भारत-गौरव-ग्रंथमाला—पुष्प १२५ वें.

# श्रीमन्महाभारतार्थ

## ( महाभारताचें सुबोध मराठी भाषांतर )



## एकादश खण्ड

१२ शांतिपर्व ( ३ मोक्षधर्मपर्व ) अध्याय २१३ ते ३६५.



न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते ।
—भगवद्गीता.

लेखक

प्रो. नरहर गणेश जोशी, एम्. ए., बी. टी.

नास्ति विद्यासमं चक्षुः नास्ति सत्यसमं तपः ।
नास्ति रागसमं दुःखं नास्ति त्यागसमं सुखम् ॥ ३२९.६.
निवृत्तिः कर्मणः पापात्सततं पुण्यशीलता ।
सद्वृत्तिः समुदाचारः श्रेय एतदनुत्तमम् ॥ ३२९. ७.
( भाषांतर पृष्ठ. ४०७ )

शके १८५८ ] किंमत ४ रुपये [ सन १९३६

# विषयानुक्रमणिका



## १२ शांतिपर्व—( पुढें चालू )

### मोक्षधर्मपर्व ३. पृष्ठें १—५१४

# दोन शब्द.

—:०:—

श्रीमन्महाभारताच्या भाषांतराचा हा अकरावा खण्ड वाचकांच्या हातीं देण्याचा सुयोग आज येत आहे ही परमेश्वराची कृपा होय. हा खण्ड प्रसिद्ध होण्यास अट-कळीबाहेर विलंब लागला. शांतिपर्वासारखा वेदांतपर कठिण भाग व त्यांतच लेख-कांच्या प्रकृतीची अडचण आडवी आली, त्यामुळें, हा विलंब झाला. महाभारता-सारख्या अवाढव्य ग्रंथाचें भाषांतर प्रसिद्ध करतांना अशा कांहीं अडचणी येतातच. तरी त्याकडे वाचक उदार मनानें पहातील अशी आशा आहे. शेवटीं, ज्या जगन्नियंत्याच्या कृपेनें हें भाषांतर येथपर्यंत आलें त्याच्याच कृपेनें तें शेवटपर्यंत जावो अशी त्याच्या चरणीं प्रार्थना करून हे दोन शब्द संपवितों.

**प्रकाशक.**

# श्रीमन्महाभारतार्थ

## ( महाभारताचें सुबोध मराठी भाषांतर )



## एकादश खंड



## १२ शांतिपर्व



## मोक्षधर्मपर्व ३

### अध्याय २१३ वा

[ १ गर्भवासादि दुःखनिवृत्त्यर्थ इंद्रियनिग्रहाची आवश्यकता. ]

( १ ) भीष्म—हे भरतर्षभा, अनात्मस्वरूपी पदार्थ आत्मस्वरूपी आहेत, अशी जी बुद्धि होते, तिला कारण रजोगुण व तमोगुण होतात. त्याचप्रमाणें क्रोध, लोभ, भय, दर्प हे देखील त्या दोन गुणांमुळेंच उत्पन्न होणारे आहेत. ह्या क्रोधादिकांचा त्याग केल्यानें मनुष्याला शुद्धता येते. तें परब्रह्म विश्वव्यापक, सर्वदेवश्रेष्ठ, अक्षय, अव्यय, अव्यक्तस्वरूपी व सर्वांहून पर आहे, असें ज्ञानवान् लोक म्हणतात. त्या परमात्म्याच्या मायेनें मनुष्यें व्याप्त झालेलीं असल्यामुळें त्यांचें ज्ञान व विचारशक्ति हीं नष्ट झालेलीं असतात. ज्ञान नष्ट झाल्यावर अर्थातच मनुष्यांचा क्रोधाशीं संबंध जडतो. क्रोधामुळें कामाची प्राप्ति होऊन नंतर लोभ-मोह हे अंगीं जडतात. पुढें आपल्या स्वतःविषयीं पूज्यताबुद्धि उत्पन्न होऊन उच्छृंखलता उत्पन्न होते. नंतर

अहंकार उद्भवतो. अहंकारामुळेंच क्रिया घडून त्यांमुळें स्नेहसंबंध जडतो आणि त्या स्नेहामुळें पुढें शोक भोगावा लागतो. स्नेहामुळें सुखदुःखात्मक क्रिया घडून त्यांपासून जन्ममरणाची प्राप्ति होते. त्यानंतर शुक्रशोणितांमध्यें जन्म होऊन गर्भवास प्राप्त होतो. त्या ठिकाणीं मलमूत्र, रक्त इत्यादि घाणेरड्या पदार्थांमध्यें दिवस काढावे लागतात. अशा रीतीनें काम-क्रोधादिकांनीं पछाडलेला असूनहि तो प्राणी त्यांच्याच मागें लागलेला असतो.

हें संसारचक्र चालविण्याला कारण म्हणजे स्त्रियाच आहेत, असें जाणावें. अविद्या जशी जीवाला बद्ध करून सोडते, तशाच ह्या स्त्रिया पुरुषांना बद्ध करून सोडतात. म्हणून मनुष्यांनीं या स्त्रियांचा आधीं त्याग करावा. ह्या कृत्यांप्रमाणें अत्यंत भयंकर स्वरूपाच्या असून अविचारी पुरुषांना मोहित करून सोडितात. इंद्रियांना वेधून टाकणाऱ्या ह्या प्रत्यक्ष रजोगुणाच्याच मूर्ति असल्या-मुळें त्यांच्याविषयीं प्रेमभाव उत्पन्न होतो आणि ह्या प्रेमरूपी बीजाच्या योगानेंच प्राण्यांची उत्पत्ति होते. ज्यांना आपण आपल्यासमान समजत नाहीं, अशा कृमि इत्यादिकांचा जसा आपण त्याग करितों, त्याचप्रमाणें जे कोणी आपले नसून ज्यांना आम्ही पुत्र समजतों, त्यांचाहि त्याग केला पाहिजे. शुक्र-शोणितापासून पुत्रादिकांची व घर्मादिकांपासून कृमींची उत्पत्ति होत असते. म्हणून शहाण्या मनुष्यानें या दोहोंचीहि सारखीच उपेक्षा केली पाहिजे.

रजोगुण हा तमोगुणाच्या ठायीं लीन होणारा असून सत्त्वगुण हाहि रजो-गुणामध्यें लीन होणारा आहे. हा तमोगुण ज्ञानाला आच्छादित करून बुद्धि व अहंकार यांना उत्पन्न करितो. जीवांना देहप्राप्ति होण्याचेंहि कारण हींच होय. अज्ञान व त्याचें कार्य यांचें अधिष्ठान जीव होय. कालानें निश्चित करून ठेविलेल्या कर्मांप्रमाणें जीवाला या संसारचक्रामध्यें फिरावें लागत असतें. स्वप्नामध्यें हा जीव आपण देहवान् आहों, असें समजून तेथील पदार्थांचे ठिकाणीं जसा रममाण होतो, त्याप्रमाणें कर्ममूलक गुणांनीं या जीवाचा गर्भा-मध्यें देहाशीं संबंध जडतो. नंतर पूर्वसंस्कारानुरूप त्याच्या मनांत ज्या ज्या विषयाचें अहंकारयुक्त स्मरण होतें, त्या त्या विषयाचें ग्राहक इंद्रिय प्राप्त होतें. अशा रीतीनें अस्तित्वांत येणाऱ्या त्या प्राण्याची श्रवणावर वासना राहिली असल्यामुळें कर्णाची उत्पत्ति होते. रूप पाहण्याची इच्छा झाल्यामुळें नेत्र उत्पन्न होतात. गंध घेण्याची वासना राहिल्यामुळें नासिका व स्पर्शाच्या इच्छेनें त्वचा

यांचा संबंध जडतो. त्याचप्रमाणें देहधारणेला आवश्यक अशा प्राण, अपान, व्यान, उदान आणि समान अशा पांच वायूंची उत्पत्ति होऊन देह बनतो.

याप्रमाणें पूर्वकर्मानुसार इंद्रियें तयार होऊन त्यांचें शरीर होतें व त्या शरीरामध्यें हा जीव ज्याच्या आरंभीं, मध्यें व अंतीं मानसिक व शारीरिक दुःखच आहे, असा जन्म घेतो. गर्भामध्यें जीवाला देह व इंद्रियें यांशीं संबंध घडून व अहंकार वाढून दुःखांचा स्वीकार करावा लागतो व त्यामुळें शरीराबरोबर दुःखहि वाढत असतें. जन्माला कारणभूत अशा वासनांचा त्याग केल्यानें त्या दुःखांचा शेवट होतो व त्यामुळें मनुष्य दुःखमुक्त होतो. इंद्रियांचा प्रलय रजोगुणामध्येंच होत असून त्यांच्या उत्पत्तीलाहि रजोगुणच कारण आहे. म्हणून शहाण्या मनुष्यानें शास्त्रदृष्टि ठेवून योग्य प्रकारें त्यांचें सूक्ष्म निरीक्षण करीत असावें. ज्यानें विषयांला बाजूला सारून ठेविलें आहे, अशा मनुष्याचीं ज्ञानेंद्रियें विषयांकडे जात नसतात. अशा रीतीनें इंद्रियें विषयांपासून निवृत्त होऊन क्रमाक्रमानें त्यांचा वियोग झाला असतां जीवाला पुनः देहप्राप्ति होत नाहीं. १२. ३. २१३.

## अध्याय २१४ वा.

[ १ इंद्रियनिग्रहोपायाचें भीष्माकडून युधिष्ठिरास कथन.

( १ ) भीष्म—आतां हे युधिष्ठिरा, इंद्रियनिग्रह कसा करावा, याविषयी उपाय तुला सांगतों. शास्त्रदृष्टीनें तत्त्वज्ञान प्राप्त करून घेऊन शमदमादिकांच्या आचरणानें मनुष्याला उत्तम गति मिळते. सर्व प्राण्यामध्यें पुरुष हा श्रेष्ठ असून त्या पुरुषांमध्यें ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य हे श्रेष्ठ गणले असून त्यांमध्येंहि वेदज्ञ ब्राह्मण हे श्रेष्ठ होत. जे ब्राह्मण वेदशास्त्रज्ञ असून ज्यांचीं परब्रह्मविषयक मतें निश्चित झालीं आहेत, जे सर्वज्ञ असून सर्वद्रष्टे आहेत, ते सर्व प्राण्यांचा जणुंकाय प्राणच होत. नेत्रहीन मनुष्याला ज्याप्रमाणें मार्गानें एकटा जात असतां अनेक प्रकारचे कष्ट भोगावे लागतात, त्याचप्रमाणें ज्ञानहीन मनुष्याची गति असते आणि म्हणूनच ज्ञानसंपन्न पुरुष लोकांत श्रेष्ठ गणिले आहेत. धर्मकामी लोक शास्त्रानुसार आपल्या इच्छेला येईल, त्या धर्माचें आचरण करितात. परंतु वाणी, देह आणि मन यांचें पावित्र्य, त्याचप्रमाणें क्षमा, साम, धृति आणि ईश्वरस्मरण या गुणांशिवाय त्यांना मोक्षप्राप्ति होणें शक्य नाहीं

आणि म्हणूनच सर्व धर्मांमध्यें ह्या उत्कृष्ट गुणांची आवश्यकता असल्याचें धर्मज्ञ लोक सांगत असतात.

ब्रह्मचर्य म्हणून जें परब्रह्मस्वरूप सांगितलें आहे तें सर्व धर्मापेक्षां श्रेष्ठ असल्यामुळें त्याच्या आचरणानें मोक्षप्राप्ति होते. याचें आचरण केल्यानें पंचप्राण, मन, बुद्धि, पंच ज्ञानेंद्रियें आणि पंच कर्मेंद्रियें यांशीं संबंध घडत नसून शब्दस्पर्शादि विषयांचाहि संबंध घडत नसतो. श्रवणद्वारें याचें श्रवण, तसेंच नेत्रद्वारें याचें स्वरूपज्ञान होईल किंवा वाणीनेंहि याचें वर्णन करितां येईल; तथापि त्या दोषरहित ब्रह्मचर्याचें स्वरूप बुद्धीनेंच जाणण्याजोगें आहे. या ब्रह्मचर्याचें योग्य रीतीनें पालन केलें असतां ब्रह्मलोकाची प्राप्ति होते. मध्यम रीतीनें आचरण करणारास देवलोकप्राप्ति होते आणि निकृष्ट रीतीनें पालन करून राहणारास अन्य जन्मीं श्रेष्ठ ब्राह्मणत्व प्राप्त होतें. हें ब्रह्मचर्यव्रत अत्यंत दुष्कर आहे. त्याचें आचरण कसें करावें, यासंबंधीं उपाय मी सांगतों, ऐक. ब्रह्मचर्याचें पालन करूं इच्छिणाऱ्या ब्राह्मणानें प्रथमतः उत्पन्न होऊन वृद्धिंगत होणाऱ्या रजोगुणाचा निग्रह केला पाहिजे. स्त्रियांच्या गोष्टींकडे त्यानें केव्हांहि लक्ष देऊं नये, तसेंच वस्त्ररहित स्थितींत त्यांचें कधींहि दर्शन घेऊं नये. कारण त्यांचें दर्शन घेतल्यास दुर्बल मनुष्याच्या अंगांत रजोगुणाचा प्रवेश होतो. अशाप्रकारें ब्रह्मचर्य पालन करणारा मनुष्य प्रेमबद्ध झाला असतां त्यानें तीन दिवस सकाळीं, तीन दिवस संध्याकाळीं भोजन करावें व पुढें तीन दिवस अयाचित वृत्तीनें जें मिळेल त्यावर रहावें; पुढें तीन दिवस त्यानें कांहींहि खाऊं नये. असें कृच्छ्रव्रत त्यानें पाळावें. फारच पीडा झाल्यास त्यानें पाण्यामध्यें प्रवेश करून रहावें.

स्वप्नामध्यें वासना उत्पन्न झाल्यासहि पाण्यामध्यें प्रवेश करून तीन वेळ अघमर्षण मंत्राचा जप करावा. अशा रीतीनें ज्ञानवान् मनुष्यानें आपल्या अंतःकरणांतील रजोरूपी पापाचें दहन करून टाकावें. ज्याप्रमाणें अपवित्र आंतडीं हीं शरीराचीं बंधनें आहेत, त्याचप्रमाणें शरीर हें आत्म्याचें बंधन आहे, मनुष्याच्या शरीरांतील रस शिरांच्या जाळ्यांमधून पसरून वात, पित्त, कफ, रक्त, त्वचा, मांस, स्नायु, अस्थि आणि मज्जा यांना पुष्ट करीत असतात. या शरीरांत दहा धमन्या असून त्या अन्नरसाच्या दानानें पंचेंद्रियांची विषयग्रहणशक्ति वाढवीत असतात. यांशीं संबद्ध आणखी सहस्रावधि सूक्ष्म धमन्या शरीरामध्यें पसरल्या आहेत. त्या धमन्या म्हणजे नद्याच असून त्या

देहरूपी सागराला अन्नरसानें भर पाडीत असतात. नद्या ज्याप्रमाणें समुद्राला तृप्त करितात, त्याप्रमाणें या शिरारूपी नद्याहि देहसमुद्राला योग्य कालीं तृप्त करीत असतात. हृदयाच्या मध्यभागीं मनोवहानामक एक शीर असून ती मनुष्याच्या शरीरामध्यें संकल्पानें उत्पन्न होणारें वीर्य सर्व गात्रांपासून आकर्षण करून घेते व जननेंद्रियाकडे पोंचविते. सर्व गात्रांमध्यें पसरलेल्या त्या मनोवहानामक शिरेला लागून दुसऱ्या अनेक शिरा आहेत. त्या नेत्रांना लागल्या असून त्यांतून तेजोगुण वाहत असतो.

ज्याप्रमाणें दुधामध्यें लुप्त असलेलें लोणी रवीनें घुसळल्यानें निघतें, त्याप्रमाणें संकल्पामुळें स्त्रियांच्या दर्शनस्पर्शनादिकांनीं चित्त क्षुब्ध होऊन शुक्र उत्पन्न होतें. स्वप्नामध्यें सुद्धां अंतःकरणाच्या संकल्पानें मनोविकार उत्पन्न होऊन त्या मनोवहाशिरेमधून शुक्र बाहेर पडतें. अन्नरस, मनोवहा आणि संकल्प या तिहींपासून शुक्रोत्पत्ति होते, असें अत्रिऋषींनीं म्हटलें आहे. याची देवता इंद्र असल्यामुळें याला इंद्रिय ही संज्ञा प्राप्त झाली आहे. हें शुक्र प्राण्यांमध्यें संकर उत्पन्न करणारें आहे, असें ज्या विरक्त पुरुषांना वाटतें, त्यांचे सर्व दोष दग्ध होऊन त्यांना पुन्हां देहप्राप्ति होत नाहीं. अंतःकरणप्रवृत्ति योगाकडे लावून योगबलानेंच निर्विकल्प स्थिति साधावी आणि अंतकालीं सुषुम्नेमध्यें प्राणांना आणून ठेवावें, म्हणजे मनुष्य मुक्त होतो. उत्पन्न होणारे सर्व पदार्थ हे सर्व मनाचीं स्वरूपें असल्याचें ज्ञान मनाला होतें आणि प्रणवाची उपासना केल्यानें महात्म्यांचीं मनें वासनामुक्त होऊन तीं निरंतर प्रकाशमान व शक्तिसंपन्न होतात. म्हणून मनाचा नाश करण्यासाठीं निष्पाप कर्मे करीत रहावें, म्हणजे रजोगुण व तमोगुण यांचा नाश होऊन इष्ट सिद्धि (मोक्ष) प्राप्त होते. तारुण्यामध्यें मिळविलेलें ज्ञान वृद्धावस्थेमध्यें मलिन होऊन जातें. परंतु परिपक्क बुद्धीच्या मनुष्याच्या पूर्वभाग्यानें त्याच्या संकल्पमय मनाचा नाश होऊन ज्ञानप्राप्ति होते आणि दुर्गम मार्गांतून ज्याप्रमाणें कुशल प्रवासी वाट काढून पार पडतो, त्याप्रमाणें या संसारबंधनांपासून मनुष्य मुक्त होतो आणि मोक्षसुख मिळवितो. १२. ३. २१४.

## अध्याय २१५ वा.

[ १ ब्रह्मप्राप्तीच्या उपायाचें कथन. २ निर्दोष वाणीला मित भाषणाची आवश्यकता. ३ अंतःकरणाचा निग्रह हें परब्रह्मप्राप्तीचें साधन आहे. ]

( १ ) ज्यांचा शेवट अत्यंत दुःखकारक आहे, अशा इंद्रियविषयांच्या ठिकाणीं जडल्यानें प्राणी क्लेश पावत असतात आणि जे त्यांमध्यें आसक्त होऊन राहत नाहींत, ते महात्मे उत्तम गतीला जात असतात. जन्म, जरा आणि मृत्यु यांच्या योगानें जे शारीरिक आणि मानसिक कष्ट होतात, ते पाहून विचारी मनुष्यानें सर्वदा मोक्षासाठीं झटावें. कायावाचामनेंकरून शुद्ध रहावें आणि अहंकार सोडून द्यावा. ज्ञानवान् भिक्षूनें शांत वृत्ति ठेवून व निस्पृह राहून भिक्षावृत्तीनें सुखी रहावें. मन भूतदयेमुळें सुद्धां एकाद्याच्या ठिकाणीं स्नेहबद्ध होऊन राहतें, तेव्हां जग हें कर्माचें फळ आहे, हें ओळखून त्या आसक्तीपासून दूर रहावें. जें कांहीं बरेंवाईट कर्म आपण करीत असतों, त्याचें फल आपणाला भोगावें लागतें. म्हणून बुद्धिपुरस्सर चांगलींच कर्में करीत रहावें. अहिंसा, सत्यवचन, सर्व भूतमात्रांच्या ठिकाणीं आर्जव, क्षमा आणि सावधपणा हे गुण ज्याच्या अंगीं आहेत, तो सुखी असतो. म्हणून बुद्धीनें मन शांत ठेवून प्राण्यांचे ठिकाणीं आसक्त होण्यापासून त्याचा निग्रह करावा. दुसऱ्याचें वाईट करण्याचें कधींहि चिंतन करूं नये, अयोग्य वस्तूची इच्छा करूं नये किंवा अबद्ध गोष्टीचा विचारहि करूं नये.

मनुष्यानें प्रयत्नपूर्वक मन ज्ञानाकडे लावावें. तसेंच वेदांतश्रवणानें अथवा फलप्राप्त्यर्थ सतत प्रयत्नानें अज्ञ मनुष्याचेंहि अंतःकरण ज्ञानाकडे वळतें. धर्म अत्यंत सूक्ष्म असल्यामुळें चांगलें भाषण करूं इच्छिणाऱ्यानें खरें बोलावें व कोणालाहि पीडा होईल असें वागूं नये. त्याची वाणी सर्वदा निर्दोष असावी. ती वाणी शाठ्यरहित असावी. कठोर, दुष्टपणाची किंवा कपटयुक्त असूं नये. त्यानें अहंकाराचा त्याग करून आपलें भाषणहि थोडक्यांत करावें. सर्व जग वाणीवर अवलंबून असल्याकारणानें ती शुभ असावी. वैराग्यशील मनुष्यानें आपलीं अशुभ कर्में वाणीनें उच्चारावीं. कारण अशुभ कर्मांचा उच्चार केल्यानेंच तीं नष्ट होतात. रजोगुणानें इंद्रियें युक्त झालीं असतां अर्थात् तीं प्रवृत्तिपर बनलीं असतां मनुष्य कर्म करूं लागतो आणि ह्या लोकामध्यें दुःखी होऊन शेवटीं नरकाला जातो. ह्यासाठीं मनुष्यानें कायावाचामनेंकरून इंद्रियनिग्रह

करणें आवश्यक आहे. ज्याप्रमाणें कळपांतून मेंढी चोरणारे लोक भीतीनें दुसऱ्याच आडमार्गानें जात असतात, त्याप्रमाणें अज्ञानी लोक कर्मांचा भार धारण करून संसारमार्गाकडे वळतात. परंतु आपला मार्ग धोक्याचा आहे, असें समजतांच जसा तो मेंढी टाकून सुखानें जातो, त्याप्रमाणें सुखाची इच्छा करणाऱ्यानें रज आणि तम या गुणांनीं युक्त कर्मांचा त्याग करावा, म्हणजे तो मुक्त होतो.

( २ ) ज्या मनुष्यानें वासनेचा त्याग केला आहे, जो सर्व विषयांपासून मुक्त झाला आहे, जो एकांतवासांत राहत असतो, जो सात्त्विक आहार करून तपस्वी व आत्मनिग्रही असतो, ज्ञानाच्या योगानें ज्याचे सर्व क्लेश नष्ट झाले आहेत, जो सर्वदा योगमायेंतच रममाण झालेला असतो, असा बुद्धिवान् पुरुष अंतःकरणाच्या निग्रहानें परब्रह्माची प्राप्ति करून घेतो. ज्ञानसंपन्न बुद्धिवान् मनुष्यानें बुद्धीला आंवरावें, बुद्धीनें मनाला आंवरावें आणि मनानें सर्व विषयांना आंवरून टाकावें. ह्याप्रमाणें इंद्रियें आणि मन हीं वश केलीं असतां सर्व इंद्रियें प्रकाशमान होऊन ब्रह्मरूप बनतात. सर्व इंद्रियें मनामध्यें एकत्र मिळालीं असतां त्यांमध्यें ब्रह्म प्रकाशमान होऊन हळुहळू सत्त्वमय बुद्धीचाहि लोप होतो आणि योगी ब्रह्मस्वरूप बनतो. योग्यानें आपलें योगैश्वर्य कधीं प्रगट करूं नये, तर त्यानें निरोधप्रधान योगमार्गाचें आचरण करून ब्रह्मप्राप्तीच्या प्रयत्नास लागावें.

( ३ ) हें योगसाधन करीत असतां वृत्तीच्या स्वाधीन न होतां अर्थात् इंद्रियें स्वाधीन ठेवून योगानुष्ठान केल्यानें परब्रह्मप्राप्ति होते. धान्याचे कण, शिजविलेले उडीद, जवांचें पीठ, फळमूळें, इत्यादिकांचा आहार योग्यानें करावा. त्यानें देशकालानुसार सात्त्विक आहार करावा. आरंभिलेलें कार्य त्यानें मध्यें कधीं सोडून देऊं नये. तर इंधनानें जळत राहणाऱ्या अग्नीप्रमाणें ज्ञानाच्या योगानें त्याला वाढवीत जावें. असें केल्यानें सूर्याप्रमाणें देदीप्यमान परब्रह्मस्वरूपाचें ज्ञान योग्याला होतें. ज्ञानाच्या ठिकाणीं अज्ञानाचाहि संबंध जडला असून तें अज्ञान तीनहि जाग्रत्, स्वप्न आणि सुषुप्ति या अवस्थांमध्यें तसेंच असतें. ज्याला अज्ञानानें आत्म्यापासून निर्माण झालेल्या वस्तू त्याहून वेगळ्या आहेत, असें वाटतें व ज्याला आत्मा त्रिगुणातीत असूनहि त्यांच्यांशीं संबद्ध आहे, असें भासतें, त्याच्या बुद्धीमध्यें ज्ञानाचा प्रादुर्भाव होतांच अज्ञानाचा नाश होतो.

अशाप्रकारें ज्ञान झालें असतां वय, जरा, मृत्यु इत्यादिकांवर जय मिळवून तो अमर, अव्यय आणि सनातन असें ब्रह्म मिळवितो. १२.३.२१५.

## अध्याय २१६ वा.

[ १ ब्रह्मचर्याचरण करणाऱ्यास निद्रात्याग करण्याची आवश्यकता. २ स्वप्नदशा-निरूपण. ३ रजोगुण व तमोगुण यांचा आश्रय केल्यानें परब्रह्मप्राप्ति होत नसते. ]

( १ ) **भीष्म**—निष्पाप ब्रह्मचर्याचें सर्वदा पालन करणाऱ्या योग्यानें स्वप्न-दोषांचा विचार मनांत आणून निद्रेचा सर्व प्रकारें त्याग करावा. कारण स्वप्ना-मध्यें मनुष्य रजोगुण व तमोगुण ह्यांच्या आधीन होऊन जातो आणि त्याची जागृतींतील विषयासंबंधीं स्मृति नष्ट होऊन नव्या देहांत शिरल्याप्रमाणें त्याची स्थिति होते. म्हणून परमात्मज्ञानाची इच्छा करणाऱ्यानें ज्ञानाभ्यास करण्यासाठीं व त्याचें नित्य मनन करण्यासाठीं सदैव जागृत रहावें. येथें कोणी असें विचारील कीं सर्व इंद्रियें लीन झालीं असतां आपण विषयी मनुष्या-प्रमाणें कांहीं क्रिया करीत आहों असें मनुष्याला वाटतें, याचें कारण काय ?

( २ ) यावर योगेश्वर हरीनें जें उत्तर दिलें आहे, तें महर्षीनीं वर्णिलें आहे. तें असें कीं, इंद्रियें थकून स्वस्थ पडलीं असतां मन मात्र लीन झालेलें नसतें, त्यामुळें स्वप्नदशा येते, असें पंडित लोक म्हणतात. ह्यासंबंधीं दृष्टांत देण्यांत येतो. तो हा कीं, जागेपणीं मनुष्य एखाद्या कार्यामध्यें तल्लीन होऊन गेला असतां त्याचेसंबंधी वेगवेगळे मनोरथ त्याचे मनांत उठत असतात. तसेंच संकल्परूपानें मनांत असणाऱ्या गोष्टी स्वप्नामध्यें दिसूं लागतात. पूर्वजन्मार्जित कर्मानुसार विषयांत आसक्त झालेल्या मनुष्याच्या मनावर हे संस्कार उमटत असतात व तेच स्वप्नामध्यें दिसत असतात. हे सर्व संकल्प अंतःकरणामध्यें सूक्ष्मरूपानें असतात आणि सर्वसाक्षीभूत आत्म्यालाहि त्यांची आठवण असते. पूर्वकर्मानुसार उत्पन्न झालेल्या सत्त्वादि गुणांपैकीं ज्या गुणांचा संस्कार मनावर होतो, त्याप्रमाणें पंचात्मक सूक्ष्म रूप दिसत असतें आणि त्या गुणाला अनुसरून मनुष्याला सुख-दुःख होतें. नंतर तें अनु-भवणाऱ्या पुरुषामध्यें सात्त्विक, राजस आणि तामस हे गुण उत्पन्न होतात.

ह्या स्वप्नांना वात, पित्त आणि कफ हे कारणभूत असून अज्ञानामुळें तीं टाळतां येण्याजोगीं नाहींत. ह्या स्वप्नांतील गोष्टी रजोगुण व तमोगुण यांनीं व्याप्त झालेल्या असतात. हीं स्वप्नें योगबलावांचून दुसऱ्या कशानेंहि टाळतां येण्यासारखीं नाहींत. इंद्रियें प्रसन्न असलीं म्हणजे मन ज्या ज्या वस्तूंविषयीं संकल्प करितें, त्या त्या वस्तूंची प्राप्ति स्वप्नांत होऊन तें आनंदित होतें. कारण हें व्यापक मन सर्व भूतांच्या ठिकाणीं आत्म्याच्या प्रभावानुसार अकुंठित राहिलें आहे.

(३) या आत्म्याचें ज्ञान नीट करून घ्यावें. त्याच्या ठिकाणींच सर्व तत्त्वें आहेत. सुषुप्तीमध्यें स्वप्नाचें द्वार जो स्थूल देह तो मनामध्यें लीन होऊन राहतो. मन हें त्या शरीरासह अव्यक्त व सदसत् वस्तु ज्यावर अवलंबून राहतात, त्या आत्म्यामध्यें लीन होऊन जातें व तो आत्मा सर्वसाक्षी होतो. ज्या योग्याला ज्ञान, वैराग्यादि दिव्य गुणांची प्राप्ति आपणाला व्हावी, अशी इच्छा असते, त्याचें अंतःकरण शुद्ध असलें पाहिजे. शुद्धांतःकरणी मनुष्याच्या ठिकाणींच सर्व देवतांची वस्ती आहे. तपाच्या योगानेंच मनाची अशी स्थिति होते. मनुष्य तमाच्या–अज्ञानाच्या–पलीकडे गेला असतां तो सूर्याप्रमाणें प्रकाशतो. अज्ञानाचा नाश झाल्यावर त्रैलोक्याचें कारण जो जीव तो परब्रह्मरूप पावतो. पूर्वीं देवांनीं अग्निहोत्रादि रजोगुणात्मक तप केलें आणि दैत्यांनीं दंभदर्पादि तमोगुणांच्या क्रिया केल्या. म्हणून ह्या ज्ञानस्वरूप ब्रह्माची प्राप्ति देवासुरांनाहि झाली नाहीं. सत्त्व, रज आणि तम हे देव आणि असुर यांमध्यें दिसून येतात. त्यांपैकीं सत्त्वगुण हा देवांचा असून इतर दोन रजोगुण व तमोगुण हे असुरांचे आहेत. ज्ञानस्वरूप ब्रह्म हें अमर, स्वयंप्रकाश व अक्षर असून तिन्ही गुणांच्या पलीकडे आहे. जे शुद्धांतःकरणी पुरुष या ब्रह्माला ओळखतात, त्यांना उत्तम पदाची प्राप्ति होते. ज्ञानदृष्टीनें योग्याला हेतुवादानें याचें ज्ञान करून देणें शक्य आहे. अक्षरब्रह्माचें ज्ञान होण्यास इंद्रियांना विषयांपासून परावृत्तच केलें पाहिजे. १२. ३. २१६.

---

## अध्याय २१७ वा.

[ १ प्रवृत्ति-निवृत्तिकथन. २ प्रकृति-पुरुषनिरूपण. ३ शारीर व मानस तप यांचें निवेदन. ४ अंतकाळीं तृष्णात्याग हाच मोक्षप्राप्तीचा उपाय होय. ]

( १ ) **भीष्म—ज्याला स्वप्न, सुषुप्ति आणि सगुण-निर्गुण ब्रह्माचीं स्वरूपें ह्यांचें ज्ञान नाहीं, तसेंच वेदामध्यें सांगितलेल्या दृश्यवस्तु आणि अव्यक्त चिदात्मा यांचीहि ओळख पटली नाहीं, त्याला परब्रह्मज्ञान झालें नाहीं. ह्यांपैकीं दृश्यवस्तु ह्या केवळ मृत्युमुख असून चिदात्मा हा मरणशून्य आहे. वेदानें प्रवृत्तिलक्षणधर्मांचें कथन केलें असून सर्व चराचर त्रैलोक्यानें त्याचेंच अवलंबन केलें आहे. निवृत्त्यात्मक जो धर्म तो ब्रह्मप्राप्तीचें साधन आहे. अर्थात् तो अव्यक्त व शाश्वत ब्रह्म आहे. प्रवृत्तिमार्गाचें लक्षण ब्रह्मदेवानें सांगितलें आहे. प्रवृत्तिमार्ग हा पुनर्जन्म देणारा असून निवृत्तिमार्ग हा मोक्षाला पोंचविणारा आहे. म्हणून निवृत्तिनिष्ठ मननशील पुरुषाला मोक्षप्राप्ति होते. तत्त्ववेत्त्यानें प्रकृति, पुरुष या उभयतांहूनहि श्रेष्ठ जो परमात्मा त्याचें ज्ञान प्रथमतः संपादन केलें पाहिजे. शहाण्या मनुष्यानें ह्या परमात्मस्वरूपाला क्लेशादिकांचा संपर्क नाहीं, हें जाणावें.**

( २ ) प्रकृति, पुरुष या दोहोंना आदि व अंत नसून त्यांना स्वरूपहि नाहीं. तीं नित्य व अचल आहेत. तसेंच तीं महत्तत्त्वापेक्षांहि श्रेष्ठ आहेत. एवढे ह्या दोहोंचे सारखे धर्म असून पुढील भेद त्यांमध्यें दिसून येतात. प्रकृति ही सर्गधर्मिणी अर्थात् सृष्टि उत्पन्न करणारी असून तिच्यांत सत्व, रज आणि तम हे तीन गुण आहेत. याच्या उलट स्वरूप पुरुषाचें आहे. तो प्रकृतीचे सर्व विकार जाणणारा असून सर्व गुणांपलीकडे आहे. आतां पुरुष व ब्रह्म हीं दोन्ही चिद्रूप असल्यामुळें इंद्रियातीत आहेत. त्यांचें स्वरूपज्ञान होण्यासारखें कांहीं ज्ञापक नसून तीं अलिप्त आहेत. परंतु यांमध्यें भेद दिसून येतो त्याचें कारण उपाधि होय. ज्याप्रमाणें मनुष्याच्या मस्तकावर पागोटें असून त्याच्या तीन पट्ट्यांनीं तें मस्तक वेष्टित असतें, त्याप्रमाणें आत्मा हा सत्त्व, रज आणि तम या तीन गुणांनीं युक्त असला, तरी या गुणांशीं त्याचा कांहीं संबंध नसतो. यावरून प्रकृति व पुरुष यांचें साधर्म्य व वैधर्म्य, तसेंच पुरुष व ब्रह्म यांमधील साधर्म्य व वैधर्म्य वर सांगितलेल्या हेतुवरून कळून येण्यासारखें आहे. हें ज्ञान झाल्यानें मनुष्य कधींहि मोह पावत नाहीं.

( ३ ) ज्याला आपलें कल्याण व्हावें, अशी इच्छा असेल, त्यानें शुद्धांतःकरणानें शरीरसाध्य असे दारुण नियम करून निष्काम तपाचें आचरण करावें. हें त्रैलोक्य देदीप्यमान आंतरतपानें व्याप्त असून सूर्य आणि चंद्र हे देखील आकाशांत त्याच तपाच्या योगेंकरून प्रकाशत आहेत. ज्ञान हें तपाचेंच फल आहे. तप हें ज्ञानाचें साधन असल्यामुळें तपाला ज्ञान ही संज्ञा प्राप्त झाली आहे. रज आणि तम यांचा नाश करणें हें तपाचें स्वरूप होय. ब्रह्मचर्य आणि अहिंसा यांना शारीरतप म्हणतात. वाणी आणि मन यांचें उत्तम प्रकारें नियमन करणें हें मानसतप होय. ज्याला शास्त्रविधि ठाऊक आहे, अशा ब्राह्मणापासून मिळविलेलें अन्न श्रेष्ठ मानिलें आहे. आहारनियम असला म्हणजे रजोगुणापासून उत्पन्न झालेल्या पापाचा नाश होतो आणि इंद्रियें विषयांपासून निवृत्त होतात. म्हणून योग्यानें शरीराला आवश्यक तेवढें अन्न मात्र घ्यावें. द्रव्यादि कांहीं घेऊं नये व जें ज्ञान त्याला योगानें अशा रीतीनें प्राप्त होईल, तें त्यानें संतुष्ट राहून अंतःकरणामध्यें ठेवावें. आत्मा रजोगुणापासून मुक्त झाला असला तथापि मुक्त न होतां सूक्ष्म देह धरून सूक्ष्म इंद्रियांसह त्याला आशांमध्यें रहावें लागतें. वैराग्याचे योगानें तो कर्मापासून मुक्त होतो. प्रकृतीच्या पलीकडील परब्रह्माची प्राप्ति त्याला होत नाहीं.

स्थूल, सूक्ष्म आणि कारण या तीनहि शरीरांपासून जेव्हां योगी मुक्त होतो, तेव्हां तो तत्काळ मोक्षाला जातो. जोंपर्यंत देह आहे, तोंपर्यंत सावधानतेनें योगामध्यें दक्षतेनें राहून वागल्यास मनुष्य स्थूल, सूक्ष्म आणि कारण या तीनहि देहांपासून मुक्त होऊन मोक्षाला जातो. अज्ञानामुळेंच मनुष्याला जन्ममरण हीं असतात. ब्रह्मज्ञान झालें असतां धर्माधर्म यांचें कारणच उरत नाहीं. त्याचे योगानें पूर्वींच्या पुण्यपापांचा नाश होतो व पुढें त्यांचा संबंध जडत नाहीं. जो आत्मा नव्हे, तो आत्मा आहे, असें जे समजतात, त्यांचें लक्ष्य दृश्य वस्तूंच्या उत्पत्ति-नाशांकडे लागलें असल्यामुळें त्यांना मोक्षाची आशा नाहीं. जे तपानें देहधारण करून बुद्धीनें विषयांपासून अंतःकरणाला परावृत्त करितात, आणि अन्नमयादि कोशांचा त्याग करून प्राणइंद्रियें यांची आत्मत्वानें उपासना करितात, ते अशा रीतीनें सर्वांहून श्रेष्ठ अशा उत्तम लोकाला जातात. तेथें आपल्या बुद्धीनें आत्म्याचें ज्ञान त्यांना होतें. योगाभ्यासानें ज्यांची बुद्धि शुद्ध झाली आहे, ते इतर कोणत्याहि आश्रयाची इच्छा न करितां परब्रह्मींच लीन होतात. कांहीं लोक धारणेला विषयीभूत अशा (श्रीकृष्णादि)

सगुणमूर्तींची आत्मा समजून त्यांची उपासना करितात; कित्येक अविद्योपाधियुक्त परब्रह्माची आराधना करितात, तर कित्येक शबल ब्रह्माहून श्रेष्ठ अशा निर्गुण ब्रह्माचा पुनः पुनः अनुभव घेतात. ह्या अक्षर परब्रह्माला शास्त्रांत विद्युत् ही संज्ञा दिली आहे. तपाच्या योगानें पातक दग्ध होऊन गेलें असतां महात्मे लोक अंतकाळीं आपल्या योगसामर्थ्यानुरूप एकदम किंवा क्रमाक्रमानें परब्रह्माला जाऊन मिळतात. ज्याचा स्थूल देहाविषयींचा अभिमान गळून गेला आहे व ज्यानें विरक्त होऊन योगमार्गाकडे आपलें मन लाविलें आहे, तो ब्रह्माशीं मिळून जातो. श्रुतीमध्यें सांगितल्याप्रमाणें कोणतीहि उपासना करणाऱ्या लोकांना दिव्य शरीराची प्राप्ति होऊन त्यांचे दोष नाहींसे होतात आणि ते ब्रह्ममय होऊन मोक्षाला जातात.

( ४ ) अशा रीतीनें वेदवेत्त्या लोकांनीं परब्रह्माचें साधन अशा धर्माचें कथन केलें आहे. आपल्या ज्ञानानुसार परमात्म्याची उपासना करणारा कोणीहि मनुष्य परम गतीला जातो. ज्यांनीं विरक्ततेनें आपलें मन योगाकडे लाविलें आहे, ते आपल्या ज्ञानबलानें परम गतीला जाऊन पोंचतात. ज्यांनीं ज्ञानप्राप्तीकडे लक्ष्य दिलें आहे, ते मृत्युलोकापासून मुक्त होऊन व पुढें रजोगुणहीन होऊन श्रेष्ठ लोकाला जातात. ज्यांना निर्मल व शाश्वत ज्ञानाची प्राप्ति झाली आहे, ते उत्तम लोकांना जाऊन आपल्या सामर्थ्यानुसार मुक्त होतात. आशा टाकून आपल्या ठिकाणींच असणाऱ्या हरीला जे ओळखतात, ते स्वतः अविनाशी होऊन त्यांना पुनर्जन्माची प्राप्ति होत नाहीं व ते श्रेष्ठ स्थान मिळवून सर्वदा आनंदांत राहतात. हें ब्रह्मज्ञान अशा प्रकारचें असून तें ज्ञान्यांना मात्र आहे, अज्ञान्यांना नाहीं. हें जगत् आशेनें बद्ध असून चक्राप्रमाणें नित्य फिरत आहे. ज्याप्रमाणें कमळाच्या अंतर्भागीं सर्वत्र बिसतंतु असतात, त्याप्रमाणें देहामध्यें आदि व अंत यांविरहित तृष्णातंतू भरून आहेत. ज्याप्रमाणें कोष्टी धोट्यानें वस्त्रांत सूत सारीत असतो, त्याप्रमाणें आशारूपी धोट्यानें संसाररूपी सूत्र मनुष्याला आंवळून बद्ध करीत असतें. विकार, प्रकृति, पुरुष व सनातन यांचें ज्ञान ज्या वितृष्ण पुरुषाला होतें, तो मुक्त होतो. सर्व प्राण्यांवर अनुग्रह करण्याच्या इच्छेनें प्रभु नारायणानें हें मोक्षप्राप्तीचें साधन स्पष्ट सांगितलें आहे. १२. ३. २१७.

---

## अध्याय २१८ वा.

[ १ राजा जनकाला मोक्षप्राप्तीचें ज्ञान होऊन तो मोक्ष कसा पावला, म्हणून धर्माचा भीष्माला प्रश्न. २ भीष्म त्याला जनक-पंचशिखसंवादाचें कथन करितो. ]

( १ ) **युधिष्ठिर**—हे इतिहासज्ञा, मिथिलाधिपति जनक राजा याला कोणत्या आचरणानें मानुष भोगांचा त्याग होऊन तो मोक्षज्ञ झाला व अंतीं मोक्ष पावला ?

( २ ) **भीष्म**—तो धर्मज्ञ राजा जनक ज्याच्या योगानें मोक्षपद पावला, त्यासंबंधी एक प्राचीन कथा इतिहास म्हणून सांगत असतात. ती अशी आहे. पूर्वीं मिथिलानगरीमध्यें जनकवंशामध्यें जनदेव ( जनक ) नांवाचा राजा होऊन गेला. तो ब्रह्मज्ञानासंबंधी विचारांत एकाग्रपणें अगदीं गढून जात असे. त्याच्या वाड्यामध्यें शेंकडों आचार्य राहत असून ते त्याला निरनिराळ्या आश्रमांतील लोकांचे वेगवेगळे मार्ग दाखवीत असत. त्यांच्यामध्यें मरण व पुनर्जन्म यासंबंधीं चाललेले वाद व त्यांचे शास्त्रविरोधी सिद्धांत ऐकून त्या राजाला समाधान वाटत नसे. एके वेळीं कोणी एक पंचशिख नांवाचा महामुनि सर्व पृथ्वी फिरत फिरत मिथिला नगराला आला. त्याला संन्यासविषयक धर्म आणि तत्त्वज्ञानसंबंधीं सिद्धांत पूर्णपणें अवगत होते. त्यानें आपलें कर्तव्य ठरविलें असून तो सुख-दुःखादि द्वंद्वांच्या पलीकडे गेलेला होता. त्याला कोणत्याच गोष्टींत संशय येत नसे. त्या सर्व ऋषींमध्यें वासनांनीं व्याप्त न झालेला असा हा एकटाच आहे, असें त्यासंबंधीं सर्व बोलत असत. शाश्वत आणि आत्यंतिक अशा दुर्लभ सुखाचा उदय मनुष्यांमध्यें व्हावा, अशी त्याची मोठी इच्छा होती. त्यांला सांख्य लोक कपिल म्हणत असत आणि हा परमर्षि प्रत्यक्ष ब्रह्मदेवच आहे, असें त्यांस वाटत असे.

ह्या पंचशिखाच्या रूपानें भगवान् कपिलच अवतीर्ण होऊन सर्वांना विस्मित करून सोडीत आहे, असें वाटत असे. तो आसुरीचा प्रथम शिष्य असून चिरंजीवी असल्याचें लोक सांगत असतात. त्यानें एक सहस्र वर्षें मानसयज्ञ केला होता. त्याची ऊहापोहशक्ति उत्तम प्रकारची होती. पंचरात्रयज्ञाचें त्याला उत्तम ज्ञान होतें. त्याला अन्नमय, प्राणमय, मनोमय, विज्ञानमय आणि आनंदमय अशा पांचहि कोशांचें उत्कृष्ट ज्ञान होतें. त्यानें त्या कोशांची उपासनाहि केली होती. शम, दम, उपरति, तितिक्षा आणि समाधान हे पांचहि गुण त्याच्या अंगीं

होते. पंचकोशांपलीकडील जें परब्रह्म त्याचेंहि ज्ञान त्याला उत्तम होतें. म्हणून त्याला पंचशिख हें नांव पडलें होतें.

एके वेळीं हा एकटा बसला असतां कपिलमतानुयायी मुनिमंडळ त्याकडे आलें. तेव्हां अन्नमयादि पांच कोश ज्यावर अवलंबून असतात, त्या परब्रह्मासंबंधीं प्रश्न त्यानें तेथें केला. आसुरीला हें ज्ञान अध्ययनानें व तपाच्या योगानें कळत होतें. देह व आत्मा यांमधील भेदहि त्याला पूर्णपणें कळत होता. तसाच तो दिव्यदृष्टिहि होता. त्यानें पंचशिखाला निरनिराळ्या स्वरूपांत असणाऱ्या अव्यक्त परब्रह्माचें निवेदन केलें. पुढें पंचशिख हा त्या आसुरीचा शिष्य झाला. तेथें कोणी एक कपिला नांवाची ब्राह्मणस्त्री होती. तिनें आपल्या पुत्रवत् त्याला दूध पाजिलें. म्हणून त्याला कापिलेय हें नांव पडलें. त्याची बुद्धि सर्वदा ब्रह्माकडे लागलेली असे.

याप्रमाणें भगवान् मार्कंडेयानें हा कापिलेयाचा वृत्तांत मला सांगितला, तसेंच त्याला कापिलेय ही संज्ञा प्राप्त कशी झाली आणि त्यानें उत्तम सर्वज्ञत्वहि कसें संपादन केलें हेंहि कथन केलें. जनकराजाची सर्व आचार्यांवर समदृष्टि असल्याचें जाणून हा धर्मज्ञ पंचशिख त्याकडे गेला आणि आपल्या सप्रमाण भाषणांनीं त्या शेंकडों आचार्यांस त्यानें थक्क करून सोडलें. तें त्या पंचशिखाचें ज्ञान पाहून जनकाचें प्रेम त्यावर बसलें आणि आपल्या त्या शंभर आचार्यांना सोडून तत्त्वज्ञानार्थ तो त्याच्यामागें लागला. त्या परमसमर्थ परंतु अत्यंत नम्र झालेल्या जनक राजाला त्यानें उपनिषदांमध्यें सांगितलेलें मोक्षज्ञान सांगितलें. जनकाला त्यानें प्रथमतः जन्मामुळें उत्पन्न होणारें, नंतर कर्मांमुळें उत्पन्न होणारें व शेवटीं, जीविताच्या सर्व स्थितींत प्राप्त होणारें दुःख कथन केलें. ज्याकरितां मनुष्यें धर्मसंबंध ठेवितात आणि कर्मफलांची इच्छा करितात, त्या विनाशी, अनिश्चित व अनिश्चयात्मक देहादि मोहाविपर्यींहि त्यानें सांगितलें. तो म्हणाला, ‘ संशयवाद्यांच्या मतें ह्या देहाला मरण येत असल्याचें आपण प्रत्यक्ष पाहत असूनहि शास्त्रावर विश्वास ठेवून आत्मा हा देहाव्यतिरिक्त आहे, असें म्हणणें म्हणजे पराजय कबूल करण्यासारखेंच आहे. आत्म्याचाहि मरणाबरोबरच नाश होतो. क्लेश, मृत्यु, जरा आणि व्याधि यांनीं आत्म्याचा नाश होत असतां केवळ अज्ञानानें आत्मा देहाहून निराळा आहे, असें म्हणणें बरोबर नाहीं.’

आतां जगांत मुळींच जें नाहीं, तें आहे, असेंच जर समजावयाचें तर ज्या राजाला आपण ‘ तूं अजर व अमर होशील, ’ असा आशीर्वाद देतों,

त्याला जरा व मरण हीं कधींच येतां कामा नयेत. एखादी वस्तु आहे किंवा नाहीं, असा प्रश्न उपस्थित झाला असतां व ती वस्तु प्रत्यक्ष नसल्याचीं लक्षणें डोळ्यांपुढें स्पष्ट दिसत असतां आपण काय केलें पाहिजे? अनुमान आणि शास्त्र ह्या दोहोंलाहि मूलभूत म्हटलें म्हणजे प्रत्यक्ष प्रमाण हें होय. प्रत्यक्ष प्रमाणानें शास्त्रांतील भेद कळून येत असतो. प्रत्यक्ष प्रमाणाप्रमाणें अनुमानानें आत्मा शरीराहून भिन्न असल्याचें ठरत नाहीं. अर्थात् ज्याला जीव असें म्हणतात, तो नास्तिकांच्या मतें शरीराहून भिन्न नाहीं. 'ज्याप्रमाणें एकाच वडाच्या बीजांमध्यें फलें, फळें, डहाळ्या वगैरे अनेक प्रकार आपणास दिसतात, गाय गवत खाते व पाणी पिते, त्यापासून दूध, तूप इत्यादि नाना पदार्थ उत्पन्न होतात, कित्येक पदार्थ पाण्याशीं एकजीव होऊन कांहीं काळ तसेच राहिले असतां त्यांपासून मादक द्रव्यें उत्पन्न होतात, त्याचप्रमाणें एकाच वीर्यापासून मन, बुद्धि, अहंकार आणि चित्तादिक हीं उत्पन्न होतात. जड शरीरापासून अजड चैतन्याचीहि उत्पत्ति होते. हें चैतन्य लोहाला ज्याप्रमाणें लोहचुंबक चालना देतो, त्याप्रमाणें इंद्रियसमुदायाला चालवितें. सूर्यकांतमण्याचा सूर्यकिरणांशीं संबंध जडला असला कीं अग्नि उत्पन्न होतो. अग्नीपासून उत्पन्न होणाऱ्या पाण्याला ज्याप्रमाणें अग्निच शोषून टाकितो, त्याप्रमाणें महाभूतांपासून उत्पन्न झालेल्या देहादिकांचा भोक्ताहि महाभूतांहून दुसरा कोणी नाहीं.'

पांचभौतिक देह व आत्मा हीं दोन्हीं एकच असा सिद्धांत मांडून आत्म्याच्या उत्पत्तीचीं म्हणून जीं कारणें वर सांगितलीं, त्यांची उपपत्ति लागत नाहीं. कारण, पंचमहाभूतांचें रूप दृश्य आहे व तीं जड आहेत. तेव्हां, दृश्यस्वरूपी व जड पंचमहाभूतांच्या संघातानें अदृश्य व अजड आत्म्याची उत्पत्ति कशी संभवते? कारण व कार्य यांच्यांत जें समानधर्मत्व असावयास पाहिजे, तें या ठिकाणीं नाहीं. कार्याचे धर्म कारणांत असावयास पाहिजेत; कोणत्याहि कारणापासून तद्विलक्षण असें कार्य उत्पन्नच होऊं शकत नाहीं. तस्मात् दृश्य व जडभूतांच्या संघातापासून अदृश्य व अजड आत्मा उत्पन्न होतो, असें म्हणणारांचा पक्ष लंगडा पडतो.

जड पंचमहाभूतांपासून देह व देह आणि आत्मा भिन्न नसल्यामुळें आत्मा उत्पन्न होतो असें मानणारा चार्वाकपक्ष जरी याप्रमाणें लंगडा पडला, तरी आत्म्याची—देहाची—उत्पत्ति संघातापासून होते असें मानणारा दुसरा एक पक्ष

आहे. यांच्यांत व चार्वाक पक्षांत फरक इतकाच कीं यांचा हा संघात जड वस्तूंचा नाहीं. हा पक्ष बौद्धांचा होय. यांच्या मतें जगाचे इहपरलोकींचे व्यवहार रूप, विज्ञान, वेदना, संज्ञा व संस्कार या अमूर्त पंचस्कंधांच्या संघाताच्या जोरावर चालतात. अविद्या, संस्कार, विज्ञान, नाम, रूप, षडायतन, स्पर्श, वेदना, तृष्णा, उपादान, भव, जाति, जरा, मरण, शोक, परिदेवना, दुःख, दुर्मनस्ता हीं क्रमानें पुढच्या पुढच्या गोष्टींचीं कारणें होत. म्हणजे अविद्ये-पासून संस्कार, संस्कारापासून विज्ञान, विज्ञानापासून नाम, नामापासून रूप इत्यादि यांचा क्रम होय, असें या पक्षाचें मत आहे. अविद्या, कर्मचेष्टा व इतर दोषांचा संसर्ग, लोभ, मोह, हीं देहोत्पत्तीचीं कारणें होत, असें हे बौद्ध म्हणतात. पीक उत्पन्न होण्याला ज्याप्रमाणें जमीन, बीं व पाऊस हीं लागतात, तशीं देहोत्पत्तीला अविद्या हें क्षेत्र, पूर्वजन्मकृत कर्म हें बीज व वासनांचा उद्भव हें जल, यांची जरूर लागते. यांच्या संघातानें देहोत्पत्ति होते असें यांचें म्हणणें आहे. या अविद्यादिकांचा संघात प्रलयकालीं देखील संस्काररूपानें शिल्लक रहातो व म्हणूनच एक मरणशील देह नाहींसा झाला तरी या संस्काररूपानें अस्तित्वांत असणाऱ्या अविद्यादि संघातापासून देहांतराची उत्पत्ति शक्य आहे. हा देह ज्ञानानें दग्ध झाला म्हणजे त्यालाच मोक्ष म्हणतात. स्वरूप, जातिधर्म, शुभाशुभ, बंधमोक्ष इत्यादि कारणांनीं संघातांपासून उत्पन्न होणारे हे देह एकमेकांपासून भिन्न असतील तर एकाद्या विवक्षित देहाचे ठिकाणीं पूर्वीचा तो हाच असा प्रत्यय कसा येईल ? म्हणून बौद्धांचें हें म्हणणें खरें नाहीं. त्यांच्या मतानें सर्व वस्तू क्षणिक आहेत. तेव्हां, त्यांचें संधानहि क्षणिकच. तसेंच आलयविज्ञान, बाह्यविज्ञान असे त्यांच्या ज्ञानस्वरूपाचे दोन प्रकार आहेत. नुसत्या 'अस्मिते'चें ज्ञान हें बौद्धमतानें आलयविज्ञान होय व रूपादिगुणांचें ज्ञान हें बाह्यविज्ञान होय.

असा भेद असल्यामुळें एका क्षणीं नष्ट झालेल्या संघाताहून पुढच्या क्षणाला उत्पन्न होणारा संघात भिन्न असूं शकेल. मग या भिन्न संघातांतून उत्पन्न होणारा देह पूर्वीचाच असा प्रत्यय कसा येईल? पूर्वीचाच संघात टिकतो म्हणावें तर सर्व क्षणिक आहे, हा बौद्धांचाच सिद्धांत त्यांच्या आड येतो. सारांश, संघातापासून देहोत्पत्ति होते हा सिद्धांत टिकत नाहीं. विनाशकालीं विस्खलित झालेल्या अविद्यागोष्टींचा पुनः तसाच संघात होईल व तसाच पूर्वीसारखा देह त्यांतून निर्माण होईल अशी खात्री देतां येत नाहीं व

हा सिद्धांत मानल्यानें भोग व मोक्ष यांच्या बाबतींत हा अनवस्थाप्रसंग येईल. मोक्षाची इच्छा एकाला, साधनें दुसऱ्यापाशीं व प्रत्यक्ष मोक्ष तिसऱ्यालाच अशी आपत्ति ओढवेल; मग असा गोंधळ माजल्यावर दान, विद्या, तपश्चर्या इत्यादिकांची थोरवी ती काय व यांच्याकरतां खटपट काय म्हणून करावयाची, असा प्रश्न सहजच कोणीहि विचारील. एकाच्या सुखकारक कर्मांनीं दुसराच सुखी होईल व दुःखकारक कर्मांनीं दुसराच एखादा दुःखी होईल.

मनुष्यांच्या सुखदुःखांचा किंवा दृश्यादृश्यत्वाचा निर्णय याप्रमाणें अनिश्चित स्वरूपाचा होऊन बसेल. एका शरीराचा नाश झाला तरी त्यापासून तसल्याच स्वरूपाचें दुसरें शरीर निर्माण होतें असें म्हणावें व त्यामुळें एकात्मतेचा व अन्यत्वाचा प्रत्यय येतो असें समजावें, तर तेंहि शक्य नाहीं. कारण, एकात्मतेचा प्रत्यय येण्यासाठीं मूळ स्वरूप कायम पाहिजे. शरीराला मुसळांनीं चेंचून नाहींसें केलें, त्याचा आकार नष्ट केला, तरी वस्तुतः त्याचें मूळ स्वरूप कायम असतें, तसें येथें होत नाहीं. एका संघाताचा उत्पत्तीनंतर दुसऱ्या क्षणींच समूळ नाश होतो. सारांश या प्रकारानें बौद्धमत कोणत्याच युक्तिवादाला टिकत नाहीं. थंडी, ऊन, ऋतु, संवत्सर, कलियुगादि कालखंड किंवा सुखदुःख हीं जशीं नाहींशीं होतात, तशाच प्रकारें मोक्षावस्था एकदां प्राप्त होऊन पुनः नाहींशी होईल. मोडकळीस आलेल्या घराचा एकेक भाग क्रमानें जसा नाहींसा होतो, त्याप्रमाणें वृद्धपणानें ग्रासलेल्या व नाश करण्यास उद्युक्त अशा मृत्यूनें पछाडलेल्या या शरीराचा क्रमशः नाश होईल. इंद्रियें, मन, वायु, रक्त, मांस व अस्थि यांचा याच अनुक्रमानें नाश होतो व तीं आपापल्या मूलस्वरूपामध्यें विलीन होतात. तेव्हां निरनिराळ्या विज्ञानांचा आश्रय धरून रहाणारा कोणी स्थिर स्वतंत्र भोक्ता आहे, असें मानल्यास या सर्व शरीरधर्मांबरोबर व शरीराबरोबर त्याचाहि नाश व्हावयास पाहिजे. कारण, यांच्यावांचून त्याला स्वतंत्र असें अस्तित्वच नाहीं. सारांश, कर्त्याचा–भोक्त्याचा–नाश झाल्यास दानादि कर्मांचीं फळें कोणीं भोगावयाचीं ? व हीं फलें कोणींहि भोगावयाचीं नसतील तर या क्रिया तरी कशाला ? पण, जगांत लोकांचा व्यवहार दानादि क्रियांच्या ठिकाणीं चालला आहे व वेद तेंच सांगतात.

अशा प्रकारचे मनुष्याच्या मनांत उत्पन्न होणारे हे नाना पक्षोपपक्ष आहेत. यांच्यापैकीं युक्तिवादाच्या कसाला टिकणारा कोणता, हें ठरविण्याचें काम अत्यंत

कठिण आहे. या अनेक पक्षांच्या मागें लागून त्यांचा विचार करीत असतांना मनुष्याची बुद्धि यदृच्छेनें कोठेंतरी स्थिर होते आणि मग झाड जसें जेथें वाढतें तेथेंच जीर्ण होतें, तसेंच या बुद्धीचेंहि होतें. अशा तऱ्हेच्या अनर्थांमुळें सर्व प्राणी दुःखचक्राच्या फेऱ्यांत सांपडतात व महात ज्याप्रमाणें अंकुशाचा उपयोग करून हत्तींना जाग्यावर आणतात, तसेच वेद मनुष्यांना ठिकाणावर आणतात. या जगांत चांगल्या प्रकारचे सुखद अर्थ आपणांस प्राप्त व्हावे, म्हणून मनुष्य हाडाचीं काडें करितो व त्यांतच अतिशय दुःख पावल्यामुळें इच्छिलेल्या गोष्टी येथेंच ठेवून त्याला मृत्युवश व्हावें लागतें. प्राण्याचें जीवित नश्वर व अशाश्वत असल्यामुळें बंधुमित्र, आप्तइष्ट यांचा त्याला उपयोग होत नाहीं. कारण, मृत्यूचें आमंत्रण येतांच त्याला एका क्षणांत हें सर्व सोडून जावें लागतें व गेल्यावर तो पुन्हां येत नाहीं. पृथ्वी, आकाश, वायु, जल व तेज या पंचमहाभूतांनींच या शरीराचें पालन केलें आहे. हें समजल्यावर या शरीराबद्दल आसक्ति कशी उत्पन्न व्हावी? ह्या नश्वरदेहाला असल्या आयुष्यांत सुद्धां सुख नाहीं.

अशा प्रकारचें त्या पंचशिखाचें संशयरहित वाक्यांनीं भरलेलें, ज्यांत कोट्या प्रतिकोट्या नाहींत, असें सरळ व आत्मानुभवाचें भाषण ऐकून तो जनकराजा आश्चर्यचकित झाला व त्यानें पुनः प्रश्न विचारण्यास सुरवात केली. १२. ३. २१८.

---

## अध्याय २१९ वा.

[ १ जनक-पंचशिखसंवाद. ]

( १ ) भीष्म—याप्रमाणें परमकारुणिक पंचशिखानें ज्ञान सांगितल्यावर देखील मृत्यूनंतर बंध किंवा मोक्ष प्राप्त होतो कीं नाहीं याबद्दल फिरून जनकानें प्रश्न केला.

**जनक**—हे भगवन्, मृत्यूनंतर मनुष्याला कसलीच संज्ञा जर शिल्लक रहात नाहीं, तर ज्ञान काय किंवा अज्ञान हीं काय दोन्हीं सारखींच निष्फळ होत. मग यांचा उपयोग काय? झोंप किंवा मूर्च्छा यांमध्यें ज्याप्रमाणें संज्ञा नष्ट होते, तशीच ती मृत्यूनंतर होत असेल व अत्यंत विस्मृतिरूप मोक्षांतसुद्धां

हा संज्ञानाश तसाच रहात असेल, तर या जन्मांतील ज्ञान, अज्ञान, प्रमत्तता किंवा अप्रमत्तता यांचा उपयोग काय ? हे द्विजश्रेष्ठा, अशा स्थितींत मनुष्यांनीं यमनियमादि साधनांनीं इहलोकीं जें मिळविलें, तें सर्व शरीराबरोबरच मृत्युवश होऊन नष्ट होणार असेल, तर त्याच्याविषयींचा यत्न सर्वथा निष्फळ ठरण्याची पाळी येईल. मग या विनाशी भूतांचा संसर्ग ( पंचमहाभूतांचा संसर्ग, जन्म ) कोणाला व काय हेतूनें प्राप्त होतो, तसेंच या भूतांचा असंसर्ग ( मोक्ष ) कोणाला व कां मिळतो याचा निश्चय मला सांग.

भीष्म—हे युधिष्ठिरा, गोंधळून गेलेल्या रोग्याप्रमाणें दिङ्मूढ झालेल्या व मोहग्रस्त अशा त्या राजाला बोध करण्याच्या इच्छेनें कविश्रेष्ठ पंचशिख जनकाला म्हणाला—

" मनुष्यप्राणी जगांत जीं कर्में करतो त्याचें पर्यवसान विशिष्ट शरीराचा नाश व्हावा हें नव्हे, किंवा दुसऱ्या एकाद्या विशिष्ट शरीराची प्राप्ति व्हावी, हेंहि पण नव्हे. आपल्याच गळ्यांत असलेल्या सोन्याच्या कंठ्याचें आपल्याला विस्मरण झालें म्हणजे तो नाहीं, अशी आपली भावना होते व तो हाताला लागला म्हणजे आहेसें वाटून आनंद होतो. वस्तुतः कंठा कोठें गेला नव्हता व कोठून आलाहि नाहीं. स्वरूपानंदाची स्थिति तशीच आहे. मनुष्याचें शरीर, इंद्रियें आणि मन या त्रिकूटाच्या संघातामुळें कर्म शक्य होतें. यांपैकीं एक नष्ट झालें, तरीहि संघाताचा नाश होऊं शकतो. कर्माच्या बाबतींत हीं तीन्ही एकमेकांच्या आश्रयानें असल्यासारखीं दिसतात. हीं शरीरादिक म्हणजे आत्म-स्वरूप नव्हे. पृथ्वी, आप्, तेज, वायु व आकाश हीं पांच भूतमात्रांच्या उत्पत्तीचीं उपादानकारणें होत. हीं जगत्कारण जो स्वभाव ( सांख्यशास्त्राप्रमाणें ' स्वभाव ' हें एक जगदुत्पत्तीचें कारण मानलें जातें ) त्याच्यामुळें एकत्र येतात व विस्ख-लित होतात, तींहि त्याच्याचमुळें होतात. शरीरामध्यें जो पोकळ भाग असतो, तें आकाश, जो प्राण तो वायु, जी उष्णता तो अग्नि, रक्त वगैरे जीं द्रव्यें तें आप् व अस्थि वगैरे कठिण पदार्थ ती पृथ्वी. येणेंप्रमाणें शरीर हा पंचमहा-भूतांचा संघात होय.

" या शरीराचे सुद्धां जरायुज, अंडज, स्वेदज, उद्भिज्ज इत्यादि प्रकारचे भेद आहेतच. तें सुद्धां एकरूप नाहीं. बुद्धि, सर्व शरीरांत खेळणारा वायु व जठराग्नि हीं तीन या शरीरांतील कार्यांचीं कारणें आहेत. इंद्रियें,

त्यांनीं सेवन करण्याचे नाना प्रकारचे भोग, त्यांचे स्वभावधर्म, त्यांच्यांतील चैतन्य, संकल्प-विकल्पांच्या उतरंडी रचणारें व मोडणारें मन, प्राण, अपान व विकार हीं येथेंच उत्पन्न होतात. या आठांपैकीं मनापर्यंतच्या ज्या गोष्टी त्यांचें कारण बुद्धि, प्राण व अपान यांचें कारण वायु, विकारांचें—खाल्लेल्या किंवा प्यालेल्या पदार्थांचें रक्तमांस बनणें पचणें, इत्यादिकांचें–कारण जाठराग्नि होय. कान, त्वचा, जीभ, डोळे व नाक हीं पंचकर्मेंद्रियें हें चित्ताचें कार्य होय. या इंद्रि-यांनीं शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध या विषयांचा उपभोग घेतां येतो, म्हणून यांनाच ते ते विषय (गुण) म्हटलें. यांमध्यें ईश्वरांशभूत असलेली जी चिदात्मिका वृत्ति ती लालसा, द्वेष व औदासिन्य अशी तीन प्रकारची असते. ही चेतना सुखा, दुःखा व अदुःखाऽसुखा अशी त्रिविध आहे. शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध व विषयांचीं दृश्य (मूर्त) स्वरूपें, हीं सहा मनुष्याला आमरणांत जें ज्ञान होतें, त्याचीं कारणें होत.

"भोगलालसेनें केलेलीं कर्मे व त्याग हींहि या इंद्रियांच्याच द्वारानें होतात. सर्व प्रकारचा तत्त्वनिश्चय करविणारी व म्हणूनच मोक्षाला कारणीभूत होणारी जी ती बुद्धि. ही मोक्षदा म्हणून अव्यया आहे. हिलाच 'महत्' असें नांव आहे. आतांपर्यंत हा जो गुणसंघात सांगितला, यालाच आत्मा मानणाऱ्या माणसांना सम्यग् ज्ञान होत नाहीं. म्हणून तीं कायमचीं दुःखी रहातात. त्यांच्या दुःखाचा उपशम कधींच होत नाहीं. जें दृष्टीस पडतें तें आत्मस्वरूप नव्हे. दृश्य जग आत्मरूप नव्हे, इतकेंच नव्हे, तर तें मीहि नाहीं आणि माझेंहि नाहीं. असें ज्ञान ज्याला झालें त्याच्या ठिकाणीं दुःखाला चिकटून रहावयाला आधार कोणता? दुःख हें दृश्य जगताला आत्मभावानें कवटाळ-ण्याच्या भावनेंत आहे. ती भावनाच संपली म्हणजे दुःखाचें अधिष्ठानहि संपलें. त्याग कसा करावा यासंबंधाचें सर्वोत्कृष्ट असें 'सम्यग्वध' नांवाचें त्यागशास्त्र मी तुला सांगतों. हें जें शास्त्र मी तुला सांगणार आहें, त्यानें तुला खचित मोक्षप्राप्ति होईल. तें तूं सावधानपणें ऐक.

"मोक्षप्राप्ति व्हावी म्हणून निरनिराळीं कर्मे करणारे जे व्रती लोक आहेत, त्यांनीं सर्व कर्मत्याग करणें हेंच सर्वथैव उचित होय. कोणत्याहि कर्माचा त्याग न करतां शांतीचा डौल मिरविणारे जे लोक आहेत, त्यांच्यामागें अविद्यारूपी दुःखद क्लेशांची परंपरा चिकटते. यज्ञादि कर्मे द्रव्याचा त्याग व्हावा या हेतूनें, नाना प्रकारचीं व्रतें मनुष्यांनीं विषयांचा त्याग करावा या हेतूनें, सांगितलेलीं

आहेत. सुखलालसेच्या त्यागासाठीं तपश्चर्येचें विधान आहे. या सर्वांचें अंतिम ध्येय, यांची परिसमाप्ति सर्वत्यागांत आहे. सर्व दुःखाचें शमन व्हावें, एवढ्यासाठीं सांख्यशास्त्रानें हा सर्वत्यागाचा एकच एक मार्ग सांगितला आहे. या मार्गाखेरीज इतर मार्गांनीं गेल्यास दुर्गतीच प्राप्त होईल. चित्ताच्या अधिष्ठानावर स्थित असलेलीं पांच ज्ञानेंद्रियें व सहावें मन हीं मीं तुला सांगितलीं. आतां बल व पांच कर्मेंद्रियें सांगतों. हात हें निरनिराळीं कर्में करणारें इंद्रिय, पाय हें गमनशक्ति देणारें इंद्रिय, प्रजोत्पत्तीपासून उत्पन्न होणारा आनंद देणारें इंद्रिय जननेंद्रिय, निसर्गाच्या विधीला अनुसरून मलोत्सर्ग करणारें गुदेंद्रिय व शब्दविशेषांचा उच्चार करविणारें, तें वागिंद्रिय होय. पंच कर्मेंद्रियें व पंच ज्ञानेंद्रियें व अकरावी बुद्धि यांचा त्याग मनानें करावयाचा आहे.

" कर्ण हें इंद्रिय, शब्द हा विषय व चित्त हा भोक्ता हें त्रिकूट ऐकण्याच्या संबंधांत; त्वचा हें इंद्रिय, स्पर्श हा विषय व चित्त हा भोक्ता हें त्रिकूट स्पर्शाच्या बाबतींत; चक्षु हें इंद्रिय, दर्शन हा विषय व चित्त हा भोक्ता हें त्रिकूट दृष्टीच्या प्रकारांत; जिव्हा हें इंद्रिय, रस हा विषय व चित्त हा भोक्ता हें त्रिकूट रसाच्या बाबतींत; घ्राण हें इंद्रिय, गंध हा विषय आणि चित्त हा भोक्ता हें त्रिकूट वासाच्या बाबतींत. यांच्या योगानेंच शब्दादि गुणांची व त्या त्या विषयांची उपलब्धि होते. कर्ता, करण व कर्म असा जो त्रिविध भेद जगांत सांपडतो, तो यांच्याचमुळें होय. सात्त्विक, राजस व तामस हे भावहि यांच्याचमुळें होतात. या सत्त्व, रज व तम या त्रिगुणांमुळें आनंदादि भावनांचा अनुभव येतो. आनंद, सुख किंवा एक प्रकारचें मनाचें समाधान हीं ज्यामुळें सकारण वा अकारण उत्पन्न होतात, तो सत्त्वगुण; असमाधान, संताप, शोक व लोभ तसाच द्वेष हीं राजसगुणाचीं चिह्नें होत. हींहि पण सकारण किंवा अकारणच उत्पन्न होतात. अज्ञान, मोह, प्रमादशीलता, झोंप हीं तमोगुणाचीं लक्षणें होत. यांनाहि प्रकट होण्यास कारण लागतेंच असें नाहीं.

"शरीराला किंवा चित्ताला आनंद देणाऱ्या कांहीं गोष्टी घडल्या म्हणजे सात्त्विकभाव तेथें उत्पन्न झाला असें समजावें. मनाला किंवा शरीराला असमाधान व द्वेष उत्पन्न करणाऱ्या गोष्टींची प्रवृत्ति म्हणजे रजोगुणाची प्रवृत्ति व शरीराला अगर मनाला मुग्धावस्थेंत—मोहांत—टाकणाऱ्या गोष्टींचा उदय म्हणजे तमोगुणाचा आरंभ होय. या गोष्टी कां व कशा होतात याबद्दल

कांहींच तर्क चालत नाहीं व यांचें ज्ञानहि होत नाहीं. श्रोत्र हें आकाश या भूताचा आश्रय धरून रहाणारें इंद्रिय होय व शब्द हा त्याचा विषय होय. परंतु शब्दाचें ज्ञान मात्र श्रोत्र किंवा आकाश यांपैकीं कोणाच्यानेंहि होत नाहीं. 'हा शब्द' असें शब्दस्वरूपविषयक ज्ञान जसें होत नाहीं, तसेंच 'हा शब्द नव्हे,' असेंहि ज्ञान करून देण्याचें सामर्थ्य या श्रोत्रांत किंवा आकाशांत नाहीं, हीच स्थिति त्वचा, डोळे, जिव्हा, नासिका, इत्यादि इंद्रियें व त्यांच्याशीं संबद्ध असणारीं भूतें व त्यांचे स्पर्शादि विषय यांची होय. विषयांचा अनुभव घेणारें मन जाग्यावर नसेल, तर नुसत्या इंद्रियार्थ संनिकर्षानें ज्ञानहि होत नाहीं व विपरीत-ज्ञानाचा निरासहि होत नाहीं. झोंपेंतून जागा होणाऱ्या मनुष्याला शब्द-स्पर्शादि विषयांचें ज्ञान एकदम होतें. त्यासाठीं झोंप संपल्यावर त्याला हेतुपूर्वक उपन्यास करावा लागत नाहीं; यावरून इंद्रियांच्या वृत्ति सदासर्वकाळ त्यांच्याच जवळ असतात आणि म्हणूनच जागृतावस्थेंत एकदम प्रत्ययाला येतात, हें उघड होतें. त्यांत अकरावें चित्त व बारावी बुद्धि असते. तमोगुणाच्या प्रभावानें सुषुप्तिकालीं या बारांच्या—दहा इंद्रियें, अकरावें मन व बारावी बुद्धि यांच्या—ठावठिकाणाचा पत्ता नसतो—हीं एकत्र अवस्थित नसतात; म्हणून यांच्या या स्थितीमुळें आत्मतत्त्वाचा नाश होतो असें मात्र नाहीं. हीं एकत्र अवस्थित असलेलीं दिसतात.

"ही लौकिक व्यवहाराची भाषा झाली. पूर्वीं अनुभविलेले जे श्रवणादि विषय, त्यांचें स्मरण मनुष्याला रहातें व म्हणूनच जाग्रदवस्थेप्रमाणें विषयेंद्रियसंयोग स्वप्नांतहि होतो. सत्वरजस्तम या त्रिगुणांनीं युक्त असलेल्या माणसाला झोंपेंतहि स्वप्न पडतात, याचें कारण हेंच होय. अंतःकरण तमोगुणानें व्याप्त झालें म्हणजे विषय व इंद्रियें यांचें एकत्र अवस्थान नाहींसें होतें. वस्तुतः ही एकत्रा-वस्था अशाश्वत आहे. ही एकत्रावस्था नाहींशी होणें, हीच सुषुप्त्यवस्था होय. या अवस्थेंतील सुख हें अज्ञानजन्य अतएव तामस होय. हें शरीरांतच उप-भोगण्यास सांपडतें. वेदप्रतिपादित ब्रह्मानंदाचा अनुभव घेत असतांना द्वैतदर्शनाचें दुःख जरी शरीरी प्राण्याला भोगावें लागत नाहीं, तरी कांहीं माणसांच्या बाबतींत ही तामसी वृत्ति शिल्लक असतेच. सुषुप्त्यवस्था व कैवल्यप्राप्ति यांत एका दृष्टीनें साम्य असलें, तरी सुषुप्त्यवस्थेंतील सुख हें अज्ञानजन्य तामससुख व ब्रह्मानंदाचा आनंद हा वेदप्रतिपादित शुद्धानंद होय, हा या दोहोंत मोठा भेद आहे.

"स्वतःच्या अस्तित्वाचें भान असणें, आपण अमुक केलें अशी आठवण शिल्लक रहाणें, वगैरे जे प्रकार मोक्षमार्गाला विघातक म्हणून सांगितले, ते कांहीं अज्ञानी लोकांना नेहमींच चिकटून रहातात–सुटतां सुटत नाहींत. ज्ञानी पुरुष मात्र या पाशांतून मुक्त होतात. अध्यात्माचें चिंतन करणारे पुरुष, आतांपर्यंत जो संघात मीं तुला वर्णन करून सांगितला, त्यालाच क्षेत्र म्हणतात. या संघाताला उत्पन्न करणारी आपल्या मनांतील जी बीजभूत भावना, ही भावना हाच क्षेत्रज्ञ होय. अशा स्थितींत गुणसंगाच्या योगानें सर्व भूतांची उत्पत्ति होत असतांना व स्वभाव हेंच त्याचें कारण असतांना आत्मोच्छेदाचा प्रश्नच उरत नाहीं. मृत्यूमुळें आत्म्याचाहि विनाश होतो हें म्हणणें टिकत नाहीं. शाश्वत आत्म्याचा नाश सर्वथा अशक्य होय. ज्याप्रमाणें समुद्राला मिळणाऱ्या नद्या आपलें व्यक्तित्व व नामरूपें टाकून देतात, मोठाले महानद सुद्धां आपलीं नांवें व व्यक्तित्व हीं समुद्रार्पण करितात, तशीच सत्त्वसंक्षयाची स्थिति आहे. जीव हा नेहमींच सोपाधिक रहाणार; तेव्हां मृत्यूनंतरच्या निरुपाधिक स्थितीमध्यें 'मी अमुक' हें भान जीवाला कोठून असणार? असो.

"आतांपर्यंत हें जें मोक्षशास्त्र–सांख्यशास्त्र–सांगितलें, तें यथार्थ रीतीनें जाणून जो अप्रमत्त राहून आत्मचिंतन करतो, त्याला अनिष्ट अशीं कर्मफलें भोगावीं लागत नाहींत. कमलाच्या पानाला जसें पाणी चिकटत नाहीं, तशीं कर्मफलें याला चिकटत नाहींत. फलाशेनें देवतांना उद्देशून निरनिराळीं कर्में करण्याचे दैवी पाश किंवा कन्यापुत्रांच्या प्रेमाचे पाश तोडून मनुष्य ज्या वेळेस सुखदुःखातीत होतो, त्याच वेळेस त्या–अलिङ्ग–विषयेंद्रियें व मन यांनीं विमुक्त–अशा पुरुषाला परमश्रेष्ठ अशी मुक्तीची गति मिळते. श्रुतिप्रणीत सिद्धांत व त्यांतच सांगितलेलीं शमदमादि मंगल साधनें यांच्या आधारावर मनुष्यप्राणी जरा व मृत्यु यांचें भय धरीत नाहीं व निश्चिंत असतो. पुण्य व पाप हीं दोन्हीहि नष्ट झालीं व त्यांचें सुखदुःखात्मक फलहि संपलें म्हणजे हृदयाकाशांत राहून–दृष्टि अंतर्मुख करून–अनासक्त पुरुष महत्तत्वाच्या ठिकाणीं असलेलें जें निर्लेप, निर्गुण असें आत्मतत्त्व त्याचें चिंतन करितात. कोळ्याला खालीं पाडण्याचा प्रयत्न केला तरी तो आपण विणलेल्या जाळ्यांतच घिरट्या घालीत रहातो. तशाच प्रकारें मनुष्य दुःखांतून सुटण्याची इच्छा मात्र करितो; पण, त्यांतच अधिकाधिक गुरफटतो. मनुष्यानें दुःखमय गोष्टींचा त्याग केल्यावर तें दुःख पर्वतावर आपटणाऱ्या मातीच्या ढेकळांप्रमाणें नाश पावतें. रुरु

नांवाचा हरिण ज्याप्रमाणें जीर्ण शृंग टाकून जातो, किंवा सर्प जसा जीर्ण झालेली कात टाकून कोणालाहि नकळत निघून जातो, तसा मुक्तपुरुष दुःखाचा त्याग करतो. पाण्यांत पडावयास झालेल्या वृक्षाच्या ठिकाणची आसक्ति सोडून पक्षी ज्याप्रमाणें त्यावरून उडून जातो, त्याप्रमाणें हा मुक्तमनुष्य सुखदुःखांचा त्याग करून विषयेंद्रियसंघातांचा लिंगदेह बाजूस टाकून परमश्रेष्ठ अशा मोक्ष-गतीला जातो.

असो. आपलें नगर अग्नीनें अभिव्याप्त झालेलें पाहून मिथिलाधिप जनकानें बोललेलें एक वाक्य प्रसिद्ध आहे. 'अग्नीच्या योगानें माझें कांहींच जळत नाहीं,' हें तें वाक्य होय. राजानें हें वाक्य स्वतः उच्चारिलें. याप्रमाणें पंचशिखानें स्वतः सांगितलेलें अमृतासारखें मोक्षज्ञान राजानें ऐकलें व त्याच्यावर तो विचार करूं लागला. मोक्षज्ञानाच्या चिंतनानें आत्मस्वरूपाविषयीं त्याच्या बुद्धीचा ठाम निश्चय होऊन तो शोकरहित व परम सुखी झाला. हे युधिष्ठिरा, हें मोक्षशास्त्र ऐकून जो कोणी त्याचें यथार्थ रीतीनें चिंतन करितो, त्याला कपिला-पुत्र जो पंचशिख, त्याकडे येऊन जनकाला जशी मुक्ति मिळाली, तशी मुक्ति मिळते. १२. ३. २१९.

---

## अध्याय २२० वा.

[ १ दमप्रशंसा. ]

( १ ) **युधिष्ठिर**—हे भारता भीष्मा, सिद्ध पुरुषानें काय केलें म्हणजे त्याला सुख प्राप्त होतें व कोणत्या कर्मानें तो दुःखी होतो, त्याला निर्भयता कशामुळें प्राप्त होते, तें सर्व मला सांग.

**भीष्म**—वेदवेत्त्या वृद्धवृद्ध ब्राह्मणांनीं या बाबतींत दमाची अत्यंत प्रशंसा केली आहे. दमाचें अवलंबन सर्व वर्णांतील पुरुषांनीं व विशेषतः ब्राह्मणांनीं करावें. ज्याला बाह्य इंद्रियांचें दमन करितां येत नाहीं, त्याचें कोणतेंहि कार्य यथाशिस्त रीतीनें सिद्धीस जात नाहीं. कोणतेंहि कर्म–अर्थात् त्याची सिद्धि-तपश्चर्या व सत्यव्रताचें आचरण हीं सर्वच दमावर अधिष्ठित झालेलीं असतात. इंद्रियदमनाच्या योगानें तेजाची वृद्धि होते. दमन हें अत्यंत पवित्र मानलें आहे. दमनशील पुरुष सर्वदा निर्भय, पापरहित असा असतो व त्यालाच मह-त्पदाची प्राप्ति होते. दमनशील पुरुषाला झोंप सुखाची येते, तो जागाहि सुखानें

होतो; तो लोकांच्यामध्यें सुखानें वावरतो, त्याचें मन नेहमीं प्रसन्न रहातें. दमनशीलतेच्या आधारावरच तेज प्रतिष्ठित झालेलें असतें. राजस पुरुषाला मात्र कामक्रोधादि शत्रु नित्य पछाडतात व त्याच्या मनांत आत्मतत्त्वाविषयीं पृथक् भाव उत्पन्न होतो. प्राणिमात्रांना जसें राक्षसांपासून भय, तसेंच अदान्त पुरुषांपासून देखील सर्वांना भय आहे. अदान्त पुरुषांना कह्यांत ठेवण्यासाठींच ब्रह्मदेवानें राजा उत्पन्न केला. सर्व आश्रमांमध्यें दमनशील वृत्ति ही सर्वश्रेष्ठ होय.

निरनिराळ्या आश्रमांतील धर्मांच्या आचरणानें जीं जीं फलें मिळूं शकतात, त्या सर्वांहून दानवृत्तीनें रहाणाऱ्या माणसाला मिळणारें फल अत्यंत श्रेष्ठ होय. आतां दमनशीलता ही ज्यांच्यामुळें उत्पन्न होते, तीं चिह्नें तुला सांगतों, ऐक. कोणत्याहि प्रकारचें दैन्य नसणें; कोणत्याहि गोष्टीचा अभिनिवेश नसणें; संतोष वृत्ति; आस्तिक्यबुद्धि; अक्रोध; सरळपणा; लौकिकव्यवहाराविषयीं मौन; अंगीं गर्व नसणें; गुरुजनांचा आदर करण्याची बुद्धि ठेवणें; निर्मत्सरबुद्धि; दयाशील वृत्ति; भूतमात्राविषयीं कारुण्य; लोकवार्ता, खोटें भाषण, स्तुति व निंदा हीं सर्व वर्ज मानणें; इत्यादि दमनशीलतेच्या उत्पत्तीचीं कारणें होत. प्राप्तस्थितींतून भविष्यत्कालीं कशा प्रकारचें सुख अगर दुःख प्राप्त होईल, याची चिंतनिका दमनशील पुरुषानें करूं नये. त्यानें निर्वैर असावें, दुसऱ्याशीं वागण्यांत कपटवृत्ति ठेवूं नये; निंदा व स्तुति सारखी मानावी. त्याचें वर्तन व शील दोन्ही चांगलीं असावीं. त्याचें अंतःकरण प्रसन्न असून तो आत्मबलानें युक्त असा असावा. अशा मनुष्याला इहलोकीं सुखप्राप्ति होते व मृत्यूनंतर तो स्वर्गाला जातो. ज्याची सर्वभूतहिताचे ठिकाणीं प्रवृत्ति असते, जो कोणाचाहि द्वेष करीत नाहीं. एकाद्या मोठ्या गंभीर डोहाप्रमाणें जो कधींच क्षुब्ध होत नाहीं. असा आत्मज्ञानांतच नेहमीं तृप्त राहणारा मनुष्य नेहमीं प्रसन्नचित्त असतो. इतर सर्व प्राणिमात्रांना दुर्गम असें सुख त्याला प्राप्त होऊन त्यापासून तो निरतिशय आनंद पावतो. ज्याच्यापासून कोणत्याहि प्राण्याला, अगर कोणत्याहि प्राण्यापासून ज्याला, कधींच भय वाटत नाहीं, असा बुद्धिमान् व दमनशील वृत्तीचा पुरुष सर्वभूतांना वंदनीय ठरतो.

मोठ्या अर्थप्राप्तीमुळें ज्याला हर्ष होत नाहीं, किंवा संकटामुळें ज्याचा धीर खचत नाहीं तो पुरुष प्रज्ञासंपन्न होय; त्यालाच दान्त द्विज म्हणतात. वेदवेत्त्या व सच्छील ब्राह्मणांनीं केलेल्या कर्मांच्या आचरणानें पवित्र झालेल्या व दमन-

शील वृत्तीनें राहणाऱ्या माणसाला त्याच्या आचरणाचें महाफळ प्राप्त होतें. निर्मत्सरता, क्षमा, शान्ति, संतोषवृत्ति, गोड बोलण्याची संवय, सत्यप्रियता, दानशीलता, कोणत्याहि प्रकारचा आयास नसणें, हा दुरात्म्याचा मार्ग नव्हे. साधुपुरुषच या मार्गानें जातात. काम, क्रोध, लोभ, दुसऱ्याविषयीं वाटणारा मत्सर व तदनुषंगानें करावीशी वाटणारी वृथा बडबड इत्यादि सर्व गोष्टी आपल्या कह्यांत ठेवून ब्राह्मणानें जितेंद्रिय वृत्तीनें रहावें. घोर संकटांना तोंड देऊन कालाची आकांक्षा करीत धीर वृत्तीनें लोकांत ब्राह्मणानें काल काढावा. १२. ३. २२०.

---

## अध्याय २२१ वा.

[ १ अहिंसादि आचारांचें वर्णन. ]

( १ ) **युधिष्ठिर**—हे पितामहा, नाना प्रकारच्या यज्ञयागादि व्रतांचें आचरण करणारे त्रैवर्णिक, देवतांना हविर्भाग देऊन उरलेलें मद्यमांसादि अन्न, ब्राह्मण-ग्रंथांनीं त्या त्या व्रताचें म्हणून सांगितलेलें फळ आपणांला मिळावें, या इच्छेनें, खातात हें कसें ?

**भीष्म**—हे युधिष्ठिरा, वेदाला संमत नसणारीं व्रतें करून जे अभक्ष्य भक्षण करतात ते स्वेच्छाचारी होत. ते इहलोकींच पतित म्हणून गणले जातात. वेदोक्त व्रताचें आचरण करून अभक्ष्य भक्षण करणारे जे व्रतलुब्ध आहेत, त्यांनाहि कैवल्यगति मिळत नाहीं. ते स्वर्गलोकाला जातात व पुण्यक्षीण झाले म्हणजे परत मृत्युलोकाला येतात.

**युधिष्ठिर**—महाराज, पुष्कळ लोक उपवास हेंच तप होय असें म्हणतात. तेव्हां यालाच तप म्हणावयाचें किंवा तप म्हणून दुसरें कांहीं आहे ?

**भीष्म**—एक मास किंवा एक पक्ष उपवास केल्यानें तपश्चर्या झाली असें लोक समजतात. पण ही तपश्चर्या खरी नसून आत्मविद्येच्या प्राप्तीला ती विघातक आहे. तपश्चर्येचा हा प्रकार शिष्टसंमत नाहीं. कोणत्याहि प्राण्याला पीडा न होईल, अशीं कर्मे करणें व प्राणिमात्रांचा संतोष राखणें हीच तपश्चर्या होय. तपस्वी मनुष्यानें सदा उपवासी, सदा ब्रह्मचारी असावें. त्यानें नेहमीं मुनिव्रत धारण करून रहावें. ब्राह्मण हें त्याचें दैवत असावें. तो कुटुंबी असला तरी त्यानें धर्माकरितां कर्म करावें, फलप्राप्तीसाठीं कर्म करूं नये. त्यानें कधींच

झोंप घेऊं नये. त्यानें मांसभक्षण करूं नये. सदा पवित्र रहावें. देवता व अतिथि यांचें पूजन करून अमृत भक्षण करून रहावें. त्यानें विघसान्न भक्षण करून रहावें व अतिथिपूजनाचें व्रत घ्यावें, नेहमीं आस्तिक्यबुद्धि धारण करावी.

युधिष्ठिर—सदा उपवासी म्हणजे काय, तपस्वी माणसानें सदा ब्रह्मचर्यव्रत धारण करणें म्हणजे काय? विघसान्नभक्षण म्हणजे काय व अतिथिपूजनाचें व्रत तें कसलें, हें सर्व तूं मला सांग.

भीष्म—सकाळीं एक वेळ व संध्याकाळीं एक वेळ याच्या खेरीज मध्यें अन्न भक्षण न करणारा सदैव उपवासी होय. स्वस्त्रीच्या ठिकाणीं सुद्धां ऋतुकालींच गमन करणारा पुरुष नित्य ब्रह्मचारी होय. अशा माणसानें नेहमीं सत्य भाषण करावें. नेहमीं ज्ञाननिष्ठ असावें. वृथा मांसभक्षण न करणें म्हणजेच मांसाशन न करणें होय. सदा दानरत रहाणें हेंच पावित्र्य, दिवसा झोंप न घेणें म्हणजेच सदा जागरण करणें होय. घरचे नोकरचाकर व अतिथि यांचें भोजन झाल्यावर जो भोजन करतो तो अमृतभक्षण करतो. यालाच अमृतभोजन म्हणतात. हे युधिष्ठिरा, अतिथि वगैरेंचें भोजन झाल्यावांचून जो स्वतः भोजन करीत नाहीं, त्याचें भोजन हेंच अभोजन होय. या अभोजनानेंच तो स्वर्गलोक जिंकतो. देवता, पितर, भृत्य व अतिथि यांना देऊन उरलेलें खाणारा तो विघसाशी होय. असें सर्वांना देऊन उरलेलें जें अन्न त्याला विघसान्न अशी संज्ञा आहे. अशा प्रकारच्या लोकांना चिरकाल चांगल्या लोकीं वास करावयास मिळतो. त्यांच्या घरीं ब्रह्मदेव व अप्सरोगणांसहवर्तमान देव येऊन राहतात. देवता व पितृदैवत यांना देऊन उरलेलें अन्न जे भक्षण करतात, ते आपल्या पुत्रपौत्रांसहवर्तमान इहलोकीं सुखानें नांदतात व शेवटीं त्यांना उत्तम प्रकारची गति प्राप्त होते. १२. ३. २२१.

---

## अध्याय २२२ वा.

[ १ कर्मकर्तृत्वाविषयीं इंद्र-प्रऱ्हादसंवाद

(१) युधिष्ठिर—हे भरतश्रेष्ठा, या जगांत मनुष्यप्राणी जें जें शुभाशुभ फळ मिळवितो, त्या त्या कर्माचा तो कर्ता असतो कीं नाहीं, हा मला संशय आहे; तरी हे पितामहा, याविषयींचें सत्य तत्त्व सांगून माझा संशय तूं नाहींसा करावा, ही माझी इच्छा आहे.

भीष्म—हे युधिष्ठिरा, याविषयींचा एक इंद्र-प्ऱ्हाद यांचा संवाद इतिहासकार सांगत असतात. कोणत्याहि गोष्टीची आसक्ति न धरणारा, सर्व पापमल ज्याचा धुतला गेला आहे असा, सत्कुलांत जन्म घेतलेला, बहुश्रुत, निंदा व स्तुति दोन्ही ज्याला सारखीं, जितेंद्रिय, एकान्तस्थलीं वास करणारा, चराचर विश्वाचें उपादानकारण जो परमात्मा, त्याचें यथार्थ ज्ञान असणारा, अप्रिय गोष्टींनीं न रागावणारा किंवा प्रिय गोष्टींमुळें हर्ष न मानणारा, सोन्याचा गोळा किंवा मातीचें ढेंकूळ यांना सारखेंच लेखणारा, सच्चिदानंदरूप परमेश्वराचें ज्ञान मिळविण्याच्या बाबतींत धीरवृत्ति धारण करणारा, त्याबद्दल ज्याच्या बुद्धीचा ठाम निश्चय झाला आहे असा, परावर परमेश्वराचें ज्ञान ज्याला आहे, भूतमात्रांचें ज्ञान ज्याला आहे, जो सर्वांना सारख्याच दृष्टीनें पहातो, असा जितेंद्रिय प्ऱ्हाद एकदां एकांतांत बसला असतांना त्याच्या बुद्धीचा ठाव घेण्याच्या उद्देशानें इंद्र त्याजकडे जाऊन त्याला म्हणाला—

"हे प्ऱ्हादा, या जगांत प्राणी ज्या गुणांनीं लोकांत मान्यता पावतो, ते सर्व निश्चल स्वरूपाचे गुण तुझ्या ठिकाणीं आहेत असें मला दिसतें. लहान मुलांच्या प्रमाणें तुझ्या बुद्धींत पक्षपात नाहीं. तुला आत्मज्ञान झाल्यासारखें दिसतें. तेव्हां या आत्मज्ञानाचें साधन कोणतें तें मला सांग. हे राजा, तूं शत्रूच्या पाशांनीं बद्ध झालेला आहेस, स्थानभ्रष्ट झाला आहेस, शत्रूंच्या पूर्णपणें तावडींत सांपडला आहेस, तुझी संपत्ति नष्ट झालेली आहे, तुझें वैभव तुला सोडून गेलें आहे. अशा स्थितींत तुला वास्तविक शोक व्हावा. पण तो होत नाहीं, याचें कारण काय? तुला झालेलें आत्मज्ञान कीं तुझें असामान्य धैर्य? हे प्ऱ्हादा, स्वतःची शोचनीय अवस्था पाहूनहि तूं सुखरूप आहेस हें कसें?"

अशा प्रकारें इंद्रानें प्ऱ्हादाच्या विचारांना चालना देतांच तो धीरवृत्तीचा व परमेश्वरस्वरूपाविषयीं ज्याच्या बुद्धीचा ठाम निश्चय झाला आहे, असा प्ऱ्हाद आपल्याला माहीत असलेलें ज्ञान इंद्राला सांगण्याच्या उद्देशानें गोड वाणीनें म्हणालाः—

"भूतांची उत्पत्ति व प्रलय यांचें ज्ञान ज्याला यथार्थ रीतीनें झालें नाहीं त्याला अज्ञान बाधतें व या गोष्टींचें यथार्थ ज्ञान ज्याला आहे, त्याला अज्ञानाची बाधा कधींच होत नाहीं. सर्व भूतें स्वभावानेंच उत्पन्न होतात व स्वभावानेंच लयास जातात. वांसरूं जन्माला येण्याच्या पूर्वींच ज्याप्रमाणें गाईच्या रक्तमय

कांसेंत दूध आपोआप निर्माण होतें, त्याप्रमाणें सर्व भूतें प्रकृतीपासून निर्माण होतात. अपत्यवात्सल्यादि धर्म गाईच्या ठिकाणीं वांसराच्या जन्मापूर्वी नसतातच व म्हणूनच, वांसराच्या जन्माआधीं उत्पन्न होणाऱ्या दुधाचें ते कारण होऊं शकत नाहींत. तसेंच भूतोत्पत्तीचें व प्रलयाचें आहे. याप्रमाणें भूतांचें सृजन किंवा प्रलय हीं दोन्ही प्रकृतीच्या आधीन आहेत. मनुष्याला त्यांत कांहीं करतां येत नाहीं, असें ठरल्यानंतर पुरुषार्थाला अवकाशच रहात नाहीं. पुरुषार्थ याप्रमाणें निरवकाश झाला म्हणजे साहजिकच 'मनुष्य कर्ता' या भाषेला जागाच उरत नाहीं. अर्थात् आपण जी गोष्ट स्वतः करीत नाहीं, त्याचा अभिमान बाळगण्याचेंहि त्याला कारण नाहीं. शुभ किंवा अशुभ कर्मांचे कर्ते आपण आहोंत, अशी ज्याची भावना झाली, त्याच्या बुद्धींत दोष आहे, परतत्त्वाचा स्पर्श तिला झालेला नाहीं, असें मी समजतों.

हे इंद्रा, आत्मा जर कर्ता असेल तर आत्मकल्याणाच्या इच्छेनें त्यानें आरंभिलेलीं सर्व कार्यें सफलच व्हावयास पाहिजेत. त्याचा पराभव होतांच कामा नये. परंतु सुखासाठीं प्रयत्नपूर्वक झटणाऱ्या माणसांना पुष्कळदां अनिष्ट गोष्टी टाळतां येत नाहींत व इष्टफलप्राप्ति त्यांना होत नाहीं. तेव्हां, पुरुषार्थ या शब्दाला अर्थच रहात नाहीं. प्रत्येक वस्तूची उत्पत्ति व लय हीं स्वभावानुसार प्रकृतीच्या तंत्रानें होतात. दुसऱ्या कित्येकांना अनिष्टाची प्राप्ति न मागतां होते—म्हणजे संकटें त्याच्या मागें हात धुवून लागतात—व इष्ट गोष्टी त्याच्यापासून दूर पळतात. मनुष्यप्रयत्नाच्या अभावींहि अशा गोष्टी प्रकृतिधर्मानुसार घडतांना आपण पहातों. कित्येक वेळां रूपवान् व बुद्धिमान् माणसें विरूप व मूर्ख माणसांपासून द्रव्यलाभाची इच्छा धरितात. तेव्हां सुखदुःखादि फलें प्राप्त करून देणारीं कर्में यदृच्छया प्रकृतिधर्मानुसार स्वभावतःच घडतात, असें म्हणणें भाग येतें. मग यांत कोणीं कशाचा व कां अभिमान धरावा? या सर्व गोष्टी स्वभावानुसार घडतात असेंच हे इंद्रा, माझें निश्चित मत आहे. माझ्या मतें मोक्ष किंवा आत्मज्ञान हींहि प्रकृतिधर्मानें होतात, अन्य मार्गानें होत नाहींत. इहलोकामध्यें शुभाशुभ फलयोग त्या त्या प्रकारच्या कर्मांनीं मिळतात असें समजतात. कर्मांचा विषय—त्यांचें विशिष्ट कार्य—कोणतें तें मी तुला सांगतों. तें ऐक.

ज्याप्रमाणें कावळा भात खाऊं लागला म्हणजे कावकाव शब्द करून विशिष्ट ठिकाणीं अन्न असल्याचें दुसऱ्यांना सुचवीत असतो, त्याप्रमाणें कर्में हीं स्वभावाचीं—प्रकृतिधर्माचीं—द्योतक आहेत. कावळ्याचें ओरडणें हें अन्नाच्या

अस्तित्वाचें जसें सूचक, तसेंच कर्माचें अस्तित्व हें प्रकृतिधर्मांच्या व्यापारांचें द्योतक होय. ज्याला विकारात्मक जगाचेंच तेवढें ज्ञान असतें व याच्या पलीकडील मूलप्रकृतीची ज्याला ओळख पटलेली नाहीं, त्याला अज्ञानाची बाधा होते. हें ज्ञान ज्या पुरुषाला झालें त्याला अज्ञानाचा बंध जाचूं शकत नाहीं. सर्व भूतें हीं स्वभावापासूनच निर्माण झालीं आहेत, असें निश्चयात्मक ज्ञान ज्याच्या बुद्धीला झालें त्याला दर्प किंवा अभिमान काय करूं शकणार ?

हे इंद्रा, धर्मविधींचें ज्ञान मला आहे व सर्व भूतें अनित्य आहेत, याचेंहि ज्ञान मला आहे. हें सर्व अन्तवत्, नश्वर आहे, म्हणूनच याच्याबद्दल मी शोक करीत नाहीं. माझ्या ठिकाणीं ममत्वबुद्धि नाहीं, मला कर्तृत्वाभिमान नाहीं, मला वासना किंवा आशा नाहीं, मी सर्व बंधांपासून मुक्त आहें, आत्मसंतुष्ट व दुःखविमुक्त असा आहें. मला भूतांच्या उत्पत्तीचें व नाशाचें ज्ञान आहे. मी स्थितप्रज्ञ आहें, जितेंद्रिय आहें, माझ्या वासना व आकांक्षा मेलेल्या आहेत. म्हणून हे इंद्रा, ह्या लोकांची अव्यय स्थिति पाहून मला आयास होत नाहींत. मूलप्रकृति किंवा तिजपासून उत्पन्न झालेलें विकारात्मक जग यांबद्दल मला प्रमेहि नाहीं व द्वेषहि नाहीं. आज माझा द्वेष करणारा कोणी नाहीं, तसाच मला आपला म्हणणाराहि कोणी नाहीं. वर, खालीं, आजूबाजूला, म्हणजे स्वर्ग, मृत्यु, पाताळ या तीन्ही लोकांत मला आतां कसलीच आशा उरली नाहीं. मला ज्ञेयाचा ध्यास नाहीं. विज्ञानाचाहि हव्यास नाहीं. हे इंद्रा, ज्ञानाच्या ठिकाणीं कर्म शिल्लकच रहात नाहीं.

इंद्र—हे प्रऱ्हादा, ज्याच्या योगानें हें ज्ञान मिळतें, ज्यामुळें या शांतीचा लाभ होतो, तो उपाय मला नीट रीतीनें सांग.

प्रऱ्हाद—सरळपणा, अप्रमत्तता, चित्ताची प्रसन्नता, जितेंद्रियत्व व वृद्ध माणसांची सेवा यांच्यामुळें मनुष्याला महत्पदप्राप्ति होते. देवेंद्रा, प्रज्ञा स्वभावधर्मानें मिळते, शांतिलाभहि त्याच्यापासूनच होतो. ज्या ज्या गोष्टी या जनांत तुला दिसतात, त्या सर्व स्वभावधर्मानेंच होतात.

अशा प्रकारचें त्या दैत्येंद्राचें भाषण ऐकून इंद्र अत्यंत आश्चर्यचकित झाला. व त्यानें परम प्रेमानें त्या दैत्येंद्राच्या वाक्यांचा आदर केला. त्रैलोक्याधिपति इंद्रानें मग दैत्येंद्र प्रऱ्हादाची पूजा केली व त्याचा निरोप घेऊन तो आपल्या निवासस्थानीं गेला. १२. ३. २२२.

---

## अध्याय २२३ वा.

[ १ इंद्र व बलि यांचा संवाद. ]

१ ) **युधिष्ठिर**—पितामहा, कोणत्या बुद्धीच्या योगेंकरून राजा कालदंडानें चिरडून जाऊन विपद्ग्रस्त होतो व राज्यभ्रष्ट होऊन पृथ्वीवर इतस्ततः भटकत फिरतो, त्याचें कारण मला सांग.

**भीष्म**—याविषयीं इंद्र आणि विरोचनपुत्र बलि यांमधील संवाद प्राचीन इतिहास म्हणून सांगितला जात असतो, तो असा आहे—

पूर्वी सर्व असुरांना जिंकून इंद्र ब्रह्मदेवाकडे गेला आणि नमस्कार करून व हात जोडून बलीविषयीं त्याजकडे चौकशी करूं लागला. तो म्हणाला, 'हे ब्रह्मन्, जो बलि दान देऊं लागला असतां ज्याच्या संपत्तीला कधींच खळ पडत नाहीं, तो बलि मला आज कोठेंच सांपडत नाहीं. तरी तो कोठें आहे, तें मला सांग. तो वायु आहे, किंवा वरुण आहे काय? रवि किंवा चंद्र आहे काय? किंवा तो जल आहे काय? अस्ताला जाणारा आणि उदय पावून सर्व दिशा प्रकाशित करणारा तो बलिच आहे काय? जो निरलसपणें यथाकाल वृष्टि करून पाणी देतो, तो बलि आहे काय? तो बलि मला कोठें दिसत नाहीं, तरी हे ब्रह्मन्, तो कोठें आहे, तें तूं मला सांग.'

**ब्रह्मदेव**—हे इंद्रा, बलीसंबंधीं तूं मला जें विचारीत आहेस, तें ठीक नव्हे. परंतु कोणी प्रश्न केला असतां त्याला खोटें सांगणें हें योग्य नाहीं, असें असल्यावरून मी तुला आतां तो कोठें आहे, तें सांगतों. हे शचीपते, तो एखाद्या ओसाड गृहामध्यें उंट, गाई, अश्व किंवा गर्दभ यांपैकीं कोणत्या तरी श्रेष्ठ स्वरूपांत पडून राहिला असला पाहिजे.

**इंद्र**—हे ब्रह्मन्, त्या निर्जन गृहामध्यें माझी बलीशीं गांठ पडली असतां मीं त्याचा वध करावा किंवा करूं नये तें सांग!

**ब्रह्मदेव**—इंद्रा, बलीचा वध करूं नको! तो वधाला योग्य नाहीं. हे वासवा, तुला वाटेल त्याप्रकारें तूं त्याला नीतिविषयक प्रश्न विचार.

**भीष्म**—याप्रमाणें भगवान् ब्रह्मदेवानें सांगितल्यावर श्रीमान् इंद्रानें ऐरावतावर आरोहण केलें आणि बलीचा शोध करीत पृथ्वीवर फिरूं लागला. तेव्हां फिरतां फिरतां ब्रह्मदेवाच्या सांगण्याप्रमाणें एका निर्जन गृहामध्यें तो गर्दभरूपानें त्याच्या दृष्टीस पडला.

इंद्र—हे दानवा, तूं गर्दभयोनीमध्यें जन्म घेऊन कोंडा खात राहिला आहेस. तूं ह्या निकृष्ट योनीमध्यें जन्म घेतला आहेस, ह्याबद्दल तुला वाईट वाटतें काय? तूं सर्व संपत्तीला मुकला आहेस! तुझे सर्व मित्र तुला नाहींतसे झाले आहेत. तुझें सामर्थ्य आणि पराक्रम हींहि तुला सोडून गेलीं आहेत. तूं आतां शत्रूच्या स्वाधीन झाला आहेस. आजचें तुझें स्वरूप पूर्वीं कोणाच्याहि पाहण्यांत आलेलें नाहीं. हजारों वाहनांतून फिरणारा तूं पूर्वीं आपल्या ज्ञातिबांधवांसह आम्हांला ताप देत असस, त्यावेळीं तूं आम्हांला अगदीं तुच्छ समजत होतास. दैत्य तुझ्या आज्ञेंत राहून तुझ्या मुखाकडे दृष्टि लावून राहिलेले असत. तुझ्या वैभवकालीं भूमि नांगरल्यावांचून धान्य देत असे. त्या तुजवर आज असा प्रसंग आला असून त्याबद्दल तुला दुःख होत आहे किंवा नाहीं? जेव्हां तूं समुद्राच्या पूर्वतीरावर बसून ज्ञातिजनांमध्यें आपली संपत्ति वांटून देत होतास, त्यावेळीं तुझ्या मनाची स्थिति कशा प्रकारची होती? तूं पूर्वीं आपल्या वैभवांत असतां तुजपुढें सुवर्णासमान शोभणाऱ्या हजारों देवस्त्रिया नृत्य करीत असत आणि तूंहि त्यांच्यांशीं विहार करीत असस. हे दानवेश्वरा, त्यावेळीं तुझ्या मनाची स्थिति कशा प्रकारची होती? त्यावेळीं तुझें छत्र रत्नविभूषित होतें. तेव्हां सहा हजार गंधर्वांचीं सात मंडळें तुजपुढें नृत्य करीत असत. तूं यज्ञ करीत असतां एक मोठा सुवर्णस्तंभ उभारिला होतास. त्यावेळीं ब्राह्मणांला तूं लक्षावधि गाई दिल्यास. त्रेसष्ट अंगुलें लांब यष्टी फेंकीत जाऊन (शाम्याक्षेपविधीनें) ती जेथें पडेल, तेथें यज्ञ करीत तूं सर्व पृथ्वी फिरलास, त्यावेळीं तुझ्या मनाची स्थिति कशा प्रकारची होती? हे असुराधिपा, आज तुझी ती सोन्याची झारी, तें छत्र, चवऱ्या आणि ब्रह्मदेवानें दिलेली माला ह्यांपैकीं मला कांहींच दिसत नाहीं हें कसें?

बलि—इंद्रा, तुला ती माझी झारी, छत्र, चवऱ्या आणि ब्रह्मदेवानें दिलेली माळहि दिसत नाहीं. मी तीं सर्व रत्नें गुहेमध्यें—मूल प्रकृतीमध्यें—छपवून ठेविलीं आहेत. जेव्हां मला अनुकूल काल येईल, तेव्हां तीं सर्व तुझ्या दृष्टीस पडतील. मी अशा निकृष्ट दशेंत पडलों आहें आणि तूं ऐश्वर्ययुक्त आहेस. तेव्हां तूं मला हिणविणें हें तुझ्या कीर्तीला आणि कुलाला शोभणारें नाहीं. जे आत्मज्ञान प्राप्त होऊन समाधानवृत्तीनें राहणारे, क्षमाशील, सत्पुरुष आणि विद्वान् आहेत, त्यांजवर संकटप्रसंग आला तरी ते कधीं कष्टी होत नाहींत आणि वैभवकालींहि ते कधीं आनंदित होत नाहींत. हे इंद्रा, तूं



**बलि**—इंद्रा, जे आत्मज्ञान प्राप्त होऊन समाधानवृत्तीनं राहणारे, क्षमाशील, सत्पुरुष आणि विद्वान आहेत, त्यांजवर संकटप्रसंग आला असतां ते कधी कष्टी होत नाहींत आणि वैभवकालीहि कधी आनंदित होत नाहींत.

( शांतिपर्व, अ० २५३, पृष्ठ ३२. )

सामान्य मनुष्याप्रमाणें व्यर्थ फुशारकी मारीत आहेस. जेव्हां तुला माझ्या-सारखी स्थिति प्राप्त होईल, तेव्हां तूं अशा प्रकारचें भाषण कधींहि करणार नाहींस. १२. ३. २२३.

---

## अध्याय २२४ वा.

[ १ इंद्र व बलि यांचा संवाद–कालाचें अतर्क्य सामर्थ्य. ]

( १ ) भीष्म—हे भारता, तें भाषण ऐकून ज्याप्रमाणें सर्प फूत्कार टाकितो, त्याप्रमाणें सुस्कारे टाकणाऱ्या त्या बलीचें उत्कृष्ट भाषण ऐकण्याच्या इच्छेनें हंसतहंसत इंद्र पुनः त्याला बोलला.

इंद्र—हे बले, तूं पूर्वी आपल्या ज्ञातिजनांसह हजारों गाड्याघोड्यांसह सर्व लोकांना ताप देत पृथ्वीवर फिरलास. तेव्हां तुला आमची कल्पनाहि नव्हती. परंतु आतां हे बले, तुला अशा प्रकारची निकृष्ट स्थिति आली आहे, हें पाहून तुझ्या इष्टमित्रांनीं तुझा त्याग केला आहे, त्यामुळें तुला दुःख होत नाहीं का? बले, पूर्वी, सर्व लोक तुझ्या स्वाधीन असून तूं मोठा आनंदी दिसत असस; परंतु आज तुला अशी दीनवाणी स्थिति प्राप्त झाली असून तिजमुळें तुला शोक होत नाहीं काय ?

बलि—इंद्रा, कालपर्यायाला अनुसरून ह्या सर्व गोष्टी अशाश्वत आहेत, असें मला वाटतें. म्हणून त्याबद्दल मला दुःख वाटत नाहीं. जें हें सर्व आहे, त्याला नाश आहे. हे देवाधिपते, प्राण्यांचे देह आहेत, ते सर्व नाशवंत आहेत. म्हणून माझ्या ह्या स्थितीबद्दल–गर्दभदेहाबद्दल–मला वाईट वाटत नाहीं. हें मला प्राप्त झालेलें गर्दभत्वहि माझ्या अपराधाचें फळ नसून तें केवळ कालगतीनेंच प्राप्त झालेलें आहे. इंद्रा, जीवित आणि शरीर ह्या दोहोंची उत्पत्ति स्वभावतःच एकत्र होते, त्यांची वृद्धि एकत्र होते आणि त्यांचा नाशहि तसाच एकत्र होतो. हें माझें अंग मला कालगतीनेंच मिळालें आहे हें समजत असल्यामुळें मला व्यथा पावण्याचें काय कारण आहे ? इंद्रा, जलप्रवाहाचा अंत जसा समुद्रांत होतो, तसा प्राण्यांचा शेवटहि मरणांतच होत असतो. ही गोष्ट ज्यांना बरोबर समजत नाहीं, तेच मोह पावतात. रजोगुणानें व अज्ञानानें मोहित होऊन ज्यांना हें समजत नाहीं, ते संकटांत पडून दुःख पावतात आणि

त्यांची बुद्धिहि नष्ट होते. ज्ञानप्राप्तीनें मनुष्याच्या सर्व पातकांचा नाश होतो. मनुष्य पापरहित झाला असतां सत्त्वगुणाचा उदय होतो आणि तो एकदां सत्त्वनिष्ठ झाला म्हणजे त्याची वृत्ति सर्वदा आनंदित असते. ह्या सत्त्वगुणाला जे लोक मुकले असतात, त्यांना वारंवार जन्म घ्यावा लागत असतो व कामक्रोधादिकांच्या तडाक्यांत सांपडून ते क्लेश पावतात.

इंद्रा अर्थसिद्धि, संकट, जीवित, मरण आणि सुखदुःखात्मक फलें यांचा द्वेष मी करीत नाहीं किंवा त्यांची इच्छाहि करीत नाहीं. जो मनुष्य दुसऱ्या कोणाचा वध करितो, त्याचा वध कालानें केलेला असतो व तो स्वतःहि मेलेला असतो. कोणाचा वध झाला व कोणीं वध केला हें त्या दोघांनाहि कळत नसतें. जो मारितो किंवा जिंकितो अशी आपण कल्पना करितों, तो कांहीं त्या कृत्याचा कर्ता नसतो. त्याचा कर्ता निराळाच असतो. ह्या जगताची उत्पत्ति आणि नाश तरी कोण करितो ? त्या गोष्टी मनुष्याच्या हातून घडत नसून त्यांचा कर्ता कोणी निराळाच असतो. त्यांचा जो कर्ता तोच पृथ्वी, आप्, तेज, वायु आणि आकाश ह्या पंचमहाभूतांचें उत्पत्तिस्थान आहे. मग तेथें शोक तो कशाबद्दल करायाचा ? मनुष्य मोठा विद्वान् असो किंवा अल्पज्ञ असो, तो मोठा बलवान् असो किंवा अत्यंत दुर्बल असो, तो सुंदर असो अथवा कुरूप असो, तो भाग्यवान् असो अथवा अभागी असो, त्याला सर्वदा गंभीर काळ आपल्या तेजानें खेंचीत असतो. याप्रमाणें भूतमात्र कालाच्या अधीन झालें आहे, ह्याचें जर मला ज्ञान आहे, मग दुःख कशाबद्दल करावयाचें ?

कालानें पूर्वींच दग्ध करून टाकलेल्या पदार्थाला अग्नि दहन करितो किंवा आधींच कालहत झालेल्या मनुष्याचा वध मनुष्य करितो. ज्याचा नाश मनुष्य करूं इच्छितो, तो कालाकडून पूर्वींच झालेला असतो. मनुष्याला जेवढें म्हणून मिळावयाचें असतें तेवढेंच मिळतें. कालसमुद्र मोठा अफाट असून त्यामध्यें नांवाला एकहि बेट नाहीं, तसेंच अलीकडील तीर व पलीकडीलहि तीर नाहीं. पापपुण्यांपलीकडील जो हा कालविधाता त्याचें पुष्कळ विचार करूनहि मला ज्ञान होत नाहीं. माझ्या दृष्टीसमोर कालाकडून जर प्राण्यांचा नाश झाला नसता, तर हे शचीपते, मला मोठा हर्ष, गर्व आणि क्रोध हे विकार उत्पन्न झाले असते. मी गर्दभरूप धारण करून निर्जन गृहामध्यें गवताचा

कोंडा खात पडलों आहें, हें पाहून तूं माझी अवहेलना करीत आहेस. मला जर वाटेल तसें रूप धारण करण्याचें सामर्थ्य असतें तर मी वेगवेगळीं भयंकर रूपें धारण करून तुला इतकें भिवविलें असतें कीं, तीं पाहून तूं पळूनच गेला असतास! कालच सर्व कांहीं देतो व तोच सर्व घेत असतो! कालानेंच सर्व कांहीं केलें आहे. इंद्रा, तूं पौरुषाचा गर्व वाहूं नकोस!

हे पुरंदरा, पूर्वी मी क्रुद्ध झालों असतां सर्व जगत् अगदीं त्रस्त होऊन जात असे. या लोकांचा सनातन धर्म मला कळत आहे, अर्थात् त्यांची वृद्धि आणि नाश ह्या गोष्टी सतत चालू आहेत, हें मी जाणतों. हे इंद्रा, तूं सुद्धां या गोष्टीचा नीट विचार कर. आश्चर्यचकित होऊं नकोस! ऐश्वर्य आणि पराक्रम ह्या गोष्टी कोणाच्या ताब्यांतील नाहींत. तुझें चित्त आज देखील पूर्वीप्रमाणेंच अज्ञानावस्थेंत आहे. म्हणून हे इंद्रा, तूं विचार कर आणि तत्त्वज्ञानविचार लक्ष्यांत आण! इंद्रा, देव, मनुष्य, पितर, गंधर्व, सर्प आणि राक्षस हे सर्व माझ्या आधीन होते, हें तुला ठाऊकच आहे. मात्सर्यबुद्धीनें ग्रस्त झालेले लोकहि 'ज्या दिशेला विरोचनपुत्र बलीचा वास आहे, त्या दिशेला नमस्कार असो,' असें म्हणून मला शरण येत असत. परंतु हे शचीपते, तें माझें स्वरूप आतां नष्ट झालें आहे आणि त्याबद्दल मला वाईटहि वाटत नाहीं. माझी निश्चित बुद्धि झाली आहे कीं मी आतां विधात्याच्या स्वाधीन आहें. एखादा मनुष्य थोर कुलामध्यें झालेला असतो, तो अति सुंदर असतो, प्रतापी असतो, तथापि त्याला आपल्या परिवारासह दुःखांत दिवस काढावे लागतात. तसाच एखादा दुराचारी, दुष्कुलीन, मूर्ख असूनहि तो सपरिवार सुखानें नांदत असतो. याचें कारण एक भवितव्यताच होय. एखादी सुलक्षणा, सुंदर स्त्री निकृष्ट स्थितींत असते, तर दुसरी एखादी कुरूप व कुलक्षणा वैभवस्थितींत असल्याचें दृष्टीस पडतें, याचें कारण भवितव्यतेवांचून दुसरें काय बरें असावें?

शक्रा, तूं अशा स्थितींत आहेस, हें कांहीं तुझ्या कृत्यामुळें नव्हे किंवा माझी ही स्थिति माझ्या कर्माचें फल नव्हे. वैभव किंवा निकृष्ट स्थिति मनुष्याला प्राप्त होते, ती केवळ कालक्रमानेंच होय. तूं देवांचा राजा आहेस, श्रीमंत आहेस, कांतिमान् आहेस आणि माझ्यापुढें गर्जना करीत आहेस. परंतु जर माझा काळ सांप्रत आहे तसा नसता, तर मी एका मुष्टीनेंच तुला

वज्रासह चीत करून पाडलें असतें. परंतु हा माझा पराक्रमकाल नसून शांतिकाल आहे. सर्वांची स्थापना काल करीत असतो आणि त्यांचा शेवटहि कालच लावितो. सर्व दानव माझें पूजन करीत होते. मीहि असाच तुझ्या सारखा गर्जना करून सर्वांना ताप देत असें. त्या कालानें जर मला गांठून अशी माझी स्थिति आज केली आहे, तर तो ज्याला गांठणार नाहीं, असा कोण आह ? हे देवाधिपते, सर्व महात्म्या द्वादश आदित्यांचें तेज प्रथमतः माझ्याच हातांत असे. मीच जलाचें धारण करीत असें व वृष्टिहि हे वासना, माझ्याच हातून होत असे. तीनहि लोकांना मीच प्रकाश व ऊन देत असें, सर्वांचें संरक्षण आणि नाश मीच करीत असें. इच्छेला येईल, त्याला मी देत असें व वाटेल त्याजकडून मी द्रव्य घेत असें. मी सर्वांना नियंत्रणांत ठेवीत असें व त्यांचें पारिपत्यहि करीत असें. कारण मी त्यांचा स्वामी होतों.

हे अमराधिपा, कालसैन्यानें मला घेरून टाकिल्यामुळें तें माझ प्रभुत्व आज नष्ट झालें आहे. हे शचीपते, मी कर्ता नाहीं, तूं नाहींस किंवा दुसरा कोणीहि नाहीं. केवळ काळगतीनेंच हें सर्व चाललें आहे. मास आणि अर्धमास हें या कालाचें निवासस्थान असून अहोरात्र हें त्यावरील आच्छादन आहे. ऋतु हीं त्याचीं द्वारें असून वर्ष हें त्याचें मुख आहे. असा हा काळ ब्रह्मस्वरूपी आहे व तो उपास्य आहे असें कांहीं लोकांचें मत आहे; परंतु ब्रह्मोपासनेला आवश्यक असे पांच अन्नमयादि कोश असल्याचें श्रुति सांगते. अफाट महासागरांतील पाण्याप्रमाणें ब्रह्म हें अत्यंत खोल असून दुर्गम आहे. ब्रह्माला आदि व अंत नसून तें विनाशी व अविनाशीहि आहे. तें ब्रह्म जरी निर्गुण आहे तरी जड पदार्थांशीं त्याचा संबंध जडल्यामुळें तें सगुण आहे असें अज्ञलोक समजतात. जे तत्त्ववेत्ते आहेत ते मात्र त्याला निरुपाधिक आहे असें मानितात. प्रत्येक प्राण्याची गति हा कालच असल्यामुळें शेवटीं त्यावांचून त्याला गत्यंतर नाहीं. प्राणी कोणत्याहि स्थितींत असला, तरी तो त्याच्या जवळच आहे. सर्व इंद्रियें त्याला पाहूं शकत नाहींत. त्याला कोणी अग्नि म्हणतात, कोणी प्रजापति म्हणतात, कोणी ऋतु, कोणी महिने, कोणी पंधरवडे, कोणी दिवस, कोणी क्षण, कोणी पूर्वाह्ण, तर कोणी अपराह्ण, अशाप्रकारें निरनिराळया नांवांनीं ओळखतात.

असें जरी ह्याला अनेक नांवांनीं अनेक जाणतात, तरी वस्तुतः तो एकच आहे आणि तो काळ होय. इंद्रा, तुजसारखे अनेक बलसंपन्न व वीर्यसंपन्न

लोक आजवर होऊन गेले आहेत. व तुझी सुद्धां वळ आली असतां तो संहार करील. 'ही शाश्वत लक्ष्मी माझ्या ठिकाणींच आतां रहाणार,' असें जें तुला वाटत आहे, तें खोटें आहे. म्हणून इंद्रा, तूं मदोन्मत्त होऊं नकोस. कालाचें आक्रमण कोणालाहि करतां येणें शक्य नाहीं. हे इंद्रा, ही लक्ष्मी एकेच ठिकाणीं कायम रहाणारी नसून तुझ्यापेक्षांहि श्रेष्ठ इंद्राकडे—माझ्याकडेहि होती. परंतु माझा त्याग करून ती तुजकडे गेली. तुझ्याकडून ती लवकरच दुसऱ्या ठिकाणीं जाईल. तेव्हां इंद्रा, ह्या सर्व गोष्टींचा शांतपणें विचार कर. १२. ३. २२४.

---

## अध्याय २२५ वा.

[ १ इंद्र-लक्ष्मीसंवादाच्या रूपानें लक्ष्मीच्या चांचल्याचें वर्णन. ]

( १ ) भीष्म—हे युधिष्ठिरा, त्या महात्म्या बलिराजाच्या शरीरांतून प्रत्यक्ष दृश्य स्वरूप धारण करून बाहेर पडलेली तेजस्वी लक्ष्मी इंद्राच्या दृष्टीस पडली. स्वतःच्या तेजानें तळपणाऱ्या त्या लक्ष्मीला पाहून भगवान् पाकशासन इंद्र आश्चर्यचकित झाला व बळीला म्हणाला—

इंद्र—हे बलिराजा, अत्यंत सुंदर, स्वतःच्या तेजानें तळपणारी, सुंदर वेणी घातलेली, बाहुभूषणें धारण करणारी, अशी ही कोण स्त्री तुझ्या शरीरांतून बाहेर निघून येथें उभी आहे ?

बलि—हे वासवा, ही स्त्री राक्षसी आहे, देवस्त्री आहे कीं मनुष्यस्त्री आहे, याचा मला कांहींच अंदाज करतां येत नाहीं. ही कोण, हें तुला पाहिजे असेल तर तिलाच विचार, अगर नको विचारूं. तुला हवें तें कर !

इंद्र—हे शुचिस्मिते, बळीलाहि अज्ञात असलेली अत्यंत सुंदर केशकलाप धारण करणारी अशी याच्या शरीरांतून बाहेर पडणारी तूं कोण ? मला तुझें नांव सांग. हे सुंदरि, स्वतःच्या तेजानें तळपणारी व या दैत्यवराला टाकून माझ्या शेजारीं उभी राहणारी अशी तूं कोण तें मी तुला विचारीत आहें, तें तूं मला कथन कर.

लक्ष्मी—माझ्या स्वरूपाचें ज्ञान विरोचनाला झालें नाहीं. विरोचनपुत्र बलि हाहि माझें स्वरूप यथार्थ रीतीनें जाणूं शकत नाहीं. माझें सान्निध्य फारच थोड्या लोकांना पचतें, म्हणून मला 'दुःसहा' म्हणतात. तसेंच मला

'विधित्सा' हि म्हणतात. हे वासवा, मला भूति, लक्ष्मी, श्री, अशींहि नांवें आहेत. हे इंद्रा, तूं माझें स्वरूप पूर्णपणें ओळखलें नाहींस; तसेंच, सर्व देवांपैकीं कोणालाच माझें स्वरूप समजलें नाहीं.

इंद्र—तूं या प्रबल बलीच्या संनिध चिरकाल राहिलीस. असें असतांना हे दुःसहे, तूं जो याचा त्याग केलास, तो माझ्यासाठीं कीं या बलीच्या कांहीं कृत्यामुळें, तें मला सांग.

लक्ष्मी—धाता असो, वा विधाता असो, मला कोणीच निर्माण करूं शकत नाहीं. हे शक्रा, माझी प्राप्ति कालाच्या क्रमानेंच होणारी आहे. त्याचा तूं अवमान करूं नको.

इंद्र—हे शिखंडिनि, तूं बलीचा त्याग कसा व कशासाठीं केलास? व काय केलें म्हणजे तूं माझा त्याग करणार नाहींस, तें मला सांग.

लक्ष्मी—सत्य, दान, व्रत, तप, पराक्रम व धर्म यांच्या ठिकाणीं माझें वास्तव्य असतें. बलिराजा हा या गोष्टींपासून पराङ्मुख झालेला होता. तो पूर्वी यज्ञशील होता खरा; पण, पुढें पुढें 'माझेंच यजन करीत जा' असें या कालवश झालेल्या मूढात्म्यानें लोकांना सांगितलें. म्हणून हे इंद्रा, या बलीला सोडून मी तुजकडे आलें. तेव्हां, प्रमत्त न होतां, तपश्चर्या आणि वीर्यबल यांच्या आधारावर तुला माझें रक्षण केलें पाहिजे.

इंद्र—हे कमलनिवासिनि, देव, मनुष्य किंवा जगतांतील इतर सर्व प्राणी यांपैकीं कोणीहि तुला सहन करूं शकणार नाहीं.

लक्ष्मी—देव, गंधर्व, असुर किंवा राक्षस यांत एकटा मला सहन करूं शकेल—माझा सहवास ज्याला एकट्याला पचेल—असा कोणीहि नाहीं.

इंद्र—हे कल्याणकारिणि, मजजवळ तुझा निरंतर वास ज्यानें होईल असें सांगशील, तें कृत्य मी करीन. तें तुझें अमृतासारखें वाक्य ऐकावयाला मी उत्सुक आहें, बोल.

लक्ष्मी—हे देवेंद्रा, तुजजवळ माझा वास निरंतर कशानें होईल, तें सांगतें, ऐक. श्रुतीनें सांगितलेल्या पद्धतीप्रमाणें माझी चार ठिकाणीं वांटणी कर.

इंद्र—हे लक्ष्मि, तूं मजजवळून दूर जाऊं नयेस—कायमचा तुझा वास मजजवळ असावा—यासाठीं, माझ्या शक्तीप्रमाणें मी तुला चार ठिकाणीं वांटून

ठेवतों. मनुष्यलोकांत 'धारिणी,' 'भूतभाविनी' या नांवांनीं संबोधिली जाणारी पृथ्वीच तुझ्या शक्तिसामर्थ्याचा चौथा हिस्सा धारण करण्यास लायक व समर्थ आहे, असें मला वाटतें.

लक्ष्मी—हा मीं आपल्या शक्तिसामर्थ्याचा चौथा हिस्सा भूमीवर ठेवला. हा येथें सुप्रतिष्ठित होवो. आतां, दुसरा चौथा हिस्सा कोठें ठेवावयाचा, त्याचें योग्य ठिकाण सांग.

इंद्र—मनुष्यांची सेवा करणारें प्रवाही रूपाचें असें हें आपद्रव्य तें तुझा चौथा हिस्सा घेवो. तो सहन करण्यास आपद्रव्य समर्थ आहे.

लक्ष्मी—हा मीं माझ्या शक्तिसामर्थ्याचा दुसरा चौथा हिस्सा जल-द्रव्यांत ठेवला. तेथें तो सुप्रतिष्ठित राहील. आतां, हे इंद्रा, तिसऱ्या हिश्शाला योग्य ठिकाण सांग.

इंद्र—वेद, यज्ञ व देव यांचा अधिवास ज्यांच्या ठिकाणीं आहे, असा अग्नि तुझ्या शक्तिसामर्थ्याचा तिसरा हिस्सा चांगल्या तऱ्हेनें धारण करील.

लक्ष्मी—माझ्या शक्तिसामर्थ्याचा तिसरा हिस्सा मी अग्नीच्या ठिकाणीं ठेवतें. तेथें तो सुप्रतिष्ठित होवो. आतां उरलेला चौथा हिस्सा कोठें ठेवूं, तें सांग.

इंद्र—या मनुष्यलोकांत जीं जीं ब्रह्मनिष्ठ व सत्यप्रिय माणसें आहेत, तीं तुझा चतुर्थ भाग सहन करोत. तो घेण्याला तीं पूर्ण समर्थ आहेत.

लक्ष्मी—हा मीं माझ्या सामर्थ्याचा उरलेला चतुर्थांश संतांच्या ठिकाणीं ठेवतें. माझे चार हिस्से अशा रीतीनें चार ठिकाणीं सुप्रतिष्ठित झाल्यानंतर तूं तेथून माझें सेवन कर.

इंद्र—याप्रमाणें भूतांच्या ठिकाणीं मीं तुला वांटून ठेविली आहे. येथें जो तुझा उपघात करील, तो माझ्या शासनास पात्र होईल, हें माझें वाक्य सर्वांनीं ऐकून ठेवावें.

यानंतर लक्ष्मीनें ज्याचा त्याग केला आहे, असा बलिराजा म्हणाला, 'ज्यावेळेस सूर्य पूर्व, पश्चिम, दक्षिण आणि उत्तर या चारी दिशांना तळपत राहील, व ब्रह्मदेवाचा अर्धा दिवस पूर्ण झाल्यानें सूर्याचा अस्त होणेंच थांबेल, अशा कालांत पुनः देवदानवांचें युद्ध होईल व त्या युद्धांत मी, हे इंद्रा, तुला

जिंकीन. ज्या वेळेस सूर्य एके ठिकाणीं स्थित राहून तेथून सर्व लोकांना संतप्त करील, त्या वेळेस होणाऱ्या देवासुरांच्या युद्धांत, हे शतक्रतो, मी तुला जिंकीन.'

इंद्र—ब्रह्मदेवानें मला पूर्वींच 'तुला मारावयाचें नाहीं' असें सांगून ठेविलें आहे, म्हणून, हे बलिराजा, तुझ्या मस्तकावर मी वज्र टाकीत नाहीं. हे महादानवा, दैत्येंद्रा, तुझें कल्याण होवो. तुला इष्ट असल तिकडे तूं जा. सूर्य एके ठिकाणीं मध्यभागीं तळपत राहून भोंवतालचे प्रदेश एकाच वेळीं प्रतापित कधींच करणार नाहीं. कारण पूर्वीं ब्रह्मदेवानेंच त्याला तशी अटक घालून ठेविली आहे. सत्याचरणानें सर्व प्रजांना प्रकाशित करीत, सत्त्वाच्याच आधारावर हा सूर्य नित्य परिभ्रमण करीत असतो. याच्या परिभ्रमणाचे दक्षिणायण व उत्तरायण असे प्रत्येकीं सहा सहा महिन्यांचे दोन भाग आहेत व या मार्गानें हा सूर्य लोकांमध्यें शीत व उष्ण यांचा प्रसार करीत भ्रमण करीत असतो.

भीष्म—हे युधिष्ठिरा, याप्रमाणें इंद्राचें भाषण ऐकून तो दैत्यराज बलि दक्षिणदिशेला गेला व पुरंदर इंद्र उत्तरेकडे गेला. याप्रमाणें ज्यामध्यें अहंकाराचा लेशहि नाहीं, असें बलिराजाचें भाषण ऐकून इंद्रानें स्वर्गांत आरोहण केलें. १२. ३. २२५.

---

## अध्याय २२६ वा.

[ १ लक्ष्मीनें त्याग केला असतांना शोक होतो कीं नाहीं, याबद्दल इंद्र–नमुचि-संवाद. ]

(१) भीष्म—हे युधिष्ठिरा, याच मुद्यावर इंद्र व नमुचि यांचाहि संवाद झाल्याचें इतिहास सांगतो. तो संवाद मी तुला सांगतों, ऐक. सर्व भूतांच्या जन्ममरणाचें ज्ञान असणाऱ्या, सागराप्रमाणें अक्षोभ्य अशा, श्रीविहीन नमुचीकडे जाऊन इंद्र त्याला म्हणाला, 'हे नमुचे, शत्रूंकडून पराभव होऊन तूं स्थानभ्रष्ट झाला आहेस, त्यांचे पाश तुजवर पडले आहेत, लक्ष्मी तुला सोडून गेली आहे, अशा स्थितींत तुला शोक होतो कीं नाहीं तें मला सांग.'

नमुचि—अनिवार्य अशा शोकानें शरीर मात्र संतप्त होतें. शत्रूंना आनंद मानावयाला फावतें. शिवाय, शोक करण्यानें आपलें कार्य साधतें, असें नाहीं. म्हणून हे इंद्रा, मी शोक करीत नाहीं. हें सर्व कधींतरी एकदां नाश

पावावयाचें आहे. संतापानें रूप नष्ट होतें; संतापामुळें लक्ष्मीचा नाश होतो. संताप आयुष्याचा ऱ्हास करतो; त्याच्या योगानें धर्महि क्षीण होतो. म्हणून मनांत उत्पन्न होणारें दुःख गिळून मनुष्यानें शहाणपणानें हृद्य अशा कल्याणावरच नजर ठेवावी. अशा प्रकारें मनुष्य कल्याणाचेंच ध्यान करूं लागला म्हणजे त्याचे सर्व मनोरथ सिद्ध होतात, यांत संशय नाहीं. या जगांत शास्ता असा एकच, आणि तो परमेश्वराखेरीज दुसरा कोणीच नाहीं. गर्भाशयांत असणाऱ्या पुरुषाचें पालन व रक्षणहि तोच करीत असतो. पाणी ज्याप्रमाणें उताराउतारानें वहातें तसाच परमेश्वराच्या आज्ञेनें त्यानें जिकडून जावयास सांगितलें तिकडून मी मार्ग कंठीत आहें. प्राण्यांच्या जन्ममृत्यूंचें ज्ञान मला आहे. परंतु, या ज्ञानापेक्षां श्रेष्ठ अशा मोक्षमार्गाचें अवलंबन मी करीत नाहीं. आशेच्या नादीं लागून मीं कर्म करीतच राहिलों आहें. हाहि परमेश्वराचा नियोगच मानला पाहिजे. त्याच्या नियोगानुसार एकाद्या प्रवाहपतित वस्तूप्रमाणें मी कर्में करीत आहें. मनुष्याला ज्या ज्या वेळेला जें जें मिळावयाचें असतें, त्या त्या वेळेला त्याची त्याला प्राप्ति होते. ज्या ज्या वेळेला ज्या गोष्टी घडावयाच्या असतात, त्या त्या वेळेस त्या त्या गोष्टी घडतात. परमेश्वरानें जीवाला ज्या ज्या कोटीच्या गर्भाशयांत निवासस्थान नेमून दिलेलें असेल, त्या त्या योनीच्या गर्भाशयांत तो वास करीत असतो. त्याला आवडेल त्या ठिकाणीं त्याला वास करतां येत नाहीं. 'जी दशा मला प्राप्त झाली आहे, ती ती माझ्या भवितव्याला अनुसरून आहे,' अशी ज्याच्या मनाची भावना असते, तो कधींच मोहवश होत नाहीं. पाळीपाळीनें मनुष्याला प्राप्त होणारीं हीं जीं सुखदुःखें आहेत, त्यांचा प्रतिकार करण्याचें सामर्थ्य कोणांतच नाहीं. तेव्हां अमुक एका गोष्टीचा कर्ता मी, असला कर्तृत्वाभिमान हेंच दुःख होय.

ऋषि, देव, राक्षसश्रेष्ठ, तिन्ही वेदांचें पारायण करून ज्ञानवृद्ध झालेले अरण्यवासी मुनि, यांपैकीं कोणीहि झाला तरी आपत्ति सर्वांनाच येतात. त्यांनीं कोणाला सोडलें आहे? परंतु, पर, अपर, श्रेष्ठ, कनिष्ठ, श्रेयस् व प्रेयस् यांचें ज्ञान असलेले आपत्तींमुळें गोंधळून जात नाहींत व त्यांना भीतहि नाहींत. पंडित जो आहे, तो कधीं क्रोधाविष्ट होत नाहीं व त्याचें धैर्य कधींच खचत नाहीं. तो कधींहि खिन्न होत नाहीं किंवा आनंदहि पावत नाहीं. आपत्ति, संकटें आलीं असतांना त्याला शोक होत नाहीं. तो स्वभावानें हिमाचलाप्रमाणें गंभीर व स्थिर असतो. ज्याला स्वतःचें मनोगत उत्कृष्ट

तऱ्हेनें साधलें म्हणून आनंद होत नाहीं व वेळेस संकट आलें म्हणून जो शोकहि करीत नाहीं, सुख व दुःख समान मानून जो मध्यस्थाच्या वृत्तीनें त्यांचें सेवन करतो, तोच पुरुष धुरंधर होय. जी जी अवस्था मनुष्याला प्राप्त होईल, त्या त्या अवस्थेंत कोणत्याहि प्रकारें खेद न करितां त्यानें संतोष मानून रहावें व अशा रीतीनें आयासकर असा मानसिक संताप शरीरांतून काढून टाकावा. जगांत अशी कोणतीहि सभा नाहीं, कीं जी भयापासून—संकटापासून—सर्वथा अलिप्त आहे. आपल्या बुद्धिसामर्थ्यानें धर्मतत्त्वांचें आकलन करून या संकटांना जो तोंड देतो, तोच धुरंधर पुरुष होय. शहाण्या माणसाच्या कर्मांचा हेतु समजणें व त्यांचें यथार्थ ज्ञान होणें दुर्घट आहे.

सामान्य माणसांना जेथें मोह उत्पन्न होतो तेथें शहाण्याला मोह उत्पन्न होत नाहीं. उत्तम पुरुष स्थानभ्रष्ट झाला तरी ज्याप्रमाणें मोह पावत नाहीं, तसाच ज्ञानवृद्ध पुरुष संकटकालीं डगमगत नाहीं. 'अमुक मनुष्याला अमुक वस्तु मिळावयाची नाहीं,' असा ईश्वरी निदेशच असेल, तर त्याला ती वस्तु मंत्रबलानें, शरीरसामर्थ्यानें, बुद्धिसामर्थ्यानें, पराक्रमानें, सच्छीलाच्या जोरावर किंवा अमोज पैसा ओतून सुद्धां मिळणार नाहीं. मग अशा ठिकाणीं शोक करण्यांत काय तात्पर्य? परमेश्वराच्या निदेशानें मी या पृथ्वीवर जन्मास आलों आहें, त्याच्याच आज्ञेनें माझें जें कर्तव्य म्हणून ठरलेलें असेल, तें मी करीन. मग मृत्यु माझें काय करील? मनुष्याला ईश्वरी निदेशानुसार जें मिळावयाचें असेल तेंच त्याला मिळत. ज्या गतीला तो जाणार असेल, तेथेंच तो जातो. त्याला ज सुख किंवा दुःख प्राप्त व्हावयाचें असेल तेंच त्याला मिळतें. या सगळ्या गोष्टींचें ज्ञान प्राप्त करून घेऊन जो पुरुष मोह पावत नाहीं, त्याला सर्व प्रकारच्या दुःखांतहि सुख होतें व तोच सर्वधन मनुष्य होय. १२. ३. २२६.

---

## अध्याय २२७ वा.

[ १ भीष्म हाच विषय आणखी एका बलि-वासवसंवादानें विशद करतो. ]

( १ ) युधिष्ठिर—हे भरतर्षभा, एकाद्या मनुष्यावर बंधुनाशाचें संकट आलें किंवा राज्यनाशाची आपत्ति आली, तर तसल्या विपत्प्रसंगीं त्यानें कोणत्या रीतीनें वागणें श्रेयस्कर होईल, तें हे महीपाल, मी तुला विचारीत आहें, तर तें कृपा करून मला सांग.

भीष्म—बायकामुळें, नाना प्रकारचीं सुखसाधनें, संपत्ति हीं सर्व नाहींशीं होऊन मनुष्य संकटांत सांपडला, म्हणजे हे राजा, त्यानें धैर्याचा अवलंब करावा, हें श्रेयस्कर होय. धैर्य धरल्यानें शरीर विशीर्ण होत नाहीं. विशोकतेमुळें—शोकरहित झाल्यानें—सुखप्राप्ति होते व आरोग्यहि उपभोगावयास सांपडतें. शरीर निरोगी असेल तर गेलेली संपत्ति पुनः परत मिळते. हे युधिष्ठिरा, जो शहाणा मनुष्य सात्त्विक वृत्तीनें राहतो, त्याला ऐश्वर्यप्राप्ति होते, धैर्य त्याच्या ठिकाणीं संभवतें व कर्मांचे व्यवहारहि त्याला सांभाळतां येतात—साधतात. याविषयीं इंद्र व बलि यांचा आणखी एक संवाद इतिहासकार सांगतात, तो तुला सांगतों. पूर्वी देव—दैत्यांचा, दोघांचाहि संहार करणारें भयंकर युद्ध झालें. महाविष्णूंनीं त्रैलोक्याचें आक्रमण केलें. इंद्र देवांचा राजा झाला. देवतांना हविर्भाग मिळूं लागला. चातुर्वर्ण्याची घडी व्यवस्थित बसली. त्रैलोक्यांत सर्व प्रकारची समृद्धि झाली. ब्रह्मदेव प्रसन्न झाला. अशा वेळीं एकादश रुद्र, अष्ट वसु, द्वादश आदित्य, अश्विनीकुमार, दुसरे इतर कित्येक ऋषि, गंधर्व, नागलोकींचे राजे व सिद्ध पुरुष यांना बरोबर घेऊन, नाना प्रकारच्या वैभवानें ऐरावतावर आरोहण केलेला इंद्र त्रैलोक्यांत संचार करिता झाला. हिंडतां हिंडतां समुद्राच्या कांठीं एका डोंगराच्या गुहेंत वैरोचन बलि बसलेला त्याला दिसला. तेव्हां तो त्याच्याजवळ गेला. ऐरावतावर आरूढ झालेल्या व देवगण ज्याच्या भोंवतालीं आहेत, अशा त्या इंद्राला पाहून बलिराजाला कोणतीहि हळहळ किंवा दुःख वाटलें नाहीं. बलिराजाच्या चित्ताला कोणताहि विकार शिवला नाहीं व तो निर्भय स्थितींत आहे, असें पाहून गजश्रेष्ठ ऐरावतावर बसलेला शतक्रतु इंद्र त्याला विचारतो—

"हे दैत्या, तुझ्या मनाला व्यथा होत नाहीं, याचें कारण तुझें शौर्य, कीं तूं केलेली वृद्धांची सेवा किंवा तपःसामर्थ्यानें प्राप्त झालेला मनोनिग्रह ? यांपैकीं कोणत्या कारणामुळें तूं व्यथारहित दिसतोस ? तुझ्या स्थितींत व्यथारहित राहणें हें सर्वथा दुष्कर होय. शत्रूंनीं तुला पादाक्रांत करून सोडलें आहे व तुला कनिष्ठ अशा हीनस्थानांचा आश्रय करावा लागत आहे, ही तुझी स्थिति शोचनीय होय. अशा स्थितींत तुला शोक कसा होत नाहीं ? स्वजातीवर सत्ता, नाना प्रकारचें श्रेष्ठ असें वैभव हीं एके काळीं तूं भोगलींस. असें असून तुझें रत्नभांडार व राज्य शत्रूंनीं हरण केलें याचा शोक तुला कसा होत नाहीं ? तुझ्या वडिलांनीं व आजोबांनीं ज्या दैत्येंद्रपदाचा उपभोग घेतला त्याच पदावर

पूर्वी तूं आरूढ झाला होतास. तें तुझें वडिलार्जित पद तुझ्या दायादांनीं हिरावून घेतलेलें पाहून तुला शोक कसा होत नाहीं ? वरुणाच्या पाशांत तुला बांधून टाकिला; वज्राचे प्रहार तुजवर केले; तुझीं बायकामुलें हरण केलीं; तुझी संपत्ति नेली, याचा हे बले, तुला शोक कसा होत नाहीं ? तुझी श्री संपली; वैभवापासून तूं च्युत झालास; असें असूनहि तुला शोक होत नाहीं. अशा स्थितींत शोकरहित राहणें हें अत्यंत दुष्कर कर्म तूं करीत आहेस. त्रैलोक्याच्या राज्याचा नाश झाला असतां जगण्याची इच्छा धरणारा तुजवांचून दुसरा कोणीच सांपडणार नाहीं."

असें व या प्रकारचें कठोर भाषण करून इंद्रानें बलिराजाचा उपहास केला, तरी तो बलिराज कोणत्याहि प्रकारें गोंधळला नाहीं. त्यानें आनंदानें सगळें ऐकून घेतलें व नंतर तो इंद्राला म्हणाला—

" हे इंद्रा, मी आज पराभूत झालेला असून निगृहीत आहें, असें पाहून तूं ही निरर्थक बडबड करीत आहेस. आज जरी तूं वज्र उगारून माझ्या समोर उभा असलास, तरी पूर्वी एक वेळ तूं निर्बलच होतास. आज कसें तरी तुला सामर्थ्य प्राप्त झालें आहे. तुझ्यावांचून अशा तऱ्हेचें क्रूर भाषण दुसरा कोण करूं शकणार ? आपल्या अंकित असलेल्या शत्रूवर, त्याचें पारिपत्य करण्याचें सामर्थ्य अंगीं असतांना दया करणारा, हातीं सांपडलेल्या वीराला दयाशील रीतीनें वागवणारा जो मनुष्य त्यालाच पुरुष-धीर पुरुष-पौरुष अंगीं असणारा असें म्हणतात. युद्धप्रसंगीं दोन पक्ष एकमेकांशीं युद्ध करायाला उभे राहिले म्हणजे जयश्री कोणाला माळ घालील, हें निश्चयानें सांगतां येणें कठिण आहे. दोन पक्षांत एकाचा जय व दुसऱ्याचा पराजय व्हावयाचाच. सर्व भूतांचा अधिपति बलिराज याला मीं आपल्या पराक्रमाच्या जोरावर जिंकिला, हा माझा पराक्रम होय, अशी हे देवपुंगवा, आपली समजूत करून घेऊं नकोस. आज मला जी स्थिति प्राप्त झाली आहे, किंवा तुला ज्या स्थितींत असण्याचें भाग्य मिळालें आहे, ही स्थिति मींहि आणलेली नाहीं किंवा तूंहि आणलेली नाहींस. मी आज ज्या अवस्थेंत आहें ती अवस्था कदाचित् पुढें तुला भोगावी लागेल. तूंहि माझ्यासारखाच होशील. तेव्हां, हे इंद्रा, 'मीं फार मोठा पुरुषार्थ केला,' अशी घमेंड धरून माझा अपमान करूं नको. मनुष्याला सुख व दुःख पर्यायानें—क्रमाक्रमानें—येत असतात. आज सुखाची पाळी तुझी आहे, म्हणून हे इंद्रा, तुला

इंद्रपद मिळालें आहे. तें तूं आपल्या पराक्रमानें मिळविलेलें नाहींस. जो काल-स्वरूपी परमेश्वर आपल्या प्रवाहाबरोबर मला घेऊन जातो, त्याच कालाच्या ओघाबरोबर तूंहि जात आहेस.

"आम्ही आजच्या स्थितींत आहोंत, त्या स्थितींत तूं नाहींस किंवा तुझ्या स्थितींत आम्ही नाहीं, याचें कारणहि पण तेंच. मातृसेवा, पितृसेवा, निरनिराळ्या देवतांची पूजा किंवा दुसऱ्या कोणत्याहि सत्कृत्याचें आचरण, यांपैकीं कशानेंहि मनुष्याला सुखप्राप्ति होत नाहीं. विद्या, तपश्चर्या, दान, मित्र किंवा नातलग, यांपैकीं कोणींहि काळाच्या तावडींतून सोडविण्याला उपयोगीं पडत नाहींत. पुढें वाढून आलेलीं संकटें मनुष्यानें बुद्धिबळानेंच टाळावयाचीं असतात. त्यांच्या-वर शेंकडों प्रत्याघात केले, तरी बुद्धिबळावांचून नुसत्या शौर्याच्या जोरावर तीं टाळणें अशक्य आहे. दुःखांचे व संकटांचे जे त्रास क्रमप्राप्त होऊन येतात, त्यांच्या-पासून सोडविणारा कोणी नाहीं. 'मीं केलें, माझ्या पराक्रमानेंच अमुक झालें.' अशी भावना तूं मनांत धरतोस हीच गोष्ट, हे इंद्रा, मोठ्या दुःखाची होय. 'मी कर्ता' अशी भावना धरणारा मनुष्य जर खराखुरा कर्ता असेल, तर त्याची उत्पत्ति होण्याला दुसऱ्या स्रष्ट्याची जरूर लागणार नाहीं. पण, हा कर्ता ज्याअर्थीं स्वतःच दुसऱ्यानें उत्पन्न केलेला असतो, त्याअर्थीं हा स्वतः कोणतीहि गोष्ट करण्याचे कामीं पराधीन आहे, हें उघड होय. कालाच्या प्रभावानें पूर्वीं मीं तुला जिंकलें; आज त्या कालाच्याच प्रभावानें तूं मला जिंकीत आहेस. मनुष्यप्राण्यांत जरी गति असली तरी त्या गतीला दिशा कालच दाखवितो. प्रजा काल वागवील तशाच वागत असतात. हे इंद्रा, तुझी बुद्धि प्राकृत आहे—कोती आहे—म्हणून तुला प्रलयाचें स्वरूप समजत नाहीं. कांहीं लोक तुला मोठा समजतात व तूं आपलें ऐश्वर्य स्वपराक्रमाच्या जोरावर मिळविलें आहेस अशी त्यांची समजूत आहे. पण ही समजूत सर्वथा खोटी होय. लोकांची प्रवृत्ति कशी आहे, हें जाणणारा माझ्यासारखा मनुष्य शोकानें किंवा मोहानें व्याप्त कसा होईल?

"कालाच्या तडाख्यांत सांपडल्यानें माझी किंवा माझ्यासारख्या दुसऱ्या कोणा-चीहि बुद्धि संकटामध्यें फुटक्या नौकेप्रमाणें नाश पावते. मी, तूं किंवा आणखी जे कोणी देवराट् होतील, ते सगळे आजपर्यंत शेंकडों इंद्र ज्या मार्गानें गेले, त्यानेंच जाणार आहेत. आज तूं उत्कृष्ट स्वरूपाच्या वैभवानें शोभून दिसत आहेस; तुझा पराभव करणें आज कठिण आहे. तरी पण, वेळ आली म्हणजे काल

तुझीहि अवस्था माझ्यासारखीच करील, यांत संशय धरूं नकोस. देवांच्या युगा-युगाच्या ठिकाणीं असे कित्येक हजार इंद्र कालाच्या ओघाबरोबर वहात गेले आहेत. कालाचा तडाखा जबर असून त्याचें उल्लंघन कोणालाहि करतां येत नाहीं. तुला हें पद प्राप्त झाल्यामुळें तूं स्वतःला फार मोठा मानीत असशील, किंवा चराचर सृष्टि निर्माण करणाऱ्या ब्रह्मदेवाप्रमाणें मी अचल, अढळ, शाश्वत आहें अशीहि तुझी कल्पना असेल. परंतु हें तुझें स्थान कोणालाहि कायमचें मिळणारें नाहीं; किंबहुना, तें स्वतःहि अनंत नाहीं. तूं मात्र पोरकटपणानें 'हें स्थान माझें होय,' असें मानीत आहेस. जे खरोखर विश्वासार्ह नाहीं, अशावर तूं विसंबून राहिला आहेस. अनित्य गोष्टी नित्य आहेत अशी तुझी समजूत आहे. हे सुरेश्वरा, कालानें ज्याची मति ग्रासलेली आहे, त्याची दशा नेहमींच अशी होते. 'ही राजश्री माझी आहे,' असें मोहानें तूं समजत आहेस. वस्तुतः ही तुझ्याजवळ, माझ्याजवळ किंवा आणखी कोणाचजवळ चिरकाल रहाणारी नाहीं. ही राज्य-लक्ष्मी जी तुजकडे आली आहे, ती यापूर्वी पुष्कळ राजांच्या सहवासांत राहून व त्यांची संगति सोडून आली आहे.

"हे वासवा, ही चंचल लक्ष्मी कांहीं काल तुजकडे राहून फिरून दुसरीकडे जाईल. गाय जशी एक जागा सोडून दुसरीकडे जाते तशी लक्ष्मीची स्थिति आहे. या लक्ष्मीनें आजपर्यंत किती राजेलोकांचें अतिक्रमण कलें असेल, त्याची गणनाहि करणें शक्य नाहीं. हे इंद्रा, तुजपेक्षांहि बलिष्ठ असे पुष्कळ राजे यापुढें होतील. नाना प्रकारचे वृक्ष, ओषधी, रत्नें, नाना प्रकारचे प्राणी, अरण्यें, खाणी, इत्यादिकांनीं युक्त अशी ही पृथ्वी आजपर्यंत ज्या राजांनीं भोगिली, ते राजे आज कोठें आहेत? पृथु, ऐल, मय, भीम, नरक, शंबर, अश्वग्रीव, पुलोमा, अनेकध्वज असलेला स्वर्भानु, इत्यादि पूर्वी होऊन गेलेले दितिपुत्र, दानव व इतरहि कित्येक दैत्येंद्रपदाचा उपयोग घेतलेले राजे, त्यांच्याविषयींचा इतिहास आपण आजपर्यंत ऐकत आलों, असे सर्व कालाच्या तडाख्यांत सांपडल्यामुळें या पृथ्वीचा त्याग करून गेले आहेत. तस्मात् काल हाच श्रेष्ठ होय. हे इंद्रा, वर सांगितलेल्या सर्व राजांनीं शंभर शंभर यज्ञ केले होते. तूंच एक शतक्रतु आहेस असें नव्हे. आतां-पर्यंत सांगितलेले सर्व राजे धर्मपरायणच होते. यज्ञ त्यांच्याहि हातून घडत होते. अंतरिक्षांत संचार या सर्वांनाहि करतां येत होता. हे सगळे शत्रूंशीं समोरासमोर उभे राहून लढत असत. सगळे कवचधारी होते. या सर्वांचे बाहू परिघांसारखे पुष्ट असून बळकट होते. या सर्वांच्याजवळ इंद्रजालाचें सामर्थ्य

होतें व यांनाहि इच्छेप्रमाणें वाटेल तीं रूपें धारण करतां येत. समरांगणांत उभें राहिल्यावर पराभव असा यांनाहि माहीत नव्हता. सगळे सत्यव्रताचें आचरण करीत. सर्वांना इष्ट स्थळीं अप्रतिबंध स्वरूपांत विहार करतां येत असे. सगळे वेदनिष्ठ होते, बहुश्रुत होते. महासामर्थ्यवान् अशा त्या राजांना त्यांच्या योग्यतेचें वैभवहि पण मिळालें होतें. पण त्या महात्म्यांनीं ऐश्वर्या-बद्दल उन्माद कधींच दाखविला नाहीं. हे सर्व राजे यथाकालीं योग्य प्रकारचें दान देत असत. यांच्या अंगीं मत्सर नव्हता. सर्व प्राणिमात्रांबरोबर हे ज्याच्या त्याच्या योग्यतेनुसार वागत. हे राजे शंकरभक्त असल्यानें पार्वतीला पण पुत्रांप्रमाणें प्रिय होते. हे प्रजेला अपत्यवात्सल्यानें वागवीत असत.

“ हे इंद्रा, हे महाप्रतापी राजे स्वतःच्या तेजानें तळपणारे असे होते. पण इतक्या गोष्टी असूनहि कालानें त्यांना धुळीस मिळविलें. तूं मात्र ज्या वेळेस या पृथ्वीचा त्याग करण्याचा प्रसंग तुजवर येईल, त्या वेळेस शोकावेग धारण करूं शकणार नाहींस. ऐश्वर्य उपभोगण्याची–विषयांची–लालसा सोड. लक्ष्मी-मदाचा त्याग कर, म्हणजे कालाच्या तडाख्यांत सांपडून ऐश्वर्याचा नाश झाल्या-वर शोकावेग सहन करण्याचें सामर्थ्य तुला येईल. शोकाचा प्रसंग असला तरी शोकव्यास होऊं नको. आनंदाच्या वेळीं आनंदांतच बुडून जाऊं नको. मागें काय झालें व पुढें काय होणार यांचा–भूतभविष्यांचा–विचार न करितां सध्यां काय आहे, त्यावर नजर ठेवून वाग; काल नेहमीं दक्ष आहे. मी माझ्या-कडून नियमबद्ध वर्तन करीत असतांना त्यानें माझ्यावर झडप घातली. हे इंद्रा, स्पष्ट बोलतों त्याची क्षमा कर; पण, हा काल थोड्याच वेळांत तुजवरहि झडप घालील. आज तूं मला संताप उत्पन्न करण्यासारखें भाषण करून आपला निर्लज्जपणा व्यक्त करीत आहेस.

“मी कालपाशांनीं बांधला गेलों म्हणून तूं आज स्वतःला मोठा समजत आहेस. कालाच्या पाशांत सांपडण्याची पहिली पाळी जरी मजवर आली तरी ती तशीच तुझ्यावरहि येणार आहे, हें ध्यानांत ठेव. कालानें तुझ्यापूर्वी मला फटका मारला म्हणून तूं आज ह्या वल्गना करीत आहेस. मीं क्रोधाविष्ट होऊन समरांगणावर उभा राहिलों म्हणजे माझ्यासमोर उभें रहाण्याची एकाचीहि छाती नाहीं. परंतु, सर्वथा दुर्लंघ्य अशा कालचक्राच्या फेऱ्यांत मी सांपडल्यामुळें तूं आज मजपुढें उभा राहूं शकतोस. हा हजार वर्षांचा काल पूर्ण होऊं दे

म्हणजे आज मी महासामर्थ्यवान् असूनहि कालानें ज्याप्रमाणें माझीं हाडें खिळखिळीं केलीं आहेत व मी इंद्रपदापासून भ्रष्ट होऊन तूं जसा आज स्वर्गाचा राजा झाला आहेस, त्याचप्रमाणें काल तुझींहि हाडें खिळखिळीं करून तुला इंद्रापदावरून खालीं ओढील. या बहुविध जीवलोकांत तूं लोकांचें आराध्यदैवत झाला आहेस, हा कालाचा महिमा होय. तूं असा काय पराक्रम केलास म्हणून तूं इंद्र झालास ? व मीं असा काय दुबळेपणा दाखविला म्हणून मला स्थानभ्रष्ट व्हावें लागलें ? कर्ता हर्ता सर्व कालस्वरूपी विराट् पुरुष आहे. त्याच्यावांचून या जगांत सुखदुःख देण्याला कोणीच समर्थ नाहीं.

"विद्वान् पुरुषानें नाश, विनाश, ऐश्वर्य, सुख, दुःख, उत्पत्ति, लय, यांपैकीं कशाचाच हर्ष किंवा विषाद मानूं नये. हे इंद्रा, माझें सामर्थ्य काय स्वरूपाचें आहे याची जाणीव तुला आहे व तुझें सामर्थ्य काय हें मीहि जाणतों. तेव्हां निर्लज्जा, तूं माझ्यासमोर ही कसली बडबड व कशासाठीं करीत आहेस ? तूं पूर्वी समरांगणांत माझा पराक्रम पाहिलेला आहेस व तुझी खात्री पटण्याला तो पुरेसा आहे. पूर्वीच्या देवदानवयुद्धांत द्वादश आदित्य, एकादश रुद्र, साध्य, अष्टवसु या सर्वांचा व मरुद्गणांचा मीं पराभव केला हें हे शचीपते इंद्रा, तुला माहीत आहे. समरांगणावर सर्व देव एकत्रित झाले असतांना त्यांचा मीं मोठ्या आवेशानें पराभव केला. माथ्यावर फोंफावलेल्या अनेक अरण्यांनीं युक्त व हिंस्र श्वापदें ज्यांत आहेत, असे अनेक पर्वत मीं एक वेळ नव्हे पण अनेक वेळां तुझ्यावर टाकलेले आहेत. ज्यांचीं शिखरें अत्यंत कठिण असे पर्वत मीं तुझ्या मस्तकावर टाकून फोडले, त्या मला काय करतां येणार नाहीं ? पण सध्यां काल विपरीत आहे. तूं आज वज्र हातांत घेऊन उभा असलास तरी मुष्टिप्रहारानें मला तुला मारतां येणार नाहीं असें नाहीं. पण हा पराक्रमाचा काल नव्हे. क्षमाशील-वृत्तीचा काल आहे.

"म्हणून, हे इंद्रा, तुझ्यापेक्षां माझें सामर्थ्य अधिक असूनहि मी तुझी गय करीत आहें. कालचक्राच्या फेऱ्यामुळें मी आज संकटाच्या वणव्यांत सांपडलों आहें. त्याच्या पाशांनीं मी बांधला गेला असल्यामुळें हे इंद्रा, तूं आज ही बाष्कळ बडबड करीत आहेस. ज्याच्या सामर्थ्यापुढें कोणाचें कांहीं चालूं शकत नाहीं, असला हा कालरूपी श्यामवर्ण पुरुष महाभयंकर असून, एकादा पशु ज्याप्रमाणें दोरीनें बांधावा तसा यानें आपल्या पाशांनीं मला बांधून टाकला आहे. लाभ, अलाभ, सुखदुःख, काम, क्रोध, उत्पत्ति व लय, मृत्यु, बंध किंवा

मोक्ष, या सर्व गोष्टी कालचक्रानेंच प्राप्त होत असतात. यांचा कर्ता मी नाहीं, तूं नाहींस; तो कालस्वरूपी प्रभु सर्वकर्ता सर्वहर्ता आहे. झाडावर लागलेलीं फळें ज्याप्रमाणें कालानेंच परिपक्क होतात, त्याप्रमाणें कालाच्याच योगानें माझ्या ऐश्वर्यभोगाची मुदत भरली आहे. कालचक्र अनुकूल असलें म्हणजे ज्या कर्मांच्या आचरणानें मनुष्याला सुखप्राप्ति होऊं शकते, त्याच कर्मांमुळें कालचक्र उलटें फिरलें म्हणजे त्याला दुःख होतें. कालाचें अशा प्रकारचें सामर्थ्य जाणणाऱ्या पुरुषानें कालचक्राचा फेरा आपल्यावर आला म्हणून शोक करीत बसूं नये. म्हणून हे इंद्रा, मी शोकव्याप्त होत नाहीं. कारण, संकटाचा परिहार करण्याचें सामर्थ्य शोकांत नाहीं." अशा प्रकारचें बलिराजाचें भाषण ऐकून इंद्रानें आपल गोंधळलेलें मन कसेंबसें आंवरलें व तो बलिराजाला म्हणाला—

"माझ्या हातांतील वज्र मीं उगारलेलें पाहून व हा दारुण वरुणपाश पाहून, प्रत्यक्ष मृत्यु जरी मजपुढें मला मारण्याच्या बुद्धीनें उभा राहिला, तरी त्याची बुद्धि क्षणभर चळेल, मग इतरांची ती काय कथा? पण अशाहि स्थितींत हे बलिराजा, सत्त्वाला पोहोंचूं शकणारी तुझी बुद्धि निश्चल आहे, हें विशेष होय. हे सत्यपराक्रमी राजा, तुझ्या असामान्य धैर्याच्या जोरावर तूं आज व्यथेला जिंकिलें आहेस. जगाचा चाललेला व्यवहार उघड्या डोळ्यांनीं पाहून कोणता प्राणी शरीराचा काय किंवा संपत्तीचा काय विश्वास धरील? मी सुद्धां हा लोक सर्वथा अशाश्वत आहे हें जाणतों. नित्य जळत असणाऱ्या, अव्यय, अगम्य अशा महाभयंकर कालरूपी अग्नींत हें विश्व पचत आहे. कालचक्राच्या फेऱ्यावर कोणतीहि मात्रा चालूं शकत नाहीं. प्राणी लहान असो वा मोठा असो, कालाच्या दाढेखालीं सगळे सारखेच रगडले जातात. ज्याला कोणी शास्ता नाहीं, अशा या सदासर्वदा सावध असणाऱ्या कालाचा फेरा संपल्यावांचून त्यांत सांपडलेला कोणीहि प्राणी मुक्त होऊंच शकत नाहीं. मनुष्यप्राणी जरी उन्मत्त झाला असला तरी काल सर्वदा जागरूक राहून आपलें कार्य करीतच असतो. याचा प्रतिकार यशस्वी रीतीनें केलेला आजपर्यंत कोणींहि पाहिला नाहीं. हा कालपुरुष अतिशय जुनाट, अव्यय व सर्व प्राण्यांशीं समभावानें वागणारा आहे. हें चक्र टाळतां येत नाहीं किंवा याचा परिहारहि करतां येत नाहीं. सावकाराच्या व्याजाला जसा कधींहि खंड पडत नाहीं, तें जसें सारखें वाढतच राहतें, तसें हें कालचक्र, कला, काष्ठा, क्षण, मास, दिवस, रात्र, इत्यादि परिमाणांनीं सारखें अखंड फिरत राहून मनुष्यमात्राला ग्रासीत असतें. 'मी

आज हें करीन, उद्यां तें करीन, ' अशी रिकामी बडबड करणाऱ्या पुरुषाला नदीवेगाबरोबर तीरावरचा वृक्ष उन्मळून अनन्यगतिकत्वानें वाहत जातो, तसें कालचक्राबरोबर वहात जावें लागतें. ' मी आतां या माणसाला चांगला पाहिला होता, मग इतक्यांत हा कसा गेला, ' असे उद्गार कालवश झालेल्या माणसाबद्दल लोकांनीं काढलेले आपल्याला ऐकूं येतात.

" मनुष्याची संपत्ति, भोग, स्थान, वैभव हीं सर्व कालाच्या तडाख्यानें नाहींशीं होतात. या जीवलोकाचें जीवित काल येऊन हरण करून नेत असतो. ऐश्वर्य-प्राप्तीचा शेवट त्याच्या नाशांत व्हावयाचा. जन्माच्या पुढें मरण हें वाढून ठेवलेलें असावयाचेंच, हा कालचक्राचा नियमच आहे. सर्व जग अनित्य व अशाश्वत आहे, असा निश्चय करतां येणें–असें निभ्रांत ज्ञान होणें–हें अत्यंत कठिण होय. तथापि तत्त्वाला स्पर्श करणारी तुझी बुद्धि सर्वथा निश्चल राहाते, हें विशेष होय. बलिष्ठ अशा कालगतीच्या चक्रांत हें सर्व जग भरडलें जात आहे, हें डोळ्यांनीं पाहून सुद्धां मनुष्य आपली पूर्वस्थिति विसरतो. आपणहि एकदां असेच कालाच्या फेऱ्यांत सांपडलों होतों, हें त्याच्या मनांतहि येत नाहीं. वडीलधाऱ्याचा विचारहि न करतां तो सर्वांचा अधिक्षेप करतो. मत्सर, अभि-मान, लोभ, काम, क्रोध, भय, अनावर वासना इत्यादिकांना बळी पडून मनुष्यप्राणी मोहव्याप्त होतो. परंतु, हे बलिराजा, तूं मात्र ज्ञानवृद्ध व तपोवृद्ध असून कालाचें चरित्र यथार्थपणें हातावरच्या आंवळ्याप्रमाणें जाणतोस. तूं सर्व शास्त्रविशारद आहेस. विवेचन कसें करावें, हें तुला पूर्णपणें अवगत आहे.

विद्वान् माणसांत तुला अत्यंत स्पृहणीय असें श्रेष्ठ स्थान आहे. तूं पंडितश्रेष्ठ आहेस. तूं आपल्या बुद्धिबलाच्या योगानें सर्व त्रैलोक्यांत मनानें परिभ्रमण करून आहेस, असें मला वाटतें. सर्व ठिकाणीं हिंडून सुद्धां तूं मुक्त आहेस, कशाचाहि लेप तुला लागलेला नाहीं. तूं इंद्रियजय केला असल्यामुळें रजस् किंवा तमस् हीं तुला स्पर्श करूं शकत नाहींत. ज्याला लोभ नाहीं आणि म्हणूनच संताप नाहीं, अशा निर्वैर, सर्वांभूतीं प्रेमभाव ठेवणाऱ्या शांतचित्त आत्म्याचीच तूं उपासना करीत असतोस. हे बलिराजा, अशा प्रकारची तुझी वागणूक पाहून तुजविषयीं माझ्या मनांत दया येते. अशा तऱ्हेचा जो तूं त्या तुला कालपाशांत धरून तुझ्यासारख्या ज्ञानी पुरुषाचा मी घात करूं इच्छित नाहीं. कोणाशींहि दुष्टपणा न करणें हा परम धर्म

होय. माझ्या मनांत तुझ्याबद्दल अनुकंपा उत्पन्न झाली आहे. कालाच्या ओघानुसार तुझे पाश यथाक्रम मोकळे होतील. प्रजांचें कल्याण केल्यानें तुझेंहि हे राजा, कल्याण होवो. ज्या वेळेला, हे राजा, तरुण सून आपल्या म्हाताऱ्या सासूला कामाला लावील, मुलगा बापाला काम करावयास सांगेल, अंत्यज ज्या वेळेस ब्राह्मणांकडून पादप्रक्षालन करून घेऊं लागतील, शूद्र ज्या वेळीं ब्राह्मणस्त्रीशीं विवाह करतील, असवर्ण स्त्रीच्या ठिकाणीं पुरुष ज्या वेळीं वीर्यसिंचन करतील, कांस्यपात्राचा उपयोग अपवित्र कार्याकडे ज्या वेळेस होईल, निषिद्ध पात्रांतून बलिदान ज्या वेळेस होऊं लागेल, चातुर्वर्ण्याच्या मर्यादा ज्या वेळेस नष्ट होतील, अशा वेळीं, हे बलिराजा, तुझे पाश क्रमाक्रमानें मोकळे होतील. आतां तुला आमच्यापासून भय नाहीं, असा निर्भय होत्साता तूं कालाची वाट पहात रहा. तुला सुखप्राप्ति होवो. चित्ताला कोणतीहि व्यग्रता न आणतां निरोगी स्थितींत स्वस्थचित्तानें तूं रहा."

अशा रीतीनें त्या बलिराजाशीं भाषण करून वारणश्रेष्ठ ऐरावतावरून हिंडणारा तो शतक्रतु इंद्र परत फिरला. सर्व असुरांच्यावर विजय मिळविल्या-मुळें आनंदित झालेला तो देवराट् सर्व त्रैलोक्याचा सम्राट् झाला. सर्व चराचर सृष्टीचा प्रभु जो वृषाकपि इंद्र त्याची महर्षींनीं नाना प्रकारच्या स्तोत्रांनीं स्तुति केली. यज्ञामध्यें अग्नि हविर्भाग नेऊं लागला व प्रभु इंद्र अर्पण केलेलें अमृत सेवन करूं लागला. नाना प्रकारच्या देशांतून एकत्र गोळा झालेल्या द्विजश्रेष्ठांनीं स्तुति केल्यामुळें अधिकच शोभून दिसणारा व ज्याचा राग शांत झालेला आहे, असा स्वस्थचित्त इंद्र आपल्या राहत्या ठिकाणीं स्वर्गांत मोठ्या आनंदानें प्रवेश करिता झाला. १२. ३. २२७.

## अध्याय २२८ वा.

[ १ मनुष्याच्या अभ्युदयाचीं व अवनतीचीं कारणें. ]

( १ ) **युधिष्ठिर**—हे पितामहा, मनुष्याची उन्नति व्हावयाची असली किंवा त्याचा पराभव व्हावयाचा असला म्हणजे काय काय पूर्वचिह्नें होतात, तीं हे महाभागा, मला कथन कर.

**भीष्म**—हे महाभागा, तुझें कल्याण असो. मनुष्याच्या उन्नतीचीं किंवा अवनतीचीं पूर्वचिह्नें ज्याचें त्याचें मनच त्याला सांगत असतें. तीं तेथेंच स्फुर-

तात. याविषयीं इतिहासज्ञांनीं सांगितलेला एक जुना इंद्र-लक्ष्मीसंवाद आहे, तो मी तुला सांगतों, तो ऐक.

दीर्घ तपोबलाच्या मोठ्या सामर्थ्यामुळें ज्याला उभय लोकांचें प्रत्यक्ष ज्ञान होतें, ब्रह्मलोकांत रहाणाऱ्या ऋषींच्या बरोबरीची योग्यता ज्याला प्राप्त झाली होती, ब्रह्मदेवाप्रमाणेंच अत्यंत देदीप्यमान अशा तेजानें जो शोभत असे, असा महातपोनिधि, निष्पाप नारद स्वतःच्या इच्छेप्रमाणें त्रैलोक्यांत मन मानेल, तसा संचार करी. एकदां प्रातःकाळीं उठून पवित्र जलाचें सेवन करण्याच्या इच्छेनें महर्षि नारद ध्रुवद्वारापासून उगम पावलेल्या गंगेवर जाऊन तिच्या पात्रामध्यें उतरला. ज्यानें शंबर, पाक इत्यादि दैत्यांचा नाश केला होता, तोहि सहस्राक्ष इंद्र त्या देवांनीं आणि ऋषींनीं सेविलेल्या नदीच्या तीरावर आला. इंद्र व नारद या दोघांनींहि त्या ठिकाणीं तांत्रिक रीतीनें स्नान, प्राणायाम, जप वगैरे कर्में केलीं व सुवर्णाच्या रंगाची बारीक वाळू ज्यांत आहे, अशा त्या नदीच्या तीरावर ते येऊन बसले. त्या ठिकाणीं वसून ते देवर्षींनीं व महर्षींनीं पूर्वीं सांगितलेले परम पवित्र इतिहास एकमेकांना सांगूं लागले. अशा तऱ्हेनें पूर्वींचे इतिहास ते एकमेकांना सांगत असतांना आपल्या किरणजालानें सर्व पृथ्वीला भूषविणारा असा भगवान् सूर्य उदय पावला.

सूर्योदय झालेला पाहतांच या दोघांनीं उठून त्याचें उपस्थान केलें. त्या उदय पावणाऱ्या सूर्याच्या शेजारीं दुसरें सूर्यासारखेंच देदीप्यमान असें तेजोवलय त्यांना दिसलें. तें सूर्य व गरुड यांनीं जणुं निर्माण केलेलें, वैष्णव पदाप्रमाणें भासणारें, आपल्या प्रकाशानें त्रैलोक्याला पावन करणारें असें तेज त्यांच्याकडे परम वेगानें येत होतें. त्या तेजोवलयाकडे पाहतांच त्यामध्यें, सूर्याच्या द्वादश रूपांपैकीं अंशुमान् नांवाची जी त्याची अत्यंत देदीप्यमान् ज्योति तिजप्रमाणें शोभिवंत दिसणारी अत्यंत तेजस्विनी, जिच्या अंगावरचे अलंकार नक्षत्रांप्रमाणें झळकत आहेत, सुंदर मोत्यांची माळ जिनें गळ्यांत धारण केली आहे अशी, कमलपत्रावर स्थित झालेली पद्मा लक्ष्मी त्यांना दिसली. सर्व स्त्रियांमध्यें श्रेष्ठ असलेली ती लक्ष्मी विमानांतून खालीं उतरली व देवर्षि नारद आणि त्रैलोक्याधिपति इंद्र यांच्यासमीप आली. तिला आपल्याकडे आलेली पाहतांच इंद्र नारदासहवर्तमान तिला सामोरा गेला व हात जोडून, आपण कोण हें स्वतःच तिला सांगून, त्यानें तिची उत्कृष्ट प्रकारें पूजा केली. नंतर तो देवराज इंद्र लक्ष्मीला म्हणाला :—

' हे चारुहासिनी सुंदरि, तूं कोण आहेस ? येथें कशासाठीं व कोठून आलीस ? आणि आतां जाणार कोठें तें सर्व मला सांग.'

लक्ष्मी—सर्व त्रैलोक्यांतील चराचर भूतें माझ्या प्राप्तीची इच्छा धरून महाप्रयासानें खटपट करीत असतात. मी सूर्यकिरणांनीं विकसित झालेल्या कमलामधून जन्माला आलेली, सर्व भूतांच्या कल्याणासाठीं अवतार धारण करणारी, कमलांची माला धारण करणारी अशी पद्मा लक्ष्मी आहें. हे बलनिषूदना इंद्रा, मी लक्ष्मी, भूति, श्री, श्रद्धा, मेधा, सन्नति, नियति, स्मृति, या रूपांनीं जगांत वास करितें. विजयश्रीनें ज्यांना माळ घातली अशा राजांच्या सैन्याच्या अग्रभागीं, त्यांच्या ध्वजाच्या ठिकाणीं, धर्मशील माणसांच्या देशांत, गांवांत व घरांत, संग्रामांत शत्रूला पाठ न दाखविणाऱ्या व विजयश्रीच्या ऐश्वर्यानें शोभणाऱ्या राजांच्या ठिकाणीं मी सदैव वास करतें. अत्यंत बुद्धिमान्, नेहमीं धर्मबुद्धीनें चालणारे, सदा सत्य बोलणारे, ब्राह्मणांच्या विषयीं आदरभाव दाखविणारे, असे जे दानशील राजे असतात, त्यांच्या ठिकाणीं हे देवेंद्रा, माझा निवास नेहमीं असतो. सत्यधर्माचें बंधन पाळणारी अशी मी पूर्वी राक्षसांमध्यें वास करीत होतें. परंतु, राक्षस विपरीत वर्तन करूं लागले, असें पाहून तुजजवळ राहण्याची आवड मला उत्पन्न झाली आहे.

इंद्र—दैत्य कसे वागत होते म्हणून हे वरानने, तूं त्यांजजवळ रहात होतीस व आतां तूं त्यांच्यांत काय पाहिलेंस, म्हणून त्यांचा त्याग करून तूं इकडे आलीस, तें मला सांग.

लक्ष्मी—जे धैर्याचा त्याग करीत नाहींत, स्वधर्माचें जे अवलंबन करतात, स्वर्गलोकींच्या मार्गाची ज्यांना आवड आहे, अशा लोकांच्या ठिकाणींच मी वास करितें. दान, अध्ययन, यज्ञ, हव्य, पितरांचें व देवतांचें पूजन, गुरु व अतिथी याचा सत्कार व सत्य भाषण या गोष्टी असुर लोक पूर्वी करीत असत. ते आपलीं घरेंदारें स्वच्छ ठेवीत. जितेंद्रियवृत्तीनें रहात. अग्नीला हविर्भाग अर्पण करीत. गुरूंची शुश्रूषा करीत. संयमी वृत्तीनें रहात. त्यांच्या मनांत ब्राह्मणांविषयीं आदरभाव असे. ते नेहमीं सत्य भाषण करीत असत. ते श्रद्धाळू होते. त्यांनीं क्रोध जिंकिला होता. ते दानपरायण व ईर्ष्यारहित होते. पुत्र, अमात्य व भार्या यांचें ते नित्य भरणपोषण करीत असत. मत्सरबुद्धि मनांत वागवून त्यांनीं दुसऱ्यांच्या ऐश्वर्याचा अभिलाष कधींच धरला नाहीं. ते दानशील,

संग्रहणशील, आर्यवृत्तीचे व परदुःख जाणणारे असे होते. ते सरळमार्गी असत. त्यांची भक्ति दृढ होती. त्यांचा अनुग्रह फार मोठा असे. त्यांनीं इंद्रियदमन केलेलें होतें. दुसऱ्याच्या वैभवाबद्दल त्यांना कधींहि हळहळ वाटत नसे. ते आपले नोकर व अमात्य यांचा संतोष राखीत. दुसऱ्यानें केलेल्या उपकारांची आठवण ठेवीत. त्यांच्या वाणींत माधुर्य होतें. ज्याला त्याला ते योग्य तऱ्हेचा मान देत असत. त्यांची वृत्ति नेहमीं विनयशील असे.

ते नेहमीं यमनियमांचा अवलंब करीत. पर्वणीच्या वेळेस उत्तम प्रकारें स्नान करून ते गंधानुलेपन करीत व चांगले अलंकार धारण करीत असत. ते उपवास, तपश्चर्या इत्यादिकांचें आचरण करीत. त्यांना स्वानुभवाचें ब्रह्मज्ञान होतें. ते मंगलकारक कर्मे नेहमीं करीत व ब्राह्मणांची पूजा करीत. त्यांच्यांत धर्मचर्चा चाले, ते कोणापासून प्रतिग्रह घेत नसत. रात्रींच्या वेळेस दहीं आणि सातू खात नसत. पहांटेस उठून ते तुपांत आपलें मुख पहात. ते फार मोठे ब्रह्मवेत्ते होते. ते आपल्या शयनावर असतांना सूर्योदय कधींच झाला नाहीं. ते पहांटेचे कधींच निजून रहात नसत. ते रात्रीचा अर्धा भाग झोपेंत घालवीत. दिवसा त्यांनीं कधींहि झोंप घेतली नाहीं. दरिद्री, अनाथ, वृद्ध, दुबळे, व्याधिग्रस्त पुरुष व स्त्रिया इत्यादिकांच्या बद्दल दयाशील वृत्ति ठेवून ते आपल्या ऐश्वर्याचा अंश त्यांना देत व त्यांना संतुष्ट ठेवीत. त्रस्त झालेल्या, कोणत्याहि कारणानें खेद पावलेल्या, उद्विग्नचित्त, भयार्त, कृश व रोगानें गांजलेल्या, संकटांत सांपडलेल्या, ज्यांच्या सर्वस्वाचा नाश झालेला आहे अशा सर्वांचें तें समाधान करीत असत. ते धर्माचाच अवलंब करून राहत व परस्परांत वैर धरून त्यांनीं एकमेकांची हिंसा कधीं केली नाहीं. कोणत्याहि कार्यांत ते एकमेकांना अनुकूल असत. गुरु व वृद्ध यांची ते नेहमीं सेवा करीत. पितर, देव व अतिथि यांची ते योग्य प्रकारें पूजा करीत, नित्य सत्य व तप यांचा आश्रय करून ते हविर्भाग देऊन उरलेल्या अन्नाचें भोजन करीत.

चांगलें चांगलें अन्न त्यांनीं एकट्यांनींच खाण्याचा स्वार्थ कधींहि दाखविला नाहीं. परस्त्रीगमन त्यांनीं कधींहि केलें नाहीं. दयेच्या बाबतींत आपल्या सारखाच दुसरा अशा भावनेनें ते सर्वांशीं वागत. आकाशामध्यें संचार करतांना त्यांनीं ग्राम्य धर्माचें आचरण केलें नाहीं. पशु, असवर्ण स्त्री, यांच्या ठिकाणीं किंवा पर्वकाळीं स्वस्त्रीच्याहि ठिकाणीं त्यांनीं वीर्यसिंचन कधीं केल नाहीं. नित्य दानशीलता,

दक्षता, आर्जव, उत्साह, निरभिमानपणा, उत्तम प्रकारची मैत्री, क्षमाशील वृत्ति, सत्यभाषण, तपश्चर्या, पावित्र्य, कारुण्य, गोड भाषण व मित्रांच्या बद्दल कधींहि मत्सर न करणें या सर्व गोष्टी, हे इंद्रा, त्या वेळीं त्या असुरांच्या ठिकाणीं होत्या. झोंप, आळस, द्वेष, मत्सर, दुर्लक्ष, विषाद व हव्यास यांनीं असुरांच्या मनांत त्या वेळपर्यंत प्रवेश केला नव्हता. अशा प्रकारच्या गुणांनीं असुर त्यावेळीं युक्त होते. म्हणून सृष्ट्युत्पत्तीपासून अनेक युगेंपर्यंत मी त्यांच्यांत रहात असें.

पुढें काल विपरीत आल्यामुळें त्यांच्या गुणांतहि फरक झाला. काम व क्रोध यांच्या ते आधीन झाले व त्यामुळें धर्म त्यांना सोडून गेला. सर्व वृद्ध लोक यांना जुन्या वृद्ध वृद्ध व चांगल्या लोकांचे इतिहास सांगूं लागले म्हणजे यांनीं त्यांना हंसावें व त्यांचा मत्सर करावा अशी तऱ्हा सुरू झाली. हे असुर गुणांनीं अत्यंत निकृष्ट झाले. स्वतः लहान असून आसनावर बसलेले असतांना वृद्ध माणसें पुढें आलीं तर उठून नमस्कार करून त्यांचा मान राखणें वगैरे गोष्टी राक्षसांच्या हातून पूर्वीप्रमाणें होईनाशा झाल्या. पिता स्वतःच्या कष्टानें आपल्या पोटाची व्यवस्था करीत असतांना देखील मुलगे त्याच्यावर आपला अंमल गाजवूं लागले. नोकरी-पेशा पत्करणें हें ज्यांना लांछनास्पद आहे, अशीं माणसें नोकर झालीं व निर्लज्जपणानें आपल्या स्थितीचें भूषण मिरवूं लागलीं. अन्याय व धर्मबाह्य रीतीनें द्रव्यांच्या राशींच्या राशी संपादन करणारीं मनुष्यें या राक्षसांना आवडूं लागलीं व त्यांच्या द्रव्याचा यांना लोभ सुटला. रात्रीच्या वेळीं हे मोठमोठ्यानें बोलूं लागले. यांच्या घरांतील अग्नि मंद मंद होऊं लागले. मुलगे बापाला जुमानीनासे झाले, स्त्रिया नवऱ्यावर अंमल गाजवूं लागल्या. माता, पिता, वृद्ध माणसें, आचार्य, अतिथि व गुरु यांना वडीलपणाचा मान द्यावयाचा, तो हे राक्षस देईनासे झाले व कुमारांचें रक्षण करण्याचें आपलें कर्तव्यहि यांनीं सोडलें. पितर, देव, अग्नि यांचा भाग काढून न ठेवितां, यज्ञांत आहुति अर्पण न करितां, भिक्षादान, बलिदान वगैरे कोणत्याहि प्रकारें न करतां हे राक्षस आपणच स्वतः अन्न खाऊं लागले. यांचे आचारी कोणत्याहि प्रकारची स्वच्छता राखीत नसत. अन्न उघडें ठेवीत, धान्य इतस्ततः पसरलेलें असे, दूधदुभतें उघडें राही, कावळे-उंदीर येऊन त्यांत तोंड घालीत आणि उष्ट्या हातांनीं हे तुपाला स्पर्श करीत.

कांशाचीं भांडीं, कुदळी वगैरे प्रपंचोपयोगी वस्तूंची राक्षसस्त्रिया काळजी घेईनाशा झाल्या. गांवांतील आपलीं घरें व वेशी पडूं झडूं लागल्या, तर

त्यांकडे हे असुर लक्ष देईनासे झाले. गुरांना बांधून ठेवून त्यांच्या चारापाण्याकडे यांनीं दुर्लक्ष्य करावें. लहान मुलें तोंडाकडे पहात असतांना यांनीं एकट्यांनींच आधाशासारखें अन्न खावें. तसेंच हे राक्षस आपल्या नोकरवर्गाचा संतोष न राखतां खिरी, खिचडी, मांसाचे निरनिराळे पदार्थ, घारगे, करंज्या वगैरे पदार्थ आपल्या एकट्याकरितांच शिजवीत व देव, पितर इत्यादिकांचा भाग त्यांचा त्यांना न देतां चोरासारखे आपणच भक्षण करीत. सूर्य उगवल्यानंतर सुद्धां हे झोंप काढीत. दिवसाहि हे झोंप घेत. रात्रंदिवस या राक्षसांच्यामध्यें घरोघर कलह होऊं लागले. आपल्यापेक्षां श्रेष्ठ पुरुष पुढें बसलेला असला तरी त्याचा मान करण्याची बुद्धि यांना होईनाशी झाली. स्वतः अधर्माचरण करीत असतांना धर्माचरणानें वागणाऱ्या लोकांचा व आपसांत परस्परांचाहि यांनीं द्वेष करावा. यांच्यांत संकर होऊं लागला, पावित्र्य राहिलें नाहीं. मग वेदवेत्ते ब्राह्मण व ज्यानां ऋचांचा उच्चारहि धड करतां येत नाहीं असे पुरुष यांचा मान-सन्मान एकाच मापानें होऊं लागला. दुराचाराला पोषक होतील, असे वेष दासी धारण करूं लागल्या. हार व दुसरीं भूषणें अंगावर घालणें, चालणें, बोलणें व दुसऱ्याकडे पहाणें या सर्व गोष्टी लोकांची अनीतीकडे प्रवृत्ति होईल, अशा तऱ्हेनें दासी करूं लागल्या. स्त्रिया पुरुषवेष व पुरुष स्त्रीवेष घेत व अशा तऱ्हेनें एकमेकांशीं क्रीडा, रति व विहार करण्यांत आनंद मानीत.

योग्य माणसांना पूर्वींच्या लोकांनीं देऊन ठेविलेलीं दानाचीं अभिवचनें स्वतः अधिकारावर आल्यावर हे असुर पाळीनासे झाले. हे नास्तिकपणाचा आश्रय करूं लागले. एकाद्या माणसानें अडचणीच्या प्रसंगीं मित्राजवळ द्रव्याची याचना केली, तर हे मित्र म्हणवून घेणारे असुर त्यांच्या अडचणीचा फायदा घेत व स्वतःचा लवमात्र स्वार्थ साधण्यासाठीं हे त्या मित्राचा कार्यनाश करीत. बाजारपेठेंत व्यवहार करतांना दुसऱ्याच्या द्रव्याचा अपहार करण्याची बुद्धि, हे इंद्रा, काल विपरीत आल्यामुळें या राक्षसांना होऊं लागली. आर्यवर्णाच्या लोकांत शूद्र सुद्धां तपस्वीवृत्तीचा आश्रय करूं लागले. ब्रह्मचर्य न पाळतां कित्येक जण अध्ययन करूं लागले व कित्येक कारण नसतांना व्रतपालन करूं लागले. गुरूपासून ज्ञान मिळविण्याची जिज्ञासा नसलेले लोक शिष्यत्व पत्करून विद्यासंपादनाचा आव आणूं लागले. कित्येक गुरु विद्यार्थ्यांशीं गैरवाजवी सलगी ठेवून त्यांच्याशीं मित्रभाव संपादन करूं लागले.

अंगांत त्राण नाहींसें झाल्यावर, हातून उद्योग होत नाहीं, अशी स्थिति आल्यावर थकलेल्या भागलेल्या वृद्ध आई-बापांना मुलांनीं आपण होऊन अन्न द्यावें हा धर्म; पण पुत्रांपासून तें मागून घेण्याची पाळी या असुरांच्या राज्यांत पितरांवर येऊं लागली. वेदवेत्ते समुद्रासारखे गंभीरवृत्तीचे शहाणे शहाणे लोक कृषिकर्मांत आसक्त होऊं लागले व मूर्ख लोक श्राद्धान्न भक्षण करूं लागले. दररोज प्रातःकाळीं कुशलप्रश्न करणें, निरनिराळ्या प्रकारच्या कामांची आंखणी करून सेवकांना तीं तीं कर्मे करण्यास पाठविणें, वगैरे शिष्यांनीं करावयाचीं ते आळसानें करीनासे झाले. त्यांची मर्जी संपादण्यासाठीं गुरूच हीं कामें करीत. सासू-सासरा समोर असतांना त्यांच्या देखत सुना नोकरांना कामें सांगत. स्त्रिया आपल्या पतींना हांक मारून त्यांना 'अमुक करा, तमुक करा' असें सांगूं लागल्या. मुलाची मर्जी मोठ्या तजविजीनें संभाळण्याचें बापाच्या नशीबीं येऊं लागलें. भीतीमुळें आपलें द्रव्य मुलांना वांटून देऊन दुःखांत आयुष्य कंठण्याचें दुर्भाग्य पितरांच्या वांट्याला येऊं लागलें. आग लागून, दरोडा पडून, किंवा राजभयामुळें ज्यांचा द्रव्यनाश झालेला असेल, अशा दुर्दैवी माणसांना त्यांचे मित्र म्हणविणारीं माणसें हंसूं लागलीं व त्यांचा द्वेष करूं लागलीं.

राक्षस, कृतघ्न, नास्तिक, पापी, गुरुदाराभिमर्शी, अभक्ष्य भक्षण करणारे, कसलेंहि बंधन न पाळणारे, निस्तेज, हतप्रभ असे बनले. काल त्यांच्यावर उलटल्यामुळें त्यांनीं अशा तऱ्हेनें अनाचार करण्यास सुरवात केली. म्हणून हे देवेंद्रा, राक्षसांजवळ राहूं नये, अशी बुद्धि मला झाली. म्हणून मी त्यांज-जवळ न राहातां आपण होऊन तुजकडे आलें आहें. त्या माझें तूं अभिनंदन कर. तूं माझें पूजन केलेंस, म्हणजे सर्व देवता माझा पुरस्कार करितील. ज्या ठिकाणीं मी आहें त्या ठिकाणीं जया व इतर माझ्यासारख्याच देदीप्यमान, मला इष्ट, मींच अर्पण केलेल्या अशा सात देवता वास करितात. आशा, श्रद्धा, धृति, क्षांति, विजिति, सन्नति व क्षमा ह्या सात देवता व त्यांच्यांत मुख्य असलेली ती जया नांवाची देवता ही हे इंद्रा, आठवी देवता होय. या आठी देवता व मीं या सर्वांनीं राक्षसांचा त्याग केला असून आम्ही तुझ्या देशांत आलों आहों. धर्मनिष्ठा ज्यांच्या अंतरंगांत जागी आहे, अशा देवांच्या मध्यें वास करण्याची आमची इच्छा आहे.

भीष्म—हे युधिष्ठिरा, याप्रमाणें त्या लक्ष्मीनें केलेलें भाषण ऐकून, देवर्षि नारद व वृत्रहन्ता इंद्र या दोघांनींहि तिचा संतोष करण्यासाठीं तिचें अभि-

नंदन करून तिचा सत्कार केला. नंतर देवांच्या मार्गावरून अग्नीसारखा वायु वाहूं लागला. त्याचा गंध सर्वतोपरि इष्ट, स्पर्श सुखावह व सर्व इंद्रियांना आनंद देणारा असा होता. लक्ष्मीनें युक्त अशा इंद्राचें दर्शन घेण्याला उत्सुक झालेले सर्व देव अति पवित्र व इष्ट अशा स्थळीं जमले. नंतर लक्ष्मीनें युक्त असा तो देवश्रेष्ठ सहस्रलोचन इंद्र, आपला मित्र जो देवर्षि नारद याच्यासहवर्तमान सुंदर घोडे जोडलेल्या रथांतून स्वर्गलोकाला पोहोंचला व सर्वांच्या आदरसत्काराचा स्वीकार करीत त्यानें देवसभेंत प्रवेश केला. इंद्रानें देवसभेंत प्रवेश केल्यावर, वज्रधर इंद्राचें व लक्ष्मीचें मनोगत काय असावें, याची स्वतःच कल्पना करणाऱ्या, व ज्याचें सामर्थ्य सर्व देवांना परिचित होतें, अशा नारदानें महर्षींसहवर्तमान आपलें आगमन सुखानें स्वर्गलोकीं झालें आहे, असें लक्ष्मीला सुचविलें. त्यावेळीं तेजस्वी अशा त्या अंतरिक्षांतून ब्रह्मलोकांत अमृतवृष्टि झाली. कोणीं आघात केला नसतांहि दुंदुभि आपोआप वाजूं लागले; व त्यांचा नाद घुमूं लागला. प्रसन्न झालेल्या सर्व दिशा तेजानें शोभिवंत दिसूं लागल्या. ऋतुमानाप्रमाणें इंद्रानें पिकांवर पाऊस पाडण्यास सुरवात केली. धर्ममार्गापासून कोणीहि च्युत होईनासा झाला.

अनेक प्रकारच्या रत्नांच्या खाणींनीं पृथ्वी विभूषित झाली. गौळवाड्यांतून सुपुष्ट अशा जनावरांचे आवाज ऐकूं येऊं लागले. देवांच्या त्या विजयकालांत सर्वत्र प्रसन्नता नांदूं लागली. कर्ममार्गांत रत असलेलीं मोठमोठीं माणसें पुण्यवान् माणसांच्या कल्याणकारक मार्गाचा अवलंब करूं लागलीं. देव, मनुष्य, किन्नर, यक्ष, राक्षस, हे सगळे ऐश्वर्यसंपन्न व महासामर्थ्यवान् झाले. झाडें वाऱ्यानें हालूं लागलीं तरी पूर्ण पक्क झाल्यावांचून कोणतेंहि फूल सुद्धां अकालीं झाडावरून पडलें नाहीं. मग फळाची गोष्ट कशाला? गाई इच्छिलेल्या वेळीं भरपूर गोरस देऊं लागल्या. कोणाच्याहि तोंडून कठिण किंवा अपशब्द निघेनासा झाला. असो. सर्वांचें सर्व मनोगत पूर्ण करणारे असे जे इंद्रप्रमुख देव त्यांच्यासहवर्तमान केलेलें हें लक्ष्मीपूजन व त्याची ही कथा, जे लोक ब्राह्मणांच्या सभांतून जाऊन पठण करितील, त्यांचे सर्व मनोरथ पूर्ण होऊन त्यांना लक्ष्मीची प्राप्ति होईल. हे कुरुश्रेष्ठा युधिष्ठिरा, याप्रमाणें, ऐहिक ऐश्वर्यांची उत्पत्ति व लय हीं कशीं होतात, म्हणून मला तूं विचारलेंस, तें मीं आज सर्व तुला सांगितलें आहे. त्याचा नीट विचार करून त्यांतील ग्राह्यांश तूं घे. १२. ३. २२८.

---

## अध्याय २२९ वा.

[ १ मायेच्या अलीकडील ब्रह्मपद कशानें मिळतें, याबद्दलचा युधिष्ठिरप्रश्न. २ जैगीषव्य व असित यांचा संवाद. ]

युधिष्ठिर—प्रकृतीच्या पलीकडचें ब्रह्मपद प्राप्त होण्यासाठीं मनुष्यानें कोणती विद्या संपादन करावी, त्याचें शील कशा प्रकारचें असावें, पराक्रम कसा असावा व आचरण कसें असावें तें हे पितामहा, तूं मला सांग.

भीष्म—मोक्षमार्गाच्या ठिकाणीं निरत असणाऱ्या, पचनास हलका असा आहार घेणाऱ्या, जितेंद्रिय अशा पुरुषाला प्रकृतीच्या पलीकडेस असणारें ब्रह्मपद प्राप्त होतें. याविषयीं जैगीषव्य व असित यांचा झालेला संवाद इतिहासज्ञ सांगत असतात, तो मी तुला सांगतों, ऐक. धर्मांचें रहस्य यथातथ्य रीतीनें जाणणाऱ्या महाबुद्धिमान् अशा जैगीषव्य ऋषीला, क्रोध व हर्ष यांनीं युक्त अशा असितवंशांतला देवलऋषि म्हणाला—

देवल—हे महाभागा, तुला वंदन केलें असतांहि तुला झालेला संतोष दिसत नाहीं किंवा तुझी निंदा केली तरी क्रोधचिह्नें तुझ्या चेहऱ्यावर दिसत नाहींत. असली ही तुझी बुद्धि काय स्वरूपाची आहे, ही तूं कोणापासून संपादन केलीस व हिच्या साहाय्यानें तूं मिळविणार काय तें हे महाभागा, मला सांग.

भीष्म—अशा तऱ्हेचा त्या असित देवलाचा प्रश्न ऐकून तो महातपस्वी जैगीषव्य ऋषि त्याला उद्देशून निःसंदिग्ध, थोड्या शब्दांत, पुष्कळ अर्थ आणणारें व पवित्र अशा प्रकारचें भाषण करिता झाला.

जैगीषव्य—पुण्यशील माणसांना जी गति मिळते, जी गति त्यांचें अंतिम ध्येय आहे व ज्या गतीमुळें त्यांना परम शांति मिळते, ती परमोच्चगति कोणती, ती हे ऋषिसत्तमा, मी तुला सांगतों.

आपली निंदा करणारे व स्तुति करणारे यांच्याशीं जे समभावानें वागतात; आपलें ध्येय किंवा हातून घडलेलीं सत्कृत्यें यांची उगीच वाच्यता जे करीत नाहींत; आपली निंदा करणाऱ्या वक्त्याला जे उलटून बोलत नाहींत; जे मनस्वी पुरुष शत्रूलाहि अपकार करण्याची भावना धरीत नाहींत; जें आपणांस मिळालें नाहीं, त्याबद्दल वृथा शोक ज्यांना होत नाहीं; ज्या वेळेस जें करावयास पाहिजे तें जे करितात; जे गतगोष्टींचा शोक करीत नाहींत, जे कोणतीहि प्रतिज्ञा

करीत नाहींत; द्रव्याच्या इच्छेनें आपल्याकडे कोणी आल्यास त्यांची जे व्रतनिष्ठ पुरुष यथाशक्ति संभावना करितात; ज्यांची विद्या परिपक्क झालेली असून जे अत्यंत बुद्धिमान् आहेत; जे जितेंद्रिय आहेत; ज्यांनीं क्रोध जिंकला आहे; मनानें, कायेनें किंवा वाचेनें जे कोणाचा कधींहि अपराध करीत नाहींत; ज्यांच्या मनांत ईर्ष्या नाहीं; जे एकमेकांची हिंसा कधीं करीत नाहींत; दुसऱ्याचें ऐश्वर्य पाहून ज्यांच्या मनाला कधीं संताप होत नाहीं; दुसऱ्याची निंदा किंवा स्तुति यांत जे रमत नाहींत; आपली कोणी निंदास्तुति केल्यास त्याबद्दल ज्यांच्या चित्ताला विकार होत नाहीं; जे सर्व तऱ्हांनीं शांतवृत्ति धारण करणारे; सर्व भूतहित करण्यासाठीं झटणारे; क्रोध व हर्ष यांनीं वियुक्त; कोणाचाहि अपराध न करणारे; अंतःकरणांतील संशयग्रंथि सोडून यथेच्छ निर्भयपणानें विहरणारे; जे कोणाचे बांधव नाहींत व ज्यांना कोणी बांधव नाहींत; तसेंच जे कोणाचे शत्रुहि पण नाहींत आणि ज्यांना कोणी शत्रु नाहींत; ते स्थितप्रज्ञ होत. या मार्गानें जाणारे जे पुरुष आहेत, त्यांना सुखाची प्राप्ति होते.

हे द्विजसत्तमा, जे धर्मज्ञ लोक या धर्माचें अवलंबन करितात, ते आनंद पावतात व या मार्गापासून जे च्युत होतात ते उद्विग्न होतात. मी ह्या मार्गाचें अवलंबन करतों. तेव्हां, हे देवला, मी कोणाचाहि व कोणत्याहि हेतूनें मत्सर करीत नाहीं. माझी कोणीं निंदा अगर स्तुति केली असतांना मला हर्ष किंवा विषाद होत नाहीं. निंदा-स्तुतीपासून ज्या कोणाला काय मिळवावयाचें असेल तें त्यांनीं मिळवावें. त्यांच्यापासून माझा स्वतःचा ऱ्हास किंवा वृद्धि कांहींच होणार नाहीं. तत्त्ववेत्त्या माणसानें अवमानाचा अमृताच्या प्राप्तीसारखा संतोष मानावा. मान-सन्मानाचा विषासारखा उद्वेग मानावा. जो इहलोकीं व परलोकीं अपमान झाला असतांहि निर्भयवृत्ति राखून सुखानें झोंप घेऊं शकतो, तोच सर्व दोषांपासून विमुक्त होतो. सगळें जग तुच्छ मानल्याचें श्रेय त्याला मिळतें. जे मनस्वी पुरुष आपल्याला परमोच्च गति प्राप्त व्हावी, अशी इच्छा धरतात, त्यांनीं या मार्गानें जावें म्हणजे त्यांना सुख होईल.

जितेंद्रिय राहून सर्व तऱ्हांनीं सर्व प्रकारचें यज्ञ केले असतां प्रकृतीच्याहि पलीकडे असलेलें अचल ब्रह्मपद मनुष्याला मिळतें. अशा तऱ्हेनें परमपदाला पोंचलेल्या मनुष्याच्या स्थानाला देव, गंधर्व, पिशाच किंवा राक्षस कोणीहि पोहोंचूं शकत नाहींत. १२. ३. २२९.

---

## अध्याय २३० वा.

[ १ सर्व जगांत सर्व गुणांनीं युक्त असा पुरुष कोण ? हा युधिष्ठिराचा प्रश्न. २ तद्विषयक वासुदेव-उग्रसेनसंवाद. ]

( १ ) **युधिष्ठिर**—सर्व लोकांना प्रिय असणारा, सर्व भूतांनीं अभिनंदन केलेला, सर्व गुणांनीं युक्त असा मानव या जगांत कोण आहे ?

**भीष्म**—या संबंधांत उग्रसेन व वासुदेव यांचा नारदाला अनुलक्षून एक संवाद झाला, तो मी तुला सांगतों.

( २ ) **उग्रसेन**—ज्या नारदाच्या संकीर्तनामुळें मनुष्यांना स्वर्गप्राप्ति होते, तो सद्गुणसंपन्नच असला पाहिजे. त्याच्या अंगीं कोणकोणते गुण आहेत तें मला सांग.

**वासुदेव**—हे कुकुराधिपा, नारदाच्या अंगीं जे उत्तम गुण आहेत, असें मला वाटतें, ते मी तुला संक्षेपानें सांगतों, ते ऐक. ज्या अहंकारामुळें मनुष्याच्या देहाचा संताप मात्र होतो, असला स्वतःच्या शीलासंबंधाचा अहंकार त्याला नाहीं. त्याचें शील व त्याची विद्या हीं परस्परांपासून भिन्न नाहींत, म्हणजे शास्त्रसंमत असेंच त्याचें आचरण आहे; म्हणूनच त्याची सर्वत्र पूजा होते. नारदाच्या ठिकाणीं असमाधानवृत्ति नाहीं. क्रोध नाहीं, चित्ताचें चांचल्य नाहीं. म्हणूनच त्याच्या ठिकाणीं भयहि पण नाहीं. तो दीर्घसूत्री नाहीं, शूर आहे, सर्व तऱ्हांनीं त्याची उपासना करावी, अशी त्याची योग्यता आहे. स्वार्थामुळें किंवा लोभामुळें त्याच्या वाचेंत कधीं फरक पडत नाहीं ( हा एक-वचनी आहे ). त्याला अध्यात्मशास्त्राचें पूर्ण ज्ञान आहे. तो क्षमाशील आहे, सामर्थ्यवान् आहे, जितेंद्रियवृत्तीनें रहाणारा आहे. सरळपणानें वागणारा व खरें बोलणारा आहे. तो तेजस्वी, यशस्वी, बुद्धिमान्, विनयसंपन्न व ज्ञान-वृद्ध, वयोवृद्ध व तपोवृद्ध असा आहे. तो सुशील आहे. त्याचा सहवास सर्वांना हवासा वाटतो; त्याचा आहार सात्त्विक असतो; लोकांच्याबद्दल त्याला व त्याच्याबद्दल लोकांना चांगला आदर आहे. तो पवित्र असून त्याची वाणी गोड आहे. त्याला कोणाचाहि मत्सर नाहीं. तो दुसऱ्याचें होईल तितकें कल्याणच करितो. त्याच्या ठिकाणीं पापवृत्ति नाहीं. दुसऱ्याचीं संकटें पाहून हर्ष मानणारां-पैकीं हा नाहीं.

वेद, उपनिषदें, नाना प्रकारचे इतिहास, यांच्या साहाय्यानें ज्ञान संपादन करण्याची त्याची इच्छा आहे. त्याच्या अंगीं सहनशीलवृत्ति आहे. त्याची अवज्ञा

कोणी करीत नाहीं. त्याची बुद्धि सम असल्यानें त्याला कोणी प्रियहि नाहीं व अप्रियहि नाहीं. त्याची वाणी सर्वांना रुचेल अशीच आहे. तो बहुश्रुत आहे. त्याला नाना प्रकारच्या कथा ठाऊक आहेत. तो पंडित आहे. त्याला कसलीहि लालसा नाहीं. तो शठवृत्तीचा नाहीं. तो कधीं दैन्य दाखवीत नाहीं. काम व क्रोध हे त्याला माहीत नाहींत. त्याची वृत्ति लोभी नाहीं. कोणत्याहि वस्तूवरून, पैशावरून किंवा हव्यासामुळें त्याचें कोणाशींहि भांडण झालें नाहीं. त्याच्यामधील सर्व दोष निरस्त झालेले आहेत. त्याची भक्ति अनन्यसाधारण आहे. त्याच्यांत निंद्य अशी कोणतीच गोष्ट नाहीं. तो विद्वान् आहे. त्याला कठोरपणा कसा तो ठाऊक नाहीं. मोहाचा दोष त्याच्यामधून पार नाहींसा झालेला आहे. कोटल्याहि गोष्टीची आसक्ति त्याच्या मनाला शिवत नाहीं. तो आत्मसंतुष्ट, आत्मक्रीड, असा आहे. तो उगीच संशयाचें जाळें पसरून बसत नाहीं. तो बोलका आहे. आपलाच हव्यास पुरवून घेण्याची तत्परता त्याचे ठिकाणीं नाहीं. तो आत्मश्लाघा केव्हांहि करीत नाहीं. त्याला मत्सर नाहीं. त्याची वाचा गोड आहे. नाना तऱ्हांचीं निरनिराळीं माणसें जगांत नजरेस पडतात. त्यांची निंदा हा कधींच करीत नाहीं. तो संसर्गविद्येंत (वस्तूत्पत्तिविषयविद्येंत) कुशल आहे. कोणत्याहि शास्त्रासंबंधीं त्याला असूया नसून तो आपल्याच नीतीनें वागत असतो. तो आपला काल फुकट घालवीत नाहीं. त्याचें मन नेहमीं त्याच्या स्वाधीन असतें. त्यानें विद्येबद्दल चांगले कष्ट केलेले आहेत. त्याची बुद्धि तीव्र आहे. कितीहि वेळां समाधि लाविली तरी त्याचें समाधान होत नाहीं. तो अत्यंत युक्त अंतःकरणाचा आहे. त्याची वृत्ति स्खलनशील नाहीं. दुसऱ्या लोकांनीं त्याची कोणत्याहि कामावर योजना केली तरी तो तें काम निर्भयतेनें व त्यांत कोणताहि हलकेपणा न मानतां करतो. दुसऱ्याची गुप्त गोष्ट हा प्रकट करीत नाहीं. अर्थलाभ झाला असतांना त्याला आनंद होत नाहीं किंवा तो मिळाला नाहीं, म्हणून त्याचें चित्त व्यथितहि होत नाहीं. त्याची बुद्धि स्थिर आहे, त्याला कशाचीहि आसक्ति नाहीं, म्हणूनच हे उग्रसेना, त्याची सर्वत्र पूजा होते व सर्व लोक त्याला मानतात. तो सर्वगुणसंपन्न, दक्ष, पवित्र, रोगरहित, काळवेळ ओळखणारा, कोणाला काय प्रिय आहे तें जाणणारा असा आहे. त्याचें प्रिय कोण करणार नाहीं? १२. ३. २३०.

## अध्याय २३१ वा.

[ १ भूतांची उत्पत्ति, स्थिति, लय, वगैरेंबद्दल युधिष्ठिराचा प्रश्न. २ एतद्विषयक शुकव्यास-संवाद. ]

( १ ) **युधिष्ठिर**—हे कुरुश्रेष्ठा, सर्वांची उत्पत्ति व लय हीं ज्यापासून होतात, तें ईश्वरस्वरूप कसें असतें, तसेंच त्याच्या प्राप्तीचीं अंतरंग व बहिरंग साधनें जीं ध्यान व कर्म तीं कशीं करावींत, निरनिराळ्या युगांतील कालगणना व मनुष्यांचें आयुष्य यासंबंधीं सर्व माहिती मला सांग. या लोकांचें स्वरूप कसें, यांची उत्पत्ति कोठून, यांचा लय कशांत होतो, यांचा सर्ग व निधन हीं कोठून होतात ? हे सज्जनश्रेष्ठा, आमचें कल्याण व्हावें अशी तुझी इच्छा असेल तर ही मी विचारतों, ती माहिती मला सांग. पूर्वीं तूं भरद्वाज महर्षि व भृगु यांचा संवाद मला सांगितलास, त्यावरून माझी बुद्धि शुद्ध झाली असून माझे मनांत धर्माविषयीं परम आदर व स्वस्वरूपज्ञानाविषयीं अत्यंत निष्ठा उत्पन्न झाली आहे. तेव्हां, ही मी पुनः विचारीत असलेली माहिती विस्तारानें मला सांग.

**भीष्म**—या संबंधाचा एक पुरातन इतिहास मी तुला सांगतों. भगवान् वेदव्यासानें आपला प्रिय पुत्र जो शुकाचार्य त्याला ही माहिती त्यानें विचारल्या-वरून सांगितली होती. सर्व वेद व सांग उपनिषदें यांचें परिपूर्ण अध्ययन करून धर्मासंबंधाचें नैपुण्य अंगीं बाणल्यामुळें नैष्ठिक कर्में व्यवस्थित करणाऱ्या शुकाचार्यांनीं धार्मिक बाबींबद्दल ज्याचा सर्व संशय नाहींसा झाला आहे असा आपला पिता जो भगवान् कृष्णद्वैपायन व्यास त्याला शंका फेडून घेण्याच्या इच्छेनें प्रश्न केला.

**शुक**—या भूतग्रामाचा कर्ता कोण व उपाधिविशिष्ट झाल्यामुळें निर-निराळ्या युगांत त्याला कोणतीं रूपें धारण करावीं लागतात; तसेंच, ब्राह्मणांचीं कर्तव्यें कोणतीं तें तूं मला सांग.

**भीष्म**—पुत्रानें अशा तऱ्हेनें प्रश्न विचारला असतांना सर्व धर्मांचें परिपूर्ण ज्ञान असलेले, भूत व भविष्य जाणणारे सर्वज्ञ व्यास यांनीं त्या शुकाचार्याला सर्व माहिती सांगितली.

**व्यास**—या सृष्टीच्या आरंभीं ज्याला आदि नाहीं, अंत नाहीं, जन्म नाहीं, म्हातारपण नाहीं, जें कधीं कमीजास्ती होत नाहीं, असें शाश्वत स्वरूपाचें,

तेजस्वी, ज्याच्या स्वरूपाबद्दल कांहीं तर्क बांधतां येत नाहीं, असें ज्ञानाच्याहि कक्षेबाहेरचें एकटें एकच परब्रह्मरूप स्फुरत होतें. डोळ्यांची एकदां उघडझांप होण्यास जो काल लागतो त्याला निमेष म्हणतात. असे पंधरा निमेष म्हणजे एक कला. तीस कला म्हणजे एका काष्ठा. तीस पूर्णांक एक दशांश कला म्हणजे एक मुहूर्त. तीस मुहूर्त म्हणजे एक अहोरात्र. असें हें संख्याप्रमाण ऋषींनीं सांगितलें आहे. तीस अहोरात्र म्हणजे एक मास. बारा मास म्हणजे एक संवत्सर होय. संख्या जाणणारे विद्वान् एका संवत्सराचीं दक्षिणायण व उत्तरायण अशीं दोन अयनें मानतात. सूर्य हा मनुष्यलोकांतील अहोरात्राचे दिवस व रात्र असे दोन भाग करितो. रात्र ही प्राणिमात्रांच्या झोंपेसाठीं असून त्यांचे नित्याचे व्यवहार करण्यासाठीं दिवस आहे. पितरांचे अहोरात्र म्हणजे एक मास होय. याचेहि फिरून शुक्ल व कृष्ण असे दोन भाग पडतात. शुक्ल भाग ( शुक्लपक्ष ) हा व्यवहाराकरितां नेमलेला दिवसरूपी भाग होय व कृष्णपक्ष म्हणजे झोंपेकरितां योजिलेली रात्र होय. देवांचें अहोरात्र म्हणजे मानवांचें वर्ष होय. याचेहि उत्तरायण व दक्षिणायन असे दोन भाग आहेत. उदगयन हा देवांचा दिवस व दक्षिणायन ही देवांची रात्र. पूर्वीं जीवलोकांतील अहोरात्रांची जी व्यवस्था सांगितली, तिच्या अनुरोधानें ही गणना केली. आतां ब्रह्मदेवाचे अहोरात्र व संवत्सर हीं क्रमानें सांगतों, तसेंच कृत, त्रेता, द्वापर व कलि या चारी युगांची कालगणनाहि सांगतों, ती ऐक. देवांचीं चार हजार वर्षें म्हणजे कृतयुगाचा काल होय. तसेंच हीं चारशें वर्षें म्हणजे कृतयुगाचा संध्याकाल व याचा संध्यांशहि तितकाच आहे. म्हणजे, कृतयुगाची कालगणना चार हजार आठशें देवांचीं वर्षें इतकी होते. यांत संध्या काल, संध्यांश व मुख्य काल या सर्वांत प्रत्येकीं चतुर्थांश भाग वजा केला म्हणजे क्रमानें त्रेता, द्वापर व कलि या युगांची कालगणना येईल.

हीं चार युगें सनातन व शाश्वत अशा लोकांचें धारण करतात. हे पुत्रा, ब्रह्मनिष्ठ लोक यालाच—या युगचतुष्टयालाच—शाश्वत ब्रह्मस्वरूप समजतात. ह्या कृतयुगामध्यें सत्याचरण हाच चारी अंगांनीं युक्त असा संपूर्ण धर्म म्हणून समजला जातो. या युगांत वेदपुरुषाच्या तोंडून निघणाऱ्या विधिवाक्यांची प्रवृत्ति अधर्माकडे कधींच होत नाहीं. कृतयुगाखेरीज इतर युगांमध्यें वेदप्रणीत धर्माचें प्राबल्य चतुर्थांचतुर्थांशानें कमी होत जातें व त्या त्या प्रमाणांत चोरी करणें, खोटें बोलणें, इतर प्रकारचें कपटाचरण करणें, इत्यादि प्रकारचा अधर्म प्रबल होत जातो. कृतयुगामध्यें मनुष्यें निरोगी असतात. त्यांच्या सर्व मनकामना पूर्ण

होतात व त्यांचें आयुष्य चारशें वर्षांचें असतें. पुढें त्रेता, द्वापर व कलि या युगांत त्यांचें आयुष्य चतुर्थांशानें कमी होत जातें; म्हणजे, तें क्रमानें तीनशें, दोनशें व शंभर असें असतें. वेदविद्येच्या अभ्यासाकडचा कल युगायुगाच्या ठिकाणीं क्रमाक्रमानें ऱ्हास पावतो, तसेंच मनुष्याचें आयुष्यहि युगायुगाप्रमाणें कमी कमी होत जातें. त्यांच्या वाणींत आशीर्वाद देण्याचें तपोबल तितकें रहात नाहीं. वेदधर्माच्या आचरणाचें फलहि त्या त्या मानानें कमी मिळतें. कृतयुगामध्यें मनुष्यानें आचरण्याचे धर्म निराळे, त्रेतायुगाच्या वेळीं आचरण्याचे निराळे, द्वापराचे निराळे व कलियुगाचे निराळे. त्रेतादि पुढच्या पुढच्या युगांत क्रमानें जो सर्वांगीण ऱ्हास होत जातो, त्याला अनुलक्षून धर्माच्या आचाराची व्यवस्थाहि निरनिराळी आहे.

कृतयुगामध्यें धर्म हा तपःप्रधान होता, त्रेतायुगांत महत्त्व ज्ञानाला, द्वापरयुगामध्यें यज्ञाला प्राधान्य, तर कलियुगामध्यें दान श्रेष्ठ अशी आचारधर्माची युगानुसार व्यवस्था आहे. बारा हजार वर्षांचीं मिळून अशीं जीं चार युगें होतात, या युगचतुष्टयाला एक महायुग अशी संज्ञा विद्वान् लोक देतात. हजार महायुगें म्हणजे ब्रह्मदेवाचा एक दिवस. ब्रह्मदेवाची रात्रहि पण अशीच हजार महायुगांची असते. ब्रह्मदेवाच्या रात्रीला प्रारंभ झाला म्हणजे विश्व प्रलयाप्रत पावतें व भगवान् इश्वर योगनिद्रेंत समाधिस्थ होतो. तसेंच रात्र संपली म्हणजे भगवान् जागृत होतो. ब्रह्मदेवाची रात्र म्हणजे हजार महायुगें व दिवस म्हणजेहि हजार महायुगें. हें ज्याला समजतें, त्याला अहोरात्रांचें ज्ञान झालें असें म्हणतात. रात्र संपल्यावर ब्रह्मदेव जागृत होतो. त्याच्या जागृतावस्थेमुळें अव्यक्त परमात्मस्वरूपांत विकार उत्पन्न होतो व अशा रीतीनें अव्यक्त स्वरूपांतून व्यक्तस्वरूप मनोरूपी महद्भूत निर्माण होतें. १२. ३. २३१.

---

## अध्याय २३२ वा.

[ १. व्यासकथित सृष्ट्युत्पत्तिविचार. ]

( १ ) **व्यास**—अत्यंत देदीप्यमान असें जें ब्रह्मरूप तेज त्या तेजोमय महद्भूतापासून ही द्विविध प्रकारची स्थावरजंगम सृष्टि निर्माण झाली. दिवसाच्या आरंभाला जागृत झालेल्या या ईश्वरस्वरूपाला अविद्येची उपाधि चिकटली म्हणजे जगदुत्पत्तीला आरंभ होतो. सृष्ट्युत्पत्तीच्या क्रमांत पहिलें स्थान व्यक्त-

स्वरूप अशा मनःस्वरूप महद्भूताचें आहे. चित्स्वरूपाला दुरावलेलें, विविध प्रकारांनीं परिभ्रमण करणारें, तेजस्वी वासनास्वरूप व संशयात्मक असें जें मन त्याचेंच वर्चस्व परमात्मस्वरूपावर होतें व सृष्ट्युत्पत्ति करावी, अशा इच्छेनें प्रेरित झालेल्या या मनापासून भूतांच्या उत्पत्तीला प्रारंभ होतो. मनांत विकार उत्पन्न होऊन त्याचें स्वरूप बदलूं लागलें म्हणजे आकाश उत्पन्न होतें. शब्द हा त्याचा गुण. आकाश विकृत झालें म्हणजे त्यांतून सर्व सुगंधावह पवित्र व बलवान् असा वायु निर्माण होतो. वायूचा गुण स्पर्श. वायूचें रूप पालटून त्यांत फरक झाला म्हणजे त्यांतून अत्यंत तेजस्वी, प्रकाशमान, सामर्थ्यसंपन्न असें तेज निर्माण होतें. रूप हा त्याचा गुण होय. हें तेज विकृत होऊं लागलें म्हणजे त्यांतून रसात्मक आपतत्त्व निर्माण होतें. आप परिपक्व दशेला येऊन त्यांत विकार उत्पन्न होण्याची वेळ आली म्हणजे त्यांतून गंधवती पृथ्वी निर्माण होते. याप्रमाणें भूतोत्पत्तीचा क्रम आहे. पूर्वोक्त पूर्वोक्त भूतांचे गुण उत्तरोक्त उत्तरोक्त भूतांमध्यें संक्रांत होत जातात. पंचमहाभूतांपैकीं जें तत्त्व जितका वेळ ज्या स्थितींत असेल, तितक्या वेळेपुरतें तें त्या विशिष्ट गुणांनीं युक्त आहे असें समजावें. गंधमिश्रित पाण्याच्या ठिकाणीं सुवास असतो, म्हणून अशा पाण्यांत आढळणारा गंधगुण हा पाण्याचा नसून तो पृथ्वीचाच होय. पाणी किंवा वायु यांच्या ठिकाणीं संसर्गानें तो आलेला असतो. तो पाण्याचाच होय, असें मंदबुद्धीच्या लोकांनीं पाहिजे तर म्हणावें. महद्, अहंकार व पंचतन्मात्रें हीं जीं निरनिराळ्या प्रकारचें सामर्थ्य अंगीं असलेलीं सात प्रकारचीं आत्मरूपें सांगितलीं, तीं परस्परांपासून अलग राहिल्यानें त्यांच्यापासून संपूर्ण सृष्टि उत्पन्न होईना. तेव्हां, त्या व्यापक स्वरूपाच्या महातत्त्वांनीं एकत्र होऊन शरीराचा आश्रय केला. त्यालाच पुरुष असें नांव आहे. आश्रय यांतील 'श्रि' धातूपासूनच शरीराची व्युत्पत्ति साधतात. भूतांनीं ज्याचा आश्रय केला तें शरीर. या शरीरांत मन, ज्ञानेंद्रियें, कर्मेंद्रियें व पंचमहाभूतें हीं सोळा असतात.

पूर्वजन्मार्जित संचित कर्मासह भूतसूक्ष्मेंहि पण याच शरीरामध्यें प्रविष्ट होतात. मग आपल्याच रूपाचें यथार्थ ज्ञान करून घेण्यासाठीं भूतमात्रांचा आदिकर्ता जो परमेश्वर तो भूतसूक्ष्मांना घेऊन या शरीरांत प्रवेश करतो. हा शरीरस्थ ईश्वर हाच प्रजापति होय. स्थावर व जंगम अशी द्विविध भूतसृष्टि हाच निर्माण करतो. नंतर तो ब्रह्मदेव देव, ऋषि, पितर, मानव, निरनिराळे लोक, नद्या, समुद्र, प्राच्यादि दिशा, पर्वत, वनस्पति, मनुष्य, किन्नर, राक्षस,

पक्षी, पशु, मृग, सर्प इत्यादिकांची उत्पत्ति करतो. क्षर, अक्षर व चर, अचर, अशा दोन्ही प्रकारच्या सृष्टींची उत्पत्ति या ब्रह्मदेवापासूनच झालेली आहे.

या सर्व सृष्टपदार्थांमध्यें पूर्वजन्माच्या ठिकाणीं जे गुण किंवा जीं कर्में होतीं, तेच गुण व तींच कर्में या जन्मींहि पुनः अनुस्यूत होत असतात. हिंस्रपणा किंवा अहिंसावृत्ति; मऊपणा अथवा कठोरपणा; धार्मिक वा अधार्मिक वृत्ति; खरें बोलण्याची किंवा खोटें बोलण्याची आवड यांपैकीं ज्याचा जो गुण पूर्वजन्मींचा, तोच बीजरूपानें ह्या जन्मीं प्रकट होत असल्यानें त्या त्या पदार्थाला त्या त्या गुणकर्मांबद्दल आवड उत्पन्न होते. इंद्रियांनीं उपभोगण्याच्या विषयांमध्यें त्यांच्या स्वरूपामध्यें व पंचमहाभूतांमध्यें नानात्व हें ईश्वरानेंच निर्माण केलेलें असतें व प्रत्येक भूताला सुखाद्युपभोगाचा अनुभवहि ज्याचा त्याला त्यानेंच नेमून दिलेला आहे. मनुष्याकडून जीं कर्में होतात त्यांचें कारण, त्यांचा पुरुषार्थ—पुरुषकार—उद्योगच आहे, असें कांहीं समजतात, तर कांहींच्या मतानें दैव हेंच त्याचें कारण होय. 'स्वभाव हेंच तीं कर्में घडण्याचें कारण' असें मानणारा तिसराहि एक पंथ आहे. उद्योग, कर्म व दैव हीं स्वभाव, वृत्ति व फल या तिन्ही बाबतींत एकरूपच असल्यानें त्यांच्यांत भेद नाहींच असें कित्येकजण मानतात.

प्राणिमात्रांच्या ठिकाणीं हें जें विविधत्व उत्पन्न होतें, त्याला कारण उद्योग कीं दैव याचा निश्चय पुष्कळांना करतां येत नाहीं. दैव हें एकटें कारण असेंहि म्हणतां येत नाहीं. उद्योग हें एकटें कारण असेंहि ही मंडळी म्हणूं शकत नाहीं. उद्योग व दैव दोन्ही मिळून या नानात्वाचें कारण, असेंहि निश्चितपणें सांगतां येत नाहीं. इतकेंच नव्हे, तर या दोहोंहून तिसरेंच कांहीं कारण आहे, असाहि निश्चय होऊं शकत नाहीं. हें आर्हत जैनांचें मत होय. परंतु, ज्यांची बुद्धि स्थिर झाली आहे, सर्वांभूतीं ईश्वर सारखा भरला आहे, हें ज्यांना पटलें ते ईश्वरच याचें कारण होय, असें मानतात. इहलोकीं प्राणिमात्राला आचरण्याला योग्य असा तपश्चर्या हा परमश्रेष्ठ धर्म होय. शम व दम हीं तपश्चर्येचीं मूलभूत साधनें असून या तपोबलाच्या योगानें मनुष्य मनानें जें जें चिंतील व ज्याची इच्छा धरील, तें तें सर्व त्याला मिळतें. ज्या महद्भूतापासून या सर्व जगाची उत्पत्ति होते, त्या भूताशीं सायुज्यता प्राप्त करून देण्याचें सामर्थ्य तपोबलांत आहे. तपश्चर्येच्या बलानें मनुष्यानें एकदां अव्ययपदप्राप्ति करून घेतली म्हणजे तो तद्रूप होतो व स्वतःच सर्व प्राणिमात्रांचा शास्ता होतो. या तपोबलाच्याच योगानें ऋषि अहोरात्र वेदविद्येचें अध्ययन करीत असतात.

ही स्वयंभू सनातन वेदविद्या ईश्वरापासून ब्रह्मदेवाला मिळाली व त्यानें ती शिष्यप्रशिष्यांच्या द्वारें प्रसृत केली. वेदांमध्यें ज्या प्रकारचीं सृष्टिरूपें सांगितलीं आहेत, तीं सृष्टिरूपें; ऋषींचीं नांवें; प्राणिमात्रांचीं विविध रूपें; कर्मांची त्या त्या क्रियेच्या ठिकाणीं प्रवृत्ति; हीं सर्व ईश्वरानेंच वेदांच्या शब्दांनींच निर्माण केलीं. ब्रह्मदेवाची एक रात्र संपून पुनः सृष्टिकाल ज्या वेळेस येतो अशा वेळेस वेदांत सांगितलेल्या सृष्टि व ऋषींचीं नांवें हीं ईश्वर पुनः निर्माण करतो. वेदाध्ययन; गृहस्थाश्रमाचें आचरण; नाना प्रकारचें व्रताचरण; वानप्रस्थाश्रम; सर्व आश्रमांत करावीं लागणारीं नित्य कर्में; निरनिराळ्या प्रकारचे यज्ञ; तळीं, विहिरी बांधण्यासारखीं कीर्तिदायक व लोकोपयोगीं कर्में; विराट्सृष्टि, सूक्ष्म-कारणब्रह्म सृष्टि व परमेश्वराचें शुद्ध अव्यय स्वरूप या तिन्हींचें क्रमानें ध्यान; व शेवटीं स्वस्वरूपप्राप्ति या दहा पायऱ्यांनीं मनुष्याला क्रमाक्रमानें मोक्ष मिळतो. वेदवेत्त्या ऋषींनीं वेदोक्त कर्मकांडांत ज्या गहन ब्रह्मरूपाचें वर्णन विस्तारानें करून ठेविलें, त्या ब्रह्मस्वरूपाचें विशेष विस्तारपूर्वक विवेचन वेदान्तामध्यें–उपनिषदांत–आहे. त्याची प्राप्ति पूर्वोक्त नाम, भेद इत्यादि दहा प्रकारच्या पायऱ्यांनीं क्रमानें होते. या जगांत 'मी दुसऱ्यापासून वेगळा आहें,' असा प्राणिमात्राच्या ठिकाणीं दृष्टोत्पत्तीस येणारा पृथक्भाव, हाहि कर्मांपासून निर्माण होणारा आहे. आत्मसिद्धीचें–आत्मस्वरूपाचें–यथार्थ ज्ञान झालें म्हणजे पुरुष या भेदभावाच्या कल्पनांचा त्याग करितो. ब्रह्मस्वरूपाचे शब्दब्रह्म व परब्रह्म असे दोन भाग आहेत.

शब्दब्रह्माचें यथार्थ ज्ञान झालें म्हणजे मनुष्याला परब्रह्माचें ज्ञान होतें. पशूचें आलंभन करून त्याचें हवन करणें हा क्षत्रियांचा मुख्य धर्म; धान्यादिकांचा हविर्भाग देऊन यज्ञ करणें हा वैश्यांचा धर्म; ब्रह्म, क्षत्र, विश् या तिन्ही वर्णांची सेवा हा शूद्रांचा धर्म व तपाचरण हा ब्राह्मणांचा धर्म होय. हा निरनिराळ्या यज्ञांचा जो विधि सांगितला, हा त्रेतायुगापुरता होय. कृतयुगाकरितां हा यज्ञभेद नाहीं. द्वापर व कलि या युगांत हीं सगळीं यज्ञस्वरूपें नाहींशीं होतात. कृतयुगामध्यें सर्व मर्त्य जीवांचा धर्म एकच होता. ऋक्, साम व यजुः या वेदत्रयीनें सांगितलेले विविध यज्ञप्रकार हे कामनिक आहेत, असें जाणून तपोबलाच्या जोरावरच कृतयुगांतील मनुष्यें आत्मप्राप्ति करून घेत. त्रेतायुगांत जे महाबलाढ्य पुरुष निर्माण झाले, त्यांच्यामध्यें स्थावरजंगमसृष्टीचा निरोध करण्याचें सामर्थ्य होतें. धर्माचरणाकडे यांची प्रवृत्ति होईनाशी झाल्यामुळें धर्माचे शास्ते जे देव

त्यांनीं निरनिराळ्या यज्ञांचीं अनुष्ठानें व त्यांचे विधि घालून दिले. निरनिराळ्या वर्णांचे व आश्रमांचे धम यांची व्यवस्था लावून दिली. द्वापरयुगांत मनुष्याच्या आयुष्याचा ऱ्हास झाल्यामुळें लोक या कर्ममार्गांतून कांहींसे भ्रष्ट झाले व कलियुगांत तर केवल अधर्माचेंच साम्राज्य होऊन वेद व यज्ञ यांचा सर्वस्वीं उच्छेद होतो. वेद व यज्ञ हे क्वचित् दिसतात. कृतयुगाच्या ठिकाणीं विद्या, तपश्चर्या व आत्मज्ञान यांनीं युक्त अशा ब्राह्मणांच्या मध्यें धर्माचरण पूर्णपणें वास करीत होतें. पुढें त्रेता, द्वापर व कलि या युगांत हें वैदिक कर्म, वेदांनीं सांगितलेल्या मार्गानेंच, परंतु कामनिक बुद्धीनें आचरणांत येऊं लागलें. त्रेतायुगांत ही कामना स्वर्गप्राप्तीची होती.

द्वापरयुगांत पुत्रादि ऐहिक सुखांच्या प्राप्तीची कामना होती व कलियुगांत ती शत्रुघाताची आहे. पावसाळ्यामध्यें पावसामुळें ज्याप्रमाणें पुष्कळ स्थावरजंगम भूतांची उत्पत्ति होते, तशी युगायुगाचे ठिकाणीं धर्माधर्मांची वृद्धि व ऱ्हास हीं होतात. निरनिराळ्या ऋतूंच्या ठिकाणीं ज्याप्रमाणें त्या त्या ऋतूंचीं लक्षणें दृग्गोचर होतात, त्याचप्रमाणें ब्रह्मा, हर, इत्यादिकांचे ठिकाणीं सृष्टि उत्पन्न करण्याचें किंवा तिचा संहार करण्याचें सामर्थ्य त्या त्या काळीं उत्पन्न होतें. आतांपर्यंत मीं जें अनाद्यनंत व विविधरूपी असें कालतत्त्व तुला सांगितलें, त्याच कालतत्त्वापासून प्रजा निर्माण होतात व त्याच्याच ठिकाणीं प्रलयकालीं विलीन होतात. जगांत जीं नानाविध भूतें दिसतात, त्यांचें अधिष्ठान हा कालच होय. हा कालच नाना प्रकारच्या भूतांच्या रूपानें अवतरतो व त्यांचें धारणपोषण करतो. भूतमात्रांमधील ही विविधता स्वभावामुळेंच आलेली असते. सृष्टीची उत्पत्ति, नैमित्तिक कर्मांचे काल, यज्ञयागादि क्रिया, त्यांचें विवरण करणारे वेळ, त्या क्रियांचें अनुष्ठान करणारा कर्ता, त्यांचें स्वर्गादि फल, इत्यादि सर्व कालात्म्याचींच स्वरूप होत. याप्रमाणें तूं विचारलेल्या प्रश्नांचीं उत्तरें आहेत. १२. ३. २३२.

---

## अध्याय २३३ वा.

[ १ सृष्टिप्रलयाचें वर्णन. ]

( १ ) व्यास—आतांपर्यंत सृष्टि उत्पन्न कशी होते तें, हे पुत्रा, मीं तुला सांगितलें. आतां, सृष्टीचा उपसंहार कसा होतो, तें सांगतों, ऐक. दिवस संपून रात्रीला सुरवात झाली म्हणजे ईश्वर या सर्व विश्वाचें स्वरूप अत्यंत सूक्ष्म करून

तें आत्मस्वरूपीं विलीन करीत असतो. त्याचा क्रम असा. ब्रह्मदेवाचा दिवस संपून रात्रीला सुरवात झाली म्हणजे सूर्य आपल्या पूर्ण तेजानें आकाशांत तळपूं लागतो, व संकर्षणाच्या मुखांतून निघणाऱ्या अग्नीच्या सात प्रकारच्या ज्वालाहि भडकूं लागतात. सूर्याच्या व अग्नीच्या ज्वालांनीं हें सर्व जग होरपळून निघतें. या पृथ्वीवर जीं कांहीं स्थावर-जंगम भूतें आहेत, तीं प्रथम नाहींशीं होऊन पृथ्वीचें रूप घेतात. याप्रमाणें सर्व स्थावर-जंगम भूतें नाहींशीं झालीं म्हणजे वृक्षहीन व तृणहीन झालेली ही भूमि कांसवाच्या पाठीप्रमाणें नितळ दिसूं लागते.

भूमीचा गंध हा गुण जलानें हरण करून घेतला म्हणजे आत्तगंधा अशी जी ही भूमि ती स्थूल कार्यस्वरूपाचा त्याग करून सूक्ष्म कारणस्वरूप धारण करिते. मग ज्यांतून मोठा निर्घोष उत्पन्न होत आहे, प्रचंड लाटा उसळत आहेत, असें एकच आपतत्त्व हेंच विश्वाला व्यापून रहातें व त्यांत संचार करतें आणि सर्व विश्व जलरूप होतें. आपतत्त्वाचा विशिष्ट गुण जो रस, तो गुण तेजानें शोषून घेतला म्हणजे आत्तरस झालेलें हें जलतत्त्व पंचमहाभूतांपैकीं जें तेजोरूप भूत त्यामध्यें विलीन होऊन तद्रूप होतें. अग्नीच्या प्रदीप्त झालेल्या ज्वाला, आकाशाच्या मध्य-भागीं असलेल्या सूर्यमंडलाला जेव्हां भेदूं पहातात, अग्नि ज्या वेळेस इतका प्रज्वलित होतो, त्या वेळेस सर्व आकाश अग्निज्वालांनीं परिपूर्ण होतें. तेजाचा गुण जो रूप, तो वायूनें हरण करून घेतला म्हणजे तेजस्तत्त्व शांत होतें व वायूंत विलीन होतें. याप्रमाणें तेजस्तत्त्व शांत झाल्यावर महाभयंकर असा वारा वाहूं लागतो. स्वतःपासूनच उत्पन्न झालेल्या शब्दाच्या आश्रयानें खालीं, वर, उभा, आडवा, सर्व बाजूंनीं पसरतो व दशदिशा व्याप्त करून सोडतो. वायूचा विशिष्ट गुण जो स्पर्श त्याला यापुढें आकाश ग्रासतें. वायूचा स्पर्शरूपी गुण आकाशानें ग्रस्त केला म्हणजे नुसत्या ध्वनीनें घुमणारें आकाश शिल्लक राहतें व बाकीच्या भूतांचीं स्थूलरूपें नाहींशीं होतात. ज्याला रूप, रस, स्पर्श, गंध, यांपैकीं कोणताच गुण नाहीं, किंवा कसलाहि आकार नाहीं, असलें निराकार व शब्द या एकाच गुणानें युक्त असें आकाश सर्व लोकांमध्यें आपला शब्द घुमवीत राहतें. आकाशाचा विशिष्ट गुण शब्द. हा मनाच्या स्थूलसंकल्पविकल्पात्मक स्वरूपांत लीन होतो व अखेर मनाचें अभिव्यक्त स्वरूपहि नाहींसें होऊन तें अव्यक्त बनतें. याला ब्राह्मप्रलय असें म्हणतात.

परमश्रेष्ठ असें ज्ञान, वैराग्य, ऐश्वर्य, धर्म, इत्यादि षड्गुणैश्वर्यसंपन्न ईश्वराचे जे आत्मगुण ते मनाचे ठिकाणीं असतात. पुढें या गुणांनीं युक्त अशा

मनाचा लय चंद्रामध्यें होतो. कारण, विराट् पुरुषाचें मन म्हणजे चंद्रच होय. ( चंद्रमा मनसो जातः ) मन चंद्रामध्यें विलीन झाल्यावर वर सांगितलेले ज्ञानवैराग्यादि आत्मगुण चंद्राचा आश्रय करून रहातात. हें संकल्परूप मन, हा चंद्रमा, जगांतील भूतमात्रांच्या मनाचें हें समष्टिरूप, अखेर दीर्घ कालानंतर चित्ताच्या आधीन होतें व अखेर 'परब्रह्म तें मीच' अशा शुद्ध स्वरूपाच्या ज्ञानांत संकल्प, चित्त समष्टिरूप मन इत्यादि सर्वांचाच लय होतो. विज्ञानाचा लय कालामध्यें होतो. जगाचें ज्ञान नाहींसें होऊन 'मी आहें' एवढाच भास शिल्लक राहतो. 'मी तें आहें' यांतील 'तें' या पदानें लक्षित असलेलें जगाचें ज्ञान नाहींसें होऊन केवळ 'अस्मिता' शिल्लक रहाते. शेवटीं ही 'अस्मिता' हि नाहींशी होऊन तिचा लय अत्यंत श्रेष्ठ जी ईश्वराची शांतावस्था तिच्यांत होतो. पुढें काल, बल हीं सर्वच ज्ञानामध्यें लय पावतात. अशा ज्ञानप्राप्तीनंतर आकाशाचा घोष हा गुण आत्मस्वरूपांत विलीन होतो. हेंच शाश्वत, परमश्रेष्ठ, अव्यक्त असें ब्रह्मस्वरूप होय. अशाप्रकारें सर्व भूतें परब्रह्मस्वरूपांत विलीन होतात. यालाच सूत्रप्रलय असें म्हणतात. अशा प्रकारचें हें ज्ञान ब्रह्मज्ञान संपादन करून तद्रूप बनलेल्या योगी जनांनीं विद्या पढविण्याला लायक व आतुर अशा शिष्यांना सांगितलें. हें सत्यज्ञान असून याच्या योगानें सर्व संशय नाहींसे होतात. अशा प्रकारें सृष्टि व प्रलय हीं ब्रह्म व प्रकृति यांच्यामुळें होतात. ब्रह्मदेवाच्या प्रत्येक रात्रीच्या आरंभीं—म्हणजे दोन हजार वर्षांनीं—प्रलय व त्याच्या प्रत्येक दिवसाच्या आरंभीं—म्हणजे दोन हजार वर्षांनीं—सृष्टीची उत्पत्ति होते. १२. ३. २३३.

---

## अध्याय २३४ वा.

[ १ ब्राह्मणांचें कर्तव्य. ]

( १ ) व्यास—सर्व महाभूतांच्या विषयीं—त्यांची उत्पत्ति, स्थिति व लय हीं कशीं होतात—त्यांचा नियंता कोण वगैरे ज्या गोष्टी तूं, हे पुत्रा, मला विचारल्यास, त्या मीं तुला सांगितल्या. आतां ब्राह्मणांचीं कर्तव्यें सांगतों, ऐक. जातकर्मापासून शेवटपर्यंत ब्राह्मणाच्या प्रत्येक कर्माचें आचरण सदक्षिण असें झालें पाहिजे. ब्राह्मणानें समावर्तनापर्यंतचा आपला काल वेदविद्यापारंगत अशा आचार्याजवळ अध्ययन करण्यांत व त्याची शुश्रूषा करण्यांत घालवावा.

यज्ञासंबंधींच्या कर्मकांडाचें यथार्थ ज्ञान करून घेऊन गुरूच्या ऋणांतून मुक्त होऊन नंतर ब्राह्मणानें समावर्तन करावें. त्यानें गुरूची अनुज्ञा घेऊन चारी आश्रमांपैकीं कोणत्याहि एका आश्रमांत शरीरपातापर्यंत यथाविधि रहावें. त्यानें पाहिजे तर विवाह करून संसार करावा. इच्छा असल्यास नैष्ठिक ब्रह्मचर्याचें अवलंबन करून वनांत अथवा गुरूच्या जवळ रहावें. त्याच्या मनांत असल्यास संन्यासधर्माचें आचरणहि त्यानें करावें. या चारी आश्रमांचें मूलसाधन म्हणजे गृहस्थाश्रमच होय. कारण, या आश्रमामध्यें येणाऱ्या अनेक प्रसंगांनीं इंद्रियनिग्रह त्याच्या अंगीं बाणतो व इतर कोणत्याहि आश्रमांत रहाण्यास तो लायक ठरतो. विद्या परिपूर्ण झालेल्या श्रोत्रियानें यज्ञयागादि कम करून, प्रजोत्पादन करून, देवऋण, ऋषिऋण व पितृऋण हीं तिन्ही ऋणें फेडावीं व नंतर कर्माचरणानें पवित्र होऊन दुसऱ्या आश्रमांत प्रवेश करावा. पृथिवीमध्यें सर्वांत पुण्यकारक असें जें स्थान असेल तेथें रहावें व त्या गांवांत उत्तम प्रकारचें पराकाष्ठेचें यश आपणांस मिळेल असा प्रयत्न नेहमीं करावा.

ब्राह्मणाचें यशोवर्धन अतिशय मोठ्या तपश्चर्येनें, उत्तम प्रकारची विद्या संपादन केल्यानें, यज्ञयाग केल्यानें व दानादि कर्में केल्यानें होतें. जोंपयत मनुष्याचा वाढता लौकिक या पृथ्वीतलावर दुमदुमत राहील, तोंपर्यंत पुण्यबलाच्या जोरावर प्राप्त होणाऱ्या स्वर्गादि लोकांची प्राप्ति त्याला होते. ब्राह्मणानें स्वतः अध्ययन करावें व दुसऱ्याकडून करवावें. त्यानें स्वतः यज्ञ करावे व दुसऱ्याकडून करवावे. कोणापासून निष्कारण दान घेऊं नये व कोणालाहि निष्कारण दान देऊं नये. जो आपल्याकडून यज्ञ करविणार असेल, अशा माणसाकडून, शिष्याकडून किंवा कन्येकडून पुष्कळ द्रव्य घेऊन त्यांच्या साहाय्यानें यज्ञयाग व दानादि कर्में करावीं. ब्राह्मणानें एकट्यानें भोजन कधीं करूं नये. गृहस्थाश्रमामध्यें रहाणाऱ्या ब्राह्मणाला देव, ऋषि व पितर यांच्याकरितां दान घेण्याइतकें पुण्यकारक कर्म कोणतेंच नाहीं. वृद्ध, रोगी, भुकेनें पीडिलेले, अज्ञातवास ज्यांना पत्करावा लागला असेल असे, काम करून पोटाला मागणारे, या सर्व लोकांना आपल्या ऐपतीबाहेर सुद्धां दान द्यावें; यांना द्रव्यदान द्यावें इतकेंच नाहीं, तर स्वतः उपार्जित केलेल्या पुण्याईचा अंशहि यांना द्यावा. योग्य व सर्वतोपरि सत्पात्र अशा माणसांना देऊं नये, असें या जगांत कांहींच नाहीं.

सज्जनांनीं इंद्राचा ऐरावत मागितला, तरी तोसुद्धां त्यांच्यापुढें उभा केला पाहिजे. महाव्रत सत्यसंधानें ब्राह्मणांचें मन धरण्याचा प्रयत्न केला व आपले

प्राण देऊनहि ब्राह्मणांचे प्राण वांचविले आणि अखेर स्वर्गलोकाला गेला. सांकृत्य रंतिदेवानें महात्म्या वसिष्ठाला शीतोष्ण अशा जलाचें दान दिलें, त्यामुळें त्याची कीर्ति स्वर्गलोकांत दुमदुमून राहिली आहे. अत्रिकुलोत्पन्न इंद्रदमन राजानें सत्पात्र लोकांना विविध प्रकारच्या धनाचें दान दिलें, त्यामुळें त्याला शाश्वत लोकांची प्राप्ति झाली. औशीनर शिबिराजानें स्वतःचीं अंगप्रत्यंगें व पुत्र यांचें दान ब्राह्मणांना दिलें, म्हणून त्याची कीर्ति स्वर्गलोकभर गाजत आहे. काशिराजा प्रतर्दन यानें आपले दोन्ही डोळे काढून ब्राह्मणांना दिले, म्हणून त्याला इहपरलोकीं अतुल कीर्तीचा लाभ झाला. सोन्याचें, अत्यंत ऐश्वर्यसंपन्न, असें आठ काड्यांचें दिव्य छत्र देवावृध राजानें दान दिलें, म्हणून तो राष्ट्रासह स्वर्गलोकीं गेला. सांकृति व आत्रेय यांनीं शिष्यांना निर्गुण ब्रह्माचें स्वरूप समजावून सांगितलें, म्हणून त्यांना परम श्रेष्ठ अशा लोकांची प्राप्ति झाली.

महासामर्थ्यवान् अशा अंबरीषानें अकरा अर्बुदें गाई ब्राह्मणांना दान दिल्या म्हणून राष्ट्रासह त्याला स्वर्गलोकीं जातां आलें. सावित्रीनें आपलीं दिव्य कुंडलें व जनमेजयानें आपलें शरीर ब्रह्मकार्यार्थ अर्पण केलें, म्हणून त्या दोघांना उत्तम गति मिळाली. वृषादर्भी राजानें सर्व प्रकारचीं रत्नें दान दिलीं, युवनाश्वानें प्रिय अशा स्त्रिया व रम्य रम्य मंदिरें दान दिलीं, म्हणून ते स्वर्गातील मिळाले. विदेहाधिपति निमिराजानें राष्ट्र दान दिलें. जामदग्न्यानें पृथ्वी दान केली. गयराजानें गांवें, शहरें यांसुद्धां सगळ्या भूमीचें दान केलें. एकदां अवर्षण पडलें असतांना भूतदयेनें प्रेरित होऊन, प्रजापतीनें प्रजांचें रक्षण करावें, त्याप्रमाणें वसिष्ठानें सर्व भूतांचें रक्षण केलें. करंधमाचा पुत्र पुण्यशील मरुत् यानें अंगिराऋषीला आपली कन्या दिली व तो स्वर्गलोकाला गेला. पंचाल देशाचा राजा ब्रह्मदत्त यानें शंख नांवाचा द्रव्यनिधि ब्राह्मणांना दिला, म्हणून त्याला उत्तम गति मिळाली. मित्रसह राजानें महात्म्या वसिष्ठाला आपली प्रिया मदयंती दिली व तिच्यासह तो स्वर्गाला गेला. महायशस्वी अशा सहस्रजित् नांवाच्या राजर्षीनें आपल्याला प्रिय असणारे प्राण ब्राह्मणांच्या साठीं सोडले व म्हणून त्याला चांगल्या लोकांची प्राप्ति झाली. राजा शतद्युम्नानें सर्व प्रकारच्या सुखसोयींनीं युक्त असें सोन्याचें संपूर्ण घर मुद्गलाला दिलें, म्हणून तो देवलोकीं गेला.

शाल्वदेशाचा महाप्रतापी द्युतिमान् नांवाचा राजा होता, त्यानें आपलें राज्य ऋचीकाला दिलें. लोमपाद नांवाच्या राजर्षीनें आपली कन्या शांता ही ऋष्य-

शृंगाला दिली, त्यामुळें त्याचे सर्व मनोरथ पूर्ण झाले. राजर्षि मदिराश्व यानें आपली सुमध्यमा कन्या हिरण्यहस्ताला दिली. त्यामुळें देवांनीं नांवाजलेले लोक त्याला मिळाले. राजा प्रसेनजित् यानें सवत्स अशा शतसहस्र गाईंचें दान केलें, म्हणून त्या तेजस्वी राजाला उत्तम गति मिळाली. हे व दुसरे अनेक महात्मे पुरुष यांनीं नाना प्रकारचीं दानें दिलीं व तपश्चर्या केली. म्हणून त्या पुण्यात्म्या व जितेंद्रिय पुरुषांना स्वर्गलोकाची प्राप्ति झाली. ही पृथ्वी जोंपर्यंत स्थित आहे, तोंपर्यंत या महात्म्यांची कीर्ति सुप्रतिष्ठित राहील. दान, यज्ञ व प्रजोत्पादन यांनींच या महात्म्या पुरुषांना स्वर्गप्राप्ति झाली आहे. १२. ३. २३४.

---

## अध्याय २३५ वा.

[ १ ब्राह्मणांचीं कर्तव्यें. २ संसारसागराचें वर्णन. ]

( १ ) **व्यास**—वेदांनीं सांगितलेल्या कर्मकांडाचें ब्राह्मणानें सांगोपांग अध्ययन करावें. या कर्मकांड विद्येमध्यें ऋक्, साम, यजु व अथर्वण या सर्व वेदांचा अंतर्भाव होतो. ब्राह्मणानें करावयाच्या षट्कर्मांत असलेलें भगवत्स्वरूप या वेदांमध्येंहि आहे. वेदवादामध्यें व अध्यात्मज्ञानामध्यें प्रवीण असलेले जे सत्त्वशील महात्मे त्यांना सृष्टीची उत्पत्ति व प्रलय यांचें ज्ञान असूं शकतें. ब्राह्मणानें अशा रीतीनें धर्मानें चालावें. चार शिष्ट लोकांप्रमाणें कर्मे करावीं. आपलें उपजीविकेचें साधन मिळवितांना कोणत्याहि माणसाचा द्रोह करूं नये. ज्यानें सज्जनांच्याकडून ज्ञान मिळविलें, अभ्यास करून शास्त्रांत नैपुण्य संपादन केलें, स्वधर्माचें आचरण करून लौकिक कर्मे जो शिष्टसंमत रीतीनें करतो, असल्या षट्कर्मसंपन्न गृहस्थाश्रमी पुरुषाला ब्राह्मण म्हणतात. ब्राह्मणानें श्रद्धायुक्त अंतःकरणानें पंचमहायज्ञ करावे. त्यानें नेहमीं धैर्यशील, अप्रमत्त, जितेंद्रिय, धर्मनिष्ठ व आत्मज्ञानयुक्त असावें. हर्ष, मद व क्रोध हे ज्याच्यामध्यें नाहींत, असा ब्राह्मण कधींहि अधःपात पावत नाहीं. दान, अध्ययन, यज्ञ, तपश्चर्या, विनय, सरळपणा व दमनशीलता या गुणांनीं ब्राह्मणाचें तेज वाढतें व पापक्षालन होतें. बुद्धिमान् ब्राह्मणानें याप्रमाणें पापक्षालन करून, पचण्यास हलका असा आहार करून, जितेंद्रियवृत्तीनें राहून काम व क्रोध जिंकावे व ब्रह्मपदप्राप्तीची इच्छा धरावी. अग्नि, ब्राह्मण व देवता यांना प्रणाम करावा,

अवाच्य शब्द उच्चारूं नयेत व धर्माचा आधार ज्याला नाहीं, असली हिंसा करूं नये. पूर्वीपासून चालत आलेला ब्राह्मणांचा आचार हा आहे.

( २ ) ज्ञानप्राप्ति करून घेऊन कर्में करणारास त्या त्या कर्मांत सिद्धि प्राप्त होते. बुद्धिमान् माणसाला, पंचेंद्रियांचे विषयोपभोग हेंच ज्यांतील पाणी, लोभ हींच ज्याचीं तीरें, राग हा ज्यांच्यांतील चिखल, असा घोर दुर्लंघ्य व सुदुस्तर संसारसागर तरून जाणें शक्य होतें. काल हा अतिशय मोह उत्पन्न करणारा आहे व तो आपलें कार्य करण्यास सदैव सज्ज आहे, हें ब्राह्मणानें नेहमीं लक्ष्यांत ठेवावें. परमेश्वरानें उत्पन्न केलेल्या, ज्याचें सामर्थ्य अप्रतिहत आहे, अशा कालाच्या या महाप्रवाहाबरोबर जग अगतिक रीतीनें वाहात जातें. काल हा मोठा जलप्रवाह होय. वर्षें हे यांतील भोंवरे, महिने या लाटा, ऋतूंची गति हा याचा वेग, शुक्लकृष्णपक्ष हे यांत वाढलेले लताकुंज व गवत, डोळ्यांची उघडझांप हा या कालरूपी जलाचा फेंस, दिवस व रात्र हें पाणी, कामक्रोधादि विकार हे यांतील भयंकर जलचर प्राणी, वेद व यज्ञ या हें जल तरून जाण्याच्या नाका, ज्यांत अर्थ व कामरूपी पाणी आहे, असें धर्म हें मनुष्यप्राण्यांना संसारसागरांत गटंगळ्या खातांना विसांवा घेण्यासाठीं असलेलें बेट होय.

सत्य वाणी ही या जलप्रवाहाचें मोक्षतीर होय. अहिंसारूपी वृक्ष या जलप्रवाहांत वहात असतात. हा कालप्रवाह परमेश्वरापासून उत्पन्न झालेला असून याच्या मध्यभागीं युगरूपी भोंवरे आहेत. परमेश्वरानें उत्पन्न केलेल्या सर्व भूतमात्रांना हा कालप्रवाह यमसदनाकडे ओढून नेत असतो. मनस्वी व धृतिमान् पुरुषांना हा प्रवाह तरून जाण्याला बुद्धि ही एकच नौका आहे. ही बुद्धिरूप नौका ज्याचेपाशीं नाहीं, त्या अल्पबुद्धि माणसाच्या हातून काय होणार? तेव्हां, हा संसारसागर बुद्धिमान् माणसालाच तरून जातां येतो, इतरांना येत नाहीं, हें उघड व युक्तीला धरून आहे. प्राज्ञ मनुष्याला सर्व बाजूचे व फार दूरचे गुणदोष दिसत असतात. वासनांनीं ज्याचें अंतःकरण व्याप्त झालेलें आहे, ज्याची बुद्धि मंद आहे व चित्त चंचल आहे, त्याचें संशयनिरसन कधींच होत नाहीं. जो स्वस्थ बसून रहातो, खटपट कोणतीच करीत नाहीं, अशा मनुष्याला हा कालप्रवाह तरून जातां येत नाहीं. बुद्धिरूप नौका जवळ नसल्यानें मोहग्रस्त होऊन हा या नाना प्रकारच्या दोषांनीं व्याप्त असलेल्या कालाच्या

ओघांत सांपडतो व वासनारूपी जलचरांच्या तडाख्यांत सांपडल्यामुळें फुटक्या नावेसारखें असलेलें यांचें तुटपुंजें ज्ञान याच्या उपयोगीं पडत नाहीं. तेव्हां शहाण्या माणसानें या कालप्रवाहांतून वर निघण्याचा नेहमीं प्रयत्न करावा. या कालरूपी प्रवाहांतून वर निघणें हें ब्राह्मणाचें कर्तव्य होय. हें ज्याला साधलें, तो ब्राह्मण होय. म्हणून शुद्ध कुलांत जन्मास आलेल्या; अध्यापन, याजन व प्रतिग्रह या तीन गोष्टींत आसक्ति नसलेल्या; स्वाध्याय, यज्ञ व दान हीं तीन कर्मे करणाऱ्या मनुष्यानें याच्यांतून तरून जाण्याची इच्छा धरावी व बुद्धिबलानें हें साधण्याची खटपट करावी. ज्याच्या मनावर उत्तम संस्कार झालेले आहेत, जो दमनशील आहे, ज्या यतात्म्या पुरुषानें इंद्रियनिग्रह केलेला आहे, अशा बुद्धिमान् माणसाला इहपरलोकीं उत्तम गति प्राप्त होते.

ब्राह्मणानें गृहस्थाश्रम स्वीकारून कोणावरहि न रागावतां किंवा कोणाचाहि मत्सर न करितां, पंचमहायज्ञ करीत वरील प्रकारानें वागावें व देव, ऋषि, पितर व अतिथि यांना देऊन शिल्लक राहिलेलें ( विघस ) अन्न भक्षण करून रहावें. सज्जनांनीं घालून दिलेल्या मार्गानें—धर्मानें—वागणें, चार शिष्ट लोकांच्या रीतीनें लौकिक कर्में करणें, कोणाचाहि मत्सर न करितां दोषरहित वृत्तीनें उपजीविका करण्याची इच्छा धरणें, हीं ब्राह्मणाचीं कर्तव्यें होत.

ज्ञान व विज्ञान यांत ज्यानें गति करून घेतली आहे, जो बुद्धिमान् असून चार शिष्टांच्या प्रमाणें आचरण ठेवतो, जो स्वधर्मानें आंखून दिलेल्या मार्गानें कर्में करीत असतो, त्याच्या कर्मांनीं संकर उत्पन्न होत नाहीं. श्रद्धायुक्त अंतःकरणानें आपलीं कर्में करणारा, निर्मत्सरी, जितेंद्रिय व बुद्धिमान् आणि धर्माधर्मांचे विशेष जाणणारा पुरुष सर्व संकटांतून मुक्त होतो. धैर्यशील, अप्रमत्त, जितेंद्रिय, धर्मवेत्ता व आत्मज्ञानयुक्त, ज्याच्या ठिकाणीं हर्ष, मद व क्रोध हीं नाहींत, असा ब्राह्मण कधींहि अधोगतीला जात नाहीं. ब्राह्मणाचा हा आचार फार पुरातन कालापासून सांगितलेला आहे. ज्ञानसंपन्न होऊन कर्में करणाऱ्या ब्राह्मणाला सर्वत्र सिद्धि मिळते. मूर्ख मनुष्य धर्माचरण करण्याच्या इच्छेनें धर्माच्या नांवाखालीं अधर्माचरण करतो व खरोखरी ज्याला धर्माचरण किंवा तत्सदृश चांगलें कृत्य म्हणतां येईल, तें करीत असतां हा आपल्याला वाईट वाटलें असें दाखवितो. आपण धर्म आचरीत आहों अशा खोट्या समजुतीनें मनुष्य कित्येकदां अधर्म करतो व अधर्म आचरीत आहोंत,

अशा समजुतीनें मनाला वाईट वाटून घेऊन धर्माचरण करतो, याचें कारण त्या दुर्बलाला धर्माचरण व अधर्माचरण या दोन्ही कर्मांचें ज्ञान नसतें हें होय आणि हें ज्ञान नसतें म्हणूनच तो जन्ममरणाच्या यातायातींत सांपडतो. १२. ३. २३५.

---

## अध्याय २३६ वा.

[ १ सांख्य व योग यांचीं तत्त्वें. ]

( १ ) **व्यास**—कधीं वर येत, तर कधीं खालीं जात अशा तऱ्हेनें या कालाच्या प्रवाहाबरोबर वहात जात असतांना यांतून तरून जाऊन आपल्याला मोक्षप्राप्ति व्हावी, अशी इच्छा असणाऱ्या पुरुषानें ज्ञान संपादन करावें व त्याची नौका करून हा कालसागर तरून जावें. ज्यांची बुद्धि स्थिर झाली आहे, असे धीर पुरुष बुद्धिरूप नौकेच्या साहाय्यानें दुसऱ्या अज्ञान लोकांचा उद्धार करतात. अज्ञानी पुरुषांना स्वतःचा किंवा आपल्या कोणाचाच उद्धार करतां येत नाहीं. ज्याचे राग-द्वेष नाहींसे झालेले आहेत, अशा मुक्त मुनीनें द्वादश प्रकारचे योग साधावे. हे बारा प्रकार असेः—देश, कर्म, अनुराग, अर्थ, उपाय, अपाय, निश्चय, चक्षु, आहार, संहार, मन व दर्शन. या बारा साधनांनीं हे प्रकार साधतां येतात. चित्ताची एकाग्रता साधण्यास अनुकूल असें पवित्र स्थान हें योगाचें ' देश ' साधन होय. आहार, विहार, झोंप व जागरण, इत्यादि गोष्टींना इयत्ता ठेवणें हें योगाचें कर्मरूप साधन. सच्छिष्य हें ' अनुराग- ' रूपी साधन. अर्थ म्हणजे द्रव्य, हेंहि योगाचें एक साधन आहे.

नानाविध आसनें साधणें हें योगाचें 'उपाय' साधन होय. रागद्वेषादि गोष्टींचा निरास करणें हें योगाचें ' अपाय ' साधन आहे. गुरुवाक्य व वेदवाक्य यांच्या-वर आपल्याला इष्ट फल हटकून मिळणार, अशी दृढश्रद्धा हें ' निश्चय ' रूपी योगसाधन. चक्षु हें आणखी एक योगसाधन होय. आहारशुद्धता हें आहारा-संबंधाचें योगसाधन. विषयोपभोगाकडे स्वभावतःच धांव घेणारें मन आंवरून धरणें हें योगाचें 'संहार' साधन आहे. मनांतील संकल्पविकल्प नाहींसे करणें हें मनाच्या बाबतींतील योगसाधन होय. जन्म, मृत्यु, जरा, नाना प्रकारचे रोग इत्यादि दोषांनीं हें शरीर युक्त आहे, असें ज्ञान हें योगाचें ' दर्शन ' रूप साधन आहे. ज्याला उत्कृष्ट प्रकारच्या ज्ञानाची इच्छा असेल अशा पुरुषानें वाणी व

मन यांच्या शक्तीचा निरोध करावा व त्यांचा लय आपल्या अंतर्मुख बुद्धीमध्यें करून बुद्धिस्वरूप होऊन रहावें. ज्याला परमश्रेष्ठ अशा प्रकारचें शांतिसुख पाहिजे असेल, त्यानें या ज्ञानाचाहि आत्म्याच्या ठिकाणीं लय करावा. या सर्व प्रकारच्या योगसाधनांचें उत्कृष्ट ज्ञान ज्याला आहे असा पुरुष महाकठोर असला; सर्ववेदपारंगत किंवा ज्याला एकहि ऋचा येत नाहीं, असा असला; धार्मिक, यजनशील, पापी, वाघासारखा शूर किंवा कष्टानें आयुष्य कंठणारा कसाहि असला, तरी जरामरणांनीं युक्त असलेला हा महाभयंकर सागर त्याला तरून जातां येतो. उपरोक्त प्रकारचा हा योग आपल्याला समजावा अशी इच्छा धरणारा पुरुषसुद्धां मुक्त होतो. मग याचें आचरण करणारा कर्मकांडातीत होतो व त्याला परोक्ष ज्ञान होतें, हें सांगावयासच नको.

निर्विकार अक्षर ब्रह्माची प्राप्ति करून घेऊं इच्छिणाऱ्या माणसानें आचरावयाचा हा योग म्हणजे एक रथ आहे असें मानलें तर धर्म ही त्यांतील सारथ्याची जागा होय. अकार्यापासून परावृत्त होण्याची बुद्धि हें त्या रथाचें रक्षण करणारें आच्छादन; उपाय व अपाय ह्या त्या रथाच्या दोन्ही बाजूंच्या दांड्या; प्राण हें या रथाचें जूं; बुद्धि ही या रथाची बळकटी; जीव हा या रथाचें आकलन करणारा बंध; चेतना ही या रथांतील फळ्यांची जोडी; निरनिराळ्या आचारांचें अवलंबन ह्याच या रथाच्या धांवा; स्पर्शन, दर्शन, घ्राण व श्रवण, हे चार या रथाचे घोडे; शमदमादिकांमधील प्रावीण्य हीच ज्यामधील यजमानाची मुख्य जागा; सर्व प्रकारचीं शास्त्रें हा ज्यांतील चाबूक; शास्त्रांच्या अर्थांचा निश्चय करविणारें ज्ञान हाच ज्यांतील सारथि; असा हा धीर गंभीर गतीनें चालणारा योगरथ होय. श्रद्धा व दम हे या रथाच्या पुढें चालतात. जीव हा या रथांत बसणारा रथी होय. विषयादिकांचा त्याग हा या रथामागून चालणारा सेवक आहे.

पावित्र्य हा याचा मार्ग असून त्याच मार्गानें तो ध्यानाकडे जातो. ध्यान हेंच याचें ध्येय होय. अशा तऱ्हेचा जीवानें जोडलेला हा दिव्य रथ ब्रह्मलोकाच्या समीप शोभून दिसतो. असा हा रथ जोडून या रथांतून परब्रह्माच्या समीप जाण्याची ज्याला त्वरा झाली आहे त्याला शीघ्र ब्रह्मप्राप्ति करून देणारा विधि सांगतों, ऐक. योगमार्गामध्यें सात मुख्य गोष्टी आहेत. वाणी इत्यादिकांचें नियमन करून या सप्तधारणांचा अवलंब योग्यानें

करावा. एकाद्या विशिष्ट विषयाचे ठिकाणीं चित्ताचा लय करणें याला धारणा म्हणतात. चंद्रमंडल, सूर्यमंडल, ध्रुवमंडल इत्यादिकांचे ठिकाणीं चित्ताचा लय लावणें किंवा त्या मानानें जवळच्या अशा नासाग्र, भ्रूमध्य, इत्यादिकांचें ठिकाणीं मनाची एकाग्रता करणें, या सप्तधारणांच्या मानानें दूरच्या, धारणा होत. पौत्राहून प्रपौत्र जसा दूरचा, शिष्याहून प्रशिष्य जसा दूरचा, तशाच सप्तधारणांतून वर सांगितलेल्या निरनिराळ्या धारणा या दूरच्या धारणा–प्रधारणा–होत. पृथ्वी, आप्, तेज, वायु, आकाश, अहंकार आणि अव्यक्त या सातांचे ठिकाणीं चित्ताचा लय करणें, या सप्तधारणा होत. मनुष्याच्या शरीरांत चरणतलापासून गुढघ्यापर्यंत पृथ्वी, गुढघ्यापासून अपानद्वारापर्यंत जल, तेथपासून हृदयापर्यंत वह्नि, हृदयाच्या मध्यभागापासून तों भुंवयांच्या मध्यभागापर्यंत वायु व भुंवयांच्या मध्यभागापासून तों डोक्यापर्यंत आकाश, अशीं पंचमहाभूतांचीं स्थानें योगी याज्ञवल्क्यांनीं सांगितलीं आहेत. पृथ्व्यादि पंचमहाभूतें, अहंकार व अव्यक्त यांच्या ठिकाणीं धारणा केल्यानें त्या त्या विषयांत बुद्धि स्थिर एकाग्र झाल्यानें तें तें ऐश्वर्य योग्याला प्राप्त होतें.

ज्या वस्तूचें मनुष्य ध्यान करतो, त्या वस्तूचेंच रूप अखेर त्याला प्राप्त होतें. या न्यायानें, पंचमहाभूतांच्या क्रमांतून पार पडून सप्तधारणांच्या योगानें योगी अव्यक्तस्वरूप बनतो. निरनिराळ्या योगसाधनांच्या योगानें योगमार्गाकडे प्रवृत्त झालेल्या पुरुषाला कोणते अनुभव कोणत्या क्रमानें येतात, हें मी तुला सांगतों. तसेंच दृष्टि अंतर्मुख करून ध्यान करणाऱ्या योग्याला भूजयादिक सिद्धि कशी प्राप्त होते, हेंहि मी तुला सांगणार आहें. आचार्याच्या उपदेशानें योग्याचा स्थूल देहावरचा अध्यास (आपण स्थूल देह आहोंत, ही भावना) संपून त्याची दृष्टि अंतर्मुख झाली म्हणजे सूक्ष्मरूपी बनलेल्या योग्याला प्रत्यगात्म्याचीं पुढील रूपें दिसूं लागतात. शिशिर ऋतूंत पडणारें दहिंवर ज्याप्रमाणें सूक्ष्मरूपानें आकाशाला व्यापून रहातें, तसेंच प्रत्यगात्म्याचें सूक्ष्म स्वरूप सर्वव्यापी आहे, असें योग्याला भासतें. त्याचें प्रथमरूप तसें सूक्ष्म होतें. दहिंवराचें स्वरूप नाहींसें झालें म्हणजे त्याचें निराळेंच रूप होतें. हें रूप जलाचें होय. दहिंवराचें स्वरूप नाहींसें होऊन त्या ठिकाणीं आकाशांत जसें जलरूप दिसूं लागतें, तसेंच देहाच्या सूक्ष्मस्वरूपाचा लय जलाच्या ठिकाणीं केला म्हणजे प्रत्यगात्म्याचें जलरूप योग्याला दिसतें. या जलरूपाचा लय तेजस्तत्त्वांत झाला म्हणजे जलाच्या ठिकाणीं अग्निस्वरूप दिसतें. या अग्निस्वरूपाचा

लय वायूचे ठिकाणीं केला म्हणजे पीतशस्त्र–पृथ्वी, आप् व तेज या महाभूतांच्या सत्त्वाचा उपसंहार ज्यानें स्वतःच्या ठिकाणीं केला आहे असा व अज ( म्हणजे झाडें उपटून पाडणारा–नीलकंठ ) असा वायु प्रकट होतो. नंतर लोंकरीच्या रूपासारखें अत्यंत सूक्ष्म असें रूप योग्याला प्राप्त होतें व तो आकाशांत निरालंब असल्यासारखा दिसतो. पृथ्वी, जल व तेज या भूतांचा उपसंहार झाल्यावर शिल्लक राहणारें सूक्ष्म वायुतत्त्व रजाचा व तमाचा निरास झाल्यामुळें शुद्ध, स्वच्छ, सत्त्वमय होतें व आकाशांत विलीन होऊन त्याच्या रूपानें भासूं लागतें. अर्थात् योग्याचें स्वरूपहि पण नीलवर्ण आकाशासारखें भासतें. ब्रह्मतत्त्व जाणूं इच्छिणाऱ्या ब्राह्मणाचें जें सूक्ष्म चित्तस्वरूप म्हणून शास्त्रानें सांगितलें आहे, तें हेंच होय.

अशा प्रकारें पंचतत्त्वांवर योग्याला जय मिळवितां आला म्हणजे त्याची फलप्राप्ति काय होते तें मी सांगतों, तें ऐक. योग्याला पार्थिव तत्त्वांवर विजय मिळवितां आला म्हणजे पार्थिव ऐश्वर्याच्या योगें त्याला सृष्टि निर्माण करतां येते. हाताच्या. बोटानें, अंगठ्यानें किंवा हातानें अगर पायानें तो पृथ्वी हालवूं शकतो. वायूचें सामर्थ्य त्याच्या अंगीं आल्याचा हा प्रभाव होय, असें श्रुति सांगते. ब्रह्मदेवाप्रमाणें अक्षोभ्य स्थितींत राहून तो आपल्या शरीरापासून सृष्टि निर्माण करूं शकतो, हा त्याच्या पृथ्वीजयाचा प्रभाव होय. पृथ्वी व वायु यांच्यानंतर आकाशतत्त्वांवर यानें विजय मिळविला म्हणजे आकाशरूप–नीलरूप–होऊन हा प्रकाशतो. पण आकाश जसें निराकार तसाच हाहि असल्यानें याला वाटेल तेव्हां अंतर्धान पावण्याची ताकद येते. पृथ्वी, वायु व आकाश यांनंतर जलतत्त्व. याचा जय केल्यानें–याच्यावर स्वामित्व मिळविल्यानें–योगी अगस्ति ऋषीप्रमाणें विहिरी, तळीं, समुद्र सुद्धां पिऊं शकतो. योग्यानें तेजस्तत्त्वाचा जय केला म्हणजे त्याला तेजःस्वरूपाची प्राप्ति होते. हें त्याचें तेजोरूप दिसत नाहीं, पण तें दिसत नाहीं म्हणून नसतें असेंहि नाहीं. त्याचें शमनहि होत नाहीं. योग्यानें अहंकारावर–अस्मितेवर–जय मिळविला म्हणजे हीं पंचमहाभूतें त्याच्या आधीन होतात. अहंकार व पंचमहाभूतें या सहांचाहि केवळ प्राण अशी जी बुद्धि तिचा जय केल्यानंतर योग्याला सप्तधारणा करून जें काय ऐश्वर्य मिळवावयाचें तें प्राप्त होतें. संशय, विपर्यय इत्यादि दोषांपासून अलिप्त असलेलें शुद्ध–आत्मस्वरूपाचें ज्ञान त्याला होतें व तो सर्वज्ञ व सर्वेश्वर होतो. या स्वरूपाला पोहोंचल्यानंतर योगी पंचमहाभूतें व अहंकार यांनीं बनलेलें

व्यक्त शरीर आणि हें व्यक्तस्वरूप भूतजात ज्याच्यापासून निर्माण होतें तें अव्यक्त आत्मरूप हीं दोन्ही एकच होत असें जाणतो. अव्यक्त आत्मस्वरूपासंबंधाचें ज्ञान मी तुला सांगतों तें ऐक. पण, त्याच्याहिपूर्वी सांख्यशास्त्रांत सांगितलेलें व्यक्तसृष्टीचें ज्ञान मी तुला सांगणार आहें तेंहि तूं सावधपणानें ऐक.

योग व सांख्य या दोन्ही दर्शनांनीं पंचवीस तत्त्वें मानलीं आहेत, हें त्यांच्यांतील साम्य होय. आतां त्यांच्यांतील भेद उलगडून दाखविणारा प्रत्येकाचा विशेष सांगतों. जन्मास येणें, वाढणें, क्षीण होणें व मरणें हे चार प्रकारचे गुणधर्म ज्याच्या ठिकाणीं सांपडतात तें तें सर्व व्यक्त होय व हीं लक्षणें ज्याच्या ठिकाणीं नाहींत असें व्यक्तविलक्षण जें कांहीं तें सर्व अव्यक्त होय. मीमांसकांचें कर्मकांड व वेदांतशास्त्र या दोहोंतहि द्विविध आत्मस्वरूप सांगितलें आहे. वरच्या चार लक्षणांनीं युक्त असलेला व धर्म, अर्थ, काम, मोक्ष या चतुर्वर्गांची इच्छा धरणारा तो जीवात्मा व मायेच्या उपाधीनें वेढलेला तो ईश्वर. हीं दोन्ही आत्मस्वरूपें चित् व अचित् यांनीं विशिष्ट अशा प्रकारचीं असतात. श्रुतीनें परमात्मस्वरूपाचे जीव व ईश्वर किंवा बुद्धि व क्षेत्रज्ञ असे विभाग सांगितले आहेत. यांत जीवाच्या ठिकाणीं, बुद्धिस्वरूपाच्या ठिकाणीं ' द्वा सुपर्णा ' इत्यादि श्रुतींनीं भोक्तृत्वाचा आरोप केला आहे. त्यामुळें बुद्धिस्वरूप चैतन्ययुक्त मानावें लागतें. विषयाच्याच मागें लागलेल्या पुरुषांना वेदांत दोन आत्मस्वरूपें सांगितलीं आहेत असा भास होतो. वस्तुतः, क्रमशः प्रतिसंहार—लय—होत होत सर्व भूतांचा लय ज्यांत होतो तें अव्यक्त परमात्मस्वरूप, असा ज्ञानी लोकांचा सिद्धांत आहे.

ज्याला ' मी ' व ' माझें ' हा विकार नाहीं; ज्याचा अहंकार ( अस्मितेचें भान ) संपला; शीतोष्ण, सुखदुःख इत्यादि द्वंद्वांच्या जो पलीकडे गेला; ज्याचे सगळे संशय संपले; जो कधीं कोणावर रागावत नाहीं; कधीं कोणाचा द्वेष करीत नाहीं; केव्हांहि खोटें भाषण करीत नाहीं; एकदां ज्याला मित्र म्हटलें त्यानें वाचेनें दुरुत्तरें केलीं, तरीहि त्याचें जो अनिष्ट चिंतीत नाहीं; कठोर वाणी, हिंस्र कर्म व दुष्ट विचार यांजवर जो नियंत्रण घालतो म्हणजे हीं ज्याच्या हातून होत नाहींत; असा सर्वांभूतीं समवृत्ति धरणारा मनुष्य ब्रह्मदेवापेक्षांहि अधिक योग्यतेचा होतो. ज्याच्या मनांत इच्छा असते, असेंहि नाहीं व नसते असेंहि नाहीं; म्हणजे शरीरस्थितीला—प्राणधारणाला—आवश्यक तेवढ्याच गोष्टींत मन घालून जो रहातो; जो कोठेंहि लोलुपता धरीत नाहीं; ज्याच्या मनाला कधींच कष्ट

होत नाहींत; जो इंद्रियदमन करून रहातो; ज्याला स्वतःचें असें कांहींच कार्य करावयाचें नसतें; जो निराकृति नसतो; ज्याचीं इंद्रियें अनेक ठिकाणीं सैरावैरा न धांवतां त्याच्या आधीन रहातात; ज्याला कोणताच मनोरथ नसतो व म्हणूनच भग्नमनोरथ होण्याची पाळीच ज्याच्यावर येत नाहीं; सर्वांभूतीं समदृष्टि ठेवून सगळ्यांशीं जो मित्रभावानें वागतो; ज्याला मातीचें ढेंकूळ, दगड व सोनें हीं सारखींच वाटतात; प्रिय व अप्रिय गोष्टींचें शुभाशुभ ज्याला सारखेंच आहे; ज्याची वृत्ति धीर व गंभीर आहे; कोणीं निंदिलें किंवा वंदिलें तरी दोन्हींची किंमत ज्याला एकच; कोणत्याहि भोगविषयाची ज्याला लालसा नाहीं; ब्रह्मचर्याच्या दृढव्रताचें आचरण जो करितो; कायावाचामनानें जो कधीं कोणाची हिंसा करीत नाहीं असला सांख्य-ज्ञानी पुरुष-मुक्त होतो. योगमार्गानें जाणारा मुमुक्षु ज्या कारणांनीं संसारबंधनापासून विमुक्त होतो तीं कारणें सांगतों, ऐक. अणिमा, महिमा, गरिमा, लघिमा, प्राप्ति, प्राकाम्य व ईशित्व या ज्या अष्टसिद्धि आहेत, त्या म्हणजे योगाचें परमश्रेष्ठ असें सामर्थ्य होय. परंतु, या अणिमादि सिद्धींचें प्रातिभासिक स्वरूप ओळखून जो त्यांच्याहि पलीकडे जातो त्याला मुक्त म्हणावें.

या प्रकारें, वक्त्यावक्त्यांच्या विवेचनपद्धतीला अनुसरून सांख्य व योग यांच्यांत जो भेद पडतो-पडलासा वाटतो, पण वस्तुतः नसतो-तो भेद आतांपर्यंत मीं तुला सांगितला. या मार्गानें जाणारा पुरुष द्वंद्वातीत होतो व त्याला ब्रह्मपदाची प्राप्ति होते. १२. ३. २३६.

---

## अध्याय २३७ वा.

[ १ 'जन्ममरणाच्या फेऱ्यांतून मुक्त होण्याचें साधन कोणतें'? असा शुकाचा प्रश्न. शून्यवादी बौद्ध वगैरेंच्या मतांचें उपन्यासपूर्वक खंडन व अद्वैतज्ञान श्रेष्ठ असें व्यासमत. ]

( १ ) **व्यास**—या संसारसागरांत गटंगळ्या खाणाऱ्या मनुष्यानें शास्त्र व गुरूपदेश यांच्या साहाय्यानें मिळालेल्या ज्ञानरूप नौकेचा आश्रय करावा व मोक्षप्राप्त्यर्थ त्याचीच कांस धरावी.

**शुक**—जन्म व मरण या दोहोंचेहि फेरे ज्याच्या योगानें चुकवितां येतात, असें आत्मोद्धाराचें साधन म्हणजे अविद्येचा निरास करून परब्रह्मस्वरूपाचें

आकलन करून देणारें यथार्थ ज्ञान, कीं 'तद् ध्यात्वा तदेव भवति' या न्यायानें ब्रह्मरूपाची प्राप्ति करून देणारा ध्यानरूप प्रवृत्तिमार्गाचा धर्म किंवा शून्यवादी वगैरे नास्तिकांना संमत असलेला आत्मोच्छेदरूप निवृत्तिधर्म? या तिहींपैकीं आत्मोद्धाराचें साधन कोणतें तें आपण मला सांगा.

**व्यास**—कोणत्याहि अधिष्ठानाच्या सामर्थ्यावांचून केवळ स्वभावानेंच जगदुत्पत्ति आपोआप होते असें जे मानतात व ज्यांच्या वादपद्धतीमध्यें युक्तिवाद येऊंच शकत नाहीं, अशा निर्बुद्ध शिष्यांना जे हीं आपलीं मतें पढवितात, त्या मूर्खांना किंवा जे स्वभावावांचून दुसरें जगदुत्पत्तीचें कारणच नाहीं असें निश्चयानें मानतात, त्यांना गवताची काडी सोलून उकलून पाहिली असतांना त्यांत बीजांकुर आहे असें दिसून येत नाहीं काय? या पक्षाचा आश्रय करून जे अल्पबुद्धि लोक त्यांत समाधान मानतात, ते स्वभावकारणवादी परमपदाला पोंहोंचत नाहींत. मोहव्याप्त मनाच्या कल्पनेनें रचलेला स्वभावकारणवादाचा डोलारा टिकत नाहीं. स्वभाव व परिभाव यांची निरुक्ति मी सांगतों ती ऐक. कारणरूपानें एकटा स्वभावच अस्तित्वांत असतो असें मानणें हा स्वभाव होय व कारणरूपी स्वभाव व त्याचें कार्य ह्यांना प्रत्येकाला स्वतंत्र अस्तित्व आहे, असें मानणें हा परिभाव होय. या जगांत चाललेलीं नांगरटीसारखीं व कापणीसारखीं कृत्यें, तसेंच, वाहनें आसनें, घरेंदारें वगैरेंच्या योजना इत्यादि सर्व गोष्टी बुद्धिमान् माणसांनीं प्रज्ञाबळाच्या जोरावरच चालविल्या आहेत. नानाप्रकारच्या बागा, घरें, रोग व त्यांवरचीं औषधें इत्यादिकांच्या कल्पना बुद्धिमंतांनींच बसविलेल्या आहेत असें ज्ञानी पुरुष सांगतात. अर्थप्राप्ति बुद्धीच्या योगानें होते, परमपदाची प्राप्ति त्याचमुळें होते. बुद्धिमान् आणि म्हणूनच ऐश्वर्यसंपन्न असे राजे बुद्धिबलाच्याच जोरावर राज्याचा उपभोग घेतात. भूतमात्रांच्या पारमार्थिक काय किंवा प्रातिभासिक काय दोन्हींहि रूपांचें ज्ञान बुद्धिद्वाराच होतें.

बुद्धि हेंच जगाचें उत्पत्तिकारण व त्याचें लयस्थानहि पण तेंच होय. जगांत जीं नानाविध भूतें आहेत, त्यांच्या उत्पत्तीचे जरायुज, अंडज, उद्भिज्ज व स्वेदज असे चार प्रकार आहेत. त्यामध्यें स्थावरांपेक्षां जंगम हे विशिष्ट असून श्रेष्ठ आहेत. कारण चेष्टा म्हणजे हालचाल हा स्थावरांत नसणारा विशेष त्यांच्यांत आहे व त्यामुळें जंगम भूतें श्रेष्ठत्व पावतात. जंगमामध्यें सुद्धां बहुपाद व द्विपाद असे दोन

भेद आहेत. त्यांत बहुपादापेक्षां द्विपाद श्रेष्ठ द्विपादांचे प्रकार दोन. एक स्थल-संचारी व दुसरे आकाशगामी. या दोघांत स्थलसंचारी अधिक योग्यतेचे; कारण हे अन्न भक्षण करतात. स्थलसंचारी भूतें द्विविध आहेत. मध्यम व उत्तम. यांत मध्यम प्रकारचीं भूतें श्रेष्ठ होत. कारण, त्यांना जातिधर्म कळतात. मध्यमांचे प्रकार दोन; एक धर्मज्ञ व दुसरीं तदितर. यापैकीं, धर्मज्ञांना कार्य कोणतें अकार्य कोणतें, याचें ज्ञान असतें म्हणून तीं श्रेष्ठ. धर्मज्ञांतहि दोन पक्ष आहेत. एक वेदज्ञ व दुसरे इतर. पैकीं वेदज्ञांवर वेदांचें अस्तित्व अवलंबून म्हणून वेदज्ञ श्रेष्ठ. वेदज्ञहि पण द्विविध. एक प्रवक्ते व दुसरे प्रवचन न करणारे यांपैकीं प्रवचनकारांना सर्व धर्मांचें ज्ञान असतें, म्हणून ते श्रेष्ठ. वेद, त्यांत सांगितलेले धर्म, निर-निराळीं कर्में व त्यांचीं फलें हीं प्रवचन करणारांना ठाऊक असतात. सगळ्या वेदांचा व त्यांतील धर्मांचा प्रसार प्रवचनकारांकडूनच होतो. प्रवचन करणारे धर्मज्ञ वेदज्ञ जे सांगितले त्यांचेहि पुनः आत्मज्ञ व अनात्मज्ञ असे दोन प्रकार आहेत. आत्मज्ञ लोकांना जन्म व अजन्म यांचें ज्ञान असतें, म्हणून या दोघांत ते श्रेष्ठ होत. प्रवृत्तिरूप व निवृत्तिरूप धर्मांचें ज्ञान ज्याला झालें, तो सर्ववेत्ता, तो सर्वज्ञ, तो त्यागी, तो सत्यसंकल्प, तो सत्यस्वरूप, तोच पावित्र्याचा अवतार, फार काय, तोच ईश्वर होय.

ब्रह्मज्ञानांत लय पावलेल्या त्या पुरुषालाच ब्राह्मण असें देव म्हणतात. हा वेदप्रणीत कर्मकांडांत निष्णात असून परब्रह्मस्वरूपाचा ठावहि याच्या बुद्धीला निश्चितपणानें लागलेला असतो. हे शुका, ज्या ज्ञानी पुरुषांना अंतर्बाह्य राहि-लेलें, साधियज्ञ व साधिदैव असें परब्रह्मरूप कळलें, ते देव, ते ब्राह्मण होत. त्यांचे ठिकाणीं हें सर्व सृष्ट विश्व व भूतजात अधिष्ठित झालेलें आहे. त्यांच्या माहात्म्याला या जगांत दुसरी तोड नाहीं. आदि, अंत, निधन व कर्म या सर्वांच्या बंधनांतून सर्वप्रकारें मुक्त झालेले हे सिद्ध पुरुष चतुर्विध सृष्टीचे ईश्वर होत. १२. ३. २३७.

---

## अध्याय २३८ वा

[ १ ब्राह्मणांची नित्यवृत्तिः २ इतर मतांचें उपन्यासपूर्वक खंडन व ज्ञानाचें श्रेष्ठत्व. ]

( १ ) व्यास—हे शुका, ब्राह्मणांनीं ब्रह्मपदाच्या प्राप्तीसाठीं ज्ञानपूर्वक कर्में करावीं, असा फार पुरातनकालापासून विधि सांगितलेला आहे. ज्ञानपूर्वक कर्में

केल्यानेंच सर्वत्र सिद्धि मिळते. या कर्मांच्या विषयीं कोणताहि संशय नसता, तर केलेलें कर्म सिद्धीस गेलेंच असतें. त्यापासून सिद्धि ही मिळालीच असती. पण, सिद्धि प्राप्त होणें हा कर्मांचा स्वभाव आणि म्हणून कर्म नित्य असें मानावयाचें, कीं कर्म हें ज्ञानजनक म्हणून तें काम्य मानावयाचें, असा या ठिकाणीं संशय उत्पन्न होतो. असा संशय उत्पन्न झाल्यावर कर्म हें पुरुषाला ज्ञान करून देणारें आहे, असें मानल्यास वेदविधि हाच नित्यविधि ठरण्याचा प्रसंग येईल व आत्मज्ञानाच्या इच्छेनें केलेल्या कर्मांनीं नित्यप्रयोगाचीहि सिद्धि होऊं लागेल. कर्म नित्य मानावें तर तें काम्य नाहीं, असें ठरेल. काम्य मानावें, तर तें न करण्यांत दोष नाहीं, असें मानण्याची आपत्ति येईल. कर्म हें नित्यहि आहे व काम्यहि आहे. तें कसें हें प्रत्यय व तर्क—उपलब्धि व उपपत्ति या दोन्ही प्रकारांनीं मी तुला सांगतों, ऐक. कर्मांचें कारण पौरुष होय, असें कित्येक जण मानतात. कित्येक दैव हें कर्मांचें कारण असें मानतात; तर दुसरे कित्येक जण कर्मांची उत्पत्ति स्वभावापासूनच होते असें मानणारे आहेत. पौरुष, दैव व स्वभाव या तीहींपैकीं प्रत्येक कर्मांचें कारण आहे, असें मानणारा एक पक्ष आहे, तर दुसरा पक्ष या तीन्हींच्या समुच्चयानें कर्म उत्पन्न होतें असें म्हणतो. आर्हतांचा पक्ष, यांच्यापैकीं एक कारण असेल वा नसेल; दोन्हीहि समुच्चयानें असतील व नसतील किंवा या दोन्हींहून निराळें असें तिसरेंच कारण असेल किंवा नसेलहि असें मानणारा आहे. वर उपन्यस्त केलेल्या पक्षांपैकीं एकाहि पक्षाचें म्हणणें युक्तिवादाला धरून नाहीं. तेव्हां व्यवहारामध्यें समुच्चयपक्ष व परमार्थतः ब्रह्मकारणवाद हींच श्रेष्ठ ठरतात.

(२) योगिजन ब्रह्मस्वरूप हेंच कारण होय असें मानतात. त्रेता, द्वापर व कलि या तीन्ही युगांतील लोकांचीं अंतःकरणें संशयानें ग्रासलेलीं होतीं. कृतयुगांतील मनुष्यें मात्र तपोबलानें युक्त, शमादि साधनांनीं संपन्न व सत्वस्थ अशीं असत. ऋग्वेद, सामवेद व यजुर्वेद हे तीन्ही एकमेकांपासून निरनिराळे आहेत. असें न मानतां, रागद्वेष यांचा त्याग करून कृतयुगांतील पुरुष तपस्वी वृत्तीचा अवलंब करीत. तपोबलानें युक्त, तपाचें अनुष्ठान नित्य करणारीं, व दान्त अशीं कृतयुगांतील माणसें असत. त्यामुळें ज्या ज्या गोष्टींची इच्छा त्यांनीं मनानें करावी त्या त्या गोष्टी त्यांना प्राप्त होत. ज्याचें स्वरूप प्राप्त झालें असतांना जगदुत्पत्ति करतां येते तें ब्रह्मरूप तपोबलानें मिळतें; व ब्रह्मरूप

झाल्यावर ब्रह्मनिष्ठ पुरुषाला त्या तपोबलाच्या जोरावर सर्वभूतांचा शास्ता होतां येतें.

वेदवेत्त्या ब्राह्मणांनीं ब्रह्माचें हेंच गहन स्वरूप कर्मकांडामध्यें वर्णिलें आहे. वेदांतशास्त्रानें हें ब्रह्मरूप अधिक स्पष्टपणानें सांगितलें असून केवळ कर्मकांडाच्या आचरणानें त्याची कायमची प्राप्ति होत नाहीं. पशूचें आलंभन करून त्याचा हविर्भाव अग्नीला द्यावयाचा हा क्षत्रियांचा यज्ञ, धान्यादिकांचा हविर्भाव अग्नीला अर्पण करणें हा वैश्यांचा यज्ञ, त्रैवर्णिकांची सेवा हा शूद्रांचा यज्ञ, तर जप करणें हा द्विजांचा धर्म ( यज्ञ ) होय. ब्राह्मणानें स्वाध्यायाध्ययन एवढेंच एकच कार्य केलें तरीहि त्याची इतिकर्तव्यता तेवढ्यानें संपते; मग तो दुसरें कांहीं करो वा न करो. ब्राह्मण हा सर्वांशीं मित्रभावानें वागणारा असावा. त्रेतादि युगांत वेद, यज्ञ, वर्ण, आश्रम हीं सर्व सकलांगांनीं अस्तित्वांत होतीं. पुढें पुढें आयुष्य कमी कमी होऊं लागल्यामुळें द्वापरयुगांत यांचे निरनिराळे भाग झाले. द्वापर व कलि या युगांत वेदविद्या संपुष्टांत येईल व कलियुगाचे शेवटीं तर ती दिसेल कीं नाहीं, याचीच वानवा राहील. कलियुगांत अधर्माचेंच प्राधान्य होईल; स्वधर्माचा उच्छेद होईल. पृथ्वी, जल, औषधी, गाई इत्यादिकांचे ठिकाणीं असलेला रस–यांच्यांतील पोषक द्रव्यें–नाहींशीं होतील, वेद, वेदधर्म, आश्रम हे अधर्मांत लोप पावतील व त्यांचें स्वरूप पालटेल. ज्याप्रमाणें या पृथ्वीवरील चराचरभूतांचें रक्षण व संवर्धन पाऊस आपल्या वृष्टीनें करतो, त्याप्रमाणें वेदहि युगायुगाचे ठिकाणीं भूतांचें सर्व बाजूंनीं रक्षण करतात. अनादि व अनंत असें अनेकविध कालस्वरूप जें मीं आतांपर्यंत सांगितलें, या कालस्वरूपापासूनच जगाची उत्पत्ति होते व त्यांतच त्याचा लयहि होतो. हें कालस्वरूप प्राणिमात्रांच्या उत्पत्तिस्थिति व लयाला कारणीभूत आहे. जगांत उत्पन्न झालेलीं नानाप्रकारचीं द्वंद्वें या कालाच्या ठिकाणींच स्वस्वरूपानें राहतात. येणेंप्रमाणें हे शुका, भूतांची उत्पत्ति, कालाचें स्वरूप, धृति, वेद, कर्तृस्वरूप, कार्यस्वरूप, निरनिराळ्या कर्मांचीं फलें कोणकोणतीं मिळतात, वगैरे माहिती तूं विचारलीस ती मीं तुला सांगितलीं. १२. ३. २३८.

*

## अध्याय २३९ वा.

[ १ 'सांख्य किंवा योग यांपैकीं कोणत्या मार्गानें ब्रह्मपदप्राप्ति होते,' असा शुकाचा प्रश्न. २ व्यासकृत सांख्यसिद्धांत-कथन ].

( १ ) **भीष्म**—परम ऋषि भगवान् वेदव्यास यांनीं आपल्याला उद्देशून केलेल्या भाषणाची प्रशंसा करीत करीतच शुकांनीं मोक्षधर्मांच्या अर्थाबद्दल पुढीलप्रमाणें त्यांना प्रश्न विचारण्यास प्रारंभ केला.

**शुक**—बुद्धिमान्, पढिक आणि म्हणूनच ज्याच्या बुद्धीवर संस्कार झालेला आहे अशा यजनशील व निर्मत्सर मनुष्याला तर्कादिकांनीं जाणतां न येणाऱ्या, ज्याच्या पाठीमागें ओळख पटण्यासारखी परंपरा नाहीं अशा ब्रह्मपदाची प्राप्ति कशानें होते? तपश्चर्या, ब्रह्मचर्याचें दृढ-व्रत, सर्वत्याग, बुद्धिमत्ता, सांख्यमार्ग किंवा योगमार्ग यांपैकीं कोणत्या मार्गानें ब्रह्मपदाची प्राप्ति होते, तेंआपण मला सांगा. तसेंच मनाची एकाग्रता व इंद्रियांचा निग्रह हीं कशीं साधावीं?

**व्यास**—विद्या, तपश्चर्या, इंद्रियनिग्रह, सर्वसंगपरित्याग यांखेरीज इतर कोणत्याहि मार्गानें मानवाला सिद्धि मिळणें शक्य नाहीं. ब्रह्मदेवानें सर्वांच्या आधीं पंचमहाभूतें निर्माण केलीं व जीवसृष्टींतील प्राण्यांच्या शरीरांमध्यें पुष्कळ अंशानें त्यांची योजना केली. देह हा भूमीपासून, जल-द्रव्यापासून मनुष्याच्या शरीरांतील रस, तेजोरूपापासून डोळे, अशी ही योजना आहे. वायुतत्त्व प्राण्यांच्या शरीरांत प्राण व अपान यांचा आश्रय करून रहातें. शिरा, घ्राणेंद्रिय इत्यादिकांचें ठिकाणीं जो पोकळ भाग असतो, त्याचा आश्रय करून आकाश हें तत्त्व असतें. मनुष्याच्या चरणाच्या ठिकाणीं विष्णु, बाहुबलाच्या ठिकाणीं इंद्र, कोठ्यांत अग्नि, कर्णांच्या ठिकाणीं दिशा व जिव्हेच्या ठिकाणीं सरस्वती अशा देवता त्या त्या इंद्रियांच्या चालक शक्ति म्हणून निवास करीत असतात. कान, त्वचा, डोळे, जीभ व नाक हीं पंचविषय भोगण्याचीं साधनें आहेत. शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध हे पंचेंद्रियांचे विषय व पंचेंद्रियें हीं परस्परांपासून भिन्न आहेत. सारथि ज्याप्रमाणें आपल्या ताब्यांतील घोड्यांना हवा तसा वळवितो, त्याप्रमाणें मन हें इंद्रियांना आपल्या दाबांत ठेवून हवें तिकडे वळवितें. मनाचा प्रेरक शरीरस्थ आत्मा हा होय. इंद्रियांच्या स्वभावधर्मांची उत्पत्ति व लय हीं दोन्ही मनाच्या आधीन असतात. मन हा इंद्रियांचा एक प्रकारें ईश्वरच होय व मनाचा नियंता आत्मा होय. कर्मेंद्रियें, त्यांचे विषय, शीतोष्णादि गुणधर्म, बुद्धि, प्राण अपान हीं वायुरूपें व जीव हीं प्राणिमात्राच्या शरीरामध्यें नित्य

वास करितात. सत्त्व, रज, तम हे त्रिगुण, शब्द किंवा चेतना हे बुद्धीचे धर्म नाहींत म्हणजे हे बुद्धीपासून निर्माण झालेले नव्हते. तेज म्हणजे अनादि-वासना जी आहे, हीच बुद्धीला उत्पन्न करते. ही वासना सत्त्वादि गुण निर्माण करीत नाहीं. असो.

पांच कर्मेंद्रियें, शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध हे पांच त्यांचे विषय; स्वभाव चेतना, मन, प्राण, अपान व जीव या सोळा गोष्टींनीं या देहांत आवृत असलेला जो आत्मा त्या सतराव्या आत्म्याचें स्वरूप मनोनिग्रहशील पुरुषाला त्याच्या दान्त मनाच्याच सामर्थ्यानें आपल्या बुद्धीचे ठिकाणीं प्रकाशमान झालेलें दिसतें. आत्मस्वरूप डोळ्यांनीं दिसणारें नाहीं किंवा सर्वेंद्रियांपैकीं कोणत्याहि इंद्रियानें त्याचें आकलन करतां येत नाहीं. दान्त मनाचा प्रदीप उजळला म्हणजे त्याच्या योगानें हें फार विशाल असें आत्मरूप दिसतें. प्राणिमात्रांत शरीरांत असणारें, शब्दस्पर्शादि पंच विषयांनीं रहित असलेलें, अव्यय, निरिंद्रिय व अशरीरी तत्त्व शोधण्याचा व पाहण्याचा मनुष्यानें प्रयत्न करावा. सर्व मरणशील प्राणिमात्रांच्या देहांत त्याचा आश्रय करून असणारें परम अव्यक्त तत्त्व जो पाहूं शकतो, तो देहपातानंतर ब्रह्मपदाला पोंहोंचतो. विद्या व शिष्यादिकांचा परिवार यांनीं युक्त असलेला ब्राह्मण, गाय, हत्ती, कुत्रा किंवा चांडाल या सर्वांना समदृष्टीनें लेखणारा तो पंडित होय. ह्या पंडिताच्या बुद्धिसामर्थ्याला स्थावरजंगम सर्व भूतांमध्यें विशाल असें आत्मतत्त्व भरून राहिलेलें दिसतें. याच आत्मतत्त्वापासून ही सृष्टि उत्पन्न झालेली आहे. सर्वभूतांमध्यें आपण आहोंत व आपणांमध्यें सर्व भूतें समाविष्ट झालेलीं आहेत, असें यथार्थ ज्ञान मनुष्याला जेव्हां होतें, तेव्हांच तो ब्रह्मपदाला पोंहोंचतो.

वेदांचा आत्मा जो शब्द तो जितक्या जीवस्वरूपाला व्यापून राहूं शकतो, तितकें सर्व जीवस्वरूप—म्हणजे जें जें वाचेचा विषय होऊं शकतें, तें तें सर्व परमात्म्याचे ठिकाणीं अधिष्ठित असतें—ब्रह्मरूपच असतें, असें ज्ञान ज्याला होतें व कायमचें टिकतें तो ब्रह्मरूप होण्यास लायक होय. सर्व प्राण्यांना व्यापून रहाणारा, त्यांना कल्याणकारण असा जो परमात्मा त्याच्या निर्मर्याद स्वरूपाचा ठाव काढतांना देवांची सुद्धां मति कुंठित होते. आकाशांत फिरणारे पक्षी किंवा पाण्यांत विहार करणारे मासे यांच्या गतीचें जसें ज्ञान होत नाहीं, तसेंच ब्रह्मनिष्ठ ज्ञानी पुरुषांच्या गतीचेंहि ज्ञान होत नाहीं. कालाच्या योगानें सर्व भूतें त्याच्या ठिकाणींच जीर्ण होतात व तेथेंच लय पावतात; पण, स्वतः

कालच ज्यायोगें जीर्ण होतो व जेथें लीन होतो, त्या परमपदाचें ज्ञान कोणालाच होत नाहीं. आपल्यावर, खालीं, आडव्या बाजूला, भोंवतालीं मध्यें कोठेंहि ब्रह्मस्वरूप असल्याचा प्रत्यय—यांपैकीं ब्रह्मस्वरूप अमुकच ठिकाणीं आहे, असा प्रत्यय–मनुष्याला येत नाहीं. म्हणजे विशिष्ट लोकाची प्राप्ति म्हणजे ब्रह्मप्राप्ति असा सिद्धांत होऊं शकत नाहीं; अर्थात्च अमुक एक विशिष्ट स्थळाची प्राप्ति म्हणजे मोक्ष नव्हे, हें ओघानेंच येतें. मुक्त पुरुष परमात्मरूपच असल्यानें सर्व लोकांचा अंतर्भाव त्याच्या सर्वव्यापी स्वरूपांत होतो व त्याच्या व्यतिरिक्त असा प्रदेशच रहात नसल्यानें त्याच्या बाहेर असें लोकांचें अस्तित्वच राहूं शकत नाहीं.

धनुष्याच्या दोरीपासून सुटलेल्या बाणाप्रमाणें एकादा प्राणी सरळ जाऊं लागला व तो जरी मनोवेगानें धांवत असला तरी त्याला या जगत्कारणरूप परब्रह्मस्वरूपाचें पैलतीर गांठतां येणें शक्य नाहीं. परब्रह्मरूप अत्यंत सूक्ष्म आहे. त्याहून सूक्ष्म असें या जगांत कांहींच नाहीं. तसेंच तें स्थूलहि आहे; इतकें कीं त्याच्याहून स्थूल असें या जगांत कांहींच सांपडणार नाहीं. त्याचीं हात, पाय, डोळे, डोकें, तोंड, इत्यादि सर्व इंद्रियें सर्वत्र पसरलेलीं आहेत. त्याचें श्रोत्रेंद्रिय हेंहि सर्वव्यापी आहे. हें परब्रह्मरूप सर्व लोकांना व्यापून उरलेलें आहे. हें अणूपेक्षांहि लहान, मोठ्यापेक्षां मोठें, असें असून सर्व भूतांच्या जवळ निश्चयानें आहे. पण, असें असून तें कोणालाहि दिसत मात्र नाहीं. परमात्मस्वरूप क्षर व अक्षर असें दोन प्रकारचें आहे. सृष्टींतील स्थावर-जंगम भूतजात हें आत्म्याचें क्षर स्वरूप होय व चिन्मात्रस्वरूप, अविनाशी, असें जें आत्मरूप तेंच त्याचें अक्षर रूप होय. अहंकारगुणानें युक्त असलेल्या ज्या वासना त्यांचें निवासस्थान महत् अहंकार, पंचतन्मात्रें, अविद्या व कर्म या नव-द्वारांनीं युक्त आहे. याच्या संसर्गानें वस्तुतः उपाधिरहित, निश्चल, स्थावरजंगम सर्व भूतांचा अधिष्ठाता ईश्वर सुद्धां हंस बनतो–गतिमान् होतो–म्हणजेच भ्रांत होतो. तत्त्ववेत्ते पुरुष, अजन्म असें जें परब्रह्मरूप त्यालाच मनुष्याच्या शरीरामध्यें असलेल्या महदादि उपरोक्त गोष्टींचे हानि ( गति ), भंग ( सुख–दुःख ) व विकल्प ( भूतजातांतील नानात्वाचा प्रत्यय ) इत्यादि जे गुण त्यांच्या संचयानें-त्यांच्याशीं संसर्ग झाल्यानें–हंसत्व येतें असें म्हणतात. वर जें परमेश्वराचें क्षर स्वरूप सांगितलें त्याला हंसरूप म्हणतात; व जें अक्षर रूप तें कूटस्थ रूप होय. हंसरूप व कूटस्थरूप–क्षररूप व अक्षररूप–हीं वस्तुतः एकच होत असें जाण-

णाऱ्या माणसाला ब्रह्मपदप्राप्ति होते व तो जन्ममरणाच्या फेऱ्यांतून मुक्त होतो. १२. ३. २३९.

## अध्याय २४० वा.

[ १ योगसाधनाचें वर्णन. ]

( १ ) **व्यास**—हे सत्पुत्रा, आतांपर्यंत मीं तुला सांख्यमार्गाशीं संलग्न असलेली सर्व माहिती व्यवस्थित व तपशीलवार सांगितली. आतां त्याच पद्धतीनें योगमार्गाबद्दलचीहि सगळी माहिती तुला सांगतों, ती ऐक. बुद्धि, मन व इंद्रियें यांचा एके ठिकाणीं म्हणजे बुद्धीचे ठिकाणीं लय करणें व बुद्धीच्याहि वृत्तीचा निरास करणें हेंच सर्वव्यापी आत्म्याचें परमश्रेष्ठ असें ज्ञान होय. सर्व रागद्वेष ज्याचे निमालेले आहेत, जो जितेंद्रिय आहे, आत्मस्वरूपाची ज्याला जिज्ञासा आहे, जो आत्माराम–आत्मसंतुष्ट–आहे, ज्याचें आचरण पवित्र आहे, असा बुद्धिमान् पुरुषच याचा अधिकारी होय.

या अधिकारी पुरुषानें शहाण्या लोकांनीं कथन केलेले पांच योगदोष टाकून हें ज्ञान प्राप्त करून घ्यावयाचें आहे. काम, क्रोध, लोभ, भय व स्वप्न हे ते पांच योगदोष होत. आत्मसंयमनानें क्रोध जिंकावा, वासनांचें बीज जो संकल्प तो टाकून देऊन हव्यास जिंकावा. निरनिराळ्या अर्थांचें संसेवन बुद्धियुक्त प्रकारानें करून धीर पुरुषाला निद्रेला कह्यांत आणतां येतें. धैर्याचा अवलंब करून जननेंद्रिय व उदर यांच्या स्वैरवृत्तींना आळा घालावा; डोळ्यांनीं मार्ग नीट पहावा व हातापायांचें कंटकादिकांपासून रक्षण करावें; मनःसामर्थ्याच्या बलावर डोळे व कान यांचा निग्रह करावा—त्यांना पापमार्गाकडे वळूं देऊं नये. मन व वाणी यांजवर यज्ञादि कर्मांनीं विजय मिळवावा. कोठेंहि चूक होऊं न देतां अप्रमत्त रीतीनें वागलें म्हणजे भयाची भीति नाहींशी करतां येते. शहाण्या माणसांची सेवा केल्यानें दंभाचें नियमन करतां येतें. अशा तऱ्हेनें नित्य प्रमादरहित राहून हे पांच योगदोष जिंकावे, अग्नि व ब्राह्मण यांची पूजा करावी, देवतांचें वंदन करावें, क्रोध, काम इत्यादिकांना उत्तेजन देणारी वाणी या अधिकारी पुरुषानें वर्ज्य करावी, कोणाचेंहि मन दुखविलें जाईल, अशी कठोर वाणी उच्चारूं नये. सर्व भूतांना बीजभूत असणारें, सत्यप्रधान असें जें महत् तत्त्व तेंच योगशास्त्राच्या मतानें परब्रह्म होय. हें अत्यंत तेजोमय

असून सर्व सृष्टि हें त्याचेंच सार होय. या भव्य अशा—म्हणजे ज्याला उत्पत्ति आहे अशा—ब्रह्माच्या संकल्पापासूनच ही सर्व स्थावरजंगम भूतसृष्टि निर्माण होते. ध्यान, अध्ययन, दान, सत्यप्रियता, विनय, सरळपणा, क्षमाशील वृत्ति, आचार व विचार यांचें पावित्र्य, जितेंद्रियत्व, इत्यादिकांच्या साहाय्यानें योग्याचें तेजोबल वाढतें व पापाचा नाश होतो. त्याचे सर्व मनोरथ सिद्ध होतात व त्याला ब्रह्मपदाचें ज्ञान होतें.

योग्यानें सर्वांभूतीं समदृष्टि ठेवून वागावें; यदृच्छेनें जें मिळेल त्यांत संतोष मानावा; त्याचा रागलोभ धरूं नये; जितेंद्रिय असावें; तेजोबल वाढवून पाप-क्षय करावा; हलका आहार घ्यावा; व कामक्रोध आपल्या कह्यांत राखून ब्रह्मपदाला पोंहोंचण्याची इच्छा धरावी. चित्त एकाग्र करावें, इंद्रियांच्या स्वैर वृत्तींचा निरोध करावा व अशा एकलय स्थितीमध्यें पूर्वरात्रीं व उत्तर-रात्रीं योग्यानें आत्म्याच्या ठिकाणीं चित्तलय करून समाधियोग साधावा. पंचेंद्रियांनीं युक्त अशा प्राण्याचें एकादें इंद्रिय जरी मोकळें सोडलें, त्याचा निग्रह केला नाहीं, तर तेवढ्यानें सुद्धां चर्मपात्रांतून पाणी थेंबथेंबानें झरावें त्याप्रमाणें याची बुद्धि झरते, नाहींशी होते. म्हणून योगसाधनेच्छु पुरुषानें पांची इंद्रियांचा एकसमयावच्छेदानें निरोध केला पाहिजे. कोळी ज्याप्रमाणें चुकार माशाला प्रथम धरतो, त्याप्रमाणें योगी पुरुषानें मनाला पहिल्यांदा लगाम घालावा. मनानंतर कान, नंतर डोळे, डोळ्यांनंतर जिव्हा, जिव्हेनंतर नासिका, या क्रमानें इंद्रियनिग्रह करून त्यांच्या वृत्ति आपल्या कह्यांत ठेवाव्या व यांचा लय मनाचे ठिकाणीं करावा. इंद्रिय व मन यांचा एके ठिकाणीं म्हणजे मनांत लय केला तरी या स्थितींत मनाचे ठिकाणीं संकल्पबीज, सुप्तावस्थेंत कां होईना, असतेंच.

या संकल्पबीजाचाहि निरास करून अशा तऱ्हेनें शुद्ध झालेलें हें मन आत्म-स्वरूपाच्या ठिकाणीं लावावें व तेथें त्याचा लय करावा. यतीनें पंचेंद्रियांचा निरोध करून त्यांचा मनाचे ठिकाणीं लय करावा. पंचकर्मेंद्रियें व सहावें मन हीं सर्व ज्या वेळेस आत्म्याचे ठिकाणीं सुप्रतिष्ठित होतात व त्यांच्या वृत्तींच्या नाशामुळें संकल्पानें—वासनेनें—उत्पन्न झालेला त्यांचा मलिनपणा जेव्हां नाहींसा होतो, तेव्हांच शुद्ध ब्रह्मरूपाचा प्रकाश फांकूं लागतो. हा ब्रह्मस्वरूपाचा प्रकाश निर्धूम अशा देदीप्यमान अग्नीच्या अगर आकाशांत तळपणाऱ्या सूर्याच्या

प्रकाशाप्रमाणें भासतो. विद्युत्संबंधाचा अग्नि जसा आकाशामध्यें असतो, तसा ह्या आत्मा सूक्ष्म बुद्धिस्वरूपाचे ठिकाणीं लीन असतो. अहंकारादि सर्व या सूक्ष्म बुद्धीच्या ठिकाणीं व्याप्य स्वरूपानें हें सूक्ष्म बुद्धिस्वरूप सर्वत्र व्यापकत्वानें असल्याचें दिसून येतें. जे मनस्वी महात्मे ब्राह्मण, धृतिमान्, महाबुद्धिमान् व सर्वांभूतीं समभाव ठेवणारे असतात, त्यांनाच या परमात्मरूपाचें दर्शन होतें. अशा प्रकारें कांहीं नियमित कालपर्यंत एकट्यानें एकांतांत आसन घालून व व्रतनियम कडक रीतीनें पाळून जो योगसाधन करतो, त्याचें परब्रह्माच्या अक्षर स्वरूपाशीं तादात्म्य होतें व तो तद्रूप होतो.

या योगमार्गांत विघ्नेंहि अनेक प्रकारचीं आहेत. कित्येक वेळां चित्ताची एकाग्रताच होत नाहीं, तर कित्येकदां चित्तवृत्तीला व्यामोह उत्पन्न होतो. पुष्कळदां चित्ताची वृत्ति एकदां आत्म्याकडे तर एकदां विषयांकडे अशी भोंवऱ्यांत सांपडल्यासारखी अस्थिर रहाते. योगमार्गांत थोडी थोडी गति होऊं लागल्यावर नाकाला दिव्यगंधादिकांचा सुवास येऊं लागतो, मधुर शब्द कानांवर येतो, सुंदर आकृतीचें दर्शन घडतें; शीतोष्णादि सहन करतां येणें, वायुरूप धारण करतां येणें, वगैरे अद्भुत गोष्टी योग्याला साध्य होतात. त्याला सर्व शास्त्रार्थांचें ज्ञान आपोआप होऊं शकतें व दिव्यभोग भोगावयास सांपडतात. पण ह्या सर्व गोष्टी म्हणजे योगमार्गांतील विघ्नें होत. तत्त्वजिज्ञासु पुरुषानें या सिद्धि प्राप्त झाल्या, तरी त्यांचा लय आत्मस्वरूपांतच करावा. सिद्धिबलानें मिळणाऱ्या भोगांत रंगून जाऊं नये. दान्त अशा मुनीनें दिवसांतून तीन वेळां, म्हणजे प्रातःकाळीं, रात्रींच्या पूर्वभागांत व उत्तरभागांत योगाभ्यास साधावा. पर्वताच्या शिखरावर, ज्याला पार घातलेला असेल अशा झाडाखालीं, अगर वृक्षासमोर बसून योगसाधन करावें. सर्व इंद्रियांच्या वृत्तीचा निरोध करून त्यांना अंतःकरणाचे ठिकाणीं स्थिर करावें व द्रव्यलुब्ध मनुष्य ज्याप्रमाणें द्रव्य सांठविलेल्या भांड्याचेंच चिंतन करितो, त्याप्रमाणें—तितक्या एकाग्रतेनें—आत्मचिंतन करावें. योगमार्गाचा कंटाळा करूं नये. मन हें अत्यंत चंचल असल्यानें त्याचें आकलन करण्याचे जे जे उपाय असतील, त्या सर्वांचा अवलंब योग्यानें करावा व ते सोडूं नयेत. ज्यांत कोणाचाहि वास नाहीं अशा शून्य गुहा, देवळें, निर्जन घरें इत्यादिकांचा निवासस्थान म्हणून उपयोग करावा. वाणीनें, कृतीनें, किंवा विचारानें कोणत्याहि प्रकारें दुसऱ्याचा द्रोह करूं नये. कशांतहि आसक्ति ठेवूं नये. उपेक्षाबुद्धि धरावी. हलका आहार करावा व तोहि मित असावा;

लाभ किंवा हानि यांचें सुखदुःख सारखें मानावें. जो आपली स्तुति गाईल किंवा निंदा करील त्याच्या, कोणाच्याच शुभाशुभांची इच्छा योग्यानें मनांत वागवूं नये. कोणाचें कल्याणहि चिंतूं नये अगर अकल्याणहि चिंतूं नये. एकादी इष्ट गोष्ट प्राप्त झाली म्हणजे योग्यानें हुरळून जाऊं नये, किंवा इष्ट सिद्धि झाली नाहीं, म्हणून शोकाकुलहि होऊं नये. दुर्गंधयुक्त किंवा सुगंधयुक्त सर्व पदार्थांशीं वाऱ्याची वृत्ति जशी सारखीच असते, तशी सर्वांभूतीं समदृष्टि ठेवावी.

अशा रीतीनें सर्वत्र समदृष्टि झालेल्या योगयुक्त अशा आत्मनिष्ठ साधूला शब्दविद्येच्या पलीकडे—अपराविद्येच्या पलीकडे—जातां येतें व तो ब्रह्मरूप बनतो. सहा महिन्यांत त्याला साक्षात्कार होतो. मातीचें ढेंकूळ, पाषाण किंवा सोनें या सर्वांना सारखें लेखणाऱ्या विरक्त पुरुषानें द्रव्यादिकांच्या मागें लागलेले पुरुष दुःखव्याप्त असतात, हें लक्षांत घ्यावें व मोह सोडून द्यावा. त्यांच्या मार्गाचें अवलंबन करूं नये व आपला मार्ग सोडूं नये. या योगमार्गाचें आचरण श्रद्धा-वान् व धर्मजिज्ञासु स्त्रीशूद्रादिकांनाहि विहित म्हणून सांगितलें आहे. या मार्गानें जाणाऱ्या स्त्रीशूद्रादिकांनाहि परम पदाची प्राप्ति होते. इंद्रियांच्या वृत्ति निश्चल केल्यानें योग्याला ज्या जन्मजरारहित अशा सनातन पुराण ब्रह्मस्वरूपाची प्रतीति येते, तेंच स्वरूप षड्विकाररहित व डोळ्यांना न दिसण्याइतकें जसें सूक्ष्म तसेंच अफाटहि आहे, असें त्या जितचित्त पुरुषाला पुढें समजून येतें. महात्म्या महर्षि वेदव्यासांनीं सांगितलेल्या वचनांचा अंतःकरणाशीं विचार करून व युक्तिवादानें तत्त्वनिश्चय करून घेऊन, ज्ञानी पुरुष, शास्त्रानें सांगित-लेली अशी ही ब्रह्मदेवाशीं होणारी सायुज्यता प्राप्त करून घेतात व तेथें ब्रह्मलोकामध्यें प्रलयकालापर्यंत तद्रूपवृत्तीनें राहून अखेर अव्यक्त ब्रह्मरूपीं लीन होतात. १२. ३. २४०.

---

## अध्याय २४१ वा.

[ १ ज्ञानकर्मसमुच्चयाबद्दलचा शुकांचा प्रश्न. ३ व्यासाचें त्यावर उत्तर. ].

**शुक**—वेदवाक्यांमध्यें कर्में करावीं व कर्में टाकावीं अशीं दोन्ही प्रकारचीं विधानें आहेत, तेव्हां ज्ञानमार्गानें प्राणी कोणत्या गतीला जातो व कर्ममार्गानें कोणत्या गतीला जातो, तें ऐकण्याची माझी इच्छा आहे. तरी हे भगवन्, तें

मला आपण सांगा. कारण, हे दोन्ही मार्ग परस्परांशीं विसदृश असून एकमेकांना प्रतिकूलहि आहेत.

भीष्म—याप्रमाणें शुकाचें भाषण ऐकून पराशरसुत वेदव्यास त्याला म्हणाले.

व्यास—कर्ममार्ग व ज्ञानमार्ग हे नश्वर व शाश्वत गति प्राप्त करून देणारे क्षर व अक्षर मार्ग आहेत. त्यांचें स्वरूप मी तुला विस्तरशः सांगतों, ऐक. कर्ममार्गानें मनुष्य कोणत्या गतीला जातो, ज्ञानमार्गानें त्याला काय मिळतें, हेंहि मी सांगणार आहें, तें सावधानपणानें ऐक. कारण, या दोहोंतलें अंतर फार मोठें आहे. जगांत आस्तिक व नास्तिक असे दोन पंथ आहेत. पण त्यांच्यांत श्रेष्ठ कोण म्हणून एकाद्या आस्तिकाला विचारलें तर त्याला जसे क्लेश होतील, तसेच क्लेश यावेळीं माझ्या मनाला तुझा प्रश्न ऐकून होत आहेत. असो. वेदांनीं प्रामुख्यानें सांगितलेले असे कर्ममार्ग व ज्ञानमार्ग असे हे दोन मार्ग आहेत. वेदांनीं प्रवृत्तिलक्षण धर्म सांगितला आहे व निवृत्तीचें निरूपणहि तेथेंच आहे. कर्में केल्यानें प्राणी त्या कर्मांच्याच जाळ्यांत अधिक गुरफटला जातो व विद्येच्या योगानें त्यांतून तो मुक्त होतो. म्हणून ब्रह्मस्वरूपावर ज्यांची दृष्टि आहे, असें पारदर्शी यति–जितेंद्रिय मुनि–कर्म करीत नाहींत. कर्में केल्यानें हा सोळा विकारांनीं झालेला मनुष्यदेह मरणानंतर पुनः साकार होतो—पुनः जन्माला येतो व ज्ञानपूर्वक कर्मत्याग केल्यानें तो नित्य व अव्यय अशा अव्यक्त स्वरूपांत लीन होतो. कांहीं कोत्या बुद्धीचीं माणसें कर्ममार्गाची प्रशंसा करीत असतात. परंतु, त्या योगानें त्यांचें चित्त विषयभोगांतच रमतें व तज्जन्य वासनांच्या पायीं त्यांना अनेक जन्म घ्यावे लागतात. धर्मविचारांत ज्यांनीं नैपुण्य मिळविलें आहे व ज्यांची बुद्धि परिपक्क झालेली आहे, अशीं माणसें कर्ममार्गाची प्रशंसा करीत नाहींत. नदीच्या पात्रांत उभें राहून ज्यांना आपली तहान भागवितां येते ते आडाच्या पाण्याचे गोडावे कशाला गात बसतील? जन्ममरणाची यातायात व सुखदुःखांचे फेरे हीं कर्में केल्याचीं फळें होत.

ज्या ठिकाणीं गेल्यावर शोक करण्याची पाळी मनुष्याला कधींच येणार नाहीं, असलें पद ज्ञानमार्गानें प्राप्त होतें. ज्या ठिकाणीं मृत्यु नाहीं, जन्म नाहीं, पुनर्जन्म नाहीं, इतकेंच नव्हे, तर स्वतंत्र अस्तित्वच नाहीं; जेथें अव्यक्त, अचल, स्थिर, ज्यामध्यें कोणताहि विकार उत्पन्न झालेला नाहीं असें शुद्ध, अनायासानें

प्राप्त होणारें, सर्वभेदातीत असणारें असें ब्रह्मरूप अधिष्ठित असतें, तें हें पद होय. ज्या ठिकाणीं थंडी, ऊन, इत्यादि द्वंद्वांची बाधा होत नाहीं, जेथें सुख-दुःखादि संकल्पजन्य मनोविकार बाधत नाहींत; असें सर्वांभूतीं मित्रभावाची समदृष्टि ठेवणाऱ्या व सर्व भूतांच्या कल्याणाची इच्छा धरणाऱ्या पुरुषाला प्राप्त होणारें हें परम पद आहे. कर्ममार्गी पुरुषाचें स्वरूप वेगळें, व ज्ञानमार्गी पुरुषाचें वेगळें. कर्ममार्गांतच गढून गेलेल्या पुरुषाचें ऐश्वर्य अमावास्येच्या दिवशीं सूक्ष्म कलारूपानें राहिलेल्या चंद्राप्रमाणें होय. चंद्राच्या कला ज्याप्रमाणें महिन्याचे महिन्यास चढत उतरत जातात तशीच कर्ममार्गी पुरुषाच्या ऐश्वर्याची गोष्ट आहे.

आकाशामध्यें वस्त्राच्या दशीप्रमाणें शोभून दिसणाऱ्या प्रतिपच्चंद्राचा दृष्टांत घेऊन ऋषींनीं हें तत्त्व विस्तारानें सांगितलें आहे. चंद्राच्या वृद्धिऱ्हासावरून कर्ममार्गी पुरुषाच्या ऐश्वर्याची वृद्धि व ऱ्हास कसा होतो, याचें अनुमान बांधतां येतें. पंच कर्मेंद्रियें, पंच ज्ञानेंद्रियें व अकरावें मन या अकरा विकारांनीं बनलेला, व कर्मरूपी कलांनीं परिपूर्ण असणारा मनोमय आत्मा जें साकार रूप घेतो, तें कर्मगुणांचेंच फल होय. कमलाच्या पानावर पडलेल्या पाण्याच्या थेंबाप्रमाणें या मनोमय कोशांत राहून त्यापासून अलिप्त असणारा जो चिन्मात्र आत्मा तोच क्षेत्रज्ञ होय. योगाच्या साधनानें ज्यानें आपलें चित्त आंवरून धरलें आहे असा हा क्षेत्रज्ञ अविनाशी असतो. सत्व, रज व तम हे उपाधिविशिष्ट जीवाचे गुण आहेत, चैतन्य हा जीवाचा गुण आहे व हें चैतन्य परमात्म्याच्या ऐश्वर्य, धर्म, यश, श्री इत्यादि षड्गुणांनीं युक्त आहे. मूळचा अचेतन असलेला देह जीवाच्या चैतन्य या गुणामुळें सचेतन मानला जातो; कारण, देहाकडून घडणाऱ्या सर्व क्रिया हा चेतन जीवच त्याच्याकडून घडवीत असतो. शरीराकडून होणारी हालचाल किंवा शरीराची जीवंत राहण्याची क्रियासुद्धां जीवाच्या चैतन्यगुणामुळेंच होते. ह्या शरीररूप क्षेत्राचें ज्ञान ज्यांना पूर्ण आहे ते तत्त्ववेत्ते पुरुष, सप्त लोक उत्पन्न करणारा परमात्मा या जीवाच्याहि पलीकडला आहे, असें म्हणतात. १२. ३. २४१.

---

## अध्याय २४२ वा.

[ १ ब्रह्मचर्य-धर्मकथन. ]

( १ ) शुक—हे ताता, क्षरापासून पुढची जी चोवीस तत्त्वांची सृष्टि ती

ईश्वरानें निर्माण केलेली भूतसृष्टि होय व इंद्रियांचे गुणधर्म व त्यांचे भोग्य विषय ही जीवानें निर्माण केलेली वासनामय सृष्टि होय. ही वासनामय सृष्टीच यातायतीच्या—जन्ममरणांच्या—फेऱ्याचें कारण असून त्या दृष्टीनें तीच श्रेष्ठ होय इत्यादि विवेचन मीं तुझ्या मुखानें पूर्वींच ऐकिलें आहेच. पण युगधर्मानुसार या लोकांत प्रचलित होणारे सदाचार कीं ज्यांच्या आधारानें सज्जन नेहमीं चालतात, ते पुनः ऐकण्याची माझी इच्छा आहे. श्रुतीनें कर्में करूं नये व करावीं असेंहि सांगितलें आहे. याचा मेळ कसा घालावयाचा तेंहि तूं मला सांग. लौकिक आचार कसा असतो, याचें ज्ञान मला आहे. आतां गुरुभूत जो तूं त्या तुझ्या उपदेशानें पवित्र होऊन व बुद्धि शुद्ध करून देहत्याग केल्यावर परमात्मस्वरूपांत मिळून जावें एवढीच इच्छा आहे.

**व्यास**—ब्रह्मदेवानें स्वतःच जो मार्ग सज्जनांना घालून दिला आहे, त्यानेंच आजपर्यंत साधुवृत्तीचे असे प्राचीन परमऋषि चालत आलेले आहेत. प्राचीन परम ऋषि ब्रह्मचर्याश्रमाचा अवलंब करून सर्व लोक जिंकतात व नंतर आपल्याला श्रेयःप्राप्ति कशानें होईल, त्याचा स्वतःचे ठिकाणींच आपल्या मनानें विचार करतात. अरण्यांत फलमूलादिकांवर उपजीविका करणारा, अतिशय उत्कृष्ट व विपुल अशी तपश्चर्या करणारा, पवित्र ठिकाणीं वास करणारा, कोणाहि प्राण्याबद्दल द्वेषभाव न धरणारा, ज्या ठिकाणीं धान्य कांडलें जात नाहीं व धूरहि निघत नाहीं, अशा वानप्रस्थाच्या आश्रमांतून योग्यकालीं भिक्षा मागणारा असा पुरुषच ब्रह्मपदप्राप्तीला लायक होय. कोणीं माझी स्तुति करावी, कोणीं मला नमस्कार करावा, अशी इच्छा मनांत न धरतां, शुभाशुभ सारखींच मानून त्यांचा त्याग कर व यदृच्छया जें मिळेल त्यावर निर्वाह करून एकटा अरण्यांत हिंडत रहा. म्हणजे तूं ब्रह्मपदप्राप्तीला योग्य होशील.

**शुक**—वेदवचनें एकमेकांच्या विरुद्ध जाऊं लागलीं तर तीं प्रमाण कशीं मानावयाचीं ! दोन्हीं परस्परविरोधि वचनें प्रमाण मानावयाचीं झाल्यावर वेद-वचनाला विरोध करणारें वाक्य शास्त्रशुद्ध कसें ही शंका येते. अप्रमाण म्हणून मानल्या जाणाऱ्या वचनाला शास्त्रशुद्धता नाहीं, हें तर सांगावयास नकोच. वाक्य प्रमाण मानावयाचें तर वेदविरुद्ध वाक्य शास्त्रशुद्ध कसें ही शंका उरते व अप्रमाण तें अप्रमाण म्हणून अशास्त्र ठरतें. एवंच, प्रमाण असो अप्रमाण असो, दोन्ही प्रकारांत अशास्त्रता येत असल्यानें दोन्ही वाक्यांना प्रामाण्य कसें

मानावयाचें हें तुजपासून ऐकण्याची इच्छा आहे. कर्मांना विरोध न करतां मोक्षप्राप्ति कशी होते ?

भीष्म—आपल्या तेजस्वी पुत्राचें तें वाक्य ऐकून परमऋषि भगवान् गंधवतीसुत वेदव्यासांना अत्यंत आनंद झाला व ते उत्तर करितात.

व्यास—ब्रह्मचारी गृहस्थ, वानप्रस्थ व भिक्षुक या चारी आश्रमांतील पुरुषांनीं यथाशास्त्र आचरण केलें तर त्यांना सर्वांना परमश्रेष्ठ अशी गति मिळते.

काम व द्वेष टाकून देऊन जो पुरुष शास्त्रोक्त रीतीनें या चारी आश्रमांचा अवलंब एकटा यथाक्रम करील, त्याला परमपदप्राप्ति होते. ब्रह्मचर्य, गृहस्थाश्रम, वानप्रस्थ व संन्यास ही मोक्षपदाला पोंहोंचविणारी चार पायऱ्यांची एक शिडी आहे. या शिडीवरून जो मनुष्य जातो, त्याला ब्रह्मलोकीं प्रतिष्ठा मिळते. कारण, या शिडीची शेवटची पायरी ब्रह्मपदाला पोंचली आहे. एकंदर आयुष्याचे चार भाग कल्पिले, तर त्यांतील पहिला भाग, ब्रह्मचर्य पाळून निर्मत्सर रीतीनें गुरु किंवा गुरुपुत्र यांच्या सहवासांत धर्मज्ञान व तत्त्वज्ञान संपादण्यांत घालवावा. गुरुगृहीं असतांना गुरूच्या मागून झोंपीं जावें व आधीं उठावें. शिष्यानें किंवा दासानें करावयाचीं जीं जीं कार्यें आहेत, तीं करावयास गुरूनें हांक मारिली तर तीं सर्व अगोदरच केलीं आहेत, असें सांगण्यास पुढें व्हावें, इतक्या त्वरेनें गुरूचें मनोगत आधींच ओळखून त्यानें सांगण्यापूर्वींच नित्याचीं कर्में करून ठेवावीं. शिष्यानें सर्वकर्मकुशल असावें व गुरूचें पडेल तें कार्य करण्यास दासाप्रमाणें तत्पर असावें. सर्वकार्य पूर्ण झाल्यानंतर जिज्ञासु शिष्यानें गुरूजवळ अध्ययन करावें.

शिष्यानें सरळवृत्ति ठेवावी, कोणासहि वांकडें बोलूं नये, गुरूच्या हांकेला ताबडतोब हजर असावें. पवित्र कार्यैकदक्ष व गुणी अशा शिष्यानें मधून मधून गुरूच्या मनाचा संतोष होईल असें भाषण करीत असावें. जितेंद्रिय वृत्तीनें शिष्यानें गुरूचेंच अवलोकन करीत असावें. गुरूचें भोजन झाल्याशिवाय शिष्यानें आपण भोजन करूं नये. त्याची तृषा शांत झाल्यावांचून आपण पाणी पिऊं नये. गुरु उभा असतां आपण बसूं नये. तो जागा असतां आपण झोंपूं नये. उताण्या हातांची ओंजळ करून गुरुचरणांना हळूच स्पर्श करावा व आपल्या उजव्या हातानें गुरूच्या उजव्या हाताला व डाव्या हातानें डाव्या हाताला स्पर्श करावा. गुरूला नमस्कार करून 'भगवन्, मला विद्या

सांगा' अशी त्याची प्रार्थना करावी. 'भगवन्, हें मीं केलें,' 'हें मीं करितों,' व 'आपण जें सांगाल तें मी करीन,' असें म्हणून केलेलें कर्म गुरूला सांगावें व करीत असलेल्या आणि पुढें करावयाच्या कर्मांबद्दल त्याची अनुज्ञा घेऊन ठेवावी. जे जे गंधरस ब्रह्मचाऱ्यानें सेवन करूं नयेत म्हणून शास्त्रानें निषेध सांगितला आहे, त्या त्या गंधांचें व रसांचें सेवन समावर्तन झाल्यावर करावें. ब्रह्मचाऱ्यासाठीं म्हणून जे जे नियम विस्तारानें ऋषींनीं सांगितले आहेत, त्या सर्वांचें नित्य आचरण करावें व गुरूचा सहवास सोडून जाऊं नये. अशाप्रकारें गुरूचा संतोष संपादन करून आश्रमा-आश्रमाच्या ठिकाणीं शिष्यानें आपलें कर्म करीत असावें. वेदविद्या संपादन करण्यामध्यें आयुष्याचा चौथा भाग याप्रमाणें घालविल्यावर गुरूला दक्षिणा देऊन शास्त्रोक्त विधीनें समावर्तन करावें. नंतर धर्ममार्गानें विवाह करावा व पत्नीसह अग्न्याधान करावें. जितेंद्रिय वृत्तीनें राहून शास्त्रानें सांगितलेल्या नियमानुसार आयुष्याचा दुसरा चवथा भाग गृहस्थाश्रमाचें पालन करण्यांत घालवावा. १२. ३. २४२.

---

## अध्याय २४३ वा.

### [ १ गृहस्थाचे धर्म. ]

( १ ) व्यास—गृहस्थाश्रमी पुरुषानें धर्मविधीनें लग्न करून पत्नीसह अग्नीची उपासना करीत आयुष्याचा दुसरा चवथा भाग घालवावा. गृहस्थानें पत्करावयाचे उपजीविकेचे मार्ग चार आहेत. पहिला मार्ग एक टोपलीभर धान्याच्या संचयाची चिंता वहाणें हा; दुसरा एक घडाभर धान्याची चिंता वहाणें हा; तिसरा एक दिवसापुरतीच काळजी वाहून दुसऱ्या दिवशीं काय होईल, याची चिंता न वहाणें हा व चौथा मार्ग पक्ष्यांप्रमाणें उंछवृत्तीनें रहाणें हा होय. यांपैकीं पुढचा पुढचा मार्ग अधिक श्रेष्ठ व धर्मसाधनाला अधिकाधिक अनुकूल आहे. यजन, याजन, अध्ययन, अध्यापन, दान व प्रतिग्रह हीं सहा गृहस्थाश्रम्याचीं कर्मे आहेत. कांहींजण यांपैकीं यजन, अध्ययन व दान एवढ्या-चेंच आचरण करतात. कांहीं दान व अध्ययन एवढीं दोनच आचरतात व कांहीं ब्रह्मरूपाचें चिंतन करण्यांत मग्न असतात. गृहस्थाश्रमी पुरुषानें आचरावयाचे अनेक धर्म शास्त्रानें सांगितलेले आहेत, ते असे.

गृहस्थाश्रमी पुरुषानें स्वतःकरितां म्हणून अन्न शिजवूं नये. कारणावांचून वृथा पशुहिंसा करूं नये. यज्ञाकरितां म्हणून ज्याचें छेदन करावयाचें तो यज्ञ-पशूसारखा सजीव प्राणी असो किंवा अश्वत्थासारखें निर्जीव झाड असो, त्याचें छेदन अमंत्रक होऊं नये. गृहस्थानें दिवसा, रात्रींच्या पूर्वभागीं व उत्तरभागीं निजून राहूं नये. दोन वेळच्या भोजनकालाखेरीज मध्यें तिसऱ्यांदा गृहस्थानें खाऊं नये. ऋतुकालाशिवाय स्त्रीगमन करूं नये. गृहस्थाच्या घरीं कोणाहि ब्राह्मणाचा सत्कार झाला नाहीं किंवा कोणी ब्राह्मण उपाशीं राहिला, असें होऊं नये. त्याच्या घरीं अतिथिसत्कार नेहमीं व्हावा; अग्निपूजन त्याला नेहमीं प्रिय असावें. वेदविद्येचें अध्ययन संपवून ज्यांनीं समावर्तन केलें आहे, असे वेदपारग, जितेंद्रिय, स्वतःच्या धर्माचें पालन करणारे, तपस्वी, कर्मनिष्ठ, जे श्रोत्रिय त्यांचा सत्कार करण्यासाठीं हव्यकव्य पदार्थ त्यांना अर्पण करावे; हव्यकव्यांचें आचरण त्यांच्यासाठीं करावें. दांभिकपणानें जटा व नखें वाढविणारा, आपल्या तोंडानें आपल्या धर्माची घोषणा करणारा, अशास्त्र मार्गानें अग्निहोत्राचा त्याग करणारा, व गुरूशीं कपटानें वागणारा, असा जो कोणी असेल, त्याचा किंबहुना श्वपच-चांडालादिकांचाहि भाग या गृहस्थाश्रमी पुरुषाच्या अन्नांत भाग असतो. स्वतः अन्नसंस्कार जे कधीं करीत नाहींत, अशा ब्रह्मचारी व संन्यासी लोकां-नाहि गृहस्थानें अन्नदान करावें.

गृहस्थानें विघसान्न भक्षण करून असावें, नित्य अमृतभोजन करावें. अग्नीला हविर्भाग देऊन शेष राहिलेल्या अन्नाचें भोजन हेंच अमृतभोजन असून त्याची योग्यता हविर्भक्षणाइतकी आहे. आपल्यावर अवलंबून असलेल्या नोकरवर्गाला देऊन उरलेलें जो भक्षण करतो, तो विघसाशी होय. भृत्यशेष अन्नाला विघस म्हणतात व यज्ञशेष अन्नाला अमृत म्हणतात. गृहस्थानें स्वस्त्रीच्या ठिकाणींच रत असावें. दमनशील वृत्ति धारण करावी, कोणाचाहि मत्सर करूं नये व जितेंद्रिय असावें. यज्ञकर्मांतील ऋत्विज, कुलपुरोहित, गुरु, मामा, आश्रितवर्ग, वृद्ध, लहान मुलें, रोगी, वैद्य, आपल्या जातींतील किंवा गोतांतील इतर बांधव, आईबाप, आपल्याच गोत्रांतील स्त्रिया, भाऊ, मुलगे, बायको, मुलगी व आपले नोकर इतक्यांशीं विवाद करूं नये. यांच्याशीं कलह टाळल्यानें मनुष्य सर्व पापांपासून विमुक्त होतो. प्रसंगानुरोधानें यांच्याशीं कलह टाळल्यामुळें स्वतःचा जरी पराभव झाला, तरीहि मनुष्याला स्वर्गप्राप्ति होते. आचार्याचा संतोष राखल्यानें ब्रह्मलोकाची प्राप्ति होते. पिता संतुष्ट झाला

तर प्राजापत्य लोक मिळतो. अतिथिपूजनानें इंद्रलोक प्राप्त होतो. ऋत्विग्जन संतुष्ट असले म्हणजे देवलोक जिंकतां येतो. गोत्रजस्त्रिया संतुष्ट राहिल्या म्हणजे अप्सरांच्या लोकांची प्राप्ति होते. जातीचें मन राखल्यानें विश्वेदेवांच्या लोकांत रहावयास मिळतें. आपल्या आप्तेष्टांचा संतोष ठेवला तर सर्व दिशांस सत्ता चालविण्यास सांपडते. आई व मामा संतुष्ट असतील तर पृथ्वीवर सत्ता चालवण्याचें सामर्थ्य येतें. म्हातारीं माणसें, लहान मुलें, रोगी व दीन पुरुष यांना संतुष्ट ठेविल्यास आकाश जिंकतां येतें. ज्येष्ठ भाऊ हा पित्यासमान होय. पत्नी व मुलगा हीं स्वतःच्या शरीरासारखींच होत. संपत्कालीं, विपत्कालीं कशाहि प्रसंगीं यांचें पोषण केलेंच पाहिजे. दासवर्ग हा स्वतःच्या छायेसारखा होय.

कन्या हा आपल्या कुटुंबांतील एक कृपण दीन प्राणी होय. तेव्हां संकटें सहन करावयास शिकलेल्या, धर्मशील, गृहस्थाश्रमाचें जाणून आचरण करणाऱ्यानें प्रसंगीं या लोकांच्याकडून आपला अधिक्षेप जरी झाला तरी तो न रागावतां सहन करावा. धर्मशील गृहस्थानें द्रव्यलोभानें कोणतींहि कर्में करूं नयेत. गृहस्थाश्रम्याला उपजीविकेचे जे तीन मार्ग सांगितलेले आहेत, त्यांपैकीं पुढचा पुढचा मार्ग मोक्षप्रद आहे. तसेंच ब्रह्मचर्यादि चारी आश्रमांमध्यें सुद्धां पुढचा पुढचा आश्रमच श्रेष्ठ होय. त्या त्या आश्रमाचा अवलंब करणाऱ्यानें शास्त्रांत त्या त्या आश्रमांचे नियम जे सांगितले आहेत ते सर्व पाळावे. कुंभधान्य, उंछशील व कापोती वृत्तीचा आश्रय करणारे पूज्य गृहस्थाश्रमी पुरुष ज्या राष्ट्रांत रहातात, त्याची नेहमींच भरभराट होते. कोणत्याहि प्रकारचें दुःख न मानतां, गृहस्थाच्या वृत्तींचा जो अवलंब करितो, त्याच्या हातून मागच्या दहा व पुढच्या दहा मिळून वीस व स्वतःची एकविसावी अशा एकवीस पिढ्यांचा उद्धार होतो. सार्वभौम राजांना मिळणाऱ्या गतीसारखी गति या गृहस्थाला मिळते. जितेंद्रियवृत्तीनें रहाणाऱ्यांची गति याला प्राप्त होते. उदारवृत्तीच्या गृहस्थाला, सुशोभित, विमानांनीं युक्त असलेला व वेदसंमत स्वर्गलोकच हितप्रद होतो. जितेंद्रियवृत्तीनें रहाणाऱ्या गृहस्थाला स्वर्गवासच प्राप्त व्हावा, असा ब्रह्मदेवाचा संकेत आहे व गृहस्थाश्रमाच्या आचरणानें स्वर्गप्राप्ति होते हें ठरलेलें असल्यामुळें, आयुष्याचा दुसरा चवथा भाग जो गृहस्थधर्माचें आचरण करण्यांत घालवितो, तो स्वर्गलोकीं मोठी प्रतिष्ठा पावतो.

याच्या पुढचा परम उदार आश्रम म्हणजे वनांत राहून व शरीर वाळवून, त्याचा त्याग करण्याच्या इच्छेनें परमार्थाकडे दृष्टि वळविणाऱ्या गृहस्थांनीं आचरावयाचा तिसरा सर्वश्रेष्ठ वानप्रस्थाश्रम होय. त्याचे धर्म मी तुला सांगतों, ऐक. १२. ३. २४३.

---

## अध्याय २४४ वा.

[ १ वानप्रस्थधर्मकथन. ]

( १ ) भीष्म—महात्म्या पुरुषांनीं गृहस्थाला इष्ट अशी जी वृत्ति शास्त्रांत सांगितली, ती मीं आतांपर्यंत सांगितली. आतां यापुढें व्यास शुकाला काय म्हणाले तें, हे युधिष्ठिरा, मीं तुला सांगतों, ऐक. 'पवित्र देशामध्यें वास करणाऱ्या, कोणतीहि गोष्ट विचारपूर्वक करणाऱ्या, सर्व देश हा आपला आश्रम आहे, असें मानणाऱ्या, गृहस्थाश्रमांतील नाना प्रकारच्या व्रतांनीं खिन्न झालेल्या व क्रमाक्रमानें गार्हस्थधर्माचा त्याग केलेल्या वानप्रस्थांच्या तृतीय वृत्तीचे नियम मी तुला सांगतों, ते ऐक,' असें म्हणून व्यास शुकाला म्हणतात.

व्यास—आपल्या शरीराला वृद्धपणामुळें सुरकुत्या पडल्या आहेत व आपल्या मुलाला मूल झालें आहे असें पाहिल्यानंतर गृहस्थानें वनाचाच आश्रय करावा. गृहस्थानें आयुष्याचा तिसरा–चौथा हिस्सा वानप्रस्थवृत्तीनें घालवावा. या वृत्तीचा आश्रय केल्यानंतर पूर्वीच्याच अग्नींची सेवा करून देवतांचें यजन करावें. वानप्रस्थानें नियमबद्ध असावें, आहार मोजका ठेवावा, सहाव्या मुहूर्तांवर भोजन करावें, हातून कोणताहि प्रमाद घडूं देऊं नये, गृहस्थाश्रमांतीलच अग्निहोत्र, गाई वगैरे यज्ञाचीं उपकरणें वानप्रस्थाश्रमांतहि ठेवावीं. वानप्रस्थाश्रमांतहि मनुष्यानें पंचमहायज्ञ करावे. नांगरट न केलेल्या जमिनींत यदृच्छया पिकलेले तांदूळ, जंव, नीवार, इत्यादिकांचा हविर्भाग या पंचमहायज्ञांचे वेळीं अग्नीला अर्पावा. वानप्रस्थाश्रमांतील वृत्तीचे सुद्धां चार प्रकार आहेत. कांहीं वानप्रस्थ एका वेळेला पुरेल एवढ्याच धान्याचा संचय करितात कांहीं एक महिन्यापुरता, कांहीं एक वर्षापुरता, तर कांहीं बारा वर्षांना पुरेल एवढा संग्रह करितात. अधिकाधिक संग्रह ठेवण्यामध्यें अतिथिसत्कार व यज्ञाचें आचरण हा त्यांचा उद्देश असतो. हे पावसाळ्यांत उघड्यावर रहातात, थंडीच्या दिवसांत पाण्याचा आश्रय करितात. उन्हाळ्यांत पंचाग्निसाधन करतात. यांचा

आहार नेहमींचाच मोजका असतो. हे कधीं भूमीवर तर भूमीवरच लोळतात, कधीं पायांच्या चवड्यावर तर चवड्यावरच उभे असतात, कधीं बसलेले तर बसलेलेच, कधीं उभे तर उभेच असतात. प्रातःसवन, माध्याह्नसवन व सायंसवन या तीन्ही सवनांचे वेळीं स्नान करितात. हे वानप्रस्थ कच्चेंच धान्य कधीं दांतांनीं चावून तर कधीं दगडांनीं कुटून खातात. यांच्यापैकीं कांहींजण शुद्धपक्षांत तर कांहीं वद्यपक्षांत एकदां शिजविलेली कण्हेरी खाऊन रहातात. कांहीं ज्या वेळेला जें मिळेल त्यावर निर्वाह करून रहातात. कांहींची उपजीविका मुळांवर, कांहींची फळांवर तर कांहींची फुलांवरहि चालते.

विद्वान् अशा वानप्रस्थाश्रमी पुरुषांचे हे व दुसरे अनेक उपजीविकेचे प्रकार आहेत. वैखानसवृत्तीचा आश्रय करणारे हे पुरुष यथान्याय या वृत्तींचा अवलंब करून रहातात. जितेंद्रियत्व, मनोनिग्रह वगैरे जे धर्म चतुर्थाश्रमाचे म्हणून उपनिषदांनीं सांगितले ते चारी आश्रमांनाहि सारखेच लागू आहेत. चतुर्थाश्रमाचे कांहीं धर्म मात्र गार्हस्थ्य व वानप्रस्थ याहून भिन्न आहेत. या युगांतच सर्व गोष्टींचें यथार्थ ज्ञान असणाऱ्या अनेक विप्रश्रेष्ठांनीं या धर्मांचें आचरण केलेलें आहे. अगस्ति, सप्त ऋषि, मधुच्छन्द, अघमर्षण, सांकृति, सुदिवा, तंडि, यथावास, अकृतश्रम, अहोवीर्य, काव्य, ताण्ड्य, महाप्राज्ञ, मेधातिथि, महासामर्थ्यवान् असा कर्णनिर्वाक व तपोनिष्ठ शून्यपाल इत्यादि ऋषींनीं या धर्मांचें आचरण केलें असून याच्यामुळेंच ते स्वर्गलोकाला गेले. वत्सा, धर्मांचें प्रत्यक्ष ज्ञान असलेल्या, धर्मांचें सूक्ष्म निरीक्षण करणाऱ्या तपोनिष्ठ ऋषींचे अनेक यायावर नांवाचे संघ या धर्मांचें आचरण करीत आलेले आहेत, व दुसऱ्याहि अनेक ब्राह्मणांनीं वनाचा आश्रय केला आहे. वैखानस, वालखिल्य व सैकत असे वानप्रस्थाश्रमी पुरुषांचे प्रकार आहेत. या तीन्ही प्रकारचे पुरुष कर्माचरणांतच परमानंदाचा लाभ होतो असें न मानतां जितेंद्रियवृत्तीनें नित्य धर्मनिष्ठ रहातात व धर्माचें प्रत्यक्ष ज्ञान असलेले हे ऋषि वनाचा आश्रय करून रहातात. हे पुरुष सामान्य नक्षत्रांहून भिन्न अशा ज्योतिर्गणांच्या रूपानें आकाशांत निर्भयवृत्तीनें वावरतांना दिसतात.

जरेनें व रोगांनीं शरीर ज्या वेळेला अत्यंत पीडा पावतें, त्या आयुष्याच्या शेष चतुर्थभागांत मनुष्यानें वानप्रस्थाश्रमाचा त्याग करावा. ज्यामध्यें सर्वस्वाचें दान करावें लागतें, अशी एक दिवसांत संपणारी इष्टि त्यानें करावी. आपल्या

पश्चात् आपलें श्राद्ध करणारा अधिकारी कोणी नसेल, तर जीवंतपणीं आपलें श्राद्ध आपणच करावें; मागें वासना ठेऊं नये. संन्याशानें आत्म्याच्याच ठिकाणीं संतुष्ट रहावें, आपलें क्रीडास्थान तेंच मानावें त्याचाच आश्रय करावा. एकाद्या वानप्रस्थाला एकदम इतकें तीव्र वैराग्य उत्पन्न झालें नसेल तर ब्रह्मयज्ञ, दर्शपूर्णमास, मित्रविन्द वगैरे इष्टि कराव्या. यज्ञकर्त्यांचें यज्ञकर्म पाहून स्वतःच्या आत्म्याच्या ठिकाणींच यज्ञ करण्याची बुद्धि होऊं लागेपर्यंत हीं कर्में करावीं. हृदयांत गार्हपत्य, मनामध्यें अन्वाहार्य व मुखामध्यें आहवनीय अशा तीन प्रकारच्या अग्निरूपांची सेवा स्वतःचे शरीराचे ठिकाणींच आमरण करीत रहावें. अन्नाची कोणत्याहि प्रकारें निंदा करूं नये व 'प्राणाय स्वाहा' इत्यादि मंत्र उच्चारून प्राणांना पांच किंवा सहा आहुति द्याव्या. अंगावरील लहानमोठे केस व नखें यांचें वपन करवून, कर्मांनीं पावन झालेला वानप्रस्थ मुनि एका आश्रमांतून दुसऱ्या पुण्यतर आश्रमांत ( संन्यासाश्रमांत ) जातो. जो ब्राह्मण सर्व भूतांना अभयदान देऊन प्रव्राजक बनतो—संन्यासधर्म स्वीकारतो—त्याला तेजस्वी लोक प्राप्त होतात व देहत्यागानंतर तो अनंत अशा ब्रह्मरूपीं लीन होतो.

आत्मज्ञानी पुरुषानें शील व वृत्त चांगलें ठेवावयास पाहिजे. त्याच्या मनांत कोणत्याहि प्रकारचें किल्मिष असूं नये. त्यानें कोणतेंहि कर्म इहलोकीं किंवा परलोकीं कांहीं विशिष्ट फळ मिळण्याच्या हेतूनें करूं नये. या पुरुषाच्या ठिकाणीं क्रोध व मोह यांचा अभाव असावा, यानें कोणाशींहि मैत्री किंवा शत्रुत्व करूं नये. याचें आचरण नेहमीं उदासीनासारखें असावें. इहलोकाची किंवा परलोकाची आशा न धरितां केवळ आत्मचिंतन करावें, असें संन्यासधर्मांच्या शास्त्रसूत्रांत सांगितलेलें आहे. त्याप्रमाणें अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य, अपरिग्रह हे यम, व शौच, संतोष, तप, स्वाध्याय व ईश्वरप्रणिधान हे नियम पाळतांना संन्याशानें कंटाळूं नये. शिखा, यज्ञोपवीत इत्यादिकांची ' भूः स्वाहा,' या मंत्रानें जलांत आहुति द्यावी. यमनियम निर्धारानें पाळणें व सर्व संकल्पाचा त्याग करणें या कर्मांत आपला पराक्रम संन्याशानें गाजवावा. सद्योमुक्ति, क्रममुक्ति किंवा चिरंजीवित्व या गतींपैकीं एक गति त्याच्या इच्छेप्रमाणें त्याला मिळते. आत्मज्ञानी, जितेंद्रिय व धर्मपर असा संन्याशी संशयरहित होतो. आतां यापुढें तीन्ही आश्रमांच्या वरचा जणूं कळस असा अतिशय श्रेष्ठ, सर्व गुणांनीं युक्त, तीन्ही आश्रमांपेक्षांहि अधिक श्रेष्ठ अशी शमदमादिक वृत्ति ज्यामध्यें अंगीकारावी लागते, असा चौथा

शेवटचा परमश्रेष्ठ असा संन्यासाश्रम मी तुला सांगणार आहें तो तूं ऐक. १२. १. २४४.

---

## अध्याय २४५ वा.

[ १ संन्यासधर्मकथन. ]

( १ ) शुक—भगवन्, वानप्रस्थाश्रमाप्रमाणें संन्यासधर्मांतहि आचरण ठेवणाऱ्या पुरुषानें परब्रह्माच्या पदाची प्राप्ति व्हावी, म्हणून आत्मयोग शक्त्यनुसार कसा साधावा, तें मला सांग.

व्यास—गार्हस्थ्य व वानप्रस्थ या आश्रमांतील धर्मांच्या आचरणानें बुद्धि शुद्ध करून घेतल्यानंतर परमार्थसाधनासाठीं पुरुषानें काय करावें, तें मी सांगतों तें एकचित्तानें ऐक. ब्रह्मचर्य, गार्हस्थ्य, वानप्रस्थ व संन्यास अशी ही चार आश्रमांची एक शिडी आहे. या शिडीच्या पहिल्या तीन पायऱ्यांवर क्रमाक्रमानें आरोहण करून स्वतःच्या अंगचे दोष नाहींसे करावे व सर्व आश्रमांत परमश्रेष्ठ असा जो संन्यासाश्रम त्याचे मार्गाला लागावें. त्या संन्यासधर्मांचें मी सांगतों, त्याप्रमाणें तूं मनन कर व तसा वाग.

परमपदाची प्राप्ति करून घेणाऱ्या पुरुषानें या धर्मांचें कोणाचेंहि साहाय्य न घेतां एकट्यानेंच आचरण करावें. जो आत्मनिष्ठ पुरुष एकटाच या धर्मांचें आचरण करितो, तो कोणालाहि सोडीत नाहीं व त्याला कोणीहि सोडीत नाहीं. संन्यासी पुरुषानें घर करूं नये, अग्निहोत्र ठेऊं नये, भिक्षेपुरताच केवळ गांवाचा आश्रय करावा, उद्यां काय हवें, त्याची आज चिंता करूं नये. संन्याशानें आपलें अंतःकरण नेहमीं शुद्ध ठेवावें. आहार हलका ठेवावा व तो मोजका असावा. हा हलका व मोजका आहारहि दिवसांतून एकच वेळ घ्यावा. पाणी पिण्यासाठीं कपाल बाळगणें, झाडांचा आसरा करून असणें, काषायवस्त्र परिधान करणें, एकाकी असणें व सर्व भूतांचे ठिकाणीं उपेक्षाबुद्धि धरणें हीं भिक्षूचीं लक्षणें होत. संत्रस्त झालेले हत्ती ज्याप्रमाणें एखाद्या विहिरींत प्रवेश करतात, त्याप्रमाणें दुसऱ्याचे शब्द ज्याच्या ठिकाणीं प्रवेश करतात—म्हणजे ज्याला दुसऱ्याच्या बोलण्यानें उद्वेग होत नाहीं आणि म्हणूनच जो दुसऱ्याला उद्वेग वाटेल असें भाषणहि करीत नाहीं, तो कैवल्यपदाला लायक ठरतो. अवाच्य गोष्टी कधीं

कोणाच्या ऐकूं नयेत व पाहूंहि नयेत. हा नियम ब्राह्मणांच्या संबंधांत विशेष रीतीनें पाळावा. मुमुक्षु पुरुषानें ब्राह्मणांना हितकारक असेल, तेंच नेहमीं बोलावें. कोणाचीहि निंदा करूं नये. समाधिस्थितींत 'मी हेंच विश्व' अशी भावना झाल्यामुळें ज्याच्या एकट्याच्याच अस्तित्वानें सर्व जग आकाशाप्रमाणें परिपूर्ण होऊन जातें, व लोकांनीं गजबजून गेलेलें स्थान देखील ज्याच्यामुळें—रूपादि गुणांचें भान नसल्यामुळें—शून्यसें होतें त्याला लोक ब्रह्मनिष्ठ पुरुष म्हणतात. मिळेल तें आच्छादन व मिळेल तें अन्न यांतच संतुष्ट रहाणारा व असेल त्या ठिकाणीं झोंप घेणारा असा जो पुरुष असतो, त्याला देव ब्राह्मण समजतात. सर्पाला पाहून भ्यावें त्याप्रमाणें जनसंमर्दाला जो भितो, नरक मानून खंती यावी, त्याप्रमाणें मिष्टान्नाची ज्याला खंत येते, प्रेताचा विटाळ मानून त्यापासून दूर सरावें, त्याप्रमाणें जो स्त्रियांपासून दूर रहातो, त्याला देव ब्रह्मनिष्ठ पुरुष म्हणतात.

आपला सन्मान झाला म्हणून ज्याला आनंद वाटत नाहीं व अपमान झाला म्हणून रागहि येत नाहीं, सर्व प्राणिमात्रांविषयीं ज्याच्या मनांत द्वेषभाव असत नाहीं व म्हणूनच ज्याचें कोणालाहि भय नसतें, त्याला देव ब्राह्मण समजतात. संन्याशानें मरण किंवा जीवन यांपैकीं कशाचीच इच्छा आपण होऊन धरूं नये. नोकर ज्याप्रमाणें यजमानाच्या आज्ञेची वाट पहात असतो, त्याप्रमाणें कालाची प्रतीक्षा करीत असावें. संन्याशाच्या चित्तांत अथवा वाणींत कोणताहि विकल्प किंवा दोष असूं नये. सर्व पापांपासून मुक्त झालेल्या निर्वैर संन्याशाला कशाचेंच भय नसतें. कोणत्याहि प्राण्यापासून संन्याशाला भय नाहीं, तसेंच, कोणत्याहि प्राण्याला संन्याशाचें भय नाहीं. मोहापासून मुक्त झालेला संन्याशी नेहमींच निर्भय असतो. पायांनीं चालणाऱ्या इतर सर्व प्राण्यांचीं पावलें हत्तीच्या पावलाखालीं जशीं झांकून जातात—हत्तीचें पाऊल इतर कोणत्याहि पादचारी प्राण्याच्या पावलापेक्षां जसें मोठें असतें—तसा अहिंसाधर्म हा सर्व धर्मांत श्रेष्ठ होय. यांत सर्व धर्मांचा अंतर्भाव होतो. ज्याच्या हातून हिंसा घडत नाहीं तो नित्य अमृतस्वरूपी होऊन रहातो. सर्वांभूतीं ज्याची समदृष्टि आहे, जो कधींहि हिंसा करीत नाहीं, ज्याची वृत्ति नेहमीं धैर्यशील, वाणी सत्यपूत असते, जो इंद्रियांच्या वृत्तींचें दमन करितो, हा आपला आसरा आहे असें ज्याच्याबद्दल प्राणिमात्रांना वाटतें, अशा पुरुषाला उत्तम गति प्राप्त होते. ज्ञानानंदाचें समाधान ज्याला लाभलें अशा निर्भय, निर्लोभ मनुष्याचें मृत्यु कधींच अतिक्रमण करीत नाहीं. उलट, हा पुरुषच मृत्यूला जिंकतो. आकाशाला ज्या-

प्रमाणें कोणत्याहि वस्तूचा लेप लागूं शकत नाहीं त्याप्रमाणें ज्याला कसलाहि लेप नसतो, ज्याला स्वतःचें म्हणून कांहींच नसतें, असा जो एकाकी शांत मुनि त्याला देव ब्राह्मण समजतात. ज्याचें जीवन धर्माकरितां, धर्म परोपकाराकरितां व ज्याचीं अहोरात्रें पुण्यसंचयासाठीं असतात, त्याला देव ब्राह्मण समजतात. निर्लोभ, सर्व कर्मांचा त्याग करणारा, नमस्कार व स्तुति यांचा आनंद न मानणारा, सर्व बंधनांपासून मुक्त झालेला असा जो, त्याला देव ब्राह्मण समजतात.

सर्व प्राणिमात्र सुखाच्या ठिकाणीं आसक्त असतात. तसेंच, दुःखापासून त्यांना अत्यंत त्रास होतो. कर्मांपासून प्राणिमात्रांना भय उत्पन्न होतें हें जाणून त्यांच्या भयानें खिन्न झालेल्या श्रद्धाळु पुरुषानें कर्मे करण्याचें टाकून द्यावें. सर्व जीवांना अभयदानाची दक्षिणा देतां येणें हें सर्वांत श्रेष्ठ असें दान आहे. जो आपल्या कठोर तनूचा प्रथम त्याग करतो त्याला सर्व जीवांकडून अभय मिळतें व तो अनंत स्वरूपीं लीन होतो. वानप्रस्थाश्रमी पुरुषाप्रमाणें संन्यासी हा तोंड उघडून 'प्राणाय स्वाहा' इत्यादि मंत्रांनीं आहुति टाकीत नाहीं तर इंद्रियें, मन इत्यादिकांचेंच हवन तो आत्म्याच्या ठिकाणीं करतो. चराचर भूतांच्या नाभिप्रदेशाच्या ठिकाणीं वैश्वानरस्वरूप आत्म्याचें ठिकाण आहे. मस्तकापासून हनुवटीपर्यंतचे भूतमात्राचे जे अवयव ते वैश्वानराचेच अवयव होत, असें श्रुति सांगते. नाभीपासून ते हृत्प्रांतापर्यंतच्या प्रदेशांत किंवा मस्तकापासून ते हनुवटीपर्यंतच्या प्रदेशांत अशा दोन्ही ठिकाणीं वैश्वानर आत्म्याचें स्वरूप आहे, असें समजून त्या त्या ठिकाणीं त्याची उपासना करावी. त्यानें केलेलें किंवा न केलेलें कर्म हेंहि वैश्वानररूपच आहे. हें सर्व जग वैश्वानररूप आहे असें ज्ञान संन्याशानें प्राप्त करून घ्यावें. नाभीपासून हृदयापर्यंतचा जो प्रादेशमात्र भाग त्या भागाच्या ठिकाणीं प्रकट झालेलें जें परमात्मतेज त्यामध्यें हा संन्यासी सर्व प्राणांची आहुति देतो.

इंद्रियार्थांचें मनोजयरूप अग्नींत हवन करणें व प्राणांचा प्राणांच्याच ठिकाणीं होम करणें हा संन्याशाचा यज्ञ होय. संन्याशानें स्वतःचे ठिकाणीं केलेलें हें जें प्राणाग्निहोत्र आहे, त्याचे योगानें देवलोकासह सर्व लोक तृप्त होतात. कारण, हा त्रैलोक्यरूपच असल्यामुळें याची तृप्ति म्हणजे त्रैलोक्याचीच तृप्ति होय. जे सर्वत्र प्रकाशमान होणाऱ्या; तेज, आप, अन्न या त्रिधातूंनीं युक्त असलेल्या, सत्व, रज, तम या तीन गुणांनीं वेढलेल्या, अशा सुपर्ण परमेश्वराचें ज्ञान करून घेतात

व तोच एक सर्वत्र भरला आहे, अशी त्याची सर्वश्रेष्ठ परमात्मता ओळखतात, ते सर्व लोकांत प्रतिष्ठा पावतात. देव व मनुष्यें सुद्धां यांच्या पुण्याईचें संकीर्तन करितात. वेद, यज्ञयागांचें तंत्र सांगणारें कर्मकांड, शब्दांनींच करून घेतां येण्यासारखें सर्व ज्ञान, आत्म्याचें सत्यस्वरूप हीं सर्व या शरीरात्म्याचे ठिकाणीं आहेत असें ज्ञान ज्याला होतें तोच देवांना आवडतो. सूर्याचें अस्तित्व ज्याप्रमाणें त्याच्या किरणांमुळें प्रत्ययास येतें, तसेंच ज्याचें अस्तित्व इंद्रियादिकांमुळें प्रत्ययास येतें, अशा पुरुषाचें—आकाशांत काय किंवा पृथ्वीवर काय कोठेंच अवसक्त नसलेल्या; सर्वत्रच भरून राहिल्यामुळें ज्याच्या रूपाला मोजमाप नाहीं अशा; ब्रह्मांडांतून आविर्भूत होऊन ह्या पुंडरीकामध्यें—अंतःकरणाच्या गाभ्यांत—स्थित असलेल्या; मोद व प्रमोद हेच ज्याचे पंख अशा हंसस्वरूप परमात्म्याचें—स्वरूप जे यथार्थ रीतीनें जाणतात, त्यांच्या पुण्याईचा महिमा देवलोकींहि गाइला जातो.

सहा ऋतु हे ज्याच्या नाभिस्थानीं आहेत, बारा महिने ह्या आरा आहेत, ज्यांत चांगलीं चांगलीं दर्श संक्रांतिसारखीं पर्वें आहेत, असें हें नित्य फिरणारें, स्वतः कधीं क्षीण न होतां मनुष्याच्या आयुष्याचा ऱ्हास करणारें कालचक्र आहे. याचें स्वरूप गूढ असून सर्व विश्वाची आहुति याच्याच मुखांत पडत असते. मोहव्याप्त करून सोडणारें जें तामस अज्ञान, तेंच जगताचें शरीर—मूलकारण—होय. हें सर्व लोकांना व्यापून राहतें. याच्या ठिकाणीं असणाऱ्या प्राणादि देवांचा हा संतोष करितो. प्राणादि देवता तृप्त झाल्या म्हणजे त्याहि या जीवाचा संतोष करितात. जो तेजोमय, नित्य, अशा पुराणपुरुषाचें ध्यान करून तद्रूप बनलेला असतो व त्याच्यापासून कोणत्याहि प्राण्याला अगर कोणत्याहि प्राण्यापासून ज्याला कधींहि त्रास होत नाहीं, अशा पुरुषाला अनंत व निर्भय अशा लोकांची प्राप्ति होते. ज्याची कोणी निंदा करीत नाहीं व जो स्वतःहि कोणाची निंदा करीत नाहीं, तो परमात्मस्वरूपाचें निरीक्षण करण्यास लायक समजावा. ज्याचें अज्ञान नष्ट झालेलें आहे, संकल्पविकल्प सुटून जो देहातीत झाला आहे, त्याला भोग्य लोकांची प्राप्ति होत नाहीं, मोक्षासाठीं त्याला इहलोकीं किंवा परलोकीं कोठेंहि जावें लागत नाहीं. ज्याच्या ठिकाणचे क्रोध-मोहादि विकार संपले, मातीचें ढेंकूळ व सुवर्ण हीं दोन्ही ज्याच्या दृष्टीनें समान आहेत; अन्न, प्राण, वासना इत्यादि कोशांचा ज्यानें त्याग केला आहे; मैत्री किंवा शत्रुत्व हीं दोन्हीहि ज्याचेजवळ नाहींत; निंदा, स्तुति या दोन्ही ज्याच्यापासून दूर

पळतात व ज्याला कसलीहि आवड किंवा नावड नाहीं असा उदासीनवृत्तीनें हिंड-णारा जो पुरुष तो भिक्षु या संज्ञेला—संन्यासी संज्ञेला—पात्र होतो. १२. ३, २४५.

---

## अध्याय २४६ वा.

[ १ व्यासकृत अध्यात्मकथन. ]

( १ ) व्यास—हे शुका, मुळांत कर्तृत्व व भोक्तृत्व त्यांनीं रहित असलेल्या क्षेत्रज्ञ आत्म्याला प्रकृतीच्या नानाविध विकारांनीं कर्ता व भोक्ता बनविलें आहे. प्रकृति-विकारांना याची ओळख नाहीं. पण, याला मात्र त्यांची जाणीव पूर्ण आहे. एखादा सारथि ज्याप्रमाणें पूर्णपणें नियंत्रित अशा बळकट अश्वश्रेष्ठांकडून आपलें कार्य करून घेतो, त्याप्रमाणें हा क्षेत्रज्ञ आत्मा पांच इंद्रियें व सहावें मन यांच्या द्वारें कर्में करीत असतो. इंद्रियांनीं घ्यावयाचे विषयोपभोग हे इंद्रियांच्या पलीकडचे होत. मन हें या विषयोपभोगांच्या पलीकडील व बुद्धि ही मनाच्याहि पलीकडील होय. महत्स्वरूप परमात्मा बुद्धीच्याहि परता आहे. महत्तत्वापेक्षां अव्यक्त तत्त्व अधिक व्यापक व अव्यक्तापेक्षांहि अमृतत्व अधिक व्यापक होय. अमृतत्व हें सर्वव्यापक असल्यानें त्याच्यापरतें कांहीं नाहीं. म्हणून अमृतत्व हीच पराकाष्ठा—परागति—होय.

अशाप्रकारें हें आत्मस्वरूप भूतमात्रांच्या ठायीं असूनहि प्रकट दिसत नाहीं. ब्रह्मज्ञानी योगी पुरुषांनीं आपल्या तीक्ष्ण व कुशाग्र बुद्धीनें हें अनुमानावयाचें आहे. विषयोपभोगांचा इंद्रियांचे ठिकाणीं व इंद्रियांचा मनासह अंतरात्म्याच्या ठिकाणीं बुद्धिबलाच्या जोरावर जो लय करतो; ध्येय, ध्याता व ध्यान या त्रिपुटीचा तसेंच विद्यासंपन्नतेनें पवित्र झालेल्या मनाचाहि उपशम करून ईश्वरत्वाची जाणीवहि ज्याला नाहींशी करतां येते, असा शांतचित्त पुरुष परम-पदाला पोंचतो. उलटपक्षीं ज्याचें चित्त चंचल आहे, जो इंद्रियांच्या पूर्ण आधीन झालेला, असा मनुष्य विषयोपभोगाच्या खाईंत आपलें सर्वस्व अर्पण करितो व मृत्युवश होतो. म्हणून पुरुषानें सर्वसंकल्प मारून टाकावे व चित्ताचा लय सत्त्वगुणाचे ठिकाणीं करावा. चित्ताला सत्त्वाचे ठिकाणीं विलीन केल्यावर मनुष्याला कालावर विजय मिळवितां येतो. चित्ताची प्रसन्नता साधली म्हणजे शुभ व अशुभ या दोहोंचाहि त्याग करावयास योगी समर्थ

होतो व प्रसन्नचित्तानें स्वातंत्र्याच्याच ठिकाणीं रममाण होणाऱ्या या योग्याला आत्यंतिक सुख प्राप्त होतें. गाढ स्वप्नरहित झोंपेंतल्या आत्म्याप्रमाणें बाह्यज्ञान-शून्य होणें किंवा निवांत स्थळीं लाविलेल्या दिव्याप्रमाणें निष्कंप व निश्चल अशी मनाची स्थिति होणें, हाच चित्ताचा प्रसाद होय. अशाप्रकारें दिवसाच्या पूर्वभागांत व उत्तरभागांत आपल्याच ठिकाणीं आपलाच लय करणारा, हलका आहार करणारा, शुद्धात्मा योगी स्वतःच्या ठिकाणींच आत्मरूप प्रकाशित झालेलें पहातो.

हे पुत्रा, केवळ परंपरागत अनुमानावर किंवा वेदांच्या शब्दप्रामाण्यावर अव-लंबून न रहातां ज्याचा प्रत्यय स्वानुभवाच्या प्रत्यक्ष प्रमाणांनीं घेतां येतो, असें सर्व वेदांचें रहस्य सांठविलेलें हें शास्त्र आहे. धर्माचें व सत्याचें व्याख्यान करणारे जे जे ग्रंथ आहेत, त्या सर्वांचें रहस्य या अनुशासनांत आहे. हें अमृतरूपी शास्त्र दहाहजार ऋग्वेदऋचांचें मंथन करून काढलेलें आहे. दह्यीं घुसळून त्यांतून जसें लोणी काढतात, काष्ठावर काष्ठ घांसून त्यांतून जसा अग्नि काढतात, तसेंच हे पुत्रा, विद्वान् लोकांसाठीं हें शास्त्र ऋग्वेदाच्या दहा हजार ऋचांचें मंथन करून काढलें आहे. बा शुका, हें अनुशासन फक्त स्नातकांनाच सांगावें. ज्यानें शमदमादि साधनांचा अवलंब केलेला नाहीं व जो तपस्वी नाहीं अशा पुरुषाला; ज्यानें वेदाध्ययन केलेलें नाहीं, जो आपल्या अनुरोधानें वागणारा नाहीं, कुटिल मार्गानें जो जातो, ज्याचा मत्सर संपला नाहीं व जो सांगितलेलें काम करीत नाहीं, ज्याची बुद्धि तर्कशास्त्रामुळें वितंडवाद घालण्यांत प्रवीण झाली आहे व जो स्वभावानें दुष्ट आहे, अशा पुरुषाला हें शास्त्र सांगूं नये. दुसऱ्याचे गुण घेणाऱ्या किंवा ज्याच्याजवळ दुसऱ्यांनीं घेण्यासारखें कांहीं आहे अशा प्रशांत व तपस्वी वृत्तीच्या प्रिय पुत्राला किंवा आपल्या अनुरोधानें वागणाऱ्या शिष्याला हें धर्म-रहस्य पढवावें; दुसऱ्या कोणालाहि कदापिहि सांगूं नये. एखाद्या नालायक मनुष्यानें या ज्ञानाच्या मोबदल्यांत रत्नांनीं परिपूर्ण अशी पृथ्वी जरी देऊं केली तरी तत्त्ववेत्या माणसानें या ज्ञानाची किंमत रत्नपूर्ण पृथ्वीपेक्षांहि अधिक मानावी. म्हणून वेदांतांत सांगितलेलें, अत्यंत गूढ असा अर्थ ज्यांत भरलेला आहे असें, मानवीबुद्धि ज्याचें आकलन करूं शकत नाहीं असलें व ज्याचे द्रष्टे मोठमोठाले ऋषि आहेत, असें हें अध्यात्मशास्त्र तूं विचारल्यावरून मीं तुला सांगितलें आहे. तुझ्या मनांत आणखी जें कांहीं विचारावयाचें असेल किंवा तुला

सांगितलेल्या विषयांतच ज्या कांहीं तुझ्या शंका असतील त्या हे पुत्रा, मला विचार. हा मी तुझ्यापुढें आहें. तुला आणखी काय सांगूं तें सांग. १२. ३. २४६.

---

## अध्याय २४७ वा.

[ १ विस्तरतः अध्यात्मकथन. ]

( १ ) **शुक**—हे भगवान् ऋषिसत्तमा, आतांपर्यंत आपण केलेलें अध्यात्मविवेचन पुनः एकवार विस्तारानें मला सांग.

**व्यास**—हे पुत्रा, पुरुषाचें म्हणून जें हें अध्यात्म सांगितलेलें आहे तें मी तुला सांगतों त्याचें व्याख्यान ऐक. सागराच्या पृष्ठभागावर लाटा जशा प्रकट होतात व पृथक् दिसतात तशीं हीं पंचमहाभूतें-पृथ्वी, आप, तेज, वायु व आकाश-प्राणिमात्रांचे ठिकाणीं पृथक् पृथक् दिसतात. कांसव ज्याप्रमाणें आपले हातपाय बाहेर काढून पुनः आंगाखालीं झांकून घेतें, त्याप्रमाणें प्रकट दिसणारीं महाभूतें भूतसूक्ष्मांत लय पावतात, म्हणून हें सर्व चराचर जग पंचमहाभूतांचेंच बनलेलें आहे. या चराचर विश्वाची उत्पत्ति व प्रलय पंचमहाभूतांपासून व पंचमहाभूतांतच आहेत. भूतात्मा भूतकृत् परमेश्वर ज्याच्या त्याच्या अंतकालींच्या वासनेप्रमाणें प्राणिमात्राचे ठिकाणीं त्या भूतांचें स्वरूप वेगवेगळें दाखवितो; वस्तुतः, सर्व प्राण्यांचे ठिकाणीं महाभूतें हीं पांचच असतात.

**शुक**—हे तात, प्राणिमात्रांचें हें जें स्वरूप परमेश्वरानें शरीरांचे ठिकाणीं निर्माण केलें आहे तें कसें ओळखावयाचें? त्यांत कांहीं इंद्रियें म्हणून सांगतात व कांहीं गुण म्हणून सांगतात. तेव्हां हें कसें ओळखावयाचें तें मला सांगा.

**व्यास**—या सगळ्या गोष्टी पूर्वींपासून जशा सांगितलेल्या आहेत तशा मीं तुला सांगतों. कोणतें इंद्रिय व कोणता गुण कसा आहे व तो कां आहे हें मीं तुला सांगतों. तें तूं सावधानपणानें ऐक. शब्द, कर्णेंद्रिय व शरीरांतील इतर पोकळ भाग हीं तीन आकाशतत्वापासून झालेलीं आहेत. प्राण, शरीरांतील हालचाल व स्पर्श हे प्रकार वायूचे होत. रूप, चक्षुरिंद्रिय, व पचनक्रिया हीं तेजापासून उत्पन्न होतात. रस, जीभ व द्रवरूपता हे पाण्याचे गुण आहेत. व वास घेण्याचे घ्रेय पदार्थ, घ्राणेंद्रिय व शरीरांतील कठिण भाग हे भूमीचे गुण होत. अशाप्रकारानें पंचमहाभूतांनीं बनलेल्या देहांतील निरनिराळ्या इंद्रियांचे ठिकाणीं तीं तीं भूतें असतात. वायूचा गुण स्पर्श, पाण्याचा गुण रस, तेजाचा गुण रूप,

आकाशाचा शब्द, व गंध हा भूमीचा गुण होय. मन, बुद्धि व अहंकार हीं तीन्ही भूतसूक्ष्मांतूनच उत्पन्न होतात. शब्दस्पर्शादि गुणांहून भिन्न असलेलीं, पण त्या गुणांचेंच ग्रहण करणारीं जीं श्रवण, त्वचादि इंद्रियें त्यांचेंच रूप मन, बुद्धि व अहंकार हीं धारण करतात, त्यामुळें शब्दस्पर्शादि गुणांना सोडून ही त्रयी नसते. चक्षुरादि इंद्रियें, व मन, बुद्धि आणि अहंकार ही त्रयी यांच्यांत फरक एवढाच कीं चक्षुरादि इंद्रियांपैकीं एकेकाला एकेकच गुण ग्रहण करतां येतो व मनादि त्रयींपैकीं एकेकाला पांची गुणांचें ग्रहण करतां येतें. कांसव ज्याप्रमाणें आपले हातपाय बाहेर पसरून फिरून आंत ओढून घेतें, त्याप्रमाणें बुद्धि ही इंद्रियांना उत्पन्न करते व त्यांचा लयहि आपल्याच ठिकाणीं करून घेते. पायाच्या तळव्यापासून वर मस्तकापर्यंत व मस्तकापासून खालीं पायापर्यंत 'हा मीं' असें जें ज्ञान आपल्याला होतें तें बुद्धीच्यामुळेंच होय. शब्दस्पर्शादि गुण व त्याचीं ग्राहक अशीं श्रवणत्वचादि इंद्रियें हीं बुद्धीचींच स्वरूपें आहेत. बुद्धि नसेल तर पंचेंद्रियें व सहावें मन आणि शब्दादि गुण यांचेंहि अस्तित्व शक्य नाहीं; अर्थात्, मनासकट सहा असलेलीं इंद्रियें व गुण हीं बुद्धीचींच उत्कट रूपें होत. मनुष्याचे ठिकाणीं पंचेंद्रियें, सहावें मन, सातवी बुद्धि व आठवा क्षेत्रज्ञ जीव हे असतात. कोणत्याहि पदार्थाच्या स्वरूपाविषयीं मनांत संशय उत्पन्न झाला तरच आपण तो पदार्थ डोळ्यांनीं निरखून पहातों. निरखून पहाण्याकडे प्रवृत्ति होण्याला मनाचा संशय हेंच कारण असल्यानें पहाणें या क्रियेचेंहि तें कारण आहे. संशय- निरसन करून पदार्थाचें स्वरूप निश्चित करणें हें बुद्धिकार्य. तेव्हां स्वरूप पहाणें व निश्चित करणें हीं मन व बुद्धि यांचीं कार्यें आहेत. या दर्शनामुळें व अध्यवसायामुळें जें ज्ञान होतें त्याचा साक्षी क्षेत्रज्ञ जीव हा होय व तो यांच्याहून भिन्न आहे. रज, सत्त्व व तम यांचा उद्भव चित्तापासून होतो. हे गुण सर्व प्राणिमात्रांत सारखे आहेत. या गुणांचे बाह्य परिणाम जे आपल्या दृष्टोत्पत्तीस येतात, त्यांजवरूनच यांचें स्वरूप ओळखावयाचें असतें. आपल्या स्वतःच्या ठिकाणीं जें कांहीं आनंददायक, शांत व शुद्ध असें सांपडेल तें सर्व सत्त्व होय. मनांत काय किंवा शरीराचे ठिकाणीं काय संताप उत्पन्न व्हावयास सुरवात झाली म्हणजे रजोगुणाचा प्रादुर्भाव होऊं लागला असें समजावें. मोहानें युक्त असणें, आपण काय करितों हें आपलें आपल्यालाच न समजणें, कोणत्याहि गोष्टींचें ज्ञान निश्चित स्वरूपानें न होणें किंवा कोणताहि तर्क बांधतां न येणें हीं तमोगुणाचीं लक्षणें होत. उत्कट आनंद, प्रेम, चित्ताचा समतोलपणा व

स्वस्थता हीं लक्षणें सत्त्वगुणांचीं आहेत; मग तीं सहेतुक असोत वा निर्हेतुक असोत. सकारण काय किंवा निष्कारण काय, अभिमान, खोटें बोलणें, लोभ, मोह व सूडाची बुद्धि या गोष्टींचा प्रादुर्भाव जेथें होतो तेथें रजोगुणाची प्रवृत्ति होते. रजोगुण या लक्षणांनीं ओळखावयाचा आहे. उगीचच्या उगीच किंवा कांहीं कारणानें मोह, सहनशीलता, निद्रा, तंद्रा, बेसावधपणा इत्यादि लक्षणें जेथें दिसतात तेथें तमोगुण जाणावा. १२. ३. २४७.

---

## अध्याय २४८ वा.

[ १ मन, बुद्धि व अहंकार यांचें स्वरूप. ]

( १ ) व्यास—मन हें संकल्पमात्रानें पदार्थ उत्पन्न करितें. बुद्धि त्या त्या पदार्थांचें स्वरूप निश्चित करते व श्रमल्यामुळें—म्हणजेच अहंकारामुळें—अंतःकरणांत वस्तुजाताविषयीं अनुकूल किंवा प्रतिकूल भावना उत्पन्न होते. उत्पत्ति, स्वरूप-ज्ञान व संवेदना असे हे कर्माचे तीन प्रकार होत. इंद्रियग्राह्य विषय हे इंद्रियां-हून सूक्ष्म स्वरूपाचे, मन हें या विषयांहूनहि सूक्ष्म स्वरूपाचें, बुद्धि मनापेक्षां सूक्ष्मस्वरूपाची व आत्मा हा बुद्धीपेक्षांहि सूक्ष्म स्वरूपाचा म्हणून अत्यंत सूक्ष्म होय. मनुष्याच्या शरीरांतील जीवरूप आत्मा हीच बुद्धि. ही बुद्धि ज्यावेळेस आपणच आपल्याच ठिकाणीं विविध पदार्थ निर्माण करते तेव्हां बुद्धि हीच मन होते.

निरनिराळ्या इंद्रियांचे ग्राह्यविषय निरनिराळे असल्यानें त्या त्या विषयांचें ग्रहण करतांना बुद्धीहि तीं तीं रूपें धारण करते. ऐकण्याची वेळ असली म्हणजे बुद्धि हीच श्रोत्रेंद्रिय होते, स्पर्शनाचे वेळीं तीच त्वगिंद्रिय होते, पहावयाचें असलें म्हणजे तिचेंच दृष्टींत रूपांतर होतें. कोणत्याहि पदार्थाची चव घ्यावयाची असली म्हणजे ही बुद्धीच रसनेचें रूप घेते; वास घ्यावयाचा असेल तर तिलाच घ्राणेंद्रियाचें रूप येतें. अशाप्रकारानें बुद्धी-चेच अनेक पृथक् प्रकार होतात. या विकारांनाच इंद्रियें म्हणतात व अदृश्य स्वरूप जो साक्षी क्षेत्रज्ञ तो या इंद्रियांचे ठिकाणीं अधिष्ठित असतो. पुरुषाचे ठिकाणीं दिसणारें हें बुद्धिस्वरूप सात्त्विक राजस व तामस अशा तीन्ही प्रकारचें आहे. या बुद्धीला कधीं सुख होतें तर कधीं दुःख होतें. केव्हां केव्हां,

सुख आणि दुःख या दोहोंचाहि संसर्ग तिला घडत नाहीं. अशी ही त्रिगुणात्मिका बुद्धि स्वतः त्रिगुणांतूनच उत्पन्न होऊन त्यांना जिंकूं शकते. नद्यांच्या पाण्यावरच पुष्ट होणारा व प्रचंड लाटांनीं युक्त असा महासागर नद्यांतूनच निर्माण होऊन त्यांचेच वेग जसा आवरून धरतो–थोपवितो–तशीच त्रिगुणात्मक बुद्धीहि त्याच तीन्ही गुणांना जिंकते. बुद्धीला ज्यावेळेस एखादी गोष्ट हवीशी वाटते त्यावेळीं ती मनाचें रूप घेते. सारांश, निरनिराळीं इंद्रियें हीं बुद्धीचींच अधिष्ठानें असल्यानें तिचींच तीं विविध रूपें होत. तपश्चर्येच्या अग्नीमध्यें या इंद्रियांचा होम करून त्यांना सर्वतोपरि आपल्या कह्यांत आणलें पाहिजे. एक झाल्यावर दुसरें, दुसऱ्यानंतर तिसरें अशा क्रमानें ही निर्विकल्पक स्वरूपाची विभागशून्य बुद्धि ज्या वेळेला ज्या इंद्रियाचें रूप घेते त्या वेळेस त्या संकल्पात्मक विषयाचें ज्ञान घडतें. पदार्थाचें प्रत्यक्ष ज्ञान होण्यास आत्म्यानें बुद्धीला ( मनाला ) प्रेरणा करणें, बुद्धीचा ( मनाचा ) इंद्रियांशीं संयोग घडणें व इंद्रियांचा अर्थाशीं संयोग घडणें, इतक्या प्रक्रियेंतून जावें लागतें. सात्विक, राजस व तामस असे तीन प्रकारचे जे भाव जगांत दिसतात ते सर्व मन, बुद्धि व अहंकार यांच्या ठिकाणींच स्थित असतात. रथाच्या धावेशीं संलग्न असलेल्या अरा जशा त्या धावेच्या अनुरोधानें खालीं वर होतात तद्वत् हे सात्विकादि भाव मन, बुद्धि व अहंकार यांच्या अनुरोधानें चालतात. स्वरूपतः उदासीन परंतु त्या त्या विषयांशीं संबंध येतांच ती ती वृत्ति स्वैरपणानें धारण करणारीं जीं हीं इंद्रियें त्यांच्या वृत्तीचा मन निरोध करितें. दीपाच्या योगानें ज्याप्रमाणें अंधकार नाहींसा होतो तद्वत् हा मनोदीप विषयांना व्यापून असलेला अज्ञानांधःकार नाहींसा करितो.

याप्रमाणें, जगांतील सर्व व्यवहार, सर्व विषय, सत्वादि गुण हे सगळे बुद्धीचे खेळ आहेत, हीं सर्व बुद्धीचींच निरनिराळीं रूपें आहेत, असें ज्ञान ज्या पुरुषाला झालें तो कधींहि मोह पावत नाहीं. त्याला शोक, आनंद व मत्सर यांपैकीं कशाचीच बाधा केव्हांहि होत नाहीं.

हे शुका, ज्यांनीं कधीं तपश्चर्या केलेली नाहीं, व संसाराच्या यातायातींत गुंतविणारीं राजस कर्मेंच जे करीत राहतात त्यांना विषयांत नेहमीं लोळणाऱ्या व कधींहि स्वस्थ न राहणाऱ्या इंद्रियांच्या द्वारें आत्मस्वरूपाचें दर्शन घडणें शक्य नाहीं; मग, तीं इंद्रियें कितीहि निर्दोष असोत. मनाच्या साहाय्यानें इंद्रियांच्या वृत्तीचे लगाम खेंचून जे पुरुष त्यांना वश करतात अशा पुरुषांनाच देदीप्यमान

आत्मस्वरूप दृग्गोचर होतें. अंधारांत असलेली आकृति ज्याप्रमाणें तिच्यावर दिव्याचा प्रकाश पाडतांच स्वच्छ दिसूं लागते त्याप्रमाणें इंद्रियनिग्रह करून ज्ञानदीप पाजळला म्हणजे अज्ञानांधःकार नाहींसा होऊन आत्मस्वरूप स्वच्छ दिसूं लागतें. रात्र संपून स्वच्छ सूर्यप्रकाश पडला म्हणजे प्राणिमात्रांना वस्तुजात जसें स्पष्ट दिसतें तसेंच हें आहे. जलचर पक्षी पाण्यांत हिंडत असतांहि त्याला जसा पाण्याचा लेप लागत नाहीं त्याप्रमाणें मुक्तात्म्या योग्याला त्रिगुणांच्या दोषांची बाधा होत नाहीं. अशा प्रकारें ज्याची बुद्धि सुसंस्कृत झालेली आहे असा पुरुष विषयांत वावरत असला तरी त्याला तज्जन्य दोषांचा संसर्ग बाधूं शकत नाहीं; कारण, तो विषयांत वावरून विषयांपासून अलिप्त असतो. पूर्वी केलेल्या कर्मांचा त्याग करून जो सदा आत्मनिष्ठ असतो, सर्व प्राणिमात्र आपल्याचसारखे आहेत ही भावना दृढ झाल्यामुळें जो तद्रूप झालेला असतो. गुणांच्या ठिकाणीं किंवा विषयांच्या ठिकाणीं ज्याची काडीचीहि आसक्ति नसते अशी पुरुषाची बुद्धि एकादे वेळेस विषयांकडे धांवते यावरून शरीरपरिच्छिन्न जीवात्मा—कीं ज्याला वर बुद्धि म्हणून म्हटलें तो व क्षेत्रज्ञ परमात्मा हे दोघेहि अत्यंत सुसूक्ष्म असले तरी ते परस्पराहून भिन्न आहेत असेंच निष्पन्न होतें. विषयांस आत्मस्वरूपाचें ज्ञान नाहीं; पण, आत्म्याला मात्र विषयांचें पूर्ण ज्ञान असतें. आत्मा विषयांचें स्वरूप पूर्णपणानें आकलन करतो इतकेंच नव्हे तर तो त्यांचा उत्पत्तिकर्ताहि आहे. बुद्धि व क्षेत्रज्ञ परमात्मा यांमधील भेद हा असा आहे; तो हे शुका, तूं यथार्थपणानें समजून घे. बुद्धि—जीवात्मा—व क्षेत्रज्ञ परमात्मा हे स्वभावतः एकमेकांपासून भिन्न असले तरी एकाचें ज्ञान दुसऱ्याच्या ज्ञानावर अवलंबून असल्यानें ते एकमेकांशीं एका अर्थानें संलग्नहि आहेत. मासे व पाणी हे परस्परांहून भिन्न असूनहि जसे एकमेकांशीं संलग्न असतात; उंबराचें फळ व त्याच्यांतील किडे हीं जशीं निरनिराळीं असूनहि एकत्र राहतात; मुंज नांवाच्या गवताची काडी व त्यांतून निघणारा अंकूर हीं जशीं भिन्नहि आहेत, व एकहि आहेत तसेच जीवात्मा व क्षेत्रज्ञ परमात्मा हे एकहि आहेत व भिन्नहि आहेत, व परस्परांवर अधिष्ठित झालेले आहेत. १२. ३. २४८.

## अध्याय २४९ वा.

[ १ जीवात्म्याचें गुणस्रष्टृत्व व क्षेत्रज्ञाचें उदासीनत्व. २ [illegible] पुरुषाला ब्रह्मा-ची प्राप्ति. ]

(१) **व्यासः**—बुद्धि गुणांना उत्पन्न करते व क्षेत्रज्ञ ईश्वर हा लोहचुंबक ज्याप्रमाणें लोखंडाच्या तुकड्यांचें स्वतः त्यांच्यापासून अलिप्त राहूनहि नियंत्रण करितो त्याप्रमाणें गुणविकारांपासून अलिप्त राहून—त्यांच्याविषयीं उदासीन असून—त्यांचें नियंत्रण करतो. बुद्धि ही जी हे गुण निर्माण करते ते आपल्या स्वतःमधूनच होय. गुणांचें निमित्तकारणहि बुद्धि व उपादानकारणहि बुद्धीच. कोळी ज्याप्रमाणें आपल्यामधूनच तंतुजाल निर्माण करतो तशीच बुद्धि गुण उत्पन्न करते. घटादिकांचा नाश झाला असतांना मागें राहिलेल्या तुकड्यांच्यावरून त्यांच्या नाशाबद्दल अनुमान बांधतां येतें. पण, गुणांचा नाश झाल्यावर त्या नाशाचा पुरावा म्हणून मागें कांहींच शिल्लक राहत नसल्यानें यांचा नाश हा आत्यंतिक नाश होय असा कित्येकांचा सिद्धांत आहे. नाश झालेले गुण पुनः परत येत नाहींत असा एक पक्ष तर ते परत येतात असा दुसरा पक्ष. अर्थात्, पहिल्या पक्षाच्या मतें जन्मादिकांचा लाभ होणें ही गोष्ट भासमय ठरते; तर, दुसऱ्या पक्षाच्या मतें ती सत्य ठरते. या दोन्हीं पक्षांच्या म्हणण्याचा नीट विचार करून आपला सिद्धांत काय तो आपण ठरवावा. अनादि अनंत व सर्वव्यापी आत्म्याला या गुणसंसर्गाच्या योगानेंच निरनिराळ्या बऱ्यावाईट योनींमध्यें जन्म घ्यावा लागतो. या आत्म्याचें स्वरूप जाणून घेऊन मनुष्यानें क्रोध, आनंद, मत्सर इत्यादिकांचा त्याग करावा; व बुद्धीच्या नानाप्रकारच्या कल्पनातरंगांनीं हृदयाला बळकट बसलेली ही विषयव्यामोहाची गांठ अनित्य आहे असें ओळखून ती तोडून टाकावी, कसलाहि शोक करूं नये, मनांतील सर्व विकल्प काढून टाकावा व सुखानें रहावें. ज्याला पोहतां येत नाहीं असा मनुष्य जमिनीवरून पाय निसटून नदीच्या भरलेल्या पात्रांत पडला तर तो जसा त्यांत गटंगळ्या खातो त्याप्रमाणें विषयकर्दमांत लोळणाऱ्या सामान्य माणसाची स्थिति होते व त्याला क्लेश होतात. पण, आत्मस्वरूप ज्यानें जाणलें अशा बुद्धिमान् पुरुषाला हे क्लेश होत नाहींत. पोहणारा मनुष्य ज्याप्रमाणें जमिनीवरच्यासारखाच पाण्यांतहि वावरूं शकतो त्याप्रमाणें ज्ञानी पुरुषाला भवसागरांतून वावरतां येतें; शुद्ध चिन्मात्रस्वरूप ब्रह्माचें ज्ञान ज्याला झालें त्याची स्थिति अशी असते.

(२.) अशा प्रकारें सर्व प्राणिमात्रांची उत्पत्ति, लय, त्यांचीं निरनिराळीं स्वरूपें इत्यादिकांचें सूक्ष्म ज्ञान करून घेऊन मनुष्य ज्ञानसंपन्न झाला म्हणजे त्याला उत्तम प्रकारचें शांतिसुख प्राप्त होतें. जन्माला आल्याचें सार्थक जर कशानें व्हावयाचें असेल तर तें आत्मज्ञान प्राप्त करून शांतिसुखांत पूर्णपणानें विलीन होण्यानेंच होणार आहे. विशेषतः ब्राह्मणजन्माचें साफल्य तर यांतच आहे. तर, हें ज्ञान प्राप्त करून घेऊन मनुष्यानें पुण्यपापरहित व्हावें. बुद्ध—ज्ञानी—पुरुषाचें याहून चांगलें लक्षण कोणतें बांधतां येईल? या ज्ञानाच्या प्राप्तीनें कृतकृत्य झालेल्या मनस्वी पुरुषांना या भवसागरांतून मुक्त होतां येतें. अज्ञानी जीवांना परलोकांत जें एक प्रकारचें भय असतें, तसलें भय ज्ञानी पुरुषाला असत नाहीं. विद्वान् माणसाला परलोकीं जी शाश्वत गति मिळते त्या गतीहून अधिक श्रेष्ठ अशी गतीच नाहीं. नानाप्रकारच्या दोषांनीं भरलेल्या या जगाकडे लोक स्वतःची भोगेच्छा पूर्ण होत नाहीं म्हणून असूयेनें—मत्सरानें—पाहातात. अर्थात्, त्या त्या गोष्टी पाहिल्यामुळें त्यांच्या चित्तांत शोकावेग उत्पन्न होतो. पण, या सर्वांच्या उत्पत्तीचें व लयाचें यथार्थ ज्ञान ज्यांना आहे आणि म्हणूनच शोकाची बाधा ज्यांना होत नाहीं तेच खरे कुशल—चतुर—पुरुष होत. फलासक्ति सोडून जें जें कर्म मनुष्य करतो त्या कर्मांच्या योगानेंच त्याच्या संचिताचाहि नाश होतो. फलासक्ति सोडून केलेलें कर्म व संचितकर्म, या दोहोंपैकीं कोणतेंच त्याला प्रियहि नसतें व अप्रियहि नसतें. म्हणून, त्याला त्यांपासून इष्टानिष्ट फलांची प्राप्ति घडत नाहीं. १२. ३. २४९.

---

## अध्याय २५० वा.

[ १ विद्याप्रापक धर्म कोणचा? २ विद्याप्रापक धर्माचें रूप. ३ संसारनदीचें वर्णन. ४ संसारनदी तरून जाण्यानें ब्रह्मपदप्राप्ति. ]

(१) **शुक**—ज्या धर्मापेक्षां श्रेष्ठतर असा धर्म जगतीतलावर कोठेंहि सांपडणारा नाहीं, व जगांतील सर्व धर्मांपेक्षां ज्यांत कांहीं तरी विशेष आहे असा धर्म हे महाभागा, आपण मला सांगा.

**व्यास**—सर्व धर्मांपेक्षां ज्यांत कांहीं विशिष्ट आहे असा पुरातन ऋषिप्रणीत धर्म मीं तुला सांगतों, तो तूं एकचित्तानें ऐक. मनुष्याचीं इंद्रियें हीं सर्व बाजूंनीं स्खलन पावणारीं असून प्रमादशील आहेत. ज्याप्रमाणें पिता उच्छृंखल अपत्यांचें नियं-

त्रण करतो त्याप्रमाणें मोठ्या प्रयत्नानें स्वतःच्या बुद्धीनें या इंद्रियांचा निग्रह करून त्यांचा लय मनाचे ठिकाणीं करावा. इंद्रियें आणि मन यांचें अशा प्रकारचें ऐकाग्र्य हेंच परमश्रेष्ठ तप होय. या तपोयोगाचें आचरण हें सर्व धर्मांत विशिष्ट असून यालाच परमश्रेष्ठ धर्म म्हणतात. आपल्या बुद्धीच्या योगानें पंचकर्मेंद्रियें व सहावें मन यांचा निग्रह करून मनुष्यानें आत्मतृप्त स्थितींत राहावें, व ज्ञाता, ज्ञेय, ज्ञान; ध्याता, ध्येय, ध्यान; कारण कर्ता, कार्य; इत्यादि त्रिपुटींचा विचार त्यानें करूं नये. बाह्य विषयोपभोगापासून निवृत्त झालेलीं इंद्रियें जेव्हां परमात्मस्वरूपीं लीन होतील त्यावेळेस परमश्रेष्ठ व शाश्वत असें परमात्मस्वरूप तुझें तुलाच दिसूं लागेल. ब्रह्मनिष्ठ व तपस्वी असे जे महात्मे पुरुष आहेत त्यांना निर्धूम अग्नीप्रमाणें असणारें सर्वव्यापि व विभु असें परमेश्वरस्वरूप दिसतें. एकादा मोठा वृक्ष फलपुष्पांनीं व शाखांनीं समृद्ध असावा व त्याला ज्याप्रमाणें आपलीं फलें व पुष्पें कोठें आहेत व कोठून आलीं याचें ज्ञान नसावें तसें या महद्रूप आत्म्याला आपण कोण, व कोठून आलों व कोठें जाणार याचें ज्ञान नसतें. या महत्संज्ञक आत्म्याहून सूक्ष्म असें दुसरें एक आत्मस्वरूप असतें त्याला हें सर्व दिसतें. हा सूक्ष्मात्मा प्रज्वलित अशा ज्ञानदीपाच्या साहाय्यानें स्वतःच्या ठिकाणींच असलेलें आत्मरूप आपलें आपणच पाहूं शकतो. हे शुका, तूं अशा तऱ्हेनें स्वतःच स्वतःला ओळखून आपल्या ठिकाणींच असलेलें परमात्मरूप पारखून घे, व उपाधिरहित हो. स्वतःच्या बुद्धीनें आत्मज्ञान संपादन करून घे. सर्प ज्याप्रमाणें कांत टाकतो त्याप्रमाणें सर्व पापें टाकून दे. अशा तऱ्हेनें निष्पाप व जीवन्मुक्त होऊन ही संसारनदी तरून जा.

इहलोक हें या संसारनदीचें पात्र असून ही घोर नदी यांतून सर्व बाजूंनीं वाहते. पंच कर्मेंद्रियें ह्या या नदींतील मगरी होत. मनानें उत्पन्न केलेले नानाविध संकल्प हीं या नदीचीं तीरें आहेत. ही संसारनदी लोभरूपी व मोहरूपी तृणानें सर्वत्र व्याप्त झालेली असून काम व क्रोध हे या नदीच्या पात्रांतील सर्प होत. सत्य हें या नदीचें तीर्थत्व (पुण्यांश) व खोटें बोलणें हा या नदीचा प्रक्षोभ आहे. या सर्वश्रेष्ठ नदीचें पात्र क्रोधरूप चिखलानें भरलेलें असून हिचा उगम कोठून झाला तें समजत नाहीं. हिच्यामध्यें विषयरूपी सुसरी भरलेल्या आहेत, व ही अत्यंत वेगवती आहे. तपश्चर्येनें ज्यांचें मन शुद्ध झालेलें नाहीं, अशा पुरुषांना ही नदी तरून जातां येणें कठिण आहे. ही नदी संसारसागराला जाऊन मिळते. हिच्या वासनारूपी तळाचा ठाव घेणें कठिण असून त्यामुळेंच

ही दुस्तर झालेली आहे. आपल्या कर्मांच्या योगानेंच ही समृद्ध होते. आपल्या वाणीपासून उत्पन्न होणारे नानाविध परिणाम हेच या दुर्लंघ्य नदींतील मोठमोठे भोंवरे होत. हे शुका, आपल्या बुद्धिबळाच्या जोरावर ही घोर नदी तूं तरून जा. धैर्यसंपन्न, स्थितप्रज्ञ व तपस्वी असे महात्मे या नदीच्या पैलतीराला जाऊं शकतात. उत्तम प्रकारचें ज्ञान संपादन करून तूंहि ही संसारनदी तरून जा. म्हणजे सर्व वासना, सर्व विषय यांपासून मुक्त झालेल्या, स्थिरबुद्धि, आत्मज्ञानी व पवित्र अशा तुला परब्रह्मस्वरूपाची प्राप्ति होईल. सर्व संसारांतून तरून जा. स्वतःचा आत्मा प्रसन्न ठेव. चित्तांतील वासना संकल्प इत्यादिकांचा मळ झाडून टाक. क्रोध, आनंद व मत्सर यांचा संसर्ग चित्ताला होऊं न देतां ज्ञानरूपी पर्वतावर आरोहण करून तेथून या जमिनीवरच्या प्राण्यांकडे पहा. म्हणजे यांचें सत्यस्वरूप तुला समजून तूं शोकरहित होशील; व या पदाला तूं पोंहोंचलास म्हणजे सर्व भूतांची उत्पत्ति कोठून होते व त्यांचा लय कोठें होतो हें तुला समजून येईल. धर्मज्ञांमध्यें श्रेष्ठ असलेले सर्वज्ञ तत्त्ववेत्ते मुनि या आज्ञानरूप नदी तरून जाण्याच्या धर्मालाच सर्व धर्मांत विशिष्ट स्वरूपाचा असलेला सर्वश्रेष्ठ धर्म असें म्हणतात.

हे पुत्रा, सर्वव्यापी आत्म्यासंबंधाचें हें ज्ञान—हें विवरण—जितेंद्रिय, आपल्याला अनुकूल असणाऱ्या अशा आपल्या अनुयायालाच सांगावें. गूढाहून गूढ असलेलें हें निगूढ आत्मज्ञान मीं तुला विस्तृतपणें, आत्मानुभवानें व यथातथ्य रीतीनें सांगितलें आहे. स्त्री, पुरुप किंवा क्लीब हे भूतमात्रांच्या ठिकाणीं दिसणारे भेद परब्रह्मस्वरूपांत नाहींत म्हणून परब्रह्मस्वरूप या स्वरूपांनीं प्रतीत होणारें नव्हे.

सुख व दुःख यांच्यापलीकडे असलेलें हें ब्रह्म मागें होऊन गेलेल्या, आज असणाऱ्या व पुढें होणाऱ्या सर्व भूतांच्या उत्पत्तीचें कारण आहे. या ब्रह्मस्वरूपाचें ज्ञान ज्याला झालें तो पुरुप असो वा स्त्री असो त्याला पुनः जन्म येत नाहीं. या ज्ञानाचा—धर्माचा—अवतार भूतमात्राच्या पुनर्जन्माचा नाश करण्यासाठींच आहे. हे पुत्रा, या विपयाबद्दलचीं जीं विविध मतें आहेत तीं सर्व मीं तुला यथातथ्य रीतीनें कथन केलेलीं आहेत. यांतील कांहीं आत्मज्ञानाला उपोद्घलक अशीं आहेत; कांहीं नाहींत. हे सत्पुत्रा, आतां जें हें ज्ञान तुला मीं सांगितलें तें, प्रेमल, गुणी, जितेंद्रिय असा जो कोणी पुत्रासारखा वागणारा

शिष्य विचारील त्याला अत्यंत आनंदानें, यथार्थ रीतीनें व पुत्रवात्सल्यानें सांगावें. १२. ३. २५०.

---

## अध्याय २५१ वा.

[ १ ब्रह्मप्राप्तीचीं साधनें. २ जीवन्मुक्तीचीं लक्षणें. ]

( १ ) **व्यास**—गंध, रस इत्यादि पंचकर्मेंद्रियांचे जे भोग्य विषय आहेत त्यांच्या आधीन न होतां तज्जन्य सुखाची आसक्ति सोडावी. तसाच हट्टानें या गोष्टींचा निरोधहि करूं नये. विषयादिकांचे ठिकाणीं रागद्वेष ठेऊं नये; मान, कीर्ति व यश यांच्या प्राप्तीची इच्छा धरूं नये. विद्वान् आत्मज्ञानी माणसाच्या व्यवहाराचा हा मार्ग होय. ब्रह्मचर्य व्रत पाळून मोठ्या आस्थेनें एखाद्या पुरुषानें जरी सर्व वेदांचें अध्ययन केलें, ऋग्वेद यजुर्वेद व सामवेद या त्रयीचें ज्ञान जरी त्याला झालें तरी तेवढ्यानेंच तो ब्राह्मण होत नाहीं. सर्व प्राणिमात्रांबद्दल ज्याला आत्मीय भाव आहे असा पुरुषच सर्वज्ञ व सर्ववेदवेत्ता होय. जो पुरुष पूर्ण-काम होऊन मृत्यूला जिंकितो तोच ब्रह्मवेत्ता ब्राह्मण होय. मनुष्यानें कितीहि इष्टि केल्या, यज्ञांत नाना प्रकारची दक्षिणा कितीहि दिली तरी त्याच्या या कर्मांत दयालुता व निर्लोभता हीं नसतील तर त्याला या कर्मांनीं ब्राह्मण्य प्राप्त होणार नाहीं. ज्यावेळेला हा कोणाला भिणार नाहीं व यालाहि कोणीं भिणार नाहीं, जेव्हां याच्या अंतःकरणांतील इच्छा व द्वेष दोन्हींहि नाहींशीं होतील त्या वेळेसच हा पुरुष ब्रह्मरूप होतो. आचार, विचार व उच्चार या तीन्ही मार्गांनीं जो कोणाहि प्राण्याबद्दल पापविचार कधींहि मनांत आणीत नाहीं तोच ब्रह्मपदाला पोहोंचतो. या जगांत प्राण्याला वासना हा एकच बंध आहे. त्याला दुसरा कोणताहि पाश नाहीं. कामाचें एवढें एक बंधन त्यानें टाकलें म्हणजे तो ब्रह्मपदाला लायक होतो. मेघांच्या पटलांतून चंद्रमा मुक्त व्हावा त्याप्रमाणें कामाच्या बंधनांतून निर्मुक्त होणारा धीट पुरुष कालाची मार्गप्रतीक्षा करीत आयुष्य घालवीत असतो. सर्व बाजूंनीं नद्यांनीं भरला जात असतांहि निश्चल राहणाऱ्या समुद्रांत पाणी ज्याप्रमाणें चोहों बाजूंनीं प्रवेश करतें त्याप्रमाणें काम ज्याच्या ठिकाणीं प्रवेश करितात, म्हणजे पाणी कितीहि आंत आलें तरी समुद्राची स्थिरता जशी भंगत नाहीं, त्याप्रमाणें विषयांत वावरूनहि ज्याचें चित्त स्थिर राहूं शकतें त्यालाच शांतिसुखाचा लाभ घडतो;

विषयकर्दमांत लोळून त्याला लांचावणाऱ्या पुरुषाला शांतिसुख कधींच मिळत नाहीं. शांतिसुखाचा लाभ झालेल्या माणसाला ईप्सित इच्छामात्रेंकरूनच मिळतें. भोगविषयांच्या मागें लागलेल्याची गोष्ट याहून निराळी आहे. त्याचा हव्यास पूर्ण झाल्यानंतर तो स्वर्गाला जातो; पण पुण्यभोग संपल्यावर त्याला पुनः खालीं यावें लागतें.

( २ ) सत्य हें वेदांचें सारसर्वस्व होय. जितेंद्रियत्व हा सत्यस्वरूपाचा गाभा आहे. दमाची परा कोटि म्हणजे दान. तपश्चर्या हें दानाचें परमरहस्य तर त्याग हें तपश्चर्येचें सार आहे. त्यागाचें परमोच्च ध्येय सुख, सुखाचें ध्येय स्वर्ग, स्वर्गाचें रहस्यसर्वस्व म्हणजे शांतिसुख–ब्रह्मपदप्राप्ति–हें होय. शोक, मनांतील नानाविध संकल्प, विविधप्रकारच्या आशादुराशा यांचा नाश करून बुद्धि प्रसन्न करून घ्यावी. बुद्धीच्या प्रसादामुळें सात्विक समाधान होतें; आणि असलें सात्विक समाधान लाभलें म्हणजेच शांतिसुखाची–परमपदाची–प्राप्ति होते. ज्याचा शोक नाहींसा झाला; अहंकार संपला; मत्सर गळाला व ज्याची बुद्धि प्रसन्न झाली, शमसुख ज्याला लाभलें आणि समाधान ज्याच्या अंगीं बाणलें अशा या सहा लक्षणांनीं युक्त व ज्ञानपूर्ण पुरुषास पुनर्जन्म नाहीं; तो मुक्त होतो. सत्य, दम, दान, तप, त्याग व शम या सहा सात्विक गुणांनीं युक्त असणाऱ्या शहाण्या पुरुषांनीं श्रवण, मनन व निदिध्यासन या तीन साधनांनीं जाणलेलें आत्मस्वरूप ज्यांनीं ओळखलें ते मुक्त होतात. जें कृत्रिम नाहीं, कोणत्याहि कारणाचें कार्य नाहीं म्हणजेच ज्याला उत्पत्ति नाहीं आणि उत्पत्ति नाहीं म्हणून संहारहि नाहीं अशा स्वतःसिद्ध निरुपचार व स्वतःच्याच ठिकाणीं प्रतीत होऊं शकणाऱ्या परब्रह्माचें रूप ज्यांनीं जाणलें त्यांना अक्षयसुखाची प्राप्ति होते. सैरावैरा भटकणाऱ्या या चंचल मनाचा सर्व बाजूंनीं निरोध करून त्याचा एके ठिकाणीं लय करणें या एका साधनानें आत्मसुखाची जशी प्राप्ति होते तशी इतर कोणत्याहि साधनांनीं होत नाहीं. मनोजयामुळें ज्या प्रकारचें समाधान लाभतें तसें समाधान कशानेंहि लाभत नाहीं. ज्या ब्रह्मलाभामुळें द्रव्यादि साधनें नसतांना व विषयांचा भोग न घडतां देखील आत्मतृप्तीचें समाधान लाभूं शकतें, त्या परब्रह्मस्वरूपाचें रूप ज्यानें ओळखिलें तोच वेदवेत्ता होय. आत्म्याचीं भोग भोगण्याचीं साधनें जीं इंद्रियें त्यांच्या स्वैर वृत्तींचा निरोध करून जो विद्वान् ब्राह्मण आत्मस्वरूपाचें चिंतन करीत राहातो त्याला आत्मरति, आत्मक्रीड, आत्माराम म्हणतात. ज्याच्या मनांतील वासना क्षीण होऊन गेलेल्या

आहेत व ज्याचें चित्त एकाग्र होऊन ब्रह्मस्वरूपीं लय पावलें आहे, त्याचें समाधान चंद्रबिम्बाप्रमाणें सर्व बाजूंनीं वृद्धिंगत होतें. विषयांचा त्याग करणाऱ्या मुनीला सर्व भूतें सारखींच वाटत असतात व सूर्यप्रकाशानें अंधःकार नाहींसा व्हावा त्याप्रमाणें सुखोदयाच्या योगानें त्याचें दुःख नाहींसें होतें. जो कर्माकर्मांच्या पलीकडे गेला, सत्वरजादि गुणांची बाधा ज्याला होत नाहीं, विषय ज्याला शिवूं शकत नाहींत, असल्या ब्रह्मवेत्त्या पुरुषाला जरा आणि मरण यांची बाधा कधींच होत नाहीं. तो ब्रह्मवेत्ता पुरुष सर्व विषयांचा संसर्ग टाकून रागद्वेषादि द्वंद्वांच्या पलीकडे गेला म्हणजे तो शरीरी असला तरी इंद्रियें व इंद्रियांचे विषय यांचें अतिक्रमण करूं शकतो! हीच जीवन्मुक्तावस्था होय. परब्रह्मापासून उत्पन्न झालेलें जें हें कार्यरूप जगत् त्याच्याहि पलीकडे जाऊन आदिकारण जें ब्रह्म त्याच्याठिकाणीं लय पावून परब्रह्मप्राप्ति ज्यानें करून घेतली त्याला पुनरावृत्ति–पुनर्जन्म–नाहीं. १२. ३. २५१.

## अध्याय २५२ वा.

[ १. अध्यात्मज्ञानाचा पुनः संक्षेप. ]

( १ ) **व्यासः**—शीतोष्ण, सुखदुःखादि द्वंद्वें, धर्म व अर्थ यांच्याशीं संलग्न असलेल्या एकाद्या शिष्याला मोक्षज्ञान प्राप्त करून घेण्याची इच्छा झाली तर गुणवान् वक्त्यानें त्याला प्रथम हें अध्यात्मशास्त्र सांगावें.

पंचमहाभूतांनीं बनलेल्या या चराचर सृष्टीमध्यें आकाश, वायु, तेज, जल व पृथ्वी हीं महाभूतें व भाव, अभाव आणि काल हीं असतात. ज्या ज्या ठिकाणीं पोकळी दिसेल तें तें सर्व आकाश होय. श्रोत्रेंद्रिय हें आकाशापासून झालें म्हणून तें त्याचें कार्य होय. पोकळीच्या अस्तित्वामुळेंच शब्द ऐकूं येतो म्हणून शब्द हा त्याचा गुण होय; असें शारीरशास्त्राची माहिती असणारांनीं समजून घ्यावें. प्राण्यांमधील चलनवलन हें वायूचें कार्य होय. तसेंच प्राण व अपान हीं त्यांचीं स्वरूपें आहेत. त्वचा हें वायूचें इंद्रिय व स्पर्श हा त्याचा गुण होय. ताप, अन्नादि रसाचें पचन, दिव्याचा वगैरे प्रकाश हीं सर्व तेजाचीं कार्यें असून चक्षु हें त्याचें इंद्रिय आहे. तांबडा, पांढरा, काळा इत्यादि रंग हे तेजाचे गुण आहेत. आर्द्रपणा, सूक्ष्मपणा व स्निग्धता हे जलाचे गुणधर्म असून रक्त, मज्जा, वगैरे शरीरामध्यें जे जे स्निग्ध पदार्थ आहेत

तीं तीं सर्व जलाचीं कार्यें आहेत. रसग्रहण करणारी जिव्हा हें जलाचें इंद्रिय आहे व रस हा त्याचा गुण होय. कठिणपणा हा पृथ्वीचा धर्म आहे. हाडें, दांत, नखें, आंगावरील व मस्तकावरील केंस, शिरा, स्नायु, कातडी हीं तिचीं कार्यें होत. पृथ्वीचें गंधग्रहण करणारें इंद्रिय नासिका हें असून गंध हा त्या पृथ्वीचा गुण होय. पुढच्या पुढच्या भूतांमधून मागच्या मागच्या भूतांचे गुण संक्रांत होत असतात. शब्द हा एकच आकाशाचा गुण. वायूचे गुण दोन, शब्द व स्पर्श; तेजाचे तीन, शब्द, स्पर्श, व रूप; जलाचे शब्द, स्पर्श, रूप व रस हे चार; व शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध हे पांचही गुण पृथ्वीचे ठिकाणीं आढळतात. तसेंच सर्व प्राणिमात्रांमध्यें अविद्या, काम व कर्म हे गुण असतात. पांचही भूत-सूक्ष्मांच्या मेळाव्यानें झालेले पंचमहाभूतांचे संघ यांचा विस्तार कसकसा असतो त्याचें ज्ञान मुनींना असतें. पंचमहाभूतें, भावना, अज्ञान, कर्म, मन व बुद्धि हीं दहा प्रत्येक प्राणिमात्राच्या शरीरांत असतातच. पण शिवाय अकरावा एक सर्वांना व्यापणारा व इंद्रियांना अगम्य असा जीव असतो. कोणत्याहि गोष्टीचें स्वरूप निश्चित करणें हें बुद्धिकार्य होय व पदार्थांपदार्थांमधील भेद स्पष्ट करणें; जगांतील नानात्व विवेचून दाखविणें हें संकल्पात्मक मनाचें कार्य होय. शरीरांत असणारा जो क्षेत्रसंज्ञक जीव त्याचें अनुमान कर्मांवरून करावयाचें असतें. कर्मांवरून अनुमान बांधून त्याचें अस्तित्व ओळखावयाचें असतें. स्वरूपतः पाप-रहित असलेलें हें विश्वजात, युगधर्मानुसार बऱ्या वाईट वासनांनीं व्याप्त होतें, असें ज्ञान ज्याला होतें तो सकाम कर्में व तज्जन्य मोह यांच्या आहारीं जात नाहीं. १२. ३. २५२.

---

## अध्याय २५३ वा.

[ १. लिंगदेहवर्णन. ].

( १ ) **व्यासः**—स्थूलशरीराचा त्याग करून बाहेर पडलेल्या सूक्ष्म आत्म्याचें ज्ञान शास्त्रज्ञ लोकांना शास्त्रोक्त कर्मांनींच होतें. या सुसूक्ष्म आत्म्याचें दर्शन योगी लोकांना योगसमाधींतच होऊं शकतें. सूर्याचे आकाशभर पसरलेले घन-दाट किरण लोकांच्या सामान्य दृष्टीला दिसूं शकत नाहीं; परंतु, ज्ञात्या माण-सांनीं सांगितलेल्या युक्तीनें पहाण्याचा प्रयत्न केला तर सुस्पष्ट दिसतात. त्याच-प्रमाणें, स्थूल देहाचा त्याग करून बाहेर पडलेलीं सुसूक्ष्म सत्वें सर्व लोकांत

संचार करीत असतात; पण, तीं स्थूलदृष्टीला मात्र दिसूं शकत नाहींत. पाणी निरनिराळ्या ठिकाणीं सांठलेलें असल्यास त्या सर्व जलाशयांपैकीं प्रत्येक ठिकाणीं ज्याप्रमाणें सूर्याचें किरणजाल प्रतिबिम्बित झालेलें दिसतें त्याप्रमाणें योग्याच्या दृष्टीला सूक्ष्म आत्मरूपच प्रत्येक शरीरांत प्रतिबिंबित झालेलें दिसतें. शरीरापासून विमुक्त झालेलीं हीं जीं असंख्य सूक्ष्म सत्वें आहेत त्यांचें ज्ञान जितेंद्रिय व ज्ञात्या पुरुषांना त्यांच्या बुद्धिबलाच्या जोरावर होऊं शकतें. स्वतःच्या बुद्धीनें आत्म्यावर लादलेला विषयसंग—कर्मफलाचा लेप—खोटा असें ज्ञान ज्यांना झालें, ज्यांनीं विषयव्यामोह सोडला, जगत्कारण व जग यांच्या अद्वैताचेंहि भान ज्यांना उरलें नाहीं, अशा योगवेत्त्या पुरुषांना लिंगशरीर नेहमीं स्वाधीन ठेवतां येतें. जागृतावस्था व सुप्तावस्था या दोन्हींहि अवस्थांत, जसें दिवसा तसें रात्रीस व जसें रात्रौ तसेंच दिवसां, हें लिंगशरीर योगी जनांच्या अधीन राहतें. परमार्थदृष्ट्या प्रातिभासिक स्वरूपाचें म्हणून सदा अनित्य असलेलें, नित्य पंचतन्मात्रें बुद्धि व अहंकार या सात सूक्ष्म गुणांनीं व्याप्त असलेलें, इंद्रादि लोकांत संचार करूं शकणारें, असें हें लिंगशरीर योगी लोकांच्या दृष्टीनें व्यवहारतः अजरामर असूं शकतें. योगी लोकांप्रमाणेंच अज्ञान स्थितींतील लोकांनाहि या लिंग शरीराचें ज्ञान होणें शक्य आहे. मन व बुद्धि यांच्या आधीन असलेल्या जीवाला स्वदेह व परदेह यांतील भेद समजतो. स्वप्नांतसुद्धां याला सुखदुःखांचें ज्ञान होऊं शकतें. तेथेंहि याला सुख होतें, दुःख होतें, त्या ठिकाणीं सुद्धां हा क्रोध व लोभ यांच्या आधीन होऊन संकटांत सांपडतो. मोठें निधान हातीं लागल्याप्रमाणें याला तेथेंहि आनंद होतो व हा पुण्यकर्मेंहि करतो. जाग्रदवस्थेप्रमाणें सुप्तावस्थेंतहि त्याला या सर्व गोष्टींचें भान असतें. गर्भावस्थेंत आईच्या उदरांतील जठराग्नींत हा दहा महिने वास करूनहि अन्नाप्रमाणें पचला जात नाहीं. यावरून स्थूलदेहाहून भिन्न असणारें लिंगशरीर अस्तित्त्वांत आहे असें अनुमान अज्ञ जनांनाहि बांधतां येईल. अत्यंत देदीप्यमान परमेश्वराचा अंश असा जो जीवात्मा तो हृदयस्थ असला तरी तमोगुणानें व रजोगुणानें व्याप्त झालेल्या लोकांना शरीरांत प्रकट असा दिसत नाहीं. अचेतन स्थूल देह, अमूर्त असा सूक्ष्म देह, व ब्राह्मप्रलयांतहि नाश न पावणारा आणि म्हणूनच वज्रासारखा कठिण असा कारणदेह या देहत्रयाचें अतिक्रमण करणाऱ्या योगवेत्त्या व आत्मबोधेच्छु पुरुषांना आत्मप्राप्ति होते. चतुर्थ आश्रमांत करावयाचीं अशीं अनेक कर्में सांगितलेलीं आहेत. त्यामध्यें सर्वेंद्रियांच्या

वृत्तीचा उपशम करून समाधियोग साधणें हें श्रेष्ठ होय. इतर आश्रमांतहि कर्में करीत असतांना मधून मधून ध्यानयोगाचें विधान आहे. मीं आतां जें हें सांगितलें तेंच शाण्डिल्यानें शांडिल्यविद्येंत सांगितलें आहे. पंचतन्मात्रें अहंकार व बुद्धि या सूक्ष्म तत्त्वांचें ज्ञान ज्याला झालें; सर्वज्ञता, तृप्ति, अनादि-बोध, स्वतंत्रता, सदासर्वदा जागरूक असणारी दृष्टि व अनंत अशी शक्ति या षडंगांनीं युक्त अशा महेश्वराला ज्यानें जाणलें; सर्व जग हें प्रधानकारणापासून उत्पन्न होतें हें ज्याला समजलें त्यालाच परब्रह्मस्वरूपाचा साक्षात्कार होऊं शकतो. १२. ३. २५३.

---

## अध्याय २५४ वा.

[ १ हृदयांतील वासनांवर वृक्षाचें रूपक. २ संसारावर कुराज्याचें रूपक. ]

(१) व्यासः—मनुष्यांच्या अंतःकरणांतील वासना हा एक मोठा चित्रविचित्र वृक्ष आहे. मोह हें याचें बीज असून क्रोध, मान इत्यादि विकार हा वृक्षाचा सोंट होय. नानाप्रकारचीं कर्में करण्याची मनुष्याची जी धडपड तेंच या वृक्षाचें आळें आहे. अज्ञान हें या वृक्षाचें मूळ; नानाविध प्रमाद हेंच या वृक्षाला घातलें जाणारें पाणी; मत्सर हींच या वृक्षाचीं पानें; दुष्कृति हींच या वृक्षाचीं फळें. शोक हा या वृक्षाच्या शाखा आहेत. संमोह व चिंता या त्या शाखांना फुट-लेल्या प्रतिशाखा होत. भय हे त्याचे अंकुर असून हा वृक्ष मनुष्याच्या अंतःकर-णाला मोह पाडणाऱ्या तृष्णारूपी लतांनीं वेढिलेला आहे. या वृक्षाचीं फळें आपणांस भोगावयास मिळावीं अशी इच्छा धरणारे लोभी पुरुष वासनारूपी लोहमय पाशांनीं जखडले जातात व त्यांच्या दृष्टीनें फलप्राप्ति करून देणाऱ्या या वृक्षाभोंवतीं जमून त्यांची उपासना करतात. वासनांचे हे जे पाश सांगितले ते जिंकून जो पुरुष या कामवृक्षाला तोडून टाकतो त्याला सुखदुःखाची बाधा होत नाहीं. दुःख हें तर बोलूनचालून दुःखच; पण, विषयभोगापासून प्राप्त होणारें सुख हेंहि एकप्रकारें दुःखच आहे. अशा द्विविध दुःखांचा त्याग करूं इच्छिणारानें वासनावृक्षाचा उच्छेद करावा, म्हणजे तो सुखदुःखातीत होतो. अस्थिर बुद्धीचा मनुष्य ज्या नानाविध हव्यासांनीं वासनावृक्षाला वाढीला लावतो, तेच हव्यास, रोग्याला विष जसें मारक होतें त्याप्रमाणें त्याचे त्यालाच मारक होतात. सर्वांभूतीं साम्य पहाण्याची योगाभ्यासानें प्राप्त झालेली समदृष्टि हेंच उत्कृष्ट

असें खड्ग घेऊन पुण्यवान् मनुष्य अज्ञानरूपी मूळांतून निर्माण झालेल्या या वासनावृक्षाचें मूळच उपटून टाकतो. वासना याच या जगांत बंधनकारक आहेत असें जाणून जो हव्यासाचीच निवृत्ति करतो तोच पुरुष दुःखातीत होतो.

(२) हे शुका, हीच गोष्ट निराळ्या तऱ्हेनें सांगावयाची झाल्यास, शरीर हें एक गांव आहे असेंहि म्हणतां येईल. बुद्धि ही त्या गांवाची स्वामिनी आहे. सर्व गोष्टींचें स्वरूप निश्चित करणारी ही जी बुद्धि तिचा मन हा प्रधान होय. हें मन या बुद्धीच्या ठिकाणीं राहून नानाविध अर्थांचें चिंतन करीत असतें. या मनोरूपी प्रधानाची इंद्रियें ही प्रजा आहे. या प्रजेच्या पोषणासाठीं यज्ञ, दान, शेतीवाडी, बागाईत इत्यादि गोष्टींकडे मनाची अनिवार प्रवृत्ति होत असते. या प्रवृत्तीमध्यें रज आणि तम असे दोन महादोष आहेत. या शरीररूपी गांवांतील प्रजाजन जीं इंद्रियें तीं मन, बुद्धि व अहंकार या त्या गांवच्या अधिकाऱ्यांसहवर्तमान त्या त्या क्रियांचीं बरींवाईट फळें भोगीत असतात. यांची उपजीविका त्यावरच चालते. मनाच्या प्रवृत्तीचे वर सांगितलेले रज व तम हे जे दोन महादोष त्यामुळें या क्रियाफलांचा उपभोग अविहित मार्गानेंहि घडतो. या वेळेस रजस्तमांनीं कलुषित झालेल्या मनाबरोबरच बुद्धीहि कलुषित होते. एरवीं ही बुद्धि कितीहि अजिंक्य असली तरी अशावेळीं रजस्तमांनीं तीहि दुष्ट होते. मन व बुद्धि हीं दुष्ट—कलुषित—झालीं म्हणजे त्यांचे प्रजाजन जीं इंद्रियें हींहि कलुषित होतात व चंचल होतात. अशा प्रकारें बुद्धींत दोष उत्पन्न झाला म्हणजे ही बुद्धि ज्या अर्थांना—धनपुत्रादिकांनीं—सुखावह म्हणून मानते, तेच अर्थ अनर्थ ठरतात—सुखावह वाटतात ते दुःखद होतात—व शेवटीं त्यांचा नाश होतो. बुद्धीशीं संलग्न असलेलें हें मन नष्ट झालेल्या अर्थांचाहि विचार करीत राहतें. व त्यामुळें दुःखव्याप्त होतें. संकल्पविकल्पात्मक मन व्यवसायात्मिका बुद्धीपासून निवटून पडतें तेव्हांच त्याला केवळ मन म्हणतां येईल. वस्तुतः मन व बुद्धि हीं परस्परांशीं संलग्नच असल्यामुळें मनस्तापानें बुद्धीलाहि दुःख होतें. आत्मरूप बुद्धीच्या ठिकाणीं प्रतिबिम्बित आहे म्हणून बुद्धीचे ठिकाणीं असणारा रजोगुण आत्म्याला चिकटतो, आणि मन व बुद्धि यांच्याशीं संबंध असल्यामुळें आत्म्यालाहि रजोगुणानें उत्पन्न होणाऱ्या सुखदुःखांचा संसर्ग बाधतो. रजोगुणाचें व मनाचें सख्य होतांच मनाची वृत्ति, नानाप्रकारचीं कर्में करून त्यांचीं फळें भोगण्याकडे प्रवृत्त होते. मनाची उपाधि आत्म्याला चिकटलेली असल्यामुळें मन हें आत्म्याला व इंद्रियांना सुखदुःखांच्या भोंवऱ्यांत नेऊन सोडतें व

दुःखव्याप्त करतें. एकाद्या दुष्ट अमात्यानें राजाला व प्रजेला आपल्या अंकित करून घेऊन जसें त्याला शत्रूच्या स्वाधीन करावें, तसेंच मन हें आत्म्याला व इंद्रियांना वश करून घेऊन त्याचे शत्रू जे राजस गुण त्यांच्या स्वाधीन करतें व दुःखांत टाकतें. १२. ३. २५४.

---

## अध्याय २५५ वा.

[ १ पंचमहाभूतांचे व बुद्धीचे गुण. ]

(१) **भीष्म**—वत्सा युधिष्ठिरा, द्वैपायन व्यासांनीं पूर्वीं सांगितलेलें पंचमहाभूतांच्या गुणांचें वर्णन मीं तुला फिरून सांगतों तें, हे निष्पापा, तूं स्वतःला धन्य धन्य समजून ऐक. निर्धूम अशा प्रदीप्त अग्नीप्रमाणें शोभणाऱ्या भगवान् वेदव्यासांनीं धूमवर्चस अशा शुकाचार्यांना जें अध्यात्म पूर्वीं सांगितलें त्यांतीलच कांहीं भाग मी, हे वत्सा, फिरून तुला सांगत आहें.

चंचलपणाचा अभाव, जडपणा, कठिणपणा, कोणताहि पदार्थ उत्पन्न करण्याची शक्ति, वास, विस्तृतता, गंधादिकांचें ग्रहण करण्याचें सामर्थ्य, सर्व अवयवांना एकत्र संलग्न ठेवण्याचें सामर्थ्य, मनुष्यादिकांच्या शरीराचा आश्रय करण्याची योग्यता व धृति हे पृथ्वीचे गुण म्हणून सांगितलेले आहेत. थंडपणा, रस, आर्द्रपणा, द्रवता, स्निग्धता, सौम्यपणा, रसना, प्रवहणशक्ति व बर्फ, गारा, इत्यादिकांच्या रूपांत गोठून राहाण्याची शक्ति हे जलाचे गुण होत. पीक पिकविणें हाहि जलाचाच धर्म होय. दुर्धर्षता, ज्वालारूपता, ऊष्मा, पचन, उजेड, शोक, राग, शीघ्रगामित्व, तीक्ष्णता, नेहमीं ऊर्ध्वमुख स्थितींत प्रकाशत राहाणें हे अग्नीचे धर्म आहेत. थंडहि नव्हे व उष्णहि नव्हे असला अनुष्णाशीत स्पर्श, भाषणशक्ति, स्वातंत्र्य, मूत्रपुरीषांचा उत्सर्ग, उत्क्षेपणासारखीं कर्में, श्वासोच्छ्वासादि चेष्टा, प्राणरूपानें चिदात्म्याशीं होणारें तादात्म्य, व जन्ममरण हे वायूचे गुण होत. शब्द, सर्वव्यापित्व, सच्छिद्रता, कोणाचाहि आश्रय न घेणें व कोणालाहि आश्रय न देणें, सूक्ष्मता, अविकारित्व, कोणत्याही प्रत्याघातानें कुंठित न होणें, भूतत्व व विकृतत्व हे आकाशाचे गुण होत. पंचमहाभूतांचे ठिकाणीं कल्पिलेले हे पन्नास गुण आहेत. धैर्य, उहापोह करण्याचें सामर्थ्य, भ्रान्ति, कल्पना, वैराग्यादि सद्विचार, रागद्वेषादि असद्विचार, क्षमा, स्मरण व चांचल्य हे मनाचे

नऊ गुण म्हणून सांगितले आहेत. निद्रावृत्ति, सुनिश्चितता, चित्तनिरोधाचें सामर्थ्य, संशय व निश्चितस्वरूपाचें ज्ञान हे पांच बुद्धीचे गुण होत.

**युधिष्ठिर**—हे पितामहा, बुद्धीचे ठिकाणीं हे पांच गुण कसे कल्पिले व पंचेंद्रियांचीं गणना गुणांत कशी झाली त्यासंबंधाचें सर्व सूक्ष्मज्ञान आपण मला कथन करा.

**भीष्म**—पंचमहाभूतें हे बुद्धीचेच गुण आहेत. तेव्हां पंचमहाभूतें हे पांच, त्या भूतांचे वर सांगितलेले गुण पन्नास, व बुद्धीचे म्हणून स्वतंत्र सांगितलेले पांच असे साठ बुद्धिगुण शास्त्रवेत्ते सांगतात. पंचमहाभूतें व त्यांच्या विभूति ( कार्यें ) हीं सर्व अक्षर अशा परब्रह्मापासून झालेलीं आहेत. परंतु परब्रह्माचें जगत्स्रष्टृत्व हें नित्य स्वरूपाचें नव्हे, कारण, तें अक्षरच्या अक्षरच राहातें त्यांत कोणताहि विकार होत नाहीं. म्हणून, जगत्स्रष्टृत्व नित्य नसून प्रातिभासिक होय. हे पुत्रा, जगदुत्पत्तिविषयीं तुला निरनिराळ्या पक्षांची म्हणून जीं मतें सांगितलीं तीं वरवर कितीहि सयुक्तिक वाटलीं तरी वेदविरुद्ध असल्यामुळें सिद्धान्तदृष्ट्या दुष्टच होत. आतां मीं जो तुला ब्रह्मस्वरूपासंबंधाचा खरा सिद्धांत सांगितला तो यथार्थ रीतीनें समजून घे; आणि ब्राह्मी स्थितीच्या प्रभावानें तुझी बुद्धि शांत व स्थिर अशी होऊं दे. १२. ३. २५५.

---

## अध्याय २५६ वा.

[ १ मृत्युस्वरूपाविषयीं युधिष्ठिराचा प्रश्न. २ मृत्युप्रजापतिसंवादाचा उपक्रम ]

(१) **युधिष्ठिर**—हे पितामहा, या रणांगणावर हे जे महाबलिष्ट राजे गतप्राण होऊन जमिनीवर लोळत आहेत यांच्यांपैकीं प्रत्येकजण अत्यंत प्रभाववान् होता. व प्रत्येकाला असंख्य हत्तींचें बळ होतें. हे सर्व राजे यांच्याच तोडीच्या पराक्रमी व तेजस्वी पुरुषांच्या हातून पराभूत होऊन मारले गेले आहेत. वस्तुतः अशा पराक्रम-संपन्न व तेजस्वी राजांना संग्रामांत मारणारा कोणीं असेल असें मला वाटत नाहीं; पण, हे सुबुद्ध आणि पराक्रमी असे राजे निःसंज्ञ होऊन पृथ्वी-तलावर लोळत आहेत व या गतप्राण राजांना मृत ही संज्ञा लाविली जात आहे हीहि गोष्ट तितकीच खरी आहे. हे बलिष्ठ पृथ्वीपति मृत होऊन पडलेले पाहून 'मृत' ही संज्ञा कशी आली अशी माझ्या मनांत शंका येते. मृत्यु कोणाला

दुःखव्याप्त करतें. एकाद्या दुष्ट अमात्यानें राजाला व प्रजेला आपल्या अंकित करून घेऊन जसें त्याला शत्रूच्या स्वाधीन करावें, तसेंच मन हें आत्म्याला व इंद्रियांना वश करून घेऊन त्याचे शत्रू जे राजस गुण त्यांच्या स्वाधीन करतें व दुःखांत टाकतें. १२. ३. २५४.

---

## अध्याय २५५ वा.

[ १ पंचमहाभूतांचे व बुद्धीचे गुण. ]

(१) भीष्म—वत्सा युधिष्ठिरा, द्वैपायन व्यासांनीं पूर्वीं सांगितलेलें पंचमहाभूतांच्या गुणांचें वर्णन मीं तुला फिरून सांगतों तें, हे निष्पापा, तूं स्वतःला धन्य धन्य समजून ऐक. निर्धूम अशा प्रदीप्त अग्नीप्रमाणें शोभणाऱ्या भगवान् वेदव्यासांनीं धूमवर्चस अशा शुकाचार्यांना जें अध्यात्म पूर्वीं सांगितलें त्यांतीलच कांहीं भाग मी, हे वत्सा, फिरून तुला सांगत आहें.

चंचलपणाचा अभाव, जडपणा, कठिणपणा, कोणताहि पदार्थ उत्पन्न करण्याची शक्ति, वास, विस्तृतता, गंधादिकांचें ग्रहण करण्याचें सामर्थ्य, सर्व अवयवांना एकत्र संलग्न ठेवण्याचें सामर्थ्य, मनुष्यादिकांच्या शरीराचा आश्रय करण्याची योग्यता व धृति हे पृथ्वीचे गुण म्हणून सांगितलेले आहेत. थंडपणा, रस, आर्द्रपणा, द्रवता, स्निग्धता, सौम्यपणा, रसना, प्रवहणशक्ति व बर्फ, गारा, इत्यादिकांच्या रूपांत गोठून राहाण्याची शक्ति हे जलाचे गुण होत. पीक पिकविणें हाहि जलाचाच धर्म होय. दुर्धर्षता, ज्वालारूपता, ऊष्मा, पचन, उजेड, शोक, राग, शीघ्रगामित्व, तीक्ष्णता, नेहमीं ऊर्ध्वमुख स्थितींत प्रकाशत राहाणें हे अग्नीचे धर्म आहेत. थंडहि नव्हे व उष्णहि नव्हे असला अनुष्णाशीत स्पर्श, भाषणशक्ति, स्वातंत्र्य, मूत्रपुरीषांचा उत्सर्ग, उत्क्षेपणासारखीं कर्में, श्वासोच्छ्वासादि चेष्टा, प्राणरूपानें चिदात्म्याशीं होणारें तादात्म्य, व जन्ममरण हे वायूचे गुण होत. शब्द, सर्वव्यापित्व, सच्छिद्रता, कोणाचाहि आश्रय न घेणें व कोणालाहि आश्रय न देणें, सूक्ष्मता, अविकारित्व, कोणत्याही प्रत्याघातानें कुंठित न होणें, भूतत्व व विकृतत्व हे आकाशाचे गुण होत. पंचमहाभूतांचे ठिकाणीं कल्पिलेले हे पन्नास गुण आहेत. धैर्य, उहापोह करण्याचें सामर्थ्य, भ्रान्ति, कल्पना, वैराग्यादि सद्विचार, रागद्वेषादि असद्विचार, क्षमा, स्मरण व चांचल्य हे मनाचे

नऊ गुण म्हणून सांगितले आहेत. निद्रावृत्ति, सुनिश्चितता, चित्तनिरोधाचें सामर्थ्य, संशय व निश्चितस्वरूपाचें ज्ञान हे पांच बुद्धीचे गुण होत.

**युधिष्ठिर**—हे पितामहा, बुद्धीचे ठिकाणीं हे पांच गुण कसे कल्पिले व पंचेंद्रियांचीं गणना गुणांत कशी झाली त्यासंबंधाचें सर्व सूक्ष्मज्ञान आपण मला कथन करा.

**भीष्म**—पंचमहाभूतें हे बुद्धीचेच गुण आहेत. तेव्हां पंचमहाभूतें हे पांच, त्या भूतांचे वर सांगितलेले गुण पन्नास, व बुद्धीचे म्हणून स्वतंत्र सांगितलेले पांच असे साठ बुद्धिगुण शास्त्रवेत्ते सांगतात. पंचमहाभूतें व त्यांच्या विभूति (कार्यें) हीं सर्व अक्षर अशा परब्रह्मापासून झालेलीं आहेत. परंतु परब्रह्माचें जगत्स्रष्टृत्व हें नित्य स्वरूपाचें नव्हे, कारण, तें अक्षरच्या अक्षरच राहातें त्यांत कोणताहि विकार होत नाहीं. म्हणून, जगत्स्रष्टृत्व नित्य नसून प्रातिभासिक होय. हे पुत्रा, जगदुत्पत्तिविषयीं तुला निरनिराळ्या पक्षांची म्हणून जीं मतें सांगितलीं तीं वरवर कितीहि सयुक्तिक वाटलीं तरी वेदविरुद्ध असल्यामुळें सिद्धान्तदृष्ट्या दुष्टच होत. आतां मीं जो तुला ब्रह्मस्वरूपासंबंधाचा खरा सिद्धांत सांगितला तो यथार्थ रीतीनें समजून घे; आणि ब्राह्मी स्थितीच्या प्रभावानें तुझी बुद्धि शांत व स्थिर अशी होऊं दे. १२. ३. २५५.

---

## अध्याय २५६ वा.

[ १ मृत्युस्वरूपाविषयीं युधिष्ठिराचा प्रश्न. २ मृत्युप्रजापतिसंवादाचा उपक्रम ]

(१) **युधिष्ठिर**—हे पितामहा, या रणांगणावर हे जे महाबलिष्ट राजे गतप्राण होऊन जमिनीवर लोळत आहेत यांच्यांपैकीं प्रत्येकजण अत्यंत प्रभाववान् होता. व प्रत्येकाला असंख्य हत्तींचें बळ होतें. हे सर्व राजे यांच्याच तोडीच्या पराक्रमी व तेजस्वी पुरुषांच्या हातून पराभूत होऊन मारले गेले आहेत. वस्तुतः अशा पराक्रम-संपन्न व तेजस्वी राजांना संग्रामांत मारणारा कोणीं असेल असें मला वाटत नाहीं; पण, हे सुबुद्ध आणि पराक्रमी असे राजे निःसंज्ञ होऊन पृथ्वी-तलावर लोळत आहेत व या गतप्राण राजांना मृत ही संज्ञा लाविली जात आहे हीहि गोष्ट तितकीच खरी आहे. हे बलिष्ठ पृथ्वीपति मृत होऊन पडलेले पाहून 'मृत' ही संज्ञा कशी आली अशी माझ्या मनांत शंका येते. मृत्यु कोणाला

घडतो, कसा घडतो व कोणत्या साधनांनीं मृत्यु प्रजांचें हरण करितो तें, हे पितामहा, आपण मला सांगा.

( २ ) भीष्म—पूर्वी कृतयुगामध्यें अकंपन नांवाचा एक राजा होऊन गेला. कालवशात् क्षीणबल झालेल्या त्या राजाला शत्रूंनीं युद्धांत जिंकिलें. नारायणासारख्या बलिष्ठ अशा हरि नांवाच्या त्याच्या पुत्राला, त्याचें सैन्य व अनुयायी यांचेसह, शत्रूंनीं संग्रामांत मारिलें. शत्रूच्या आधीन झालेला व पुत्रशोकानें विव्हल झालेला तो राजा एकेवेळीं उगीच स्तब्ध बसला असतांना यदृच्छया त्याला नारदांचें दर्शन झालें. नारदांस पाहतांच त्या राजानें शत्रूंनीं युद्धांत आपणांस कसें जिंकिलें व आपल्या पुत्राला कसें मारलें त्याची झालेली हकीकत त्यांना सांगितली. त्याचें तें भाषण ऐकल्यावर तपोधन नारदांनीं त्याला पुत्रशोकाचा नाश करणारें असें पुढील आख्यान सांगितलें.

नारद—राजा, अतिशय विस्तृत असें त्याबद्दलचें एक आख्यान पूर्वी घडलें तसें, व माझ्या कानांवर आलें तसें मी तुला सांगतों तें ऐक. सृष्टीच्या उत्पत्तिकालीं महातेजस्वी अशा पितामह ब्रह्मदेवांनीं नानाविध सृष्टि उत्पन्न केली. त्यावेळीं, प्रजा बेसुमार वाढली, ती कमी होईना. प्राण्यांप्राण्यांमध्यें कोठेंहि यत्किंचित्सुद्धां अवकाश राहिला नाहीं, सगळे प्राणी एकमेकाला चिकटल्यासारखे दिसूं लागले, इतकी प्रजेची वाढ झाली. श्वासोच्छ्वास करावयासहि जागा नाहीं इतकें जग प्राण्यांनीं नुसतें फुलून गेलें. तेव्हां, या भूतांचा संहार कसा करावा याची ब्रह्मदेवाला चिंता पडली. पुष्कळ विचार करूनहि भूतसंहाराचा उपाय त्याला सुचेना. मग, हे राजा, क्रोधाविष्ट झालेल्या त्या ब्रह्मदेवाच्या गात्रांतून अग्नितेज प्रकट झालें व त्या तेजाच्या योगानें तो सर्व दिशांचा दाह करूं लागला. ब्रह्मदेवाच्या क्रोधांतून उत्पन्न झालेला तो अग्नि, पृथ्वी, आकाश, आकाशांतील ग्रहनक्षत्रें व सर्व चराचर प्राणी यांचा दाह करूं लागला. क्रोधयुक्त झालेल्या ब्रह्मदेवांनीं सुरू केलेल्या त्या संहारसत्रांत सर्व स्थावरजंगम भूतें जळून गेलीं. नंतर, अहिंसाधर्म ज्याला जटांप्रमाणें शिरोधार्य म्हणजे वंद्य वाटतो, असा वेदांचा व यज्ञांचा अधिपति परमात्मा श्रीशंकर ब्रह्मदेवाला शरण गेला. प्रजांचें कल्याण व्हावें ही बुद्धि मनांत धरून आपणांकडे आलेल्या भगवान् शंकरांना आत्मतेजानें तळपणारा तो ब्रह्मदेव म्हणाला, 'आपण वर देण्याला योग्य आहांत. तेव्हां, आज आपली कोणती इच्छा मीं पुरवूं तें हे शंभुदेवा, मला सांगा. आपल्या अंतःकरणांत जी इच्छा वागत असेल ती मी आज पूर्ण करीन.' १२.३.२५६.

## अध्याय २५७ वा.

[ १ मृत्यु-प्रजापतिसंवाद. ]

१ **स्थाणु**—भगवन्, संहार केलेल्या प्रजेची उत्पत्ति फिरून व्हावी एवढीच इच्छा धरून मी आपणांकडे आलों आहें. हे पितामहा, आपणच या प्रजा उत्पन्न केलेल्या आहेत, त्यांच्यावर असा क्रोध करणें आपल्याला उचित नाहीं. हे देवा, आपल्या तेजानें सर्व प्रजा होरपळून जात आहेत. त्यांना पाहून मला त्यांची दया येते. प्रभो, त्यांच्यावर आपण क्रुद्ध होऊं नका.

**प्रजापति**—मी प्रजांवर रागावलों नाहीं व त्या उत्पन्न होऊं नयेत अशीहि माझी इच्छा नाहीं. परंतु, धरणीचा भार हलका करण्यासाठीं त्यांचा संहार करणें भाग आहे. प्रजांच्या भारानें आक्रांत होऊन त्याच्याचमुळें पाण्यांत बुडूं पाहाणारी ही पृथ्वी मजकडे आली व तिनें मला या संहारकार्यास प्रवृत्त केलें. मीं आपल्या मनाशीं पुष्कळ विचार केला; पण, यांचा संहार करण्याची युक्ति मला सांपडेना, म्हणून मला क्रोध आला.

**स्थाणुः**—देवेश्वरा, प्रजांचा संहार करण्याच्या उद्देशानें आपल्या क्रोधाग्नींत त्यांना जाळूं नका. ही स्थावर व जंगम सृष्टि नष्ट होऊं देऊं नका. सरोवरें, गवत व दुसरें नानाप्रकारचें पृथ्वीवरचें पीक, उद्भिज, जरायुज, स्वेदज व अंडज अशीं चतुर्विध स्थावरजंगम भूतसृष्टि आपल्या क्रोधाग्नीनें भस्मसात् झाली आहे. सर्व जगावर मोठा अनर्थ कोसळला आहे. तेव्हां, हा प्रकार आपण थांबवा एवढाच वर मीं मागतों तो हे भगवन्, आपण मला द्या. त्या प्रजा एकदां नष्ट झाल्या म्हणजे फिरून उत्पन्न होणार नाहींत. तस्मात्, ज्या तेजोबलानें आपण त्या नष्ट केल्या त्याच तेजोबलानें फिरून त्यांची उत्पत्ति आपण करावी. भूतांच्या हिताच्या दृष्टीनें, हे पितामहा, आपल्या क्रोधाग्नींत तीं नष्ट होणें इष्ट नाहीं. त्यांच्या संहारार्थ आपण दुसरा उपाय काढा. पुनरुत्पत्तीचा संभवच नाहींसा झाल्यामुळें प्रजांचा पृथ्वीवर अत्यंताभाव होण्याची पाळी येईल, तर तसें होऊं नये. हे लोकेश्वरा, आपण मला प्रजापालनासाठीं नेमलें आहे. माझी योजना त्यासाठींच आहे. जगन्नाथा, ही सर्व स्थावरजंगम सृष्टि आपल्यापासूनच उत्पन्न झालेली आहे; तेव्हां, या प्रजा नष्ट झाल्या तरी पुनः उत्पन्न होतील अशा तऱ्हेचा यांच्या संहाराचा उपाय आपण शोधा अशी माझी प्रार्थना आहे.

**नारद**—भगवान् स्थाणूचें तें वचन ऐकून प्रजाधिपति ब्रह्मदेवानें वाचेचा व मनाचा निरोध करून आपल्या तेजाचा पुनः आपल्याच ठिकाणीं उपसंहार केला. लोकपूजित अशा भगवान् ब्रह्मदेवानें क्रोधाग्नीचा उपसंहार करून प्रजांचें जनन व मरण यांचा उपाय शोधून काढला. ब्रह्मदेव आपल्या क्रोधाग्नीचा उपसंहार करीत असतांना त्या महात्म्याच्या सर्व गात्रांमधून एक स्त्री निर्माण झाली. त्या स्त्रीनें काळसर तांबडें वस्त्र परिधान केलेलें असून तिचे डोळे कृष्णवर्ण होते. तीच्या कानांत तेजस्वी कुंडलें होतीं व दिव्य अलंकारांनीं ती विभूषित झालेली होती. त्या स्त्रीनें ब्रह्मदेवाच्या गात्रांतून बाहेर पडतांच दक्षिण दिशेचा आश्रय केला. तिला भगवान् श्रीशंकर व ब्रह्मदेव या दोघांनीं पाहिलें. हे राजा, सर्व सृष्टीचा आदिकर्ता भगवान् ब्रह्मदेव यानें त्या स्त्रीला पहातांच 'मृत्यो' म्हणून तिला हांक मारिली व ह्या प्रजांचा संहार कर अशी तिला आज्ञा केली.

**ब्रह्मदेव**—प्रजेच्या संहाराचें कारण काय योजावें तें मला सुचेना म्हणून रागावून संहार करण्याच्या बुद्धीनें मीं तुझें चिंतन केलें. तेव्हां, सगळे जड पदार्थ, अजड पदार्थ या सर्वांसहवर्तमान या प्रजांचा तूं संहार कर. हे कामिनि, कोणताहि भेदाभेद ठेवितां तूं या प्रजांचा संहार कर. ही माझी आज्ञा पाळल्यानें तुझें अत्यंत कल्याण होईल.

ब्रह्मदेवाचें हें भाषण ऐकून ती कमलमालिनी मृत्युदेवता अतिशय दुःखित होऊन अश्रू गाळीत विचार करूं लागली. लोकाधिपति ब्रह्मदेवानें तिचे ते अश्रू आपल्या हाताची ओंजळ करून त्यांत धरले व मानवांचें कल्याण व्हावें या इच्छेनें त्यानें प्रजांचा संहार करण्याबद्दल फिरून तिची विनवणी केली. १२. ३४. २५७.

---

## अध्याय २५८ वा.

[ १. मृत्यु-प्रजापतिसंवादः पुढें चालू. ]

( १ ) **नारद्**—त्या विशालाक्षी स्त्रीनें आपलें दुःख आपणच आंवरलें, आणि स्वस्थ होऊन ब्रह्मदेवाला तिनें हात जोडले व त्याला म्हणाली—

**मृत्यु**—हे वक्तृश्रेष्ठा, आपल्या हातून निर्माण झालेली माझ्यासारखी स्त्री कठोर कर्मं करणारी व सर्व प्राण्यांना भय उत्पन्न करणारी अशी व्हावी हें कसें शक्य आहे ? भगवन्, मला अधर्माचें भय वाटतें. धर्म्य असें कोणतेंहि कार्य आपण मला सांगा. भयानें संत्रस्त झालेल्या अशा मजकडे आपण पहा. आपली कल्याणकारक नजर मजवर फिरूं दे. बाल, तरुण, वृद्ध कोणत्याहि निष्पाप प्राण्यांचें हरण मी करणार नाहीं. हे लोकाधिपा, मीं आपणांस हात जोडतें, एवढी देणगी आपण मला द्यावी. या जगांतील प्राण्यांचीं प्रिय अपत्यें, त्यांचे स्नेही, भाऊ, आईबाप इत्यादिकांचें हरण मी केल्यास त्यांचे मृतात्मे मला शाप देतील त्याची मला भीति वाटते. त्या दीनांच्या डोळ्यांतून वाहणारा अश्रुप्रवाह मला अनंत काळपर्यंत जाळीत राहील. म्हणून, त्यांची मला अत्यंत भीति वाटते. देवा, मीं आपणांला शरण आलें आहें. पापकर्माचें आचरण करणारांना यमसदनांत टाकून देतात, म्हणून भगवन्, आपण मला पापाचरण करावयास सांगूं नका. भगवंता, मीं आपली प्रार्थना करितें कीं एवढा प्रसाद आपण मला द्या. लोकपितामहा, आपल्यापासून एवढें मिळवावयाची माझी इच्छा आहे. आपल्या प्रसादासाठीं तपश्चर्या करण्याची माझी इच्छा आहे.

**ब्रह्मदेव**—हे मृत्यो, प्रजांचा संहार करावा या इच्छेनें तुझी योजना मीं केली आहे. तेव्हां, तूं जा आणि कसलाहि विचार न करितां सर्व प्रजांचा संहार कर. ही गोष्ट अशीच झाली पाहिजे यांत फरक होतां कामा नये. तूं निर्दोष शरीराची व निष्पाप आहेस. तूं येथून जा आणि मीं तुला सांगितल्याप्रमाणें सर्व कर.

**नारद्**—हे शत्रूंचीं नगरें उध्वस्त करणाऱ्या अकंपना, ब्रह्मदेवाचें तें भाषण ऐकून ती मृत्युदेवता कांहींच बोलली नाहीं व नम्रपणानें ब्रह्मदेवाच्या मुखाकडे नजर लावून उभी राहिली. ब्रह्मदेवानें पुनः पुनः सांगितलें तरी ती स्त्री एकाद्या अचेतन पुतळ्याप्रमाणें निःस्तब्धच. हें पाहून स्वर्गाचाहि राजाधिराज जो भगवान्

ब्रह्मदेव त्यानें आत्मबलानें स्वतःच्या क्रोधाचा आपल्याच ठिकाणीं उपशम केला. प्रसन्न अंतःकरणानें त्या लोकेशानें हंसत हंसत सर्व लोकांवर नजर फेंकली. अशा तऱ्हेनें त्या ब्रह्मदेवाचा क्रोध शांत झालेला पाहून ती कन्या—मृत्युदेवता—ब्रह्मदेवा-जवळून निघून गेली असें आम्हीं ऐकिलें आहे. हे राजेंद्रा, प्रजासंहरणाची ब्रह्मदेवाची आज्ञा न मानतांच ती स्त्री तेथून निघून गेली व मोठ्या त्वरेनें धेनुक नांवाच्या तीर्थाला आली. तिनें त्या ठिकाणीं अत्यंत दुर्घट अशी तपश्चर्या आरंभिली. पंधरा पद्में इतकीं वर्षें भरेपर्यंत ती एका पायावर उभी होती. अशा तऱ्हेची खडतर तपश्चर्या करीत असतांना ब्रह्मदेवानें तिला प्रजासंहाराची फिरून विनंति केली व 'मीं सांगितल्याप्रमाणें कर' असें सांगितलें. परंतु मृत्युदेवतेनें त्याचें म्हणणें मानलें नाहीं; व पुनः सात पद्में इतकीं वर्षें तिनें तशीच उभी राहून तपश्चर्या केली. तेरा पद्में वर्षेंपर्यंत तिनें त्याहीनंतर तसलीच तपश्चर्या केली. अनेक पद्में इतकीं वर्षेंपर्यंत तिनें पशूंच्यासमवेत रानांत संचार केला. हे नरश्रेष्ठा, दोन अयुतें म्हणजे वीस हजार वर्षेंपर्यंत तिनें वायुभक्षण केलें, व पुनः तितकींच वर्षें मौनव्रताचें आचरण केलें. एक हजार आठ वर्षें तिनें पाण्यांत राहून काढलीं. नंतर ती कन्या गंडकी नदीवर आली. व त्या ठिकाणीं वायुभक्षण, जलाहार वगैरे प्रकारांनीं तिनें तपश्चर्या आरंभिली. नंतर ती महापुण्यवती देवता गंगानदीचे ठिकाणीं आली व मेरु पर्वतावरहि गेली. प्रजांचें हित व्हावें या बुद्धीनें तिनें लांकडाप्रमाणें निश्चेष्ट राहून दिवस काढले. नंतर, सर्व देव ज्या ठिकाणीं यजन करतात अशा हिमालयाच्या माथ्या-वर जाऊन तेथें तिनें एक निखर्व इतकीं वर्षें पायाच्या अंगठ्यावर उभें राहून तपाचरण केलें, व मोठ्या प्रयत्नांनीं तिनें ब्रह्मदेवाचा संतोष संपादन केला. तेव्हां प्रजांच्या उत्पत्तीचें व लयाचेंहि कारण असा जो ब्रह्मदेव तो तिला म्हणाला, 'मुली, हें काय चाललें आहे? मीं सांगितलेला प्रजेचा संहार करून टाक.' त्यावर त्या मृत्युदेवतेनें भगवान् पितामहांना फिरून विनवून सांगितलें कीं, 'मीं प्रजांचा नाश करणार नाहीं. आपल्या कृपाप्रसादाच्या प्राप्तीसाठीं मीं फिरून तपश्चर्या करीन.' याप्रमाणें अधर्माला भिऊन प्रजासंहाराचें काम आपल्याला नको म्हणून पुनःपुनः प्रार्थना करणाऱ्या त्या मृत्युदेवतेला भगवान् पितामह मोठ्या निग्रहानें म्हणाले,

ब्रह्मदेव—हे मृत्यो, मीं सांगतों यांत अधर्म मुळींच नाहीं. ह्या प्रजांचा संहार तूं खुशाल कर. मीं सांगितलेली ही गोष्ट कधींहि अन्यथा होणारी नाहीं.

किंबहुना, मीं सांगितलेलें कार्य केल्यानेंच तुला सनातन धर्माच्या आचरणाचें फल लाभेल. माझें व सगळ्या देवांचेंहि तुझ्या कल्याणाकडे लक्ष असून तुझें हित करण्यांत आम्हीं दक्ष आहोंत. शिवाय तुझ्या मनांत तूं वागवलेला असा दुसराहि एक वर मीं तुला देतों. नानाप्रकारच्या रोगांनीं पीडिलेल्या प्रजा आपल्या नाशाचा दोष तुजवर लादणार नाहींत. पुरुषांच्या ठिकाणीं तूं पुरुषरूपानें, स्त्रियांच्या ठिकाणीं स्त्रीरूपानें व तृतीयप्रकृतींच्या ठिकाणीं क्लीबरूपानें तूं राहशील.

हे अकंपना, अशा रीतीनें ब्रह्मदेवांनीं सांगितलें असतांहि त्या मृत्युदेवतेनें अव्यय अशा त्या महात्म्या देवेशाला हात जोडिले व फिरून 'मीं हें करणार नाहीं' असें सांगितलें. त्यावर ब्रह्मदेव तिला म्हणतात.

ब्रह्मदेव—'या सर्व कृत्यांत तुझ्या हातून अधर्म घडणार नाहीं, अशी योजना मी करीन. हे मृत्युदेवते, तूं मानवांचा संहार कर. तुझ्या डोळ्यांतून जे अश्रुबिंदु पडतांना दिसले व जे मीं आपल्या ओंजळींत धरले होते त्या अश्रुबिंदूंचेच अनेक व्याधि होतील व आपल्या उग्र प्रकारांनीं ते व्याधि मानवांना ग्रस्त करितील व योग्य वेळ येतांच त्यांचा नाश करतील. सर्व प्राण्यांच्या अंतकालीं तूं त्यांच्या चित्तांत काम व क्रोध यांचा संचार करीव म्हणजे तुझें कार्य झालें. अशा रीतीनें माझ्या कार्यांत निमित्तमात्र झाल्यामुळें तुला धर्म घडेल व सर्व प्राण्यांच्या ठिकाणीं निःपक्षपातीपणाची बुद्धि धरल्यामुळें अधर्माचा लेपहि तुला लागणार नाहीं. तुझ्या मतें तुला हवें तें धर्माचें पालन तुझ्या हातून घडेल व अधर्माची भीति तुला वाटत होती तीहि नाहींशी होईल. म्हणून तुझ्याकडे सोंपविलेला हा अधिकार तूं आनंदानें स्वीकार व कामाची व क्रोधाची मनुष्यांचे ठिकाणीं योजना करून त्यांचा संहार कर.

ब्रह्मदेवाचें हें भाषण ऐकून मृत्युदेवतेला वाटलें कीं आतां आपण ओढून धरलें तर ब्रह्मदेव आपणांस शाप देईल. म्हणून तिनें त्याची आज्ञा मान्य केली. त्या आज्ञेप्रमाणें प्राण्यांच्या अंतकालीं कामक्रोधांची त्यांचे ठिकाणीं योजना करून त्यांचे प्राण ती हरण करीत असते. पूर्वीं मृत्यूच्या डोळ्यांतून गळलेले जे अश्रुबिंदु सांगितले त्यांचेच व्याधि बनतात व तेच रोग मनुष्यांच्या शरीराला ग्रासतात. प्राणिमात्रांच्या अंतकालीं हे रोग त्यांना ग्रासतात व त्यामुळें त्यांचा अंत होतो हें नीट विचार करून उमजून घे व हे अकंपना, कोणत्याहि प्रकारचा

शोक करूं नको. झोपेंमध्यें निःस्तब्ध झालेले इंद्रियादिकांचे व्यापार ज्याप्रमाणें जाग्रदवस्थेंत पुनः सुरू होतात, त्याचप्रमाणें मृत्युकालीं सर्व मानव परलोकाला जाऊन फिरून इहलोकीं परत येतात. अतिशय तेजस्वी, भयंकर आवाज करणारा व अत्यंत बलिष्ठ असा हा वायु सर्व भूतांचा प्राण होय. प्राणिमात्राच्या देहाची चालना याच्यामुळें होते. प्राणिमात्रांच्या देहभेदामुळें हा निरनिराळीं रूपें धारण करतांना दिसतो. म्हणून, वायूला सर्व देवांत श्रेष्ठ देव असें म्हणतात. पुण्यकर्मे करून स्वर्गांत गेलेलीं माणसें हेच देव. अर्थात् पुण्यक्षय होतांच हीं देव झालेलीं माणसें परत पृथ्वीवर यावयाचीं आहेत; व मनुष्यें पुण्यसंचय करून देवत्व पावणार आहेत. पुण्यसंचयानें माणसांचे देव व पुण्यक्षयानें देवांचीं मनुष्यें अशी ही यातायात असल्यानें देवांनाहि मर्त्य ही संज्ञा लागूं पडते व मनुष्यांनाहि ‘ देव ’ संज्ञा लागूं पडते. म्हणून, हे राजसिंहा अकंपना, पुत्राच्या मृत्यूबद्दल शोक करूं नको. तुझा मुलगा स्वर्गांत जाऊन आनंदाचा उपभोग घेत आहे. अशा रीतीनें देवांनीं उत्पन्न केलेली ही मृत्युदेवता योग्यवेळीं योग्य प्रकारानें प्रजांचा संहार करीत असते. त्या मृत्युदेवतेचे अश्रुबिंदु हेच रोग होतात व या रोगांमुळेंच सर्व प्राण्यांचा योग्यकालीं संहार होत असतो. १२.३.२५८.

---

## अध्याय २५९ वा.

[ १ धर्मलक्षणाबद्दल युधिष्ठिराचा प्रश्न. २ भीष्मकथित धर्मलक्षण. ]

( १ ) **युधिष्ठिर**—हे पितामहा, धर्म म्हणजे काय याबद्दल या सर्व मानवांच्या मनांत संशय उत्पन्न होत असतो. हा धर्म कसल्या स्वरूपाचा असतो, याची उत्पत्ति कोठून, धर्म हा इहलोकासाठीं आहे कीं परलोकासाठीं आहे किंवा उभयलोकांसाठीं आहे तें आपण मला सांगा.

( २ ) **भीष्म**—सदाचार, स्मृतिप्रामाण्य व वेदप्रामाण्य या तीन्ही गोष्टींचा समुच्चय म्हणजे धर्म होय. परोपकार हेंहि एक चवथें धर्माचें अंग आहे असें विद्वान् लोक मानतात. कांहीं लोक शास्त्रानें सांगितलेलीं धर्मविहित कर्में मानतात; पण, त्यांच्या प्रति लावतांना ते त्या विपरीतपणानें लावतात. त्यामुळें धर्माचरणाला बाध येतो. धर्माचें लक्षण करावयाचें, त्याबद्दलचे नियम बांधावयाचे ह्या गोष्टी झाल्या तरी जगाचा व्यवहार सुरळीत चालूं राहावा एवढ्या-

करितांच आहेत. धर्मासंबंधानें घालून दिलेले नियम व्यवस्थित पाळले म्हणजे इहलोकीं व परलोकीं मनुष्याला सुखप्राप्ति होते. योग्य धर्म कोणता, कोणत्या धर्माचें आचरण केव्हां करावें याचें पूर्ण ज्ञान नसलें म्हणजे प्राण्याच्या हातून पापाचरण घडतें. पापाचरण करणारा पापापासून मुक्त होत नाहीं असें कांहींचें मत आहे. आपत्प्रसंगीं पापाचरण करणारा निष्पाप ठरूं शकतो तसाच अधर्माचरण करणाराहि धर्मवेत्ता ठरूं शकतो. आचार हा धर्माचा पाया होय. आचारांच्या ज्ञानानेंच धर्माचें ज्ञान हे युधिष्ठिरा, तुला होईल. अधर्मानें मन दुष्ट झालेला चोर दुसऱ्याचें द्रव्य हरण करून आणतो व ज्या ठिकाणीं राजा नाहीं, अर्थात् ज्या ठिकाणीं शिक्षेचें भय नाहीं, अशा ठिकाणीं जाऊन त्याचा उपभोग घेतो. परंतु दुसरे लोक जेव्हां याचें धन हरण करून नेतात तेव्हां मात्र याचें धन हरण करणाऱ्यास शिक्षा करावयास राजा असावा असें याला वाटूं लागतें. परधनाची इच्छा न करितां स्वतःच्या धनावर संतुष्ट रहाणाऱ्या लोकांचें धन आपणांसच मिळावें अशी हा चोर इच्छा धरितो. कोणत्याहि प्रकारची शंका मनांत न धरतां व कसलेंहि भय न बाळगतां, आपण निष्पाप—पवित्र—असें मानून हा राजद्वारांत उभा रहातो—आपलें धन चोरून नेल्याबद्दल राजद्वारीं तक्रार करतो. तात्पर्य, मनुष्याला दुसऱ्याचें पाप—दुसऱ्याचे दोष—चटकन् दिसतात; पण स्वतःचे मात्र दिसत नाहींत. स्वतःच्या ठिकाणीं कांहीं दोष असेल अशी कल्पनाच त्याला येत नाहीं.

बा युधिष्ठिरा, सत्य भाषण करणें हें सर्वोत्कृष्ट होय. यापरतें श्रेयस्कर जगांत कांहीं नाहीं. सर्व सत्यावर आधारलेलें आहे; विश्वाला आधार सत्याचा आहे. सर्व लोक सत्याच्याच ठिकाणीं अधिष्ठित झालेले आहेत. महाभयंकर पापाचरण करणारे लोक जरी असले तरी ते परस्परांमध्यें कांहीं शपथा घेतात व त्या पाळतात. त्या शपथा पाळल्यामुळेंच त्यांचे व्यवहार एकमेकांचा द्रोह न करितां व कोठेंहि विरोध न येतां सरळ चालतात. त्यांनीं घेतलेल्या शपथा पाळल्या नाहींत तर त्यांचाहि नाश होईल; तात्पर्य, अशा भयंकर दरोडेखोरांसारख्यांनाहि सत्याचरणाचा आश्रय करावा लागतो. परधनाचा अपहार करूं नये, हा शास्त्रकारांनीं सांगितलेला सनातन धर्म होय. आतां, कांहीं बलिष्ठ लोक, दुर्बलांनीं प्रचारांत आणलेला हा धर्म आहे असें म्हणून याची चेष्टा करतात, पण, दुर्दैवानें यांच्यावरच हतबल होण्याची पाळी आली म्हणजे हाच परक्यांचें धन हरण न करण्याचा धर्म यांना आवडूं लागतो. जगांत [illegible]

अत्यंत बलिष्ठ नाहीं तसाच अत्यंत सुखीहि कोणीं नाहीं. तेव्हां हे युधिष्ठिरा, सरळ मार्ग सोडून जाण्याची बुद्धि केव्हांहि धरूं नकोस. जो कोणाचेंहि व कोणत्याहि प्रकारें वांकडें करीत नाहीं त्याला दुष्टांपासून, चोरांपासून व राजापासूनहि भय नाहीं. अशा तऱ्हेचा पवित्र मनुष्य निर्भय वृत्तीनें राहतो. एकादा हरिण गांवांत शिरतांना भीत भीत शिरतो त्याप्रमाणें चोराला सगळ्यांची भीति वाटते. आपण स्वतःच केलेलें पाप त्याला चोहोंकडे दिसत असतें, सगळेच आपल्यासारखे चोर आहेत अशी त्याची समजूत झालेली असते. पण, ज्याचें अंतःकरण पवित्र तो सर्वत्र निर्भयपणें विहार करतो. कारण हा निष्पाप असल्यानें दुसऱ्याच्या ठिकाणीं पाप असेल अशी शंका याला येत नाहीं. परस्वाचें अपहरण करूं नये म्हणून जसें शास्त्रानें सांगितलें तसेंच प्राणिमात्राच्या कल्याणाची इच्छा धरणाऱ्या साधुपुरुषांनीं दान हा धर्म सांगितला आहे. बलिष्ठांनीं जशी अस्तेयाची थट्टा केली तशीच धनवान् लोकहि 'दान' हा कृपणांनीं प्रचारांत आणिलेला धर्म असें म्हणून दानाचा उपहास करतात. परंतु, दुर्दैवानें यांच्यावर धनहीन होण्याची पाळी आली म्हणजे 'दान' रूप धर्माचें रहस्य यांना पटूं लागतें. जगांत कोणींहि अत्यंत धनवान् नाहीं, कोणींहि अत्यंत सुखी पण नाहीं. दुसऱ्या माणसांनीं आपल्या संबंधांत जें करूं नये असें आपल्याला वाटतें तें आपणहि दुसऱ्याच्या संबंधांत करूं नये. कारण, जें आपल्याला अप्रिय तें दुसऱ्याला तसेंच अप्रिय असतें, अशी समजूत घ्यावी. जो पुरुष स्वतःच दुसऱ्याचा उपपति असेल—परस्त्रीगमन करणारा असेल—तो दुसऱ्या कोणाला आणि काय बोल लावूं शकेल ? स्वतः परस्त्रीगमन करणाऱ्या पुरुषाला जर दुसरा एखादा तसेंच करतांना आढळला तर त्यानें त्याचा राग मानूं नये. ज्याला स्वतः जीवंत रहावयाची इच्छा आहे त्यानें दुसऱ्याचा घात कधींहि चिंतूं नये. आपल्याला जें हवेंसें वाटतें तें दुसऱ्यालाहि मिळावें अशी इच्छा धरावी. आपल्याला पुरून उरतील इतक्या भोग्यवस्तु आपल्याजवळ असतील तर दुसऱ्या आकिंचन मनुष्यांना त्या द्याव्यात, त्यांना त्यांचा उपयोग करूं द्यावा. धनवंतांचा पैसा दीनदुबळ्यांना उपयोगीं पडावा म्हणूनच ब्रह्मदेवानें कुसीद वृत्ति म्हणजे व्याजबट्ट्याचा धंदा निर्माण केला आहे. व्याजबट्ट्याच्या धंद्याचा उद्देश धनवंतांना अधिक गबर करण्याचा नसून दीनदुबळ्यांची अडचण भागावी, त्यांचा उपयोग व्हावा हा आहे. ज्या मार्गानें गेलें असतां देव आपल्या संमुख येतील—म्हणजे जी आपली कृति देवांना आवडेल, ज्या कृतीबद्दल देव आपलें अभिनंदन करतील—तीच

कृति करावी. मोठा लाभ घडण्याची वेळ आली तरी त्याच्या लोभानें धर्मापासून च्युत न होतां धर्मपर रहाणें हेंच श्रेयस्कर होय. कायावाचामनानें कोणालाहि न दुखवितां जें आपल्याला प्राप्त होतें तो धर्म होय; तें धर्मानें प्राप्त होतें असें समजावें. हे युधिष्ठिरा, धर्म व अधर्म यांचें लक्षण हें असें आहे. लोकसंग्रहानें युक्त असलेलें, सूक्ष्म धर्माचें यथार्थ ज्ञान व्हावें या साठींच ज्याचा अवतार, असलें सज्जनांचें सर्वोत्कृष्ट चरित–सदाचार–परमेश्वरानें निर्माण करून ठेविलें तें धर्माधर्म कळावा म्हणूनच होय. याप्रकारें हे कुरुसत्तमा युधिष्ठिरा, धर्मलक्षण कोणतें तें मीं तुला सांगितलें आहे. तर, सरळपणाचा मार्ग सोडून जाण्याची बुद्धि तुला होऊं देऊं नकोस. १२. ३. २५९.

## अध्याय २६० वा.

[ १ धर्मप्रामाण्याबद्दल युधिष्ठिराचे आक्षेप. ]

( १ ) **युधिष्ठिर**—हे पितामहा, आपण मला सुनिश्चित व सूक्ष्मस्वरूपाचें धर्मलक्षण अत्यंत उत्कृष्ट प्रकारें सांगितलें. पण मला जीं कांहीं अनुमानें काढावींशीं वाटतात व त्यावरून जें कांहीं विचारण्याची स्फूर्ति मला होत आहे तें मीं आतां विचारतों. मला आतांपर्यंत जे जे प्रश्न विचारावेसे वाटले ते मीं विचारले व त्यांचीं आपण, हे महाभागा, उत्तरेंहि दिलीं व माझ्या शंकांची फोड करून सांगितली. पण, मीं आतां आपल्याला आणखीहि कांहीं विचारणार आहें. या माझ्या शंका निग्रहासाठीं–आपल्याला अडविण्यासाठीं–नाहीं तर केवळ ज्ञानलालसेनें मीं त्या विचारीत आहें. त्याची मला अनुज्ञा असावी.

या जगांतील सर्व प्राणी शरीरी आहेत. व या शरीरांचें पोषण, उत्पत्ति व लय हीं सर्व अन्नावर अवलंबून आहेत. दुसऱ्याला सुख देऊन किंवा पीडा देऊन उत्पन्न होणारे धर्म व अधर्म हेच आपल्याहि सुखाला व दुःखाला कारणीभूत होतात असें आपण सांगितलें; पण, ‘ अमुक एक धर्म ’ किंवा ‘ अमका अधर्म ’ असें नुसतें म्हटल्यानें तो धर्म किंवा अधर्म होऊं शकत नाहीं. याला शब्दप्रामाण्याखेरीज दुसरा पुरावा कोणता ? जो आपत्तींत सांपडलेला नसेल त्याचा धर्म एक तर संकटांत सांपडलेल्या माणसाचा धर्म निराळाच होऊं शकतो. आतां, संकटांचें ज्ञान करून घ्यावयाचें तर तें नुसत्या शब्दप्रामाण्यानें होणार नाहीं. आपत्ति

ह्या अनंत आहेत. शब्दप्रामाण्याशिवाय सदाचारप्रामाण्य हें एक दुसरें धर्माचें लक्षण आपण सांगितलें; पण, त्याचीहि गति तीच. सदाचार हा धर्म. कोणींहि मनुष्य संत किंवा असंत हें त्याच्या आचारावरून ठरवावयाचें. आचार चांगला वाईट कळावयास सदसद्विवेक आधीं पाहिजे. आधीं माहीत असलेल्या सदसद्विवेकावरून आचारस्वरूप निर्णीत करावयाचें व मागून या आचाराच्या आधारानेंच पूर्वी माहित असलेलेंच सदसद्विवेकस्वरूप म्हणजे साधु व असाधु धर्माचें रूप—धर्माधर्मांचें रूप—निश्चित करावयाचें यांत अन्योन्याश्रयाचा दोष येतो. तेव्हां, सदाचार हें धर्माचें लक्षण मानून धर्मस्वरूपाचा नीट उलगडा होत नाहीं. कांहीं प्राकृत माणसें धर्माच्या नांवावर अधर्माचरण करतात. तर कित्येक सूज्ञ माणसांनीं आचरिलेला अधर्म हाहि धर्म ठरतो. दुसरी गोष्ट अशी कीं, शास्त्रवेत्त्या लोकांनीं धर्माला प्रमाण म्हणून जीं वेदवचनें सांगितलीं त्यांचाहि युगानुक्रमानें ऱ्हास होत आला आहे असें आम्हीं ऐकत आलों आहों. कृतयुगांत आचरावयाचे धर्म निराळे, त्रेतायुगाचे धर्म निराळे, द्वापरयुगाचे धर्म निराळे व कलियुगाचे धर्म निराळे. त्या त्या युगांतील लोकांचें सामर्थ्यमान धर्म सांगतांना लक्षांत घ्यावें लागतें. तेव्हां, वेदानें सांगितला तोच खरा धर्म असें म्हणणें हें केवळ लोकांचें रंजन करण्यासाठीं होय. स्मृति या वेदांपासूनच प्रसृत झालेल्या आहेत. त्या धर्मलक्षण म्हणून प्रमाण मानावयाच्या झाल्यास त्यांच्या प्रामाण्याला श्रुतिप्रामाण्याची अपेक्षा ही असतेच. आतां, प्रत्यक्ष वेदवचनांतच परस्पर विरोधी अशीं वचनें आढळतात; मग, परस्परविरोधी वचनें शास्त्रशुद्ध कशीं मानावयाचीं? मूळ वेदवचनांतच जर अनवस्था दिसते तर तत्प्रतिष्ठित स्मृतिवचनांतहि ती असणारच. तेव्हां, वेद व स्मृति या लक्षणांनीं धर्मस्वरूप निश्चित होत नाहीं. सदाचार या लक्षणांत अन्योन्याश्रय—दोष येतो. बलाढ्य व दुरात्म्या लोकांनीं केलेल्या धर्माचरणांत त्यांचा स्वार्थ असतो व त्यामुळें त्यांच्या आचारानें धर्माचें स्वरूप बदलतें—म्हणजे त्यांच्या शक्तिमत्त्वामुळें त्यांचा आचार हाच धर्म असें त्यांच्या रंजनासाठीं लोक मानूं लागतात. पुढें पुढें धर्माचें हें विकृत स्वरूपहि नष्ट होतें. हें धर्मस्वरूप आम्हांला कळतें म्हणावें तर कळत नाहीं, कळत नाहीं म्हणावें तर कळतें अशी याची स्थिति आहे. कित्येक वेळां हें रूप कळणें अशक्यच होतें. धर्माचें रूप वस्तऱ्याच्या धारेहून सूक्ष्म आहे व तें पर्वतापेक्षां मोठेंहि आहे. धर्माचें स्वरूप प्रथमतः मोठें अद्भुतरम्य व भव्य असें दिसतें. पण,

शहाण्या लोकांनीं तर्कबुद्धीच्या साहाय्यानें त्याचें निरीक्षण आरंभिलें तर हें स्वरूप विरूनहि जातें. शेतांतून गाईबैलांना पाणी पिण्यासाठीं काढलेल्या पाटांतील पाणी जसें आटलें म्हणजे नाहींसें होतें त्याचप्रमाणें हा स्मृतिरूपी शाश्वत धर्म युगमानानें नष्ट झाला असतांना अदृश्य होतो. कांहीं वासना धरून, दुसऱ्याच्या इच्छेवरून अगर इतर कांहीं कारणांनीं पुष्कळ दुर्वृत्त लोक वृथा दंभाचाराचा पसारा मांडतात. लोकांच्या गतानुगतिकत्वानें याला लवकरच धर्माचें स्वरूप प्राप्त होतें, व साधु पुरुषांचा सद्धर्म हा धर्म नाहीं असें ठरण्याची पाळी येते. इतकेंच नव्हे तर हे साधु पुरुष या दुष्टांच्या दृष्टीनें उन्मत्त ठरतात व यांचा उपहास होऊं लागतो. मोठमोठे पूज्य लोक पूर्वीं आपल्या धर्मापासून निवृत्त झालेले आहेत व त्यांनीं राजधर्माचा आश्रय केलेला आहे. याच्या उलटहि प्रकार आढळतो. तेव्हां, सदासर्वदा सर्वांचें हित करणारा असा एकच एक कोणताच आचार नाहीं. एकाद्या आचारामुळें एकाद्या माणसाला सुख होईल तर त्याच आचारामुळें दुसऱ्या एकाद्याला दुःख प्राप्त होईल. तर कांहीं वेळेस त्याच आचाराचें फल दोन ठिकाणीं सारखेंच दिसेल. तात्पर्य, एकच एक आचार सगळ्यांना सर्वदा सुखकारक होईलच असें नाहीं. एकाच आचाराचें फल निरनिराळ्या ठिकाणीं अशा प्रकारें निरनिराळें आढळतें; व क्वचित् निर-निराळया आचारांचें फल एकच आढळतें. पुरातन कालापासून सूज्ञ लोकांनीं आचाराचा अंगीकार केला आहे व यालाच त्यांनीं धम म्हटलें आहे. या पूर्वापार चालत आलेल्या आचारानेंच धर्माचें स्वरूप कायमचें टिकतें—धर्मकल्पनांना शाश्वत रूप येतें—असें मला वाटतें. १२. ३. २६०.

---

## अध्याय २६१ वा.

[ १ तुलाधार-जाजलि-संवाद. ]

( १ ) **भीष्म**—हे युधिष्ठिरा, धर्माचें स्वरूप कोणतें व अधर्म कशाला म्हणतात याबद्दल पूर्वीं एका तुलाधाराचा व जाजलि नांवाच्या एका ब्राह्मणाचा झालेला संवाद पुरातन इतिहास म्हणून सांगत असतात, तो मी तुला सांगतों ऐक.

पूर्वीं अरण्यांत राहणारा कोणीं एक जाजलि नांवाचा ब्राह्मण समुद्रकांठीं आला व त्यानें तेथें खडतर तपश्चर्या आरंभिली. जितेंद्रियवृत्ति स्वीकारून तो मोजका आहार करून राहात असे. त्यानें जटा वाढविल्या होत्या व तो वल्कलें

व कृष्णाजिनें धारण करीत असे. पुष्कळ वर्षेंपर्यंत अशी तपश्चर्या करीत राहिल्यामुळें व शरीराची निगा न राखल्यामुळें त्याच्या अंगावर मल पुष्कळच सांठला होता. हे राजा, अशा तऱ्हेनें पाण्यांत रहाणारा तो मुनि सिद्धिबलाच्या जोरावर सर्व लोक पहात पहात मनोवेगानें एकदां संचार करूं लागला. त्यानें पाण्यांतूनच सागरानें वेढिलेल्या व घोर अरण्यांनीं युक्त अशा सर्व पृथ्वीचें तपोबलाच्या जोरावर अवलोकन केलें, व तो आपल्याशींच म्हणूं लागला कीं, जलांत राहून आकाशांतील ग्रहनक्षत्रादिक जाणणारा व येथें राहूनच मनोवेगानें मजबरोबर आकाश हिंडून येणारा असा माझ्यासारखा दुसरा कोण प्राणी या स्थावर जंगम सृष्टीमध्यें आहे ? अदृश्यरूपानें राहूं शकणाऱ्या त्या मुनीनें जलांतल्या राक्षसांशींहि पण असेंच अहंभावाचें भाषण केलें. तेव्हां ते पिशाच त्याला म्हणतात, ‘बाबारे, असें बोलणें तुला शोभत नाहीं. वाराणसी क्षेत्रांत तुलाधार नांवाचा महायशस्वी वाणी राहतो. आतां तूं जी भाषा बोलत आहेस ती त्या तुलाधाराच्या तोंडींहि शोभणारी नाहीं. मग तुझ्या तोंडीं शोभणें तर दूरच.’ त्या राक्षसाचें हें भाषण ऐकून तो महातपस्वी जाजलि त्या राक्षसांना म्हणाला, कीं ‘त्या यशस्वी व महाप्राज्ञ तुलाधाराला पाहण्याची मला इच्छा आहे.’ त्या ऋषीनें अशी इच्छा प्रकट करितांच त्या राक्षसांनीं त्याला सागरांतून वर काढून तीरावर आणलें व एक मार्ग दाखवून या मार्गाच्या रोंखानें जा असें सांगितलें. याप्रमाणें राक्षसांनीं सांगिल्यावर खिन्न झालेला तो जाजलि वाराणसींत आला, व तुलाधाराची भेट घेऊन त्याला म्हणाला—

युधिष्ठिर—हे पितामहा, असली अत्यंत श्रेष्ठ सिद्धि प्राप्त होण्यासाठीं जाजलीनें पूर्वीं कोणती दुष्कर तपश्चर्या केली होती तें मला सांगा.

भीष्म—हे महाभागा, या जाजलीनें पूर्वीं अत्यंत घोर तपश्चर्या केली होती. हा तपस्वी ऋषि सकाळ संध्याकाळ स्नान करण्यामध्यें अत्यंत दक्ष असे. स्नान करून त्यानें अपउपस्पर्शन करावें, नित्य अग्नीची उपासना करावी, व वेदाध्ययनामध्यें नेहमीं निमग्न असावें. वानप्रस्थानें पाळावयाचे सव नियम त्याला ठाऊक होते व तपस्तेजाच्या योगानें तो देदीप्यमान दिसत होता. त्यानें वनांत राहून अनेक दिवस तपश्चरण केलें; परंतु, मीं धर्माचरण केलें असा अभिमान त्याला शिवला नाहीं. भर पावसाळ्यामध्यें त्यानें उघड्यावर रहावें, व थंडीच्या दिवसांत पाण्यांत असावें. उन्हाळ्यांत वारा व सूर्याचें प्रखर ऊन हीं सहन करून रहावें. परंतु इतकें करूनहि त्याला अभिमान झाला नाहीं. तो कधीं कधीं

कठिण अशा जमिनीवर लोळे, तर कधीं मऊशा जमिनीवर झोंप घेई. एकेवेळीं हा मुनि पाऊस पडत असतांना उघड्यावर उभा होता. आकाशांतून खालीं पडणारें पाणी यानें पुनः पुनः आपल्या मस्तकावर घेतलें. त्यामुळें त्याच्या जटा भिजून जाऊन त्या एकांत एक गुंतून गेल्या. नित्य अरण्यांत हिंडल्यानें तो निष्पाप मुनि शरीरानें मलिन दिसत होता. त्या महातपस्वी ऋषीनें कधीं निराहार रहावें तर कधीं वायुभक्षण करून असावें. एकदां तो तपश्चर्या करीत असतांना काष्ठासारखा निश्चल उभा होता व इकडे तिकडे मुळींच हालला नाहीं. त्याला झाडाच्या खीडाप्रमाणें निश्चेष्ट उभा राहिलेला पाहून हे राजा, चिमण्यांच्या एका जोडप्यानें त्याच्या डोक्यावर घरटें केलें. आपल्या जटांमध्यें गवताच्या काड्यांनीं चिमण्या घरटें घालीत आहेत हें त्या दयाळू ब्रह्मर्षीच्या लक्षांत आलें; पण, त्यानें त्यांची उपेक्षाच केली. झाडाच्या बुंध्याप्रमाणें निश्चल असलेला तो महातपस्वी ऋषि मुळींच हालचाल करीत नाहीं असें पाहून त्या चिमण्यांच्या जोडप्याला मोठा संतोष झाला व तें त्या घरट्यांत मोठ्या विश्वासानें राहिलें. पावसाळा संपल्यावर शरदृऋतु आला. तेव्हां, आपल्याला या ठिकाणीं कसलेंच भय नाहीं असा विश्वास वाटूं लागलेलें तें जोडपें काममोहित झालें व त्यानें त्या ऋषीच्या मस्तकावरील घरट्यांत अंडीं घातलीं. त्या तेजस्वी व संयमी ब्राह्मणाला हा सर्व प्रकार समजला आणि ही गोष्ट समजून सुद्धां तो महातेजस्वी जाजलि अणुमात्र हालला नाहीं. तो नित्य धर्माचरणांत मग्न असे. अधर्माची आवड त्यानें कधींहि धरिली नाहीं. रोजच्या रोज तें चिमण्याचें जोडपें त्या ऋषीच्या मस्तकावरील आपल्या घरट्यांत येऊन राही. त्या जोडप्याला एक प्रकारचा निर्भयपणा उत्पन्न झालेला होता; व तें आनंदांत असे. योग्य काळ झाल्यानंतर तीं अंडीं पूर्णपणें उबलीं व त्यांतून पक्ष्यांचीं पिलें जन्मास आलीं. हे राजा, तीं पक्ष्यांचीं पिलें सुद्धां त्याच घरट्यांत वाढूं लागलीं तरी तो जाजलि जसाच्या तसाच स्थिर होता. आपलें व्रत यथायोग्य रीतीनें पाळणारा तो धर्मात्मा जाजलि त्या पक्ष्यांच्या अंड्यांचें रक्षण करीत पूर्वींच्याच निश्चल समाधिस्थितींत होता. पुढें कालांतरानें तीं पिलें मोठालीं होऊन त्यांचींहि पण पांखरें झालीं, व या चिमण्यांच्या पिलांना पंख फुटले असेंहि त्या ऋषीला समजून आलें. त्या पांखरांना तेथें पाहून त्या जितेंद्रिय व बुद्धिमंतामध्यें श्रेष्ठ असलेल्या जाजलीला परमहर्ष झाला. चिमण्याच्या जोडप्यालाहि आपलीं पिलें मोठालीं झालेलीं पाहून परम आनंद झाला; व तें जोडपें आपल्या

पिलांसह तेथें राहूं लागले. पंख फुटलेलीं तीं पांखरें सकाळीं उडून जात व संध्याकाळीं आपल्या घरट्यांत परत येत. असा क्रम रोज चाले; परंतु जाजलीच्या मनाचा निश्चलपणा ढळला नाहीं. केव्हांकेव्हां ते पुनः येत पुनः जात असा प्रकार सारखा चाले. तीं पांखरें मोठीं झालीं तसें त्यांच्या आईबापांनीं त्यांना सोडून दिलें. तरीहि हा जाजली आपल्या स्थैर्यापासून ढळला नाहीं. ते पक्षी दिवसा तेथून उडून जात व सायंकाळीं वस्तीसाठीं पुनः त्या घरट्यांत येत. एकेवेळीं ते पक्षी बाहेर गेले असतांना पांच दिवस सारखे बाहेर होते व सहावे दिवशीं परत आले. तरीहि हे राजा, या जाजलीची वृत्ति निश्चळची निश्चळच होती. होतां होतां त्या पक्ष्यांचे अंगीं बरेंच सामर्थ्य आल्यानंतर ते एके वेळीं बाहेर गेले असतांना बरेच दिवसपर्यंत परत आलेच नाहींत. आपलें घरटें सोडून बाहेरच राहिले. एकदां तर ते महिनाभर परत आले नाहींत. तेव्हां मात्र, हे राजा, तो जाजलि तेथून निघाला. अखेर ते पक्षी अजिबाद नष्ट झालेले पाहून त्या जाजलीला आश्चर्य वाटलें. आपण आतां सिद्धपुरुष झालों अशी त्याची भावना होऊन त्याला गर्वानें घेरलें. आपल्या मस्तकावर वाढून ते पक्षी अशा रीतीनें निघून गेले हें पाहून त्या जितेंद्रिय ऋषीला मोठी धन्यता वाटली व त्याला अतिशय आनंद झाला. एकदां तो महातपस्वी ऋषि नदीमध्यें स्नान करून, अग्नीला आहुति देऊन, उदयोन्मुख अशा सूर्याची उपासना करीत होता. जपयज्ञ करणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ अशा त्या जाजलीला आपण आपल्या मस्तकावर पक्षी वाढविले या गोष्टीचा अत्यंत गर्व झाला व 'धर्माचरण काय तें मींच केलें' असा विचार मनांत आणून त्यानें दंड थोपटले. त्याच्या दंड थोपटण्याचा आवाज ऐकून अंतरिक्षांत आकाशवाणी झाली व ती जाजलीच्या कानावर आली. आकाशवाणीनें जाजलीला सांगितलें कीं, 'हे जाजले, धर्माचरणाच्या बाबतींत तुला तुलाधाराची मुळींसुद्धां सर येणार नाहीं. हा तुलधार महाविद्वान् असून वाराणसीक्षेत्रांत राहतो. त्या तुलाधाराला सुद्धां असें बोलणें शोभत नाहीं; मग तुझी गोष्ट तर दूरच " ही आकाशवाणी ऐकून जाजलि क्रोधाविष्ट झाला व तुलाधाराला भेटण्याच्या इच्छेनें तो एकसारखा मार्ग आक्रमण करूं लागला. सायंकाळीं वस्तीपुरता मात्र तो मुक्काम करी, बाकी सर्व दिवसभर मार्ग चालत असे. असा पुष्कळ काळ गेल्यानंतर तो जाजलि वाराणसी क्षेत्रांत आला व त्यानें नानाप्रकारच्या विक्रेय पदार्थांचा विक्रय करीत बसलेल्या तुलाधाराला पाहिलें. व्यापारांत घातलेल्या आपल्या भांडवलावर

उपजीवीका करणाऱ्या त्या तुलाधारानें त्या ब्राह्मणाला दुरून येतांना नुसतें पाहिलें मात्र; तों तो लागलीच उठला व मोठ्या आनंदानें त्यानें त्या ब्राह्मणाचें स्वागत केलें.

**तुलाधार**—हे ब्रह्मन्, आपण येत असतांनाच मला आपली माहिती झाली. हे द्विजोत्तमा, मीं आतां आपल्याला सांगतों तें आपण ऐका. सागराच्या जवळच्या पाणथळ जागेंत राहून आपण फार मोठी तपश्चर्या केली; पण, आपण धर्माचरण केलें असला अहंकार आपल्या चित्ताला त्यावेळीं शिवला नाहीं. पुढें सिद्धीच्या तपोबलानें आपल्या मस्तकावर पक्ष्यांनीं घरटें घातलें व त्यांत पक्षी वाढलेहि. त्या पक्ष्यांना पंख फुटतांच ते सगळे इतस्ततः भक्ष्याचा शोध करण्याकरितां गेले. तेव्हां, या चिमण्यांना आपल्या अंगावर वाढविण्यांत आपण मोठें धर्माचरण केलें अशी, हे ब्रह्मन्, आपली भावना झाली. तेव्हां, आपण आकाशवाणी ऐकिली आणि रागाच्या झपाट्यांत आपण तेथून मजकडे आलांत, हे द्विजसत्तमा, मीं आपलें कोणतें प्रिय करूं तें मला सांगा. १२. ३. २६१.

---

## अध्याय २६२ वा.

[ १ तुलाधार-जाजलिसंवाद—पुढें चालू; अहिंसाधर्मकथन ]

( १ ) **भीष्म**—अशाप्रकारें त्या महाप्राज्ञ तुलाधारानें केलेलें भाषण ऐकून जपयज्ञ करणारांमध्यें श्रेष्ठ अशा त्या बुद्धिमान् जाजलीनें त्याला विचारलें.

**जाजलि**—हे वणिजा, नानाप्रकारचे रस, सर्व तऱ्हेच्या सुगंधी वस्तु, वनस्पति, औषधि, त्यांचीं मूळें व फळें या पदार्थांची विक्री करणाऱ्या तुझ्या ठिकाणीं इतकी स्थिर बुद्धि कोठून आली व तुला हें ज्ञान कोठून मिळालें तें हे महामते, सर्व मला सांग.

**भीष्म**—आपल्याला उद्देशून त्या जाजलि ब्राह्मणानें असें भाषण केलेलें ऐकून धर्मार्थांचीं तत्त्वें उत्तम तऱ्हेनें जाणणाऱ्या त्या वैश्य तुलाधारानें त्याला धर्माचीं सूक्ष्म तत्त्वें सांगितलीं.

**तुलाधार**—हे जाजले, लोक ज्या धर्माला सर्वभूतांचें हित साधणारा, मैत्रीभावाचा पुरातन धर्म म्हणून समजतात तो पूर्वींपासून चालत आलेला धर्म व त्याचें रहस्य मीं जाणिलें आहे. ज्या वृत्तीमध्यें कोणाचाहि द्रोह करावा लागत नाहीं, किंवा अद्रोहानें जेथें भागतच नाहीं—दुसऱ्याचा द्रोह केलाच

पाहिजे असा बिनतोड प्रसंग जेथें येतो तेथेंच व जरूर तेवढाच द्रोह ज्या वृत्तींत करावा लागतो, अशा वृत्तीनें चालणें हाच परमश्रेष्ठ धर्म होय. हे जाजले, मीं याच धर्मानें चालतों. लांकडे व गवत गोळा करून आणून त्यांचें हें मीं घर बांधलें आहे. या ठिकाणीं मीं, अळित्याचा रंग, पद्मकाष्ठ, नारळ, निरनिराळे उंची व हलके सुगंधि पदार्थ व निरनिराळ्या प्रकारचे रस दुसऱ्याकडून विकत घेऊन पुनः विकतों, त्यांत लबाडी करीत नाहीं. मीं मद्यरसाचा विक्रय करीत नाहीं. हे जाजले, जो सर्वांचा सदासर्वदाचा मित्र; कर्मानें, विचारांनीं किंवा शब्दांनीं जो सर्वांचें कल्याण करण्याविषयींच झटतो त्यालाच धर्म समजला असें जाणावें. मीं कोणाची खुशामत करीत नाहीं किंवा कोणाशीं विरोध करीत नाहीं; तसेंच, मीं कोणाचा द्वेष करीत नाहीं व कोणावर लोभहि दाखवीत नाहीं. सर्व भूतांकडे समदृष्टीनें पाहणें हेंच माझें व्रत होय. हे जाजले, ही माझी तुला सर्वांनाच सारखी आहे. दुसऱ्यांनीं केलेल्या कर्मांची प्रशंसा मीं करीत नाहीं, तशीच त्यांची निंदाहि करीत नाहीं. आकाशांतील चित्रविचित्र ढगांप्रमाणेंच या चित्रविचित्र लोकांची स्थिति आहे हें मीं जाणतों. बुद्धिमंतांमध्यें श्रेष्ठ असणाऱ्या जाजले, मीं याप्रकारें सर्व भूतांशीं समदृष्टीनें वागणारा आहे असें तूं जाण. मातीचें ढेंकूळ, दगड व सोनें हीं सर्व मला सारखींच आहेत हें तूं पूर्णपणानें ध्यानांत वागव. अंधळ्या, बहिऱ्या व उन्मत्त लोकांच्या इंद्रियवृत्तींचा देवांनीं निरोध केलेला असतो; म्हणून, त्यांचें जीवन जसें श्वसनमात्रच असतें, तद्वत्, मला पूर्ण ज्ञान झालें असल्यानें माझी स्थिति आहे. म्हातारे, रोगी, शरीरानें कृश असणारे इत्यादिकांची ज्याप्रमाणें विषयोपभोगाचे ठिकाणीं इच्छा नसतें, तशीच मलाहि अर्थ व काम यांच्या उपभोगाची इच्छा नाहीं. मनुष्य जेव्हां दुसऱ्याला भीत नाहीं व दुसरे लोक त्याला भीत नाहींत; जेव्हां तो कशाची इच्छा धरीत नाहीं व कोणाचाच द्वेष करीत नाहीं तेव्हांच तो ब्रह्मपदाला चढतो. कर्मांनीं, विकारांनीं किंवा शब्दांनीं कोणत्याहि प्राण्याबद्दल जो दुष्टबुद्धि दाखवीत नाहीं तोच ब्रह्मरूप होतो. मागें होऊन गेलेला, पुढें येणारा व आज असलेला असा कालकृत धर्मभेद या जगांत नाहीं. सर्व प्राणिमात्रांना ज्याच्याकडून अभय मिळतें त्यालाच अभयपदाची प्राप्ति होते. सर्व प्राण्यांना अभयदान देणें हाच खरा धर्म होय. लोकांना ज्याचा मृत्यूप्रमाणें उद्वेग येतो असा मनुष्य आपल्या क्रूर वाचेचें व कठोर दंडाचें फळ म्हणून मोठ्या संकटांत सांपडतो—अर्थात् नरकांत जातो. ज्यांना मुलेंबाळें व नातवंडें झालेलीं आहेत,

ज्यांचा आचार शास्त्राला सोडून नाहीं, अशा वृद्ध, कोणाशींहि दुष्ट बुद्धीनें न वागणाऱ्या महात्म्यांच्या चरित्राचें आम्हीं अनुकरण करीत असतों; हीं माणसें ज्या मार्गानें जातील त्या मार्गानें आम्ही जात असतों. सदाचारामध्यें क्वचित् प्रसंगीं दोषहि असतात. या दुष्ट अंशानें भांबावून जाऊन कांहीं प्राकृत लोक सबंध सदाचाराचाच त्याग करितात व त्यामुळें सदाचारानें सिद्ध होणारा जो शाश्वत धर्म त्याचा लोप होतो. सदाचारांतील दोषयुक्त अंशामुळें उत्पन्न होणारा हा मोह बलवान्, तपस्वी व ज्ञानी अशा पुरुषांनाहि ग्रासतो. शाहण्या मनुष्यानें सदाचाराचें–संत ज्या मार्गानें जातात त्याचें–नेहमीं अनुकरण करावें. धर्माचरणाचें फल लवकर मिळण्याचा तो एकच मार्ग आहे. कोणाचाहि द्रोह न करितां, जितेंद्रियवृत्तीनें राहून साधूंच्या मार्गानें जावें. हाच धर्म होय. नदीच्या प्रवाहाबरोबर एकादें काष्ठ वहात येतें. त्याला यदृच्छया दुसऱ्या एकाद्या काष्ठाचा संयोग घडतो. हीं दोन्ही एकत्र आलीं म्हणजे त्या ठिकाणीं आणखीहि दुसरीं काष्ठें, गवत वेली वगैरे जमतात. हा त्या काष्ठांचा संघात जसा कोणी हेतुपुरःसर करीत नाहीं, तो जसा यदृच्छया घडतो, तशीच या भूतांच्या समागमाची गोष्ट आहे.

हे जाजले, ज्या मनुष्यापासून कोणालाहि व कसलेंहि यत्किंचित्सुद्धां भय नाहीं, त्याला सर्व भूतांपासून अभयप्राप्ति होते, तो सर्वदा निर्भय असतो. जलशयाच्या तीरावर येऊन ओरडणाऱ्या लांडग्याला जसे सर्व जलचर भितात, तसे सर्व प्राणी ज्याला भितात त्याला धर्मसिद्धि होत नाहीं. भूतलावर प्रगट झालेला हा आचारधर्म अशा प्रकारचा आहे. हा अभयदानाचा धर्म शक्य त्या मार्गांनीं साध्य करून घ्यावा. बंदीखान्यांतील कैदी सोडून साधावा, द्रव्यानें साधावा. हा धर्मच ऐहिक ऐश्वर्याची प्राप्ति करून देणारा असून परलोकींचेंहि साधन तेंच होय. या अभयदानरूपी धर्माच्या विविध प्रकारांचेंच शास्त्रकारांनीं शास्त्रांत वर्णन केलें आहे. कांहीं लोक या धर्माचें आचरण कीर्तीसाठीं, अल्पकालिक बाह्य सुखासाठीं करतात; कारण, त्यांच्या मनावर घडलेले सस्कार कोते असतात. दुसरे प्रगल्भ संस्काराचे पुरुष या धर्माचें आचरण परमपदाची प्राप्ति व्हावी म्हणून करितात. यज्ञ, दान इत्यादि कर्मांनीं, तपश्चर्येमुळें व नाना प्रकारच्या कुशल वाक्यांनीं जें जें फल मिळतें तें तें सर्व या अभयदानरूप धर्मानें मिळतें. या जगांत सर्व प्राण्यांना अभयदक्षिणेचें दान जो देतो, त्याला सर्वप्रकारचे यज्ञ केल्याचें फळ मिळतें व सर्व लोकांपासून अभयदक्षिणाहि मिळते. काया-

वाचामनानें कोणाचाहि द्रोह न करणें या अहिंसा धर्मापरता श्रेष्ठ धर्म जगतांत नाहीं. ज्या मनुष्यापासून कोणालाहि, कसलेंहि भय यत्किंचित्सुद्धां कधींच प्राप्त होत नाहीं त्याला, हे महामुने, सर्व प्राण्यांकडून अभय मिळतें. घरांत शिरलेल्या सापाला भ्यावें त्याप्रमाणें लोक ज्याला भितात त्याला इहलोकीं व परलोकीं दोन्ही लोकांत धर्मसिद्धि होत नाहीं. सर्व भूतांच्या आत्म्याशीं जो एकरूप झाला व ज्याला प्राणिमात्रांचें यथार्थ दर्शन झालें—एकच एक परब्रह्मरूप सर्वांच्या ठिकाणीं विनटलेलें ज्यानें पाहिलें—त्याच्या मार्गानें जातांना देव सुद्धां भ्रमांत पडतात. ज्याचा ठाव कधीं कोणाला लागला नाहीं अशा ब्रह्मपदाची प्राप्ति करून घेऊं इच्छिणारे देवसुद्धां या मार्गावर घोटाळतात, त्यांना सुद्धां हा मार्ग नीट उमगत नाहीं. हे जाजले, भूतांना अभय देणें हें सर्व दानांत उत्तम दान होय. मीं हें जें तुला सांगत आहें तें सत्य आहे; तें तुच्छ मानूं नको, त्यावर श्रद्धा ठेव. एकच मनुष्य एकदां ऐश्वर्यसंपन्न असतो तर कालांतरानें त्यालाच पुनः दुःस्थिति प्राप्त होते. स्वर्गादि कर्मफलांचा अशा रीतीनें नाशच होत असलेला पाहून सर्व लोक त्यांचा तिरस्कारच करीत असतात. हे जाजले या परम सूक्ष्म अभयदानरूप धर्मालाहि त्याचें त्याचें प्रयोजन आहेच, तो निर्हेतुक नाहीं. परिनिष्ठित स्वरूपाचें जें स्वतःसिद्ध ब्रह्म—भूत—व कर्मांच्या योगानें उत्पन्न होणारा जो धर्म—भव्य—या दोहोंच्याहि प्राप्तीसाठीं हा धर्म शास्त्रानें सांगितला आहे. या धर्माचें स्वरूप अत्यंत सूक्ष्म आहे व हा अनेक प्रकारांनीं सूक्ष्म राहूंहि शकतो. परंतु, मधून मधून सत्पुरुषांच्या आचारांचें निरीक्षण करून याचें स्वरूप जाणतां येतें.

हे जाजले, अळित्याचा रंग, पद्मकाष्ठ इत्यादि पदार्थ विक्रीस ठेवल्याबद्दल तूं मला दोष दिलास. पण, प्राण्यांचे वृषणच्छेद करून, त्यांच्या मस्तकाचा भेद करून, त्यांच्याकडून जे मोठमोठीं ओझीं वाहवितात, त्यांना बांधून घालतात. त्यांना तूं कसा दोष देत नाहींस ? कित्येक लोक दुसऱ्या प्राण्यांना मारून खातात. मनुष्यें आपल्याचसारख्या दुसऱ्या माणसांना गुलाम म्हणून वागवितात. त्यांचा वध करितात, त्यांना बंधन करितात व रात्रंदिवस कारागृहांत कोंडून ठेवितात. वध करणें व बंधनांत ठेवणें यापासून मनुष्याला काय पीडा होत असली पाहिजे याची जाणीवहि त्यांना असते. पंचेंद्रियांनीं युक्त अशा सर्व प्राण्यांमध्यें देवता वास करीत असतात. आदित्य, चंद्रमा, वायु, ब्रह्मदेव, प्राण, ऋतु व यम ह्या त्या देवता होत.

अशा देवता ज्यांच्या शरीरांत वास्तव्य करितात ते जीवंत प्राणी विकणारांनीं मृत गोष्टी विकाव्या कीं नाहीं याचा विचार करीत बसण्यांत काय अर्थ आहे? बोकड हा अग्नि, मेंढा हा वरुण, घोडा हा सूर्य व ही विशाल पृथ्वी ही धेनु आहे. सोम हा या पृथ्वीरूप धेनूचा वत्स होय. यांची विक्री केल्यानें धर्मसाधन होत नाहीं. तेल, तूप, मध व औषधें या गोष्टी विकण्यांत, हे ब्रह्मन्, काय दोष आहे? ज्या ठिकाणीं डांस नाहींत, मच्छर नाहींत, अशा ठिकाणीं सुखांत वाढलेलीं जनावरें—तीं त्यांच्या आयांचीं लाडकीं आहेत हें समजून सुद्धां—माणसें धरून आणतात व त्यांना पुष्कळ डांस व चिखल असलेल्या प्रदेशांत नेऊन सोडतात. मनुष्यांनीं वहावयास लाविलेल्या भाराच्या ओझ्याखालीं बैल सत्रस्त होतात. परक्यांनीं केलेल्या अविधियुक्त आचरणानें प्राण्यांना त्रास होतो. मनुष्यांच्या हातून घडणारीं हीं कर्में भ्रूणहत्येच्या पातकांहूनहि भयंकर होत. त पातकहि याच्यापेक्षां सौम्य स्वरूपाचें आहे.

जगांत शेती करणें हा धंदा उत्तम आहे, असें समजतात. परंतु, शेतकऱ्याची वृत्ति ही एकप्रकारें दारुण वृत्तीच होय. लोखंडाच्या फाळानें युक्त असलेला नांगर भूमीचें विदारण करितो व त्या भूमीच्या ठिकाणीं असलेल्या जंतूंची हत्या करितो. तसेंच, हे जाजले, त्या शेतकऱ्यानें नांगराला जुंपिलेल्या बैलांकडे पाहिलें तर शेतकऱ्याची वृत्ति दारुण कशी त्याचा प्रत्यय येईल. 'अघ्न्या' हा एक गाय या अर्थाचा वाचक असा शब्द असून त्याचा अर्थ 'जिला मारितां येणें शक्य नाहीं ती' असा आहे. अर्थात् 'अघ्न्या ही संज्ञा ज्या गाईला लाविली जाते तिला मारणें कोणाला बरें शोभेल? बैल किंवा गाय यांचें आलंभन करणारा, यांना मारणारा पुरुष महापापी होय. पूर्वीं एकदां नहुष राजाच्या हातून गाईची व बैलाची हत्या घडली. त्यावेळेस त्याच्या भोंवतालच्या जितेंद्रिय ऋषींनीं त्याला सांगितलें कीं, 'नहुषा, तूं गाईचा म्हणजे मातेचा व वृषभाचा म्हणजे प्रजापतीचाच वध केला आहेस. हें अत्यंत गंभीर असें महापातक तुझ्या हातून घडलें, तुझ्याकरितां आम्हांला आतां पीडा भोगावी लागेल' असें म्हणून त्या ऋषींनीं एकशेंएक रोग निर्माण केले व त्यांना सव भूतांचे ठिकाणीं व प्रजांचे ठिकाणीं संचार करण्यास सोडून दिलें. वृत्रवधामुळें इंद्राच्या पाठीस लागलेली ब्रह्महत्या जशी अग्नि, पृथ्वी, जल व स्त्रियांचें रज अशा चार ठिकाणीं वांटून दिली, तसेंच नहुषाचें पातक एकशें एक ठिकाणीं वांटून त्याचे रोग केले. त्या ऋषींनीं नहुषाला 'तूं भ्रूणहत्या

करणारा आहेस ' असें म्हणून ' आम्हीं तूं केलेल्या यज्ञांत अग्नीमध्यें आहुति घालणार नाहीं. ' असेंहि सांगितलें. पण, असें बोलून गेल्यानंतर त्या सत्य तत्व काय हें जाणणाऱ्या, शांत, दांत अशा महात्म्या ऋषींना ध्यानबलानें खरी वस्तुस्थिति काय होती ती कळून आली. नहुषानें दुष्टबुद्धीनें हेतुपूर्वक हत्या केलेली नाहीं हें जाणून त्यांनीं वरील रोगांचें प्रायश्चित्तहि हेतुपूर्वक केलेल्या गोवधापुरतेंच मर्यादित ठेविलें.

हे जाजले, जगामध्यें अशा प्रकारचे भयंकर व अमंगल आचार प्रचलित आहेत. केवळ पूर्वींच्या लोकांनीं त्यांचें आचरण केलें एवढ्यावरूनच, तूं निपुण असूनहि तुझें लक्ष त्यांच्या दोषांकडे जात नाहीं. कोणताहि धर्म आचरावयाचा झाला तर तो कां आचरावयाचा तें समजून घेऊन—त्याचा हेतु किंवा ध्येय नीट ध्यानांत घेऊन—मग त्याचें आचरण करावें. अमुक एक धर्माचें आचरण लोक करितात एवढ्याचसाठीं आपणहि गतानुगतिकत्वानें त्याचें आचरण करूं नये. हे ब्रह्मन्, जो कोणी मला ठार मारील व जो कोणी माझी निंदा करील ते दोघेहि मला सारखेच आहेत. मला या जगांत प्रियहि कांहीं नाहीं व अप्रियहि कांहीं नाहीं. असा हा जो सर्व भूतांना अभय देण्याचा धर्म, याच धर्माची महात्मे लोक प्रशंसा करितात. धर्मशील माणसें या धर्माचें सतत सूक्ष्म दृष्टीनें अवलोकन करितात व हा तर्कसिद्ध व युक्तिसिद्ध असल्यानें मुनिजन याच धर्माचें सेवन करितात. १२. ३. २६२.

---

## अध्याय २६३ वा.

[ १ तुलाधार–जाजलिसंवाद; पुढें चालू. २. हिंसारहित यज्ञाचें विवेचन. ]

१. जाजलिः—हे तुलाधारा, तूं जो हा अहिंसाधर्म व भूतांना अभयदान देण्याचा धर्म सांगितलास, या धर्माच्या आचरणानें स्वर्गाचीं द्वारें बंद होतील व लोकांची उपजीविकाहि थांबेल. शेतीच्या धंद्यामुळेंच अन्न पिकूं शकतें व त्याच अन्नावर, हे वणिक्पुत्रा, तूंहि जगत आहेस. पशु व औषधि यांच्या योगानेंच मनुष्यांची उपजीविका चालते. यज्ञकर्मेंहि यांच्यामुळेंच घडतात. असें असतां तूं ही नास्तिकपणाची काय बडबड करीत आहेस ? अरे, नुसतें एक कृषिकर्मच थांबविलें तरी तेवढ्यानेंच लोकांची उपजीविका चालण्याची थांबून सर्व व्यवहार एकदम बंद होतील.

**तुळाधार**:—हे जाजले, हिंसा न करितां वृत्ति कशी चालेल तें मीं तुला सांगतों. हे ब्रह्मन्, मीं नास्तिक नाहीं व यज्ञाची निंदाहि करीत नाहीं. पण, खरी गोष्ट अशी आहे कीं, यज्ञाचें रहस्यच पुष्कळांना समजत नाहीं. यज्ञरहस्य जाणणारीं माणसें विरळा आहेत. हे जाजले, ब्राह्मणांनीं केलेल्या यज्ञाला व यज्ञवेत्त्या पुरुषांना मीं नम्रतापूर्वक अभिवादन करितों. ब्राह्मणांनीं आज स्वतःचा स्वाध्यायरूपी यज्ञ टाकून दिला असून ते क्षत्रियांनीं करावयाच्या हिंसाप्रधान यज्ञाच्या मागें लागले आहेत. हे ब्रह्मन्, वेदांतील वाक्यांचें रहस्य बरोबर न उलगडल्यामुळें लोभी, द्रव्यलुब्ध व नास्तिक अशा लोकांनीं वर वर सत्य दिसणारे खोटे आचार प्रचलित केले. हे लोक यज्ञांत असें दान द्यावें, तशी दक्षिणा द्यावी, सदक्षिण यज्ञ श्रेष्ठ होय अशी या यज्ञकर्मांची स्तुति गातात. पुढें लोभी यजमानाला दक्षिणा देण्याचें सामर्थ्य नाहींसें झालें म्हणजे 'सदक्षिण आपण केला' अशी लोकांनीं आपली कीर्ति गावी या लोभानें यज्ञासाठीं त्याला चोरी करावीशी वाटते व त्याच्या हातून अकर्में घडतात. चांगल्या तऱ्हेनें मिळविलेल्या हविर्द्रव्यांनींच देवतांचा संतोष होतो. वाईट हविर्द्रव्यानें होत नाहीं. 'देवतांना हविर्भाग अर्पण करून त्यांची पूजा करावी' असें जें शास्त्रानें सांगितलें आहे त्याचें परिपालन, नमस्काररूपी हविर्द्रव्य, स्वाध्यायरूपी हविर्द्रव्य किंवा निरनिराळ्या प्रकारच्या धान्यांचे हविर्भाग देवतांना अर्पण केल्यानेंहि होतें. शास्त्रोक्त कर्मांची सांगता याही प्रकारांनीं होते. याहि मार्गानें देवतांना पूजा पोहोंचते. त्याला वर सांगितलेले सदक्षिण यज्ञच पाहिजेत असें नाहीं. लोभी माणसांनीं वासना मनांत धरून यज्ञयाग केले तर, किंवा लौकिकासाठीं तळीं विहिरी इत्यादि बांधिलीं तर त्या कर्मांचीं फळें म्हणून त्यांना प्रजाहि तशीच लोभी होणार. लोभी माणसाची संतति लोभी होते, समदृष्टीच्या माणसाची संतति निर्लोभ वृत्तीची होते, असा सामान्य नियम आहे. यजमान व ऋत्विज हे स्वतः जसे सकाम किंवा अकाम असतील, तशीच त्यांची प्रजाहि होते. आकाशांतून ज्याप्रमाणें स्वच्छ पाणी निर्माण होतें, तशीच यज्ञापासून प्रजा निर्माण होते. हे ब्रह्मन् , अग्नीमध्यें टाकिलेली आहुति आदित्यदेवतेपर्यंत पोहोंचते, आदित्यदेवता पृथ्वीवर वृष्टि करते, वृष्टीपासून अन्न निर्माण होतें व अन्नापासून प्रजा निर्माण होते, अशी ही यज्ञापासून प्रजा उत्पन्न होण्याची परंपरा आहे. पूर्वीच्या लोकांना यज्ञांपासून अमुक अमुक फळें आपणांस मिळावीं असा हव्यास नव्हता. देवांच्या तृप्तीसाठींच

यज्ञ करावयाचे अशी त्यांची निष्ठा असल्यानें त्यांनीं केलेल्या यज्ञांचें फळ त्यांना पूर्ण मिळे. जमीन नांगरल्यावांचूनच त्यांना तींतून पीक मिळत असे. ते जगाचें ज कल्याण चिंतीत त्याचें प्रतिफल म्हणून लता औषधि इत्यादिकांना आपोआप फळें व फुलें येत. निर्लोभ वृत्तीचीं जीं मनुष्यें असतात त्यांची 'यज्ञापासून आपणांस कांहीं मिळवावयाचें आहे किंवा यज्ञ आपणांस कांहीं फळ देतो' अशी दृष्टीच नसते. यज्ञापासून आपल्याला कांहीं फळ मिळेल अशा कल्पनेनें जे लोक कसा तरी यज्ञ उरकून घेतात ते पुढच्या जन्मीं दुष्ट, धूर्त, लोभी व द्रव्यैकदृष्टि असे निपजतात. कांहीं तरी पाखंडी मताचे तर्क काढून प्रमाणभूत वेदांना जो अप्रमाण—अशुभ—ठरवितो तो आपल्याच पापकर्मांमुळें पापी लोकांच्या गतीला जातो. त्याला इहलोकीं कधींच ज्ञानप्राप्ति होत नाहीं व तो सर्वदा बद्धच राहतो. कर्तव्यकर्म ही एक अवश्य केलीच पाहिजे अशी गोष्ट आहे. ती न केली तर त्यांत पाप आहे असें ज्ञान ब्राह्मणाला असतें. या जगांत सर्वत्र ब्रह्मरूपच भरून राहिलें आहे, कर्मकर्तृत्वाचा अभिमान आपल्याला लागूं शकत नाहीं, असें ज्ञान ज्याला झालें तो ब्राह्मण होय. अशा ब्राह्मणानें केललें कर्म सदोष जरी असलें तरी तें श्रेष्ठ होय असें आम्हीं ऐकत आलों आहों. अशा विद्वान् ब्राह्मणानें केलेल्या यज्ञांत जरी कुत्रीं, डुकरें इत्यादि अमेध्य पशूंच्यामुळें व्याघात आला तरी त्याचें तें सदोष कर्मसुद्धां मूर्खांनीं केलेल्या सांग कर्मापेक्षां श्रेष्ठ होय. दोषाबद्दलचें प्रायश्चित्त हें दोष हेतुपूर्वक केला असेल त्याला असतें. 'माझें ह कम या विवक्षित दोषामुळें निष्फळ झालें' अशी जाणीव जेथें असेल तेथेंच शास्त्रानें दोषाला प्रायश्चित्त सांगितलें आहे; एरवीं नाहीं. ज्या दोषाला प्रायश्चित्त नाहीं तो वस्तुतः दोषच नव्हे. म्हणून ज्ञान्याचें सदोष कर्महि दोषयुक्त नव्हे. पूर्वीचे लोक सत्याचरणानें वागत व जितेंद्रिय वृत्तीनें असत. हे यज्ञाचेच प्रकार आहेत. हे लोक परमपदाविषयीं आसक्ति धरणारे व त्याच्या लाभांतच संतोष मानणारे, एक दिवस भागला म्हणजे पुढच्या दिवसाची काळजी न करणारे, निर्मत्सर, जीवात्मा व परमात्मा यांच्यांतला भेद तत्त्वतः जाणणारे, स्वतःच्या यज्ञकर्मांतच गढून गेलेले, परब्रह्मस्वरूपासंबंधाच्या वेदवाक्यांचें अध्ययन करणारे व दुसऱ्याचा संतोष करणारे असे होते.

ॐकारस्वरूप परब्रह्माचे ठिकाणीं सर्व देवता वास करतात. असलें हें परब्रह्मरूप ब्रह्मवेत्त्या पुरुषाचे ठिकाणीं वास करितें. म्हणून एक ब्रह्मवेत्ता पुरुष तृप्त

झाला म्हणजे त्याच्या तृप्तीनें सर्व देवता तृप्त होऊन संतोष पावतात. सर्व रसांचें सेवन करून तृप्त झालेला पुरुष ज्याप्रमाणें दुसऱ्या कोणत्याहि पदार्थाची इच्छा धरीत नाहीं—स्वतःच्या तृप्तिसुखाचाच संतोष मानतो—तसाच ज्ञानामृताच्या भोजनानें तृप्त झालेला ब्रह्मवेत्ता आपल्या शाश्वत तृप्तींत सुख मानतो. कार्य कोणतें व अकार्य कोणतें याचा विवेकपूर्वक निश्चय केलेले शहाणे पुरुष धर्म हाच आमचा आधार—धर्म हेंच आमचें सुखाचें साधन—असें मानतात. व आपल्या शरीरांतील जीवसंज्ञक तत्त्वापेक्षां अधिक व्यापक असें परब्रह्मरूप आहे—शारीर आत्म्यापेक्षां निरुपाधिक परब्रह्म अधिक व्यापक आहे—असें ज्ञान या पुरुषांना झालेलें असतें. शास्त्रानें सांगितलेलें ज्ञान ज्यांना समजलें आहे व अनुभवानें ज्ञान उमजलें आहे असे संसारसागर तरून जाऊं इच्छिणारे सात्विक मुमुक्षु पुरुष ब्रह्मपदाला पोहोंचतात. हें ब्रह्मपद अत्यंत पवित्र, दुसऱ्याला पवित्र करणारें, पवित्र माणसांनीं ज्याचा आश्रय केला आहे असें व ज्या ठिकाणीं गेलें असतां शोक, व्यथा आणि पुनरावृत्ति हीं प्राप्त होत नाहींत असें आहे. हे मुमुक्षु पुरुष त्या यशस्वरूपी परब्रह्माला धनानें साध्य होणाऱ्या यज्ञानें आळवीत नाहींत. त्यांना स्वर्गलोकाच्या प्राप्तीची इच्छा नसते. मुमुक्षु लोक सज्जनांनीं आचरिलेल्या मार्गानें जातात व अहिंसेनें साध्य होणारा यज्ञ करितात. त्यांना वनस्पति, औषधि व त्यांचीं फळें व मुळें यांचें ज्ञान असतें. काम्यहेतु मनांत धरणारे फलार्थी, लोभी ऋत्विज यांच्याकडून यज्ञ करवीत नाहींत; या ऋत्विजांच्या भिडेला बळी न पडतां आपलीं कर्में संपलीं तरी लोकानुग्रह करण्याच्या इच्छेनें हे स्वतःलाच यज्ञसाहित्य समजून मानसिक यज्ञ करितात. द्रव्यलोभी ऋत्विज या ब्राह्मणांना नको असतात व त्या ऋत्विजांनाहि हे ब्राह्मण नको असतात. तेव्हां हे धनलुब्ध द्विज केवळ कीर्तीसाठींच यज्ञाचरण करणाऱ्या व मोक्षाची इच्छा नसलेल्या लोकांकडून यज्ञ करवितात, व निर्लोभ वृत्तीचे लोक जे आहेत ते आपल्या आचरणानें प्रजांना स्वर्गप्राप्तीची जोड करून देतात. याप्रमाणें, हे जाजले, सत्पुरुषांचे आचार तदितर पुरुषांच्या आचारांहून पुष्कळ भिन्न असतात. म्हणून, हे ब्रह्मन्, मीं सर्वांभूतीं समदृष्टि ठेवून आचरण करीत असतों.

यज्ञामध्यें हे बुद्धिमान् ब्राह्मणश्रेष्ठ ज्या ज्या देवतांचें यजन करतात त्या त्या देवतांच्या मार्गानें ते जातात. धूमादि देवतांचें यजन केल्यानें कांहीं धूमादि पितृयान पंथानें जातात. तर अर्चिरादि देवतांचें यजन केल्यानें दुसरे कांहीं लोक देवयान

पंथानें जातात. पितृयान पंथानें जाणाऱ्या लोकांना मृत्युलोकांतून स्वर्गलोक व स्वर्गलोकांतून पुनः मृत्युलोक अशा जन्ममरणाच्या फेऱ्यांतून जावें लागतें व देवयान पंथानें जाणाऱ्यांना पुनरावृत्ति नाहीं असें शास्त्र सांगतें. धूमादिक याहि देवताच व अर्चिरादिक याहि देवताच; तेव्हां उभय पंथाच्या लोकांचे मार्ग दिव्यच आहेत. तथापि संकल्पभेदांमुळें त्यांच्या फलप्राप्तींत फार मोठा फरक पडतो. एका पंथाच्या लोकांना जन्ममरणाच्या फेऱ्यांत सांपडावें लागतें तर दुसरे मुक्त होतात. असो.

जे पुरुष सत्यसंकल्प व ज्ञानी आहेत अशा लोकांना नांगरांना बैल जुंपावे लागत नाहींत. बैल त्यांचे नांगर आपोआप खांद्यावर घेतात व वहातात. त्यांच्या चित्तशुद्धीमुळें त्यांना जी एक प्रकारची सिद्धि मिळते, त्या सिद्धीमुळें गाई आपोआप दूध देऊं लागतात. हे सिद्ध पुरुष स्वतःच्या सिद्धीच्या जोरावर यज्ञस्तंभ निर्माण करितात. व विपुल दक्षिणांनीं युक्त असे यज्ञ पार पडतात. योगाभ्यासानें ज्यांनीं आपलें चित्त शुद्ध करून घेतलें आहे अशा सद्बुद्धीच्या पुरुषांनाच यज्ञांत गवालंभन करण्याचा अधिकार आहे. हे ब्रह्मन्, वनस्पति, औषधि इत्यादिकांच्या साहाय्यानें देवतांचें यजन करण्याची योग्यता त्यांनाच आहे, इतरांना नाहीं. हे जाजले, वासनात्यागाचें महत्त्व इतकें मोठें आहे म्हणून त्यागप्रधान यज्ञकर्मांचें मी तुजजवळ आतांपर्यंत विवेचन केलें. ज्याला कधीं कोणाजवळ कांहीं मागावयाचें नसतें, ज्याला स्वतःचें असें कांहींच कार्य नसतें, नमस्कार किंवा स्तुति यांचा हव्यास ज्याला नसतो, ज्याच्या सर्व कर्मांचा क्षय झालेला असतो व जो अक्षीण असतो त्यालाच देव ब्रह्मनिष्ठ पुरुष असें समजतात. हे जाजले, अध्ययन, यज्ञ व दान हीं कर्में ज्याच्या हातून घडत नाहींत त्याला कोणती गति मिळणार ? वासनात्मक वृत्तीची इच्छा धरणाराला कोणतीच गति नाहीं. एकाद्या देवतेचें पूजन जितक्या भक्तीनें व यथासांग रीतीनें आपण करितों, तितक्याच निष्ठेनें या साम्यधर्माचें आपण आचरण केलें तर त्यानें मात्र यज्ञस्वरूपी परमात्म्याची प्राप्ति खास होईल.

जाजलिः हे तुलाधारा, अशा प्रकारें मानसिक यज्ञ करणाऱ्या मुनींचें हें धर्मरहस्य आम्हीं आजपर्यंत ऐकिलें नव्हतें. हे वणिजा, हें धर्मतत्त्व कठिण आहे आणि म्हणूनच तें मीं तुला विचारीत आहें. प्राचीन काळच्या ऋषींनीं या धर्माचें आलोचन केलेलें नव्हतें व हा धर्म अत्यंत गूढ व गहन असल्यामुळें यापुढेंहि त्या धर्माची प्रवृत्ति हे ऋषि लोकांमध्यें करणार नाहींत. आतां, पशू-

प्रमाणें मंदबुद्धि असलेल्या या लोकांना शरीररूपी यज्ञभूमीचे ठिकाणीं जर यज्ञ करतां येत नसेल—त्यांच्या हातून तो घडत नसेल—तर त्यांना कोणत्या कर्मानें सुखप्राप्ति होते तें हे वणिक्पुत्रा, मला सांग. तुझ्याबद्दल मला अत्यंत आदर वाटतो व म्हणूनच तुजवर माझी श्रद्धा बसली आहे.

तुलाधारः दांभिकांनीं केलेले यज्ञ हे त्यांची त्यांवर श्रद्धा नसल्यानें करून न करून सारखेच होतात. असल्या दांभिक मनुष्यांना मानसिक काय किंवा प्रत्यक्ष द्रव्ययुक्त काय कोणत्याच प्रकारच्या यज्ञाचा अधिकार नसतो. पण, जे श्रद्धाळु अंतःकरणाचे पुरुष आहेत त्यांचा यज्ञ एका गाईनेंच परिपूर्ण होतो. कारण, यज्ञाला लागणारीं तूप, दूध, व दहीं हीं होमद्रव्यें; तशींच पूर्णाहुतिद्रव्येंहि पण या गाईपासूनच मिळतात. असा यज्ञ करण्याचें सामर्थ्य ज्यांना नाहीं त्यांनाहि यज्ञफल प्राप्त करून देण्यास ही गायच कारणीभूत होते. कारण, गोपुच्छावर पितृतर्पण केल्यानें, गाईच्या शिंगानें अभिषेक केल्यानें व गोरज अंगावर घेतल्यानें यज्ञकर्माचेंच फल प्राप्त होतें. मोठमोठाले यज्ञ पत्नीच्या सहाय्यावांचून पूर्ण होत नाहींत हें खरें; तथापि, गोमय होमद्रव्यांनीं साध्य होऊं शकणाऱ्या यज्ञाच्या मार्गानें तूप, दूध, दहीं इत्यादि होमद्रव्यें देवतांना अर्पण करून मानसिक श्रद्धा हीच पत्नी होय असें हा पुरुष मानतो. होमद्रव्यांच्या साधनानें श्रद्धायुक्त अंतःकरणानें देवांचें यजन केलें, म्हणजे तो यज्ञ सपत्नीक केला असें होऊन त्याची पूर्णता होते. या यज्ञालाच देवाप्रमाणें मानून श्रद्धायुक्त अंतःकरणानें त्याचें आचरण केलें म्हणजे यज्ञस्वरूपी भगवान् विष्णूची प्राप्ति होते. ज्या ज्या यज्ञांतून पशूचें हवन करावें लागतें तेथें तेथें पुरोडाशाचें हवन शास्त्रोक्त म्हणून मानिलें आहे. हे जाजले, ज्ञानी पुरुषाला सर्वच नद्या सरस्वतीसारख्या आहेत, सर्वच पर्वत त्याच्या दृष्टीनें पवित्र होत. आपला विशुद्ध आत्मा हेंच तीर्थ आहे. तेव्हां तीर्थयात्रेसाठीं म्हणून तूं देशांतराला जाऊं नकोस. आतां सांगितले अशा प्रकारचे धर्म जो आचरतो, मनुष्याची फलासक्ति, सामर्थ्य व ज्ञान यांच्या तारतम्यानें जो धर्मरहस्य समजून घेतो त्याला हे जाजले, शुभ लोकांची प्राप्ति होते.

भीष्म—हे युधिष्ठिरा, अशा प्रकारचे हे युक्तिवादाला पटलेले, नित्य सज्जनांनीं आचरलेले असे धर्म तुलाधारानें जाजलीला सांगितले. १२. ३. २६३.

---

## अध्याय २६४ वा.

[ १. अहिंसा–धर्माचें पक्षिमुखानें पुनः कथन. २. श्रद्धाप्रशंसा. ]

**तुलाधारः**—सज्जन काय किंवा दुर्जन काय, सर्वांनींच आचरिलेला हा धर्ममार्ग नीटपणें प्रत्यक्ष पाहून घे. म्हणजे हा मार्ग कसा आहे व त्याचें फल काय हें तुला यथातथ्य रीतीनें कळून येईल. या ठिकाणीं हे पुष्कळ पक्षी आपल्या सभोंवतीं विहार करीत आहेत. यांत तुझ्या मस्तकावर वाढलेले पक्षी आहेत, श्येन आहेत तसेच दुसरेहि कित्येक अन्य जातीचे पक्षी आहेत. हे ब्रह्मन्, हे पक्षी सर्व बाजूंनीं आपले हातपाय पोटाशीं आंखडून घेऊन आपापल्या घरट्यांतून प्रवेश करण्याच्या बेतांत आहेत. तूं या पक्ष्यांना आपल्या मस्तकावर घेऊन वाढविलेंस तेव्हां तूं त्यांना निःसंशय पित्यासारखा आहेस. तुझा पित्याचा शब्द ते पक्षी मानतील. तुला पुत्रासारखे असणारे हे जे पक्षी त्यांना हांक मार. त्यांच्यापासून तुला धर्मरहस्य कळून येईल.

**भीष्म**—तेव्हां त्या जाजलीनें त्या पक्ष्यांना हांक मारिली. त्याची हांक ऐकतांच ते पक्षी येऊन जाजलीच्या धर्मविषक प्रश्नांचीं निःशंकपणें उत्तरें देऊं लागले.

**पक्षी**—हिंसायुक्त व अहिंसायुक्त अशा दोन्ही प्रकारच्या कर्मांचें फल इहपर लोकीं प्रत्यक्ष भोगावें लागतें. हिंसायुक्त कर्मानें मनुष्याच्या मनांतील श्रद्धेचा नाश होतो; व श्रद्धा नष्ट झाली म्हणजे त्या हिंसायुक्त कर्में करणाराचाहि नाश होतो. हे ब्रह्मन्, ज्यांची बुद्धि सर्वत्र सम आहे, ज्यांच्या अंतःकरणांत श्रद्धा वागत आहे, जे जितेंद्रिय आहेत, शांत आहेत, कोणताहि फलोद्देश मनांत न धरतां केवळ करावयाचा म्हणून जे यज्ञ करितात अशा लोकांनींसुद्धां यज्ञ करूं नये असें नाहीं. हे द्विजा, चित्स्वरूप ईश्वरावरची श्रद्धा ही सूर्याप्रमाणें तेजस्वी असा जो सत्वगुण त्या सत्वगुणापासून उत्पन्न झालेली आहे. ही सात्विक श्रद्धाच आपलें रक्षण करते व पुढील जन्मीं शुभप्रद जन्म देते. संशयात्मक मन हें निश्चयात्मक श्रद्धेच्या अलीकडचें आहे. व वाचा त्या मनाहूनहि अलीकडची आहे. वाचेनें केलेला जप व मनानें केलेलें ध्यान या दोहोंपेक्षांहि श्रद्धा श्रेष्ठ होय. वाचेच्या स्खलनानें उत्पन्न झालेला दोष श्रद्धेनें नाहींसा होतो. मानसिक व्यग्रतेनें—एकाग्रतेच्या अभावामुळें—उत्पन्न होणारा ध्यानदोष श्रद्धा नाहींसा करते. पण, श्रद्धेच्या अभावामुळें उत्पन्न झालेला दोष मात्र वाचा आणि मन या दोघांनाहि नाहींसा करतां येत नाहीं. याविषयीं इतिहासज्ञांनीं ब्रह्मदेवांनीं सांगितलेली म्हणून एक आख्यायिका सांगितली आहे.

ज्याचा देह वरून पवित्र पण अंतरंग अश्रद्धेनें भरलेलें असा एक, व वरून अमंगळ पण श्रद्धाळू अंतःकरणाचा असा एक अशीं दोन माणसें घेतलीं तर त्या दोघां-चेंहि द्रव्य यज्ञकर्माला सारखेंच योग्य ठरतें असें देवांनीं मानलें आहे. कृपण असलेला कर्मनिष्ठ ब्राह्मण व उदारबुद्धीचा धान्यविक्रय करणारा व्यापारी या दोघांचेंहि अन्न भक्ष्याभक्ष्यविचाराच्या दृष्टीनें सारख्याच योग्यतेचें होय असें देवांनीं विचार करून ठरविलें. परंतु, प्रजापति ब्रह्मदेव देवांना म्हणाला कीं, 'हा निकाल देण्यांत तुम्हीं अन्याय करीत आहां. कारण उदारबुद्धीच्या पुरुषाचें अन्न श्रद्धेच्या पावित्र्यामें रंगलेलें असतें, तर कृपणाचें अन्न अश्रद्धेनें मारलेलें असतें. तेव्हां उदारबुद्धीच्या धान्यविक्रय करणाऱ्या व्यापाऱ्याचें अन्न भक्षणीय होय व कृपणाचें अन्न त्याज्य होय. जगांत देवतांना हविर्भाग अर्पण करण्याचा अधिकार फक्त अश्रद्ध माणसाला तेवढाच नसतो. त्याचें एकट्याचेंच अन्न भक्षण करूं नये—वर्ज्य मानावें—असें धर्मवेत्ते पुरुष सांगतात. अश्रद्धा हें सर्व पापांत भयंकर असें पाप होय. श्रद्धा हीच मनुष्याला पापविमुक्त करते. सापानें कात टाकावी त्याप्रमाणें श्रद्धावान् मनुष्य पापाचा त्याग करितो. श्रद्धा-युक्त अंतःकरणानें जो निषिद्ध कर्मांपासून परावृत्त होतो त्याची ती निवृत्ति हीच पवित्रांतील पवित्र गोष्ट होय. ज्याच्या स्वभावामधील रागद्वेषादि दोष सर्व नाहींसे झाले आहेत, असा श्रद्धावान् पुरुष हाच शुचित्वाचा अवतार होय. तपश्चर्या, आचार, किंबहुना, स्वतःचें शरीर या गोष्टींशीं त्याला कांहींच कर्तव्य नसतें. मनुष्य हा श्रद्धारूपच असतो; कारण ज्याची जशी श्रद्धा तसा तो तद्रूपच असतो.

हे महाप्राज्ञ जाजले, धर्मशास्त्र जाणणारे जे सज्जन लोक आहेत, त्यांनीं हा धर्म सांगितलेला आहे. हा धर्म जाणण्याची आम्हांला जिज्ञासा झाल्यामुळें धर्मदर्शन नांवाच्या मुनीनें तो आम्हांला सांगितला. तेव्हां, हे बुद्धिमंता, श्रद्धासंपन्न हो म्हणजे तुला परमपदाची प्राप्ति होईल. ज्याच्या अंतःकरणांत भाव आहे, वेद-वचनांवर विश्वास जो ठेवितो, व जो आपल्या मार्गानें चालतो तोच पुरुष सर्व-श्रेष्ठ होय.

भीष्म—पुढें लौकरच तुलाधार आणि तो जाजलि हे दोघेहि स्वर्गलोकाला गेले व त्या महाप्राज्ञ पुरुषांनीं तेथील सुखांचा यथासंभव उपभोग घेतला. आपा-पल्या कर्मांनीं मिळविलेल्या योग्य अशा स्थानाला ते दोघेहि गेले. असो.

अशाप्रकारें त्या तुलाधारानें नानाप्रकारच्या अर्थांनीं भरलेलें भाषण करून जाजलीचा योग्य तऱ्हेनें उपहास केला, व त्याला सनातन धर्म सांगितला. हे कौंतेया, त्या प्रथितवीर्य तुलाधाराचीं तीं भाषणें ऐकून तो जाजलि ब्राह्मण अत्यंत समाधान पावला. अशाप्रकारचें नानाविध दृष्टांतांनीं भरलेलें अर्थयुक्त भाषण त्या तुलाधारानें केलें. हे युधिष्ठिरा, आणखी काय ऐकण्याची तुझी इच्छा आहे, तें सांग. १२. ३. २६४.

## अध्याय २६५ वा.

[ विचख्नु गीत. ]

भीष्म—यासंबंधीं आणखी एक पुरातन इतिहास सांगत असतात. प्रजांवर दया करण्याच्या उद्देशानें राजा विचख्नु यानें केलेलें भाषण हाच तो इतिहास. तो मीं तुला सांगतों ऐक.

एकदां एका यज्ञभूमीवर गवालंभनपूर्वक यज्ञ चालला असतांना छिन्न केलेलें तें बैलाचें शरीर, त्याच्याभोंवतीं हंबरडे फोडणाऱ्या त्या गाई व हवन करीत असलेले ते निर्दय ब्राह्मण असा सगळा देखावा त्या राजानें पाहिला. तेव्हां 'या गाईचें कल्याण होवो' असें निश्चित स्वरूपाचें वचन त्या राजानें उच्चारिलें व तेथें यज्ञांत हिंसा सुरू झाली असतांना अशा प्रकारचा आशीर्वाद दिला. हिंसाप्रधान यज्ञ क्षत्रियांचा, व अहिंसाप्रधान यज्ञ ब्राह्मणांचा ही मर्यादा विसरलेल्या, ईश्वराच्या अस्तित्वावर विश्वास नसलेल्या, विमूढ, यज्ञादिकांच्या द्वारानेंच लोकांत आपली कीर्ति वाढावी अशी इच्छा धरणाऱ्या संशयात्म्या लोकांनीं हिंसेचें वर्णन केलें आहे. कोणत्याहि कर्मामध्यें हिंसा करूं नये असें धर्मात्म्या मनूचें वचन आहे. यज्ञांत किंवा यज्ञवेदीच्या बाहेर कोठेंहि मनुष्याच्या हातून हिंसा जी घडते ती केवळ वासना-लोभानें होय. त्याला शास्त्राचा आधार नाहीं. म्हणून शास्त्रवचन हेंच प्रमाण मानून, ज्ञात्या पुरुषानें सूक्ष्म अशा धर्माचें आचरण करावें. सर्व प्राणिमात्रांच्या दृष्टीनें अहिंसा ही सगळ्या धर्मांत श्रेष्ठ होय. गांवाच्या जवळच पण शिंवेच्या बाहेर राहून, अतिशय तीव्र असें व्रताचरण करून, काम्यकर्मांचा विधि सांगणाऱ्या फलश्रुतियुक्त वेदवचनांचा त्याग करून, काम्यकर्मांचा आचार हाच अनाचार होय असें मानून, फलाभिसंधिपूर्वक कर्में करणारे लोक क्षुद्र असें जाणून मनुष्यानें सूक्ष्म अहिंसाधर्माचें आचरण करावें. यज्ञ, वृक्ष, व यज्ञस्तंभ

यांच्या निमित्तानें मनुष्यांनीं केलेलें मांसभक्षण हें अधर्म्य नव्हे असें कांहींजण समजतात. परंतु हा धर्म प्रशस्त नाहीं. सुरा, मासे, मांस, आसव व तिलमिश्रित भात, असलें अन्न खाण्याचा प्रघात धूर्त व लबाड लोकांनीं पाडलेला आहे. ह्या अन्नाचें भक्षण वेदविहित नाहीं. मान, मोह व लोभ यांच्यामुळें हें जिव्हालौल्य उत्पन्न झालें आहे. जाणते ब्राह्मण सर्व यज्ञांत विष्णु हीच प्रधान देवता असें मानतात. त्याचें यजन पायसान्नानें, फुलांनीं व वेदामध्यें जे वृक्ष यज्ञार्ह म्हणून सांगितले आहेत त्यांच्या समिधांनीं करावें असें शास्त्र सांगतें. ज्यांच्या मनाचा भाव शुद्ध आहे, अशा पुण्यशील विशुद्ध पुरुषांनीं सुसंस्कृत केलेलें असें जें जें कांहीं असेल तें परमेश्वराला अर्पण करण्याला योग्य होय.

**युधिष्ठिर**—आपत्ति या मनुष्यशरीराचा नाश इच्छितात व मानवी शरीर आपत्तींचा नाश व्हावा अशी इच्छा धरतें. तेव्हां, आत्यंतिक अहिंसाव्रतानें निष्कर्मी बनलेल्या पुरुषाची शरीरयात्रा कशी चालेल ?

**भीष्म**—ज्याप्रकारें शरीराला ग्लानि येणार नाहीं व तें मृत्युवशहि होणार नाहीं अशाच प्रकारानें कर्में करून समर्थ पुरुषानें धर्माचरण करावें. १२.३.२६५.

## अध्याय २६६ वा.

[ चिरकारिकाचें उपाख्यान. २ मातापितरांच्या योग्यतेचें वर्णन. ]

**युधिष्ठर**—कार्य कोणतें व अकार्य कोणतें याची परीक्षा लवकर वा उशीरा, कशी करावी तें हें पितामहा, आपण मला सांगा. कार्याकार्याबद्दलच्या ज्या अड-चणी आम्हांला येतात त्यांत आपणच आम्हांला गुरुस्थानीं आहांत.

**भीष्म**—याहीबद्दल पूर्वीं अंगिरस ऋषीच्या कुळांतील जो चिरकारी त्याच्या-संबंधीं घडलेला एक पुरातन इतिहास सांगतात, तो मीं तुला सांगतों. चिरका-रिका तुझें कल्याण असो. कोणत्याहि कार्याचा नीट विचार करून घाईनें कार्य न करणारा बुद्धिमान् मनुष्य प्रायः कर्मांच्या संबंधांत प्रमाद करीत नाहीं.

गौतम नांवाच्या ऋषीला चिरकारी नांवाचा एक अत्यंत बुद्धिमान् मुलगा होता. कोणतेंहि कार्य करावयाचें झालें तर त्याचा सर्व बाजूंनीं विचार करून तो तें सावकाशपणानें करीत असे. तो प्रत्येक गोष्टीचा चिरकाल विचार करीत असे. चिरकालपर्यंत जागत असे. चिरकालपर्यंत झोंपहि घेई. कोणत्याहि कार्याला

लागावयाचें तर तो सावकाशपणानें आरंभ करी. त्याच्या ह्या स्वभावामुळें त्याला चिरकारी असें नांव पडलें. कोत्या बुद्धीचीं व अदूरदर्शी माणसें त्याला अल्पबुद्धीचा व आळशी म्हणत; अलस हें नांवच त्याला त्या लोकांनीं दिलें होतें.

एके समयीं या चिरकारिकाच्या मातेच्या हातून व्यभिचारकर्म घडलें. तेव्हां त्याचा बाप गौतमऋषि यानें इतर पुत्रांना बाजूला ठेवून या चिरकारिकालाच अशी आज्ञा केली कीं, ' ह्या तुझ्या जननीला ठार मार. ' अशी आज्ञा करून तो महाभाग गौतम कसलाच विचार न करितां वनांत गेला. चिरकारिकाच्या नेहमींच्या स्वभावाप्रमाणें त्यानें बराच वेळ विचार करून ' ठीक आहे ' असें उत्तर केलें, व पुढें प्रत्यक्ष वध करावा कीं नाहीं याबद्दल त्यानें बराच विचार केला. " मीं पित्याची आज्ञा कशी मोडूं; व न मोडूं तर आईचा वध कसा करूं ? एकाद्या पापी माणसाप्रमाणें मीं या धर्मच्छलांत—संकटांत—सांपडूं नये याला उपाय काय ? पित्याची आज्ञा पालन करणें हा परम धर्म व मातृरक्षण करणें हा तर आद्य स्वधर्मच होय. पुत्रत्व म्हणजे पराधीनपण हें तर खरेंच; पण आतांच्या या संकटांत मला याची बाधा न व्हावी म्हणून मीं काय करूं ? आधीं स्त्रीवध, आणि त्यांतहि मातृवध ! असलें भयंकर पाप करून कधीं कोणाला सुख लागलें आहे ? बरें, पित्याची अवज्ञा करून तरी आजपर्यंत कोण प्रतिष्ठेला चढला ? पित्राज्ञेची अवज्ञा न करणें हें युक्त असून मातृरक्षण हेंहि अवश्य आहे. आई व बाप दोघेंहि वंद्य. तेव्हां, पित्राज्ञाभंग किंवा मातृवध यांपैकीं कोणतेंहि कर्म केलें तरी तें पातकच ठरणार. मग ह्या पातकाचा दोष माझ्या अंगास कसा बरें चिकटणार नाहीं ? पिता हा जायेच्या ठिकाणीं पुत्ररूपानें आपलेंच आधान करीत असतो. ' पतिर्जायां प्रविशति गर्भो भूत्वेह जायते ' असें वचन आहे. स्वतःचें शील, चारित्र, गोत्र व कुल हीं कायमचीं टिकावीं व त्यांचें संवर्धन व्हावें एवढ्याचसाठीं पिता पुत्ररूपानें फिरून अवतार घेतो. माझा पिता व माझी माता या दोघांनींहि मला पुत्रधर्म पालन करण्यासाठींच जन्माला घातलें आहे. आतां या ठिकाणीं पुत्रधर्माचें पालन कसेंहि केलें तरी पातक लागणारच. ह्या दोघांनीं मला जन्म दिला हें ज्ञान मला आहे. ही जाणीव यावेळीं मला विसरतां आली तर बरें होईल. या संकटांतून मीं मुक्त कसा होऊं ? याला उपाय काय ? ' अश्मा भव, परशुर्भव ' ( दगडाप्रमाणें किंवा परशुप्रमाणें कठिण होऊन माझ्या शत्रूंचा उच्छेद कर ) असें जातकर्म

संस्काराच्या वेळीं पिता म्हणतो व उपाकम नांवाच्या संस्काराचे वेळीं ‘ आत्मा वै पुत्र नामासि ’ असें म्हणून पिता पुत्राच्या मस्तकाचें अवघ्राण करतो. पित्याचें श्रेष्ठत्व सिद्ध करण्याला हा निर्णायक स्वरूपाचा पुरावा पुरेसा आहे. शरीराचें पोषण करणें व अध्यापन करणें हीं कर्मे करणारा गुरु हाच परम श्रेष्ठ व पहिल्या प्रतीचा धर्म होय. ‘ पिता जें सांगेल तोच धर्म होय ’ असें वेदांनींहि निश्चितपणानें सांगितलें आहे. पुत्र पित्याला प्रेम ही एकच गोष्ट देऊं शकतो. पिता मात्र पुत्राला सर्वस्व देतो. शरीर आदिकरून जें जें कांहीं देतां येण्यासारखें आहे, तें तें सर्व एकटा पिता पुत्राला देतो. म्हणून पित्याचें वचन ताबडतोब पाळावें. त्याची चिकित्सा करीत बसूं नये. पित्याची आज्ञा पाळण्यांत पातक जरी असलें तरी पित्राज्ञा पाळण्याच्या धर्माचरणानें तें पातक नष्ट होतें. सर्व प्रकारचे सुखोपभोग, अन्नवस्त्रादिक शरीरयात्रेला अवश्य असणाऱ्या गोष्टी, वेदाध्ययन, सर्व प्रकारचे लौकिक व्यवहार, गर्भाधान, सीमन्तोन्नयनादि संस्कार इत्यादि सर्व गोष्टींत पित्याचें वचनच प्रमाण होय. पिता हाच स्वर्ग, पिता धर्म, पिता हें परमोच्च प्रकारचें तप होय. एकट्या पित्याचा संतोष झाल्यानें सर्व देवतांचा संतोष होतो. ज्या कर्मांचें पित्याकडून अभिनंदन होतें अशीं कर्में केल्यानें मनुष्य सर्व पापांपासून मुक्त होतो. देंठ हा फुलाचा आधार, झाड हा फळांचा आधार म्हणजे त्यांचा पिता ही गोष्ट खरी. पण, फूलसुद्धां देंठापासून सुटतें, फळहि झाडांवरून पडतें. स्वतःला कितीहि क्लेश झाले तरी पिता पुत्राला स्नेहपाशांनी गुंतवून ठेवून त्याला सोडीत नाहीं. पुत्राला बाप किती पूज्य आहे याचें चिंतन आतांपर्यंत केलें. पित्याची योग्यता लहानसहान नाहीं. आतां मातृगौरवासंबंधीं चिंतन करूं.

माझ्या या मर्त्य शरीरामध्यें जो पंचमहाभूतांचा समुदाय आहे, त्याचें अधिष्ठान माझी जननी होय. अरणीमधून जसा अग्नि निर्माण होतो त्याप्रमाणें जननीपासून माझा पंचभौतिक देह निर्माण झाला आहे. माता ही पुत्राच्या देहाची अरणी होय. पुत्राला कोणतेंहि दुःख झालें तरी त्याची समाधानाची एकच जागा म्हणजे माता होय. ज्याला माता आहे तो सनाथ व मातृवियोगाचें दुःख ज्याला भोगावें लागतें तो अनाथ होय. मनुष्य कितीहि दरिद्री असला तरी तो जर ‘ आई ’ म्हणून आईला हांक मारीत घरीं येत असेल, मातृच्छत्र जर त्याच्या डोक्यावर असेल तर त्याला शोक करण्याची पाळी येत नाहीं व जरा त्याचें आक्रमण करूं शकत नाहीं. मनुष्य कितीहि म्हातारा

झाला तरी आपल्या आईचा तो बाळच असतो. मुलें व नातवंडें यांनीं युक्त असलेल्या पुरुषावर जर मातृच्छत्र असेल तर तो जरी शंभर वर्षांचा म्हातारा असला तरी आईजवळ दोन वर्षांच्या मुलासारखाच वागेल. मुलगा श्रीमान असो वा दरिद्री असो, कृश असो वा पुष्ट असो, तो कसाहि असला तरी माता त्याचें रक्षण करतेच करते. मुलाचें योग्य प्रकारानें रक्षण करणारा आईखेरीज कोणीहि नाहीं. पुत्राला आईचा वियोग ज्या दिवशीं होईल त्या दिवशीं तो म्हातारा होतो, त्याच दिवशीं तो दुःखी होतो. त्याच दिवशीं त्याला सर्व जग शून्य होतें. जगांत आईसारखी छाया नाहीं, आईसारखें आश्रयस्थानहि नाहीं. आईसारखें रक्षण या जगांत कोणाच्याच हातून होत नाहीं, व आईपरतें प्रियहि या जगांत कांहींच नाहीं. माता मुलाला उदरांत धारण करिते म्हणून ती धात्री, जन्म देते म्हणून जननी, मुलाच्या शरीराचें संवर्धन करिते म्हणून अम्बा, माता वीरपुरुषाला जन्म देते म्हणून ती वीरसू होय. शिशूचें शुश्रूषण माता करिते म्हणून तिला शुश्रू असें नांव आहे. माता हें आपलेंच दुसरें शरीर होय. अशा मातेला, ज्याचें डोकें रस्त्यांत पडलेल्या पोकळ भोंपळ्यासारखें झालेलें असेल, ज्याच्या डोक्यांतील मेंदू नाहींसा होऊन तें पोकळ बनलें असेल, अशा पुरुषाखेरीज इतर कोणीहि ज्ञाता मनुष्य ठार करणार नाहीं.

दंपत्याचे समागमकालीं, आपल्याला पुत्र व्हावा अशी इच्छा आई व बाप या दोघांच्याहि मनांत असते. परंतु पित्यापेक्षां मातेचीच इच्छा अधिक बलवत्तर असते. आईला माहीत असेल तेंच मुलाचें गोत्र. मुलगा कोणाचा हेंहि पण आईलाच माहीत असतें. गर्भधारणेच्या कालापासूनच आईला मुलाबद्दल आनंद वाटतो, व ती त्याच्यावर प्रेम करिते. हें जरी खरें, तरी प्रजा ही वस्तुतः बापाचीच ठरते. एखाद्या स्त्रीचें पाणिग्रहण करून, तिच्यासहवर्तमान सर्व धार्मिक कृत्यें करून, 'धर्मे चार्थे च कामे च नातिचरामि' अशी शपथ वाहून जर पुरुष परस्त्रीगमन करूं लागला तर त्याला कोणीहि पूज्य मानणार नाहीं. स्त्रीचें भरण–पोषण–करितो तो भर्ता व पालन करितो तो पति होय. या गुणांपासून जो निवृत्त होतो–स्त्रीचें पालनपोषण जो करीत नाहीं, तो भर्ताहि नव्हे व पतीहि नव्हे. व्यभिचारकर्मांच्या अपराधांत स्त्री ही अपराधी नाहीं. खरा अपराधी पुरुषच होय. स्त्रियांच्या परपुरुषगमनाच्या पातकापेक्षां पुरुषाचें परस्त्रीगमनाचें पातक अधिक गंभीर स्वरूपाचें होय. म्हणून ह्या महादोषाचे आचरणाच्या बाबतींत पुरुष हा एकटाच अपराधी असतो; तोच खरा

दोषी होय. भर्ता हें स्त्रीचें सर्वस्व होय. तेंच तिचें परमदैवत आहे. माझ्या मातेच्या संबंधांत व्यभिचाराचा दोष तिजवर येतच नाहीं; कारण, इंद्र हा तिजकडे माझ्या पित्याचें रूप घेऊन आला होता. तेव्हां, आपलें सर्वस्व जो पति त्याचें रूप घेऊन आलेल्या इंद्राला नकळत पति समजून तिनें शरीरदान केलें यांत तिचा दोष नाहीं. स्त्री व पुरुष यांत स्त्री ही अबला असून पुरुषाच्या आधीन असल्यामुळें सर्व बाबतींत ती अपराध्य आहे. म्हणजे दुसरे तिच्याकडून अपराध करवितात. ती स्वतः कधींच अपराध करीत नाहीं. या कारणासाठीं सुद्धां स्त्रियांचा अपराध कधींच नसतो व पुरुषच सदासर्वदा अपराधी असतो असेंच ठरतें. आपल्या भोगेच्छेच्या तृप्तीसाठीं स्त्रीनें आपण होऊन जेथें भोगदान मागितलें नाहीं, अशा ठिकाणीं तिला संभोगसुखाची आठवण करून देणाऱ्या पुरुषाच्याच अंगीं व्यभिचाराचा अधर्म चिकटतो यांत संशय नाहीं. तेव्हां, एक तर स्त्री व तशांत माता म्हणून अत्यंत पूज्य अशी स्त्री सर्वथा अवध्य होय, हें अज्ञान पशूंना देखील समजेल. पिता हा सर्व देवतांचा एकत्र झालेला समुदाय, त्याच्या ठिकाणीं सर्व देवतांचें वास्तव्य असतें. पितृतोषणानें स्वर्गप्राप्ति होईल. पण, सर्व मर्त्य व देवता यांचा समुदाय मातेभोवतीं प्रेमानें गोळा होतो. पिता हा परलोकींचें सुख देतो तर माता ही इहपरलोकींच्या सुखाचें साधन—हा वात्सल्याचा ठेवा—आहे. तेव्हां आईचीच योग्यता अधिक होय. ”

अशाप्रकारें तो चिरकारिक आपल्या स्वभावाप्रमाणें पुष्कळ वेळ विचार करीत असतांना बराच काळ निघून गेला. व पुढें त्याचा वनांत गेलेला पिता, महाप्राज्ञ तपस्वी गौतम माघारा आला. इतक्या दीर्घ कालांत आपली पत्नी आपल्या पुत्राच्या हातून मरणहि पावली असेल असा विचार त्याच्या मनांत येऊन, अध्ययन व धैर्य यांच्या संस्कारामुळें पश्चात्ताप पावलेला तो महात्मा गौतम दुःखाश्रु गाळीत व्यथित अंतःकरणानें म्हणतोः

गौतम—पूर्वी त्रिलोकाधिपति इंद्र हा ब्राह्मणाचें रूप घेऊन अतिथि म्हणून माझ्या आश्रमांत आला. मीं त्याला मधुर शब्दांनीं संतुष्ट केलें. त्याचें स्वागत करून पूजा केली. अर्घ्य—पाद्य इत्यादि उपचारहि मीं त्याला योग्य तऱ्हेनें अर्पण केले. त्याचा संतोष व्हावा म्हणून ‘ मीं तुझा दास आहें ’ अशा प्रकारचीं नम्रतेचीं भाषणेंहि केलीं. या सगळ्या गोष्टींचा विचार करितां, झालेल्या अनिष्ट प्रकारांत माझ्या पत्नीचा अपराध नाहीं. इंद्रानेंच आपला स्नेह ओळखला नाहीं.

खरें पाहूं गेलें तरी माझी पत्नी, मी किंवा पांथ म्हणून आलेला देवाधिपति इंद्र यांपैकीं कोणाचाच हा अपराध नव्हे. धर्माचरणाच्या बाबतींत माझ्याकडून घडलेल्या प्रमादाचेंच हें फल असलें पाहिजे. धर्माचरणाच्या बाबतींत सावधपणा न राखल्यामुळें ईर्ष्या उत्पन्न होते, व ईर्ष्येमुळेंच नानाप्रकारचीं संकटें येतात, असें ऊर्ध्वरेते मुनि सांगतात. मला ईर्ष्येची बाधा झाली, म्हणून मीं पापसागरांत बुडालों. आर्धी स्त्री, त्यांत साध्वी, तशांतहि माझ्या दुःखानें दुःखित होणारी व जिचें पोषण करणें हें माझें कर्तव्य अशी माझी वासिता भार्या हिला मीं माझ्या व्यसनितेमुळें मारलें आहे. आतां या संकटांतून मला कोण सोडवील? या बाबतींत मातेचा वध करण्याबद्दल मी उदारधी चिरकारिकाला आज्ञा केली होती. आपल्या स्वभावाप्रमाणें तो येथेंहि चिरकारीच ठरला तर तोच माझें या पातकापासून रक्षण करील. चिरकारिका, तुझें कल्याण असो. आज जर तूं चिरकारी झालास तर तुझ्या चिरकारित्वाचें सार्थक झालेंसें होईल. तूं आज चिरकारी होच आणि आपल्या मातेचें, माझें, माझ्या तपोबलाचें व तुला लागणाऱ्या पातकापासून आपलेंहि रक्षण कर. चिरकारित्व हा तुझा स्वभावच आहे. तुझ्या तीव्र अशा बुद्धिमत्तेमुळें तुझें चिरकारित्व आज सफल होऊं दे. वत्सा, आज तूं चिरकारिकच हो. तुझ्या जन्मापूर्वीं तुझ्या मातेनें 'तूं आपल्या पोटीं यावास' अशी इच्छा चिरकालपर्यंत केली होती. तिनें चिरकालपर्यंत तुला आपल्या उदरांत वागविलें. हे चिरकारिका, तूं आपलें चिरकारित्व आज सफळ कर. घाईनें काम करण्यापासून आपलाच संताप होतो म्हणून, तूं कोणत्याहि कार्याला विलंबच लावीत असतोस. कोणतेंहि कार्य सोडायचें झालें तर तेंहि तूं एकदम न टाकतां त्यावर विचार करीत करीत झोंपीं जातोस. तेव्हां, हे चिरकारिका, आम्हांला होणारा हा चिरकारिक संताप टळेल असें कर."

हे राजा, तो महात्मा गौतम दुःखितांतःकरणानें असा विचार करीत बसला असतांना जवळच असलेला त्याचा पुत्र चिरकारी त्याला दिसला. चिरकारीनें पित्याला पहातांच त्याला अत्यंत दुःख झालें व हातांतील शस्त्र टाकून देऊन त्यानें पित्याच्या चरणावर मस्तक ठेविलें व तो त्याची प्रार्थना करूं लागला. आपल्या पायांवर डोकें ठेवून जमिनीवर पडलेल्या त्या आपल्या पुत्राला पाहून व तेथेंच उभ्या असलेल्या आणि लज्जेमुळें निःसंज्ञ बनलेल्या आपल्या पत्नीला पाहून त्या गौतमाला अत्यंत आनंद झाला. आश्रमस्थ,

महात्म्या गौतमानें त्या निर्जन वनांत आपल्या पत्नीचा वध केला नाहीं इतकेंच नव्हे तर आपल्या पुत्राचीहि समजूत केली. 'मातेचा वध कर' अशी आपण आज्ञा दिलेली, हातांत शस्त्र घेऊन मुलगा नम्रपणें उभा, त्याला स्वतःच्या कर्माचा खेद झाला असावा असें दर्शविणारी त्याची मुद्रा, अशी स्थिति असतां तो आपल्या पायांवर येऊन पडतो हें पहातांच गौतमाला प्रथम वाटलें कीं, मातेचा वध करण्यांत जें शस्त्रग्रहणचापल्य यानें केलें त्यावर हा झांकण घालूं पाहत आहे. परंतु, तसें कांहीं नाहीं असें पाहतांच त्यानें चिरकारिकाचें पुष्कळ वेळपर्यंत अभिनंदन केलें व मस्तकावघ्राण केलें. दोन्ही हातांनीं त्याला गाढ आलिंगन देऊन गौतमानें चिरकारिकाला 'चिरंजीव हो' असा आशिर्वाद दिला. प्रेम, आनंद इत्यादि गुणांनीं युक्त अशा त्या गौतमानें अशा प्रकारें आपल्या पुत्राचें अभिनंदन केलें व हे महाप्राज्ञा युधिष्ठिरा, तो त्याला म्हणाला, "हे चिरकारिका, तूं दीर्घ कालपर्यंत असाच चिरकारी रहा. वत्सा, तुझ्या या चिरकारिकत्वाच्या गुणांमुळेंच माझें चिरकालपर्यंतचें दुःख टळलें." असें म्हणून त्या मुनिश्रेष्ठ गौतमानें चिरकारिक व धीर पुरुषांच्या गुणांचीं लक्षणें ज्यांत आहेत अशा गाथा म्हटल्या; त्या अशाः—

"कोणाशींहि मैत्री जोडणें झाल्यास ती दूरवर विचार करून जोडावी. अशा रीतीनें पुष्कळ वेळानें जोडलेली मैत्री तोडण्याची वेळ आल्यास तितकाच विचार करावा. ज्याच्या स्वभावाची पुष्कळ वेळ पारख पाहून आपण मैत्री जोडली ती तितकीच चिरकाल टिकण्याच्या लायकीची असते. प्रेम करणें, गर्व वहाणें, मान, द्वेष, पापकर्म करणें व कोणालाहि वाईट वाटेल असें कर्म करणें इत्यादि गोष्टींच्या संबंधांत प्रत्यक्ष कृतीपूर्वीं विचारांतच जो पुष्कळ वेळ घालवितो, तो विचारी ठरतो, त्याचीच स्तुति होते. आप्त, मित्र, नोकरवर्ग व स्त्रिया यांच्या अनिश्चितस्वरूपाच्या अपराधाचा निर्णय पुष्कळ वेळ विचार करून सांगणारा मनुष्यच प्रशंसेस पात्र होतो." अशा तऱ्हेनें, पुष्कळ वेळ योग्य रीतीनें विचार केलेल्या त्या पुत्राच्या कर्मानें, हे कौरवा, तो महात्मा गौतम संतुष्ट झाला.

याप्रकारें मनुष्यानें सर्वच कार्यांत सर्व तऱ्हांनीं विचार करून घाई न करितां चिरकालानें कोणत्याहि गोष्टीचा निश्चय करावा. मग त्याच्यावर चिरकालपर्यंत दुःखव्यास होण्याची पाळी येत नाहीं. राग आला तरी तो पुष्कळ वेळ आंवरून धरावा. व प्रत्यक्ष कृति काय करावयाची असेल ती चिरकालानें करावी.

म्हणजे पश्चात्ताप करण्यासारखी कोणतीहि गोष्ट मनुष्याच्या हातून घडणार नाहीं. वृद्धांची सेवा चिरकाल करावी. ते खालीं बसले म्हणजे आपण बसावें, व त्यांचा सत्कार करावा. धर्माचें सेवन चिरकाल करावें व दीर्घकालपर्यंत त्याचें संशोधनहि करीत असावें. विद्वान् पुरुषांची सेवा चिरकाल करावी, शिष्टांची उपासना चिरकाल करावी, स्वतः शिक्षण चिरकालपर्यंत घ्यावें म्हणजे पुष्कळ काळ लोटेपर्यंत अशा मनुष्यावर अवज्ञा करून घेण्याचा प्रसंग येणार नाहीं. शत्रूसुद्धां जर धर्मयुक्त वचन बोलत असेल तर त्यानें विचारलें तरी चिरकालानेंच त्याच्या प्रश्नाचें उत्तर द्यावें. म्हणजे आपल्यावर दीर्घकालापर्यंत दुःख करण्याची पाळी येणार नाहीं. हे युधिष्ठिरा, तो महातपस्वी गौतम ऋषि त्या आश्रमांत पुष्कळ वर्षें उपासना करीत होता व अखेर पुत्रासह तो स्वर्गाला गेला. १२. ३. २६६.

## अध्याय २६७ वा.

[ १. राजांनीं अहिंसाधर्मानें प्रजारक्षण कसें करावें. २. द्युमत्सेन—सत्यवान् संवाद. ]

( १ ) युधिष्ठिर—राजानें प्रजांचें रक्षण तर करावें, व कोणाचा घातहि करूं नये; हीं दोन्ही कशीं साधावीं तें हे सच्छ्रेष्ठ पितामहा, मीं आपणांस विचारीत आहें, तें मला सांगा.

( २ ) भीष्म—या संबंधांत सुद्धां राजा सत्यवान् व द्युमत्सेन यांचा झालेला संवाद प्राचीन इतिहास म्हणून सांगत असतात. तो मी तुला सांगतों तो ऐक. बापाच्या आज्ञेवरून वध्य पुरुषांचा वध करण्यासाठीं जेव्हां त्यांना नेण्यांत येऊं लागलें, त्यावेळेस पूर्वी कधींहि व कोणींहि न केलेलें असें दण्ड्यादण्ड्यनिर्णयाबद्दलचें भाषण सत्यवानानें केलें असें आमच्या ऐकण्यांत आहे.

सत्यवान्—केव्हां केव्हां, अधर्म हाच धर्म घडतो, तर कधीं कधीं धर्म हाहि अधर्म घडतो. वध्य पुरुषाचा सुद्धां वध करणें हा धर्म होऊंच शकत नाहीं. वध हा धर्म नव्हे हें निश्चित होय. अवध हाच धर्म.

द्युमत्सेन—वध्य प्राण्यांचा सुद्धां वध करणें हा धर्म नसेल तर मग

धर्म तरी कोणता ? हे सत्यवन्, चोर जर मारले गेले नाहींत तर सर्वत्र संकर माजेल. या कलियुगामध्यें ' ही वस्तु माझी आहे ' असें निश्चयानें कोणालाच म्हणतां येणार नाहीं. व असें झालें तर लोकांचे संसारच बंद पडण्याची पाळी येईल. तूं म्हणतोस त्याप्रमाणें अवध हाच धर्म मानला तर लोकांचे संसार कसे चालवयाचे तें तुला माहीत असेल तर सांग.

सत्यवान्—क्षत्रिय, वैश्य व शूद्र या तिन्ही वर्णांना ब्राह्मणांच्या आज्ञेनें वर्तावयास लावावें. ब्राह्मणांनीं घालून दिलेल्या धर्मपाशांनीं त्रैवर्णिक बद्ध झाले म्हणजे दस्यु आदिकरून इतर वर्ग त्याच मार्गांनें जातील. ब्राह्मणांनीं घालून दिलेले नियम जो कोणी पाळणार नाहीं त्याच्याबद्दल ' हा माझें ऐकत नाहीं ' अशी ब्राह्मणानें राजाकडे तक्रार करावी व मग अशा माणसाला राजानें दण्ड करावा. तत्त्वाशीं भेद येऊं न देतां जें शास्त्रोक्त असेल तें करावें, अशास्त्र असेल तें करूं नये. अपराध्याचें कर्म व नीतिशास्त्राचे नियम यांचा बरोबर रीतीनें मेळ न घालतां व योग्य विचार न करतां अशास्त्र आचरण करूं नये. राजा चोरांचा वध करतो; पण त्या पुरुषाच्या वधामुळें त्याच्यावर अवलंबून असलेल्या भार्या, माता, पिता व पुत्र इत्यादि दुसऱ्या निष्पाप मनुष्यांचा वध होतो. या निष्पाप माणसांचा हा जो एकप्रकारचा वध होतो याचें पाप राजाच्या डोक्यावर येतें म्हणून दण्डाची योजना करावयाची ती विचार करूनच करावी. साधु पुरुषाच्या संगतींत राहून असाधु पुरुषाच्या बुद्धींत पालट पडेल, त्यालाहि शीलाचा लाभ होईल, सद्विचार सुचतील; असाधु पुरुषानें स्वतः अयोग्य आचरण केलें तरी त्याची प्रजा तरी साधुवृत्तीची निपजेल अशा आशेनें त्याचा वध करूं नये. कोणाचाहि समूल घात करूं नये. वृत्तीचें मूळच उपटून टाकणें हा सनातन धर्म नव्हे. प्रायश्चित्त द्यावयाचें तें वधासारख्या वाटणाऱ्या इतर शिक्षा करून देतां येतें. 'तुझ्या सर्वस्वाचें हरण करीन' अशी धमकी घालून, कारागृहांत ठेवून व चोरांना विरूप करून त्यांना शिक्षा लावतां येते. अशा प्रकारें चोरांना शिक्षा लावावी; पण पुरोहितांच्या सभेंत त्यांना वधदण्ड सांगून त्यांच्या बायकामुलांना क्लेश देऊं नयेत. जर ते स्तेनादिक आश्रयासाठीं पुरोहिताकडे आले व " आम्हीं पुनः पाप करणार नाहीं " असें म्हणून त्यांनीं क्षमा मागितली तर त्यांना सोडून द्यावयास पाहिजे असें ब्रह्मदेवाचें अनुशासन आहे. दण्ड व कृष्णाजिन धारण करणारा व संन्यास घेतलेला ब्राह्मणहि प्रायश्चित्तार्ह आहे. प्रायश्चित्त द्यावयाचें तें अपराधाच्या स्वरूपावर असावें. मोठ्या अपराधाला प्रायश्चित्तहि मोठेंच पाहिजे. अपराधाची खेप

पहिलीच असेल तर अपराध्यास एकदां सोडून द्यावें. परंतु, तोच तोच अपराध पुनः पुनः घडेल तर पहिल्या खेपेप्रमाणें त्यास सोडूं नये.

द्युमत्सेन—ज्या ज्या निर्बंधांनीं प्रजांचें नियंत्रण करणें शक्य आहे ते ते निर्बंध प्रजांच्याकडून जेथपर्यंत उल्लंघिले जात नाहींत तेथपर्यंतच धर्म या संज्ञेला पात्र होतात. आज जर चोरांचा वध केला नाहीं, तर सर्वच अनवस्था होईल. पूर्वीच्या कालामध्यें मागच्या मागच्या युगांतले लोक जास्त जास्त धर्मनिष्ठ होते म्हणून त्यांचें नियंत्रण करणें अधिकाधिक सुलभ होतें. पूर्वीचे लोक स्वभावानें दयाळू, धर्माचरणाची चाड असणारे, सत्याचरण करणारे, असे होते. ते दीर्घ-द्वेषी नसून त्यांचा राग अल्पकालपर्यंतच टिकत असे. फार पूर्वीच्या कालांत धिःकार करणें एवढेंच शासन पुरें होई. त्यानंतर कठोर भाषण करणें हें प्राय-श्चित्त अमलांत येऊं लागलें; पुढें शासन म्हणून त्या अपराध्यांकडून दण्डादाखल द्रव्य घेण्याची चाल पडली. आज चोरांचा वध करावा असा व्यवहारशास्त्राचा नियम रूढ आहे. धिक्कारापासून तों वधदण्डापर्यंत हीं जीं प्रायःश्चित्तें अधि-काधिक तीव्र होत आलीं आहेत याचें कारण, लोकांचे स्वभाव अधिकाधिक दुष्ट होत चालले हें असून ज्याकाळीं ज्या नियमांनीं प्रजांना कह्यांत ठेवतां येईल ते नियम त्याकाळीं अमलांत आणणें हाच धर्म आहे, आणि आजच्या काळांत चोरांचा सरसहा वध होणें हेंच इष्ट होय. आज कांहीं कांहीं ठिकाणीं वधदंडा-नेंहि चौर्यकर्माचें नियंत्रण होऊं शकत नाहीं अशी स्थिति आहे. ‘ चोर हा मनुष्यांचा कोणी नव्हे. तो देवांचा, गंधर्वांचा, पितरांचा कोणाचाहि नव्हे.’ असें श्रुति सांगते. या जगांत कोण कोणाचा ? कोणीच नाहीं. या दुष्टबुद्धी-च्या लोकांशीं केलेले करार त्यांच्याकडून पाळले जातील अशी अपेक्षा करणें म्हणजे स्मशानांत कमळें उगवतील व पिशाचांचेहि देव होतील अशी आशा धरण्याइतकें असमंजसपणाचें होईल.

सत्यवान्—दुष्ट लोकांना सृष्ट करून, त्यांचा वध न करितां त्यांचें रक्षण करणें हें जर साधत नसेल तर त्यांचा अंत होण्यांतहि त्यांना कांहीं लाभ होईल अशा तऱ्हेनें—यज्ञबलि देण्याच्या मार्गानें—तरी त्यांचा वध कर.

प्रजांचें रक्षण नीट व्हावें, त्यांचे संसार सुरळीत चालावे यासाठीं राजांना मोठी तपश्चर्या करावी लागते. आपल्या राज्यांत चोरांचें वास्तव्य असावें याची त्यांना खंति वाटते. म्हणूनच ते तपस्वी बनतात—तपश्चरण करतात. नुसत्या

धाकानेंहि प्रजा निवळतात. म्हणून दुष्टांचाहि वध करणें झाल्यास राजे लोक तो स्वच्छंदानें न करितां विचारानेंच करतात. प्रजानुशासनाचें बरेंचसें काम राजांच्या सुकृतानेंच होतें. राजा जसा अधिकाधिक पुण्यशील असेल तशी त्याची प्रजाहि अधिकाधिक पुण्यशील होते. आपल्यापेक्षां जो श्रेष्ठ असेल त्याचें अनुकरण मनुष्यें करतात. आपल्या स्वतःचें नियंत्रण न करितां जो राजा दुसऱ्या माणसांना कह्यांत ठेवावयास पाहतो अशा इंद्रियाधीन व विषयलोलुप राजाचा लोक उपहासच करतात. जो कोणी राजपुरुष दंभानें किंवा मोहानें अयोग्य वर्तन करील त्याचें राजानें सर्व उपायांनीं नियंत्रण करावें. म्हणजे तो अयोग्याचरणापासून निवृत्त होतो. पापाचें नियंत्रण व्हावें अशी ज्या राजाची इच्छा असेल त्यानें अगोदर स्वतःच्या आत्म्याचें (व आत्मभूत अशा आपल्या परिवाराचें) नियंत्रण केलें पाहिजे. त्याच्या अगदीं जवळचे असे आप्त वगैरे जर पापाचरण करूं लागतील तर त्यांनाहि मोठालीं प्रायश्चित्तें देऊन त्यांचें नियमन केलें पाहिजे. ज्या ठिकाणीं पापी व नीच माणसाला दुःख भोगावें लागत नाहीं, त्या राज्यांत पापाचें संवर्धन व धर्माचा ऱ्हास हीं निश्चयानें होतात. परमकारुणिक व विद्यासंपन्न अशा ब्राह्मणांनीं शिक्षण देतांना मला असेंच शिकविलें आहे. व हे तात, माझ्या पूर्वजांचीहि शिकवण तशीच आहे. हे माझे पूर्वज प्रजांविषयीं अत्यंत दयाशील वृत्ति धारण करणारे व त्यांना धीर देणारे असे होते म्हणूनच, त्यांनीं मला ही शिकवण दिली. सर्वश्रेष्ठ अशा या धर्माचं आचरण करून राजानें कृतयुगांत प्रजा आपल्या आधीन ठेवावी. या धर्माच्या तीनचतुर्थांशाचें पालन राजानें त्रेतायुगांत करावें; अर्थात् त्या मानानें त्रेतायुगांत दंडांची तीव्रता वाढेल. द्वापरयुगांत कृतयुगांतील धर्माचा अर्धा भाग आचरावा, व त्यांचा चौथा भाग कलियुगांत आचरावा. शिवाय कलियुग प्राप्त झालें असतांना कालमाहात्म्यामुळें व राजांच्या दुश्चरितामुळें या धर्माचा फक्त एक षोडशांश शिल्लक राहील व बाकीचा नष्ट होईल. हे सत्यवान्, उच्च प्रतीच्या कृतयुगांतील धर्माप्रमाणें दंडनिर्णय केल्यास संकर होतो असें वाटेल तर, राजानें आयुष्य, शक्ति व काल यांचा विचार करून मगच अपराध्याला शिक्षा सांगावी. ब्रह्मप्राप्ति ज्याच्यामुळें निश्चयानें होते त्या त्या धर्मांचा—धर्मज्ञानाचा—त्याग ज्यांत होणार नाहीं तें करावें असें प्रजांचें कल्याण इच्छिणाऱ्या स्वायंभुव मनूनें सांगितलें आहे. १२-३-२६७.

---

## अध्याय २६८ वा.

[ १ योग व गार्हस्थ्यधर्म यांचें तारतम्य. २ कपिलस्यूमरश्मिसंवाद. ]

( १ ) **युधिष्ठिर**—कोणत्याहि प्राण्याचा कोणत्याहि प्रकारें द्रोह न करितां अहिंसाधर्मानें जो योग साधतां येतो व ज्याच्यामुळें ऐश्वर्य, धर्म, ज्ञान, यश, श्री व वैराग्य या षाड्गुण्याची प्राप्ति राजांना होते तो योगधर्म हे पितामहा, आपण मला सांगितला. आतां, गार्हस्थ्य धर्म व योगधर्म यांचें फल—यांच्या आचरणाचें पर्यवसान—जर एकच आहे तर या दोहोंपैकीं श्रेष्ठ धर्म कोणता तें आपण मला सांगा.

भीष्म—गार्हस्थ्य धर्म व योगधर्म हे दोन्ही अतिशय उच्च धर्म असून दोहोंचाहि आचार हातून निर्दोषपणानें घडणें कठिण आहे. दोहोंच्याहि आचरणाचें फल मोठें असून हे दोन्ही धर्म संतांनीं आजपर्यंत आचरिलेले आहेत. या दोन्ही धर्मांच्याबद्दलचें, धर्मतत्त्वासंबंधाच्या सर्व संशयांचें उच्छेद करणारें असें प्रमाण मीं तुला सांगतों तें तूं एकाग्रचित्तानें ऐक. या संबंधांत कपिलऋषि व एक गाय यांचा झालेला संवाद पुरातन इतिहास म्हणून सांगत असतात. तो हे युधिष्ठिरा, मीं तुला सांगतों ऐक. सनातन, शाश्वत व निश्चित अशा पूर्वीपासून चालत आलेल्या व वेदवचनांनीं घालून दिलेल्या विधीला अनुसरून नहुषानें, त्वष्टा आपल्या घरीं पाहुणा आला असतांना त्याच्या सत्कारासाठीं गवालंभन केलें असें आमच्या ऐकण्यांत आहे. त्या गाईला वध करण्यासाठीं म्हणून उभी केली असतांना, महासामर्थ्यसंपन्न, सात्विक, संयमी, महाज्ञानी व ठराविक आहार घेणाऱ्या अशा कपिलऋषींची नजर तिजकडे गेली. सर्वथा निर्भय, परब्रह्मरूपाच्या ठिकाणीं लीन झालेली, निश्चल, सत्य, अशी उत्तम सद्बुद्धि त्या कपिलऋर्षींना प्राप्त झालेली होती; म्हणून 'वेद, वेद, वेद,' असा त्रिवार उच्चार करून वेदांविषयींची अनादर बुद्धि त्यांनीं प्रकट केली. तेव्हां, त्या धेनूच्या देहांत योगबलानें प्रवेश करून स्यूमरश्मि त्या मुनींना म्हणाला—

(२) **स्यूमरश्मि**—'वेद, वेद, वेद,' असा उद्वेगानें वेद शब्दाचा त्रिवार उच्चार करून आपण त्या वेदांची हेटाळणी करतां, तर तुमचे बाकीचे हिंसाशून्य धर्मसुद्धां वेदवाक्यांवरच आधारलेले नाहींत काय? वेदवाक्य म्हटलें म्हणजे येथून तेथून एक. असें असतां स्वतःला उपोद्बलक तेवढें वाक्य ग्राह्य व

बाकीचें वेदवाक्य अग्राह्य हा न्याय कोठला ? वेदविज्ञानाच्या नेत्रांनीं सर्व गोष्टी पहाणारे धैर्यशील व तपस्वी असे ऋषि 'वेद हे परमेश्वराच्या मुखांतून निघालेले आहेत' असेंच मानीत आले आहेत. तेव्हां, ज्याला कसलीहि वासना नाहीं, ज्याला रागहि नाहीं व द्वेषहि नाहीं, ज्याला स्वतःचें असें कोणतेंच कार्य नाहीं त्या परमेश्वराचा वेदोच्चार करण्यांत कांहीं विवक्षित हेतु असणें शक्य नाहीं.

कपिल—मीं वेदवचनांची निंदा करीत नाहीं व त्यांच्यांत वैषम्य आहे असेंहि म्हणत नाहीं. ब्रह्मचर्य, गार्हस्थ्य, वानप्रस्थ, व संन्यासी या चारी आश्रम्यांना जीं पृथक् कर्मे सांगितलीं आहेत त्यांचें ध्येय वस्तुतः एकच आहे, असें आम्हीं ऐकिलें आहे. संन्यासी, वानप्रस्थ, गृहस्थ व ब्रह्मचारी हे सगळे परमपदाला पोहोंचतात व सगळेच आपापल्या परीनें शाश्वत अशा देवयान मार्गानेंच जातात यांत शंका नाहीं. परंतु, या मार्गांचें बलाबल व श्रेष्ठ–कनिष्ठत्व यांच्या फलांमध्यें आहे, हें जाणूनच वेदवाक्यांनीं स्वर्गादि लोकांची प्राप्ति करून देणारीं यज्ञकर्मे करावींत असें सांगितलें आहे. तसेंच, 'कर्मे करूं नयेत' अशीं दुसरींहि निश्चित स्वरूपाचीं वेदवचनें आहेत. काम्य कर्मे आरंभिलीं नाहींत तर त्यांत दोष नाहीं इतकेंच नव्हे तर तीं कर्मे आरंभिल्यास निश्चयानें दोष लागण्याचा संभव आहे. अशा प्रकारच्या या शास्त्रवचनांचें बलाबल जाणणें, ही गोष्ट अत्यंत कठिण व गुंतागुंतीची असें तुला वाटत असेल तर हे स्यूमरश्मे, वेदप्रामाण्यावर अधिष्ठित नसलेलें असें अहिंसेखेरीजचें दुसरें कोठलें शास्त्र–(–हिंसाशास्त्र) तुला अनुभवानें प्रत्यक्ष माहीत असलेलें किंवा युक्तिवादानें तूं समजून घेतलेलें–श्रेष्ठ आहेसें तुला वाटतें तें सांग.

स्यूमरश्मि—ज्याला स्वर्गलोक मिळावा अशी इच्छा असेल त्यानें यज्ञकर्म आरंभावें असें श्रुति सतत सांगते. प्रथम फलोद्देशाचा संकल्प मनांत धरूनच यज्ञकर्माचा पसारा मांडला जातो. बोकड, घोडा, मेंढा व गाय, नाना प्रकारचे पक्षिगण तसेंच ग्राम्य व वन्य वनस्पति हें सर्व प्राण्यांचें–मनुष्याचें–अन्न (भक्ष्य) आहे असें श्रुति सांगते. अशाच प्रकारचें अन्न दररोज सकाळ संध्याकाळ मनुष्यें भक्षण करतात असें आपण पहातों. पशु व धान्य हीं यज्ञाचीं अंगें आहेत अशीहि श्रुति आहे. प्रजापति ब्रह्मदेवानें या सर्वांची यज्ञाशीं सांगड घातली व यांच्या साहाय्यानेंच प्रजापतीनें देवांना उद्देशून यज्ञ केला. गाय, बोकड, मनुष्य, घोडा, मेंढा, इत्यादि सात प्रकारचे ग्राम्य व सिंह, व्याघ्र, वराह, महिष इत्यादि सात प्रकारचे आरण्य पशु हे परस्परांच्या दृष्टीनें एकापेक्षां

एक श्रेष्ठ आहेतच; पण, त्या सर्वांत श्रेष्ठ असा जो मनुष्य तोहि मेध्य पदार्थ होय–त्याचाहि यज्ञ करावा असें श्रुतीनें सांगितलें आहे. व आपल्या पूर्वींच्या व त्यांच्याहि पूर्वींच्या शिष्ट सज्जनांनीं तें वचन प्रमाण मानलें आहे. अशा स्थितींत आपल्याला अमुक एका पशूचें आलंभन करून यज्ञ करतां येणें शक्य आहे असें स्वतःच्या सामर्थ्याचें ज्ञान असलेला कोणता मनुष्य यज्ञ केल्यावांचून राहील? प्रत्येक आस्तिक मनुष्यानें स्वतःच्या सामर्थ्यानुसार यज्ञ हा केलाच पाहिजे. आपल्या स्वतःची हत्या न करितां इतर पशूंचें आलंभन करून यज्ञ करितां येणें शक्य आहे असें माहीत असतांना मनुष्यानें यज्ञांत आत्मार्पण न करितां पशूंचेंच हवन करावें हेंच क्रमप्राप्त होय. असो. पशू, मनुष्यप्राणी, वृक्ष, औषधि इत्यादि सर्व स्वर्गाचीच इच्छा धरतात व यज्ञकर्माच्या आचरणावांचून स्वर्गप्राप्ति होत नाहीं. सर्व वनस्पति, पशु, वृक्ष, पालवी फुटलेल्या लता, तूप, दूध, व दहीं हीं हविर्द्रव्यें, भूमि, दिशा, श्रद्धा, काल, ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, यज्ञकर्ता यजमान व गृहपति नामक अग्नि हीं सतरा यज्ञाचीं अंगें होत. यज्ञ हें लोकयात्रेच्या स्थितीचें मूळ होय. लोकयात्रा ही यज्ञावरच चालते. तूप, दूध, दहीं, गोमय, दहीं व दूध यांचें मिश्रण, त्वचा, केश, शिंगें व पाय इत्यादि सर्वांगांनीं गाय हें यज्ञाचें साधन होय. बैलाच्या कातड्यावर सोमरस गाळून घ्यावा असें शास्त्रवचन आहे; तदनुसार, गाईचें व बैलाचें कातडें यज्ञसाधनच ठरतें. वर दिलेल्या गोष्टींपैकीं एकेक किंवा सर्व निरनिराळ्या यज्ञांसाठीं ग्राह्य म्हणून सांगितलेल्या आहेत. या सगळ्या गोष्टी, ऋत्विज व दक्षिणा यांच्या समुच्चयानेंच यज्ञकर्म चालूं शकतें; व या सगळ्या गोष्टी जमवूनच लोक यज्ञ पार पाडीत असतात. या सर्व गोष्टी यज्ञासाठींच परमेश्वरानें निर्माण केलेल्या आहेत अशी जी श्रुति आहे ती यथार्थ होय. आपल्या पूर्वींच्या सर्व मनुष्यांनीं याच मार्गाचें आचरण केलेलें आहे. कोणत्याहि फलाचा अभिनिवेश न धरितां केवळ करावयाचा म्हणून जो यज्ञ करतो, तो हिंसा करीत नाहीं, कोणतेंहि कार्य स्वतःकरितां आरंभीत नाहीं, व कोणाचाहि द्वेष करीत नाहीं. आतां, यज्ञासाठीं उपयोगांत आणण्याचीं यज्ञांगें म्हणून जीं सांगितलीं तीं योग्य विधीनें यज्ञासाठीं उपयोगांत आणलीं असतांना यज्ञकर्त्याच्या अभिनिवेशाची आशा न धरतांच परस्परांना पोषक अशीं होतात. ऋषींचा स्वाध्याय हाच वेदांचें अधिष्ठान होय. ब्राह्मणग्रंथांचें अध्ययन केल्यानें या वेदांचें ज्ञान विद्वान् पुरुषांना होतें. यज्ञ हा ब्राह्मणांपासून होतो व त्यांनाच अर्पण करावयाचा असतो.

यज्ञामुळें जग व जगामुळें यज्ञ असा जग व यज्ञ यांचा परस्परावलंबित्वाचा संबंध आहे. 'ॐ कार हा सर्व वेदांचें मूळ होय. हा ॐ कार व नमः, स्वाहा, स्वधा व वषट् यांचा प्रयोग ज्यांच्या यज्ञकर्मांतून यथाशक्ति केला जातो, त्याला या त्रैलोक्यांतसुद्धां परलोकभय नाहीं.' असें वेद सांगतात, व सिद्धस्वरूप परम ऋषीहि पण तेंच सांगतात. ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेद आणि सामगायनामध्यें सामपूरणासाठीं उच्चारिलेलीं अक्षरें (स्तोम) यांचा प्रयोग ज्याच्या हातून होतो, हीं सर्व ज्याच्या ठिकाणीं आहेत त्याला ब्राह्मण–द्विज–म्हणावें. 'मानुषाद्दैव्यमुपैमि' इत्यादि मंत्रांनीं अग्न्याधान करणाराला देवत्व प्राप्त होतें, सोमरस काढून त्याचें हवन करणाराला स्वर्गलोकाची प्राप्ति होते, या गोष्टी व इतर महायज्ञांनीं मिळणारीं फलें हीं हे भगवन्, आपणांस माहीतच आहेत. तेव्हां, हे ब्रह्मन्, कोणत्याहि प्रकारचा विचार मनांत न आणतां, स्वतः यज्ञ करावे व दुसऱ्याकडून करवावे. स्वर्गलोकाची प्राप्ति व्हावी या इच्छेनें जो यज्ञ करतो त्याला अंतकाळीं स्वर्गप्राप्तिच होते. ज्याच्या हातून यज्ञकर्मे घडत नाहींत त्याला इहलोकहि नाहीं व परलोकहि नाहीं हा निश्चित सिद्धांत होय. तेव्हां, वेदवादवेत्यांच्या दृष्टीनें कर्मकांडश्रुति व ज्ञानकांडश्रुति ह्या दोन्ही सारख्याच प्रमाणभूत आहेत. १२-३-२६८.

---

## अध्याय २६९ वा.

(१ कपिल-स्यूमरश्मिसंवाद–पुढें चालू.)

कपिल—यमनियमादिकांच्या साहाय्यानें परब्रह्मपदाची प्राप्ति करून घेण्याच्या मार्गांत असतांनाच मुनिजनांना गुरुमुखानें शास्त्रोपदेश झाल्यामुळें, मर्यादित स्वरूपाचें ब्रह्मांड हें कर्माचें फल आहे असें ज्ञान त्यांना झालेलें असतें. या पुरुषांना कोणत्याही लोकांतील कसल्याहि भोग्य पदार्थांची वासना नसते. हे द्वंद्वातीत असतात; हे कोणापासून नमस्काराची अपेक्षा करीत नाहींत, व स्वतः कोणाला नमस्कार करीत नाहींत. यांना कोणापाशीं कांहीं मागावयाचें नसतें. हे ज्ञानी असतात; सर्व पापापासून विमुक्त झालेले असतात. हे पवित्र व निर्मल असतात व मोक्ष आणि त्याग यांच्या स्वरूपाचें निश्चित आकलन त्यांच्या बुद्धीला झालेलें असतें. हे ब्रह्मनिष्ठ असून परब्रह्मरूपाशीं तादात्म्य पावलेले, त्या ब्रह्मरूपालाच आपलें घर मानून त्यांतच रमणारे असतात. हे शोकरहित असल्यानें

यांच्या अंतःकरणांतील राजसभाव नष्ट झालेला असतो. म्हणून यांना सनातन अशा लोकांची प्राप्ति होते. या लोकांना मिळणारी ही जी गति ती गति प्राप्त झाल्यानंतर गृहस्थधर्माच्या आचरणाचें प्रयोजन काय राहिलें ?

स्यूमरश्मि—अशाप्रकारें आतां वर्णिलेली निर्द्वंद्व व अरागद्वेष अशी स्थिति हेंच जर आपलें परम ध्येय—आपल्याला मिळणारी परमोच्च गति—असेल तर ती गृहस्थाश्रमावांचून सिद्धच होणार नाहीं. कारण, असा कोणताहि आश्रम नाहीं कीं, ज्याला गृहस्थाश्रम्याचा आश्रय घ्यावा लागत नाहीं. सर्व जीव ज्याप्रमाणें आईच्या आधारावरच जगूं शकतात त्याचप्रमाणें ब्रह्मचर्य, वानप्रस्थ व संन्यास हे आश्रमहि गार्हस्थ्य आश्रमावरच अवलंबून असतात. गृहस्थ हाच यज्ञ करितो. तपश्चर्याहि तोच करितो. सुखार्थी मनुष्य धर्माचरणाच्या द्वारें जें सुख मिळवूं इच्छितो व त्यासाठीं प्रयत्न करतो, त्या सुखाचें मूळ गृहस्थाश्रमच होय. प्रजोत्पादनादि ज्या ज्या कर्मांनीं मनुष्याला समाधान वाटतें तीं तीं कर्में गृहस्थाश्रमाखेरीज इतरत्र शक्य नाहींत. या कर्मांवांचून प्राण्यांची उत्पत्तीच शक्य नसल्यामुळें गृहस्थाश्रम हाच सर्व आश्रमांचा आधार असेंच ठरतें. या जगांत जीं तृणें, धान्यें, औषधि दिसतात व पर्वतावर वाढणाऱ्या वनस्पति सांपडतात त्यांचें मूळ गृहस्थाश्रमच होय. कारण गृहस्थानें केलेल्या यज्ञामुळेंच पर्जन्यवृष्टि होते, व या वृष्टीमुळें औषधि वाढतात. औषधीपासून अन्न व अन्नापासून प्राण असा उत्पत्तिक्रम असल्यानें सर्व प्राणयुक्त पदार्थ हे औषधींच्या बाहेरचे असणें शक्य नाहीं; कारण प्राणच तन्मय आहेत. तेव्हां औषधींचें मूळ जो गार्हस्थ्य धर्म तोच विश्वोत्पत्तीचें मूळ होय. असें असतांना 'गृहस्थाश्रमाच्या आचरणानें मोक्ष नाहीं' ही कोणाची बरें वाणी खरी ठरेल ? 'शांतिसुखाची पराकाष्ठा संन्यासांतच आहे' हा सिद्धांत, अश्रद्ध, अप्राज्ञ, सूक्ष्मदृष्टि नसलेल्या, कांहीं व्यंगामुळें गृहस्थाश्रमाचा स्वीकार करण्यास अयोग्य ठरलेल्या, आळशी, श्रांत झालेल्या व आपल्याच पूर्वकर्मांचीं फळें भोगणाऱ्या पुरुषांनीं बसविलेला आहे. यज्ञ हेंच त्रैलोक्याचें मूळ होय; व निश्चित स्वरूपाच्या शाश्वत धर्मांची मर्यादाहि तीच. ब्राह्मण हा भगवत्स्वरूप असून जन्मापासूनच पूज्य आहे. ब्राह्मणांच्या कुळांतून गर्भाधानापूर्वीपासूनच मंत्रांची प्रवृत्ति असते. अविश्रंभ, किंवा विश्रंभ—स्वर्गादि लोकांची प्राप्ति किंवा ऐहिक सुखोपभोगांची प्राप्ति—या दोहोंसाठींहि मंत्रांची प्रवृत्ति असते. मृताचा अग्निसंस्कार; त्याला पुत्रपौत्रादिरूपानें फिरून देहप्राप्ति; पुनः देहप्राप्ति झाल्यानंतर मृताचें तर्पण व श्राद्ध;

गोदान करणें; वृषोत्सर्ग करणें; पिंडांचें तीर्थांचे ठिकाणीं विसर्जन करणें हीं सर्व कर्में मंत्रमूलकच आहेत. ज्याला शरीर नाहीं अशा मुक्त पुरुषाला या मंत्रांचा उपयोग होत नाहीं. अर्थातच अशरीर स्थितीमधला मोक्ष ही नुसती एक कल्पना आहे, तें सत्य नव्हे. अर्चिष्मत्, बर्हिषद्, राक्षस व पितर हे देखील सर्व क्रिया—मृतांसंबंधाच्या देखील—समंत्रकच असाव्या असें मानतात. मंत्रांमुळेंच सर्व गोष्टी सिद्ध होतात असें वेद कंठरवानें सांगत असतांना मंत्रांवांचून इतर कोणत्या गोष्टींनीं आणि कोणाला मोक्षप्राप्ति होणार? कारण मनुष्य जन्माला येतो तो पितर, देव व ब्राह्मण या तिघांच्या ऋणाचें ओझें पाठीवर घेऊनच येतो. तेव्हां, सामर्थ्यवती प्रजा निर्माण करून पितरांचें, यज्ञादिकांनीं देवांचें, व अध्ययन आणि अध्यापनाच्या द्वारें ब्राह्मणांचें असें हें ऋणत्रय फेडल्यावांचून मोक्ष कोठचा? अशरीर स्थितींतील मोक्षप्राप्तीचा हा सिद्धांत दरिद्री व आळशी अशा विद्वानांनीं मांडलेला असून त्यामध्यें वेदमंत्रांचें अज्ञान भरलेलें आहे व तें सत्याचा आभास उत्पन्न करणारें मूर्तिमंत असत्य होय. वेदशास्त्रांनीं सांगितलेल्या विधीप्रमाणें जो ब्राह्मण यज्ञकर्में करतो, त्याला पापांचा मोह उत्पन्न होत नाहीं व तीं त्याचा नाश करीत नाहींत. तो ब्राह्मण यज्ञांत बलि दिलेल्या पशूसह वर स्वर्लोकाला जातो. यज्ञामध्यें आत्मार्पण करण्याची संधि देऊन स्वर्लोकप्राप्तीची पशूची इच्छा ब्राह्मण तृप्त करतात, व यज्ञांची सांगता पूर्ण करवून पशूहि त्यांचे मनोरथ पूर्ण करितो. वेदांची निंदा करून, शाठ्याचा अवलंब करून किंवा मायावीपणानें वागून मनुष्याला ब्रह्मपदप्राप्ति होत नाहीं. तर वेदमंत्रांबद्दल आदर ठेवून यज्ञाचरण यथासांग केल्यानेंच त्याला मोक्ष मिळतो.

कपिल—दर्श, पौर्णमास, अग्निहोत्र व चातुर्मास्ययाग हींच पूर्वींच्या बुद्धिमान् लोकांचीं कर्में होतीं. ते लोक याच कर्मांचें आचरण करीत व त्यांचा धर्म यांच्यावरच अधिष्ठित झालेला होता. हिंसाप्रधान यज्ञांचें आचरण त्यांनीं केलें नाहीं. शिवाय, ज्यांना कर्में करावयाचीं नसतात असे अमृतत्वाची इच्छा करणारे, धैर्यशील, पवित्र व ब्रह्मैकनिष्ठ पुरुष ब्रह्मपदप्राप्ति करून घेऊन तद्द्वाराच देव, ऋषि व पितर यांचा संतोष करूं शकतात. सर्व भूतांशीं जो एकरूप झाला, सर्व भूतांचें यथार्थ ज्ञान ज्याला झालें असा ब्रह्मपदाची इच्छा धरणारा पुरुष ज्या मार्गानें जातो त्याचें यथार्थ स्वरूप कळणें देवांनाहि कठिण होऊन बसतें. या पुरुषांचा मार्ग कसला व कोणता हें देवांनाहि नीट उमगत

नाहीं. उपाधींनीं व्याप्त झालेल्या आत्म्याचीं बाहु, वाणी, उदर व जननेंद्रिय हीं चार द्वारें; व देह, इंद्रियें मन व बुद्धि हीं त्याचीं चार मुखें आहेत. या उपाधींनीं झांकून टाकलेलें आत्मस्वरूप गुरूपदेशाच्या योगानें विराट्, सूत्र, अंतर्यामि व शुद्ध अशा चार रूपांत जाणतां येतें. वर दिलेल्या चार द्वारांच्या उपाधीनें वेष्टित असलेल्या आत्मरूपाचें ज्ञान देवांनासुद्धां होत नाहीं. म्हणून ब्रह्मज्ञान करून घेऊं इच्छिणाऱ्या पुरुषानें या द्वारांचा रक्षक होण्याची इच्छा धरावी, या द्वारांच्या मार्गानें आपल्या हातून घडणारे प्रमाद होऊं देऊं नयेत. बुद्धिमान् मनुष्यानें फांशांनीं खेळूं नये, दुसऱ्याचें द्रव्य हरण करूं नये, ज्याचा आपला हाडारक्ताचा संबंध होऊं शकत नाहीं, अशा माणसाचें हविष्य घेऊं नये; व राग आला तरी कोणावरहि हस्तप्रहार करूं नये. याला हातापायांचें नियंत्रण म्हणतात. या गोष्टींनीं हातांचें व पायांचें रक्षण—नियंत्रण—होतें. मोठ्यानें आक्रोश करूं नये; कारण नसतां बोलूं नये; कोणाच्या चहाड्या सांगूं नयेत; कांहींतरी वार्ता उठवूं नयेत; सत्य असेल तेंच बोलावें, भाषण मोजकें असावें व प्रमाद होऊं देऊं नये, म्हणजे वाग्रूपी द्वाराचें नियमन झालें. अगदीं खावयाचें नाहीं असें करूं नये व एकदम पुष्कळ खावयाचें असेंहि करूं नये. कोणत्याहि प्रकारची लोलुपता नसावी. सज्जनांचा समागम नेहमीं असावा. शरीरधारणापुरताच आहार करावा. म्हणजे जठररूपी द्वाराचें नियंत्रण होतें. स्त्रीच्या पोटीं पुत्रसंतान झाल्यानंतर तिच्याशीं विहार करूं नये. ज्यावेळीं ऋतुकाल नसेल अशावेळीं स्त्रीला जवळ बोलावूं नये व परस्त्रीगमन करूं नये. म्हणजे जननेंद्रियाचें नियमन होतें. अशा प्रकारें या चारी द्वारांचें नियमन करणाराला मोक्षप्राप्ति होते, त्याच्या सर्व क्रिया सफळ होतात. ज्यानें हीं चारी द्वारें आपल्या ताब्यांत ठेवलेलीं नाहींत त्यानें कांहीं केलें तरी तें निष्फळच होय. त्याची तपश्चर्या, यज्ञकर्म किंबहुना स्वतः तो मनुष्य हीं घेऊन काय करावयाचीं ! यांचा उपयोग कांहीं नाहीं. कांहींएक न आंथरतां नुसत्या जमिनीवर जो शयन करतो, ज्याला उत्तरीय व वस्त्र यांची जरूरी नसते व जो उशी म्हणून आपल्या हाताचाच उपयोग करतो, तात्पर्य जो इतका वैराग्यसंपन्न व निरिच्छ असतो त्यालाच देव ब्राह्मण—ब्रह्मनिष्ठ—समजतात. दुसऱ्याच्या सुखदुःखाचा विचार न करितां—त्यांचा मत्सर, द्वेष न करितां शीतोष्ण सुखदुःखादि द्वंद्वांमध्यें त्यांच्याकडे उपेक्षा बुद्धीनें पहात जो रमतो त्यालाच देव ब्रह्मनिष्ठ समजतात. प्रकृति कोणती, विकृति कोणती हें सर्व ज्यानें

यथार्थ रीतीनें जाणलें, सर्व प्राणिमात्र कोणत्या गतीला जाणार आहेत याचेंहि यथार्थ ज्ञान ज्याला झालें तो ब्रह्मनिष्ठ असें देव समजतात. कोणत्याहि प्राण्याला ज्याच्यापासून भय नाहीं व ज्याला कोणापासूनहि भय नाहीं, जो सर्व प्राणिमात्रांशीं एकरूप झाला त्यालाच देव ब्रह्मनिष्ठ समजतात. दान, यज्ञक्रिया इत्यादिकांचें फल जी चित्तशुद्धि तिच्यावांचून गुरुमुखांतून ऐकलेलें ब्रह्मज्ञान उमजत नाहीं, व ब्रह्मज्ञानाचा उमज पडला नाहीं म्हणजे त्या अज्ञानग्रस्त मनुष्याला स्वर्गादि फलें आवडूं लागतात. धर्मशास्त्रानें कांहीं अंशीं ज्याचा विधि सांगितला आहे; जो निश्चित स्वरूपाचा, सनातन व कायमचा टिकणारा आहे अशा सदाचाराचा आश्रय केल्यानें आश्रमोक्त कर्में व वेदान्तादि शास्त्रांचें श्रवण यांना एकप्रकारचें तपोबल चढतें व त्यामुळें संसारमूलक अज्ञानाचा समूळ उच्छेद होतो. ज्यांना या सदाचाराचें आचरण घडणें अशक्य होतें त्यांना हा प्रमादरहित, आपद्धर्मशून्य, व सदैव कल्याणकारक असा सदाचार निरुपयोगी वाटतो. निश्चितपणें फलें देणारीं, कायमचीं टिकणारीं व अत्यंत तेजस्वी अशीं यमनियमादि कर्म विगुण आहेत असें वाटतें. यांच्यापैकीं अमुक कर्माचें फल अमुकच आहे असें निश्चितपणें सांगतां येत नाहीं अशी या कर्मासंबंधानें त्यांची भावना होते. कर्मकांडाचें खरें मर्म काय हें समजणेंच पुष्कळ वेळां दुर्घट होतें. कदाचित् कांहीं लोकांना हें रहस्य समजलें तरी हातून त्याचा योग्य विधि घडणें हें त्याहून कठीण. या दुर्घट गोष्टी समजून त्याच्या हातून आचारहि घडला तरी शेवटीं याचें फळ मिळणार तेंहि कायमचें नाहीं अशी या यज्ञादि कर्मांची स्थिति आहे; हें, हे स्यूमरश्मे, तूं जाणतच आहेस.

स्यूमरश्मि—कर्मांचें आचरण व कर्मांचा त्याग असे दोन्ही मार्ग वेदांनीं स्पष्ट सांगितलेले असून दोन्ही मार्गांत श्रद्धा व उपपत्ति यांचें बल आहे. तेव्हां, हे भगवन्, या मार्गांचें यथार्थ तत्त्व कोणतें व वेदप्रामाण्याला बाध कशानें येणार नाहीं तें आपण मला सांगा.

कपिल—ब्रह्मपदप्राप्ति करून देणाऱ्या योगमार्गाचें तुम्हीं आचरण करीतच आहांत. या मार्गानें जाऊन मिळणारें शमसुख याच देहामध्यें जीवन्मुक्तावस्थेंत अनुभवतां येतें. त्याचा प्रत्यक्ष अनुभव तुम्हीं पहा. पण, कर्मठ लोकांना हवासा वाटणारा जो कर्ममार्ग त्याचें सुखदुःखादि फल इहलोकीं प्रत्यक्ष कोठें आहे?

स्यूमरश्मि—हे ब्रह्मन्, मीं स्यूमरश्मि. तत्त्वज्ञान यथार्थ रीतीनें व्हावें, व तद्द्वारा कल्याणप्राप्ति व्हावी या इच्छेनें मीं आपल्याशीं आतांपर्यंत भाषण केलें.

आपल्या बरोबर वाद खेळण्याची माझी इच्छा नव्हती. मीं जें बोललों तें सरळ भावानेंच बोललों. मला जो हा महान् संशय आलेला आहे हा आपण दूर करावा. योगमार्गाचें आचरण करणाऱ्या आपणांला या जगांतील सर्व गोष्टींचें प्रत्यक्ष ज्ञान असतें. परंतु, आपण या लोकीं ज्याच्या उपासनेंत गढून जातां तें, सर्व प्रत्यक्ष असणाऱ्या गोष्टींपेक्षांहि अधिक स्पष्ट असें प्रत्यक्षतम काय आहे तें आपण मला सांगा. चार्वाक, जैन, बौद्ध, कापालिक इत्यादि नास्तिक दर्शनें सोडून बाकीच्या वेदविद्येचें मीं यथावत् अध्ययन केलें आहे. प्रत्यक्ष श्रुति, श्रुतींशीं विरोध न करणारें तर्कशास्त्र, पूर्वमीमांसा, उत्तरमीमांसा, सांख्यशास्त्र व पातंजलयोगशास्त्र हीं सर्व आगम या सदराखालीं येतात. आश्रमधर्मांना बाध येऊं न देतां त्या त्या आश्रमांत त्या त्या प्रकारें यांची उपासना केली, म्हणजे वेदोक्त सिद्धि प्राप्त होते. ही सिद्धि प्रत्यक्ष दृश्यरूपांत दिसते असा वेदांचा निश्चय आहे. प्रवाहाबरोबर वहात जाणाऱ्या एखाद्या नौकेला दुसरी एक नाव बांधली तर ती पहिल्या नौकेबरोबरच वहात जाईल. हे ब्रह्मन्, मंदबुद्धि लोकांचा उद्धार करून त्यांना पैलतीराला पोहोंचविण्याचें सामर्थ्य त्या नावेंत कोठून येणार? आपल्याला शरण आलेल्या ह्या आपल्या अधिकारी शिष्याला आपण उपदेश करा आणि माझा हा संशय नाहींसा करा. या जगांत सर्वथा त्यागी, आत्यंतिक समाधानवृत्तीचा, ज्याच्या चित्ताला शोक शिवतहि नाहीं असा, निरामय, संगविमुख, कर्मांपासून सर्वथा पराङ्मुख झालेला व कर्तव्यबुद्धि निःशेष झालेला प्राणी कोणींच सांपडणार नाहीं. आम्हांला ज्याप्रमाणें शोकहर्षादि विकार होतात, तसेच ते आपणांलाहि होतात. विषयोपभोगांची आवड व इंद्रियधर्म हे जसे इतर सर्व प्राण्यांत दिसतात तसे ते आपणांतहि आहेत. एवंच, चारी वर्ण व चारी आश्रम या सर्वांची प्रवृत्ति आपलें एक ध्येय जें सुख तेंच साधण्याकडे असते. यांच्यांपैकीं निरामयस्वरूपाचा आचार कोणता तें मला सांगा.

कपिल—सर्व प्रक्रियांच्या संबंधांत, जें जें शास्त्र ज्या ज्या मोक्षानुकूल क्रियांचें विधान सांगतें तें तें शास्त्र त्या त्या क्रियेपुरतें अर्थवत् होय. ज्या ज्या कर्मांनीं मनुष्याची प्रत्यगात्म्याचें ज्ञान करून घेण्याकडे प्रवृत्ति होईल तीं तीं सर्व कर्में चांगलीं, सशास्त्र अतएव अनवस्था न माजविणारीं होत. योग्य मार्गानें केलेल्या धर्मानुष्ठानापासून जें ज्ञान होतें त्यामुळेंच ज्ञानी पुरुषाचा संसार संपतो. परंतु न समजून केलेलीं कर्में जरी वेदविधानोक्त असलीं तरी त्यांच्यामुळें प्रजा जन्ममरणाच्या फेऱ्यांत सांपडतात व त्यांना क्लेशच होतात. आपण सर्वज्ञानी

आहांत, सर्व बाजूंनीं निरामय–शुद्ध–आहांत असें असूनहि 'एकच एक आत्मा सर्वत्र भरलेला आहे, असें ऐकात्म्यज्ञान तुम्हांपैकीं कोणाला कधीं झालें आहे काय ? नाहीं. तेव्हां, तुमचा कर्मकाण्डवाद्यांचा पक्ष हा सत्पक्ष नव्हे. कांहीं लोकांना शास्त्राच्या तत्त्वाचें ज्ञान यथार्थ रीतीनें होत नाहीं व ते वादबलाच्या आधारावर आणि कामक्रोध इत्यादिकांच्या आधीन झाल्यामुळें अहंकारवश होतात. शास्त्राचें परमरहस्य ज्यांना उमगलेलें नसतें असे हे ब्रह्मरूपी सत्य-वस्तूचा अपलाप करणारे शास्त्रचोर स्वतः कांहीं न करितां दंभ व मोह यांच्या अधीन होतात. शम, दम, तितिक्षा इत्यादिकांचा कांहीं उपयोग नाहीं असें मानून जे स्वतः परमात्मज्ञान करून घेत नाहींत व दुसऱ्यालाहि त्याचा लाभ घडूं देत नाहींत असे तमःप्रधान प्रकृतीचे पुरुष शेवटीं तामस गतीलाच जातात; त्यांना अज्ञानांतच गुरफटून रहावें लागतें. जो अधीर–प्रकृतीचा पुरुष प्रकृतीच्या–मायेच्या–अधीन होऊन राहतो त्याच्या ठिकाणीं मायेचे द्वेष, काम, क्रोध, दंभ, असत्य व मद हे गुण नित्य वास करितात. या गोष्टींचा विचार करून व त्यांचें नीट मनन करून परमपदाला जाऊं इच्छिणाऱ्या संयमी मुनींनीं सर्व शुभाशुभांचा त्याग करावा व अनासक्त वृत्तीनें असावें.

**स्यूमरश्मि**—हे ब्रह्मन्, मीं आतांपर्यंत जें बोललों तें शास्त्राच्या आधारानें होय. शास्त्रार्थाचा आधार घेतल्यावांचून उगीच वाचेची प्रवृत्ति होत नाहीं. जो कांहीं आचार न्याय्य असेल तो सर्व शास्त्रसिद्ध होय व जें जें कांहीं अन्याय्य तें तें सर्व अशास्त्र अशी श्रुति आहे. सर्व कर्मांची प्रवृत्ति शास्त्रापासूनच होते हा ठाम सिद्धांत आहे. वेदांत ज्याचें विधान नाहीं असें सर्व कर्म अशास्त्र होय असें श्रुति सांगते. जें प्रत्यक्ष दिसतें तेवढेंच खरें असें मानणारे पुष्कळ लोक आहेत. या लोकांना शास्त्रानें निषिद्ध मानलेलीं इहलोकींचीं सुखें तेवढींच दिसतात; पण या सुखांच्या मागें लागण्यांत शास्त्रानें जे दोष सांगितले आहेत ते यांना दिसत नाहींत. अन्याय्य व अवैदिक अशा मतांचा स्वीकार केल्यानें यांना आमच्याप्रमाणेंच शोकमग्न होऊन राहण्याची पाळी येते; कारण, इंद्रियभोग्य असे जे शीतोष्णादि विषय त्यांचें सुखदुःख तुम्हाआम्हांलाच काय, पण सर्व पशु, पामर आणि पंडित यांना सारखें आहे. चारी वर्ण व चारी आश्रम यांच्या सर्व आचारांची प्रवृत्ति एका सुखप्राप्तीसाठींच झालेली आहे. एका सुखोद्देशानेंच प्रवृत्त झालेल्या ह्या अनेक क्रियांच्या श्रेष्ठ–कनिष्ठत्वाचा निर्णय सांगतांना, हे ब्रह्मन्, सकल शास्त्राच्या सिद्धांतांत श्रेष्ठ असें अनंत स्वरूपाचें मोक्ष-

शास्त्र सांगून आपल्या उहापोहकौशल्यानें आमचें चित्त आपण शांत केलें आहे. आत्मज्ञानाचा अनुभव नसल्यानें व चित्त अज्ञानानें आवृत झालेलें असल्यानें ब्रह्म-रूपावर आमची निष्ठा जडत नाहीं; आमचें चित्त हीन विषयांकडेच धांवतें. पण आपण आज आमच्या चित्ताचा उपशम केला आहे. स्वतःच्या अनुभवज्ञानाच्या जोरावर तर्कशास्त्रासारख्या शास्त्राची प्रतिष्ठा न ठेवणारा, अज्ञानांत गढून गेलेल्या लोकांना तुच्छ मानून त्यांच्यापासून दूर रहाणारा, जितेंद्रिय, योगनिष्ठ व कृत-कृत्य असा पुरुषच शरीरस्थिति कायम रहाण्यापुरताच जगाशीं संबंध ठेवून सर्वत्र विहार करूं शकतो. अशा पुरुषानेंच वेदवचनांचा आधार घेऊन मोक्ष आहे असें म्हणणें हें योग्य आहे. कुटुंबाचा आश्रय करून राहणारा व सांसारिक कर्मांतच गढून गेलेला जो पुरुष आहे त्याच्या हातून या मार्गाचें आचरण घडणें कठीण. आतां, दान, अध्ययन, यज्ञ, विध्युक्त रीतीनें विवाह करून वंशवृद्धि करणें, सारल्य इत्यादि धर्मांचें आचरण करूनहि मोक्षप्राप्ति न होऊं लागेल तर या धर्मांचें आचरण करणारा पुरुष, त्याचें धर्माचरण, व त्यासाठीं त्यानें केलेले श्रम हीं सर्व निरर्थक ठरतील व तो पुरुष धिक्कारार्ह ठरेल. यामुळें नास्तिक मताचा जोर होऊन वेदप्रामाण्य कमी होईल, वेद मागें पडतील. म्हणून, हे भगवन्, या मोक्षशास्त्राचें अनंत अशा प्रकारचें स्वरूप विस्तारानें व शीघ्र ऐक-ण्याची माझी इच्छा आहे. हे ब्रह्मन्, मीं आपल्या समीप आलों आहें. मला आपण उपदेश द्या. हें मोक्षशास्त्र आपल्याला जसें विदित असेल तसें तें मला शिकवा. १२. ३. २६९.

---

## अध्याय २७० वा.

[ १ कपिलस्यूमरश्मिसंवादः—पुढें चालू २ सदाचाराचें लक्षण व त्याचे चार प्रकार. ३ आत्मविद्योपदेश. ]

(१) **कपिल**—हे स्यूमरश्मे, वेदांचें प्रामाण्य कमी होईल अशी जी तुला भीति वाटते ती निराधार आहे. वेद कधींहि मागें पडणार नाहींत. इहलोकीं मनुष्यानें द्विविध ब्रह्माचें ज्ञान करून घ्यावयाचें असतें. एक शब्दब्रह्म म्हणजे वेदविद्या व दुसरें परब्रह्म—चित्स्वरूप. वेदविद्येमध्यें निष्णात झाल्यानंतरच पुरुषाला परम-पदाचें ज्ञान होतें. पुत्रजन्माबद्दलची मातापितरांची इच्छा ‘धाता गर्भं दधातु ते’ इत्यादि मंत्रांनीं जेथें व्यक्त केली जाते तेथेंच त्या

मंत्रांचा संस्कार शरीरावर घडतो. अशा तऱ्हेनें पित्यानें ज्याचे सर्व श्रौतस्मार्त संस्कार केलेले आहेत व ज्याच्याकडून अध्ययनहि करविलेलें आहे असा पुरुषच ब्रह्मविद्येचा अधिकारी होतो. मोक्षाला उपयोगी पडणारी चित्तशुद्धि करणें हेंच कर्मकाण्डोक्त कर्मांचें फल होय. तें मीं तुला सांगतों तें समजून घे. हें कर्मांचें फल वेदवाक्यें सांगतात म्हणून मानावयाचें किंवा लोकवार्तेवरून अगर इतिहासावरून अनुमानावयाचें असेंहि पण नाहीं. तर लोकांच्या डोळ्यांस दिसणारें प्रत्यक्ष असें हें फल आहे. तें मी सांगतों.

कोणत्याहि प्रकारच्या फलाची आशा मनांत न धरितां केवळ एक धार्मिक कर्तव्य म्हणून जे यज्ञ करीत; ज्यांना कोणताहि लोभ नव्हता व म्हणूनच संग्रहलालसाहि नव्हती; सत्पात्रीं दान करणें हाच धनाचा सद्व्यय होय असें जे मानीत; पापकर्माचा आश्रय ज्यांनीं कधींहि केला नाहीं; अग्निहोत्रादि कर्मं जे निष्कामबुद्धीनें करीत; आपल्या मनांतील सर्व संकल्प सिद्धीस नेण्याचें पूर्ण सामर्थ्य ज्यांच्या अंगीं होतें; विशुद्ध अशा ज्ञानाचा लाभ करून घेऊन ज्यांनीं आपल्या बुद्धीला एक प्रकारचें स्थैर्य आणलेलें होतें; ज्ञानमार्गावर ज्यांची पूर्ण निष्ठा होती; जन्म, कर्म व विद्या हीं तीन्हीहि ज्यांचीं विशुद्ध स्वरूपाचीं होतीं; जे प्राणिमात्राच्या हिताविषयीं नेहमीं तत्पर रहात, असे आपल्या कर्मापासून केव्हांहि न चळणारे पुष्कळ गृहस्थ, योगयुक्त जनक राजासारखे राजे व यथाविधि धर्माचार पाळणारे याज्ञवल्क्यासारखे ब्राह्मण पूर्वीच्या काळांत होऊन गेले. सर्वत्र समबुद्धि ठेवणारे, सदा सरळपणानें चालणारे, नित्य संतुष्ट, ज्ञानामुळें बुद्धि स्थिर झालेले, ज्यांच्या धर्मांचें सत्यसंकल्पत्वादि फल प्रत्यक्ष दृष्ट आहे असे, सोपाधिकाच्या पलीकडचें जें निरुपाधिक ब्रह्म त्यावर पूर्ण श्रद्धा असणारे, मूळचेच पवित्र अंतःकरणाचे, ज्यांच्या विधिवत् आचरणांत कधींहि खंड पडला नाहीं असे हे पुरुष संकटांतहि धर्माचरण करीत व आपत्कालींहि यांचें धैर्य चळत नसे. पूर्वीं अशा तऱ्हेनें धैर्यानें धर्माचरण करणाऱ्या या महाभागांना सुखप्राप्ति नियमानें होई, व प्रायश्चित्तें घेण्याचे प्रसंग यांजवर कधींहि आले नाहींत. हे पुरुष सत्यधर्मांचें आचरण करीत. धर्माचरणाच्या बाबतींत कधींहि वंचना करीत नसत. विषयासक्त बुद्धीच्या अनुरोधानें कधींहि चालत नसत. म्हणूनच यांचा उपमर्द करणें कोणालाहि शक्य होत नसे. एकाच प्रकारच्या धर्मविधीला अनेक विकल्प जेथें सांगितलेले असतील त्या ठिकाणीं सर्वोत्कृष्ट अशा पक्षाचाच हे अवलंब करीत. म्हणून प्रायश्चित्ताची वेळ यांजवर कधींच आली नाहीं. यथाविधि धर्माचरण

करणारांना प्रायश्चित्ताची जरूरच नाहीं. प्रायश्चित्त हें दुर्बलांसाठीं आहे असें श्रुति सांगते. अशा प्रकारचे ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेद या त्रयीचें अध्ययन करून त्यांत पारंगत झालेले; पवित्र; सन्मार्गानें चालणारे; यशस्वी; यज्ञाचरण करणारे असे अनेक ब्राह्मण पूर्वीच्या काळांत होऊन गेले. हे सदाचारसंपन्न व शहाणे ब्राह्मण नित्य निर्लोभ वृत्तीनें यज्ञकर्में करीत. यांचे यज्ञ, अध्ययन, व सर्व कर्में हीं वेदाज्ञेप्रमाणें चालत. अध्ययन व्यवस्थेशीर, योग्य वेळीं, योग्य पद्धतीनें होई. यांचीं कर्में शास्त्रानें घालून दिलेल्या क्रमानेंच चालत. काम व क्रोध यांच्या वाऱ्यालाहि उभे रहात नव्हते. अत्यंत दुर्घट अशीं कर्में हे करीत. आपल्या कर्मांनीं लोकांच्या स्तुतीस पात्र झालेल्या, स्वतः स्वभावानेंच स्तुत्य असलेल्या, सरळ मार्गानें जाणाऱ्या, नेहमीं शमवृत्तीचा अवलंब करून आपापल्या कर्मांत निरत असणाऱ्या या लोकांना अनंतस्वरूपी परमपदाची प्राप्ति होई असें सनातन श्रुति आम्हांला सांगते. दुर्घट कर्में करूं शकणाऱ्या, महासामर्थ्यवान् व स्वतःच्या कर्मांनीं आचारसंपन्न बनलेल्या या लोकांच्या तपोबलाला अत्यंत तीव्र स्वरूप आलें. ज्यामध्यें आपद्धर्माची पळवाट नाहीं; जेथें कामक्रोधापासून पराभव होण्याचा संभव नाहीं; असा प्रमादरहित, आश्चर्यकारक, सनातन, शाश्वत व संशयरहित असा जो हा धर्ममार्ग त्याचें आचरण जितक्या सूक्ष्मतेनें व्हावयास पाहिजे तितकें तें कालांतरानें लोकांच्या दुबळेपणानें होईनासें झालें; तेव्हां हा एकच आचार आश्रमभेदानें चार प्रकारचा कल्पिला गेला असें ब्राह्मण मानितात. वानप्रस्थश्रम न स्वीकारतां गार्हस्थ्यांतून एकदम संन्यास घेऊन, गार्हस्थ्यानंतर वानप्रस्थधर्म स्वीकारून, गृहस्थाश्रमांतच वागून किंवा ब्रह्मचर्यव्रतानें राहून जो सदाचारसंपन्न पुरुष विधिवत् धर्माचरण करतो त्याला परमपदाची प्राप्ति होते. असे परमपदाला पोहोंचलेले हे ब्राह्मण आकाशांतील तेजोगोलांच्या—नक्षत्रें तारका इत्यादिकांच्या—रूपानें दिसतात व त्या ठिकाणीं परमपदप्राप्तीच्या आनंदांत मग्न होऊन राहतात असें वेदश्रुति सांगते. या ब्राह्मणांनीं जर कधींकाळीं पुनः शरीराचा आश्रय केला तर त्या त्या शरीरधारणेमुळें त्या त्या योनींतील पापाचा संपर्क त्यांना बाधूं शकत नाहीं.

हें सर्व जरी खरें, तथापि ज्याचा निश्चय अढळ अशा वेदाध्ययनरत व योगयुक्त ब्रह्मचाऱ्याच्या ठिकाणींच ब्राह्मण या शब्दाची सार्थकता होईल. इतर पुरुष नुसतेच ब्राह्मणब्रुव म्हणजे ब्राह्मणक या संज्ञेला पात्र होतात. एवंच मनुष्याचें भलेपण किंवा बुरेपण हें त्याच्या बऱ्या किंवा वाईट कर्मांवरच अवलंबून आहे.

कर्माचरणानें व अनंत असें परमेश्वराचें स्वरूप उपजून सांगणाऱ्या 'तत्त्वमसि' इत्यादि श्रुतिवाक्यांच्या यथार्थ ज्ञानानें बुद्धि स्थिर होऊन आत्मज्ञानींचा अंतःकरणांत लख्ख प्रकाश पडला म्हणजे 'सर्वत्र परब्रह्म भरलेलें आहे' असा अनुभव या पुरुषांना येतो असें श्रुति सांगते. ज्यांच्या वासना नाहींशा झालेल्या आहेत असे जे शुद्धात्मे मुमुक्षु त्यांना परब्रह्मपदाच्या ज्ञानाचा अनुभव येतो. जागृति, स्वप्न आणि सुषुप्ति या तीन्ही अवस्थांतून अनुक्रमें प्रत्ययास येणारीं जीं विश्व, तैजस व प्राज्ञ हीं परमेश्वरस्वरूपें, या तीन्हींच्या पलीकडील जें तुरीयपदवाच्य ब्रह्मरूप उपनिषदें सांगतात त्या रूपाची प्राप्ति करून घेण्याचा शम, दम, उपरति, तितिक्षा, श्रद्धा व समाधि यांनीं साध्य होणारा धर्म आचरण्याची मोकळीक सर्व धर्मांना सारखीच आहे असें स्मृति सांगते. परंतु, मनोजय केलेल्या शुद्धात्म्या ब्राह्मणांनाच याचा खरा फायदा घेतां येतो व त्यांनाच तुरीयपदाची प्राप्ति होते. हा संन्यासधर्म परंपरेनें आलेला, नित्य व मोक्षप्रद असा असून संतोष हें त्याचें मूळ, त्याग हा आत्मा व ज्ञान हें त्याचें अधिष्ठान होय. मनुष्य साधारण किंवा कसाहि असो, तो निरनिराळ्या आश्रमांतील धर्मांचें आचरण करीत असो वा नसो, जो जो या मार्गाचें यथाशक्ति अवलंबन करील त्याला या मार्गानें जातां जातां केव्हां तरी कल्याणप्राप्ति होईलच होईल. या मार्गानें जाऊन ज्याला ज्ञानप्राप्ति होत नाहीं-मोक्ष मिळत नाहीं—असा फक्त एक दुबळा किंवा रोगीच. जो मनुष्य शुद्धांतःकरणानें ब्रह्मपदप्राप्तीच्या मार्गाला लागला तो संसारबंधनांतून सुटलाच पाहिजे.

**स्यूमरश्मिः**—उपलब्ध असलेल्या साधनांनीं, भोग, दान, यज्ञ व अध्ययन या कर्मांचें आचरण जे करितात व या सर्वांचा त्याग जे करतात या दोघांतून मृत्युनंतर स्वर्ग निश्चित असा कोणाला मिळतो? हे ब्रह्मन्, मी आपणाला हें विचारीत आहे तें आपण मला यथातथ्य कथन करा.

**कपिलः**—हे स्यूमरश्मे, सर्व प्रकारचे भोगपरिग्रह यथाशास्त्र घेतले तर तेहि आपल्या परीनें कल्याणकारक व मोक्षफलदायक आहेत ही गोष्ट खरी; परंतु शम सुखांत जी गोडी आहे ती यांत नाहीं हें तुलाहि समजेल.

**स्यूमरश्मिः**—आपल्यासारखे विद्वान् ब्राह्मण ज्ञाननिष्ठ असतात, व गृहस्थ हे कर्मनिष्ठ असतात. सर्व आश्रमधर्मांचें फल एकच म्हणजे मोक्ष हें होय. म्हणून हे सर्व तुल्यबलच आहेत. कर्म व ज्ञान यांच्यांत श्रेष्ठत्वकनिष्ठत्व मानणें यांत कांहींच

तथ्य उरत नाहीं. तेव्हां, याचा उलगडा युक्तिजुक्तिला धरून जो असेल तो आपण मला साकल्यानें सांगावा.

कपिलः—स्थूल व सूक्ष्म या शरीरांची शुद्धि करणें हें कर्माचें फल होय. कर्में चित्तशुद्धीसाठीं व शरीरशुद्धीसाठीं असतात. ज्ञान हें मोक्षफलदायि आहे. त्याचें पर्यवसान मोक्षांत होतें. अंतःकरण मलिन करणारे विविध दोष कर्माचरणानें दग्ध झाले व ब्रह्मरसाची गोडी उत्पन्न होऊन त्या स्वरूपाचें शास्त्रोक्त ज्ञान झालें म्हणजे मनुष्य परमपदाला पोहोंचतो. भूतदया, कोणत्याहि संकटांत न डगमगण्याइतकें धैर्य, मनोजय, खरें बोलणें, सरळपणा, अद्रोह, अभिमानाचा अभाव, विनय, सहनशीलता व कर्मासंबंधींची उपरति हे ब्रह्मपद-प्राप्तीचे मार्ग असून यांनींच अक्षय परमपदाचा लाभ होतो. कर्माच्या द्वारें बुद्धींतील दोष नाहींसे होणें, निर्दोषबुद्धींत वर सांगितलेले गुण उत्पन्न होणें व या गुणांच्या योगानें परमपदाची प्राप्ति होणें असा हा मार्ग असल्यानें परमपदप्राप्ति हें कर्माचेंच फल होय असें विद्वान् मनुष्यानें समजावें. सर्व बाजूंनीं ज्यांच्या चित्ताला शांति प्राप्त झालेली आहे, ज्यांचें चित्त विशुद्ध आहे, ज्ञानानें ज्यांच्या बुद्धींत एक प्रकारचें स्थैर्य आलें आहे असे ब्राह्मण ज्या गतीला जातात तीच ही परमगति होय. वेद, वेदांनीं जिज्ञास्य म्हणून सांगितलेलें ब्रह्मरूप, कर्माचें यथाविधि अनुष्ठान इतक्या गोष्टीचें यथार्थ ज्ञान असूनहि ज्यांच्या अंगीं अहंकार नाहीं, त्यांनाच वेदवेत्ता ही पदवी शोभते. इतर नुसतेच वातरेचक—म्हणजे लोहाराच्या भात्याप्रमाणें वारा आंत घेऊन पुनः बाहेर सोडणारे—अर्थ न समजतां निष्कारण वटवट करणारे होत. खरा वेदवेत्ता ब्राह्मण जो आहे त्याला सर्व गोष्टींचें ज्ञान असतें. कारण, वेद हेंच सर्व गोष्टींचें अधिष्ठान होय. वर्तमान, भूत, भविष्य वगैरे सर्वांचें स्वरूप या वेदांत सांगितलेलें आहे. सर्वशास्त्रांचा निर्णय म्हणून एकच; व तो हा कीं, हें जगत् आहेहि व नाहींहि. स्वप्नांत पाहिलेली गोष्ट जशी स्वप्नकालीं सत् व बोधकालीं असत् असते तसेंच हें जग व्यावहारिक दृष्टीनें सत् व परमार्थदृष्टीनें असत् होय. सर्व ठिकाणीं जगताचें हेंच स्वरूप सांगितलेलें आहे; म्हणजे ज्या क्षणाला ज्ञात्या पुरुषांच्या दृष्टीनें तें डोलाऱ्याप्रमाणें असत् असतें त्याच क्षणाला अज्ञानी पुरुषाच्या दृष्टीनें तें वज्रपंजराप्रमाणें मजबूत व सत्यहि असतें. जगतांत “ सत्त्व ” व “ असत्त्व ” हे दोन्ही गुण एकसमयावच्छेदानें असतात. ज्ञात्या पुरुषाची निष्ठाहि पण अशीच असते. तो जगत् हें सत्‌हि मानतो व असत्‌हि मानतो. कार्याचा कारणांत लय होणें हा मध्यलय

व कार्य आणि कारण या दोहोंचाहि शुद्ध परमब्रह्मांत–निर्विकल्प परमात्मरूपांत–लय हा अंत्यलय होय. शेतें, बागा, घरें, जनावरें, बायका–मुलें, स्वतःचें शरीर, इंद्रियें, प्राण, मन, बुद्धि व अहंकार इत्यादिकांच्या त्यागानें उत्पन्न होणाऱ्या निर्विकल्प समाधींतच आत्मसुख प्राप्त होतें. ' दृश्यते त्वग्र्यया बुध्या ' व ' योगिनस्तं प्रपश्यंति ' इत्यादि श्रुति व स्मृति हेंच सांगतात. हें आत्मसुख–हा संतोष–हेंच अपवर्गाचें साधन–मोक्षाचें साधन होय. ब्रह्मजिज्ञासु मनुष्याला होणारें हें पद म्हणजेच निराबाध असें परमात्मरूप—ऋत; मूर्त व अमूर्त प्रपंचाचें अधिष्ठान–सत्य; सर्व स्थावर जंगम भूतांच्या रूपानें प्रकट दिसणारें म्हणून ज्ञेय व सर्वांचा आत्मा म्हणून ज्ञात होय, असें याचें वर्णन केलेलें आहे. हें ब्रह्म-रूप निष्कल, सुखरूप, मंगलांतलें मंगल, दिक् कालादिकांची मर्यादा ज्याला नाहीं असें, अव्यक्ताचा आविर्भाव सुद्धां ज्यापासून होतो असें, ज्याला कोणताहि विकार होत नाहीं असें व असंग आहे असें श्रुति सांगते. इंद्रियनिग्रह करण्याचें सामर्थ्य ज्यांना आहे, शत्रूसंबंधानें सुद्धां ज्यांच्या मनांत रागाची भावना उत्पन्न होत नाहीं, वासनारहित झाल्यामुळें ज्यांची कर्मांतील आसक्ति संपली आहे, सारांश, केवळ सुखाची–निर्मळ सुखाची–प्राप्ति करून देणारे तेज, क्षमा व शांति हे गुण ज्यांच्या अंगीं बाणलेले आहेत अशा पुरुषांनीं आपले बुद्धिरूप नेत्र उघडले म्हणजे त्यांना निष्क्रिय, आकाशाप्रमाणें असंग, नित्यस्वरूप व अव्यय अशा परब्रह्मरूपाची प्राप्ति होते. अशा तऱ्हेच्या त्या ब्रह्मरूपाला व तद्रूपच असलेल्या ब्रह्मवित् ब्राह्मणाला नमस्कार असो. १२. ३. २७०.

## अध्याय २७१ वा.

[ १ धर्म, अर्थ व काम यांचें श्रेष्ठकनिष्ठत्व. २ कुण्डधारोपाख्यान ]

(१) युधिष्ठिर—धर्म, अर्थ व काम या तीन्ही पुरुषार्थांची महती वेदांनीं गाइली आहे खरी; पण, यांच्यांत निवडच करावयाची झाली तर कोणता पुरु-षार्थ श्रेष्ठ मानावा तें हे पितामहा, आपण मला सांगा.

(२) भीष्म—या संबंधांत पूर्वी कुण्डधारानें मोठ्या प्रेमानें आपल्या भक्तावर उपकार केल्याचा म्हणून एक जुना इतिहास सांगतात तो मीं तुला सांगतों तो ऐक.

कोणी एका निर्धन ब्राह्मणानें आपल्या सकल कामना तृप्त व्हाव्या या इच्छेनें धर्माचरण करण्याची इच्छा मनांत धरिली. धर्माचरण हातून घडण्यासाठीं यज्ञ करावयाचा तर त्याला आधीं द्रव्य पाहिजे; म्हणून, त्या ब्राह्मणानें द्रव्यासाठीं घोर तपश्चर्या आरंभिली. त्यानें मनाचा निश्चय करून अनेक देवतांचें भक्तिभावानें पूजन केलें. पण, अशा देवतापूजनानेंहि त्याला धनप्राप्ति झाली नाहीं. मनुष्यांच्या विनवण्या ऐकून ऐकून ज्याचें अंतःकरण बधिर झालेलें नाहीं, ज्याला अजून थोडी भावना शिल्लक आहे व जें माझ्यावर शीघ्र कृपाप्रसाद करील असें दैवत कोणतें व तें कोठें सांपडेल अशी त्या ब्राह्मणाला चिंता पडून तो असलें दैवत शोधण्याच्या मार्गास लागला. सौम्य मनानें विचार करीत असतांना त्याला जवळच नेहमीं देवांच्या सेवेंत असणारा कुंडधार नांवाचा एक मेघ दिसला. त्याचें भव्य शरीर पाहून त्या ब्राह्मणाच्या मनांत त्याच्याबद्दल आदरभाव उत्पन्न झाला व 'हा मेघ आपलें कल्याण करील असें याच्या आकारावरून वाटतें, हा नेहमीं देवांच्या सहवासांत असतो, याला दुसऱ्या माणसांनीं कोणींहि भीड घातलेली नाहीं तेव्हां हा आपल्याला पुष्कळ धन आणि तेंहि लवकर देईल' असा विचार मनांत आणून त्या ब्राह्मणानें नानाप्रकारचे धूप, गंध, सर्व प्रकारचीं फुलें व विविध तऱ्हेचे बळि देऊन त्या मेघाचें पूजन केलें. त्या पूजेनें तो मेघ अल्पकालांतच संतुष्ट झाला व त्या ब्राह्मणाचें निश्चितपणें कल्याण करण्याच्या इच्छेनें त्याला म्हणाला "ब्रह्महत्या, सुरापान, चोरी व व्रतभंग यांची गणना महापातकांत होते; पण, या पातकांनाहि सज्जनांनीं प्रायश्चित्त सांगितलेलें आहे, कृतघ्नतेच्या पातकाला प्रायश्चित्तविधि नाहीं, म्हणून कृतघ्नतेचें पातक सज्जनांच्या दृष्टीनें पंचमहापातकांपेक्षांहि घोरतर होय."

नंतर रात्रौ तो ब्राह्मण दर्भाच्या शय्येवर निजला असतां कुंडधाराच्या प्रभावानें त्याला स्वप्नांत सर्व स्थावरजंगम भूतें दिसूं लागलीं. त्याची तपश्चर्या, शमसामर्थ्य भक्ति वैराग्य व शुद्ध अंतःकरण यामुळें त्याला स्वप्नांत पुढील दृश्य दिसूं लागलें.

मणिभद्र नांवाचा एक भव्य व अत्यंत तेजस्वी असा देव आपापल्या कर्मांचीं फलें मागावयास आलेल्या निरनिराळ्या लोकांना देवांच्या समोर नेत होता व ते देव शुभकर्में करणारांना राज्यें, धन इत्यादिक फलें देत होते. तसेंच, ज्यांनीं ज्यांनीं अशुभ कर्में केलीं त्यांचीं राज्यें वगैरे काढूनहि घेत होते. हे युधिष्ठिरा, त्या ठिकाणीं जे यक्ष वगैरे जमले होते त्या सर्वांच्या देखत त्या कुण्डधारानें

देवांसमोर साष्टांग दंडवत घातलें. त्या कुंडधाराला तशा तऱ्हेनें भूमीवर पडलेला पाहून अतिशय मोठ्या मनाचा असा तो मणिभद्र ' हे कुंडधारा, तुला काय पाहिजे तें सांग ' असें म्हणाला; त्यावर तो कुंडधार मणिभद्राला म्हणतो,

**कुंडधार**—हे सर्व देव जर मजवर संतुष्ट झाले असतील तर माझी भक्ति करणाऱ्या या ब्राह्मणाला जेणेंकरून सुख होईल असा कांहीं अनुग्रह त्यांनीं याच्यावर करावा. महातेजस्वी कुंडधाराचें हें भाषण ऐकून देवांच्याच आज्ञेवरून मणिभद्र त्याला फिरून म्हणतो,

**मणिभद्र**—बा कुंडधारा, ऊठ, ऊठ. तुझें कल्याण असो, व तूं कृतकार्य होऊन सुखी हो. या ब्राह्मणाला जर द्रव्य पाहिजे असेल तर त्याला द्रव्य दे. हा तुझा मित्र ब्राह्मण जितकें द्रव्य मागत असेल तितकें अगणित द्रव्य देवांच्याच आज्ञेनें मीं त्याला देतों.

हे युधिष्ठिरा, कुंडधारानें मणिभद्राचें हें भाषण ऐकून मनांत विचार केला कीं, ऐहिक राज्यादि संपत्ति ही चंचल व नश्वर असल्यानें ती संपून जाईल; तेव्हां या ब्राह्मणाची मति तपश्चर्येकडे वळेल असें करावें. असें मनांत आणून तो मणिभद्राला म्हणाला.

**कुंडधार**—हे दातृश्रेष्ठा, या ब्राह्मणाकरितां मीं आपल्याजवळ धनाची याचना करीत नाहीं. या माझ्या भक्तावर आपण दुसराच अनुग्रह करावा अशी माझी इच्छा आहे. रत्नादिकांनीं परिपूर्ण अशी पृथ्वी, किंवा एकादा रत्नांचा निधि यांपैकीं माझ्या भक्ताला आपण कांहीं द्यावें अशी माझी इच्छा नाहीं. या ब्राह्मणानें नेहमीं धर्मरत रहावें एवढेंच माझें आपल्यापाशीं मागणें आहे. या ब्राह्मणाची बुद्धि धर्मनिष्ठ असावी, यानें धर्माचरणानें वागावें, याचें सर्व आयुष्य धर्मप्रधान असावें. याला योग्य असा अनुग्रह माझ्या मतें हाच होय. हाच अनुग्रह आपण याच्यावर करावा.

**मणिभद्र**—हे कुण्डधारा, धर्माचें अंतिम फल तरी काय ? राज्योपभोग व विविध प्रकारचीं सुखें हेंच ना ! मग, तपश्चर्येचे शरीरकष्ट न करतां या ब्राह्मणाला धर्माचें फल जें राज्यादिक तेंच भोगूं दे. धर्माचरणाचे कष्ट त्याला कशाला देतोस ?

**भीष्म**—त्या मणिभद्रानें असें पुष्कळ सांगितलें तरी कुण्डधारानें पुनः पुनः धर्मनिष्ठाच मागितली. त्यामुळें सर्व देवता त्याच्यावर संतुष्ट झाल्या.

मणिभद्र—हे कुंडधारा, सर्व देवता तुजवर प्रसन्न झाल्या आहेत; तशाच त्या या ब्राह्मणावरहि पण संतुष्ट आहेत. हा ब्राह्मण देवतांच्या प्रसादानें धर्मात्मा होईल व याचें लक्ष नेहमीं धर्मांत राहील.

भीष्मः—हे युधिष्ठिरा, दुसऱ्या कोणालाहि सहजीं न मिळणारा असा दुर्लभ व आपल्या मनांतला वर मिळाल्यामुळें त्या मेघाला आनंद झाला व आपण कृतकृत्य झालोंसें त्याला वाटलें. पुढें त्या ब्राह्मणश्रेष्ठाला आपल्या दोन्हीं बाजूंस व भोंवतालीं सर्व ठिकाणीं तलम वस्त्रें पसरलेलीं दिसलीं. तीं पाहून त्याला एकप्रकारचा उद्वेग वाटला व त्यानें मनांत विचार केला कीं, 'या कुंडधाराला सुकृताची परीक्षाच नाहीं. आतां दुसरा कोण आपलें सुकृत पारखूं शकणार ? तेव्हां आतां आपण अरण्यांत जावें व तेथें धर्माचरणानें रहावें तेंच बरें !' असा विचार करून, एक तऱ्हेच्या खिन्नतेमुळें व देवतांनींहि त्याला तसा वर दिला होता म्हणून, तो ब्राह्मण अरण्यांत गेला व तेथें त्यानें घोर तपश्चर्या आरंभिली. देवता व अतिथि यांना देऊन शेष राहिलेल्या फळांवर व मुळांवर हा आपला चरितार्थ चालवी. धर्माच्या ठिकाणीं त्याचें मन रत झालेलें होतें. त्याची निष्ठा दृढ झाली होती. फलमूलांवर उपजीविका करण्याचा क्रम संपल्यानंतर पुढें त्या ब्राह्मणानें पर्णाहार आरंभिला व नंतर हीं पानें खाण्याचेंहि टाकून देऊन तो नुसतें पाणी पिऊनच राहूं लागला. जलाहाराच्या पुढच्या पायरीवर जाऊन त्या ब्राह्मणानें कित्येक वर्षेंपर्यंत वायुभक्षण केलें. इतक्या तपश्चर्येनंतरहि त्याचे प्राण व्याकुळ झाले नाहींत ही एक अद्भुतच गोष्ट होय. असाच पुष्कळ काळ गेल्यानंतर, त्या धर्मनिष्ठ व तपस्वी ब्राह्मणाला दिव्यदृष्टि प्राप्त झाली. त्याच्या मनांत असा विचार आला कीं, जर मी प्रसन्न होऊन एकाद्याला धन देईन म्हटलें तर माझी वाणी आतां खोटी होणार नाहीं. सिद्धिप्राप्तीच्या या कल्पनेनेंच त्याला अतिशय आनंद झाला व त्यानें फिरून तपश्चर्या आरंभिली. पुढें त्याला वाटलें कीं आपण जर एकाद्याला राज्य देऊं म्हटलें तर तो लवकरच राजा होईल, आपली वाणी खोटी होणार नाहीं. ब्राह्मणाच्या तपश्चर्येनें संतुष्ट होऊन व पूर्वीच्या स्नेहभावाला वश होऊन कुंडधारानें त्याला प्रत्यक्ष दर्शन दिलें. तेव्हां, हे युधिष्ठिरा, त्या ब्राह्मणाला अत्यंत आश्चर्य वाटलें व त्यानें कुंडधाराचें स्वागत करून त्याची यथाविधि पूजा केली. नंतर तो कुंडधार त्या ब्राह्मणाला म्हणाला, 'हे ब्रह्मन् , तुला आतां दिव्यदृष्टि प्राप्त झालेली आहे. राजे लोक कोणत्या गतीला जातात, त्यांना कोणते लोक मिळतात तें तूं आतां प्रत्यक्षच

पहा. इतकें तो कुंडधार बोलतो तोंच त्या ब्राह्मणाला त्याच्या दिव्यदृष्टीच्या प्रभावानें अनेक राजे नरकांत लोळत आहेत असें दृश्य दिसूं लागलें. त्याच्या नजरेसमोर असलें दृश्य ठेऊन कुंडधार त्या ब्राह्मणाला म्हणतो, ब्रह्मन् माझी भक्तिभावानें पूजा केल्याचें फळ म्हणून जर तुला असलें दुःख भोगावें लागलें असतें तर मीं तुझें कोणतें कार्य केलेंसें झालें असतें व यांत तुजवर अनुग्रह तो कोणता झाला असता ? पहा, पहा, हें दृश्य पुनः एकवार पहा आणि मनुष्यानें भोगविषयांचा हव्यास कसा धरावा तें सांग. या हव्यासापायींच स्वर्गाचे दरवाजे सर्वांसच बंद होतात आणि मनुष्यप्राण्याला तर विशेषच. नंतर त्या ब्राह्मणाला 'पुष्कळ लोकांना काम, क्रोध, लोभ, भय, मद, निद्रा, तंद्रा व आळस या अष्टदोषांनीं घेरलेलें आहे ' असें दृश्य दिसूं लागलें. त्यावेळेस तो कुंडधार त्या ब्राह्मणाला म्हणाला.

कुंडधार—हे विप्रर्षे, या दोषांनीं हे सगळे लोक दुष्प्राप्य झाले आहेत. देवांना मनुष्यांचें मोठें भय वाटतें व म्हणूनच देवांच्या आज्ञेनें हे अष्टदोष मनुष्यांच्या मार्गांत सर्व बाजूंनी विघ्नें आणीत असतात. देवांचा अनुग्रह ज्याच्यावर नाहीं त्याच्या अंतःकरणांत धर्मबुद्धि जागृत होणें शक्य नाहीं. तूं आतां आपल्या तपोबलाच्या जोरावर वाटेल त्याला द्रव्य व राज्य देण्यास समर्थ झाला आहेस. "

भीष्म—त्याचें हें भाषण ऐकतांच तो धर्मात्मा ब्राह्मण त्या कुंडधार नामक मेघाच्या पायावर डोकें ठेऊन त्याला म्हणाला, 'आपण मजवर फार मोठा अनुग्रह केला. आपला मजवरचा लोभ न ओळखतां काम व लोभ यांना बळी पडून मीं आपला निष्कारण मत्सर केला. त्याबद्दल मला क्षमा करा. ' त्याबरोबर 'मीं तुला पूर्वींच क्षमा केली आहे ' असें म्हणून त्या कुंडधारानें आपल्या दोन्हीं बाहूंनीं त्या ब्राह्मणाला आलिंगन दिलें व तो तेथेंच अंतर्धान पावला. कुंडधाराच्या प्रसादानें व तपोबलानें तो ब्राह्मण सर्व लोक फिरून आला. व आकाशगमन, मनांत इच्छिलेले अर्थ ताबडतोब मिळणें या गोष्टींना लागणारें सिद्धिबल त्याला प्राप्त झालें. धर्माचरण, शक्ति व योग यांनीं प्राप्त होणारी अत्यंत श्रेष्ठ अशी गतीहि त्याला मिळाली.

हे युधिष्ठिरा, देवता, ब्राह्मण, संत, यक्ष, मानुष व चारण हे सर्व या जगांत कोणाची पूजा करीत असतील तर ती धार्मिकाचीच होय. धनाढ्य व वासनांनीं

वेढलेले असे जे लोक असतात त्यांची पूजा हे करीत नाहींत. तुझी धर्माच्या ठिकाणीं निष्ठा आहे हा देवांचा तुजवर प्रसाद आहे असें समज. सुख, सुख म्हणून कोठें असेल—आत्यंतिक सुख कोठें प्राप्त होणार असेल—तर तें धर्माचरणांतच होय. १२. ३. २७१.

---

## अध्याय २७२ वा.

[ १ हिंस्रयज्ञनिंदा ]

१ **युधिष्ठिर**—हे पितामहा, यज्ञाचरण विविध प्रकारचें सांगितलें असलें तरी त्या सर्व यज्ञांचें फल एकच, व तें चित्तशुद्धि हें होय. चित्तशुद्धीसाठीं किंवा ईश्वरप्राप्तीसाठीं जे अनेक यज्ञ सांगितले त्यांत ज्याची योजना स्वर्गासाठीं नाहीं व धनासाठींहि नाहीं असला एकादा यज्ञ सांगितला असल्यास त्याचें स्वरूप मला कथन करा.

**भीष्म**—या संबंधांत नारदांनीं सांगितलेला, यज्ञासाठीं उंच्छवृत्तीचा अंगीकार केलेल्या ब्राह्मणाचा एक इतिहास सांगत असतात तो मीं तुला सांगतों.

**नारद**—विदर्भदेशामधील एका अत्यंत श्रेष्ठ व धर्मनिष्ठ अशा प्रांतांत एक ब्राह्मण असे. हा ऋषि उंच्छवृत्तीनें राहणारा होता. याला एकदां आपण यज्ञ करावा अशी इच्छा झाली. याचा आहार म्हणजे काळी वरी, आणि सूर्यपर्णी व सुवर्चला या दोन पालेभाज्या एवढाच होता. या भाज्या बेचव व तिखट असत तरी याच्या तपःसामर्थ्यामुळें याला आपल्या त्या गोड लागत. वानप्रस्थाश्रमाच्या शुद्ध व प्रशांत वातावरणांत राहून, कोणत्याहि प्राण्याच्या हिंसेची कल्पना मनांत न आणतां, फलमूलादि साधनांनींच त्यानें स्वर्गप्राप्ति करून देणारा यज्ञ केला. या ब्राह्मणाचें नांव सत्य असें असून याच्या पत्नीचें नांव पुष्करधारिणी असें होतें. ही पुष्करधारिणी नवऱ्याप्रमाणेंच व्रतस्थ असल्यानें कृश झालेली होती तरी तिच्या अंगावर पावित्र्याचें तेज होतें. नवऱ्याबरोबर तिनेंही जरी यज्ञदीक्षा घेतली होती तरी नवऱ्याचा यज्ञ तिला मनापासून आवडत नसे. तो शाप देईल या भीतीनें ती त्याचें मन धरून वागे एवढेंच. तिच्या अंगावरचें वस्त्र आपोआप गळून पडलेल्या पानांचें व मोरपिसांचें केलेलें होतें. त्या यज्ञाचें फल आपल्याला मिळावें, किंबहुना, तो तसल्या

प्रकारचा यज्ञ आपल्या हातून घडावा, अशी तिची इच्छा नव्हती; पण, होत्याची आज्ञा म्हणून अकामबुद्धीनेंच तिनें यज्ञाचरण केलें. हें दंपत्य रहात होतें त्याच वनामध्यें पर्णाद नांवाचा एक धर्मवेत्ता हरिण इंद्राच्या आज्ञेवरून रहात असे. तो यांच्याजवळच असल्यानें त्याला यांचा सहवास नित्य लाभे. हा हरिण त्या ब्राह्मणाचा यज्ञ पाहून त्याला म्हणाला, ' मंत्रादि अंगांनीं हीन अशा या यज्ञाचें आचरण आपण कशाला करतां ? या यज्ञांत आपण माझें हवन करा, व सांग यज्ञ करून स्वर्गलोकाला जा. म्हणजे, अविधि यज्ञ केल्यानें होणारी आपली निंदा टळेल. नंतर, सूर्याच्या मंडलाची अधिष्ठात्री देवता सावित्री ही साक्षात् खालीं येऊन ' मजकरितां म्हणून या पशूचें हवन या यज्ञकुंडांत कर ' असें त्याला म्हणाली. परंतु, ' माझ्या सहवासांत असलेल्या पशूचा मीं वध करणार नाहीं ' असें म्हणून त्यानें सावित्रीचें सांगणें अमान्य केलें. तेव्हां ' काय हो हा यज्ञांतील अनाचार ' असें म्हणून रसातलांत जाण्याच्या इच्छेनें त्या सावित्रीनें त्या यज्ञाच्या अग्नींत प्रवेश केला.

पुढें त्या हरिणानें त्या सत्य ब्राह्मणाची पुनः प्रार्थना केली व ' मला मार ' अशी त्याची विनवणी केली. परंतु, त्या ब्राह्मणानें त्याला पोटाशीं घेऊन कुरवाळलें व ' जा ' म्हणून सांगितलें. त्याच्या म्हणण्याप्रमाणें तो हरिण गेला खरा, पण आठ पावलें जाऊन तो पुनः परत आला. आणि त्या ब्राह्मणाला म्हणाला ' हे सत्य विप्रा, पहा, तूं माझें या यज्ञांत खरोखरच हवन कर. यज्ञांत माझी आहुति पडल्यानें मला सद्गति मिळेल. मीं तुला दिव्यदृष्टि देतों. या दिव्यदृष्टीनें तूं स्वर्गांतील अप्सरा, व महात्म्या गंधर्वांचीं हीं विचित्र विमानें पहा. ' मृगानें दिलेल्या दिव्यदृष्टीमुळें त्या ब्राह्मणाला या गोष्टी खरोखरच दिसूं लागल्या व बराच वेळपर्यंत सतृष्ण नेत्रांनीं त्यानें तो देखावा पाहिला. भावी स्वर्गसुखाचा मनश्चक्षूंपुढील सुंदर देखावा व यज्ञांत स्वतःची आहुति देऊन स्वर्गसुख मिळविण्यास आतुर असलेला तो हरिण या दोन्ही गोष्टी पाहिल्यामुळें हिंसामय यज्ञानें स्वर्ग मिळतो या मताचें त्याला समर्थन करावेंसें वाटूं लागलें. हा हरिण हा प्रत्यक्ष धर्मच होता व त्यानें हरिणाच्या रूपांत त्या वनांत पुष्कळ वर्षें घालविलीं होतीं. त्यानें या ब्राह्मणाच्या निमित्तानें आपला उद्धार करून घेतला. वस्तुतः हिंसा करणें हा यज्ञाचरणाचा योग्य मार्गच नव्हे. हरिणाचा वध करावा असें त्यानें मनांत आणलें व हिंसामय यज्ञाला अनुमति दर्शविली. यामुळें त्याच्या तपश्चर्येचा भंग झाला. म्हणून हिंसा ही यज्ञिय नव्हे. नंतर

भगवान् धर्मानें त्या ब्राह्मणाच्या हातून स्वतः यज्ञ करविला. तपश्चर्येनें पत्नीला संतुष्ट केल्याचें समाधानहि त्याला लाभलें. अहिंसा—धर्म हाच सर्वांत परिपूर्ण असा धर्म होय. हिंसाप्रधान यज्ञाचरण करण्यास सांगणारा धर्म हा अशास्त्र अतएव अहितकारक आहे. मीं तुला खरेंच सांगतों, सत्यवादी ब्रह्मनिष्ठ लोकांचा हा धर्म नव्हे. १२. ३. २७२.

## अध्याय २७३ वा.

[ १ युधिष्ठिराचे चार प्रश्न. व त्यांचीं उत्तरें ]

१ **युधिष्ठिर**—हे पितामहा, मनुष्याच्या हातून पापाचरण कसें घडतें व तो धर्महि कसा आचरतो ? त्याला खेद कशामुळें होतो व मोक्ष कोणत्या साधनांनीं मिळतो तें आपण मला सांगा.

**भीष्म**—बाबारे, सर्व धर्मांचें ज्ञान तुला आहे. परंतु, तूं आपलें उजळणी-साठीं विचारतोस इतकेंच. मोक्ष, खेद, पाप व धर्म यांची उपपत्ति तुला मीं आमूलाग्र सांगतों ती ऐक—शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध हे जे पंचकर्मेंद्रियांचे विषय त्यांच्या प्राप्तीची इच्छा उत्पन्न होणें ही पहिली पायरी होय. या पांचांपैकीं कोणताहि एक विषय मिळाला असतांना तो इष्ट असेल तर त्याबद्दल काम व अनिष्ट असेल तर त्याबद्दल द्वेष अशा भावना उत्पन्न होतात. आणि, मग त्या विषयांसाठीं प्राण्यांची मोठी धडपड सुरू होते. रूपरस गंधादिकांपैकीं इष्ट गोष्टी पुनः पुनः मिळाव्या म्हणून त्यांचा अभ्यास ( पुनरावृत्ति )— सातत्यानें चिंतन—मनुष्य करूं लागतो, व बोकांडीं बसणाऱ्या अनिष्ट गोष्टी टळाव्या म्हणूनहि त्याची पुनः पुनः धडपड सुरूच असते. इष्ट गोष्टींचें पुनः पुनः चिंतन केल्यानें त्याबद्दलचा हव्यास वाढतो, आणि टाळण्यासाठीं म्हणून कां होईना, अनिष्ट गोष्टींचें चिंतन पुनः पुनः झाल्यानें त्याबद्दल तिटकारा वाटतो, व तो वाढतो. लोभ आणि मोह हे यांतूनच निर्माण होतात. लोभ व मोह यांनीं व्याप्त झालेल्या व रागद्वेषांनीं पछाडलेल्या मनुष्याला धर्माचरण करण्याची बुद्धि होत नाहीं; व तो धर्माचरणाचा आव घालून दंभाचार करतो. हे कुरुनंदना युधिष्ठिरा, अशा माणसाचें धर्माचरण दांभिकपणाचें असतें. निरनिराळ्या प्रकारचे अर्थ ( द्रव्य ) त्याला आवडतात पण त्यांतहि त्याचें कपट असतेंच. स्वतःला

मिळूं पहाणाऱ्या धनाकडेहि तो कपटदृष्टीनेंच पहातो. मनांतून हवें असलेलें द्रव्य तोंडानें वरवर नको म्हणणें ही कपटवृत्ति–दंभाचार–होय. हा तोंडानें जें द्रव्य नको म्हणतो तेथेंच याची आसक्ति असते व त्यासाठीं पाप करावयासहि हा मागेंपुढें पहात नाहीं. शहाण्या माणसांनीं व मित्रमंडळींनीं याला पापापासून मागें ओढण्याचा प्रयत्न केला तरी त्यांना तो जुमानीत नाहीं. स्वतःच्या दंभाचाराचें समर्थन करतांना हा भाषा मोठी न्यायघटित अशी योजतो. राग व मोह यांनीं वाढीस लावलेला या माणसाचा त्रिविध अधर्म–आचार, विचार व उच्चार या तिन्ही प्रकारांनीं यानें केलेलें पाप–सर्व बाजूंनीं वाढतच जातें. हा पापी मनुष्य दुसऱ्याचें वाईट चिंतितो, दुसऱ्याबद्दल वाईट बोलतो व दुसऱ्याचें वाईट करतोहि. असा जो अधर्मप्रवृत्त माणूस त्याचे दोष साधूंच्या डोळ्यांना दिसतात. पापकर्मैं हे सगळेच एका शीलाचे असल्यानें त्यांची मैत्री जुळते, पापकृत्यें करणाऱ्या माणसाला इहलोकींच सुख मिळत नाहीं; मग परलोकच्या सुखाची वार्ता दूरच. युधिष्ठिरा, पापात्मा माणूस अशा प्रकारचा असतो. आतां धर्मात्मा कोणाला म्हणावें तें सांगतों ऐक, व अशा धर्मात्म्या माणसाला सुख कसें मिळतें तेंहि सांगतों तें ऐक.

वर सांगितलेले जे दोष आहेत यांचें आपल्या बुद्धीनें पूर्वींच अवलोकन करून आपल्या कुशल धर्माचरणानें जो त्यांना टाळतो त्याला इष्ट अशी गति प्राप्त होते. सुख कोणतें व दुःख कोणतें याचा निर्णय करूं शकणारा धर्मात्मा पुरुष साधुपुरुषांची उपासना करितो. साधूंच्या सदाचाराचा कित्ता नेहमीं डोळ्यांपुढें असल्यानें व पुनः पुनः अभ्यास ठेविल्यानें या पुरुषाची धार्मिकता अधिकाधिकच वाढते. धर्मात्म्या माणसाची बुद्धि धर्मांतच रमते व ती त्या धर्मावरच पोसली जाते. धार्मिक माणूस धर्माचरणानें वागून मिळालेल्या द्रव्यांतच आनंद मानतो. ज्या ज्या ठिकाणीं त्याला सद्गुण दिसेल तेथें तेथें तो त्याचें संवर्धन करण्याच्या खटपटींत असतो. अशा आचरणानें मनुष्य धर्मात्मा होतो व त्याच्या भोंवतालीं चांगल्या सज्जन मित्रांचाच परिवार जमतो. धर्माचरणानें मिळालेलें धन व सज्जन मित्र यांच्या लाभानें त्याला इहपरलोकीं आनंद प्राप्त होतो. हे युधिष्ठिरा, शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध हे भोगविषय मागितल्याबरोबर पुढें येऊन उभे रहाणें हा मनुष्यांच्या धर्माचरणाचा प्रभाव होय. परंतु, धर्मात्म्या माणसाला असल्या सिद्धि हाताशीं येऊनहि त्यांचा आनंद वाटत नाहीं. भोगविषयांच्या भोगानें तृप्ति होत नाहीं असें ज्ञानचक्षूंनीं याच्या नजरेस

येतांच हा धर्मात्मा विरक्त होतो. भोगविषयांबद्दल याच्या अंतःकरणांत एक प्रकारचें वैराग्य उत्पन्न होतें. बुद्धीवर ज्ञानाचा संस्कार झालेला हा धर्मात्मा ज्या वेळेस, वासनारसगंधादि भोगविषय इत्यादिकांत आसक्ति ठेवीत नाहीं; शब्द, स्पर्श व रूप यांच्या ठिकाणीं ज्या वेळेस त्याचें मन गुंतून रहात नाहीं त्या वेळेस वासनांच्या पाशांतून हा मुक्त होतो; पण, धर्मावरची याची निष्ठा नाहींशी होत नाहीं. स्वर्गादि लोक अशाश्वत आहेत अशी खात्री पटल्यावर हा धर्मफलांचा त्याग करण्याचा प्रयत्न करितो. नंतर, हा स्वस्थ न बसतां योग्य उपायांनींच मोक्षासाठीं प्रयत्न करतो. पूर्वी उत्पन्न झालेलें वैराग्य हळूं हळूं याच्या अंगीं बाणतें व पापकर्माचा त्याग करून मनुष्य धर्मात्मा होतो व अशा धर्मात्म्याला मोक्षप्राप्ति होते. हे भारता, याप्रमाणें पाप, धर्म, निर्वेद व मोक्ष यांबद्दल जें जें तूं मला विचारलेंस तें तें मीं तुला सांगितलें आहे. हे युधिष्ठिरा, तूं कोणत्याहि अवस्थेंत असलास तरी धर्माचरणाकडे प्रवृत्ति ठेव. धर्मानें वागणाऱ्या पुरुषांना शाश्वत सिद्धि प्राप्त होते. १२. ३. २७३.

---

## अध्याय २७४ वा.

[ १ मोक्षोपायकथन. ]

१ **युधिष्ठिर**—'कोणत्याहि अशास्त्र मार्गाचा अवलंब न करितां, सरळ शास्त्रशुद्ध मार्गानें मोक्षप्राप्ति होते ' असें पितामहा, आपण आतांपर्यंत सांगितलें. हा सरळ व शास्त्रशुद्ध मार्ग कोणता हें ऐकण्याची माझी इच्छा आहे. तरी आपण कृपा करून तो मार्ग मला सविस्तर सांगा.

**भीष्म**—हे महाप्राज्ञा युधिष्ठिरा, मोक्षमार्ग इतक्या सूक्ष्मपणानें समजून घेण्याचा प्रयत्न करणें हें तुला शोभूनच दिसतें. कारण, प्रत्येक गोष्टीच्या बाबतींत शास्त्रशुद्ध मार्ग कोणता याची तूं नेहमींच चौकशी करीत असतोस. असो. मातीची घागर अस्तित्वांत येण्यापूर्वीं तिच्याबद्दल विचार करण्याची मनुष्याची जी बुद्धि असते तीच ती घागर अस्तित्वांत आल्यानंतर रहात नाहीं. तसेंच, यज्ञादि कर्मांनींच उत्पन्न होणारा व स्वर्गादि फलें प्राप्त करून देणारा जो धर्म त्याबद्दलची मनुष्याची विचार करण्याची तऱ्हा—त्याबद्दचा उपाय, व स्वतःसिद्ध असा जो मोक्षधर्म त्याबद्दलची मनुष्याची विचार करण्याची तऱ्हा—त्याबद्दचा उपाय—या दोन्ही गोष्टी परस्परभिन्न आहेत. स्वर्गादि फलें प्राप्त

करून देणारा भव्य ( पुढें उत्पन्न होणारा ) धर्म व स्वतःसिद्ध असा मोक्षधर्म या दोहोंच्या मार्गांत दक्षिणोत्तर ध्रुवांइतकें अंतर आहे. पूर्वसमुद्राला जाणाऱ्या मार्गानें गेलें असतां ज्याप्रमाणें पश्चिम समुद्राचें तीर दिसत नाहीं, त्याचप्रमाणें प्रवृत्तिधर्माच्या प्राप्तीच्या उपायांनीं मोक्षधर्माची प्राप्ति होऊं शकत नाहीं. मोक्षाला नेणारा मार्ग एकच आहे, तो मीं तुला विस्तारानें सांगतों ऐक.

क्षमेचा अवलंब करून क्रोधाचें उन्मूलन करावें. वासनाबीज समूळ नाहींसें करून आशेचा उच्छेद करावा. धीरपुरुषानें सत्वगुणाचा आश्रय करून आलस्यादि तामस दोष टाकावे व निद्रा जिंकावी. हातून कोणताहि प्रमाद होऊं न देण्याविषयीं जपावें व दुसऱ्यापासून आपल्याला उत्पन्न होणारें भय टाळावें. प्राणवायूचा विरोध करून क्षेत्रज्ञ जो परमात्मा त्याचें परिशीलन करावें. परमात्म्याच्या चिंतनांत मग्न राहून प्राणवायूच्या निरोधनानें मनोजय करावा. कोणत्याहि प्रकारची इच्छा, द्वेषभावना व विषयोपभोगांतील आसक्ति यांचा मोठ्या धैर्यानें निग्रह करावा. तत्ववेत्त्या पुरुषानें सत्यवस्तूबद्दलचे विपरीत ग्रह, त्यासंबंधाचें अज्ञान व अनिश्चित स्वरूपाचें ज्ञान या तिहींचाहि अभ्यासानें उच्छेद करावा. कोणत्याहि विषयाकडे लक्षच न लागण्याची मनाची जडवृत्ति व एका विषयाचें चिंतन करतांना इतर अनेक विषयांत भटकण्याची त्याची चंचलवृत्ति या दोहींचें ज्ञानाभ्यासानें नियमन करावें. ज्ञेय पदार्थाचें नेहमीं चिंतन करणें, त्याचें कथन करणें, तत्संबंधींच्या विचारांना नेहमीं चालना देणें व या सर्व प्रकारांनीं त्याच्याच ध्यानामध्यें निमग्न असणें याला ज्ञाते लोक ज्ञानाभ्यास म्हणतात. कफ, अजीर्ण इत्यादि उपद्रवांचें व ताप, अतिसार इत्यादि रोगांचें निर्मूलन स्वतःच्या प्रकृतीला हितकारक असा हलका व मोजका आहार करून करावें. समाधानवृत्ति बाळगून लोभ व मोह जिंकावे. विषय हे अनर्थकारी आहेत असें ज्ञान करून घेऊन त्यांच्या आहारीं जाऊं नये. दया हें धर्माचें मूळ आहे. परोपकाराचीं कृत्यें करून अधर्माला जिंकावें. शास्त्रानें सांगितलेल्या मार्गानें योग्य तऱ्हेनें आचार पाळून धर्माचें रक्षण करावें. ईश्वरावर हवाला ठेवावा व फळप्राप्तींतच मन गुंतूं न देतां दुराशेचा जय करावा. अर्थांतील आसक्ति टाकून त्याला आपल्या आहारीं आणावें. जगांतील वस्तुजात अनित्य आहे असें जाणून तत्संबंधीचा स्नेह तोडावा. वायूचा निग्रह करून क्षुद्विकार बळावूं देऊं नये. सर्वांबद्दल दयाशील वृत्ति धारण करावी व आपण मोठे अशी मनाची भावना नाहींशी करावी. संतोषवृत्तीनें तृष्णा

मारावी, उद्योगानें आळस घालवावा, निश्चितस्वरूपाच्या सिद्धांतरूप ज्ञानानें तर्कवितर्क नाहींसें करावे, मौनवृत्तीनें वाचाळपणा जिंकावा, मोठ्या शौर्यानें संसारभयाला तोंड द्यावें. वाचा व मन यांचें नियंत्रण बुद्धीनें करावें, बुद्धीच्या ठिकाणीं त्यांचा लय करावा. बुद्धीचा लय विश्वांतील पदार्थजाताचें ज्ञान करून घेऊन त्यांत करावा. या विज्ञानाचा लय परब्रह्मरूपाच्या ज्ञानांत व शेवटीं सर्वांचा स्वतःच्या ठिकाणींच लय करावा. ही शेवटची पायरी हेंच मोक्षस्वरूप होय.

या प्रकारें कथन केलेला हा मोक्षमार्ग शुद्ध आचरण करणाऱ्या शांतिप्रिय पुरुषांनीं जाणून घ्यावयाचा आहे. या पुरुषांनीं शास्त्रानें सांगितलेले काम, क्रोध, लोभ, भय व स्वप्न हे पांच योगदोष टाळावे. वाचेचा संयम करून ध्यान, अध्ययन, दान, सत्य, लज्जा, सरळपणा, आहाराचें पावित्र्य व इंद्रियांचा जय या योगसाधनांचें सेवन करावें. या साधनांनीं पुरुषाचें तेजोबल वाढतें व त्यांनीं सर्व पाप नाहींसें होतें. अशा पुरुषाचा मनांतील सर्व संकल्प सिद्धीस जातात. त्याला सर्व वस्तुमात्राचें ज्ञान होतें. या तऱ्हेनें निष्पाप बनलेल्या, हलका आहार घेणाऱ्या, जितेंद्रिय पुरुषानें काम व क्रोध जिंकावे व स्वतःला ब्रह्मपदाला पोहोंचविण्याची इच्छा धरावी. कोणत्याहि मोहांत न सांपडणें, कोठेंहि आसक्ति न धरणें, कामक्रोधांचा जय करणें, दैन्यवृत्तीचा त्याग करणें, दर्प, अहंकार इत्यादि सोडून देणें, उद्वेग न धरणें, गृहादिकांचा लोभ न धरणें व निष्कामबुद्धीनें काया, वाचा आणि मन यांचें नियंत्रण करणें हाच शुद्ध, निर्मल व पवित्र असा मोक्षमार्ग होय. १२. ३. २७४.

---

## अध्याय २७५ वा.

[ १·नारदासितसंवाद ]

(१) भीष्म—याच संबंधांतला एक पुरातन इतिहास म्हणून नारद व देवल असित यांचा एक संवाद सांगत असतात, तो मीं तुला सांगतों ऐक. सर्व ज्ञात्या पुरुषांत श्रेष्ठ असे देवल ऋषि एकदां बसले असतांना त्यांचें ज्ञानवृद्धत्व जाणून महर्षि नारदांनीं त्यांना सृष्टीची उत्पत्ति व लय याबद्दल प्रश्न केला.

नारद—हे ब्रह्मन्, हें सर्व स्थावरजंगम विश्व कशापासून उत्पन्न झालें व प्रयलकालीं याचा उपसंहार कशांत व्हावयाचा आहे तें आपण मला सांगा.

असित—' बहु स्यां प्रजायेय ' इत्यादि श्रुतींनीं ध्वनित केलेल्या इच्छेच्या प्रेरणेनें, प्राणिमात्रांच्या कर्मांचा विपाक होण्याचा योग्य काल आला असतांना, ज्यांच्यामधून परमेश्वर सर्व चराचरसृष्टि निर्माण करतो त्यांना सृष्ट्युत्पत्तीचा विचार करणारे ज्ञाते पुरुष पंचमहाभूतें असें म्हणतात. आपल्याच वासनेनें प्रेरित होऊन परमात्मा योग्य कालीं या पंचमहाभूतांतूनच सर्व सृष्टि निर्माण करितो. काल, बुद्धि व आकाशादि पंचमहाभूतें यांतूनच सृष्टि निर्माण होते. यांच्याखेरीज चेतन ईश्वर किंवा अचेतन प्रधान असलें दुसरें कांहीं जगत्कारण आहे असें म्हणणारे लोक जगापुढें अपसिद्धांत मांडीत असतात. हे नारदा, हीं पंचमहाभूतें व कालस्वरूप जीवात्मा ह्या अत्यंत सूक्ष्म अशा तेजाच्या राशीच होत. हीं सहा तत्त्वें शाश्वत, परिणामशून्य, निश्चल, अनाद्यनंत व स्वयंभू अशीं आहेत. पृथ्वी, आप, तेज, वायु व आकाश हीं तीं पंचमहाभूतें होत. या भूतांच्या पलीकडे या जगांत कांहीं नाहीं हें निःसंशय होय. श्रुतिवाक्य किंवा लौकिक तर्क यांच्या बळावर जर कोणीं यांच्या पलीकडे कांहीं तत्त्व आहे असें दाखवण्याचा प्रयत्न करूं लागेल तर त्याला त्यांत यश येणार नाहीं. फार झालें तर त्याला अज्ञान एवढी एकच गोष्ट दाखवितां येईल. हें अज्ञान म्हणजे ज्ञानाचा अभाव किंवा संशयात्मक, अनिश्चित स्वरूपाचें ज्ञान नव्हे. तर, एका वस्तूचे ठिकाणीं दुसऱ्याच वस्तूचा आभास उत्पन्न करणारें मिथ्या ज्ञान होय. या अविद्येमुळेंच संसाराची प्रवृत्ति होते. काल व पंचमहाभूतें यांच्या पलीकडे कोणाला कांहीं दाखवतां आलेंच तर तें हें अज्ञान किंवा अविद्या एवढें एकच. काल व पंचमहाभूतें हीं सहा, व हीं सहा ज्यांतून निर्माण होतात तें अज्ञान हीं कार्यरूपानें प्रकट होणें म्हणजे सृष्ट्युत्पत्ति होय, असें समज. पंचमहाभूतें, काल, भाव व अभाव, हीं आठ शाश्वत भूतें प्राणिमात्रांच्या उत्पत्तीला व लयाला कारणीभूत होतात. प्रलयकालीं सर्व प्राणिमात्र या भूतांच्या ठिकाणीं विलीन होतात व पुनरुत्पत्तीच्या प्रसंगीं त्यांतूनच पुनः निर्माण होतात. प्राणी नाश पावतो याचा अर्थच हा कीं, त्याचे पांच विभाग होऊन पृथ्वीचा भाग पृथ्वींत, जलाचा भाग जलांत अशा तऱ्हेनें पांची भूतांचे पांच भाग त्या त्या भूतांत विलीन होतात. त्याचा देह भूमीपासून निर्माण होतो. कानांची उत्पत्ति आकाशतत्त्वापासून होते. तेज या महाभूतापासून ( सूर्यापासून ) त्याचे डोळे होतात. प्राण वायूपासून होतो व त्याच्या अंगांतील रक्त हें जलापासून झालेलें असतें. डोळे, नाक, कान, त्वचा व जीभ हीं पांच इंद्रियें इंद्रियार्थांचें ज्ञान करून

देणारीं होत असें शहाणीं माणसें मानतात. पहाणें, ऐकणें, वास घेणें, स्पर्श करणें व चव घेणें हे पंचकर्मेंद्रियांचे व्यापार आहेत. पंचकर्मेंद्रियांच्या ह्या पांच प्रकारच्या व्यापारांतूनच पांच गुण निर्माण होतात. रूप, गंध रस, स्पर्श व शब्द हे ते पांच गुण होत. या पांच गुणांचा ( भोग्यवस्तूंचा ) उपभोग पंचकर्मेंद्रियांनीं पांच प्रकारांनीं घेतला जातो. पांच गुणांचा उपभोग पंचकर्मेंद्रियांनीं घेतला जातो असें म्हटलें; परंतु, हा भोग इंद्रियांना घडत नाहीं तर तद्वारा तो क्षेत्रज्ञ आत्म्याला घडतो. क्षेत्रज्ञ आत्मा इंद्रियांच्या द्वारें विषयभोग घेतो. चित्त हें इंद्रिय-समूहाच्या पलीकडचें होय; व मन हें चित्ताच्याहि पलीकडचें आहे. नुसती जाणीव उत्पन्न करणारें तें चित्त व अमुक वस्तु अमुक स्वरूपाची व अमुक गुणाची असें प्रत्येक वस्तूचें सविशेष व्याकरणात्मक ज्ञान ज्यानें होतें तें मन. बुद्धि ही या मनाच्याहि पलीकडची व क्षेत्रज्ञ आत्मा हा या बुद्धीच्या पलीकडचा. प्राणी प्रथमतः इंद्रियांच्या द्वारें पदार्थांचें सामान्य ज्ञान करून घेतो. नंतर, त्यांतील भेद मनानें जाणून बुद्धींद्रियाच्या साहाय्यानें त्याला पदार्थांचें स्वरूप निश्चित करतां येतें. सामान्य ज्ञान होणें हें चित्ताचें कार्य, त्यांतील भेदप्रभेद समजणें हें व्याकरणात्मक मनाचें कार्य तर निश्चितस्वरूपाचें पदार्थज्ञान हें व्यवसायात्मिका बुद्धीचें कार्य होय. चित्त, मन, व बुद्धि यांच्या अर्थांतील बारीक भेद हा असा आहे. इंद्रियांनीं उपलब्ध झालेल्या अर्थांचें स्वरूप प्राणी आपल्या बुद्धींद्रियानें निश्चित करीत असतो. चित्त, पंचकर्मेंद्रियें, मन व बुद्धि हीं आठ ज्ञानेंद्रियें होत असें सृष्ट्युत्पत्तीच्या प्रक्रियेचा विचार करणारांचें मत आहे. हात, पाय, गुद, शिश्न व मुख या नांवांनीं संबोधिलीं जाणारीं तीं कर्मेंद्रियें होत. खाणें व बोलणें या क्रियांकडे ज्या इंद्रियाचा उपयोग केला जातो तें मुख, चालण्याची क्रिया ज्यांकडून घडते ते पाय; कोणतीहि सामान्य क्रिया ज्यांच्याद्वारें होते ते हात अशा या इंद्रियांच्या संज्ञा आहेत. गुद व शिश्न यांचें कार्य उत्सर्ग करण्याचें आहे व या दोन्हीं इंद्रियांच्या कार्यांचें स्वरूप एकच. पुरीषोत्सर्ग हें गुदाचें कार्य व मूत्रोत्सर्ग आणि रेतोत्सर्ग हें शिश्नाचें कार्य होय. या पंचकमद्रियांना आपापलीं कार्यें करण्याचें सामर्थ्य देणारें असें जें प्राणबल तेंहि एक सहावें इंद्रियच होय. हीं सहा कर्मेंद्रियें जीं आतां सांगितलीं तीं जशीं माझे ठिकाणीं तशींच सर्वांच्याहि ठिकाणीं आहेत.

याप्रमाणें ज्ञानेंद्रियें कोणतीं, कर्मेंद्रियें कोणतीं, त्या त्या इंद्रियांचे गुण कोणते तें सर्व, नारदा, मीं तुला सांगितलें. आपापले व्यापार करून थकलेलीं कर्मेंद्रियें

निश्चेष्ट झालीं म्हणजे प्राण्याला झोंप येते. एकादा सुतार ज्याप्रमाणें काम करून थकल्यानंतर हातांतील हत्यार बाजूला ठेवून विश्रांति घेतो त्याचप्रमाणें प्राणिमात्र इंद्रियांना बाजूस ठेऊन झोंप घेतो. इंद्रियें थकलीं तरी कित्येकवेळां मनाचे व्यापार चालू रहातात. अशा वेळीं इंद्रियें निश्चेष्ट असलीं तरी मन एकटेंच विषयांचा उपभोग घेतें. याच प्रकाराला स्वप्न-दर्शन किंवा स्वप्न पडणें असें नांव आहे. यावर, झोंपेंत विषयोपभोगाची जाणीव कोठून, अशी शंका येईल; तर त्याचें उत्तर हें कीं जाग्रदवस्थेंत जे जे सात्विक, राजस किंवा तामस भाव त्या त्या कर्मांमुळें उत्पन्न होतात ते ते भाव स्वप्नस्थितींत सुद्धां उत्पन्न होतात व त्या त्या कर्मांचीं तीं तीं फलेंहि पण दिसतात. सुख, ऐश्वर्य, ज्ञान व परम वैराग्य हीं सात्विक भावाचीं लक्षणें आहेत. जाग्रदवस्थेंत जो पुरुष या गोष्टींचा अनुभव घेतो त्याला स्वप्नस्थितींतहि त्यांचीच आठवण होऊन तो स्वप्नांतहि त्याच गोष्टीचा अनुभव घेतो. जे जे सात्विक, राजस अथवा तामस भाव ज्या ज्या पुरुषाला जाग्रदवस्थेंत अनुभवावे लागतात ते ते भाव त्याला स्वप्नस्थितींतहि अनुभवाला येतात. जाग्रदवस्थेंतील भावना स्वप्नस्थितींत शिल्लक रहात नाहींत, व स्पप्नस्थितींतील भावना जाग्रदवस्थेंत नसतात. जाग्रदवस्था व स्वप्नस्थिति या दोहोंहून निराळी अशी एक सुषुप्ति नामक अवस्था आहे. या अवस्थेंत जाग्रदवस्था व स्वप्नस्थिति या दोहोंतीलहि भावना लयास जातात हें प्रत्यक्ष दिसतें. हीच नित्यस्थिति होय. जाग्रदवस्था व स्वप्न या दोहींतीलहि भावनांचा निरास होऊन जेथें कांहींच शिल्लक उरत नाहीं तीच नित्य सुषुप्त्यवस्था—तीच मुक्ति होय. याचाच अभिलाष प्राणिमात्रानें धरावयाचा असतो. ज्ञानेंद्रियें व कर्मेंद्रियें मिळून आतां जीं चौदा इंद्रियें सांगितलीं तीं व सत्व, रज आणि तम हीं तीन, असे एकंदर सतरा गुण सांगितले आहेत. या सतरा गुणांचा भोक्ता तो अठरावा आत्मा होय.

"आत्मा व हे सतरा गुण यांच्यांत भोक्तृभोग्यभाव आहे तेव्हां, गुणी व त्यांचे गुण यांच्या प्रमाणेंच आत्मा व इंद्रियादि गुण यांतहि नित्यसंबंध मानावयास हवा; आणि असला न्यायशास्त्रासारखा नित्य-संबंध मानल्यास इंद्रियादि गुणांच्या उच्छेदाबरोबरच आत्म्याचाहि उच्छेद होण्याचा प्रसंग येईल" अशी शंका कोणीं घेईल तर त्याचा परिहार असाः आत्मा व इंद्रियादि गुण यांचा संबंध अग्नि व उष्णत्व यांच्या संबंधासारखा नित्य नाहीं. अग्नि व उष्णत्व यांच्यांत तादात्म्य आहे तें येथें नाहीं. म्हणून, वरची शंका निर्मूल होय. अथवा, अविद्या

व वरचे सतरा गुण हे आत्म्याचे भोग्यविषय होत. आत्म्यानें शरीराची उपाधि धारण केली कीं हे गुण त्याचा आश्रय करतात; आणि, आत्मा व शरीर यांचा वियोग झाला कीं त्या गुणांना फिरून त्यांची मूळ अवस्था प्राप्त होते. शरीरांशीं त्यांचा संबंध रहात नाहीं. ही प्रत्यक्ष अनुभवाची गोष्ट आहे. अथवा असेंहि म्हणतां येईल कीं, आपलें पांचभौतिक शरीर हा, अनुभवाचा बुद्धीवर झालेला संस्कार, वर सांगितलेले शारीर आत्म्यासकटचे अठरा गुण व विसावा जाठराग्नि इतक्या वीस भावांचा संघात आहे. अखंडज्ञानरूप जो महान्–संज्ञक क्षेत्रज्ञ आत्मा तो प्राणवायूचें साहाय्य घेऊन शरीरांत प्रवेश करतो व त्याच्याच साहाय्यानें शरीराचा नाशहि करतो. देहाचें चलनवलन वायूमुळें होतें; म्हणून, वायु हाच शरीराचा संचालक होय व तोच त्याचा नाश करितो असा भ्रम उत्पन्न होण्याचा संभव आहे. पण आत्माच या गोष्टी करवितो, वायु हा केवळ निमित्त-मात्र आहे. ज्याप्रमाणें एखादी वस्तु उत्पन्न होते व त्याप्रमाणेंच नाशहि पावते, तद्वत् प्रारब्ध पुण्याचा व पापाचा क्षय झाला म्हणजे प्राणी देहत्याग करतो–पंच-महाभूतांत–जेथून तो जन्माला आला त्या ठिकाणीं–विलीन होतो. तसेंच संचित पापपुण्यांची प्रेरणा बळावली म्हणजे तो इहलोकीं फिरून जन्म घेतो. प्राण्याचा देह हा कर्मसंभव आहे.

कालाच्या प्रेरणेनें घेतलेला एक एक देह टाकून प्राणी पुढच्या पुढच्या देहांत प्रवेश करतो. मनुष्यानें मोडकळीस आलेलें एक घर टाकून दुसऱ्या घरांत प्रवेश करावा तद्वत्च हें होय. प्राण्यांच्या जन्ममरणांचें असलें निश्चित स्वरूपाचें ज्ञान असलेलीं शहाणीं माणसें जन्ममरणांचें दुःख मानीत नाहींत. अविद्येनें ग्रासलेले व म्हणूनच आत्म्याचा व देहादिकांचा संबंध जोडणारे कृपण पुरुष मात्र जन्ममरणाचें सुखदुःख मानतात. हा आत्मा कोणाचाहि कोणीहि नाहीं; व याचाहि कोणीं कोण नाहीं. शरीराच्या आश्रयानें नित्य सुखदुःखांचा उपभोग घेणारा असा हा एकटा एकच आहे. वस्तुतः प्राणी जन्मालाहि येत नाहीं व मरतहि नाहीं. कर्मबंध हाच त्याचा जन्म होय; व ज्ञानप्राप्ति हाच मोक्ष–हेंच मरण–होय. यदृच्छया कधीं काळीं प्राण्याला ज्ञानप्राप्ति झाली म्हणजे तो हा देहमय कर्मबंध तोडून परमगतीला जाऊन पोहोंचतो. प्रारब्धकर्माच्या संक्ष-यानें प्राप्तदेहाचा विनाश होतो खरा; पण जन्ममरणाची यातायात तेवढ्यानेंच चुकत नाहीं. त्याला संचिताचाहि नाश व्हावा लागतो. प्रारब्धकर्मांबरोबरच संचिताचाहि नाश करून पुण्यपापमय देहाचा ज्यानें त्याग केला असा क्षीणदेह

पुरुषच ब्रह्मपदाला पोहोंचतो. पुण्य व पाप यांचा क्षय व्हावा एवढ्यासाठींच सांख्यज्ञानाचा अवतार आहे. सांख्यज्ञान यासाठींच सांगितलेलें आहे. पाप-पुण्यांचा क्षय होऊन जीवाला ब्रह्मभाव प्राप्त झाला म्हणजे तो परागतीला पोहोंचतो. असा ब्रह्मभाव प्राप्त होणें हीच परा गति होय असें शहाणे पुरुष समजतात. १२. ३. २७५.

---

## अध्याय २७६ वा.

[ १ तृष्णानिरासाबद्दल युधिष्ठिराचा प्रश्न. २ मांडव्यजनकसंवाद. ]

( १ ) **युधिष्ठिर**—हे पितामहा, आम्हीं पापी माणसांनीं द्रव्यलोभानें आमचे भाऊ, पितर, नातू, ज्ञातिबांधव, सुहृद् व पुत्र इत्यादि स्वजनांची क्रूर-पणानें हत्या केली. तृष्णेमुळें आमच्या हातून अनेकविध पापें घडलीं. या अना-वर हव्यासाचें शमन कसें करावें तें आपण मला सांगा.

२ भीष्म—या बाबतींत पुरातनकाळीं घडलेला व विदेहराज जनकानें मांडव्याला कथन केलेला असा एक जुना इतिहास सांगतात तो मीं तुला सांगतों ऐक.

एकदां जनक राजा मांडव्याला म्हणाला, " बाबारे, माझें असें या जगांत कांहीं नाहीं; आणि म्हणूनच माझें आयुष्य अत्यंत सुखांत जात आहे. ' माझें असें या जगांत कांहीं नाहीं ' या माझ्या भावनेची व्याप्ति येथ-पर्यंत आहे कीं, उद्यां जर ही मिथिला नगरी सबंधच्या सबंध जळून गेली तरी त्यांत माझें कांहीं नष्ट झालें असें मला वाटणार नाहीं. ऐश्वर्य केवढेंहि समृद्ध असलें तर तें अफाट ऐश्वर्यसुद्धां दुःखमयच होय अशी शहाण्या विवेकी पुरुषांची भावना असते. उलट, अज्ञानी जीव क्षुद्र स्वरूपाच्या—क्षुल्लक—भोगविषयांच्या मोहांत सांपडतात. इहलोकीं मनुष्यप्राण्याला जें सुख भोगा-वयास मिळतें, किंवा स्वर्गलोकांत ज्या दिव्य भोगांची प्राप्ति होते त्या सर्व भोगांना त्यागसुखाच्या षोडशांशाइतकीहि किंमत नाहीं. वासनाक्षयाच्या योगानें जें सुख होतें त्याची योग्यता कांहीं निराळीच आहे. बैलाचें किंवा गाईचें शिंग जसें वयाबरोबर वाढत जातें, तसेंच द्रव्य जों जों अधिक मिळेल तों तों त्याबद्दलचा हव्यास वाढतच जातो. कोणत्याहि क्षुल्लक गोष्टीबद्दल जरी आपण ममत्वबुद्धि धरिली तरी ती क्षुल्लक वस्तुसुद्धां नाश पावली म्हणजे

आपल्याच दुःखाला कारणीभूत होते. वासनांच्या आहारीं कधींहि जाऊं नये; वासनांबद्दल मनांत आसक्ति बाळगणें हेंच दुःखाचें बीज होय. योग्य मार्गानें प्राप्त झालेल्या द्रव्याचा विनियोग धर्माकडे करावा. त्या संबंधाचा सर्व प्रकारचा वैयक्तिक हव्यास टाकून द्यावा. शहाण्या, स्थितप्रज्ञ पुरुषांनीं सर्व प्राणिमात्र आपल्याचसारखे आहेत अशी भावना ठेवून वागावें. ज्याची बुद्धि शुद्ध झाली, व जो कृतकृत्य झाला त्याच्या पुण्याचा व पापाचा विनाश होतो. सत्य व अनृत, शोक व आनंद, प्रिय व अप्रिय, भय व अभय या द्वंद्वांचा त्याग करून जो द्वंद्वातीत झाला त्याच्या बुद्धींतील विकल्प नाहींसा होऊन त्याला शाश्वत शांति–सुख मिळतें. अस्थिर बुद्धीच्या माणसाच्या हातून तृष्णात्याग होणें कठिण आहे. या वासनेचा उपशम करूं म्हटलें तरी तो होत नाहीं. ही वासना हा एक प्राण घेणारा असाध्य रोग आहे. या तृष्णेचा जो त्याग करितो त्यालाच सुखप्राप्ति होते. जो पुरुष आपलें चरित्र निर्दोष चंद्रासारखें शुद्ध ठेवतो त्या धर्मात्म्याला इहपरलोकीं कीर्तीचा व सुखाचा लाभ होतो.'' जनकराजाचें तें भाषण ऐकून मांडव्य ऋषीला अत्यंत आनंद झाला; व त्याच्या शब्दाचा योग्य तो मान ठेविल्यामुळें—त्यानें सांगितल्याप्रमाणें आचरण केल्यामुळें—तो मांडव्यऋषि मोक्षपदाला पोहोंचला. १२. ३. २७६.

## अध्याय २७७ वा.

[ १. पितापुत्रसंवाद. ]

( १ ) **युधिष्ठिर**—सर्व प्राणिमात्रांना सारखाच भयावह असणारा काल केव्हां, कोणावर, कसा घाला घालील त्याचा नेम नाहीं. अशा स्थितींत चारी आश्रमांतील धर्मांचें क्रमानें आचरण शक्य न झाल्यास मनुष्यानें काय करणें श्रेयस्कर आहे तें हे पितामहा, मला सांगा.

**भीष्म**—हे युधिष्ठिरा, या संबंधांत प्राचीन काळीं घडलेला इतिहास म्हणून एक पिता–पुत्र–संवाद सांगतात तो मीं तुला सांगतों, ऐक.

पूर्वी एक स्वाध्याय–निरत असा एक ब्राह्मण होता. त्याला एक मेधावी नांवाचा बुद्धिमान् मुलगा होता. हा ब्राह्मण स्वाध्यायाध्ययनांत अत्यंत कुशल होता, पण मोक्षधर्माचें त्याला ज्ञान नव्हतें; परंतु, त्याचा मुलगा मेधावी हा

मोक्षधर्मांच्या ज्ञानांत अत्यंत निपुण होता. एके वेळीं मेधावी आपल्या बापाला ह्मणाला ' हे ताता, मनुष्याचें आयुष्य अत्यंत झपाट्यानें क्षीण होत जातें. तेव्हां, शहाण्या माणसानें कोणत्या क्रमानें धर्माचरण करावें, त्याची आनुपूर्वी मला सांगा, म्हणजे मीं आपण सांगाल त्या मार्गानें यथाशिस्त धर्माचरण करीन. '

पिता—' हे पुत्रा, ब्रह्मचर्यव्रताचें आचरण करून मनुष्यानें यथासांग वेदाध्ययन करावें. वेदाध्ययन संपल्यावर पितरांचें ऋण फेडून त्यांना कृतार्थ करण्यासाठीं पुत्रसंततीची इच्छा धरून गृहस्थाश्रम स्वीकारावा. त्या आश्रमांत अग्नीचें विधिवत् पूजन करून व नानाप्रकारचे यज्ञ करून वानप्रस्थाश्रम स्वीकारण्याची इच्छा धरावी व नंतर संन्यास घ्यावा."

**पुत्र**—प्राणिमात्रांवर क्षणोक्षणीं घाला पडण्याचें भय आहे; त्यांच्या भोंवतीं चौफेर शत्रूंचा वेढा आहे व असाध्य अशीं संकटें एकामागून एक त्यांजवर येत आहेत अशा स्थितींत एकाद्या गंभीर पंडिताप्रमाणें आपण भाषण करितां हें कसें ?

पिता—अरे बाबा, हा घाला कोणाचा ? प्राणिमात्रांना वेढणारे शत्रू कोण ? व अशीं असाध्य संकटें तरी त्यांच्यावर कोणतीं येत आहेत ? तूं मला असा भिववितोस कां ?

**पुत्र**—प्राणिमात्रांवर घाला घालण्यासाठीं काळ नित्य टपलेला आहे; जरादि दोषांनीं मनुष्याचें शरीर सर्व बाजूंनीं वेढलेलें आहे व रात्र आणि दिवस हीं दोन्हीं आयुष्याचें सारखें माप करीत असून तें क्षीण करीत आहेत. त्यांतील कोणत्याच गोष्टीकडे तुमचें लक्ष कसें जात नाहीं. मृत्यु कोणाचीहि वाट पहात नाहीं हें जेथें मला कळतें तेथें अज्ञानांतच गुरफटून राहून आपण सांगितल्याप्रमाणें मुक्तिमार्ग चोखाळण्याचा योग्य काल यण्याची मीं वाट कोठें पहात बसू ? रात्रीनें रात्र चालली असून त्यामुळें आयुष्य क्षीण होत जात आहे. अशा स्थितींत उथळ पाण्यांत सोडलेल्या मासळीसारखी प्राण्याची दशा होते. मग त्याला सुख कोठून लाभेल बरें ? बागेंत फुलें वेंचावीं त्याप्रमाणें प्राणी आपल्या कर्मांचीं या संसारांतील फलें भोगीत असतो; त्याच्या वासना कधींच पूर्ण होत नाहींत. या परिस्थितींत त्याचें लक्ष दुसरीकडे असतांनाच मृत्यु त्याच्यावर घाला घालतो. प्राण्यानें आपलें ईप्सित कार्य संपविलें आहे कीं नाहीं—केलें आहे कीं नाहीं—याची मृत्यु कधींच वाट पहात नाहीं. म्हणून, उद्यांचें काय आज करावें व दुपारचें सकाळींच संपवावें. जें काय श्रेयस्कर कार्य करावेंसें वाटेल तें आजच्या

आज करून टाकावें. आपण आपलें कार्य संपविण्यापूर्वी त्या महान् कालस्वरूपी मृत्यूनें आपल्यावर घाला घालूं नये अशी खबरदारी घ्यावी. मृत्यूचा घाला पडण्याची आजची पाळी कोणाची, उद्यांची कोणाची हें कोणीं कसें सांगावें ? मनुष्याचें ईप्सित कार्य संपण्यापूर्वीच मृत्यु त्याला ओढून नेतो. तेव्हां मनुष्यानें तारुण्यांतहि धर्माचरण करावें. कारण, मृत्यूला निमित्त लागत नाहीं व जीवित हें क्षणभंगुर आहे. मोक्षधर्माचें आचरण केल्यानें इहपरलोकीं सुखप्राप्ति होते. मोहानें व्याप्त होऊन संसारी मनुष्य स्त्रीपुत्रांकरितां धडपड करीत असतो; व चांगलीं वाईट सर्व प्रकारचीं कर्में करून त्यांचा संतोष संपादन करितो.

दारांत पशु, घरांत पुत्र अशा भरलेल्या संसारांत गढून गेलेल्या मोहव्याप्त पुरुषाला, कांठावर निजलेल्या वाघाला पाण्याच्या लोंढ्यानें ओढून न्यावें त्या-प्रमाणें, मृत्यु हा ओढून नेतो. कणाकणानें धन जोडण्यांतच गढून गेलेल्या व हव्यास पूर्ण न झालेल्या पुरुषाला एकाद्या लांडगीनें कोंकरूं उचलून न्यावें त्याप्रमाणें मृत्यु घेऊन जातो. आज हें केलें, उद्यां तें करावयाचें आहे, हें माझें कार्य अर्धवटच राहिलें आहे अशा तऱ्हेनें विचार करीत वासनांच्या फेऱ्यांतच गुरफटून राहिलेल्या माणसाला मृत्यु अवचित उचलून नेतो. केलेल्या कार्याचें फल ज्याला मिळालेलें नाहीं अशा, शेतीवाडी, दुकानें, घरें, दारें यांतच आसक्त झालेल्या कर्मसंगी पुरुषावर मृत्यु अवचित घाला घालतो. मनुष्य दुर्बल असो वा बलवान् असो, तो शहाणा असो किंवा मूर्ख असो, शूर असो वा नसो, तो जड असो वा कवि असो, मृत्यु त्याचा विचार करीत नाहीं. त्याच्या सर्व इच्छा पूर्ण झाल्या आहेत कीं हें पहाण्यासहि न थांबतां मृत्यु प्राण्याला आत्मसात् करितो. मृत्यु, म्हातारपण, रोग व अनेक कारणांनीं उत्पन्न होणारीं निरनिराळीं दुःखें हीं मनुष्यानें टाळूं म्हटलें तरी टाळतां येणारीं नव्हेत. अशा स्थितींत आपण स्वस्थ काय बसलांत ? मृत्यु आणि म्हातारपण यांनीं प्राणी जन्माला आला न आला तोंच व तेव्हांपासूनच आपलें हत्यार त्याच्यावर सदाचें उपसलेलेंच आहे. या जगांतील सर्व स्थावरजंगम वस्तुमात्र मृत्यु आणि म्हातारपण या जोडीनें वेढलेले आहेत. मृत्यूच्या सेनेचा हल्ला आपल्यावर आला असतांना तो परतवून लावण्याचें सामर्थ्य एकट्या सत्यधर्मावांचून कोणांतहि नाहीं. सत्यधर्मांत मात्र अमृतत्व भरलेलें आहे. गांवांत घरदार करून रहाणारांची तद्विषयक जी आसक्ति असते तेंच मृत्यूचें निवासस्थान होय. अरण्य हें देवांचें वसतिस्थान होय असें श्रुति सांगते. गांवांत राहून तिथल्या सुखांत आसक्त रहाणें हीच मनुष्याला

बांधून घालणारी दोरी होय. हीच दोरी तोडून टाकून पुण्यशील पुरुष बंधनांतून मुक्त होतात. पापी पुरुष या बंधनांचा उच्छेद करूं इच्छित नाहींत. कायेनें, वाचेनें व मनानें जो कोणचीहि हिंसा करीत नाहीं, प्राण्यांच्या चरितार्थाचें साधन जें द्रव्य त्याचा जो अपहार करीत नाहीं, त्याला कसलेंहि बंधन बाधा करीत नाहीं, तो मुक्तच असतो. म्हणून, सत्यव्रताचें आचरण करून, सत्यव्रतांतच तल्लीन राहून, सत्याचीच इच्छा धरून, सर्वांभूतीं सम दृष्टि ठेऊन जितेंद्रिय पुरुषानें सत्यानेंच मृत्यूला जिंकावें. मृत्यु व अमृतत्व हीं दोन्हीं मनुष्यदेहांत प्रतिष्ठित असतात. मनुष्य मोहवश झाला म्हणजे तो मृत्यूच्या आधीन होतो. तो सत्यव्रताचें आचरण करीत असला म्हणजे त्याला अमरत्व मिळतें.

मी अशा रीतीनें अहिंसाव्रताचें आचरण करितों. कामक्रोधांना जिंकून सत्यधर्माचें आचरण करितों. सत्याचा अवलंब आनंदानें केल्यामुळें मला सुखांत रहातां येतें व एकाद्या अमर मनुष्याप्रमाणें मीं मृत्यूकडे पाहून तिरस्कारानें हंसूं शकतों. इंद्रियांचा उपशम करून मीं शांतियज्ञांत निमग्न होऊन रहातों व ब्रह्मयज्ञाचें आचरण करतों. उद्गयन प्राप्त होतांच मुनिव्रत धारण करून मी वाचेचा, मनाचा व कर्मांचा यज्ञ करीत असतों. माझ्यासारख्या पुरुषानें हिंसामय पशुयज्ञ केलेला कसा बरें बरा दिसेल ? मीं प्राज्ञ आहें. तेव्हां, क्षत्रियांनीं आचरण्यास योग्य अशा नाशिवंत व हिंसामय पशुयज्ञांचें, पिशाच्चवत् आचरण करणें मला शोभणार नाहीं. हे ताता, माझा मींच माझ्याच ठिकाणीं उत्पन्न होऊन, आत्मनिष्ठ व संततिरहित राहूनहि आत्मयज्ञानें मीं स्वतःचा उद्धार करीन. माझा उद्धार प्रजांच्या हातून होणार नाहीं. ज्याची वाणी व मन हीं योग्य तऱ्हेनें नियंत्रित झालेलीं आहेत अशा त्यागयुक्त, योगयुक्त व तपोयुक्त पुरुषाला या साधनांनीं सर्व कांहीं मिळवतां येतें. ज्ञानासारखे दुसरे डोळे नाहींत. ज्ञानासारखें दुसरें या जगांत फल नाहीं. कोणत्याहि गोष्टीचा हव्यास धरून त्यांत आसक्ति दाखविणें यासारखें दुःख नाहीं व त्यागासारखें सुख या जगांत दुसरें नाहीं. सर्व विश्व एकरूप आहे अशी भावना, व म्हणूनच सर्वांभूतीं समभाव, सत्यधर्माचें आचरण, सदाचार, शीलशुद्धता, दण्डधारण, सरळपणा व क्रमाक्रमानें कर्मापासून निवृत्त होणें यापरतें ब्राह्मणाला दुसरें धन नाहीं. हा गुणसमुच्चय हेंच त्याचें धन होय. बाबा, आपल्याला मरावयाचें आहे. तेव्हां, हे ब्रह्मन्, हें धन, हे बांधव, ही स्त्री, हा सगळा परिवार घेऊन आपणांला काय कर्तव्य आहे ? अंतःकरणाच्या गुहेंत असलेलें ब्रह्मरूप—आत्मा—हुडकण्याच्या मार्गाला आपण लागा. आपले वाडवडील,

आपले आजोबा व आपले वडील कोठें गेले व कोणत्या मार्गानें गेले त्याचा विचार करा.

भीष्म—हे राजन्, पुत्राचें हें भाषण ऐकून पित्यानें त्याप्रमाणें आचरण केलें. तूं सत्यधर्मपरायण हो आणि या पित्यासारखेंच तूंहि आचरण कर. १२. ३. २७७.

## अध्याय २७८ वा.

[ १ हारीत–गीता. ]

१ युधिष्ठिर—मनुष्याचें शील, आचार व विद्या हीं कशी असावीं व तो कोणत्या गोष्टींत निमग्न असावा म्हणजे त्याला प्रकृतीच्या पलीकडे असलेलें शाश्वत ब्रह्मपद प्राप्त होतें तें मला सांगा.

भीष्म—मोक्षधर्मांत रत असणाऱ्या व हलका आहार घेणाऱ्या जितेंद्रिय पुरुषाला प्रकृतीच्या पलीकडचें शाश्वत ब्रह्मपद मिळतें. स्वतःच्या घरादारावरील आसक्ति टाकून देऊन, लाभालाभांना सारखेंच मानावयास शिकून, मुनिव्रताची दीक्षा घेऊन व हातीं आलेल्या फलांबद्दल सुद्धां निरपेक्ष वृत्ति ठेऊन मनुष्यानें अरण्याचा रस्ता धरावा. डोळ्यानें, मनानें व वाचेनें कोणालाहि त्याच्या तोंडावर अगर पाठीमागें दुखवूं नये. कोणाच्याहि मर्माचा कोठेंहि उच्चार करूं नये. कोणाहि प्राण्याची हिंसा करूं नये. सर्वांशीं मित्रभावानें वागावें. इहलोकीं जन्मास येऊन कोणाशींहि वर करूं नये. आपल्याला जरी कोणीं राग आणण्याचा प्रयत्न केला तरी त्याच्याशींहि गोड बोलावें. कोणीं आपल्यास अपशब्द बोलला तरी त्याच्याशींहि कुशल भाषण करावें. गांवांत राहून कोणाच्याहि बाजूनें अगर कोणाच्याहि उलट वर्तन करूं नये. घरोघर भिक्षा मागूं नये. आगाऊ संकेत ठरवून कोणाच्याहि येथें जेवावयास जाऊं नये. आपला अपमान कोणीं केला तरी धीरवृत्ति सोडूं नये. कोणालाहि वाचेनें वाईट बोलूं नये. दयाशील वृत्ति धरावी. क्रूराशीं प्रतिक्रूर होऊं नये. शांतवृत्ति धरावी व मितभाषी असावें. घरांतून धूर निघावयाचा थांबला, मुसळांचा आवाज ऐकूं येईनासा झाला, विस्तव विझून गेला, घरांतील सर्व माणसांनीं भोजन केलें, पात्रें वाढण्याचें काम थांबलें, सारांश, सर्व व्यवहार थांबल म्हणजे ( उरलेल्या अन्नांतील भिक्षा घ्यावयास आपणांस हरकत नाहीं अशी खात्री करून घेऊन मगच ) मुनीनें भिक्षा मागावी व तीहि शरीर जगेल इतकीच घ्यावी; पोटभर मिळण्याचीसुद्धां आशा धरूं नये. भिक्षा

मिळाली नाहीं तर कष्टी होऊं नये व मिळाली तरी हर्षित होऊं नये. कोणत्याहि सामान्य प्रतीच्या लाभाची सुद्धां इच्छा धरूं नये. कोणाकडूनहि पूजन करून घेऊन त्याच्या घरीं भोजन करूं नये. कोणी आपला मानसन्मान केला तर तो झांकून ठेवण्याचा प्रयत्न करावा, त्याची वाच्यता कधींहि करूं नये. अशाचे दोष काढून निंदा करीत बसूं नये किंवा त्याच्या गुणाचेंहि वर्णन करूं नये. आपली शय्या व आसन हीं नेहमीं एकांतांत ठेवण्याची इच्छा धरावी. एकादें ओसाड घर, झाडाचें मूळ, अरण्य किंवा एकादी गुहा यामध्यें कोणालाहि न कळतां अज्ञात स्थितींत रहावें. नेहमीं एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं जात असावें; योगाचा अनुरोध करून व आसक्तीचा विरोध करून सर्वत्र समवृत्ति ठेवावी. नेहमीं अचल व स्थिर असावें. सुकृतासाठीं किंवा दुष्कृतासाठीं म्हणजे चांगला किंवा वाईट कोणताहि हेतु मनांत धरून कर्म करूं नये. नित्य तृप्तवृत्ति धरावी. चित्त नेहमीं संतुष्ट ठेवावें. इंद्रियांच्या वृत्ति शांत ठेवाव्या. दुर्मुखलेलें असूं नये. सर्व भय टाकून द्यावें. ब्रह्मचिंतन नेहमीं करावें. मौनव्रत धारण करून असावें व सर्वच गोष्टींबद्दल वैराग्यवृत्ति धारण करावी. आपला हा पांचभौतिक देह पंचमहाभूतांच्याच साहाय्यानें पुनः पुनः वाढतो व क्षीण होतो हें ध्यानीं आणून, भूतमात्र जन्ममरणांच्या फेऱ्यांत सांपडलेले आहेत हें नीट ओळखून परिव्राजकानें निस्पृह वृत्ति ठेवावी. साम्यवृत्ति धारण करावी. पक्क किंवा अपक्क जो मिळेल तो आहार शरीरयात्रा चालण्यापुरता घेऊन उपजीविका करावी. आत्मसंतुष्ट राहून शांतवृत्ति ठेवावी. हलका आहार करावा व इंद्रियांचें नियमन करावें. बोलण्याची ऊर्मि आल्यास ती दाबून वाचेचा संयम करावा. मनांत रागाचा आवेग येऊं पहात असेल तर तो दाबावा. कोणाची हिंसा करावीशी वाटली तर ती इच्छा जिंकावी. भूक व कामवासना यांचे आवेग आवरून धरावे. तपस्वी पुरुषानें वाचा, क्रोध, हिंसा, भूक व भोगेच्छा यांचे आवेग सहन करावे. त्यांना अनावर होऊं देऊं नये. कोणी निंदा केली तरी त्याचा आपल्या मनावर परिणाम होऊं देऊं नये. प्रशंसा किंवा निंदा यांची किंमत सारखीच मानून तटस्थ वृत्तीनें रहावें. परिव्राजकाच्या आश्रमांत असलें आचरण फार पवित्र मानलें आहे. सर्व बाबतींत दमनशील अशा महात्म्या परिव्राजकानें कोणत्याहि बाबतींत आसक्ति धरूं नये. पूर्वाश्रमींचे नातेवाईक, आप्तइष्ट किंवा शेतीवाडी यांचा लोभ धरूं नये. आपलें घरदार कोठेंहि नाहीं अशी भावना ठेवून सौम्य वृत्तीनें व सौम्य बुद्धीनें वागावें. वानप्रस्थ व गृहस्थ यांचा संसर्ग आपणांला न बाधेल

अशी खबरदारी घ्यावी. आपल्याला आज अमुक हवें अशी इच्छा मनांत धरून-पूर्वी योजना करून—तें मिळविण्याच्या मागें लागूं नये व हर्षादि विकारांच्या आधीन होऊं नये. ज्ञानी पुरुषांना या तऱ्हेचें आचरण हाच मोक्ष वाटतो. अज्ञानी जीवांना मात्र यांत कष्ट वाटतात. ज्ञानी लोकांचा सगळा मोक्षमार्ग तो हाच होय असें हारीत ऋषींनीं सांगितलें आहे. सर्व लोकांना अभयदान देऊन, जो घर सोडून अरण्यांत जाण्यास निघतो त्याला तेजोमय लोक प्राप्त होतात. वाचा व मन यांना अगोचर असा जो प्रत्यगात्मा त्याची या परिव्राजकाला प्राप्ति होते. १२. ३. २७८.

---

## अध्याय २७९ वा.

[ १ वृत्रगीता. ]

( १ ) **युधिष्ठिर**—हे पितामहा, सर्व लोक आम्हांला आज धन्य धन्य म्हणत आहेत हें खरें; परंतु, आमच्यापेक्षां अधिक दुःखी या जगांत कोणीहि नसेल. देवांच्या अंशानें मनुष्यजातींत जन्म घेऊन व लोकांकडून धन्य म्हणवून घेऊन सुद्धां जें दुःख आम्हांला प्राप्त झालें तसलें दुःख कोणालाहि झालें नसेल. हे कुरुसत्तमा, या दुःखाचा निरास आमच्या हातून कसा होईल? हें शरीर धारण करणें हें सुद्धां आज कष्टप्रद आहे. आम्हांला आमचे प्राण जड झाले आहेत. प्राण, अपान, व्यान, उदान व समान हे पंच प्राण; मन व बुद्धी ही जोडी; पांच ज्ञानेंद्रियें व पांच कर्मेंद्रियें या सतरा गोष्टी मोक्षाला विरोध करतात. काम, क्रोध, लोभ, भय व स्वप्न हे पांच योगदोषहि बंधकच होत. शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध हे इंद्रियांचें भोग्य विषय; सत्व, रज व तम हे त्रिगुण; पंचमहाभूतें, अविद्या, अहंकार आणि कर्म हीं भूतोत्पत्तीचीं आठ कारणें हींहि सर्व मोक्षविरोधि व संसारवर्धन करणारींच आहेत. वर दिलेल्या सतरा गोष्टी, पांच योगदोष, पांच भोग्य विषय, तीन गुण व भूतोत्पत्तीचीं आठ कारणें असा हा जो अडतीस गोष्टींचा संघात आहे याच्या पार जाणाऱ्या—यांना जिंकून यांतून विमुक्त होणाऱ्या—संयमी मुनींना पुनर्जन्म नाहीं. या राज्याचा त्याग करून आम्हीं या अडतिसांच्या पार कधीं जाऊं तें हे पितामहा, मला सांगा.

**भीष्म**—हे महाराजा, हें जें तूं दुःख म्हणून म्हणतोस हें कांहीं अनंतकाल टिकणारें नव्हे. या जगांतील प्रत्येक वस्तूला माप आहे व म्हणूनच कोणतीहि

गोष्ट कायमची टिकणारी नाहीं. फार काय, जन्ममरणाचा फेराहि कायमचा नव्हे, त्यालाही शेवट हा आहेच. या जगांत अचल असें कांहीं नाहीं. तेव्हां 'ऐश्वर्याच्या लोभाला आम्हीं गुंतलों, आम्हांला मुक्ति कोठून, असें तूं म्हणशील तर तेंहि तुझें म्हणणें व्यर्थ होय. ऐश्वर्यप्राप्ति हा मोक्षमार्गांतील एक दोष आहे असें म्हणशील तर तेंहि तुझें म्हणणें टिकणारें नव्हे. कारण, ऐश्वर्य हे जरी आसक्ति उत्पन्न करणारें व म्हणून मोक्षविरोधि असलें तरी तुम्हीं धर्मज्ञ आहांत, शमदमादिसाधनसंपत् प्राप्त करून घेण्याच्या अभ्यासानें संचिताचा क्षय करून तुम्हीं कधींना कधीं तरी या जन्ममरणाच्या फेऱ्यांतून सुटालच. हे राजा, सुखप्राप्ति किंवा दुःखप्राप्ति ही कांहीं मनुष्याच्या हातची गोष्ट नव्हे; आणि याच कारणामुळें मनुष्य सुखदुःखाच्या मोहजालांत अडकून पडतो. स्वतः अरूप असणारा वायु काजळ किंवा मनशीलाचे तांबडे पिंवळे रजःकण यांनीं व्याप्त झाला म्हणजे त्या त्या पदार्थांचें रूप घेऊन आपण त्यांच्यासारखे आहोंत असा भास उत्पन्न करतो. इतकेंच नव्हे, तर आपला हा प्रातिभासिक वर्ण आकाशाला देऊन आकाश देखील त्या त्या वर्णानें युक्त आहे असें भासवितो. तसेंच, स्वतः अकर्ता असूनहि कर्मफलांच्या संसर्गानें आत्मा मोहव्याप्त होतो आणि मग त्या कर्मांना व कर्मफलांना कवटाळीत बसल्यामुळें त्याला या देहांतून त्या देहांत अशा तऱ्हेनें परिभ्रमण करीत बसावें लागतें. प्राणी ज्या वेळेस ज्ञानाच्या साहाय्यानें अज्ञानरूपी मोहजालाचा नाश करतो त्यावेळेस सनातन ब्रह्मरूपाचा स्वयंभू प्रकाश आपोआप फांकतो. ब्रह्मरूप हें यत्नसाध्य नव्हे असें मुनि म्हणतात. विसरलेली गोष्ट आठवणें म्हणजे जशी नवी गोष्ट शिकणें नव्ह तसेंच आपणच परमात्मरूप आहोंत ही बुजलेली जाणीव पुनः होणें म्हणजे नवीन ज्ञान नाहीं. अज्ञानाचा—मोहाचा—निरास एवढेंच ज्ञानाचें कार्य होय. अज्ञानाचा निरास झाल्यावर ब्रह्मपदाच्या प्राप्तीसाठीं निराळी खटपट लागत नाहीं, अज्ञाननिरास हीच ब्रह्मपदप्राप्ति होय. म्हणून, ब्रह्मपद हें अयत्नसाध्य आहे असें मुनि म्हणतात. यत्न लागतो तो अज्ञाननिरासासाठीं, ब्रह्मपदाच्या प्राप्तीसाठीं नव्हे. ज्ञानानें अज्ञाननिरास करण्याच्या बाबतींत तूं सिद्ध पुरुषांची अखंड उपासना करीत जा. ही उपासना तूंच करावीस असें नाहीं तर सर्व लोकांनीं व देवांनींहि करावी; कारण, ब्रह्मपदप्राप्ति होण्याबद्दल निरलस जर कोणीं असतील तर ते महर्षि होत. ब्रह्मोपासना करण्याच्या त्यांच्या कामांत कधींच खंड पडत नाहीं.

पूर्वी दैत्यराज वृत्र याला शत्रूंनीं युद्धांत जिंकून त्याचें राज्य हरण केलें. त्या वेळेस त्या राज्यापासून भ्रष्ट झालेल्या असहाय्य वृत्रासुरानें योगबुद्धीचा आश्रय करून आपला शोक आंवरून धरला व शत्रूंच्या मध्यें तो मोठ्या धीरवृत्तीनें वागला असा एक जुना इतिहास सांगतात तो मीं तुला सांगतों. तो तूं एकाग्र मनानें ऐक. ऐश्वर्यापासून च्युत झालेल्या त्या वृत्रासुराला उशना ( शुक्र ) म्हणाले " हे वृत्रा, आज तुझा पराभव झालेला पाहून तुझ्या चित्ताला कांहींच कां व्यथा होत नाहीं ? "

**वृत्रः** प्राणिमात्रांच्या जन्ममरणांसंबंधाचें निश्चित स्वरूपाचें ज्ञान माझ्या सत्याचरणानें व तपोबलानें मला झालें आहे. म्हणून, शोक किंवा हर्ष यांची बाधा मला होत नाहीं. कालाच्या प्रेरणेनें कांहीं जीव परवश होऊन नरकांत पडतात; व कांहीं त्याच्याच प्रेरणेनें स्वर्गाला जाऊन आनंदानें तेथील भोग भोगतात असें मोठमोठे ऋषि सांगतात. प्रारब्ध पुण्यकर्मानें प्राप्त झालेले स्वर्ग-भोग, किंवा प्रारब्ध पापकर्मानें प्राप्त झालेला नरक यांचा प्रारब्धकर्माचा क्षय होतांच हे प्राणी त्याग करितात व संचित कर्मानुसार फिरून फिरून जन्म घेतात. वासनांच्या बंधानें बद्ध झालेले जीव परवश होऊन नरकांत जातात, हजारों पशुयोनींत जन्म घेतात व त्यांतूनहि बाहेर येतात, व पुनः त्यांतच पडतात. मला अतींद्रिय वस्तूंचें ज्ञान असल्यामुळें जीवांचें हें नानाप्रकारच्या पशुयोनींतून चाललेलें संसरण मला समजतें. ' जसें कर्म तसें फळ ' हा शास्त्राचा सिद्धांतहि मला ठाऊक आहे. सव प्राणिमात्र यमधर्मानें दाखविलेल्या एका मार्गानेंच जातात. पूर्वायुष्यांत जीं कांहीं सुखकारक, दुःखकारक, प्रिय किंवा द्वेष्य कर्में केलीं असतील त्या त्या कर्मांप्रमाणें त्यांचीं बरीं वाईट फलें भोगण्यासाठीं मनुष्य पशुयोनींत, नरकांत, मनुष्यलोकांत किंवा स्वर्गांत जातो. सर्व प्राणिमात्र पुनः पुनः त्याच त्या वाटेनें जात असतात.

प्राणिमात्राची उत्पत्ति व स्थिती हीं याप्रमाणें त्याच्या त्याच्या कर्मफलाच्या मापानें मापिलीं जातात व काल हें कार्य करीत असतो असें भूतमात्रांच्या उत्प-त्तिबद्दलचें परमोच्च ज्ञान वृत्रासुर सांगत असतांना शुक्राचार्य त्याला म्हणतात, ' हे वृत्रा, तूं बुद्धिमान् असून असे दुष्ट प्रलाप कां काढतोस ? "

वृत्र—माझ्या शत्रूंवर मला जय मिळावा म्हणून पूर्वी मीं जें मोठें तप केलें तें आपणांस व आपणांप्रमाणेंच इतरहि मोठमोठ्या ऋषींना माहीत आहे.

भूतांच्या ठिकाणचे विविध गंध व रस यांचा उपभोग घेऊन मीं तीन्ही लोकांचें आक्रमण केलें व स्वतःच्या तेजानें त्यांना व्याप्त करून सोडलें. तेजोवलयानें युक्त असा मीं विमानांतून आकाशमार्गानें हिंडत असें. मला कोणाचेंहि भय नव्हतें व मीं सर्व प्राण्यांना अजिंक्य होतों. असलें हें ऐश्वर्य मीं माझ्या तपोबलानें मिळविलें व तसेंच तें माझ्याच कर्मांनीं नष्टहि पण झालें. तेव्हां, हे भगवन्, धीरवृत्ति धारण करून मीं त्याबद्दल शोक करीत नाहीं. महात्म्या व बलाढ्य अशा इंद्राशीं युद्ध करण्याच्या इच्छेनें मीं रणांगणावर उभा असतांना मला भगवान् सर्वपापहर अशा प्रभु नारायणाचें दर्शन युद्धभूमीवर घडलें. त्या महापराक्रमी, पूर्ण, अनंत, ज्याला मुंजकेश, हरिश्मश्रू व सर्वभूतपितामह म्हणतात अशा, शुक्लवर्णाच्या व सनातन वैकुण्ठस्वरूप विष्णूच्या दर्शनानें जी पुण्याई मीं जोडिली तिचा अवशेष अजून शिल्लक आहे. म्हणूनच, हे भगवन्, कर्मफल कशा प्रकारचें असतें असें आपणांस विचारण्याची बुद्धि मला होत आहे, असें मला वाटतें. ऐश्वर्य हें अत्यंत श्रेष्ठ प्रकारचें आहे. हें ऐश्वर्य कोणत्या वर्णाचा आश्रय करून असतें ? सर्वोत्कृष्ट असें हें ऐश्वर्य एकदां प्राप्त झालें म्हणजे पुनः नाहींसें कसें होतें ? सर्व प्राणिमात्र कशाच्या आधारावर जगतात ? भूतमात्रांच्याकडून हालचाल कोण करवितो ? कोणत्या परमश्रेष्ठ फलाची प्राप्ति झाली असतां जीव शाश्वतब्रह्मरूप होऊन रहातो ? हें परमश्रेष्ठ असें फल कोणत्या कर्मानें किंवा कसल्या ज्ञानानें प्राप्त होणें शक्य आहे ? हे विप्रश्रेष्ठा, हें सर्व आपण मला समजावून सांगा."

भीष्म—हे राजसिंहा पुरुषर्षभा, अशा तऱ्हेचें त्या वृत्राचें तें भाषण ऐकून तो ऋषिश्रेष्ठ शुक्राचार्य त्याला त्या वेळीं काय म्हणाला तें मीं सांगतों. तें तूं आपल्या भावांसहवर्तमान अनन्यचित्तानें ऐक. १२. ३. २७९.

---

## अध्याय २८० वा.

[ १ शुक्रवृत्रासुरसंवाद; २ सनत्कुमारोक्त विष्णुमाहात्म्य. ]

१ उशाना—हे दैत्यश्रेष्ठा, ज्याच्या बाहुद्वयामध्यें आकाशासह सर्व पृथ्वीतल मावूं शकतें व अनंत असें मोक्षस्थान हेंच ज्याचें मस्तक अशा प्रभावशाली भगवान् विष्णुदेवाला नमस्कार असो. त्या भगवान् विष्णूचेंच अत्यंत पवित्र असें माहात्म्य मीं तुला सांगतों तें ऐक.

शुक्र आणि वृत्र यांचा असा संवाद चालला आहे इतक्यांत जणूं काय त्यांच्या मनांतील संशयाचा उच्छेद करण्यासाठींच धर्मात्मा मुनिश्रेष्ठ सनत्कुमार त्या ठिकाणीं प्राप्त झाले. हे राजन्, सनत्कुमारांना पाहातांच शुक्राचार्य व दैत्येंद्र वृत्र या दोघांनींहि त्यांचें पूजन केलें व ते मुनिश्रेष्ठ सनत्कुमार बहुमोल अशा आसनावर बसले. तेव्हां, त्या महाबुद्धिमान् सनत्कुमारांना शुक्राचार्य म्हणाले 'हे मुनिश्रेष्ठा, अत्यंत श्रेष्ठ असें विष्णुमाहात्म्य आपण या दैत्येंद्राला सांगा.' सनत्कुमारांनीं तें भाषण ऐकिलें व मोठ्या अर्थयुक्त अशा शब्दांनीं त्या बुद्धिमान् दैत्येंद्राला त्यांनीं विष्णुमाहात्म्य सांगण्यास सुरवात केली.

२. **सनत्कुमार**—हे दैत्येंद्रा, विष्णूचें सर्वोत्कृष्ट माहात्म्य मीं तुला सर्व सांगतों तें ऐक. हे परंतपा, या जगताची स्थिति—पोषण—सर्व विष्णूवर अवलंबून आहे. त्याच्यामुळेंच हें जग आहे असें समज. हे महाबाहो, हा भगवान् विष्णूच सर्व चराचर भूतें निर्माण करतो. योग्यकालीं त्या भूतांचा संहारहि विष्णूच करतो व पुनरुत्पत्तीचा योग्यकाल येतांच भूतांची पुनरुत्पत्तीहि पण विष्णूपासूनच होते. सर्व भूतें या विष्णूच्या ठिकाणींच लय पावतात व त्याच्यापासूनच फिरून उत्पन्न होतात. या भगवंताची प्राप्ति ज्ञानानें, तपश्चर्येनें किंवा यज्ञादि कर्मांनीं होणारी नाहीं. तर, याच्या प्राप्तीसाठीं इंद्रियजय करावा लागतो तेव्हांच याची प्राप्ति होते. यज्ञादि बाह्य, व ध्यानादि मानसिक, अशीं बाह्य व अभ्यंतर अशीं उभयविध कर्में विष्णुस्मरणपूर्वक केलीं म्हणजे विष्णुध्यानानें तीं तीं कर्में पवित्र होतात; व अशीं कर्में करणाऱ्याला परलोकीं अनंतपदाची प्राप्ति होते. सोनार ज्याप्रमाणें फार मोठ्या प्रयत्नानें चांदी अग्नींत टाकून शुद्ध करून घेतो, त्याप्रमाणें अशा पवित्र कर्मांच्या आचरणानें—अनेक जन्मांनीं कां होईना—जीवाची शुद्धता होते व तसाच तितका जोराचा प्रयत्न केल्यास जीवाची ही विशुद्धता एका जन्मांतहि होणें शक्य आहे. मनुष्यानें नेटानें प्रयत्न केल्यास, आपल्या अंगावरचे बारीक रजःकण आपण जितक्या सहज रीतीनें झाडून टाकतों तितक्या सहज रीतीनें आपल्या आंगचें दोष आपणांस नाहींसे करतां येतील. तीळ किंवा खसखस हीं थोड्या फुलांत ठेविलीं म्हणजे एकाच खेपेंत त्यांचा मूळचा वास नाहींसा होत नाहीं. सूक्ष्म अशा परमात्मज्ञानाची गोष्ट तशीच आहे. ते तीळ किंवा खसखस एकदां शिळीं झालेलीं फुलें टाकून देऊन पुनःपुनः ताज्या ताज्या फुलांत अनेकवेळां ठेविलीं म्हणजे त्यांचा मूळचा वास नाहींसा होतो व फुलांचाच वास त्यांना लागतो. तशाच

तऱ्हेनें सत्वरजतमांनीं भोग्य विषयामध्यें उत्पन्न केलेले दोष अनेक जन्मपर्यंत पुनः पुनः यत्न केल्यानें नाहींसे होतात. कर्मांमध्यें आसक्त होऊन राहिलेल्या जीवांना तसेंच विरक्त जीवांनाहि त्या त्या कर्मांचे विशेष म्हणजे त्यांतील राग–विराग कसेकसे प्राप्त होतात तें मीं तुला सांगतों ऐक. अज्ञान दशेमध्यें जीव कर्मप्रवृत्त कसा होतो व ज्ञानप्राप्तीनंतर तोच कर्मनिवृत्तहि कसा होतो तेंहि मीं तुला अनुक्रमानें सांगणार आहें. तें तूं एकचित्तानें ऐक. अनाद्यनन्त, श्रीमान्, स्वयंप्रकाश, विश्वाचा संहर्ता असा प्रभू नारायण सर्व चराचर भूतांची उत्पत्ति करतो. सर्व प्राणिमात्रांच्यामध्यें क्षररूपानें व अक्षर रूपानें हाच वास करितो. पंचज्ञानेंद्रियें, पंचकर्मेंद्रियें व अकरावें मन या अकरा प्रकारांनीं हाच जगतांतील भोग भोगतो. पृथ्वी हे याचे पाय, आकाश हें याचें डोकें, दिशा हेच याचे हात व आकाश हे याचे कान होत. याच्या तेजापासून सूर्य झाला आहे, याचें मन म्हणजेच चंद्रमा होय. ज्ञान हीच याची बुद्धि व जलदेवता हेंच याचें रसनेंद्रिय होय. याच्या दोन्ही भुंवयांच्या सन्निध सगळे ग्रह आहेत. याच्या नेत्रांतील किरणजालापासून हें नक्षत्रजात निर्माण झालें आहे व पायांपासून पृथ्वी निर्माण झाली आहे. सत्व, रज व तम हे त्रिगुण नारायणात्मक आहेत. आश्रमधर्मांच्या आचरणाचें फल–जपादि कर्मांचें फल–म्हणजे नारायणाची प्राप्ति हेंच होय. नैष्कर्म्यानें प्राप्त होणारें अव्यय ब्रह्मपद तेंहि पण हा नारायणच होय. याचे अंगावरील केश म्हणजे वेद, ॐकार हीच याची विद्या. हा नारायण हा अनेकांचा आधार असून अनेकविध धर्मस्वरूपानें अंतःकरणाचा आश्रय करून असतो. हा नारायण हेंच परब्रह्म, हाच अत्यंत श्रेष्ठ असा धर्म, हीच तपश्चर्या, जगांतील सद्भाव व असद्भावहि हाच. संहितामंत्र, त्यांचा विनियोग सांगणारीं कर्मप्रवर्तक ब्राह्मण–वाक्यें, इंद्र, वायु इत्यादि देवता, सोळा ऋत्विक् (पुरोहित) इत्यादिकांनीं युक्त असा यज्ञ हें नारायण विष्णूचेंच रूप होय. विष्णु, हाच ब्रह्मदेव, अश्विनौ देव हाच आणि इंद्रहि पण हाच. सूर्य हें याचेंच रूप, वरुण हाच, यम हाच, कुबेर हाच. ऋत्विज लोक इंद्रवाय्वादि देवतांना उद्देशून निरनिराळीं कर्में करावयास सांगत असले तरी या देवता सर्व एकच, म्हणजे, यज्ञभोक्ता नारायणच होत असेंहि ज्ञान त्यांना आहे. ह्या एकट्या एक नारायणस्वरूपी परमेश्वराच्या आधीन हें जगत् आहे. हे दैत्येंद्रा, नाना रूपांनीं विनटलेला परमेश्वर एकरूपच असें जेव्हां प्राणी म्हणतो व हें जें हा म्हणतो तें जेव्हां अनुभवानें त्याला पटतें, तेव्हां ब्रह्मरूप त्याला दिसूं लागतें. जगाची

उत्पत्ति होऊन त्याचा लय होईपर्यंतचा जो काल—संसारविक्षेपांचा जो काल—त्याला कल्प म्हणतात. असे सहस्रावधि किंवा कोट्यवधि कल्प उलटून जाईपर्यंत प्राणी स्थावर किंवा जंगम स्थितींत रहातात. हे दैत्येंद्रा, ह्या यातायातींचें—जन्ममरणांच्या फेऱ्यांचें—परिमाण हजारों विहिरींतील पाण्याइतकें अनंत आहे. या विहिरींपैकीं एक एक विहीर प्रत्येकीं एक योजन रुंद, पांचशें योजनें लांब व एक कोस खोल अशी असते; व त्यांतहि पहिलीपेक्षां दुसरी, दुसरीपेक्षां तिसरी अशी एक एक योजनानें ( लांबी, रुंदी व खोली व या प्रत्येक मापांत ) मोठी असते अशी कल्पना केली व या विहिरींतील पाणी प्रत्येक दिवसाला केंसाच्या अग्रावरील राहील एवढा एकच थेंब व तोहि एकदांच, या मापानें उपशीत गेलें तर सर्व विहिरींतील पाणी संपायला जेवढा काल लागेल तितका काल प्रजांच्या संहारविक्षेपात्मक एका कल्पाला लागतो. म्हणजे, हा कल्पकाल अनंत आहे हा इत्यर्थ होय. नारायणाच्या त्रिगुणात्मक सृष्टींत जे जीव निर्माण होतात त्यांचें, गुणांच्या न्यूनाधिक प्रमाणावरून सहा वर्ण कल्पिले आहेत असें श्रुतीचें प्रमाण आहे. हे वर्ण म्हणजे कृष्ण, धूम्र, नील, रक्त, हारिद्र व शुक्ल हे होत. यांपैकीं रक्तवर्ण हा कर्मप्रवण साहसी लोकांना सोसेसा असतो. पिंवळा वर्ण सुखकर होय. शुक्लवर्ण हा अत्यंत सुखकर होय. या शुक्लवर्णाच्या जीवांना मोक्षप्राप्ति होते. हा वर्ण निर्मल व शोकरहित असतो; या ठिकाणीं प्रवृत्तिधर्माची कर्मकटकट नसते. हे दैत्येंद्रा, हजारों योनिसंभव जन्मांच्या फेऱ्यांतून गेल्यानंतर जीवाला सिद्धि मिळते. सच्छास्त्राचें ज्ञान झाल्यानंतर आत्मानुभवाची जी गति प्राप्त होते तीच ही शुक्लवर्ण जीवांना मिळणारी गति होय असें देवेंद्रानें म्हटलें आहे. प्रजांना मिळणारी गति ही त्यांच्या वर्णावर अवलंबून असते व हे असुरेंद्रा, वर्ण हा कालाच्या आधीन असतो. जीवाला पूर्वजन्मसंस्कारानुसार भोगावी लागणारी ही जी वर्णगति हिची आत्यंतिक मर्यादा चौदा लक्ष कल्पांची आहे. मोक्षमार्गाच्या रोंखानें जीवाची उत्क्रान्ति होत जाणें, एकाद्या विवक्षित वर्णांत जीव जागच्याजागीं स्थिर रहाणें किंवा त्याचें अधःपतन होणें या गोष्टी या चौदा लक्ष कल्पांतील त्याच्या आचारावर अवलंबून असतात. वरच्या सहा वर्णांपैकीं कृष्णवर्णांतील गति ही अत्यंत निकृष्ट स्वरूपाची होय. या वर्णांतील जीव नरकांत पिचत रहातो व तेथेंच आसक्त होतो. वर जी चौदा लक्ष कल्पांची वर्णगतीची आत्यंतिक मर्यादा सांगितली, तिचा हा कृष्णवर्णी जीव दुरुपयोग करीत असल्यानें त्याची उत्क्रान्ति होत नाहीं व त्याच्या आसक्त वृत्तीमुळें त्या

जीवाला जन्ममरणांचे अनेक फेरे संपेपर्यन्त नरकांतच रहावें लागतें असें सूज्ञ पुरुष सांगतात. जन्ममरणांचे एक लक्ष फेरे होईपर्यंत या कृष्णवर्णांत काल कंठल्यानंतर जीव हरितवर्णांत जातो. या वर्णांतहि त्याला कर्मपरतंत्र स्थितींतच अनेक कल्पपर्यन्त पडून रहावें लागतें. प्रारब्ध पापकर्मांचा भोगानें क्षय झाला म्हणजे संचित पुण्यांशाचा उदय होऊन सत्वगुणाची प्राप्ति झालीच तर हा जीव अज्ञान दूर करून स्वतःच्या प्रयत्नानें आत्मकल्याणाच्या मार्गाला लागतो. या वेळेस जीवाला नीलवर्णाची गति संपून रक्तवर्णाची गति मिळते. पण, दैववशात् सत्वगुणाचा जोर तितका जास्त जर झाला नाहीं तर तो फिरून मनुष्यलोकांत येतो. तेथें त्याच्याच कर्मांनीं उत्पन्न झालेल्या बंधनांचे क्लेश भोगीत, व धार्मिक विधिनिषेधांनीं देहदण्डन करून तद्द्वारा चित्तशुद्धि करीत त्याला अनेक कल्पपर्यंत रहावें लागतें. विधिनिषेधांच्या देहदंडानें हा पुनीत झाला म्हणजे याला देवत्व येतें; व येथें शंभर कल्पपर्यंत काळ कंठल्यानंतर हा जीव फिरून मनुष्यत्वांत येतो; व फिरून देवत्व पावतो. देवत्वाच्या स्थितींत जीव हजारों कल्पपर्यंत राहिला तरी त्याची विषयोपभोगप्रीति कायम असते म्हणून त्या ठिकाणीं तो जन्ममरणाचे फेरे घेत रहातो. तामसी विषयलालसेप्रमाणेंच स्वर्गीय विषयोपभोग हेहि एकप्रकारें नरकप्रदच आहेत. म्हणून देवत्वस्थिति–स्वर्गभोग भोगण्याची स्थिति–हाहि एकप्रकारचा नरकच होय. या नरकांत हा जीव स्वकृत कर्मांचीं फलें भोगीत अनेक कल्पपर्यंत रहातो. या ठिकाणीं कर्मफलांचा उपभोग घेत घेत दहा अधिक पांच अधिक चार मिळून एकोणीस लक्ष कल्पपर्यंत काळ कंठल्यानंतर जीव हा या नरकांतून–स्वर्गभोगाच्या नरकांतून–मुक्त होतो व त्याला इतर योनींतील जन्ममरणांचे फेरेहि घ्यावे लागत नाहींत. हा जीव देवलोकांतून मनुष्यलोकांत व मनुष्यलोकांतून देवलोकांत सारखा येरझारा घालीत असतो. मनुष्याचा देव होणें व देवाचा मनुष्य होणें हें चक्र त्याच्या मागचें अनेक कल्पपर्यंत सुटत नाहीं. मनुष्यत्वाच्या स्थितींत आठशें कल्प राहिल्यानंतर जीवाला देवत्व येतें. पण, दुर्दैवानें याच्या हातून तेथें पाप घडलें तर हा जीव पुनः अतिशय निकृष्ट अशा कृष्णवर्णांत येऊन पडतो. हें जें वर चढणें, पुनः खालीं येणें, पुनः वर जाणें, पुनः खालीं येणें असे या वर्णावर्णांतील फेरे आहेत यांतून विमुक्त होऊन जीवाला मुक्ति कशी मिळते तें, हे असुरेंद्रा, मी तुला सांगतों, ऐक.

प्राणिमात्राची बुद्धि ( इच्छा ) ही श्रोत्र, त्वचा, चक्षु, जिव्हा इत्यादि सात

इंद्रियांनीं होणाऱ्या अनेकविध व्यापारांनीं प्रकट होते. हें जें एका बुद्धीचें अनेक रूपांनीं प्रकट होणें याला व्यूह म्हणतात. अशा तऱ्हेच्या शेंकडों सात्त्विक व्यूहांतून जातां जातां—अनेक प्रकारचीं सात्त्विक शमदमादि कर्में करतां करतां—प्राणी प्रथम रक्त, नंतर हारिद्र व नंतर शुक्ल अशा वर्णांत जातो व शेवटीं त्याचे रागद्वेष मावळतात. मोक्ष ही आत्यंतिक श्रेष्ठ अशी गति बाजूला ठेविली तर त्याच्या खालोखाल सर्वोत्कृष्ट असे जे चंद्रब्रह्मादि लोक ते जीवाला प्राप्त होतात. चित्स्वरूपाच्या ज्ञानाचा स्वच्छ प्रकाश ज्यांच्या अंतःकरणांत पडला आहे असे महापुरुष आपल्या मनोबलानें वर सांगितलेले चंद्रब्रह्मादि आठ लोक जिंकतात. तसेंच, दशेंद्रियें, त्यांचे उपभोग्य विषय, पंचप्राण, अंतःकरणचतुष्टय व अविद्या या ज्या कर्मकारक व भोगप्रापक तीस गोष्टी त्यांचाहि निरोध हे ज्ञानी पुरुष करतात. या तीस गोष्टी जशा जाग्रदवस्थेंत कर्में करविणाऱ्या व भोगप्राप्ति करून देणाऱ्या असतात, तशाच त्या स्वप्नस्थितींतहि असतात. एवंच, जाग्रदवस्थेंतील तीस व स्वप्नस्थितींतील तीस अशा या साठ गोष्टींवर व त्यांच्याच शेंकडों प्रकारांवर आपल्या मनःसामर्थ्यानें प्राण्याला जय मिळवितां आला—यांच्या योगानें उत्पन्न होणारे रागद्वेषादि विकार टाळतां आले—जाग्रत्, स्वप्न व सुषुप्ति या तीन्ही अवस्थांच्या पलीकडे जातां आलें म्हणजे, हे महानुभावा, तो तुरीयावस्थेंत जातो. या तुरीयावस्थेंतच त्याला शुद्ध प्रत्यगात्म्याचें स्वयंप्रकाश व चिन्मय रूप दिसतें. शुक्लवर्णानें प्राप्त होणारी परा गति ती हीच होय. जीवन्मुक्त झाला तरी 'प्रारब्धकर्मणां भोगादेव क्षयः' या नियमांतून त्यालाहि सुटतां येत नाहीं. म्हणून प्रारब्धकर्मांचा भोगानें क्षय होईपर्यंत त्याला एक शत कल्पपर्यंत त्याच देहांत रहावें लागतें; मग त्याची रहाण्याची इच्छा असो वा नसो. प्राप्त झालेल्या दिव्य भोगांतील आसक्ति टाकण्याइतकें मनोजयाचें सामर्थ्य या योग्याला नसेल, तर त्याला महः, जनः, तपः, व सत्य या चार लोकांतून क्रमानें जावें लागतें. वर सहाव्या शुक्लवर्णानें प्राप्त होणारी परागति म्हणून जी सांगितली तिच्यामधील मनोजय तेवढा साधला व ब्रह्मसाक्षात्कारानें जीवन्मुक्तता मिळाली नाहीं तरी देखील त्याचे रागद्वेषादि विकार नष्ट झालेले असल्यामुळें त्याला क्रममुक्तीच्या मार्गानें जातां येतें. एखाद्या मनुष्याच्या हातून शुद्ध योगानुष्ठानाचें संपूर्ण आचरण झालें नाहीं व त्याला एकदम मुक्ति मिळवतां आली नाहीं तरी सुद्धां त्याचीं ज्ञानेंद्रियें, मन व बुद्धि हीं त्याच्या सात्त्विकतेमुळें पवित्र झालेलीं असल्यामुळें तो शतकल्पपर्यंत स्वर्गा-

तच रहातो. तेथें त्याच्या प्रारब्धकर्मांचे शेष शिल्लक राहिलेले असतात म्हणून तो स्वर्गलोकांतून फिरून मनुष्यजन्मांत येतो व पवित्र आणि ऐश्वर्यसंपन्न अशा कुळांत जन्म घेतो. हा मानुषजन्म संपला म्हणजे पूर्वजन्मार्जित अभ्यासबलाच्या जोरावर अधिकाधिक योगानुष्ठान करून, योगभ्रष्ट मनुष्यजन्म टाकून उत्तरोत्तर श्रेष्ठ अशा लोकांत जाऊं लागतो. योगभ्रष्टाचें जनन व मरण हीं व्युत्थान व समाधि यांच्यासारखींच असल्यानें प्रत्येक जन्माबरोबर त्याच्या योगसामर्थ्याची वाढच होत जाते. इतरांच्या जन्ममरणांपेक्षां योगभ्रष्टाच्या जन्ममरणांत हा विशिष्ट गुण असल्यानें त्याला जन्ममरणांची यातायात करावी लागली तरी तो खालीं न येतां उत्तरोत्तर श्रेष्ठ अशा भूः, भुवः, स्वः, महः, जनः, तपः, व सत्य या सप्त लोकांतून फिरतो. शेवटच्या सत्यलोकांत जाऊनहि 'आत्मैव ब्रह्म' ही त्याची भावना दृढ झाली नसेल तर तो तेथूनहि परत खालीं येतो; व 'तत्त्वमसि' या वाक्याच्या चिंतनानें उत्पन्न झालेली ब्रह्मात्मैक्याची त्याची भावना बळकट बनलेली असेल तर तो पुनः खालीं न येतां एकदम मुक्त होतो. आतां, जो प्राणी या जीवलोकांत असतांना इंद्रियें, मन व बुद्धि हीं मुक्तिमार्गाला विघातक आहेत—यांच्या आधीन होऊन हीं वागवितील तसें वागण्यानें मुक्ति मिळत नाहीं—असें आरंभापासून समजून चालतो त्याला अनन्त व अक्षर अशा पदाची प्राप्ति होते. या अव्यय पदाला शिवभक्त शिवाचें स्थान—कैलास—म्हणतात; विष्णुभक्त यालाच वैकुण्ठ म्हणतात; हिरण्यगर्भ ब्रह्मदेवाचे भक्त याला सत्यलोक म्हणतात; व शेषाचे भक्त याला शेषलोक समजतात. सांख्यमताप्रमाणें जीवाला प्राप्त होणारी परमोच्च गति हीच. जाग्रत्, स्वप्न व सुषुप्ति या अवस्थात्रयाच्या पलीकडे गेल्यावर तुरीयावस्थेंत प्रतीत होणाऱ्या अत्यंत श्रेष्ठ, देदीप्यमान व व्यापक अशा परब्रह्मस्वरूपाचें अव्यय स्थान तें हेंच होय असें वेदान्तशास्त्रज्ञ लोक म्हणतात. उज्ज्वल ज्ञानाची प्राप्ति झाल्यामुळें ज्यांचा स्थूल देह, सूक्ष्मदेह व कारण देह असे तीन्ही देह—देहत्रय—दग्ध झाले आहेत अशा प्रजांना संहारकालीं ब्रह्मपदाची प्राप्ति होते. आपापल्या अधिष्ठात्या देवतांच्या सामर्थ्यानें हालचाल करणारीं चेष्टात्मक इंद्रियें व ब्रह्मस्वरूपाहून विलक्षण असणाऱ्या जडप्रकृत्यादि गोष्टी यांचाहि प्रलयकालीं ब्रह्मरूपांतच लय होतो. आत्मबोध ज्यांना झाला आहे अशा लोकांच्या मुक्तिमार्गाचें विवरण आतांपर्यंत झालें. आतां ज्यांना पूर्ण आत्मज्ञान झालेलें नाहीं, अशांच्या सृष्टिप्रलयांची व्यवस्था कशी ती सांगतों.

सृष्टीचा प्रलय व पुनरुत्पत्ति यांच्या संधिकालांतहि ज्यांचीं कर्मफलें भोगानें क्षीण झालेलीं नाहींत–संपलेलीं नाहींत–असे देवलोकीं गेलेले प्राणी, सृष्टीची पुनरुत्पत्ति होण्याचे वेळेस, "धाता यथापूर्वमकल्पयत्" या न्यायानें नव्या कल्पांतहि फिरून जुन्या जागेवरच येतात. ज्यांचीं प्रारब्धकर्मे भोगानें निःशेष झालीं आहेत असे प्राणी मात्र पुनः मनुष्ययोनींत येतात; कारण, पूर्ण तत्त्वज्ञान होऊन तें अंगीं ठसावल्याखेरीज कोणालाच मुक्ति नाहीं. मग हें ज्ञान जन्ममरणांच्या कितीहि फेऱ्यांनीं होवो. सिद्धलोकांतून खालीं आलेल्या पुरुषांना पूर्वकल्पांतील परंपरेप्रमाणेंच क्रमाक्रमानें त्यांच्या त्यांच्या गतीनें जावें लागतें. बळानें व रूपानें पूर्वीच्या कल्पांतील रूपांसारखींच रूपें घेऊन हे जीव क्रमानें आपल्या पापपुण्यांचीं फळें भोगीत असतात.

'प्रारब्धकर्माचा क्षय भोगानेंच व्हावयाचा' या निराबाध सिद्धांताला ब्रह्मवेत्ता पुरुषहि अपवाद नाहीं. ब्रह्मज्ञान झालेला जीव प्रारब्धकर्माच्या भोगासाठीं जेथपर्यंत शरीर धारण करून असतो तेथपर्यंतच त्याच्या स्वरूपामध्यें सर्व सृष्टि, परा विद्या, अपरा विद्या या असतात. परंतु, योगानुष्ठानानें चित्त शुद्ध झालेलें असल्यामुळें, व ध्यानधारणादिकांनीं मन पवित्र केलेलें असल्यामुळें हें सर्व पंचेंद्रियरूप आहे-आभासमय आहे असें ज्ञान या ब्रह्मवेत्त्याला असतें. म्हणून, इतर जीवांप्रमाणें तो पुन्हां या गोष्टींत न घोंटाळतां शेष प्रारब्धकर्माच्या भोगानें–अर्थात्, तो फलभोग संपल्याबरोबर–मुक्त होतो. ब्रह्मवेत्ता पुरुष शुद्ध मनानें अत्यंत निर्मल परब्रह्मरूपाचें चिंतन करीत असतो व त्यामुळें त्याला अत्यंत श्रेष्ठ अशी विशुद्ध गति प्राप्त होते. ब्रह्मसाक्षात्कारानंतर त्याला अव्यय अशा प्रकारचें स्थान मिळतें–तो मोक्षपदाला पोहोंचतो–व त्याला परमदुर्लभ अशा शाश्वतपदाची प्राप्ति होते. "हे सत्वाढ्य वृत्रासुरा, याप्रमाणें नारायणाच्या सामर्थ्याचें महात्म्य मीं तुला कथन केलें आहे."

**वृत्रः** अशी स्थिति आहे म्हणून–नानाविध सृष्टि हे आपल्याच मनानें उत्पन्न केलेले आभासमय प्रकार आहेत असें ज्ञान मला आहे म्हणून–हे शुक्रा, मला कोणत्याहि प्रकारचा विषाद वाटत नाहीं. आपण आतांपर्यंत जें मला विवरण करून सांगितलें त्यानें ब्रह्माद्वैताचें रहस्य माझ्या मनांत बरोबर ठसलें. हे सत्वशील विप्रर्षे, आपलें वचन ऐकल्यामुळें आज माझ्या मनांतील सर्व संशय नाहींसे झाले व माझें पापहि आज क्षीण झालें. हे भगवन् महर्षे, त्या महा तेजस्वी

विष्णूचें अत्यंत सामर्थ्यवान् असें हें चक्र सारखें फिरत आहे. ज्या स्थानापासून ही सर्व सृष्टि उत्पन्न होते तेंच या अनंताचें शाश्वत स्थान होय, तोच महात्मा पुरुषोत्तम भगवान् विष्णु होय. त्याच्याच ठिकाणीं हें सर्व जग अधिष्ठित झालेलें आहे.

**भीष्म**—हे कौंतेया, असें बोलून त्या वृत्रासुरानें प्राणत्याग केला व आत्म्याचा परब्रह्माच्या ठिकाणीं लय करून तो परमपदाला पोहोंचला.

**युधिष्ठिर**—हे पितामहा, सनत्कुमारांनीं पूर्वीं वृत्रासुराला ज्या भगवान् विष्णूचें माहात्म्य सांगितलें तो हा आमचा श्रीकृष्णच !

**भीष्म**—नव्हे. सर्व जगाचा मूलाधार असा हा षड्गुणैश्वर्यसंपन्न भगवान् स्वतःच्या तेजोबलानें निर्विकार स्वरूपांत तळपत असतो. हा सत्यसंकल्पादि गुणांनीं युक्त असा महात्मा परमेश्वर स्वतः सृष्टींत प्रविष्ट होऊन तिच्या मधील नाना-रूपांचे अनेक भाव प्रकट करीत असतो. हा केशव, अच्युत, श्रीकृष्ण म्हणजे त्या परमात्म्याचा आठवा अंश. या त्रैलोक्याला प्राप्त झालेलें सामर्थ्य हें ह्या अच्युत केशवाच्या सामर्थ्याच्या आठव्या हिश्शाचें होय. हा श्रीकृष्ण परमात्मा आपल्या अंगच्या तेजाच्या अष्टमांशानें त्रैलोक्याला सामर्थ्यसंपन्न करतो. श्रीकृष्ण हा मूलस्थायी महादेवाचा तुरीयार्ध म्हणजे अष्टमांश, व त्रैलोक्याची शक्ति हा त्याचाहि अष्टमांश म्हणजे मूलाचा चौसष्टावा हिस्सा होय. मूलस्थायी महा-देवाच्या अलीकडच्या पायरीवर असलेला हा जगत्कारणरूप ईश्वर तुमच्या आमच्या दृष्टीनें नित्य असला तरी प्रलयकालांतील अंत हा त्यालाहि चुकत नाहीं. अति सामर्थ्यवान् असा जो भगवान् निर्विकार प्रभु तो त्याच्याहि पलीकडे पाण्यांत असतो. त्याचें अधिष्ठान आप हें होय. अविद्या-नाशामुळें प्रसन्नचित्त झालेला भगवान् ब्रह्मदेव हाहि त्याच शाश्वत लोकांत —म्हणजे मूलकारण जो भगवान् नारायण त्याचें अधिष्ठान होऊन राहिलेल्या आपस्वरूपांत—लीन होतो. या अनंत परमेश्वराच्या—नारायणाच्या—सत्तासाम-र्थ्यानें, कारणरूपानें सुप्त असलेलीं कार्यबीजें कार्यांची—सृष्टीची—उत्पत्ति करण्यास समर्थ होतात. मायोपाधीनें वेष्टित झाला तरी जगताच्या दृष्टीनें सनातनच अस-लेला हा परमात्मा सर्व लोकांत संचार करतो. यानें सर्व लोकांत संचार केला तरी स्वीकृत उपाधींचे गुणधर्म याला बाधत नाहींत—याचा निरोध करूं शकत नाहींत—म्हणून हा अनिरुद्ध होय. हा महात्मा आपल्यामध्यें सुप्तरूपानें असलेलें विविध-

प्रकारचें जग प्रकट करतो. कारणरूपानें परमात्म्याच्या ठिकाणीं सुप्त असलेलें जग कार्यरूपानें प्रकट होणें हीच जगताची उत्पत्ति होय.

युधिष्ठिर—हे परमतत्व जाणणाऱ्या परमार्थज्ञ पितामहा, वृत्रासुराला आपल्याला शुभगतीच प्राप्त होणार ही गोष्ट माहीत असेल--नव्हे, होती—म्हणून तो सुखी होता व त्याला कसलाहि विषाद झाला नाहीं. त्याला शुक्लवर्णीय साध्य ही देवयोनि प्राप्त झाल्यामुळें तो शुक्लवर्णाचा वृत्रासुर पशुपक्ष्यांच्या हलक्या योनींतून व नरकांतून मुक्त झाला आणि त्याला पुनर्जन्म आला नाहीं; परंतु हारिद्रवर्णाची किंवा रक्तवर्णाची गति प्राप्त झालेला प्राणी आपल्या तामस कर्मांच्या परिणामामुळें पशुपक्ष्यांच्या हलक्या योनींतहि जन्मास येणें शक्य आहे; कारण, या वर्णांत तामस कर्मेंहि त्याच्या हातून घडणें शक्य आहे. आम्हीं तर परमार्थतः दुःखरूप असलेल्या आभासमय सुखाला पारमार्थिक सुख मानून त्यांत रत झालेलीं माणसें आहों. तेव्हां, आम्हाला नील, कृष्ण किंवा त्याहूनहि अधम अशी तिर्यक्—योनि यांतील कोणती गति मिळणार कोण जाणे !

भीष्मः—तसें कांहीं नाहीं. तुम्हीं पांडव पवित्र आणि उदात्त कुळांत जन्माला आलेले आहांत, व आतांपर्यंत तुमच्या हातून तपश्चर्याहि चांगल्या प्रकारची झालेली आहे. तेव्हां तुम्हीं देवलोकामध्यें राहून तेथील सुखाचा अनुभव घेतल्यानंतर फिरून मनुष्यलोकांत याल. मनुष्यलोकांतील सुखें पूर्णपणें उपभोगिल्यानंतर योग्यकालीं—कल्पांतीं—फिरून देवलोकांत जाऊन तेथील सुखांचा उपभोग तुम्हांला घ्यावयाचा आहे. देवलोकांतील व मनुष्यलोकांतील सुखें अशा तऱ्हेनें पूर्णपणानें उपभोगिल्यानंतर तुमची गणना सिद्धलोकांत होईल. व तेथून तुम्हीं मुक्त व्हाल. युधिष्ठिरा, तुम्हीं सर्व पांडव अत्यंत निर्मल आहां तेव्हां तुम्हांला भिण्याचें बिलकूल कारण नाहीं. १२. ३. २८०.

---

## अध्याय २८१ वा.

[ वृत्रवधाची कथा ]

युधिष्ठिर—हे पितामहा, त्या अत्यंत तेजस्वी वृत्राची धार्मिकता, त्याची आपण वर्णिलेल्या प्रकारची विष्णुभक्ति व त्याचें ज्ञान हीं सर्वच अतुल आहेत. अतिशय देदीप्यमान अशा भगवान् विष्णूच्या पदाचें ज्ञान होणें ही गोष्ट अत्यंत दुर्घट होय. हे राजश्रेष्ठा, त्या वृत्राला हें ज्ञान कसें झालें ? आपल्या वच-

नावर माझी पूर्ण श्रद्धा आहे; आणि म्हणूनच, माझ्या मनांत एक संशय उत्पन्न होऊन त्याचें निरसन करून घेण्याची बुद्धि मला झाली आहे. वेदान्तविचार करण्यांत अत्यंत प्रवीण, उत्तम तत्त्वज्ञ, धार्मिक व परम विष्णुभक्त असा वृत्र इंद्राच्या हातून मारला कसा गेला? हे भरतर्षभा, या माझ्या शंकेचें आपण निरसन करा. इंद्र व वृत्र यांचें युद्ध कसें झालें व त्यांत इंद्रानें वृत्राला कसें जिंकलें ही कथा आपण मला विस्तारानें सांगा. ती ऐकण्याची मला फार मोठी उत्सुकता आहे.

भीष्मः—पूर्वी एकदां इंद्र सगळ्या देवांसहवर्तमान रथांत बसून निघाला असतांना त्याला समोर उभा असलेला पर्वतासारखा वृत्रासुर दिसला. हे अरिंदमा, पांचशें योजनें उंचीचें व तीनशें योजनें—त्याहून कांहींसें अधिकच—विस्तृत असें त्या वृत्राचें तें त्रैलोक्यालाहि दुर्जय असें तें रूप पाहून देवांना वृत्रासुराची अतिशय भीति वाटली व त्यांना शांति कशी ती मिळेना. हे राजा, वृत्रासुराचें तें भव्य स्वरूप एकदम डोळ्यांपुढें दिसतांच इंद्राचे पाय भीतीनें कांपूं लागले. मग देवासुरांचें भयंकर युद्ध सुरू झालें असतां ती युद्धभूमि देवांनीं व असुरांनीं वाजविलेल्या निरनिराळ्या वाद्यांच्या आवाजानें दुमदुमून गेली. हे कुरुश्रेष्ठा युधिष्ठिरा, वृत्राला मात्र इंद्राला पाहून कसलीहि भीति वाटली नाहीं. त्याच्या मनाचा कोणत्याहि प्रकारचा गोंधळ झाला नाहीं किंवा इंद्राविषयीं त्याच्या मनांत पूज्यभावहि उत्पन्न झाला नाहीं. नंतर, त्रैलोक्यालाहि भीतिप्रद वाटणारें असें, देवराट् इंद्र व महात्मा वृत्रासुर यांचें मोठें युद्ध झालें. त्यावेळेस ती युद्धभूमि देवांच्या व असुरांच्या सैन्यानें फुलून गेल्यासारखी दिसत होती. सर्वत्र तरवारी, पट्टिश, शूल, शक्ति, तोमर, मुग्दर, गोफणींनीं फेकिलेले नानाप्रकारचे दगड, रोमहर्षण आवाज करणारीं धनुष्यें, नानाप्रकारचीं दिव्य शस्त्रें व पेटलेले पलिते यांखेरीज दुसरें कांहींच दिसत नव्हतें. ब्रह्मदेवादि सर्व देव व मोठे मोठे ऋषि इंद्राचें व वृत्राचें तें युद्ध पहाण्यासाठीं आले होते. हे भरतर्षभा, सिद्धलोक आपल्या विमानांतून व अप्सरांसहवर्तमान गंधर्वहि पण आपल्या विमानांतून त्या ठिकाणीं जमले होते. धर्मज्ञांमध्यें श्रेष्ठ अशा त्या वृत्रानें आकाशांत सर्वत्र संचार करून इंद्रावर सर्व बाजूंनीं अतिशय वेगानें दगडांचा वर्षाव करावयास सुरवात केली. त्या वेळेस सर्व देवगण क्रुद्ध होऊन त्यांनींहि सर्व बाजूंनीं बाणांची वृष्टि केली व युद्धामध्यें वृत्रानें केलेला दगडांचा वर्षाव थोपवून धरला. हे कुरुशार्दूला, तो महासामर्थ्यवान् वृत्र मायिक युद्धांतहि मोठा

कुशल असल्यामुळें त्यानें सर्वत्र मायायुद्ध करून इंद्राला मोहवश केलें. वृत्राच्या मायायुद्धामुळें संत्रस्त झालेला इंद्र अखेर निश्चेष्ट झाला. तेव्हां वसिष्ठ महर्षींनीं त्याला जागा करून रथंतर नांवाच्या सामानें त्याला बोध केला.

**वसिष्ठ**—हे देवेंद्रा, तूं देवश्रेष्ठ आहेस. तूं आजपर्यंत अनेक दैत्य, अनेक असुर मारले आहेस. तुझ्या अंगांत त्रैलोक्याचें सामर्थ्य एकवटलेलें आहे. असें असतांना तूं खेद कां करितोस? हा ब्रह्मदेव, हा भगवान् विष्णु, हा जगत्पति शंकर, हा भगवान् सोमदेव व हे सगळे मोठमोठे ऋषि तुझ्याकडे पहात आहेत; यावेळेस एकाद्या यःकश्चित् प्राण्याप्रमाणें उदास होऊं नको. हे देवेंद्रा, युद्ध करण्याबद्दल अंतःकरणांत नीट उत्साह धर आणि आपल्या शत्रूंना मार. सर्व लोकांना पूज्य असणारा असा हा लोकगुरु भगवान् त्र्यंबक शंकर तुझ्याकडे निरखून पहात आहे. या वेळेस मोह सोड. हे बृहस्पतिप्रमुख सगळे ब्रह्मर्षि तुझा जय व्हावा म्हणून तुला उद्देशून दिव्य स्तोत्रें गात आहेत तीं ऐक.

**भीष्म**—महात्म्या वसिष्ठांनीं या प्रमाणें बोध केल्यानंतर आधींच तेजस्वी असलेल्या त्या इंद्राच्या अंगांत अधिकच आवेश चढला व त्या भगवान् पाकशासनानें भानावर येऊन आपल्या श्रेष्ठ अशा योगबलाच्या जोरावर त्या वृत्रासुरानें पसरिलेलें मायाजाल हतवीर्य करून टाकलें. इकडे वृत्रानें केलेला तो अद्भुत पराक्रम पाहून आंगिरस व दुसरे कित्येक महर्षि महेश्वर शंकराकडे गेले व लोकांच्या हिताच्या दृष्टीनें वृत्राचा नाश करण्याची त्यांनीं भगवंताला विज्ञापना केली. तेव्हां, भगवान् शंकराच्या तेजानें तीव्र ज्वराचें स्वरूप घेऊन लोकपति वृत्राच्या शरीरांत प्रवेश केला व लोकांचें रक्षण करण्याचें व्रत पत्करिलेल्या, सर्व लोकांना वंद्य अशा भगवान् विष्णूंनीं इंद्राच्या वज्रांत प्रवेश केला. इतकें झाल्यानंतर धीमान् बृहस्पति, वसिष्ठ व इतर मोठे मोठे ऋषि इंद्राकडे जावयास निघाले व त्या वरद आणि लोकवंद्य अशा वासवाकडे येऊन त्याला म्हणाले कीं "हे प्रभो, वृत्राचा वध कर."

**महेश्वर**—हे इंद्रा, हा बलाढ्य वृत्र अतिशय सामर्थ्यवान् आहे. हा विश्वात्मा असून याला वाटेल त्या ठिकाणीं जातां येतें. याच्याजवळ अनेक प्रकारचें मायाजाल आहे असा याचा लौकिक आहे. तेव्हां, त्रैलोक्यालाहि दुर्जय होऊन बसलेल्या या असुरश्रेष्ठाला तूं आपल्या योगबलानें मार. कोणताहि अनमान करूं नकोस. हे अमराधिपा, आपल्याला चांगलें सामर्थ्य प्राप्त व्हावें

म्हणून या वृत्रानें साठ हजार वर्षें तपश्चर्या केली होती; व ब्रह्मदेवानें याला वरहि दिला होता. या वराच्या योगानें याला योग्यांच्यामधील श्रेष्ठ पद, अत्यंत मोठें असें मायिक बल, अचाट सामर्थ्य व अत्यंत देदीप्यमान असें तेज प्राप्त झालें आहे. हे इंद्रा, हें पहा माझें तेज तुझ्यामध्यें प्रविष्ट होत आहे. तें तेज तुझें सामर्थ्य वाढवील. या वृत्रामध्येंसुद्धां माझ्या तेजानें प्रवेश केला आहे; पण, तेथें त्याचा परिणाम उलट होऊन माझ्या तेजामुळें त्याचें सामर्थ्य कमी होईल. म्हणून, हे इंद्रा, तूं वज्रानें या दानवाला मार. महेश्वराचें हें भाषण ऐकून इंद्र म्हणाला, " हे सुरश्रेष्ठा, आपल्या प्रसादानें मीं या दुर्जय अशा दैत्याला माझ्या वज्रानें आपल्या डोळ्यांदेखत मारतों, पहा. "

**भीष्म**—भगवान् शंकराच्या तेजानें ज्वराचें रूप घेऊन त्या दैत्यश्रेष्ठ वृत्रासुराच्या शरीरांत जेव्हां प्रवेश करावयास सुरवात केली त्यावेळीं देवता व ऋषि या सर्वांना आनंद होऊन त्यांनीं हर्षातिरेकानें मोठा नाद केला. नंतर दुदुंभी, मोठ्या आवाजाचे शंख, मुरज, डिंडिम वगैरे हजारों वाद्यांचा गजर त्या ठिकाणीं सुरू झाला. सर्व राक्षसांची मात्र स्मृति एकाएकीं नष्ट झाली व त्यांचें अपार मायिकबल एकदम नाहींसें झालें. महेश्वराचें तेज वृत्राच्या अंगांत शिरल्याचीं हीं चिन्हें पाहून व इंद्राच्याहि अंगांत तें तेज संचरलेलें पाहून सर्व देव व ऋषि यांनीं इंद्राची स्तुति करावयास सुरवात केली व ते वृत्रवधाच्याबद्दल त्या सुरेंद्र शक्राला उठावणी देऊं लागले. सर्व ऋषि इंद्राची स्तुति गात असतांना त्या युद्धप्रसंगीं रथांत बसलेल्या त्या महात्म्याचें रूप इतकें तेजःसंपन्न दिसत होतें कीं त्याच्याकडे कोणालाहि पहावत नव्हतें. १२. ३. २८१.

---

## अध्याय २८२ वा.

[ १ ब्रह्महत्याविभाग. ]

( १ ) **भीष्म**—हे महाराजा, त्या वृत्राच्या अंगांत ज्वरानें सर्व बाजूंनीं ज्यावेळेस प्रवेश केला त्यावेळेस त्याचे शरीरावर कोणतीं चिन्हें दिसत होतीं तीं सांगतों ऐक. त्याच्या मुखांत उष्णता वाढून त्यांतून जणूं अग्नीच्या ज्वाळा बाहेर पडत आहेत असा भास होई. यामुळेंच, तो अत्यंत भयावह असा दिसत होता. त्याच्या सर्व शरीराला एक प्रकारचा पांडुरपणा आला होता; सर्वांगाला कंप सुटला होता; श्वास जोराजोरानें चालला असून सर्व अंगावर रोमांच उभे राहि-

लेले दिसत होते. तो वृत्र जोरजोरानें सुस्कारे टाकीत होता. हे भारता, त्या वृत्रासुराची स्मृति एका महाभयंकर व अत्यंत अमंगल अशा दारुण कोल्हीच्या रूपानें त्याच्या वदनांतून बाहेर पडली. त्याच्या दोहीं बाजूंस पेटलेल्या दारुण उल्का दिसूं लागल्या. गिधाडें, कंकपक्षी व बगळे हे मोठमोठ्यानें ओरडूं लागले व त्या वृत्राच्या डोक्यावर जमून चक्राकार घिरट्या घालूं लागले. वृत्राची अशी स्थिति पहातांच युद्धभूमीवर देवांकडून उत्तेजन मिळालेला तो इंद्र आपल्या रथांत बसून व हातांतील वज्र उगारून त्या वृत्राकडे रोखून पाहूं लागला. महेश्वर शंकरानें निर्माण केलेला ज्वर त्या वृत्राच्या अंगांत शिरला असल्यामुळें तो राक्षस मोठमोठ्यानें ओरडूं लागला व जांभया देऊं लागला. तो जांभया देतोसें पाहून इंद्रानें आपल्या वज्राचा प्रहार त्याच्यावर केला. प्रलयाग्नीसारख्या तेजस्वी अशा त्या वज्राच्या प्रहारामुळें तो धिप्पाड वृत्रासुर लागलाच जमिनीवर पडला. इंद्राच्या हातून वृत्रवध झाला असें पहातांच सर्व देवांनीं त्याच्या भोंवतीं जमून मोठ्या आनंदानें गर्जना करायास सुरवात केली. वृत्रवधानें अतिशय मोठें यश संपादन करून व विष्णुतेजानें युक्त असें आपलें वज्र घेऊन इंद्र हा थेट स्वर्गलोकांत गेला. हे भरतसत्तमा युधिष्ठिरा, वृत्राच्या शरीरांतून इकडे एक काळसर पिंगट वर्णाची, अतिशय घोर, भयंकर, रुद्रस्वरूपाची, लोकांना भीति उत्पन्न करणारी, करालासारखे दांत असणारी अशी कृत्येसारखी दिसणारी ब्रह्महत्या बाहेर निघाली. तिनें केस मोकळे सोडलेले होते. तिचे डोळे महाभयंकर दिसत होते. तिच्या गळ्यांत नररुंडांच्या माला होत्या. ती रक्तानें न्हालेली असून तिनें अंगावर वल्कलें धारण केलेलीं होतीं. हे राजेंद्रा, असल्या स्वरूपाची ती महाभयंकर ब्रह्महत्या वृत्राच्या शरीरांतून निघाली व तिनें इंद्राचा पाठलाग सुरू केला. कांहीं काल लोटल्यानंतर तो वृत्रहंता इंद्र लोकांचें कल्याण करण्याच्या इच्छेनें स्वर्गाच्या रोखानें बाहेर पडला. महातेजस्वी असा तो इंद्र बाहेर पडलेला पहातांच ब्रह्महत्येनें त्याला घेरलें व ती त्याच्या पाठीशीं कायमची चिकटून राहिली. ब्रह्महत्येचें हें नवीनच संकट उपस्थित झालेलें पहातांच इंद्रानें एका कमलिनीच्या केसरांत सूक्ष्मरूपानें प्रवेश केला व त्या ठिकाणींच तो अनेक वर्षेंपर्यंत राहिला. त्या ब्रह्महत्येनें महाप्रयत्नानें इंद्राचा माग काढून त्याला तेथेंहि गांठलें. ब्रह्महत्येनें घेरल्यामुळें तो इंद्र अत्यंत निस्तेज होऊन गेला. ब्रह्महत्या आपल्या मागची टळावी म्हणून इंद्रानें नानाप्रकारें प्रयत्न केला; पण, ब्रह्महत्या त्याला जी चिकटली ती चिकटलीच. अखेर इंद्रानें ब्रह्मदेवाकडे जाऊन त्याला शिर-

साष्टांग नमन केलें. ब्रह्महत्येच्या पातकानें इंद्राला घेरलें आहे असें पहातांच त्या ब्रह्मदेवानें आपल्याशीं पुष्कळ विचार केला व अखेर मधुर स्वरानें व आर्जवाच्या भाषेंत तो पितामह ब्रह्मदेव त्या ब्रह्महत्येला म्हणाला, " माझ्याकरितां म्हणून या इंद्राला सोडून दे व माझी इच्छा पूर्ण कर. तुझी इच्छा काय आहे तें मला सांग व तुझ्या मनांतील कोणता हेतु मीं आतां पूर्ण करूं तें बोल."

ब्रह्महत्याः—त्रैलोक्याला वंद्य असणारा सृष्टिकर्ता ब्रह्मदेव मला प्रसन्न असल्यावर माझ्या सर्व इच्छा परिपूर्ण झाल्यासारख्याच आहेत. इंद्राला सोडल्यानंतर मीं कोठें रहावें तें सांगा. मला रहावयास जागा द्या म्हणजे झालें. भगवन्, लोककल्याणासाठींच आपण ही मर्यादा घालून दिली व मला उत्पन्न करून लोकांच्या पापाचारास आळा घालण्यासाठीं माझी कायमची स्थापना आपणच केली. हे धर्मज्ञा, सर्वलोकेश्वरा, आपण मजवर प्रसन्न झालां आहांत तर आपल्या मर्जीसाठीं मी इंद्राला सोडून देतें. पण हे प्रभो, आपण मला रहाण्याला ठिकाण दाखवावें. "

भीष्मः—पितामह ब्रह्मदेवानें त्या ब्रह्महत्येला 'होय' म्हणून सांगितलें, व मोठ्या चातुर्यानें इंद्राची तिजपासून सुटका केली. नंतर त्या महात्म्या ब्रह्मदेवानें अग्नीचें ध्यान केलें; त्याबरोबर अग्नि त्याच्यासमोर येऊन त्याला म्हणाला, " हे भगवन्, हा मीं आपल्या समीप आलों आहें. तेव्हां मीं काय करूं तें आपण मला सांगा. "

ब्रह्मदेवः—इंद्राला लागलेलें ब्रह्महत्येचें पाप नाहींसें व्हावें म्हणून या ब्रह्महत्येचे मी अनेक भाग करणार आहें. तेव्हां यांतील चौथ्या भागाचा तूं स्वीकार कर."

अग्निः—या ब्रह्महत्येपासून माझी सुटका कशी होईल त्याचा हे ब्रह्मदेवा, आपण कांहीं विचार करा. माझ्या सुटकेचा उपाय आपल्याजवळून जाणून घेण्याची माझी इच्छा आहे.

ब्रह्मदेवः—हे अग्ने, जो कोणी मनुष्य तुला पेटलेला पाहून धान्यें, औषधि व रस यांचें तुझ्या ठिकाणीं हवन करणार नाहीं त्या अज्ञानी माणसाला हें तुझें ब्रह्महत्येचें पातक चिकटेल व त्याचे ठिकाणीं ही ब्रह्महत्या राहील. म्हणून हे अग्ने, तूं मनांत कोणतीहि चिंता करूं नको.

ब्रह्मदेवाचें तें भाषण ऐकतांच पितृयज्ञ व देवयज्ञ यांच्या आहुति स्वीकारणाऱ्या अग्नीनें त्याचें म्हणणें कबूल केलें; व ब्रह्मदेवाच्या व्यवस्थेप्रमाणें ब्रह्म-

हत्येचा चतुर्थांश अग्नीचे ठिकाणीं आला. नंतर ब्रह्मदेवानें वृक्ष, औषधि व तृणधान्यें यांना बोलावून त्यांच्याजवळहि तेंच बोलणें काढलें. अग्नीला सांगितलेली गोष्टच ब्रह्मदेवानें त्यांना सांगितल्यामुळें त्या लता व झाडें यांनाहि अग्नीप्रमाणें वाईट वाटलें व ब्रह्मदेवाला म्हणतात " हे त्रिलोकेशा, आम्हांला आमची सुटका यांतून कशी होईल त्याचा उपाय सांग. आम्हीं आधींच आमच्या दैवानें गांजलों आहोंत. मेल्या मढ्यांना तूं आणखी मारूं नको. आम्हांला वणवा, थंडी, पाऊस व वावटळ इत्यादिकांपासून होणारें दुःख नेहमीं सहन करावें लागतें. तसेंच लोक आमचे तुकडे करितात, आम्हांला कापतात तेंहि आम्हीं सहन करतों. आतां, हे त्रैलोक्याधिपते, तुझ्या म्हणण्यासाठीं म्हणून आम्हीं या ब्रह्महत्येचा स्वीकार करतों; पण, आमच्या मोक्षाचा उपाय आम्हांस सांग.

ब्रह्मदेवः—पर्वकाल प्राप्त झाला असतांना जो कोणीं मनुष्य मोहव्याप्त होऊन तुमचे तुकडे करील अगर तुम्हांला कापील त्याच्यामागें ही ब्रह्महत्या लागेल.

भीष्मः—हे भारता, त्या महात्म्या ब्रह्मदेवानें याप्रमाणें सांगतांच तीं झाडें व त्या लता ब्रह्मदेवाचें पूजन करून जशा आल्या तशाच आपापल्या जागीं गेल्या. नंतर त्या विधात्यानें सर्व अप्सरांना बोलाविलें व अत्यंत मधुर आणि आर्जवाच्या स्वरानें तो त्यांना म्हणाला, " हे श्रेष्ठ स्त्रियांनो, ही ब्रह्महत्या इंद्राला सोडून येथें आली आहे, हिच्या चतुर्थांश भागाचा तुम्हीं स्वीकार करावा अशी माझी इच्छा आहे. "

अप्सराः—" हे देवेशा, आपल्या आज्ञेसाठीं आम्हीं या ब्रह्महत्येचा स्वीकार करूं; परंतु, आमची यांतून सुटका होण्याचा निश्चित उपाय आपण आम्हांला सांगा.

ब्रह्मदेवः—स्त्री रजस्वला असतांना तिच्याशीं जो समागम करील त्या पुरुषाला तुमचें ब्रह्महत्येचें पातक चिकटेल. तुह्मीं कांहीं काळजी करूं नका.

भीष्मः—हें ब्रह्मदेवाचें वाक्य ऐकून त्या अप्सरांना आनंद झाला व त्याला 'होय' म्हणून त्या आपापल्या जागीं जाऊन विहार करूं लागल्या. नंतर त्रैलोक्याचा स्रष्टा जो ब्रह्मदेव त्यानें जलाचें ध्यान केलें. त्याबरोबर आपोदेवता त्याच्यासमोर आल्या, व त्या अत्यंत तेजस्वी व तपोबलानें युक्त अशा ब्रह्मदेवाला त्यांनीं नमस्कार केला आणि त्याला म्हणाल्या, " हे शत्रुमर्दना लोकेशा, तुझ्या आज्ञेप्रमाणें आम्हीं या ठिकाणीं आलों आहोंत. तुझी इच्छा काय आहे तें सांग. "

**ब्रह्मदेव**—वृत्राच्या शरीरांतून निघालेली ही महाभयंकर ब्रह्महत्या इंद्राच्यामागें लागली आहे. हिचा चौथा भाग तुम्हीं स्वीकारावा.

**आपोदेवता**—प्रभो, आपण म्हणतां तर तसें होऊं दे. पण, यांतून निश्चितपणानें आमची सुटका होईल असा एकादा उपाय काढा. हे लोकनायका, सर्व जगताचा आधार आपणच आहां. तेव्हां, या संकटांतून आमचा उद्धार ज्यानें होईल असा उपाय आम्हांला सांगा.

**भीष्म**—आपोदेवतांचें तें भाषण ऐकून ब्रह्मदेव त्यांना म्हणाला, "तुम्हीं क्षुद्र आहांत असें समजून जो मूढ मनुष्य तुमच्या ठिकाणीं कफ, मूत्र, इत्यादिकांचें विसर्जन करील त्याच्यामागें ही तुमची ब्रह्महत्या लागेल व तेथेंच राहील. अशा रीतीनें तुम्हीं ब्रह्महत्येच्या पातकांतून मुक्त व्हाल; हें मीं तुम्हांला सत्य स्मरून सांगत आहे." हे युधिष्ठिरा, ब्रह्मदेवानें ब्रह्महत्येच्या पातकाची अशी वांटणी केल्यानंतर त्या कृत्येनें इंद्राला सोडून दिलें, व ब्रह्मदेवाच्या आज्ञेप्रमाणें ती नेमून दिलेल्या जागीं जाऊन राहिली. हे जनाधिपा, इंद्राला ब्रह्महत्येचें पातक लागलें त्याचा प्रकार हा असा आहे. या पातकांतून मुक्त होण्यासाठीं इंद्रानें अश्वमेध यज्ञ आरंभिला. ब्रह्मदेवाच्या अनुज्ञेनें त्यानें हा यज्ञ करून ब्रह्महत्येच्या पातकांतून आपली सुटका करून घेतली असें आम्हीं ऐकिलें आहे. हे पार्था, वृत्राच्या रक्तापासून डोक्यावर तुरा असणारे कोंबडे निर्माण झालेले आहेत. म्हणून तपोदीक्षा घेतलेल्या लोकांनीं व इतर ब्राह्मणांनीं ते खाऊं नयेत. तूं सुद्धां, सर्व प्रकारांनीं या ब्राह्मणांचें कल्याणच करीत जा. कारण, ते ह्या पृथ्वीतलावरचे देव होत असेंच समजलें जातें. याप्रमाणें, इंद्रानें त्या पराक्रमी वृत्रासुराचा, आपल्या सूक्ष्म बुद्धीचा उपयोग करून व योग्य उपाय योजून मोठ्या वीरश्रीनें नाश केला. त्यानें ज्याप्रमाणें आपल्या शत्रूंचा उच्छेद केला तसा तूंहि आपल्या शत्रूंचा उच्छेद करशील, व या पृथ्वीवर तुझा कोठेंहि पराजय होणार नाहीं. इंद्रानें वृत्रवध केल्याची ही कथा पर्वापर्वांचे ठिकाणीं जो कोणीं विप्रांच्या मध्यें बसून सांगेल त्याला कोणतेंहि संकट कधींहि प्राप्त होणार नाहीं. वृत्राच्या संबंधांत इंद्रानें केलेल्या अद्भुत पराक्रमाचा इतिहास मीं तुला याप्रमाणें सांगितला आहे. आणखी काय ऐकण्याची तुझी इच्छा आहे तें सांग. १२. ३. २८२.

---

## अध्याय २८३ वा.

[ १ ज्वरोत्पत्ति ]

( १ ) **युधिष्ठिर**—हे महाप्राज्ञ पितामहा, आपण सर्व शास्त्रांत पारंगत आहां. या वृत्रवधाच्या इतिहासाबद्दल मला आपल्याला एक प्रश्न विचारावासा वाटतो. वृत्राला महेश्वरानें उत्पन्न केलेल्या ज्वरानें ग्रासलें व नंतर इंद्रानें आपल्या वज्राच्या सहाय्यानें त्याचा वध केला असें आपण सांगितलें. पण, हा ज्वर कोठून व कसा उत्पन्न झाला त्याची यथातथ्य हकीकत विस्तारानें ऐकण्याची माझी इच्छा आहे.

**भीष्म**—राजा, ज्वराची उत्पत्ति कशी झाली त्याची लोकांत प्रसिद्ध असलेली हकीकत जशी आहे तशी मीं तुला सांगतों. पूर्वीं मेरुपर्वताचें ज्योतिष्क नांवाचें एक शिखर सूर्याच्या तेजानें एकसारखें चकाकत असे. सर्व त्रैलोक्यांतील लोक हें स्थान पूज्य मानीत व या ठिकाणीं नानाप्रकारचीं रत्नेंहि होतीं. अशा या मेरुपर्वताच्या शिखराचें आक्रमण सर्व लोकांत कोणाच्यानेंहि होऊं शकत नसे व त्याचा विस्तारहि पण कोणालाच मापतां येण्यासारखा नव्हता; सोन्यानें विभूषित झालेल्या त्या पर्वतशिखरावर भगवान् शंकर एकाद्या पलंगा-वर पडावें त्याप्रमाणें आसन घालून बसलेले असत. जवळ पार्वतीहि नित्य असे. त्या ठिकाणीं, तेजस्वी असे महात्मे अष्ट वसु; वैद्यश्रेष्ठ अश्विनौदेव; आपल्या यक्षगणांनीं परिवृत असलेला, कैलासावर रहाणारा, प्रभु यक्षराट् कुबेर; महाते-जस्वी असा शुक्रऋषि हे सर्व त्या महात्म्या शंकराची उपासना करीत होते. सनत्कुमारादि महर्षि व आंगिरसादि देवर्षि; विश्वावसु गंधर्व; नारद, पर्वत, इत्यादि ऋषि आणि अप्सरांचे थवेच्या थवे त्या ठिकाणीं सर्व बाजूंनीं येऊन गोळा झाले. नानाप्रकारच्या सुगंधानें युक्त असा पवित्र व आल्हादकारक वारा वाहूं लागला. सर्व ऋतूंमध्यें मिळणाऱ्या फुलांनीं व फळांनीं वृक्ष लढलेले दिसूं लागले. विद्याधर, सिद्ध, नानाविध तपस्वी इत्यादिकांनीं पशुपति महादेवाची त्या ठिकाणीं उपासना करण्यास सुरवात केली. नानाप्रकारचीं रूपें धारण करून आलेलीं भूतें, अतिशय अक्राळविक्राळ दिसणारे राक्षस, पिशाच्चें इत्यादि त्या ठिकाणीं होतीं. हातांत अनेक प्रकारचीं शस्त्रें घेतलेले व निरनिराळे वेष धारण केलेले असे महादेवाचे अनेक सेवक त्या ठिकाणीं अग्नीसारख्या देदीप्यमान स्वरूपांत वावरतांना दिसत होते. स्वतःच्या अमित तेजानें तळपणारा असा भगवान् नंदी हातांत पेटलेली चूड घेऊन देवाच्या आज्ञेची वाट पहात उभा

होता. सर्व तीर्थांतून निर्माण झालेली व सर्व नद्यांत श्रेष्ठ असलेली गंगा प्रत्यक्ष देह धारण करून त्या ठिकाणीं त्या भगवान् शंकरांची सेवा करीत होती. सुरर्षींची व देवांची अशा तऱ्हेची पूजा घेत घेत तो अतिशय तेजस्वी असा भगवान् महादेव त्या मेरुपर्वताच्या शिखरावर वास्तव्य करून राहिला होता.

कांहीं काळ गेल्यानंतर, दक्षप्रजापतीनें शास्त्रानें पूर्वी घालून दिलेल्या विधिप्रमाणें यज्ञ करण्यास आरंभ केला. त्याच्या त्या यज्ञांत हविर्भाग घेण्यासाठीं आपण सर्वांनीं मिळून जावें असा इंद्रादि सर्व देवांनीं मनांत विचार केला. सूर्यासारख्या अत्यंत तेजस्वी अशा विमानांतून हे देव महादेवांच्या अनुज्ञेनें गंगाद्वाराच्या ठिकाणीं गेले असें आम्हीं ऐकिलें आहे. ते सर्व देव निघालेले पाहून महासाध्वी पार्वती पशुपति शंकरांना म्हणाली, " हे महाराजा, हे सर्व इंद्रादि कोणीकडे चालले आहेत तें सर्व यथार्थ रीतीनें मला सांगून आपण माझा संशय दूर करावा."

**महेश्वर**—हे महाभागे, प्रजापतींच्यामध्यें श्रेष्ठ असा दक्ष अश्वमेध नांवाचा यज्ञ करीत आहे. त्याच्या यज्ञाला हे देव चालले आहेत.

**उमा**—हे महादेवा, या यज्ञाला आपण कां जात नाहीं ? आपल्या जाण्यांत अशी कोणची अडचण आली ?

**महेश्वर**—या देवांनीं पूर्वीपासूनच अशी योजना करून ठेविली आहे कीं कोणत्याहि यज्ञांत मला हविर्भाग मिळूं नये. या जुन्या रूढीला अनुसरून देव मला यज्ञांतील भाग देत नाहींत.

**उमा**—भगवन्, आपला प्रभाव व गुण हे कोणाहिपेक्षां अधिक आहेत. आपण अजेय आहांत; आपल्यावर कोणींहि हल्ला करणें शक्य नाहीं. आपलें तेज, यश व ऐश्वर्य हीं सर्व श्रेष्ठ आहेत. अशा स्थितींत यज्ञांत आपला भाग आपल्याला मिळत नाहीं हें पाहून मला अतिशय दुःख होतें व माझ्या सर्वांगाला कांपरें भरल्यासारखें होतें.

**भीष्म**—ती उमादेवी त्या पशुपति महादेवाला अशा तऱ्हेनें बोलून मनांतल्या मनांत चरफडत स्तब्ध राहिली. उमादेवीचा अभिप्राय जाणून व तिच्या मतानें काय करावयास हवें होतें तें ओळखून भगवान् शंकरांनीं नंदीला 'तूं येथें थांब' अशी आज्ञा केली. नंतर सर्व योगेश्वरांत श्रेष्ठ असलेल्या पिनाकपाणी महादेवानें आपलें सर्व योगबल एकवटून आपल्या महाभयंकर अशा अनु-

चरांच्या सहाय्यानें त्या यज्ञाचा एकदम विध्वंस केला. देवेश्वराच्या त्या अनुचरांपैकीं कांहींजण मोठमोठ्यानें ओरडूं लागले; कांहींनीं विकटपणें हास्य करण्यास सुरवात केली. हे राजा, दुसरे कित्येकजण त्या यज्ञकुंडांतील अग्नीवर रक्त शिंपूं लागले; कित्येकांनीं यज्ञांतील पशुबंधांचे स्तंभ उपटून हातांत घेतले व वेडींवांकडीं तोंडें करीत इकडेतिकडे हिंडावयास सुरवात केली. कांहींजण भोंवतालीं असणाऱ्या सेवकांना आपल्या तोंडांनींच सगळे गिळूं लागले. अशा प्रकारें आपला चोहों बाजूंनीं विध्वंस होत असलेला पाहून त्या यज्ञानें हरिणाचें रूप घेऊन आकाशमार्गानें जाण्यास सुरवात केली.

हरिणाचें रूप घेऊन यज्ञ आकाशमार्गानें पळत आहे असें पाहून शंकरांनीं हातांत धनुष्य घेतलें व त्यावर बाण चढवून त्यांनीं त्या यज्ञाचा पाठलाग केला. नंतर त्या महातेजस्वी देवदेवेश्वराच्या कपाळांतून क्रोधामुळें उत्पन्न झालेला घामाचा बिंदु जमिनीवर पडला. तो बिंदु जमिनीवर पडतांच त्यांतून प्रलयकालच्या अग्नीप्रमाणें अत्यंत तेजस्वी असा अग्नि निर्माण झाला व त्या अग्नींतून एक पुरुष बाहेर आला. हा पुरुष अतिशय खुजा व अति भयप्रद असून त्याचे डोळे लाल होते. त्याच्या चेहऱ्यावरचे केंस हिरवे होते. त्याचें सर्व अंग केंसांनीं व्याप्त झालेलें असून ते ससाणा किंवा दिवाभीत यांच्या केंसाप्रमाणें ताठ होते. त्या पुरुषाचा वर्ण काळाकभिन्न असून त्यानें तांबडें वस्त्र धारण केलें होतें. त्या महाबलाढ्य पुरुषानें अग्नीनें गवत जाळावें त्याप्रमाणें त्या यज्ञाचें चोहों बाजूंनीं दहन करण्यास सुरवात केली. तो सर्व देवांच्याकडे व ऋषींकडे त्यांना भेवडावण्यासाठीं धांवूं लागला. तेव्हां भयानें संत्रस्त झालेले ते देव दशदिशा धांवूं लागले. हे राजन्, तो पुरुष याप्रमाणें त्या यज्ञमंडपांत धांवत असतांना सर्व पृथ्वी अतिशय कंपित होऊं लागली. सर्व जगतांत याप्रमाणें हाहा:कार माजलेला पाहून भगवान् ब्रह्मदेवानें शंकराचें लक्ष तिकडे वेधलें व तो त्यांना म्हणाला:

ब्रह्मदेव—" प्रभो, सर्व देव आपल्यालाहि यज्ञांत हविर्भाग देत जातील. तरी, हे सर्वदेवेश्वरा, आपण कृपा करून या आपल्या क्रोधाचा उपसंहार करावा. या सर्व देवता व हे सगळे ऋषि आपल्या क्रोधामुळें गांगरून गेले आहेत व यांना शांतपणा कसा तो मिळत नाहीं. हे देवश्रेष्ठा, आपल्या घर्मबिंदूंतून निर्माण झालेला हा पुरुष लोकांत ज्वर या नांवानें प्रसिद्ध होईल. याचें सर्व तेज

एकवटलें तर तें सहन करण्याचें सामर्थ्य सगळ्या पृथ्वीलाहि नाहीं. तेव्हां आपण या ज्वराचे अनेक भाग करावे."

ब्रह्मदेवानें अशी विनंति केलेली ऐकून व यज्ञांत देवांनीं आपल्याला हविर्भाव कबूल केलेला पाहून त्या पिनाकपाणी भगवंताला अतिशय आनंद झाला व त्यानें ब्रह्मदेवाला 'तथास्तु' म्हणून सांगितलें. त्यावेळेपासून ब्रह्मदेवानें सांगितल्याप्रमाणें शंकरांना यज्ञांतील हविर्भाग मिळूं लागला. सर्व प्राणिमात्रांना शांति मिळाली म्हणून त्या सर्वधर्मज्ञ देवेश्वरानें ज्वराची अनेक ठिकाणीं वांटणी केली. ती कशी केली, तें मीं तुला आतां सांगतों ऐक. हत्तींच्या ठिकाणीं मस्तकदाहाच्या रूपानें, पर्वतांच्या ठिकाणीं शिलाजतु नांवाच्या धातूच्या रूपानें, पाण्यांत शेवाळाच्या रूपानें, सर्पांत कातीच्या रूपानें, जनावरांच्यामध्यें खुरक्या नांवाच्या रोगाच्या रूपानें, तर पृथ्वीच्या ठिकाणीं कोरडवाहू जमिनीच्या रूपानें हा ज्वर वास्तव्य करीत असतो. पशूंना दृष्टिमांद्य येणें हें ज्वराचें लक्षण होय.

मोराची शिखा गळून पडणें, कोकिळेस नेत्ररोग होणें, मेंढरांचे ठिकाणीं पित्तप्रकोप होणें हीं सर्व ज्वराचींच रूपें आहेत. पोपटांना उचकी लागणें हें ज्वराचें लक्षण; हे धर्मज्ञा, वाघ श्रांत होणें हें ज्वराचेंच रूप होय. मनुष्यांच्या ठिकाणीं मात्र हा ज्वर ज्वर या नांवानेंच रहातो. मनुष्याच्या जन्मकाळीं, मृत्युकाळीं किंवा मध्यंतरीं केव्हांहि हें दारुण असें ज्वररूपी शांकर तेज त्याला पछाडतें. या सर्वश्रेष्ठ ईश्वराला सर्व प्राण्यांनीं पूज्य मानून त्याला वंदन केलें पाहिजे. धार्मिकश्रेष्ठ वृत्रासुराच्या अंगांत याच ज्वरानें प्रवेश केला होता, आणि म्हणूनच तो जांभया देत असतांना इंद्रानें आपलें वज्र त्याच्याकडे फेंकिलें. इंद्राच्या वज्रानें वृत्रासुराच्या देहांत शिरून त्याचें विदारण केल्यामुळें तो महायोगी वृत्रासुर अत्यंत तेजस्वी अशा परमोच्च विष्णुपदाला पोहोंचला. वृत्रासुराच्या अंगीं सर्व जगाला व्यापून टाकण्याचें जें सामर्थ्य आलें होतें तें तरी विष्णुभक्तीमुळेंच होय आणि म्हणूनच युद्धांत मारला गेल्यानंतर त्याला विष्णुलोकाची प्राप्ति झाली. हे युधिष्ठिरा, याप्रमाणें वृत्राच्या शरीराचा आश्रय करून राहिलेल्या या ज्वररूपी तेजाची उत्पत्ति व त्याचा विस्तार यांची माहिती मीं तुला सांगितली. आतां आणखी दुसरें काय ऐकण्याची तुझी इच्छा आहे तें सांग. ज्वराच्या उत्पत्तीचा व विस्ताराचा हा इतिहास जो कोणीं शांतचित्तानें आणि दुबळेपणा सोसून वाचील किंवा ऐकेल, तो सर्व रोगांपासून मुक्त होऊन

त्याला आनंदाचा लाभ होईल व त्यानें जे जे मनोरथ मनांत धरिलेले असतील ते ते सर्व पूर्ण होतील. १२. ३. २८३.

---

## अध्याय २८४ वा.

[ १ दक्षकृत सहस्रनामस्तव ]

( १ ) **जनमेजय**—हे ब्रह्मन्, वैवस्वत मन्वंतरांत प्राचेतस दक्षप्रजापतीनें केलेल्या अश्वमेध यज्ञाचा नाश कसा झाला? उमादेवीला राग आलासें पाहून भगवान् सर्वांतर्यामी शंकर क्रुद्ध कसे झाले व पुढें दक्षानें त्यांना शांत करून त्यांच्याच प्रसादानें आपला यज्ञ परिपूर्ण कसा केला ही सर्व हकीकत ऐकण्याची माझी इच्छा आहे. तेव्हां, ही हकीकत जसजशी घडली असेल तसतशी ती आपण मला सांगा.

**वैशंपायन**—पूर्वीं हिमालयाच्या पायथ्याशीं, ऋषि व सिद्धलोक रहात असलेल्या गंगाद्वार नांवाच्या अत्यंत पवित्र अशा प्रदेशांत दक्षप्रजापतीनें अश्वमेध केला. तें स्थान गंधर्व व अप्सरा यांनीं गजबजलेलें असून त्या ठिकाणीं अनेक वेली व झाडें होतीं. पृथ्वीवर, अंतरिक्षांत व स्वर्गलोकांत रहाणारे सर्वजण त्या ऋषिगणांनीं परिवेष्टित असलेल्या धार्मिकश्रेष्ठ दक्षप्रजापतीच्या भोंवतीं जमा झाले होते. देव, दानव, गंधर्व, पिशाच, नागलोकीचे नाग, राक्षस, हाहा हूहू विश्वावसु विश्वसेन हे गंधर्व, अप्सरा, नारद तुम्बर इत्यादि ऋषि हे सर्व त्या दक्षप्रजापतीपुढें हात जोडून उभे होते. बारा आदित्य, अष्ट वसु, एकादश रुद्र, मरुद्गण, साध्य इत्यादि यज्ञांत भाग घेणारे सर्व देव इंद्रासह त्या यज्ञाचे ठिकाणीं उपस्थित झाले होते. पंचाग्निसाधन करणारे, सोमपान करणारे, धूम्रपान करणारे व तूप पिऊन रहाणारे सर्व ऋषि व पितृगण त्या ठिकाणीं ब्रह्मदेवासह आलेले होते. जरायुज, स्वेदज, अंडज व उद्भिज या चतुर्विध सृष्टीपैकीं पुष्कळ प्राणी त्या ठिकाणीं हजर होते. समंत्रक आवाहन केलेले सर्व देव आपापल्या पत्न्यांसहवर्तमान विमानांतून दैदीप्यमान अग्नीप्रमाणें तळपतांना दिसत होते. त्यांना पाहून दधीचि नांवाच्या एका ऋषीला राग आला व तो म्हणालाः “ ज्या यज्ञांत शंकरांना हविर्भाग नाहीं तो यज्ञ नव्हे किंवा धर्महि नव्हे. काळ विपरीत आल्यामुळें हे सगळे लोक आपण होऊन मृत्यूच्या दाढेंत शिरत आहेत असें वाटतें. या प्रचंड यज्ञामध्यें अतिशय भयंकर असें विघ्न उपस्थित झालेलें आहे हें यांना अज्ञानामुळें दिसत

नाहीं" असें बोलून त्या योगनिष्ठ दधीचि ऋषीनें समाधि लाविली व अंतर्दृष्टीनें पहातां महादेव श्रीशंकर व सर्व जगाचें कल्याण करणारी वरदात्री पार्वती अशीं दोघेंहि त्या ठिकाणीं उपस्थित असलेलीं त्याला दिसलीं. त्या दोघांच्या जवळ नारद ऋषीहि पण होते. हा प्रकार पाहून दधीचीला अत्यंत आनंद झाला. या सर्वांनीं संगनमत करून भगवान् शंकरांना या ठिकाणीं आमंत्रण दिलें नसावें असा मनाशीं सिद्धांत बांधून दधीचि त्या ठिकाणाहून निघून जाऊन तो त्या सर्व मंडळींना उद्देशून म्हणालाः "पूजार्हांची पूजा न केल्यानें व अपूज्य माणसांची पूजा केल्यानें मनुष्याचे अंगीं पुरुषावधाइतकें भयंकर पातक कायमचें चिकटतें. मीं यापूर्वीं कधीं खोटें बोललों नाहीं व यापुढं बोलणारहि नाहीं. देवता व ऋषिगण यांच्यामध्यें उभा राहून मीं सर्वांना सत्य तेंच सांगत आहें. सर्व जगताचा पति, आपल्या सामर्थ्यानें जगाची उत्पत्ति करणारा, पशुपति प्रभु महेश्वर हा आला पहा. यज्ञांत हविर्भाग घेण्याचा पहिला मान याचाच आहे."

दक्ष—माथ्यावर जटा धारण केलेले, हातांत शूल घेतलेले हे पुष्कळ रुद्र येथें असून ते या अकरा स्थानावर बसलेले आहेत. महेश्वर, महेश्वर म्हणून तुम्हीं ज्याला म्हणतां तो मीं ओळखीत नाहीं."

दधीचि—तुमचें सर्वांचें या बाबतींत एकमत झालेलें असल्यानें तुम्हीं भगवान् शंकरांना आमंत्रण दिलें नाहीं. माझ्या मताप्रमाणें शंकराहून श्रेष्ठ दैवत या जगतांत नाहीं आणि म्हणून शंकरांना ज्या ठिकाणीं आमंत्रण नाहीं असा हा प्रचंड यज्ञ–दक्षयज्ञ–तडीस जाणार नाहीं.

दक्ष—या सुवर्णपात्रांमध्यें यज्ञपति जो भगवान् विष्णु त्याचेसाठीं सर्व प्रकारचा हविर्भाग विधिपूर्वक मंत्रून ठेविला आहे. हा भाग सर्वश्रेष्ठ विष्णूला मीं अर्पण करतों. कारण, कोणत्याहि यज्ञांत त्याचेंच आवाहन करणें योग्य होय.

देवी—या जगांत असें कोणतें दान, कोणता नियम व कोणती तपश्चर्या आहे कीं त्याचें आचरण मीं यावेळीं करूं ? अतर्क्य सामर्थ्य अंगीं असणारा माझा पति भगवान् शंकर याला आज या यज्ञांतला अर्धा किंवा निदान तिसरा भाग तरी कोणत्या दानाच्या, नियमाच्या किंवा तपश्चर्येच्या आचरणानें मिळेल ?

अशा प्रकारें ती पार्वती देवी रागारागानें बोलत असतांना भगवान् शंकर आनंदांतच होते. ते तिला म्हणाले, " हे कृशोदरि देवि, तूं मला पूर्णपणें ओळ-

खलें नाहींस असें दिसतें; सर्व यज्ञांचा अधिपति मीं, मला यज्ञांत हविर्भाग कसा मिळेल अशी चिंता करून तूं हें काय बोलतेस? जे मूर्ख लोक माझें ध्यान करीत नाहींत त्यांना माझ्या पूर्ण स्वरूपाची ओळख पटत नाहीं हें मीं जाणतों. हे विशालनेत्रे, इंद्रादि सर्व देव व सर्व त्रैलोक्य यांना तुझ्या मायेचा मोह पडावा; ती तूंच आज भ्रांत झाल्यासारखी दिसत आहेस. यज्ञांत स्तुतिपर सूक्तें म्हणणारे ऋषि माझेंच स्तवन करितात. सामगायन करणारे ऋत्विज मलाच उद्देशून रथंतर नांवाचें साम म्हणतात. ब्रह्मस्वरूपाची ओळख ज्यांना पटलेली आहे असे ब्राह्मण माझेंच भजन करतात. मला उद्देशून यज्ञ करतात. अध्वर्यु हे यज्ञांत माझ्यासाठीं हविर्भाग ठेवतात.

**देवी**—अतिशय प्राकृत मनुष्य सुद्धां बायकांच्या समाजांत आपली आपण स्तुति करतो व स्वतःविषयीं गर्व वहातो यांत संशय नाहीं.

**भगवान्**—मीं उगीचच स्वतःची स्तुति करीत आहें, असें समजूं नकोस. मीं आतां या यज्ञाच्या विध्वंसनासाठीं जो पुरुष निर्माण करणार आहें त्याचा पराक्रम तर पहा.

आपल्या प्राणांपेक्षांहि प्रिय अशा पत्नीला याप्रमाणें सांगून भगवान् शंकरांनीं आपल्या मुखांतून एक अत्यंत घोर व ज्याला पाहिलें असतां अंगावर रोमांच उभे रहावे असा पुरुष निर्माण केला; व त्याला दक्षाच्या यज्ञावर हल्ला कर अशी आज्ञा केली. नंतर परमेश्वराच्या तोंडापासून निर्माण झालेल्या त्या सिंहपराक्रमी पुरुषानें सहज लीलेनें, पार्वतीचा राग शांत व्हावा म्हणून दक्षयज्ञाचें विध्वंसन केलें. रागानें बेभान झाल्यामुळें भयंकर दिसणारी उमादेवी महाकालीच्या रूपानें—शंकरांची अनुमति घेऊन व त्यांना नमस्कार करून—त्या पुरुषाबरोबर आपल्या कृतीचा काय परिणाम होतो हें पाहण्यासाठीं निघाली. भगवान् शंकरांच्या मुखांतून पुरुषरूपानें प्रकट झालेला तो त्यांचा क्रोध हा भगवंतासारखाच पराक्रमी, बल व रूप यांनीं संपन्न व दिसण्यांतहि त्यांच्या सारखाच होता. याचा पराक्रम व सामर्थ्य हीं अमर्याद असून तो उमादेवीचा राग शांत करण्यासाठीं अवतीर्ण झालेला होता. त्याचें नांव वीरभद्र असें होतें. या वीरभद्रानें आपल्या रोमरंध्रांतून रौम्य नांवाचे दुसरे अनेक गण निर्माण केले. हे गणहि पण रुद्रासारखेच असून दिसण्यांत भयंकर होते व यांचा पराक्रम आणि शरीरसामर्थ्य हींहि अद्भुतच होतीं. नंतर अकराळ विकराळ देहांचे व भीषण स्वरूपाचे ते शेंकडों—हजारों—गण दक्षयज्ञाचा विध्वंस करण्यासाठीं सर्व बाजूंनीं मोठ्या

झपाट्यानें तुटून पडले. त्यांचा किलकिल असा जो शब्द सुरू झाला त्यानें सर्व आकाश दुमदुमून गेलें व त्या महाभयंकर शब्दामुळें तेथें जमलेल्या देवांनाहि भीति पडली. त्या भीषण प्रकारानें पर्वत कोसळूं लागले, पृथ्वी थरथरां कांपूं लागली, झंझावाताचे लोटच्या लोट उठूं लागले, समुद्र खवळला, अग्नीचें तेज मंद झालें, प्रत्यक्ष सूर्याचाहि प्रकाश लोपला. ग्रह, नक्षत्रें व चंद्र हीं सर्व निस्तेज झालीं. ऋषि, देव व मनुष्यें यांपैकीं कोणीं कोणाला दिसेना. असा सर्वत्र अंधकार माजला व त्या अंधकारांत, अपमान झाल्यामुळें रागावलेले ते शंकराचे गण आपला पराक्रम गाजवूं लागले. कांहीं लोकांना जाळीत सुटले, कांहींनीं शस्त्रप्रहार करण्यास सुरवात केली, कांहींनीं यज्ञभूमींतील पशुबंधांचे स्तंभ उपटून टाकले तर दुसरे कित्येक लाथाबुक्यांनीं शत्रूंचें मर्दन करूं लागले. ते शंकरांचे गण इकडून तिकडे व तिकडून इकडे असे मनोवेगानें व वायुवेगानें धांवत सुटले. त्यांनीं यज्ञपात्रांचा नाश करून टाकला. त्या ठिकाणीं विध्वंस होऊन पडलेलीं दिव्य भूषणें आकाशांतून तुटून पडलेल्या तारकांसारखीं दिसत होतीं. खाण्यापिण्याच्या पदार्थांच्या पर्वतप्राय राशीच्या राशी तेथें पडलेल्या दिसत होत्या. तेथें दुधाच्या तर जणूं नद्याच वहात होत्या. या नद्यांतून तूप व निरनिराळीं दुधाचीं पक्कान्नें चिखलांसारखीं दिसत होतीं. ताक हेंच या नद्यांतील पाणी होतें. व साखरेचे ढीग हीच त्यांतील वाळू होती. या नद्यांतून षड्रसांनीं युक्त अशीं दिव्य अन्नें वाहत होतीं. त्यांत मद्याचे पाट सोडलेले होते. चावून खाण्यासारखीं, चाटण्यासारखीं, चोखून खाण्यासारखीं व पिण्यासारखीं पातळ अशीं अनेक प्रकारचीं मांसयुक्त पक्कान्नें त्या ठिकाणीं होतीं. यांपैकीं कांहीं पदार्थ हे गण खाऊन टाकीत, कांहीं फेंकून देत. अशा तऱ्हेनें त्यांनीं दक्षयज्ञाचा विध्वंस मांडला. क्रुद्ध झालेल्या शंकरांचा पाठिंबा असल्यामुळें ते धिप्पाड शरीराचे शंकरगण प्रलयकालच्या अग्नीप्रमाणें शोभून दिसत होते व त्यांनीं देवांच्या सैन्याची दाणादाण करून त्यांना भेदरून सोडलें. नानाप्रकारचीं रूपें घेऊन ते शंकरगण इकडे तिकडे क्रीडा करूं लागले. त्यांच्यापैकीं कांहींनीं देवस्त्रियांना उचलून टाकून देण्यास सुरवात केली. अशा प्रकारें त्या वीरभद्रानें व त्याच्या गणांनीं, सर्व देवांनीं मोठ्या प्रयत्नानें त्यावेळपर्यंत सुरक्षित ठेवलेल्या त्या दक्षयज्ञाचा नानाप्रकारांनीं आपल्या पराक्रमानें व शंकरांच्या क्रोधाच्या पाठबळानें सर्व बाजूंनीं सत्वर नाश करून टाकला. सर्व प्राणिमात्रांनीं भेदरून जावें इतक्या भयंकर तऱ्हेनें ओरडत ओरडत त्यानें त्या यज्ञपुरुषाचा शिरच्छेद

केला व मोठ्या आनंदानें पुनः एकवार गर्जना केली. तेव्हां ब्रह्मादिक सगळे देव व दक्षप्रजापति हे त्याच्या पुढें हात जोडून उभे राहिले व त्याला "आपण कोण तें सांगा" असें विचारूं लागले.

वीरभद्र—दक्षा, मीं रुद्र नव्हे, व देवीहि नव्हे. तुझ्या यज्ञकर्मांत मला भाग मिळावा व त्याचा भोग मीं घ्यावा या लालसेनेंहि मीं येथें आलेला नाहीं. उमादेवीला क्रुद्ध झालेली पाहून भगवान् शंकरांना अत्यंत राग आला. त्या रागापासून निर्माण झालेला वीरभद्र नांवाचा मीं त्यांचा गण आहें. मीं या ठिकाणीं तुझा यज्ञ पहाण्यास किंवा येथें जमलेल्या या ब्राह्मणश्रेष्ठांचें दर्शन घेण्यासहि आलेला नाहीं. मला तुझ्या यज्ञाचा नाश करावयाचा आहे. उमादेवीच्या कोपापासून निर्माण झालेली ही भद्रकाली व शंकरांच्या कोपापासून उत्पन्न झालेला मीं वीरभद्र या आम्हां दोघांना भगवान् शंकरांनीं तुझ्या यज्ञाचा नाश करण्यास पाठविलें आहे. तेव्हां हे विप्रश्रेष्ठा, त्या देवदेवेश्वर उमापति शंकराला शरण जा. शंकराचा क्रोधहि आपल्याला पथ्यकरच होय. कारण, श्रीशंकर प्रसन्न झाले तर त्यांच्यासारखें वरदानहि दुसरा कोणीं देणारा नाहीं, हें लक्षांत ठेव."

वीरभद्राचें हें भाषण ऐकून तो धार्मिकश्रेष्ठ दक्षप्रजापति सर्व त्रैलोक्याचा नाथ, असा शाश्वत, ध्रुव, अव्यय महात्मा भगवान् शंकर त्याला शरण गेला. शंकरांच्या चरणावर मस्तक ठेऊन त्यानें त्यांची स्तुति आरंभिली व त्यांचा संतोष केला.

दक्षप्रजापतीच्या त्या यज्ञांत नानाप्रकारचीं द्रव्यें गोळा केलीं होतीं. सर्व देवता, ऋषि व अनेक तपस्वी पुरुष यांना त्या यज्ञांत आमंत्रण होतें. परंतु, विश्वकर्मा महेश्वर शंकर याला मात्र दक्षानें आमंत्रण न दिल्यामुळें उमादेवी अत्यंत क्रुद्ध झाली व तिनें यज्ञ विध्वंस करण्यासाठीं अनेक गण पाठविले. त्या गणांनीं दक्षाचा यज्ञमंडप पेटविला व तेथें जमलेल्या ब्राह्मणांना पळवून लावलें. त्या गणांनीं त्या ठिकाणीं जो अग्नि प्रदीप्त केला त्याच्या ज्वाळा गगनाला भेदून जाऊं लागल्या. हे गण तेथें असलेल्या लोकांच्या छात्यांतून शूळ भोंसकीत व विचित्र आवाज काढून ओरडत. यज्ञभूमीवरील पशुबंधाचे स्तंभ या गणांनीं खणून उपटून टाकले होते व इतस्ततः ते फेंकून दिले होते. मांस खाण्याला धाधावलेलीं गिधाडें त्या ठिकाणीं पंख फडफडवीत इकडे तिकडे उड्या मारीत

होतीं व घिरट्या घालीत होतीं. यज्ञभूमीचें तें ठिकाण अशुभदर्शक अशा शेंकडों कोल्ह्यांच्या नादानें दुमदुमून गेलें होतें. यक्ष व गंधर्व यांचे थवे तेथें जमलेले असून पिशाच, नाग व राक्षस हेहि तेथें होते.

अशा प्रकारानें त्या यज्ञाचा विध्वंस चालू असतांना आपल्या योगसामर्थ्यानें प्राणापानांचा निरोध करून शत्रुमर्दन देवदेवेश भगवान् विश्वचक्षु शंकर चोहोंकडे दृष्टि फेंकीत फेंकीत त्या यज्ञकुंडांतून एकदम प्रकट झाले त्यावेळेस सहस्र सूर्यांचें तेज त्यांच्या ठिकाणीं प्रकट झालें होतें व ते प्रलयकालाच्या संवर्तक मेघाप्रमाणें दिसत होते. भगवंतांनीं प्रकट झाल्याबरोबर दक्षाला, 'तुझ्याकरितां काय करूं तें सांग' असा हंसत हंसतच प्रश्न केला. नंतर बृहस्पतींनीं दक्षाला वेदामधील मखाध्याय ऐकविला. दक्षप्रजापति भयानें गांगरून ग्रासून गेला होता. त्याच्या डोळयांत पाणी आलें होतें व तोंडहि घामानें डबडबलें होतें. मखाध्याय ऐकल्यावर दक्ष हात जोडून शंकरांना म्हणाला "आपण जर मजवर प्रसन्न झालां असाल व जर आपला मजवर लोभ असेल, जर मीं अनुग्रहाला पात्र असेन व जर आपण मला वरदान देणार असाल तर या यज्ञांत ज्या ज्या वस्तु जाळल्या गेल्या असतील, खाऊन टाकल्या असतील, किंवा ज्यांचा नाश झालेला असेल, ज्यांचें चूर्ण करून टाकलेलें असेल किंवा ज्या इतस्ततः फेंकून दिलेल्या असतील त्या सत्कारणीं लागाव्या, त्यांचा योग्य विनियोग झालासा व्हावा एवढा वर हे भगवन्, आपण मला द्यावा. हा यज्ञसंभार फार दिवसांपासून मोठ्या प्रयत्नांनीं गोळा करून ठेविलेला आहे. तेव्हां, भगनेत्रहर, धर्माध्यक्ष, विरूपाक्ष, त्र्यंबकेश्वर अशा प्रजानाथ भगवान् शंकरांनीं त्या दक्षाला 'तथास्तु' म्हणून सांगितलें. नंतर, शंकरांकडून वरप्राप्ति झालेल्या त्या दक्षप्रजापतीनें जमिनीवर गुडघे टेंकून एक हजार आठ नांवांनीं वृषभध्वज महादेवाची स्तुति केली.

युधिष्ठिरः—दक्षप्रजापतीनें ज्या नामांनीं प्रजापति शंकरांची स्तुति केली तीं नांवें ऐकण्याची मला इच्छा झाली आहे. तरी हे पितामहा, तीं नांवें आपण मला सांगा.

भीष्मः—युधिष्ठिरा, अद्भुत कर्में करणाऱ्या त्या गूढव्रत देवदेवाचीं सर्व प्रसिद्ध आणि अप्रसिद्ध अशीं नांवें मीं तुला सांगतों तीं ऐक.

हे देवदेवेशा, तुला नमस्कार असो. तूं देवांच्या शत्रूंचें सामर्थ्य नष्ट करणारा, देवेंद्राचें सामर्थ्य वाढविणारा, देव व दानव यांच्याकडून पूजिला जाणारा,

सहस्राक्ष, विरूपाक्ष, त्र्यंबकेश्वर व कुबेराला नेहमीं प्रिय असणारा असा आहेस. तुला सर्व बाजूंनीं हात, पाय, डोळे, मस्तकें व मुखें आहेत. तुला सर्व बाजूंनीं श्रोत्रेंद्रियेंहि पण आहेत. तूं या जगाला व्यापून राहिलेला आहेस. शंकुकर्ण, महाकर्ण, कुंभकर्ण, अर्णवालय, गजेंद्रकर्ण, गोकर्ण व पाणिकर्ण हीं तुझींच रूपें होत. या गणांच्या रूपानें तूंच प्रकट झाला आहेस. तुला शेंकडों उदरें, शेंकडों नाभिस्थानें व शेंकडों जिव्हा आहेत. अशा विश्वरूप ईश्वराला माझा नमस्कार असो. तिन्हीवेळां गायत्रीचा जप करणारे लोक तुझेंच ध्यान करितात. सूर्योपासना करणारे तुझीच उपासना करितात. ब्रह्मदेव तूंच व देवेंद्रहि तूंच आहेस. सर्व लोक तुला आकाशाप्रमाणें निर्लेप, असंग मानतात. हे समुद्राप्रमाणें व आकाशा-प्रमाणें अमर्याद स्वरूपाच्या परमेश्वरा, महामूर्ते, तुझ्या या निर्मर्याद मूर्तीच्या ठिकाणीं सर्व देवता—गाईबैलांनीं गोठ्यांत वास करावा त्याप्रमाणें—वास करितात. भगवंता, तुझ्या शरीरांत मला, सोम, अग्नि, वरुण, सूर्य, विष्णु, ब्रह्मदेव व बृहस्पति या सर्वांचें वास्तव्य आहेसें दिसतें. भगवंता, या विश्वरूप कार्याचें कारण तूंच आहेस व हें विश्वरूप कार्यहि पण तूंच. या विश्वाचें उपादानकारण तूंच. तूं आपल्या स्वतःमधून स्वतःलाच उत्पन्न करतोस.

या जडाजड विश्वाचें उत्पत्तिस्थान तूंच असून या विश्वाचा लयहि पण तुझ्याच ठिकाणीं होतो. सर्व विश्वाचा उत्पत्तिकर्ता भव तूं; तसाच त्याचा संहारकर्ता शर्वहि तूंच. लोकांचें सर्व पाप हरण करणारा रुद्र तूं; त्यांना वर देणारा वरद तूं; ब्रह्मदेवापासून तों पृथ्वीवरील सर्व स्थावरजंगम भूतांपर्यंत सगळ्या जीवांचा अधिपति तूंच. अंधकासुराचा नाश तूंच केलास. त्या तुला नमस्कार असो. तूं त्रिजट आहेस, त्रिशीर्ष आहेस, हातांमध्यें सर्वश्रेष्ठ असा त्रिशूळ धारण करून तुझे व्यवहार चालतात. श्रवण, मनन व निदिध्यासन हे तुझे तीन नेत्र म्हणून तुला त्र्यंबक, त्रिनेत्र म्हणतात. हे महादेवा, त्रिपुरासुराचा नाश आप-णच केलात. तूं सर्वांचा संहारकर्ता म्हणूनच चण्ड; सर्वांचा आधार म्हणून कुण्ड आहेस. हें सर्व ब्रह्मांड तूंच व त्याला धारण करणाराहि तूंच. दण्डी तूं; समकर्ण तूं; दण्डिमुण्ड म्हणजे संन्यासी तूं; ऊर्ध्वदंष्ट्र तूं; ऊर्ध्वकेश तूं; शुद्धहि तूंच. जगताच्या रूपानें तूं आपल्याच आत्मरूपाचा विस्तार केला आहेस. तूं रजो-गुणाचा आश्रय करतोस म्हणून तुला विलोहित म्हणतात. तमोगुणाचा आश्रय केलास म्हणजे तूं धूम्रवण होतोस. जगद्रक्षणासाठीं हालाहल विष आपण कंठांत धारण केलें म्हणून आपण सत्वरूप नीलग्रीव आहांत. आपल्याला आपल्या

तोडीचा प्रतिस्पर्धी कोणीं नाहीं म्हणून आपण अप्रतिरूप; नानाप्रकारचीं रूपें धारण करितां म्हणून विरूप; जगाचें आपण कल्याण करितां म्हणून आपल्याला शिव म्हणतात. सूर्य आपण; सूर्यबिंबांत प्रकाशमान होणारें ईश्वरतेज आपण. आपल्या ध्वजा व पताका या सूर्याप्रमाणें तेजस्वी आहेत. अशा आपणांला नमस्कार असो. हे भगवंता, प्रमथनाथ तूं; वृषस्कंध तूं; धन्वी तूं; शत्रूंचा नाशकर्ता तूं; दण्ड तूं; वल्कलें व पानें यांचीं वस्त्रें धारण करणारा तूं; हिरण्यगर्भ तूं; हिरण्यकवच तूं; हिरण्यपति तूंच. तुझ्या जटा या सुवर्णाच्या वर्णाच्या आहेत. तूं स्तुत आहेस; स्तुत्यहि आहेस; व स्तूयमानहि आहेस; देवा, सर्व तूं; सर्वभक्षक तूं; सर्व भूतांतरात्मा तूं; यज्ञकर्मांतील होता तूं; मंत्र तूं; तुझ्या ध्वजा व पताका या शुभ्रवर्णाच्या असतात. नाभिस्थानाच्या ठिकाणीं सर्व जग धारण करणारा नाभ तूं; नाभ्य तूं. विश्वाच्या आवरणालाहि तूं आवरण घालतोस म्हणून तुला कटकट–कटांचा कट–असें म्हणतात. तूं कृशनास आहेस, कृशांग आहेस, कृश आहेस, संहृष्ट आहेस, विहृष्ट आहेस, किलकिल असा जो शब्दविशेष तें तुझेंच रूप होय. झोंपेला येणें, प्रत्यक्ष झोंप घेणें, जागें असणें, बसणें व धांवणें या ज्या क्रिया मनुष्य करतो तीं सर्व तुझींच रूपें आहेत. तूं मुंड आहेस तसाच जटिलहि आहेस. नर्तन हें तुझें शील होय. तोंडानें वाजविण्याचीं वाद्यें जीं आहेत, तीं वाजविण्यांत तूं कुशल आहेस. कमलांच्या फुलांनीं बांधलेली पूजा, गायन व वादन हीं तुला आवडतात. तूं ज्येष्ठ आहेस, श्रेष्ठ आहेस. इंद्राचाहि पराजय करणारा तूंच. तूं कालाचा नियंता, तूं सर्वसमर्थ. अशा तुला वारंवार नमस्कार असो. महाप्रलय, अवांतर प्रलय इत्यादि तुझ्याच कर्तृत्वाचीं फलें होत. तुझें हास्य एकाद्या भयंकर दुंदुभीच्या आवाजाप्रमाणें आहे. तूं महा भयंकर स्वरूपाचीं व्रतें आचरण करणारा आहेस. तूं उग्र आहेस. तुला दहा हात असून तुझ्या हातांत भिक्षाकपाल असतें. तुला नेहमीं चिताभस्म आवडतें. तुझी लोकांना भीति वाटावी असा तूं भयंकर आहेस व विभीषण–निर्भयहि आहेस. तूं विकृतवक्त्र आहेस. तुझी जिव्हा तरवारीसारखी तीक्ष्ण आहे. तुझ्या दंष्ट्रा भयंकर स्वरूपाच्या आहेत. यज्ञांतील अग्नींत पक्कें भाजलेलें व स्मशानांतील अर्धें कच्चें भाजलेलें असें दोन्हीं प्रकारचें मांस तुला आवडतें. भोंपळ्याची केलेली एकतारी तुला फार प्रिय आहे. वृष्टि करणारा वृष तूं; धर्मवृद्धि करणारा वृष्य तूं; नंदी हें तुझेंच रूप; धर्माच्या रूपानें प्रकट होणारा तूंच; तूं नित्य गमनशील असून दण्ड हेंहि तुझेंच रूप

होय. या दण्डानें तूं सर्वांचें नियंत्रण करितोस. सर्व भूतांचा पाककर्ता–संहारकर्ता–तूं आहेस. तूं सर्वश्रेष्ठ आहेस; वर हें तुझेंच स्वरूप, व तो वर देणाराहि तूंच. उत्तम वस्त्रें, फुलें व सुवासिक द्रव्यें तूं धारण करतोस. मागितलें तेवढेंच द्यावयाचें हा वर व मागितल्याहून अधिक देणें हा अतिवर होय. भगवंता, तूं वरदहि आहेस व अतिवरदहि आहेस. तूं रक्त आहेस तसाच विरक्तहि आहेस. हे भावना, हे अक्षमालाधरा, हे संभिन्ना, हे विभिन्ना, हे छायारूपा, हे आतपस्वरूपा, हे अघोररूपा, हे घोररूपा, हे घोरघोर तररूपा, हे शिवा, हे शांतरूपा, हे शांततमा, हे एकपादा, हे बहुनेत्रा, हे एकशीर्षा, हे रुद्रा, हे मधुप्रिया, तुला नमस्कार असो. यज्ञांतील हविर्भागाचा अंश तुला प्रिय असतो. हे पंचाला, हे सितांगा, तूं नेहमींचा शमस्वरूप आहेस. शत्रूंना भीति वाटेल अशी भयंकर घंटा तुजजवळ आहे. तूं घण्टानादरूप आहेस. तुझ्या घंटेचा नाद कारण नसतांहि होतो. वस्तुतः एकच असतांना हजारों पुरुषांनीं जरी वाजविण्याचा प्रयत्न केला तरी तुझ्या योगसामर्थ्यानें तितकीं रूपें धारण करणारी अशी तुझी घंटा आहे. घंटांची माळ गळ्यांत घालणें तुला आवडतें. तुझ्या सामर्थ्यानें पांच प्राणवायु हेच घंटारूप धारण करून शब्द करितात. गंध हें तुझेंच रूप, कलकल असा जो शब्दविशेष तेंहि हे शंकरा, तुझेंच रूप होय. क्रोधरूप हुंकार, नामरूपात्मक प्रपंचाचा निदर्शक असा हुंकार, व कारणरूप शबल ब्रह्माचा वाचक असा हुंकार या तीन्ही हुंकारांच्या पलीकडे शांत तुरीयावस्थेंत तूं असतोस. क्रोधरूप हुंकाराशिवाय बाकीचे हुंकारद्वय तुला प्रिय आहेत. तूं नित्य शमरूप आहेस. पर्वत व झाडें हीं तुझीं निवासस्थानें होत. पशूंच्या हृदयांतील मांसाच्या, जिभांच्या, छातींतील मांसाच्या ज्या आहुति यज्ञांत पडतात त्यांच्यावर तूं कोल्ह्याप्रमाणें तुटून पडतोस, हें मांस तुला अत्यंत प्रिय आहे. तूं यज्ञभोक्ता असल्यानें सर्वांचें पाप हरण करणारा तूं; सर्वांचा उद्धार करणारा तूं; यज्ञ तूं; यजमान तूं; हुत तूं; प्रहुत तूंच. ऋत्विजांचा यज्ञ तडीला नेणारा यज्ञवाह तूं; दान्त तूं; तप्य तूं; आतपस्वरूप तूं; तट तूं; तट्य तूं; तटपति तूं; अन्नद तूं; अन्नपति तूं; अन्नभोक्ताहि तूंच. तुला अनेक मस्तकें आहेत. तुला शेंकडों चरण आहेत. तूं बालसूर्याप्रमाणें देदीप्यमान असून बालरूप धारण करणारा आहेस. तुझे जे बाल अनुचर आहेत त्यांचें तूं रक्षण करतोस. बालकांच्यामध्यें तूं क्रीडा करीत असतोस. तूं वृद्ध आहेस, लुब्ध आहेस, क्षुब्ध आहेस, क्षोभन आहेस. मस्तकावरील गंगेच्या पाण्यानें तुझे केंस नित्य भिजले जातात. तुला सर्व

मुंजकेश असें म्हणतात. गृहस्थांनीं करावयाच्या षट्कर्मांनीं तूं संतुष्ट होतोस; यज्ञ, अध्ययन व दान हीं तिन्हीं कर्मं तुला आवडतात. वर्णधर्मांचीं व आश्रमधर्मांचीं कर्में त्या त्या विधीप्रमाणें मनुष्यांच्याकडून पृथक् पृथक् करवून घेणारा कर्ता-करविता तूंच. घुष्य तूं, घोष तूं, कलकलहि तूंच. तुझे डोळे कांहींसे पांढरे, कांहींसे पिंगट, कांहींसे लाल तर कांहींसे काळे आहेत. तूं प्राणायामपर आहेस, तूं दण्डरूप आहेस, स्फोटन आहेस, कृश आहेस. धर्म, अर्थ, काम व मोक्ष या चारी पुरुषार्थांबद्दलच्या कथा तुला आवडतात. सांख्यशास्त्राचा उत्पादक कपिलमहामुनि हा तुझाच अवतार होय. सेश्वर सांख्यवादी पतंजलि हाहि त्वद्रूपच होय. वेदांतशास्त्र व ध्यानयोग यांचा प्रवर्तक तूंच आहेस. हे रथ्या, हे विरथ्या, जल, अग्नि, वायु व आकाश या चारी मार्गांनीं तुला अप्रतिहत रीतीनें गमन करतां येतें. तूं कृष्णाजिनाचें उत्तरीय वस्त्र धारण करतोस. सर्प हेंच तुझें यज्ञोपवीत होय. हे ईशाना, हे वज्रसंघाता, हे हरिकेशा, हे त्र्यंबका, हे अंबिकानाथा, हे व्यक्ता, हे अव्यक्ता, हे कामरूपा, हे कामदा, हे कामघ्ना, हे तृप्ता, हे अतृप्ता, हे सर्वा, हे सर्वदा, हे सर्वघ्ना, हे संध्यारागरूपा, तुला नमस्कार असो. भीषण-स्वरूप मेघांच्या संघाताप्रमाणें तुझें रूप आहे. हे महाकाला, हे स्थूला, हे जीर्णांगा, हे जटिला, हे कृष्णाजिनधारिन्, हे वल्कलधारिन्, तुझ्या जटा दैदीप्यमान सूर्य व अग्नि यांच्या ज्वालांप्रमाणें दिसतात. वल्कलें व कृष्णाजिनें हीं तुझीं वस्त्रें आहेत. हजारों सूर्यांच्या तेजासारखें तुझें अप्रतिम तेज आहे. तुझी नित्यतपस्व्याची वृत्ति आहे. हे उन्मादना, शेंकडों भोंवरें असलेल्या गंगेच्या पाण्यानें तुझे केश नित्य आर्द्र होतात. ह चंद्रावर्ता, हे युगावर्ता, हे मेघावर्ता तुला नमस्कार असो. अन्न तूं; अन्न खाणारा तूं; भोक्ता तूं; अन्नद तूं; अन्नभुक् तूं; अन्नस्रष्टा तूं; अन्न-पाचन करणारा तूं; शिजविलेल्या अन्नाचा भोक्ता तूं; पवन तूं; अनलहि तूंच. जरायुज, अण्डज, स्वेदज व उद्भिज ही जी चतुर्विध भूतसृष्टि होहि तुझींच रूपें आहेत. स्थावर-जंगम भूतांचा प्रलय व उत्पत्ति हीं तुझ्यामुळेंच होतात. हे ब्रह्मवित्श्रेष्ठा, ब्रह्मवेत्ते पुरुष तुलाच ब्रह्म म्हणतात. मनाचें परम कारण तूंच आहेस. आकाश व वायु हीं त्वद्रूपच असून तूं तेजाचा निधि आहेस. संहितापठण करणारे पुरुष ऋचा, साम व ओंकार हीं तुझींच रूपें आहेत असें मानतात. सामगायन करणारे ब्रह्मवादी पुरुष हायिहायि, हुवा-हायि, हावुहायि अशा चतुरक्षरी स्तोभांनीं, हे सुरश्रेष्ठा, तुझीच स्तुति करीत असतात. तूं ऋङ्मय आहेस, यजुर्मय आहेस, आहुतिमय आहेस. वेद व

उपनिषदें हीं सर्व तुझेंच गायन करतात व तुझीच स्तुति करीत असतात. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र व यांच्याहिपेक्षां खालचे वर्ण जे आहेत हे सर्व त्वद्रूप आहेत. नानाप्रकारचे मेघसमूह, विजेची गर्जना, मेघाची गर्जना, हींहि तुझींच रूपें होत. संवत्सर तूं; ऋतु तूं; मास तूं; पक्ष तूं; युग तूं; निमेष तूं; काष्ठा तूं; नक्षत्रें तूं; ग्रह तूं; कला तूंच. वृक्षांमधील अत्यंत श्रेष्ठ वृक्ष तूं; गिरिपर्वतांचीं उत्तुंग शिखरें हीं तुझींच रूपें आहेत. पशूंच्यामध्यें व्याघ्र तूं; आकाशमार्गानें जाणाऱ्या पक्ष्यांत गरुड तूं; सर्पांमधला अनंत तूंच. सप्तसमुद्रांतील क्षीरसमुद्र तूं; यंत्रांमधील धनुष्य तूं; फेकून मारण्याच्या शस्त्रांमधील सर्वश्रेष्ठ जें वज्र तें तूं; सर्व व्रतांत श्रेष्ठ असें सत्याचरणाचें व्रतहि तूंच. तूं द्वेष; तूं इच्छा; तूं राग; तूं मोह; तूं क्षमा; तूं अक्षमा; तूं स्थैर्य; तूं धैर्य; लोभहि तूंच; कामहि तूंच; क्रोध तूं; जय तूं; पराजय तूं; हातांत गदा घेऊन युद्ध करणारा तूं; बाणांनीं व धनुष्यानें युद्ध करणारा तूं; खट्वांग धारण करणारा तूं; झर्झरी धारण करणारा तूं. तूं छेत्ता; तूं भेत्ता; तूं प्रहर्ता; तूं नेता; विचारांना चालना देणारा तूंच. तूं या सर्व जगाला पित्याच्या ठिकाणीं आहेस. अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य, अपरिग्रह, शौच, संतोष, तप, स्वाध्याय ईश्वरप्रणिधान या दश लक्षणांनीं युक्त असलेला धर्म तूं; अर्थ तूं; काम तूंच. गंगा, समुद्र, इतर नद्या, डबकीं, तळीं, लता, वेली, तृणौषधि, पशु व पक्षी हीं सर्व तुझींच रूपें आहेत. सर्व द्रव्यांचा व कर्मांचा आरंभ तूंच आहेस. फळें व फुलें यांची समृद्धि करणारा काल हें तुझेंच रूप आहे. देवांचा आदि व अंत तूं आहेस. गायत्री व ओंकार हीं तुझींच रूपें आहेत. हिरवा, तांबडा, निळा, काळा, अत्यंत लाल, शेंदरी, पिंगट, करडा, पारवा व मोराच्या गळ्याखालील रंगासारखा मेचक असे दशविध रंगहि तूंच आहेस. तुला वर्ण आहे म्हणावा तर नाहीं, नाहीं म्हणावा तर अत्युत्कृष्ट वर्ण आहे. तूं वर्णांची उत्पत्ति करणारा आहेस. तूं मेघासारखा आहेस. तुझें नांवच सुवर्ण असून सुवर्ण हें तुला फार प्रियहि आहे. इंद्र तूंच; यम तूंच; वरुण तूंच; कुबेर तूंच; अग्नि तूंच; सूर्यचंद्रांना लागणारीं ग्रहणें तूंच; चित्रभानु तूंच; राहू हें तुझेंच रूप; सूर्य हें तुझेंच रूप. ज्यांत हवन केलें जातें असा अग्नि तूंच आहेस. हवन करणारा होता, यज्ञिय मेध्य द्रव्यें, अग्नींत टाकलेल्या आहुति व त्यांचा स्वीकार करणारा प्रभु हे सर्व तूंच आहेस. त्रिसुपर्णांत केलेलें ब्रह्मरूप व यजुर्वेदाचें शतरुद्रिय हींहि तूंच आहेस. तुझें स्वरूप पवित्रांतील पवित्र व मंगलांतील मंगल होय. दगडाप्रमाणें अचेतन असणाऱ्या देहांतून तूं शब्द करवितोस म्हणून

तुला गिरिक अशी संज्ञा आहे. प्राण्यांच्या शरीरांची हालचाल तुझ्या सामर्थ्यामुळें होते म्हणून तुला हिंडुक म्हणतात. वृक्ष हें तुझेंच रूप आहे. जीव हाहि तूंच आहेस. नानारोगांनीं व्याप्त झाल्यामुळें रक्त आणि पू ज्यांतून गळतो असा नाशिवंत देहपुद्गल हाहि तूंच आहेस. प्राण तूं; सत्व तूं; रज तूं; तम तूं; विरक्तांतील विरक्त तूं. प्राण, अपान, व्यान, उदान व समान हे पंच वायूहि पण तूंच आहेस. डोळयांच्या पापण्यांची उघडझांप तूंच; शिंक तूंच; जांभई तूंच. तुझ्या आरक्त-नेत्रांची नजर अंतर्मुख असते. तूं महावक्त्र, महोदर, हरिश्मश्रु असा आहेस. तुझे केश सुईच्या अग्राप्रमाणें असून ते ऊर्ध्व आहेत. तूं अत्यंत चलस्वरूपाचा आहेस. गीतवादनादिकांचें तत्त्व तुला पूर्ण अवगत असून या कलांची तुला अत्यंत आवड आहे. तूं मत्स्य आहेस, जलचर आहेस. संसारनदीच्या जलामध्यें मत्स्यासारखा तूं जीवरूप घेऊन फिरतोस म्हणून वासनाजाल तुला बद्ध करितें आणि म्हणूनच तुला जाल्य म्हणतात. वस्तुतः तुझें आकलन होणें शक्य नाहीं म्हणून तूं अकल आहेस. तूं स्वतः आपणच आपल्याला स्वतःच्या लीलेनें बद्ध करून घेतोस म्हणून तुला केलिकल म्हणतात. कलि हें तुझें स्वरूप होय. अकाल तूंच; अतिकाल तूंच; दुष्काळ तूंच व कालहि तूंच. मृत्यु तूंच; क्षुर तूंच; छेद्य तूंच; मित्र तूंच व शत्रूंचा नाश करणारा परंतप तूंच. तूं मेघकाल आहेस, महा-दंष्ट्र आहेस. प्रलयकालचे मेघ हीं तुझींच रूपें आहेत. तूं प्रकाशमान् आहेस तसाच मायोपाधीनें वेष्टित असल्यामुळें अप्रकाशहि आहेस. प्राणिमात्राला कृत-कर्मांचीं फळें तुझ्यामुळें प्राप्त होतात म्हणून तूं घटी, घंटा तुजजवळ असतात म्हणून तुला घंटी म्हणतात. चरु म्हणजे जे प्राणि त्यांच्या सोंगट्या करून तूं खेळतोस म्हणून तुला चरुचेली म्हणतात. कारणरूपानें सर्व प्राणिमात्रांच्या—वस्तुजाताच्या—ठिकाणीं अनुस्यूत असल्यामुळें तुला मिलिमिली अशी संज्ञा आहे. प्रणवस्वरूप ब्रह्म तूंच. अग्नीमधून उत्पन्न होणारें स्वाहा, स्वधा इत्यादि वन्हिपत्न्यांचें रूप तूंच आहेत. दण्डी तूंच; मुंडी तूंच; त्रिदंडधारी तूंच. कृतादि चारी युगें, ऋग्वेदादि चारी वेद, हीं तुझींच रूपें आहेत. चतुर्विध अग्निहोत्राचा प्रवर्तक तूं आहेस. ब्रह्मचर्य, गार्हस्थ्य इत्यादि चारी आश्रमांचीं कर्में तुझ्या सामर्थ्यानें चालतात. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र हे चारी वर्ण तुझ्यापासूनच झालेले आहेत. तुला नेहमीं द्यूत आवडतें. तूं धूर्त आहेस; गणाध्यक्ष आहेस; गणाधिप आहेस. तूं नेहमीं तांबडीं फुलें व तांबडीं वस्त्रें धारण करतोस. तूं गिरीश आहेस. पर्वतांच्या गुहांतून निघणारा आवाज तुला आवडतो. तूं

शिल्पिक आहेस, शिल्पिश्रेष्ठ आहेस, सर्व शिल्पकलेचा प्रवर्तक आहेस. तूं भगाच्या नेत्रांचा नाश करणारा अंकुश आहेस. तूं महाभयंकर आहेस. पूषन् नांवाच्या ऋषीचे दांत पाडणारा आहेस. स्वाहाकार तूंच; स्वधाकार तूंच; वषट्कार तूंच; नमस्कार तूंच. त्या तुला वारंवार नमस्कार असो. तूं गूढव्रत आहेस; तुझी तपश्चर्या अगाध आहे; तूं प्रणवरूप आहेस; अनेक नक्षत्रांनीं युक्त असें आकाश तूंच. आदिकर्ता विष्णु तूंच; सृष्टिकर्ता ब्रह्मदेव तूंच; सर्व विश्वाला एकवट करून स्थिररूप करणारा संधाता तूंच; त्याचा संहार करणारा संहर्ता तूंच. प्रजांचें अदृष्ट कर्म तूंच; सर्वांचा आधार म्हणून धारण तूंच; ज्याला कोणाचा आधार नाहीं असा अधर शुद्धात्मा तूंच आहेस. ब्रह्मवेत्ता तूंच; ब्रह्मविद्या प्राप्त करून देणारें तपादि साधनचतुष्टय तूंच आहेस. सत्य तूं; ब्रह्मचर्य तूं; आर्जव तूं; भूतात्मा तूं; प्राणिमात्रांना उत्पन्न करणारा तूं; तुझें स्वरूप नित्य आहे. भूत, वर्तमान व भविष्य या तीन्हींचा उत्पत्तिकर्ता तूं आहेस. भूः तूं; भुवर्लोक तूं; स्वर्लोक तूं; आकाशादि दृश्यजाताच्या पलीकडे असलेलें ध्रुवरूप तूं; जितेंद्रिय तूं; महेश्वर तूं; दीक्षित तूं; अदीक्षित तूं; शांत तूं; दुर्दान्त तूं; उन्मत्तांचा नाशहि पण तुझ्याच हातून होतो. चंद्रावर्त म्हणजे महिना तूं; युगावर्त म्हणजे प्रलयकाल तूं; संवर्त तूं; जगाच्या पुनरुत्पत्तिकर्ता तूंच. मनुष्याच्या ठिकाणचा स्त्रीविषयक अभिलाष तूं; रेतोबिंदू तूंच; अणु तूंच व स्थूलहि तूंच. कर्णिकार नांवाच्या फुलांच्या माला तुला आवडतात. तूं नंदीमुख आहेस, भीममुख आहेस, सुमुख आहेस, दुर्मुख आहेस व अमुखहि आहेस. तूं चतुर्मुख आहेस, बहुमुख आहेस, रणभूमीवर अग्नीसारखें भयंकर मुख तूंच धारण करतोस. हिरण्यगर्भ तूंच; शकुनी तूंच; सर्वांचा अधिपति तूंच; विराट्स्वरूप तूंच. तूं अधर्मांचा नाश करतोस. तूं महापार्श्व आहेस; चण्डधार आहेस; गणाधीश आहेस. तूं बैलासारखा आवाज काढतोस, गाईबैलांचें रक्षण तूं करतोस, बैलांच्या मध्यें श्रेष्ठ असलेला नंदी हें तुझें वाहन आहे. तूं त्रैलोक्याचें रक्षण करणारा आहेस; गोविंद आहेस; इंद्रियचालक असून इंद्रियातीतहि आहेस. तूं श्रेष्ठ; तूं स्थिर; तूं स्थाणू, निष्कंप तूंच; कंपहि तूंच. तुझ्या मनांत ज्याचा नाश करावयाचा असेल त्याला तो नाश टाळतां येणें शक्य नाहीं म्हणून तूं दुर्निवार आहेस. ज्याच्यावर अनुग्रह करशील त्याच्या संबंधांत दुर्निवार्य अशा विषाचाहि तूं नाश करितोस. म्हणून तुला दुर्विषह म्हणतात. दुःसह तूं; दुरतिक्रम तूं; दुर्धर्ष तूं; दुष्प्रकंप तूं; दुर्विष तूं; दुर्जय तूं; जयहि तूंच. शश तूं; चंद्रमा तूं; यमधर्म तूंच. थंडी,

उष्ण, भूक, जरा, रोग इत्यादिक तुझ्यापासूनच उत्पन्न होतात. शारीरिक व मानसिक व्याधि हीं तुझींच रूपें आहेत. नानाप्रकारच्या आधिव्याधि हीं जशीं तुझीं रूपें तसाच त्यांचा संहारकर्ताहि तूंच आहेस. माझ्या यज्ञानें ज्यावेळेस मृगाचें रूप धारण केलें त्यावेळेस त्याचा वध करण्यासाठीं व्याधरूपानें तूंच धांवलास. व्याधि ह्या तुझ्यामुळेंच उत्पन्न होतात व नष्टहि होतात. तूं शिखंडी आहेस, तुझे डोळे कमलाप्रमाणें असून कमलांचें वन हेंच तुझें निवासस्थान आहे. तूं दंड धारण करणारा आहेस; त्र्यंबक तूं; उग्रदण्ड तूंच; ब्रह्मांडाचा नाश करणाराहि तूंच. विषरूप अग्नीपासून जगाचें रक्षण करणारा तूं; सुरश्रेष्ठ तूं; सोमपान करणारा तूं; मरुद्गणांचा नायक तूं; हे जगन्नाथा, देवदेवा, अमृतपान करणारा तूं; गणाध्यक्ष तूं; विषरूप अग्नीचा नाश करणारा तूं; मृत्युहंता तूं; क्षीर प्राशन करणारा तूं व सोमपान करणाराहि तूंच. स्वर्गांतून खालीं पडणाऱ्या दिव्य जलाचें प्रथम पान तूंच करतोस. देवश्रेष्ठ ब्रह्मदेवाचेंहि रक्षण करणारा तूं आहेस. तूं अग्नि; जगामधील स्त्रीपुंनपुंसक भेद जो आहे तो सर्व तूं; बाल तूं; तरुण तूं; वृद्ध तूं; जीर्णदंष्ट्र तूं; हे नागेंद्रा, इंद्र तूं; विश्वकर्ता तूं; विश्वहर्ता तूं; प्रजांची उत्पत्ति करणारे जे प्रजापति त्यांच्यांतील श्रेष्ठतम तूं; विश्वाचा आधार तूंच. तुझें तेजस्वी स्वरूप सभोंवार सर्वत्र पसरलेलें आहे, तूं विश्वतोमुख आहेस. सूर्य व चंद्र हे तुझे डोळे आहेत. ब्रह्मदेव हें तुझें हृदय होय. तूं एक महोदधिच आहेस. सरस्वती हें तुझें वाग्बल होय. अग्नि तूंच; वायु तूंच; अहोरात्र तूंच; डोळ्यांच्या पापण्यांची उघडझांप करणारा तूंच. हे शंकरा, तुझें माहात्म्य यथातथ्य रीतीनें जाणणें हें ब्रह्मदेवाच्या काय, गोविंदाच्या काय, किंवा जुन्या मोठमोठ्या ऋषींच्या काय, सर्वांच्याच आवांक्याबाहेरचें आहे. तुझ्या अनेक अत्यंत सुसूक्ष्म अशा मूर्ति आहेत त्यांचें दर्शन मला पामराला होणें शक्य नाहीं. बाप ज्याप्रमाणें आपल्या औरस पुत्राचें रक्षण करतो तसेंच हे भगवंता, तूं माझें रक्षण कर. हे अनघा, मीं रक्षणीय आहें, त्याज्य नाहीं, म्हणून माझें रक्षण कर; तुला नमस्कार असो. हे भगवंता, तूं भक्तांच्यावर कृपा करणारा आहेस; व मीं तुझा भक्त आहें. शेंकडों हजारों लोकांच्या दृष्टीवर मायेचें आवरण घालून त्यांच्या दृष्टीआड समुद्रापलीकडे असणारा असा जो परमेश्वर तो माझें नित्य रक्षण करो. ज्यांनीं निद्रा जिंकली; जे प्राणायामपर आहेत, जे सत्वगुणसंपन्न आहेत, व ज्यांनीं इंद्रियजय केला आहे अशांच्याच दृष्टीला, भगवंता, तुझें तेजःस्वरूप दिसतें. तुला योगात्म्याला नमस्कार असो.

जटिलाप्रमाणें आचरण करणाऱ्या, नित्य दण्ड धारण करणाऱ्या, लंबोदर स्वरूप अशा, कमंडलु हाच ज्याचा बाणांचा भाता अशा ब्रह्मरूप भगवंताला माझा नमस्कार असो. ज्याच्या केशांत मेघ, सर्व गात्रसंधींच्या ठिकाणीं नद्या, व चारी बाजूला चार समुद्र आहेत अशा जलस्वरूप परमेश्वराला नमस्कार असो. प्रलय-काल जवळ आला असतांना सर्व भूतांचा उपसंहार आपले ठिकाणीं करून जो पाण्यांत शयन करून रहातो त्या जलशायी भगवंताला माझा नमस्कार असो. रात्रौ राहूच्या तोंडांत शिरून जो सोमपान करतो व स्वर्भानु होऊन जो सूर्याचा ग्रास करतो तो परमेश्वर माझें रक्षण करो. ब्रह्मदेवाचे उत्पत्तीनंतर जे देव अत्यंत सूक्ष्मरूपानें तुझ्या शरीरांतून बाहेर पडले व ज्यांना यज्ञामध्यें यथाभाग आहुति मिळतात त्या सर्वांना—देवांना व पितरांना—माझा नमस्कार असो. स्वाहाकार व स्वधाकार इत्यादिकांमुळें देवांचे भाग देवांना व पितरांचे पितरांना मिळून त्यांचा संतोष होवो. सर्व प्राणिमात्रांचे ठिकाणीं अंगुष्ठरूप जे पुरुष आहेत ते सर्व तुझींच रूपें आहेत. ते सर्वदा माझें रक्षण करून मला सुखप्राप्ति करून देवोत. जे प्राणिमात्रांच्या शरीरांत प्रवेश करून स्वतः न रडतां त्यांना रडवितात किंवा स्वतः न हसतां त्यांना हंसवितात त्या रुद्रगणांना माझा सर्वदा नमस्कार असो. नद्यांच्या ठिकाणीं; समुद्रांच्या ठिकाणीं; पर्वतांमधून; गुहांमधून; वृक्षांच्या मुळांखालीं; गोठ्यांत; वनांत; दाट झाडीमध्यें; चव्हाट्यावर; रस्त्यांत; अंगणांत; तटांमधून; हस्तिशाला, अश्वशाला, रथशाला इत्यादिकांत; जीर्णोद्यानांत; मोडक्या पडक्या घरांत; पंचमहाभूतांच्या ठिकाणीं; सर्व दिशा व उपदिशा यांच्यामध्यें; सूय व चंद्र यांच्या बिम्बांत; त्यांच्या किरणजालांत; रसातलाच्या ठिकाणीं व त्याच्याहि पलीकडे जीं जीं शंकरांचीं रूपें आढळतील, त्यांना सर्वांना माझा नमस्कार असो, त्रिवार प्रणाम असो. ज्यांची संख्या अजमावतां येत नाहीं, ज्यांचा आकार व रूप यांची कल्पना येत नाहीं व ज्यांचे गुण असंख्येय आहेत त्या सर्वांना माझा नित्य नमस्कार असो. तूं सर्व भूतांचा उत्पत्तिकर्ता; तूं त्यांचा संहारकर्ता; तूं सर्व भूतांच्या अंतरंगांत त्यांना व्यापून रहातोस म्हणून, हे भगवंता; तुला निराळें निमंत्रण दिलें नाहीं. विविधप्रकारच्या दक्षिणांनीं युक्त अशा यज्ञांमध्यें तुझेंच यजन केलें जातें; व तूंच सर्व गोष्टींचा हर्ताकर्ता आहेस; म्हणून तुला निराळें निमंत्रण दिलें नाहीं. किंवा कदाचित् असेंहि असेल कीं तुझ्या अत्यंत सूक्ष्म अशा मायेनें मीं त्यावेळीं मोहित झालों असेन. या कारणानेंहि मीं तुला निराळें निमंत्रण दिलें नसेल. कसेंहि असो; आतां मजवर,

देवा, दया करा. मीं त्यावेळीं रजव्याप्त झालों असल्यामुळें सत्वग्राह्य शंकराचें स्वरूप मला पूर्णत्वानें आकलन करतां आलें नाहीं. पण, आतां, माझें हृदय, मन व बुद्धि हीं सव त्वद्रूपच होऊन तुझ्या ठिकाणीं स्थित झालीं आहेत."

अशा प्रकारें शंकराचा स्तव करून तो दक्षप्रजापति विराम पावला; व भगवान् शंकरहि संतुष्ट होऊन त्या दक्षाला म्हणतातः "हे सुव्रता, दक्षा, मीं तुझ्या या स्तवानें संतुष्ट झालों आहें. तुला मीं फार कांहीं सांगत नाहीं; पण, तूं नेहमीं माझ्या समीप असशील एवढेंच म्हणतों. सहस्र अश्वमेध यज्ञ व शंभर वाजपेय यज्ञ केल्याचें फल, हे प्रजापते, माझ्या आशीर्वादानें तुला मिळेल." असें सांगून लोकाधिपति भगवान् शंकर त्या दक्षाला पुढें म्हणतातः "हे दक्षा तुझ्या यज्ञाला झालेल्या विघ्नाबद्दल तूं रागाऊं नकोस. कारण, तुझ्या यज्ञाला कल्पाकल्पाचे ठिकाणीं मींच विघ्न करावयाचें हा पूर्वसंकल्प तुला माहीतच आहे. शिवाय, मीं तुला आणखी वर देतों. तो कोणता तें सावधान चित्तानें व प्रसन्न अंतःकरणानें ऐक." असें म्हणून त्या शास्त्रज्ञ शंकरांनीं दक्षाला उद्देशून शास्त्रसंमत असें आश्वासनपर भाषण केलें.

शंकर—'वेदसंहिता, वेदांचीं शिक्षाकल्पादि षडंगें, सांख्ययोगादि दर्शनें इत्यादि सर्वांचें मंथन करून त्या निर्देशानुसार देवदानवांनीं विपुल अशा तऱ्हेचें दुष्कर तपाचरण केलें; परंतु, मीं जें व्रत आतां तुला सांगणार आहें हें व्रत त्या तपश्चर्येच्या व्रताहूनहि श्रेष्ठ आहे. हें व्रत अपूर्व, अव्यय, सर्व बाजूंनीं कल्याण करणारें, सर्वव्यापि असें आहे. या व्रताची सिद्धि होणें हें कार्य महादुर्घट असून तें दीर्घ कालानें होणारें आहे. यमनियमादिकांचें आचरण जे करितात त्यांनांच याची सिद्धि होते. हें व्रत मोठें गहन असून अजाण लोकच याची निंदा करतात. ब्रह्मचर्यादि चारी आश्रमांत त्रैवर्णिकांनीं जीं कर्म करावीं म्हणून सांगितलीं त्यांच्याशीं हें व्रत कांहीं गोष्टींत जमणारें आहे व कांहींत विरुद्ध आहे. शास्त्रज्ञ लोकांना याचें परिपूर्ण व निश्चित ज्ञान असून हें व्रत चारी आश्रमांच्या आचारधर्मांच्या पलीकडचें आहे. हे दक्षा, हें पाशुपत नांवाचें व्रत मीं फार पूर्वीं उत्पन्न केलेलें असून या व्रताचें आचरण केल्यानें त्याचें योग्य तें फल व्रतकर्त्याला फार मोठ्या प्रमाणांत मिळतें. हे महाभागा, या व्रताचरणाचें फल तुला अनायासानेंच प्राप्त होइल. हा माझा तुला वर आहे. आतां, मनाचा सगळा संताप झाडून टाक."

असें बोलून तो महापराक्रमी देवाधिदेव श्रीशंकर पार्वती व आपले गण यांच्यासहवर्तमान अदृश्य झाला.

दक्षानें केलेला हा शंकरस्तवराज जो कोणीं वाचील किंवा ऐकेल त्याला कोणतेंहि संकट येणार नाहीं, त्याला अशुभ प्राप्ति होणार नाहीं, व तो दीर्घायु होईल. ज्याप्रमाणें सर्व देवांमध्यें भगवान् शंकर श्रेष्ठ त्याप्रमाणें वेदाला संमत असलेला हा स्तवराज सर्व स्तोत्रांत श्रेष्ठ होय. यश, राज्य, सुख, ऐश्वर्य, नाना प्रकारच्या इच्छांची सिद्धि, नाना अर्थ व द्रव्य यांची इच्छा धरणारांनीं व आपल्याला ज्ञान प्राप्त व्हावें अशी इच्छा असणारांनीं या स्तवराजाचें भक्तियुक्त अंतःकरणानें प्रयत्नपुरःसर श्रवण करावें. जो कोणींहि व्याधीनें पीडिलेला असेल, अगर दुसऱ्या कोणत्याहि कारणांनीं दीन झालेला असेल, ज्याला चोरांनीं गांजलें असेल, जो कोणी भवव्याप्त झालेला असेल, किंवा ज्याला कोणाला राजकाजाचें संकट पडलें असेल, त्यानें त्यानें हा स्तवराज पठण करावा म्हणजे तो महद्भयापासून मुक्त होईल. हा स्तवराज पठण करणाराला तेज व यश यांची प्राप्ति होऊन तो याच देहांत परमेश्वराच्या गणांत समाविष्ट होईल. ज्यांच्या घरांत या स्तवराजाचें पठन चालत असेल तेथें राक्षस, पिशाच, भूत किंवा विनायक यांपैकीं कोणींहि विघ्न उत्पन्न करणार नाहीं. परमेश्वरावर भाव ठेवून व व्रतस्थ राहून जी कोणीं स्त्री हा स्तवराज ऐकेल ती पित्याच्या बाजूनें व आईच्याहि बाजूनें देवाप्रमाणें पूज्य ठरेल. जो कोणी हा सगळा स्तवराज ऐकेल किंवा एकाग्रचित्तानें पठण करील त्याचीं सर्व कार्यें सिद्धीला जातील. जो जो कोणी जें जें मनांत आणील किंवा तोंडानें बोलेल तें तें सर्व या स्तवराजाच्या पठनानें सिद्धीस जाईल. महादेव शंकराची, कार्तिकेयाची, पार्वतीची व नंदिकेश्वराची यथाविधि पूजा करून शांतवृत्तीनें यमनियमांचें पालन करून, मग यथाक्रम या स्तवराजांतील नामांचा उच्चार करावा. अशा रीतीनें, या स्तवराजाचें पठण केलें असतांना मनुष्याला त्याचे ईप्सित अर्थ, भोग व काम हे प्राप्त होतात. या स्तवराजाचें पठन करणाराला मृत्यूनंतर स्वर्गलोकाची प्राप्ति होते; व हलक्या तिर्यग्योनींत त्याला जन्म घ्यावा लागत नाहीं असें भगवान् वेदव्यास पराशरसुत प्रभु स्वतः सांगतात. १२. ३. २८४.

## अध्याय २८५ वा.

[ १ सांख्यकथन. २ पंचमहाभूतांमधून सृष्ट्युत्पत्ति ]

( १ ) **युधिष्ठिर**—हे पितामहा, पुरुषमात्राच्या ठिकाणीं असणाऱ्या अंतर्यामी आत्म्याचें स्वरूप व दृश्यादृश्य वस्तुजाताचा विवेक सांगणारें अध्यात्मशास्त्र या दोन्हींचेंहि स्वरूप मला उलगडून सांगा. या अध्यात्म्यशास्त्राची उत्पत्ति कोठून तेंहि मला सांगा.

**भीष्म**—हे युधिष्ठिरा, ज्याच्या संबंधानें तूं मला आतां बुद्धिपूर्वक प्रश्न विचारीत आहेस तें सर्व ज्ञानांत परमश्रेष्ठ अशा प्रकारचें ज्ञान होय. या ज्ञानाबद्दलचें विवेचन मीं तुला आतां सांगतों, तें ऐक.

पृथिवी, वायु, आकाश, आप व पांचवें तेज या पंचमहाभूतांपासून सर्व भूतजाताचा उद्भव होतो व त्याचा लयहि याच पंचमहाभूतांत होतो. हे भरतर्षभा, शरीर, शरीर म्हणून जें म्हणतात तो या पंचमहाभूतांच्या गुणांचा संघातच होय. हे गुण गुणांतूनच निर्माण होतात व त्यांतच लयहि पावतात. यांच्यापासून निर्माण झालेले प्राणिमात्र, समुद्राच्या पृष्ठभागावर जशा लाटा उठाव्या व त्या जशा त्याच ठिकाणीं आपटल्या जाव्या त्या प्रमाणें गुणांतून उत्पन्न होऊन त्यांच्यांतच पुनः पुनः विलीन होतात. कांसव ज्याप्रमाणें आपले अवयव बाहेर पसरतें व पुनः अंगाखालीं ओढून घेतें त्याप्रमाणें पंचमहाभूतांतून लहान लहान प्राणी उत्पन्न होतात व पुनः त्यांच्यांतच लीन होतात. शरीरामधील शब्द हा आकाशापासून, काठिण्य हें पृथ्वीपासून, प्राण हा वायूपासून, शरीरांतील द्रव पदार्थ पाण्यापासून व शरीराच्या ठिकाणचें रूप हें तेजापासून उत्पन्न होतें. अशाप्रकारें ही सर्व स्थावरजंगम सृष्टि पंचमहाभूतात्मकच आहे. प्रलयकाळीं ही सर्व सृष्टि यांच्यांत विलीन होते व सृष्टिकाळीं यांच्यांतूनच वर येते. सृष्टिकर्त्या ईश्वरानें पंचमहाभूतांपैकीं ज्या ज्या भूतांत जो जो गुण आहे त्या त्या गुणाच्या अनुरोधानें सर्व प्राणिमात्रांच्या ठिकाणीं त्या त्या विषयाची योजना केली आहे. शब्द, कर्णेंद्रिय व देहाच्या ठिकाणचीं इतर रंध्रें हीं आकाशापासून उद्भूत झालेलीं; द्रव, आर्द्रता व जिव्हा हे आपाचे गुण; दृश्यस्वरूप, नेत्रेंद्रिय व पचन हीं तेजाचीं कार्यें; सुवासिक पदार्थ, नाक व शरीर हीं भूमीचीं कार्यें तर प्राण, स्पर्श व सर्वप्रकारची हालचाल हीं वायूचीं कार्यें आहेत. हे राजन्, अशाप्रकारें पंचमहाभूतांचे ते ते गुण मीं तुला विवरण करून

सांगितले. सत्व, रज व तम हे त्रिगुण, काल, कर्मबुद्धि व मन या सहांची योजनाहि सृष्टिकर्त्या ईश्वरानें या महाभूतांचे ठिकाणीं केलेली आहे. पादादि-मूर्धांत किंवा मूर्धादिपादांत या शरीरामध्यें जें जें म्हणून दृष्टीस पडतें तें तें सर्व या एकवीस तत्त्वांच्या रूपानें नटलेल्या बुद्धीचेंच रूप होय. पंचमहाभूतांचे प्रत्येकीं तीन याप्रमाणें पंधरा गुण, व त्रिगुणादि सहा तत्त्वें मिळून हीं एकवीस तत्त्वें होतात. हींच बुद्धीचीं रूपें आहेत. मनुष्याच्या शरीरांत पंचमहाभूतापासून निर्माण झालेलीं पंच इंद्रियें, सहावें मन व सातवी बुद्धि हीं असतात. क्षेत्रज्ञ आत्मा म्हणून ज्याला म्हणतात तो मात्र या सातांच्या पलीकडचा आहे. निरनिराळीं इंद्रियें व त्यांच्या त्यांच्या व्यापारांचें कर्तृत्व याचें विस्तरपूर्वक ज्ञान त्या त्या इंद्रियांच्या कार्यांवरून करून घ्यावयाचें आहे. सत्व, रज व तम या त्रिगुणांचे जे सात्विकादि भाव आहेत ते सर्व या इंद्रियांच्या मधूनच उत्पन्न होतात. नेत्रेंद्रिय हें फक्त पहाण्याचें काम करतें; पाहिलेली वस्तु या स्वरूपाची कीं त्या स्वरूपाची असा संशय उत्पन्न करणें हें मनाचें कार्य होय तर दृष्टवस्तु अमुकच स्वरूपाची असा निश्चय करून देणें हें बुद्धीचें कार्य होय. क्षेत्रज्ञ आत्मा हा हे सव व्यापार पहाणारा फक्त साक्षी होय. तम, सत्व, रज, काल व कर्म हे पांच गुण आहेत व या पांच गुणांनींच बुद्धि ही विविध विषयांकडे आकर्षिली जाते. मनआदिकरून सहा इंद्रियें हीं बुद्धीचींच रूपें आहेत. बुद्धीच्या अभावीं गुणांना अस्तित्व कोठून ? बुद्धि ज्यानें पहाते तें नेत्रेंद्रिय, ज्यानें ऐकते तें कर्णेंद्रिय, ज्यानें वास घेते तें घ्राणेंद्रिय, ज्यानें विविध रसांची चव घेते तें रसनेंद्रिय होय. बुद्धि ज्या योगानें स्पृश्य विषयांना स्पर्श करते तें स्पर्शेंद्रिय होय. याप्रमाणें बुद्धि हीच विविध-रूपानें नटली आहे. बुद्धीचीं हीं जीं पांच प्रकारचीं अधिष्ठानें म्हणून सांगितलीं यांनांच इंद्रियें म्हणतात व हीं आळ्यांत राहिलीं नाहींत म्हणजे यांच्यामुळेंच मनुष्य बिघडतो. मनुष्याच्या ठिकाणीं असणारी ही बुद्धि तीन प्रकारची असते. हिला कधीं आनंद होतो तर कधीं दुःख होतें व केव्हां केव्हां ही बुद्धि सुखाच्या व दुःखाच्या पलीकडे सुखदुःखातीत स्थितींत असते. याप्रमाणें ही भावात्मिका बुद्धि या त्रिविध भावांमध्यें घोंटाळत असते. नदीपति जो समुद्र त्याच्या पृष्ठभागावर कितीहि लाटा उसळल्या तरी त्या जशा त्याची मर्यादा ओलांडून जात नाहींत त्याप्रमाणें ही भावात्मिका बुद्धि कितीहि भिन्न भिन्न रूपांनीं नटली तरी या तीन भावांच्या पलीकडे जाऊं शकत नाहीं. रजोगुणाचा प्रादु-

भाव झाला असतांना बुद्धि रजोगुणाच्या अनुरोधानें चालते. रोमांचादि दृश्य चिन्हांनीं प्रकट दिसणारा आनंद, प्रेम, सुख व चित्ताची प्रसन्नता हे सत्वगुणाचे धर्म असून ते मनुष्याच्या ठिकाणीं कधीं कधीं प्रादुर्भूत होतात. जळजळ, शोक, संताप, अतृप्तता व सूड घेण्याची बुद्धि हीं राजसगुणाचीं लक्षणें मनुष्यामध्यें सकारण वा अकारण उत्पन्न होतात. अज्ञान, आसक्ति, मोह, बेसावधपणा, स्तब्धता, भय, असमृद्धि, दैन्य, मोह, स्वप्न व आळस हे तमोगुणाचे धर्म होत. शरीरामध्यें किंवा मनामध्यें जे जे प्रेमयुक्त व आनंदकारक भाव उत्पन्न होतील ते ते सर्व सात्विक भाव समजावे. तसेंच जे जे भाव दुःखकारक व स्वतःला संताप उत्पन्न करणारे आहेत ते भाव उत्पन्न झाले असतां रजोगुणाची प्रवृत्ति झाली म्हणून निःसंशय समजावें. ज्यांबद्दल कोणतीहि कल्पना करतां येत नाहीं, किंवा जे काय आहेत हें समजतहि नाहीं असे मोहव्याप्त जे भाव ते तामस भाव जाणावे. हे धर्मा, याप्रकारें मीं तुला बुद्धीचे जेवढे जेवढे प्रकार आहेत तेवढे सर्व समजून सांगितले. हें सर्व समजून घेऊन मनुष्यानें ज्ञान मिळवून घ्यावें. कारण, ज्ञान, ज्ञान, म्हणजे तरी याहून निराळें तें काय?

ही बुद्धि व क्षेत्रज्ञ आत्मा हीं जरी दोन्ही सूक्ष्म असलीं तरी यांच्यांत एक मोठा फरक आहे व तो हा कीं बुद्धि ही नानाविध गुण उत्पन्न करते व क्षेत्रज्ञ आत्मा तटस्थवृत्ति धारण करतो. हीं दोन्ही याप्रमाणें जरी गुणधर्मांनीं भिन्न असलीं तरी एकमेकांशीं संलग्नच असतात. पाणी आणि त्यांतील मत्स्य यांचे प्रकृतिधर्म भिन्न असूनहि तीं जशीं परस्परांशीं संलग्न असतात तशीच सूक्ष्म बुद्धि व क्षेत्रज्ञ आत्मा यांची स्थिति होय. गुणांना आत्म्याचें ज्ञान नसतें; पण, आत्म्याला मात्र गुणांचें परिपूर्ण व सर्व बाजूंचें ज्ञान असतें. आत्मा व गुण यांच्यामधील संसर्ग हा गुणगुणीभावाचा द्योतक आहे असें जसें एखाद्या मूढ माणसानें म्हणावें त्याप्रमाणें गुणांचा परिद्रष्टा तटस्थ क्षेत्रज्ञ आत्मा हा तद्रूपच—गुणांशीं तादात्म्यवृत्तीनें असणारा—आहे असें भ्रमानें मानलें जातें. गुणांची उत्पत्ति क्षेत्रज्ञ आत्म्यापासून नाहीं असें म्हटलें तर सूक्ष्मबुद्धि हें या गुणांच्या उत्पत्तीचें कारण असेल असा एक तर्क संभवतो; पण, बुद्धि हेंहि गुणोत्पत्तीचें उपादान कारण नव्हे. सत्वरजादि गुणांची उत्पत्ति करून तद्द्वारा दुसरे गुणच उत्पत्तिकार्य करीत असतात. बुद्धीच्या प्रेरणेनें गुणच गुणांची उत्पत्ति करतात. बुद्धि ही गुणांचें उपादानकारण नसली तरी गुणांना गुणोत्पत्ति करण्यास ती प्रवृत्त करते; म्हणून तिच्यांतून नसले तरी तिच्यामुळें गुणांतून गुण उत्पन्न

होतात. अतएव, एका अर्थानें बुद्धि हें गुणांचें कारण होय. क्षेत्रज्ञ आत्म्याची वृत्ति मात्र तटस्थपणाची आहे. हा बुद्धि व क्षेत्रज्ञ आत्मा यांचा संयोग अनादि स्वरूपाचा आहे. इंद्रियें हीं स्वतः अजाणतीं व अंधळीं आहेत. पण, तीं दिव्याचें कार्य करतात. दिव्याला ज्याप्रमाणें स्वतःला कोणतीहि गोष्ट दिसत नाहीं पण त्याच्या साहाय्यानें दुसरे लोक निरनिराळ्या वस्तु पाहतात तशीच इंद्रियांची गोष्ट आहे. इंद्रियांना स्वतःला ज्ञान नसलें तरी तद्वारा बुद्धीला ज्ञान होतें. इंद्रियें हीं दिव्यासारखीं होत.

सारांश, बुद्धि, आत्मा व इंद्रियें यांचें खरें स्वरूप या प्रकारचें आहे. याचें यथातथ्य ज्ञान करून घेऊन जगांत वावरणारा मनुष्य शोक, हर्ष किंवा मत्सर यांनीं व्याप्त होत नाहीं. बुद्धीपासून गुण निर्माण होतात ही एक स्वभावसिद्ध गोष्ट आहे. कोळ्याच्या उदरांतून ज्याप्रमाणें तंतुजाल निर्माण होतें तसेंच बुद्धींतून गुणजाल निर्माण होतें. देहनाशाबरोबर गुणांचा नाश होत नाहीं तर ते अत्यंत सूक्ष्मरूप बनल्यामुळें ते आपल्याला दिसत नाहींत इतकेंच, असें कांहींचें मत आहे तर दुसरे कित्येक म्हणतात कीं ते अजीबात नष्ट होतात. बुद्धि व चिंता हीं ज्यांत प्रधान आहेत अशी चेतन आत्मा व अचेतन मन यांची अंतःकरणांत बसलेली दृढ गांठ सोडून टाकून व सर्व संशयाचा उच्छेद करून शोकरहित स्थितींत सुखानें रहावें. या संसाररूपी महानदींत पडलेलीं मनुष्यें ज्याप्रमाणें नदीच्या तळाचा ठाव लागला नाहीं म्हणजे क्लेश पावतात, तद्वत् बुद्धीशीं संयुक्त झालेल्या, बुद्धिसंसर्ग झालेल्या जीवालाहि त्यापासून क्लेश होतात. या संसाररूप नदींतील पाणी तोडून पलीकडे जाऊं शकणाऱ्या ज्ञानी, धीर व अध्यात्म जाणणाऱ्या पुरुषांना यापासून मुळींच क्लेश होत नाहींत. ज्ञान हीच त्यांची परतीराला जाण्याची नौका होय. अज्ञानी माणसाला संसारसमुद्राचें जें एवढें मोठें भय वाटतें तें तितकें ज्ञानी माणसाला वाटत नाहीं; कारण, ज्ञाननौकेच्या साधनानें तो भवसागर तरून जाऊं शकतो. अज्ञ माणसांना मिळणारी गति त्यांच्या त्यांच्या कर्मानुसार निरनिराळी असूं शकते—अज्ञ माणसांची गति एकाला एक तऱ्हेची व दुसऱ्याला दुसऱ्या तऱ्हेची अशी भिन्न असूं शकते; पण, ज्ञात्या माणसांना मिळणारी गति एकाला श्रेष्ठ तर दुसऱ्याला कनिष्ठ अशी भिन्न भिन्न असूंच शकत नाहीं; ती सर्वदा एकरूपच असते. कारण, ज्ञानी माणसानें पूर्वी केलेलें कर्म म्हणजे त्याचें संचित, व या जन्मांत तो करीत असलेलं कर्म म्हणजे त्याचें क्रियमाण हीं दोन्ही कितीहि दोषयुक्त

असलीं तरी त्यांचा त्याला झालेल्या ज्ञानामुळें एकदमच नाश होतो. ज्ञान्याची द्वैतदृष्टि मावळलेली असते त्यामुळें दुसऱ्याचें वाईट करणें किंवा त्याला दोष देणें या दोहोंपैकीं कोणतेंच अप्रिय कर्म तो करीत नाहीं; व म्हणूनच तो मुक्त असतो. १२. ३. २८५.

---

## अध्याय २८६ वा.

[ १ समंग-नारद-संवाद. ]

**युधिष्ठिर**—हे पितामहा, सर्व प्राणिमात्रांना अत्यंत कष्टद असा दुःख व महा-भयंकर मृत्यु यांचाच अतिशय त्रास वाटतो. या दोन्ही गोष्टींची बाधा आम्हांला कशानें होणार नाहीं तें सांगा.

**भीष्म**—हे भारता, या संबंधांत समंग आणि नारद यांच्यामध्यें झालेला एक संवाद जुना इतिहास म्हणून सांगत असतात, तो मीं तुला सांगतों ऐक.

**नारद**—हे समंगा, लोक मस्तक लववून नमस्कार करतात, तूं वक्षःस्थळा-नेंच प्रणाम करतोस असें दिसतें; अतएव तूं अत्यंत विनीत–नम्र–आहेस. ही सर्व भवनदी तूं आपल्या बाहुबलाच्या जोरावर तरून जातोस असें वाटतें. अत्यंत दुर्धर अशा संकटसमयींहि तूं निरपेक्ष रीतीनें वागतोस. तुझें चित्त अत्यंत प्रसन्न असून तूं शोकरहित आहेस. उद्वेगाची अत्यंत सूक्ष्मसुद्धां छटा तुझ्या ठिकाणीं दिसत नाहीं व तूं नित्यतृप्त असून एकाद्या बालाप्रमाणें आचरण करितोस हें कसें ?

**समंग**—भूत वर्तमान व भविष्य या तीन्ही काळांत झालेल्या, होत अस-लेल्या व होणाऱ्या सर्व गोष्टी व त्यांचीं यथातथ्य स्वरूपें या सर्वांचें मला ज्ञान आहे; म्हणून मी विमनस्क नाहीं व मला शोकहि होत नाहीं. या सर्वांचा उपक्रम, या सर्वांचीं फलें मला माहीत आहेत. लोकांना नानाविध फलांची प्राप्ति कशी होते याचेंहि ज्ञान मला आहे. म्हणून हे नारदा, मला शोक होत नाहीं. ज्यांच्याजवळ अध्ययनसंपत्ति नाहीं असे लोक, ज्यांच्याजवळ स्त्रीपुत्रादिक व द्रव्यादि संपत्ति नाहीं असे लोक या दोघांचाहि आयुःक्रम चालतो–अडून रहात नाहीं. बरें, ज्यांच्याजवळ पांडित्यधन आहे व द्रव्यादि अर्थांची अनुकूलता आहे असे लोकहि आपला आयुष्यक्रम कंठीत असतात व आमच्यासारखे निष्कर्मेहि पण जगतात हें तूं पहातोसच. आंधळे लोक, उन्मत्त झालेले जड लोक यांचेंहि,

हे नारदा, कोठेंहि अडून रहात नाहीं. रोगी, निरोगी, देव, सामर्थ्यवान् व दुर्बल हे सर्व आपल्या प्राकृतन कर्मांच्या जोरावरच जगतात, व इहजन्मीं निष्कर्मेच असतात. म्हणून, आमच्यासारख्या नैष्कर्म्ययुक्त माणसांना तूं मान देत जा. ज्यांचें धन हजारांनीं मोजतां येतें अशा लोकांचा आयुःक्रम चालू आहे, ज्यांचें द्रव्य शेंकड्यांच्या मापांत असून सहस्रापर्यंत पोंचलें नाहीं असेहि लोक जगतात. भाजीपाला खाण्याचा प्रसंग ज्यांच्यावर आहे असे लोकहि आपला काळ कंठीत आहेत, व कांहीं न करणारे असे आम्हींहि तुझ्यासमोर आहों. हे नारदा, ज्या ठिकाणीं आम्हांला शोकच करावयाचा नाहीं, शोकाचें मूळ जें अज्ञान त्याचाच जेथें आम्हांला निरास करावयाचा आहे, तेथें धर्म व कर्म या दोहोंचेंहि आम्हांस प्रयोजनच काय ? कारण, शोकरहित माणसाला या दोहींचेंहि शुभाशुभ सारखेंच आहे. सुख व दुःख हीं दोन्हीहि यमधर्माधीन म्हणजे अंतवंत आहेत हें जेथें आम्हांस माहीत आहे व त्यांचा उपसर्ग जेथें आम्हांस पोहोंचत नाहीं त्या ठिकाणीं त्या दोहोंचेंहि शुभाशुभ आम्हांला सारखेंच आहे. "मोहादिकांचा अभाव–प्रसाद–हेंच प्रज्ञेचें–ज्ञानाचें मूळ होय" असें शहाणे ज्या पुरुषाबद्दल म्हणतात तो प्राज्ञ पुरुष होय. मोहादि विकार हे अहंकारानें दूषित झालेल्या जीवात्म्याचे ठिकाणीं दिसतात, परमात्म्याला ते बाधूं शकत नाहींत. शोक काय किंवा मोह काय दोन्हीहि इंद्रियांचे धर्म आहेत. हे दोन्ही विकार त्यांचे ठिकाणींच संभवतात. ज्यांचीं इंद्रियें मोहव्याप्त झालेलीं आहेत त्यांना प्रज्ञालाभ–ज्ञानलाभ–होत नाहीं. 'मी श्रीमान्, मी धनवान्,' असा अज्ञानी माणसाला गर्व होणें हा मोहाचाच एक प्रकार होय. अज्ञानी मनुष्याला इहलोकहि नाहीं व परलोकहि नाहीं अशी त्याची स्थिति होते. सुखप्राप्ति काय किंवा दुःखप्राप्ति काय दोन्हीहि कायमच्या टिकणाऱ्या नाहींत. म्हणून सुखप्राप्तीचा हर्ष किंवा दुःखाचा विषाद यांपैकीं कोणाचाच संस्कार चित्तावर उमटूं देऊं नये. भवचक्राचें रहाटगाडगें सारखें चालूच आहे, त्याबद्दल माझ्या-सारख्यानें सुखदुःख मानूं नये. आपल्याला आवडणारे भोग किंवा सुख यदृच्छया प्राप्त झाले तरी त्यांच्यामागें लागून त्यांचा हव्यास धरूं नये; व दुःख प्राप्त झालें तरी त्याचीहि चिंता करीत बसूं नये. स्वतः समाधानवृत्ति ठेवणाऱ्या पुरुषानें दुसऱ्याच्या सुखाचा हेवा करूं नये; व जें सुख किंवा लाभ प्राप्त झालेला नाहीं अशा अनागताबद्दल मनोरथहि बांधीत बसूं नये. विपुल अर्थलाभ झाला तरी त्याचा विषाद मानूं नये व अर्थनाश झाला तरी त्याचा खेद मानूं नये. आपले बांधव,

द्रव्य, कुलीनता, विद्या, मंत्र किंवा शरीरबल यांपैकीं कोणीहि दुःखाचा परिहार करण्याला समर्थ नाहीं. परलोकीं शांतिलाभ जो मिळावयाचा तो शमदमादिरूप शीलानेंच प्राप्त होतो. हे राजा, ज्याचें चित्त योगयुक्त नाहीं त्याला ज्ञानप्राप्ति होत नाहीं. आत्मदमनाचा योग ज्याला साधला नाहीं, त्याला सुखप्राप्ति नाहीं. धीरवृत्ति व दुःखाची उपेक्षा यालाच सुख म्हणतात. आवडत्या गोष्टींच्या प्राप्तीमुळें हर्ष होतो, हर्षानें उन्माद येतो व उन्मादामुळें नरकांत जावें लागतें. अशी ही परंपरा असल्यानें या सर्वांचाच मी त्याग करतों. सुखदुःखादिकांचा मोह पाडणारे शोक, भय व उन्माद इत्यादि जे विकार आहेत, त्यांच्याकडे साक्षिभूत आत्म्याची तटस्थ व उदासीन वृत्ति धारण करून मी देहपातापर्यंत पहात असतों. अर्थ व काम यांचा त्याग करून, शोक व संताप टाकून देऊन व तृष्णा आणि मोह सोडून मी या पृथिवीभर हिंडत असतों. म्हणून एकाद्या अमृत प्यालेल्या मनुष्याला ज्याप्रमाणें भय नसतें, तद्वत् मला इहलोकीं काय किंवा परलोकीं काय, मृत्यूपासून, अधर्मापासून किंवा लोभापासून, कोणापासूनच भय नाहीं. हे ब्रह्मन् , फार मोठी व अक्षय अशी तपश्चर्या करून हें ज्ञान मीं मिळविलें आहे. म्हणून जरी मला एकादे वेळेस शोक झाला तरी त्याची बाधा मला होत नाहीं. १२. ३. २८६.

---

## अध्याय २८७ वा.

[ अशास्त्रज्ञांच्या कल्याणाचा मार्ग. ]

१. **युधिष्ठिरः** हे पितामहा, निरनिराळीं दर्शनें व शास्त्रें यांचीं तत्वें ज्यांना माहीत नाहींत व सदासर्वदा संशयाच्या जाळ्यांत गुरफटल्यामुळें ज्यांच्या बुद्धीचा कोणताच निश्चय होऊं शकत नाहीं, अशा मनुष्यांचें कल्याण कशानें होईल तें मला सांगा.

**भीष्मः** अशा मनुष्यांनीं सतत गुरूची–गुरुरूप परमेश्वराची–पूजा करावी, व वृद्ध वृद्ध आचार्यांची सेवा करून नित्य शास्त्रार्थाचें श्रवण करावें. गुरुभक्ति, परमेश्वरचिंतन, आचार्यांची उपासना व शास्त्रार्थश्रवण असा हा एकच कल्याणाचा मार्ग अज्ञ माणसांकरितां सांगितलेला आहे. या मार्गानें त्यांचें कल्याण निश्चयानें होतें. या संबंधांत पूर्वी घडलेला नारद व गालव यांच्या संवादाचा एक इतिहास सांगतात तो मीं तुला सांगतों. एकदां जितेंद्रिय व आत्मकल्याणाची इच्छा

धरणाऱ्या गालवानें, ज्ञानामृतानें तृप्त झालेल्या, निर्मोह व आत्मसंयमी नारदांना प्रश्न केला कीं, ' हे मुने, या लोकीं मनुष्यप्राणी ज्या ज्या गुणांनीं श्रेष्ठ म्हणून मानला जातो, ते ते सर्व आपल्या ठिकाणीं स्थिररूपानें आहेत असें आम्हांस स्पष्ट दिसत आहे. आपण अशाप्रकारें सर्वगुणसंपन्न व निर्मोह आहांत, व आम्हीं मूढ व लोकतत्व न जाणणारे असे आहों. तेव्हां आपण आमची शंका दूर करावी. शास्त्रांनीं ज्ञानप्राप्तीचीं साधनें म्हणून जीं कर्मे सांगितलीं आहेत तीं प्रत्येक शास्त्राचीं निरनिराळीं आहेत. या कर्मांतील तरतमभाव जाणण्याला आमच्या जवळ साधन नसल्यानें आम्हांला सर्वच कर्मे सारखींच श्रेयस्कर वाटतात. आतां सर्व कर्मांचें आचरण करावयास जावें तर परस्परविरोधी कर्मांच्या आचरणानें आमची ' इतो भ्रष्टः ततो भ्रष्टः ' अशी स्थिति होणार आहे. या कर्मांचा तरतमभाव, हे मुने, आपणाला समजतो. तेव्हां, निश्चितपणें श्रेयस्कर कर्म कोणतें तें आपण आम्हांला सांगा. भगवन्, वर्णाश्रमधर्म सांगणारीं शास्त्रें निरनिराळ्या प्रकारचे आचार सांगतात; व प्रत्येक शास्त्र ' हा आचार श्रेष्ठ ' ' हा आचार श्रेष्ठ ' असेंच मनुष्यांना शिकवितात. निरनिराळ्या शास्त्रांनीं प्रस्थापित केलेले व त्या त्या शास्त्रांनीं श्रेष्ठ मानलेले हे विविध आचार पाहिले म्हणजे आमचा गोंधळ होतो, व आमच्या शास्त्रांवर जरी आमची निष्ठा असली, त्यांनीं घालून दिलेले आचार पाळण्यांत आम्हांला आनंद होत असला, तरी श्रेयस्कर आचार कोणता व आमचें कल्याण कशानें होईल याचा निश्चय आमच्या मनाला होत नाहीं. शास्त्र हें एकच असेल तर कल्याणाचा मार्गहि पण एकच राहील. पण, शास्त्रें अनेक झाल्यानें त्यांनीं श्रेय हें गुहेंत अधिकाधिक खोल दडवून ठेविल्याप्रमाणें जास्त जास्तच कठिण केलें आहे. नानाप्रकारचे संशय व शंका उपस्थित झाल्यामुळें ' श्रेय कोणचें ? ' हा प्रश्न गुंतागुंतीचा झाला आहे असें मला वाटतें. म्हणून, हे भगवन्, श्रेय कोणतें तें मला सांगा. मीं आपल्याला शरण आलों आहें. मला या प्रश्नाचा उलगडा सांगा.

**नारदः** हे गालवा, शास्त्र चतुर्विध असून आपापल्या प्रकारें तें निरनिराळे श्रेयोमार्ग सांगतें. हे सर्व तूं योग्य गुरूकडून नीट समजून घे. म्हणजे त्यांच्यांतील तरतमभाव तुझा तुलाच कळून येईल. जसजशीं तूं हीं शास्त्रें सूक्ष्म रीतीनें पहात जाशील, तसतसे त्यांच्यांमध्यें त्या त्या शास्त्राच्या मतें आत्मज्ञानाला पोषक पण परस्परविरुद्ध असे निरनिराळे धर्म सांगितलेले तुला आढळतील. या शास्त्रांचें स्थूल दृष्टीनें अवलोकन केलें तर हीं निश्चितस्वरूपाचें एकच धर्मतत्व

किंवा आत्मतत्व सांगत नाहींत, असें दिसतें. सूक्ष्म दृष्टीच्या व विचाराच्या माणसांना मात्र शास्त्रांचें ध्येय—त्यांची परागति—जें आत्मतत्व तें नीट, सरळ व निःसंदिग्धपणें दिसतें. त्यांच्या मतें श्रेयोमार्ग हा सदासर्वदा निःसंदिग्ध स्वरूपाचा असून तो या सर्व शास्त्रांनीं सांगितलेल्या धर्मांहून निराळा व त्यांच्या पलीकडचा आहे तो असाः

'मित्रांच्यावर अनुग्रह करणें, शत्रूंचा निग्रह करणें, व धर्म, अर्थ आणि काम या त्रिवर्गांचा संग्रह करणें या तीन्ही गोष्टींना मनस्वी लोक श्रेय असें म्हणतात. पापकर्मांपासून परावृत्त होणें, नेहमीं पुण्यशील असणें, सज्जनांच्यासारखा आचार ठेवणें, सर्वांभूतीं दयाशील वृत्ति राखणें, व्यवहारांत सरळपणा धरणें व नेहमीं गोड वाणी बोलणें हेंच निःसंदिग्ध स्वरूपाचें श्रेय होय. देवता, पितर व अतिथि यांचे भाग त्यांचे त्यांना देणें; निरपराध भृत्यांचा त्याग न करणें; सत्य बोलणें हेंच श्रेय होय. सत्य बोलणें हें श्रेयस्कर खरें; पण, सत्याचें ज्ञान होणें अत्यंत कठिण आहे. प्राणिमात्रांचें आत्यंतिक कल्याण ज्यानें साधेल तेंच सत्य होय असें माझें मत आहे. अहंकाराचा त्याग करणें; कोणत्याहि बाबतींत गैरसावधपणा होऊं न देण्याविषयीं जपणें; नेहमीं संतोषवृत्ति ठेवणें; विजन-वास पत्करणें; धर्मानें वेदाध्ययन करणें व वेदांताचेंहि अध्ययन करणें; ज्ञानाचा साक्षात् अनुभव घेण्याची इच्छा धरणें हीं श्रेयाचीं अंगें होत. हीं सर्व मिळूनच निःसंदिग्ध प्रकारचें कूटस्थ श्रेय होतें. श्रेयस्कामी पुरुषानें शब्द, रूप, रस, गंध व स्पर्श या पांच भोगविषयांतच आत्यंतिक रीतीनें मग्न होऊन राहूं नये. रात्रीं जागणें, दिवसा झोंप घेणें, आळस, चहाडखोरपणा, उन्मत्तपणा, अति आहार करणें व मुळींच आहार न घेणें, या सर्व गोष्टी श्रेयोर्थी पुरुषानें वर्ज मानाव्या. दुसऱ्याची निंदा करून स्वतःचा उत्कर्ष साधण्याचा मार्ग कधींहि पतकरूं नये. लोकांमध्यें आपला उत्कर्ष व्हावा अशी इच्छा धरावी व ती स्वतंत्र रीतीनें आपल्या गुणांच्या जोरावर सिद्धीस न्यावी. स्वतःला गुणी समजणारे आत्मसंभावित लोक हे बहुधा गुणरहित असतात, व स्वतःच्या अंगच्या गुणांचा अभाव भरून काढण्यासाठीं दुसऱ्या गुणी लोकांचें उणें हुडकीत बसतात. यांना कांहीं सांगायला गेलें तर स्वतःच्या नसत्या मोठेपणाचा ताठा धरून हे मोठ्या मनुष्यांपेक्षां स्वतःला जास्त शहाणे समजतात. शहाण्या गुणी मनुष्यानें दुसऱ्याची निंदा करूं नये व आपले गुण आपल्या वाणीनें वर्णूं नयेत. म्हणजेच त्याला यशःप्राप्ति होते. फुलांचा पवित्र व मधुर सुवास हा न बोलतांच

पसरतो. सूर्य हा आकाशामध्यें स्वतःच्या विमल तेजानें तळपतो तोहि न बोलतांच तळपतो. याप्रकारें शहाणा मनुष्य विचारानें स्वतःच्या अंगचे दोष स्वतःच निवडून टाकून देत असतो व आपल्या गुणांचा गाजावाजा स्वतःच्या तोंडानें कधींच करीत नाहीं. तो आपल्या गुणांनीं लोकांत प्रथितयश होऊन रहातो. जो मुळांतच मूर्ख त्याची प्रतिष्ठा केवळ त्यानें आपल्या गुणांचें प्रदर्शन केलें म्हणूनच वाढते असें नाहीं. कृतविद्य शहाण्या माणसाला, खळगा खणून त्यांत पुरून जरी ठेविलें तरी तेथूनहि तो आपला प्रकाश पाडीलच पाडील. खोटीं वचनें—असत् भाषण—कितीहि ओरडून उच्चारिलीं तरी अखेर त्यांचा उपशम होतो, व सुभाषितें हीं कितीहि हळू उच्चारिलीं तरी लोकांच्या मनावर तीं कायमचा संस्कार करतात. मूर्ख माणसें मोठींमोठीं पल्लेदार भाषणें करतात व त्या पोकळ बडबडीनें स्वतःच्या अंतःकरणाचा क्षुद्रपणा मात्र व्यक्त करितात. सूर्य ज्याप्रमाणें सूर्यकांत मण्याच्या द्वारें स्वतःचें अग्निरूप प्रकट करितो तसेंच हें मूढांचें वर्तन होय. म्हणून, सूज्ञ माणसें नानाप्रकारची बुद्धि आपणांस प्राप्त व्हावी—विविध तऱ्हेची चतुराई आपल्या ठिकाणीं यावी—म्हणून धडपड करीत असतात. उत्कृष्ट प्रकारची बुद्धि लाभणें हा सर्व लाभांत श्रेष्ठ लाभ होय असें माझें मत आहे.

शहाण्या माणसानें कोणीं प्रश्न विचारल्यावांचून त्याला कांहीं सांगायची खटपट करूं नये; व जो कोणी अन्यायानें आपल्यास छेडण्यासाठीं वडवांकड प्रश्न विचारील त्याला उत्तर देऊं नये. स्वतःला ज्ञान असलें तरी अशा वेळीं वेड पांघरावें. वस्तीला जागा शोधावयाची ती सदा धर्माचरण करणाऱ्या धर्मनिष्ठ उदार अशा साधुपुरुषांच्या संगतींतील असावी. कुग्रामवसति करूं नये. चारी वर्णांच्या आचारांचा संकर ज्या ठिकाणीं होतोसा वाटेल त्या ठिकाणीं आत्मकल्याणाची इच्छा धरणाऱ्या माणसानें राहूं नये. श्रेयोर्थी मनुष्य स्वतः निष्कर्मी असला तरी या जगांत वावरतांना पुण्यवान् प्राण्यांशीं संगति जडली म्हणजे त्याला पुण्यप्राप्ति होते व पाप्याच्या संगतींत केवळ संगमात्रानेंच पापाची प्राप्ति होते. पाणी, अग्नि व चंद्र यांचा स्पर्श जसा थंड, उष्ण, सुखद व दुःखद असतो तद्वत् केवळ संसर्गमात्रानें सज्जनांची संगत पुण्यकारक व दुर्जनांची संगत पापकारक ठरते. प्रत्येक विषयाच्या ठिकाणीं जे जे रस असतात ते ते गोड तिखट इत्यादि सर्व रस विसरून केवळ जठराग्नीला गोळा द्यावयाचा एवढ्याच भावनेनें श्रेयोर्थी मनुष्य देवादिकांना देऊन शेष उरलेलें अन्न खातो. बुद्धीला

विशेष बंधनकारक अशा विषयरसांची गोडी जो चवीनें घेत बसतो, तो कर्मपाशांच्या बंधनांत सांपडतो. आत्मज्ञान यथार्थ रीतीनें व्हावें अशी इच्छा धरूनहि सत्कारयुक्त रीतीनें प्रश्न न विचारणारांना ज्या ठिकाणीं ब्रह्मविद्या सांगितली जाते असें ठिकाण श्रेयोर्थी माणसानें सोडून द्यावें. शिष्य व उपाध्याय यांचा संबंध व्यवस्थित रीतीचा व शास्त्रशुद्ध असा जेथें असेल तो देश सोडण्याचें कोण मनांत आणील? विद्वान् माणसांच्या अंगीं नसते दोष चिकटवून त्यांचेंच वर्णन ज्या ठिकाणीं केलें जातें अशा ठिकाणीं स्वतःच्या अंगची योग्यता वाढावी अशी इच्छा धरणारा कोणता शहाणा वास करील? ज्या ठिकाणीं लोभी माणसांनीं धर्माचीं सर्व बंधनें बहुशः उच्छिन्न करून टाकलेलीं आहेत, अशा स्थलाचा शहाण्या माणसानें पदर पेटलेल्या वस्त्राप्रमाणें त्याग करावा. ज्या ठिकाणीं निर्मत्सर माणसें निःशंक रीतीनें धर्माचें आचरण करीत असतात अशा भागांत वसति करावी व नेहेमीं पुण्यशील साधूंच्या संगतींत रहावें. मनुष्यें ज्या ठिकाणीं द्रव्यलोभानें धर्माचरण करतात, त्या ठिकाणीं त्यांच्या संगतींत कल्याणेच्छु पुरुषानें राहूं नये; कारण, हीं माणसें पापी होत. जीविताच्या लोभानें ज्या ठिकाणीं पापाचरण केलें जातें, त्या ठिकाणाचा एकाद्या सर्पयुक्त घराचा आपण त्याग करतों त्याप्रमाणें त्याग करावा. ज्या कर्मांच्या आचरणानें पुढें बिछान्यावर पडल्यावर पश्चात्ताप करण्याची पाळी येईल, तें कार्य आत्मकल्याणेच्छु पुरुषानें आरंभापासूनच करूं नये. ज्या ठिकाणीं राजा व राजपुरुष यांचे अधिकार सारखेच असतात व कुटुम्बांतील कर्तीं माणसें ज्या ठिकाणीं आपल्या कुटुंबीयांस सोडून आधींच भोजन करितात, तें राष्ट्र शहाण्या माणसानें सोडावें. ज्या राष्ट्रांत सनातन धर्मानें चालणाऱ्या, सदा धर्मरत असणाऱ्या, यजन व अध्यापन या कर्मांतच गुंतलेल्या अशा श्रोत्रियांनाच प्रथम भोजन मिळतें, त्या राष्ट्रांत श्रेयोर्थी मनुष्यानें वास करावा. स्वाहा, स्वधा व वषट् या शब्दांनीं युक्त अशा आहुति ज्या ठिकाणीं योग्य विधिपूर्वक अग्नींत टाकल्या जातात व हें कर्म जेथें अखंड चालू आहे, अशा राष्ट्रांत इतर कोणताहि विचार न करतां बेलाशक वास करावा. ज्या ठिकाणीं वृत्ति चालावी म्हणून ब्राह्मण अपवित्र कर्मे करतांना दृष्टीस पडतील तें ठिकाण सविष अन्नाप्रमाणें वर्ज मानावें. आपल्या कर्मावर संतुष्ट झालेलीं माणसें ज्या ठिकाणीं आपल्याला हवें तें न मागतां देतात अशा ठिकाणीं श्रेयोर्थी माणसानें स्वतःला कृतकृत्य समजून स्वस्थ चित्तानें रहावें. ज्या ठिकाणीं उन्मत्त माणसांना शासन होतें, व पुण्यशील माणसांचा योग्य सत्कार होतो, अशा

ठिकाणीं पुण्यात्म्या साधूंच्या संगतींत वास करावा. ज्या राष्ट्रांत जितेंद्रिय वृत्तीच्या लोकांबद्दल क्रोधवृत्ति धारण करणारांना व सज्जन लोकांचा छळ करणाऱ्या अविनीत माणसांना मोठें शासन होतें, ज्या राष्ट्रांतला राजा नित्य धर्मरत असून राष्ट्राचें धर्मानें पालन करतो, त्या ठिकाणीं सर्व विषयांचा अभिलाष टाकून कोणताहि विचार न करितां वसति करावी. राजाचें शील यथाशिस्त चांगलें असलें म्हणजे तो श्रेयःप्राप्तीची संधि येतांच आपल्या राष्ट्रांतील माणसांचें सत्वर कल्याण करून देतो.

हे गालवा, याप्रमाणें तूं मला श्रेय कोणतें म्हणून विचारलेंस तें मीं तुला सांगितलें आहे. आत्मकल्याण ही गोष्ट अशी आहे कीं मुख्यतः त्याचें मोजमाप करतां येणें शक्य नाहीं. अमुकच श्रेयस्कर असें प्राधान्यानें सांगतां येणार नाहीं. तथापि वर सांगितल्याप्रमाणें आयुष्य कंठणाऱ्याला व तपस्वीवृत्तीनें राहून प्राणिमात्राचें हित व्हावें अशी बुद्धि धरणाऱ्याला मोक्षरूपी आत्मकल्याण म्हणजे काय हें आपोआपच स्पष्ट समजेल. १२. ३. २८७.

---

## अध्याय २८८ वा.

[ सगरारिष्टनेमिसंवाद. ]

१. युधिष्ठिरः—हे पितामहा, आमच्यासारख्या राजांनीं या पृथ्वीवर योगयुक्त रीतीनें कसें वागावें, व आसक्तीच्या पाशांतून मुक्त होण्यासाठीं कोणकोणत्या गुणांचा आश्रय करावा तें मला सांगा.

भीष्मः—या बाबतींत सगरानें अरिष्टनेमीला पूर्वीं असाच प्रश्न विचारला होता. त्यावेळचा त्यांचा संवाद जुने इतिहासकार सांगतात तो मीं तुला सांगतों; ऐक. एकदां सगरानें अरिष्टनेमीला प्रश्न केला कीं हे ब्रह्मन्, कोणत्या श्रेयोमार्गाचें आचरण केल्यानें आत्यंतिक सुख मिळतें, व शोक आणि क्षोभ यांची बाधा कशामुळें होणार नाहीं तें मला सांगा. अशा प्रकारचें भाषण ऐकून सर्व शास्त्रवेत्यांच्या मध्यें श्रेष्ठ असणारे असे तार्क्ष्य अरिष्टनेमि सगराच्या ठिकाणीं दैवी संपत्ति व उपदेश ग्रहण करण्याचा अधिकार आहेसें पाहून त्याला पुढीलप्रमाणें उपदेश करते झाले.

"या जगांत मोक्षसुख हेंच काय तें आत्यंतिक सुख असून मोहव्याप्त माणसाला तें समजणें अशक्य होय. पुत्र, पशु, धन, धान्य इत्यादिकांत गढून गेलेल्या

विषयासक्त व अस्थिर माणसाच्या बुद्धीला या सुखाचें स्वरूप अजमावतां येणें ही गोष्ट संभवनीय नव्हे. मायापाशांनीं बांधला गेलेला मनुष्य मोक्षपदाला कधींच चढूं शकत नाहीं. मायेचे पाश कोणते ते मीं तुला सांगतों ऐक. ज्याचें डोकें ठिकाणावर असेल अशा शहाण्या माणसानें कान देऊन ऐकल्या तर त्यालाच या गोष्टी समजणें शक्य आहे; इतरांना नाहीं. पुत्रांचें लालनपालन करून ते स्वतःचा योगक्षेम चालविण्याइतके मोठे झाले म्हणजे त्यांचीं लग्नें करून देऊन व स्वतःला मुक्त मानून तूं निःसंग रीतीनें रहा. जन्मभर लालन केलेली भार्या पुत्रवती झाली व वृद्धपणीं तिचें लक्ष्य मुलांबाळांच्या संसारांत गुंतूं लागलें म्हणजे योग्य कालीं तिचा त्याग करून तूं त्यांतून मोकळा हो व परमार्थाकडे दृष्टी वळीव. इंद्रियांना त्यांच्या त्यांच्या विषयांचें सेवन यथाविधि करूं दिल्यानंतर तूं आपलें मन त्यांतून काढून घे व सापत्य किंवा निरपत्य स्थितींत मनानें मोकळा रहा व निःसंग हो. यदृच्छया प्राप्त होणाऱ्या विषयभोगांत आसक्ति ठेवूं नको. त्यांच्याबद्दल राग किंवा द्वेष कांहींच न मानतां अनासक्तवृत्तीनें त्यांचें दुरून कौतुक करून मुक्तसंग अशा स्थितींत वाग. हा मोक्षमार्ग—विषयांचा भोगपूर्वक त्याग—मीं तुला संक्षेपानें सांगितला. आतां समजुतीसाठीं त्याचाच विस्तार करून सांगतों ऐक.

जे लोक मुक्तसंग व निर्भय वृत्तीचे असतात त्यांना सुखानें रहावयास मिळतें व आसक्त बुद्धीचे मूढ लोक नाश पावतात यांत संशय नाहीं. कृमि व मुंग्या धान्याचा संचय करून ठेवतात त्यांचा नाश होतो हें आपण पहातों. यांच्या उदाहरणानेंहि असक्तांना सुख व आसक्तांना दुःख हीच गोष्ट फिरून एकवार सिद्ध होते. तुला मोक्षप्राप्तीची चाड असेल तर 'माझ्यामागें यांचें कसें होईल' अशी स्वजनांविषयीं चिंता वाहूं नको. प्राणिमात्र आपापल्या संचितानें जन्माला येतो, त्याची वाढ त्याच्या स्वतःच्याच कर्मांमुळें होते व सुख, दुःख आणि मृत्यु हीं त्याला त्याच्या कृतींनींच प्राप्त होतात. भोजन व आच्छादन हीं आईबापांनीं ठेविलेल्या संग्रहांतून मिळणें अगर स्वतःच्या कष्टांनीं मिळणें हें ज्याच्या त्याच्या पूर्वकर्मांवर अवलंबून आहे. पूर्वजन्मीं ज्याची तजवीज करून ठेविलेली नाहीं असें फल या लोकीं केव्हांच व कोणतेंच मिळत नाहीं. म्हणून, प्राणिमात्राचें आयुष्य त्याच्या स्वकर्मांवर अवलंबून आहे; आपण अमुक करूं म्हटल्यानें कांहीं होत नाहीं हें ध्यानांत धर व आसक्ति सोड. विधात्यानें प्राणिमात्राला ज्याचें त्याचें भक्ष्य

नेमून दिलें आहे. या पृथ्वीवर संचार करीत असतांना प्राणिमात्राचें रक्षण त्याच्या त्याच्या कर्मांनीं होतें. तूं स्वतः मातीच्या गोळ्यासारखा असून तुझा तूंच परतंत्र आहेस. स्वजनांचें पालन पोषण करण्यांत व आसक्तबुद्धीनें त्यांच्यांत वावरण्यामध्यें तुझा हेतु काय हें समजणें कठिण आहे. तूं मातीच्या गोळ्याप्रमाणें परतंत्र आहेस, इतकेंच नव्हे तर तूं शाश्वत टिकणाराहि नाहींस. तूं आपल्याकडून आटोकाट प्रयत्न करीत असतांनाहि तुझ्या डोळ्यांदेखत मृत्यु तुझ्या आप्तेष्टांवर घाला घालीत असतो. यावरून तूं योग्य तो बोध घे. तुझे आप्तइष्ट तुझ्या कल्पनेप्रमाणें जीवंत राहिले असें घेऊन चाललें तरी त्यांच्या भरणपोषणाचें तूं स्वीकारलेलें काम अर्धेंच टाकून व त्यांना मागें ठेऊन तुलाच मृत्युवश व्हावें लागणार नाहीं कशावरून? मेलेले आप्तेष्ट सुखांत आहेत कीं दुःखांत आहेत, पुढील जन्मांत ते कोठें जातात—याची वास्तपुस्तहि तुला नसते. यावरून तूं योग्य तो बोध घेणें हें उचित नव्हे काय? तूं मेलास काय किंवा जीवंत राहिलास काय, तुझे आप्तेष्ट आपापल्या कर्मांचीं फळें भोगीतच रहातील हें जर खरें, तुझ्या मरण्याजगण्यावर ते अवलंबून नाहींत हें जर खरें, तर तूं परमार्थ दृष्टीनें स्वहित आधीं साधावयास नको का? या जगांत कोण कोणाचा तें नीट ओळखून—'कोणीं कोणाचा नाहीं' हा सिद्धांत उमजून घेऊन—व आतांपर्यंत सांगितलेला या लोकांचा व्यवहार ध्यानीं घेऊन तूं आपलें चित्त मोक्ष-मार्गाकडे लाव. तुला आणखीहि कांहीं सांगतों तें ऐकून घे.

ज्या प्राण्यानें इहलोकीं क्षुधा, तृष्णा, क्रोध, लोभ व मोह इत्यादि भाव जिंकले त्या सत्वगुणसंपन्न माणसाला मुक्तच समजावा. द्यूत, मद्यपान, स्त्रिया व मृगया यांच्यामध्यें जो मनुष्य मोहानें आसक्त होऊन रहात नाहीं तो मुक्तच होय. प्रत्येक दिवशीं व रात्रौ जो मनुष्य 'आतां अमुक गोष्टीचा उपभोग घ्याव-याचा, मग अमुक गोष्टीचा उपभोग घ्यावयाचा' असें रात्रंदिवस चिंतन करतो व खिन्न होतो त्याची बुद्धि दोषयुक्त आहे असें जाणावें. तसेंच स्वतःच्या चित्त-वृत्ति स्त्री आदिकरून जे भोग्यविषय त्यांजकडे वळत नाहींत असें पुनः पुनः ज्याच्या प्रत्ययाला येतें तो योगयुक्त पुरुष मुक्तच जाणावा. प्राण्यांची उत्पत्ति व त्यांचा विनाश आणि त्यांचें इहलोकींचें आयुष्य या संबंधाचें यथार्थ ज्ञान ज्या पुरुषाला झालें तो इहलोकींच मुक्त झाला असें म्हणण्यास हरकत नाहीं. धान्यानें भरलेले लक्षावधि किंवा कोट्यवधि गाडे पुढें आले तरी त्यांतून शरीरयात्रा चालण्यापुरतें पसाभर धान्यच आपल्याला मिळावें एवढीच ज्याची इच्छा असते,

किंवा राजवाड्यांत राहून सुद्धां ज्या जागेवर आपली खाट आहे तेवढीच जागा आपली असें जो मानतो तो मुक्तच होय असें जाणावें. सर्व लोक मृत्यूनें पछाडलेले आहेत, व्याधींनीं पीडलेले आहेत, उपासमारीमुळें कृश झालेले आहेत असें ज्ञान ज्याला झालेलें आहे तो सर्वथा मुक्तच होय. सर्व लोक मृत्यूनें व्यापिलेले आहेत, अतएव नश्वर आहेत, असें ज्यानें जाणलें त्याची वृत्ति समाधानी असते; व ज्याला ही जाणीव नाहीं तो जगाला शाश्वत समजून त्याचे मोहांत गुंततो व शेवटीं स्वतःचा नाश करून घेतो. या लोकीं जो मनुष्य अल्प-संतोषी असतो त्यालाच मुक्त असें म्हणतात. या जगांत, जठराग्नि हा भोक्ता व सोम-अन्न-हें भोग्य असून, सर्व जग हें तद्रूपच आहे. खरें आत्मरूप याहून निराळेंच आहे असें ज्ञान ज्याला झालें, व सुखदुःखादि अद्भुत व मायिक अशा भावांना ज्यानें जिंकलें, जो सुखादिकांच्या पलीकडे गेला त्याला मुक्त म्हणावें. ज्याला पलंगावर निजणें व भूमीवर निजणें हीं दोन्हीं सारखींच वाटतात, ज्याच्या जिभेला साळीचा भात व कदान्न याची चव सारखीच वाटते, ज्याच्या लेखीं रेशमी वस्त्रें, दर्भांचीं वस्त्रें, वल्कलें, घोंगड्या व कातडीं हीं सर्व सारखींच आहेत त्याला मुक्त म्हणावें. या भूतमात्राची उत्पत्ति पंचमहाभूतांतून आहे असें जो जाणतो व जाणून तदनुरूप लोकांत वागतो त्याला मुक्त समजावा. सुख व दुःख, लाभ व अलाभ, अथ किंवा पराजय, इच्छा व द्वेष, भय आणि उद्वेग हीं ज्याला समसमान वाटतात तो मुक्त होय. रक्त, मूत्र व पुरीष इत्यादि घाणेऱ्या गोष्टींच्या संघातानें बनलेलें हें शरीर अनेक दोषांचें माहेरघर आहे असें जो जाणतो तो मुक्तच जाणावा. शरीर हें नश्वर आहे, त्याच्यावर म्हातार-पणामुळें वळया पडतात, त्याला कृशता येते, त्याचा वर्ण पालटतो, तें कुबडें होतें, हें ज्ञान ज्याला आहे तो मुक्त होय. कालांतरानें पौरुष नाहींसें होणें, दृष्टि-भेद होणें, कान बधिर होणें व एकंदरींत सर्वच बाजूंनीं दौर्बल्य उत्पन्न होणें हे विकार देहाला होतात म्हणून देह हा नश्वर आहे असें जो जाणतो तो मुक्त होय. ऋषि, देव व असुर यांच्यापैकीं इहलोकीं कोणींच शिल्लक राहिला नाहीं, सगळे हा लोक सोडून परलोकाला गेले, हें ज्यानें जाणलें तो मुक्त होय. आपापल्या ऐश्वर्यानें युक्त असे हजारों राजे या पृथ्वीतलावर होऊन गेले; पण, ते आले तसे गेले हें ज्याला उमजलें—ऐश्वर्याची कालवशता व नश्वरता ज्यानें जाणली—तो मुक्तच होय. या जगांत अर्थलाभाचा संभव कमी, व क्लेशच फार; कुटुम्बाच्या पोषणार्थ झटतांना दुःखच भोगावें लागतें, हें ज्याच्या प्रत्ययास

आलें तो मुक्त असें समजावें. या लोकीं आपलींच अपत्यें व भोंवतींची मंडळी हीं असावीं तशीं नाहींत हें ज्याच्या वारंवार प्रत्ययास येतें त्याची दृष्टि मोक्षमार्गाकडे वळल्यावांचून कशी राहील? असा माणूस मोक्षमार्गाला केव्हांहि पूज्यच मानील. शास्त्राच्या अध्ययनानें व लोकव्यवहाराच्या अनुभवानें जो मनुष्य या मानवी संसाराला असार मानावयास शिकला तो सर्वथा मुक्तच होय. मी आतांपर्यंत तुला जें सांगितलें त्याचें मर्म ध्यानीं घेऊन सर्वथा मुक्तासारखें आचरण ठेव. बुद्धींत कोणत्याहि प्रकारचें वैक्लव्य-शोक-उत्पन्न होऊं देऊं नकोस. बुद्धि शोकरहित व निःसंग झाली म्हणजे गार्हस्थ्य व मोक्षमार्ग हीं दोन्हीं तुला सारखींच आहेत. अरिष्टनेमीचें हें भाषण ऐकून सगर राजानें मोक्षद गुणांचा आश्रय करून योगयुक्त चित्तानें प्रजांचें पालन केलें. १२. ३. २८८.

---

## अध्याय २८९ वा.

[ शुक्राचार्यांची कथा. ]

**युधिष्ठिरः** हे पितामहा, माझ्या अंतःकरणांत एक जिज्ञासा पुष्कळ दिवसांची राहिलेली आहे. तिचा खुलासा आपल्याजवळून ऐकून घेण्याची माझी इच्छा आहे, तेवढी आपण पूर्ण करावी. काव्य, उशना, हीं ज्याचीं नांवें, असा महाबुद्धिमान् देवर्षि शुक्र यानें खरें म्हणजे देवांचा पक्ष स्वीकारावयाचा; तें सोडून तो राक्षसांचें कल्याण व देवांचें अकल्याण करूं लागला हें उलटें कसें झालें? अत्यंत तेजस्वी अशा देवांचा तेजोभंग त्यानें काय म्हणून केला? राक्षस या शुक्राच्या बळावरच नेहमीं देवांशीं विरोध मांडीत असतात. देवासारखा देदीप्यमान जो उशना त्याला शुक्रत्व कसें प्राप्त झालें व त्याला ऋद्धि कशी प्राप्त झाली तें सर्व आपण मला सांगा. तसेंच हा तेजस्वी असूनहि याला आकाशमार्गानें गमन करितां येत नाहीं हें कसें? हें आपणांकडून समजून घ्यावें अशी माझी इच्छा आहे.

**भीष्मः** हे राजा, या गोष्टी जशाजशा पूर्वीं घडल्या, जसजशा आमच्या कानांवर आल्या व आम्हांला जशा त्या ग्रहण करतां आल्या तसतशा त्या मीं तुला सांगतों; तूं त्या लक्षपूर्वक ऐक. भृगूच्या वंशांत जन्माला आलेला व लोकांत मान्यता पावलेला हा मुनि कांहीं कारणाकारणांनींच देवांचें अहित करतो. इंद्र हा सगळ्या जगाचा राजा, व कुबेर हा त्याचा कोशाधिपति होय.

हा सगळ्या यक्षराक्षसांचा नायक. एके वेळीं योगबलाची सिद्धि असलेल्या या महातपस्वी उशना ऋषीनें कुबेरावर हल्ला केला व त्याला अडवून धरून आपल्या योगबलानें त्याचें धन हरण केलें. हें पाहून कुबेर अर्थात्च अत्यंत खिन्न झाला व दुःखानें व्याप्त होऊन देवश्रेष्ठ श्रीशंकर यांना दीनपणें शरण गेला. नानारूपांनीं नटणारा, अत्यंत तेजस्वी, सौम्य असा जो कल्याणकारक देवश्रेष्ठ रुद्रदेव त्याला कुबेरानें सर्व हकीकत सांगितली व म्हणाला, "योगबलाच्या सामर्थ्यानें उशना ऋषीनें माझें द्रव्य मला अडवून धरून हरण केलें; व योगसामर्थ्यानेंच तें धन स्वाधीन करून घेऊन तो महातपस्वी ऋषि निघून गेला. हे राजा, कुबेराचें हें भाषण ऐकून योगिश्रेष्ठ महेश्वर शंकर अत्यंत क्रुद्ध झाले व डोळे लाल करून हातांत शूल घेऊन उभे राहिले. आपलें दिव्य आयुध हातीं घेऊन कोठें कोठें आहे तो उशना' अशी श्रीशंकरांनीं पृच्छा केली. शंकरांना पुढें काय करावयाचें आहे हें उशना कवीनें ओळखिलें व दूर अंतरावर उभा राहून तो पुढें काय होतें त्याची वाट पहात पहात बसला. योगिश्रेष्ठ महात्मा शंकर प्रभु याच्या रागाचें स्वरूप योगसिद्ध शुक्राच्या पूर्ण ओळखीचें होतें व श्रीशंकरांची गति, आगमन व ठाण मांडण्याची तऱ्हा या गोष्टीहि त्याला माहीत होत्या. तेव्हां, शुक्राचार्यानें आपल्या तपोबलानें महात्म्या महेश्वराचें ध्यान केलें व योगबलाच्या जोरावर शंकरांच्या शूलाच्या अग्राचे ठिकाणीं तो जाऊन बसला. शूलाग्राचे ठिकाणीं बसलेला शुक्र भगवान् शंकरांना दिसला; परंतु, शूलस्थ शुक्रावर शूलाचाच प्रहार करणें अशक्य म्हणून त्या शूलाचें धनुष्य करण्याच्या उद्देशानें त्या धनुर्धर शंकरांनीं तो शूल आपल्या हातांनीं वांकविला. आपल्या बाहुबलानें तो शूल वांकविल्यानंतर उग्रायुध श्रीशंकर प्रभूंनीं त्या शूलालाच पिनाक अशी संज्ञा दिली. शूल वांकविल्याबरोबर शुक्राचार्य शंकरांच्या हातांत येऊन राहिले. त्यांना हातांत आलेले पहातांच याच्यावर धनुष्याचाहि उपयोग होऊं शकत नाहीं असें पाहून श्रीशंकरांनीं आपलें तोंड उघडिलें व त्या देवश्रेष्ठांनीं शुक्राचार्याला तोंडांत टाकिलें. पण, शुक्राचार्य महेश्वर प्रभूच्या उदरांत शिरून तेथेंहि फिरूं लागला.

**युधिष्ठिरः**—हे राजन्, त्या बुद्धिमान् देवदेवेश्वराच्या उदरांत शिरून शुक्राचार्य इकडे तिकडे फिरूं कां लागला? उदरांत अन्न ज्याप्रमाणें जठराग्नींत पचून जातें तसें शुक्राचार्यांचें पचन कसें झालें नाहीं? व पुढें त्या महातेजस्वी शंकरांनीं काय केलें!

**भीष्मः—**हे राजन्, त्या शंकरांनीं पाण्यामध्यें स्थाणूप्रमाणें उभें राहून अर्बुद वर्षेंपर्यंत अत्यंत घोर अशी तपश्चर्या केली; व अशी घोर तपश्चर्या करून ते त्या पाण्याच्या मोठ्या डोहांतून बाहेर आले. तपस्तेजानें देदीप्यमान दिसणाऱ्या त्या शंकरांना डोहाबाहेर आलेले पहातांच देवाधिदेव ब्रह्मदेव त्याजकडे आले; व त्या अव्यय पितामहांनीं 'आपली तपोवृद्धि नीट झाली ना?' व 'आपलें कुशल आहेना?' असा श्रीशंकरांना प्रश्न केला. 'तपश्चर्या पुष्कळ झाली' असें शंकरांनींहि त्यावर उत्तर दिलें. पुढें शुक्र हा आपल्या पोटांतच असल्यानें आपण केलेल्या खडतर तपश्चर्येचा परिणाम त्या अचिंत्य गतीच्या, सत्यधर्मरत व महाबुद्धिमान् शुक्रावर झाला असून तोहि त्यामुळें वृद्धिंगत झाला आहे असें श्रीशंकरांना कळून आलें. त्या तपोबलानें व कुबेरापासून घेतलेल्या धनसंपत्तीनें समर्थ बनलेला तो महापराक्रमी योगी शुक्र त्रैलोक्यांत तेजःसंपन्न म्हणून शोभूं लागला. पुढें त्या योगेश्वर पिनाकपाणी शंकरांनीं ध्यानयोगाचें आचरण करण्यास सुरवात केली. ध्यानयोगांत वायूचा निरोध झाल्यामुळें श्रीशंकरांच्या उदरांत शुक्राचा कोंडमारा होऊं लागला व त्यानें इतस्ततः पोटांतच परिभ्रमण करण्यास सुरवात केली. शुक्राजवळहि योगसामर्थ्य होतें व शंकरांच्या उदरांत राहून त्यानें तेथूनच त्यांची स्तुति करण्यास प्रारंभ केला. शुक्रानें शंकरांच्या पोटांतून बाहेर पडण्यासाठीं पुष्कळ धडपड केली; पण शंकरांनीं वेळोवेळीं त्याला अडविल्यामुळें त्याचा इलाज चालेना. शेवटीं, हे अरिंदमा युधिष्ठिरा, शंकरांच्या उदरांत रहाणाऱ्या त्या शुक्रांनीं 'माझ्यावर प्रसन्न व्हा' अशी त्यांची वारंवार प्रार्थना केली, तेव्हां, देवश्रेष्ठ शंकरांनीं शरीराच्या इतर सर्व द्वारांचा निरोध केला व 'माझ्या शिश्नावाटे बाहेर जा' असें शुक्रांना सांगितलें. शंकरांनीं सांगितलेला शिश्नावाटे बाहेर पडण्याचा मार्गहि शुक्राला सांपडेना; व तो श्रीशंकरांच्या तेजानें पीडित होऊन इतस्ततः त्यांच्या उदरांत संचार करूं लागला. शेवटीं एकदांची ती वाट त्याला सांपडून तो तेथून बाहेर आला व तेथून पुढें उशना कवीला 'शुक्र' असें नांव मिळालें. देवदेवेश्वराच्या शिश्नावाटे बाहेर आल्यामुळें त्याला आकाशमार्गानें गमन करण्याचें सामर्थ्य प्राप्त झालें नाहीं. स्वतःच्या तेजानें तळपणाऱ्या त्या शुक्राला बाहेर पडलेला पाहून श्रीशंकर क्रोधाविष्ट झाले व रागानें हातांत शूल घेऊन उभे राहिले. आपले पति याप्रमाणें रागावलेले पाहून भगवती पार्वतीनें त्यांचें निवारण केलें. याप्रमाणें शंकरांचें निवारण झाल्यानंतर शुक्रांना देवी पार्वतीचें पुत्रत्व प्राप्त झालें.

देवीः—माझें पुत्रत्व प्राप्त झालेल्या या शुक्राचा आपण नाश करूं नये. कारण, देवाच्या उदरांतून बाहेर आलेल्या जीवाचा नाश कधींच होत नाहीं. हें ऐकून श्रीशंकर प्रसन्न झाले व हंसत हंसतच देवी पार्वतीला 'याला जावयाचें असेल तिकडे यानें जावें' असें वारंवार म्हणाले. नंतर, त्या महामुनि उशना कवीनें वरद देवदेवेश्वराला व भगवती पार्वतीला नमस्कार केला व त्यांच्या आशीर्वादानें त्याला इष्ट अशी गति प्राप्त झाली.

याप्रमाणें हे भरतश्रेष्ठा, त्या महात्म्या भार्गवाचें चरित्र तूं मला विचारिलेंस-तें मीं तुला सांगितलें आहे. १२. ३. २८९.

---

## अध्याय २९० वा

[ १ जनक–पराशर संवाद. २ परशरगीतेचा उपक्रम. ]

**युधिष्ठिर**—हे महाबाहो, आत्यंतिक कल्याण म्हणजे काय तें मला सांगा. अमृत कितीहि प्यालें तरी त्यानें जशी तृप्ति होत नाहीं, तशीच आपल्या वचनांमृतानेंहि तृप्ति होत नाहीं. कोणत्या शुभ कर्मांचें आचरण केलें असतां मनुष्याला इहपरलोकीं श्रेयःप्राप्ति होते तें, हे पितामहा, आपण मला सांगा.

**भीष्म**—यासंबंधांत प्रथितयश जनकराजानें महात्म्या पराशरऋषींना एकदां प्रश्न विचारला होता. तोच इतिहास मीं तुला सांगतों. 'इहलोकीं व परलोकीं सर्व प्राणिमात्रांचें कल्याण कशानें होईल तें मला सांगा' असा जनकानें प्रश्न विचारला असतां सर्व प्रकारच्या धर्माचारांची माहिती परिपूर्ण असणारे व लोककल्याणाची बुद्धि असणारे ते तपस्वी पराशर मुनि राजाला उद्देशून म्हणतात :

**पराशर**—इहलोकीं व परलोकीं मनुष्याचें कल्याण साधून देणारें एक फक्त धर्माचरणच होय. शहाण्या माणसांच्या सांगण्याप्रमाणें धर्मापरतें या जगांत श्रेष्ठ असें कांहींच नाहीं. या धर्माचरणानेंच मनुष्य स्वर्गलोकीं श्रेष्ठ पदाला पोहोंचतो. हे राजन्, प्राणिमात्रांचें कर्माचरण हें धर्मरूपच असतें. धर्मानें घालून दिलेल्या कर्मविधीप्रमाणें त्या त्या ब्रह्मचर्यगार्हस्थादि आश्रमांत राहून मनुष्यें आपापलीं कर्मे करीत असतात. मनुष्याची या जगांतील जीवितयात्रा चार प्रकारची आहे. ब्राह्मणानें प्रतिग्रह घ्यावा, राजानें प्रजेपासून कर घ्यावा, वैश्यांनीं शेती करावी व शूद्रांनीं त्रैवर्णिकांची सेवा करून त्याबद्दल वेतन घ्यावें अशी

ही चतुर्विध यात्रा आहे. ही यात्रा अशी चतुर्विध असली तरी मनुष्यप्राणी आपापल्या इच्छेनुसार निरनिराळ्या पापपुण्यात्मक कर्मांचें आचरण करीत असतो त्यामुळें त्याला पापपुण्यात्मक अशा निरनिराळ्या गति प्राप्त होतात. पापाचरणानें मनुष्य तिर्यक् योनींत जन्म घेतो, पुण्याचरणानें त्याला स्वर्ग मिळतो, पुण्य व पाप सारखें असेल तर मनुष्यजन्म आणि परमेश्वरस्वरूपाच्या यथार्थ ज्ञानानें या दोहींचा उच्छेद झाला असेल तर मुक्ति मिळते. निरनिराळ्या प्रकारचीं पापपुण्यात्मक कर्में मनुष्य इहलोकीं करीत असतो व त्या त्या कर्मानुसार त्याला पंचत्व पावल्यावर ती ती गति मिळत असते. तांब्याच्या वगैरे भांड्यावर ज्याप्रमाणें सोन्याचा किंवा रुप्याचा, द्यावा तसला, मुलामा चढतो त्याचप्रमाणें पूर्वजन्मींच्या कर्मफलांनीं मनुष्याचें इहजन्मींचें आयुष्य रंगविलें जातें. या जगांत कारणावांचून कोणतीच गोष्ट निर्माण होत नाहीं; आणि म्हणूनच, कांहीं न करतां आपोआप सुखप्राप्ति होणें शक्य नाहीं. शरीरनाशानंतर परलोकीं मनुष्याला जें सुख मिळतें तें त्याच्या कर्मांचेंच फल होय.

'मनुष्य इहजन्मीं पूर्वजन्मार्जित कर्मांचीं फलें भोगतो' या म्हणण्यावर कांहीं लोक आक्षेप घेतात तो असा: "दैव किंवा प्राक्तनकर्म म्हणून ज्याला म्हणतात त्याचें अस्तित्वच या जगांत नाहीं. कारण, पूर्वकर्मांचें अस्तित्व हें कोणत्याच साधनांनीं सिद्ध करतां येणें शक्य नाहीं. देव दानव गंधर्व इत्यादिकांच्या स्थितींत जो भेदभाव दिसतो तो प्राक्तनकर्मांमुळें उत्पन्न झालेला नसून स्वभावसिद्ध आहे. शिवाय इहजन्मीं भोगीत असलेलें फल नित्य, नैमित्तिक, काम्य व निषिद्ध अशा चतुर्विध पूर्वजन्मार्जित कर्मांमुळें प्राप्त झालेलें आहे अशी मनुष्याला आठवण रहात नाहीं. म्हणूनहि, प्राक्तनकर्म नाहीं असेंच मानावें लागतें. 'पुण्यो वै पुण्येन कर्मणा भवति' इत्यादि वेदवाक्यें कर्मांमुळें सुख किंवा दुःख होतें असें सांगतात खरीं; पण, तें झालें तरी शत्रूचा उत्कर्ष व आपला अपकर्ष पाहून चिडलेल्या लोकांच्या मनाचें समाधान व्हावें एवढ्यासाठींच होय. शास्त्र सांगणाऱ्या वृद्ध वृद्ध लोकांना हा धर्म संमत नाहीं. प्रत्यक्ष व अनुमान या दोन्ही प्रमाणांनीं सिद्ध न होणारा हा धर्म केवळ लोकांचें कांहींतरी समाधान करावें या उद्देशानें सांगितला जातो."

हा आक्षेप सर्वथैव खोटा आहे. या जगांत मनुष्य डोळे, मन, वाचा व इतर कर्मेंद्रियें यांनीं जें जें पुण्यकारक, पापात्मक, नीतीचें किंवा अनीतीचें कर्म करितो, त्याचें त्या त्या प्रकारचें फल त्याला प्राप्त होतें. हें फल कधीं कधीं

केवल दुःखरूप, कधींकधीं केवल सुखरूप तर कधींकधीं सुखदुःखरूप म्हणजे संमिश्र असें असतें. केलेलें कर्म सुखदायक असो व दुःखदायक असो, 'प्रारब्धकर्मणां भोगादेव क्षयः' या न्यायानें त्या त्या कर्मांचीं फलें कर्त्यानें भोगिल्यावांचून त्यांचा नाश होत नाहीं. संसारांत वागणाऱ्या माणसाचें सुकृत कधीं कधीं त्याच्या दुःखाचा अंत होईपर्यंत सुप्तावस्थेंत असतें. केलेल्या पापकर्मांमुळें प्राप्त झालेलें दुःख भोगून संपलें व त्याच्याचबरोबर पापकर्मांचा क्षय झाला म्हणजे मनुष्याला सुख प्राप्त होतें व सुकृताचा क्षय झाला म्हणजे फिरून शेषदुःख भोगण्यास सुरवात होते. पुण्य व पाप यांच्या समूळ नाशामुळें प्राप्त होणारें आत्यंतिक सुख, इंद्रियदमन, क्षमा, धीरवृत्ति, तपस्तेज, समाधान, सत्य बोलणें, विनयशीलता, अहिंसा, अव्यसनिता व दक्षता या गुणांनींच प्राप्त होतें. सुखाचा किंवा दुःखाचा उपभोग घेत असतांना प्राणी सामान्यतः संयमीवृत्तीनें रहात नाहीं. म्हणून, शहाण्या माणसानें नेहमीं चित्त संतुष्ट ठेवण्यासाठीं झटावें. मनुष्य जें कांहीं सुखदुःख भोगतो तें दुसऱ्या कोणाच्या कर्माचें फल नसून त्याचें त्याच्याच कर्माचें फल असतें. ज्या प्रकारचें कर्म तो करितो त्या प्रकारचेंच फल त्याला मिळत असतें. सुख व दुःख हीं दोन्हीं समान मानून त्यांचा आत्म्याच्या ठिकाणीं लय करणाऱ्या ज्ञानी माणसाचा मार्ग वेगळा; व स्त्री, पुत्र, पशु, घरदार, संपत्ति व शेतीवाडी इत्यादिकांत गुंतून रहाणाऱ्या आसक्त माणसाचा मार्ग वेगळा. जें कर्म दुसऱ्यांनीं केलें असतां त्याबद्दल आपल्याला वाईट वाटतें, तें कर्म आपण स्वतः करूं नये. स्वतः योगवृत्तीनें न रहातां दुसऱ्याचे दोष दाखविणारा पुरुष निंदेस पात्र होतो. राजा असून भितरा, ब्राह्मण असून भक्ष्याभक्ष्याचा विधिनिषेध न मानणारा, वैश्य असून निरिच्छ, शूद्र असून आळशी, विद्वान् असून शीलहीन, कुलीन असून आचारहीन, नेहमीं खोटें बोलणारा माणूस, शीलभ्रष्ट ब्राह्मणस्त्री, योगदीक्षा घेऊनहि आसक्त रहाणारा मनुष्य, स्वतःकरितां म्हणून अन्न शिजविणारा, मूर्ख असून वक्तृत्वाची हांव धरणारा, नृपहीन राष्ट्र व प्रजांवर प्रेम न करितां असंयमी वृत्तीनें रहाणारा राजा यांची नेहमींच कींव करावीशी वाटते व यांना नेहमीं दुःखच होतें. १२.३.२९०.

## अध्याय २९१ वा.

[ पराशरगीता—पुढें चालू. ]

पराशरः—मनुष्याच्या मनांत उत्पन्न होणाऱ्या वासना हा एक रथ असून इंद्रियांनीं सेव्य असे शब्दस्पर्शादि विषय तेच या रथाचे घोडे आहेत. या घोड्यांना वाटेल तसें भटकूं न देतां ज्ञानरूपी रश्मींनीं जो यांचें आकलन करतो तोच खरा बुद्धिमान् होय. ज्यांना परमतत्वाचें ज्ञान झालेलें आहे अशा ब्रह्मनिष्ठ पुरुषांकडून ईशसेवेचा मार्ग समजून घेतल्यानंतर त्या मार्गानें अनासक्त मनानें असंग परमेश्वराची अखंड सेवा करणें हाच परमश्रेष्ठ असा मार्ग आहे. ईशसेवेचा मार्ग समजून घ्यावयाचा तो आपल्यापेक्षां श्रेष्ठ असणाऱ्या पुरुषाकडूनच घ्यावा. आपल्या बरोबरीच्याच एकाद्या माणसाकडून घेऊं नये; कारण त्यांत पुरी समजूत पटत नाहीं.

हे राजन्, या जगांत मनुष्याचें आयुष्य ही एक दुर्लभ गोष्ट आहे. हें दुर्लभ आयुष्य प्राप्त झालें असतां केवळ विषयसेवनांतच गुंग राहून त्याची माती करूं नये. पुण्य कर्माचरण करून मनुष्यानें आपला उत्कर्ष साधण्याची खटपट नेहमीं करीत असावें. सत्व, रज व तम या त्रिगुणांच्या कमी अधिक प्रमाणानें त्यांच्यामुळेंच उत्पन्न होणारे जे कृष्ण, धूम्र, नील, रक्त, दारिद्र व शुक्ल असे सहा वर्ण मागें सांगितले त्यांच्यापैकीं वरच्या वरच्या वर्णांतून खालीं खालीं येणाऱ्या मनुष्याला जगांत कोणीं मानीत नाहीं. सत्कर्में करण्याची संधि आली असतांहि जो राजस कर्मांतच गुंतून राहतो त्यालाहि जगांत मान नसतो. पुण्यकर्माच्या आचरणानेंच प्राण्याला खालच्या खालच्या वर्णांतून वरच्या वरच्या वर्णांत जातां येतें. हा वर्णोत्कर्ष ज्याला साधला नाहीं तो पुरुष स्वतःच्या पापकर्मांनीं आपला नाश करून घेतो. अज्ञानामुळें झालेल्या पापाचा तपश्चर्येनें नाश करण्याचा प्रयत्न करावा. बुद्धिपुरःसर केलेल्या पापकर्माचा परिणाम दुःखदच होतो हें जाणून दुःखकारक पापकर्माचें आचरण कधींहि करूं नये. एकाद्या कर्माच्या आचरणापासून मोठी फलप्राप्ति होणारी असली तरी त्या कर्मांत जर पापाचा अंश असेल तर शहाण्यानें तें कर्म करूं नये. एकादा पवित्र ब्राह्मण ज्याप्रमाणें चाण्डाळाच्या संपर्कापासून दूर रहातो तसें शहाण्यानें अशा कर्मापासून दूर असावें. या जगांत पापकर्माचें फल अत्यंत वाईट व दुःखद असतें. पापकर्माच्या फलांनीं दृष्टि विकृत झाल्यामुळें अनात्मवस्तुच आत्मस्वरूप भासूं लागते व आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं अरुचि उत्पन्न होते. ज्या मूर्खांच्या अंगीं वैराग्य

बाणत नाहीं अशा माणसानें योगमार्गाचा अवलंब करण्याचा प्रयत्न केला तरी त्याला त्यापासून संतापच होतो. पांढऱ्या बिनरंगाच्या कपड्यावर दुसऱ्या रंगाचा डाग पडला तर तो डाग काढतां येतो. पण, त्याच वस्त्रावर काळ्या विड्याच्या फुल्यांचे डाग पडले तर ते कांहीं केल्या निघत नाहींत. तशीच पापाची गोष्ट आहे. कांहीं पापांचें क्षालन होऊं शकतें तर कांहीं पापें वज्रलेप होतात. स्वतः बुद्धिपुरःसर पापकर्म केल्यानंतर मनुष्यानें जरी त्या पापाच्या क्षालनार्थ म्हणून शुभकर्में करून प्रायश्चित्त घेतलें तरी तें पापकर्म नाहींसें होत नाहीं. पापकर्मांचें व पुण्यकर्मांचें फळ त्याला निरनिराळें भोगावें लागतें. बुद्धिपुरःसर केलेल्या पापाचीं फळें भोगिलींच पाहिजेत, प्रायश्चित्तानें त्याचा नाश होत नाहीं. आतां अज्ञानानें केलेल्या हिंसाप्रधान पापकर्मांचा क्षय अहिंसेच्या बुद्धिपुरःसर आचरणानें होऊं शकतो; पण, संकल्पपूर्वक बुद्धिपुरःसर केलेल्या हिंसेचा क्षय कसल्याहि अहिंसाधर्मानें होत नाहीं असें कांहीं शास्त्रवेते व आत्मनिष्ठ ब्राह्मण म्हणतात. पण हें त्यांचें म्हणणें खरें नाहीं. माझ्या मतें खरा सिद्धांत असा कीं, मनुष्याला कृतकर्माचें फल भोगावेंच लागतें. तो पुण्यकर्मांचें आचरण कितीहि व कसेंहि करो, त्याची आणि त्याच्या हातून घडलेल्या पापकर्मांची वजावाट होणें शक्य नाहीं. त्याला या दोन्हीं कर्मांचीं फलें पृथक् पृथक् भोगिलींच पाहिजेत. मनुष्यानें बुद्धिपुरःसर केलेलीं कर्में जशीं लहान मोठीं असतील तसें त्यांचें फलहि लहान मोठें असतें. बुद्धिपुरःसर केलेल्या कर्मांचें फल जसें भोगिलेंच पाहिजे तसेंच हातून अजाणतां घडलेल्या पापाचें फल हेंहि भोगिलेंच पाहिजे. बुद्धिपुरःसर व अबुद्धिपुरःसर यांत फरक एवढाच कीं जें कर्म एरवीं नित्य नरकाची वाट दाखविणारें होतें, तेंच अबुद्धिपुरःसर आचरिलें असतां थोड्या शासनावर कर्त्याची सुटका होते इतकेंच. म्हणजे याचा अर्थ बुद्धिपुरःसर कर्में करणारांना भोगाचा वांटा भोगलाच पाहिजे व अबुद्धिपुरःसर तीं करणारांना भोग चुकतो असा मात्र नाहीं. यांत भेद आहे तो फलभोगाच्या तारतम्याचा आहे. या म्हणण्यावर कोणीं शंका घेईल कीं, कर्मफलाचा भोग टळत नाहीं हा जर सिद्धांत, तर हा सिद्धांत ठाऊक असूनहि पूर्वींच्या देवतांनीं व ऋषींनीं निरनिराळीं पापकर्में केलीं; व तीं करूनहि त्यांना त्याचें फल भोगावें लागलें नाहीं हें कसें? यावर उत्तर एवढेंच कीं, तीं कर्में मुनींनीं केलीं म्हणून आपण करूं नयेत, व शहाण्या पुरुषानें असल्या गोष्टी ऐकून त्यांची निंदाहि करूं नये.

हे राजा, मनाशीं पूर्ण विचार करून, आपणांला काय शक्य आहे तें पाहून त्याप्रमाणें शुभ कर्माचें जो आचरण करतो त्यालाच कल्याणाची प्राप्ति होते. कच्च्या मातीच्या मडक्यांत पाणी ठेविलें तर तें झिरपून झिरपून कमी होतें. व पक्क्या घड्यांतलें पाणी कमी न होतां अनायासानें तसेंच रहातें. मडक्यांत पूर्वींचें पाणी शिल्लक असतांना त्यांतच आणखी पाणी घातलें तर तें पूर्वींचें पाणी जास्तच वाढतें. हें जसें पाण्याचें तसेंच कर्माचेंहि आहे. केलेलें कर्म पुण्यकारक वा पापकारक असो, ज्याच्या कर्माचें बुद्धिपुरःसर आचरण आपले हातून घडतें त्या त्या कर्माची पूर्वकर्मांत भरच पडत जाते.

उन्मत्त शत्रूंचा उच्छेद करावा, प्रजांचें योग्य प्रकारें पालन करावें, नानाविध यज्ञांनीं अग्नीचें संचयन करावें व मध्यम वयांत वैराग्य उत्पन्न झाल्यास मध्यम वयांत आणि वृद्धपणीं मात्र मनाच्या विरक्त अथवा अविरक्त अशा कोणत्याहि स्थितींत वनांत जाऊन वास करावा, हें राजाचें कर्तव्य होय. धर्मशील व दान्त पुरुषानें सर्व भूतें आपल्यासारखींच आहेत असें जाणून सर्वत्र समभाव ठेवावा.

आपणांला ज्ञान देणारें आपणांहून श्रेष्ठ असे जे कोणी असतील त्यांचा यथाशक्ति सन्मान करावा, व स्वतःच्या सत्याचरणानें व शीलानें त्यांना समाधान होईलसें करावें. १२. ३. २९१.

## अध्याय २९२ वा.

[ पराशरगीताः दानमहिमा. ]

**पराशरः**—या जगांत कोणीं कोणावर उपकार करीत नाहीं, व कोणीं कोणाला कांहीं देतघेत नाहीं. प्राणिमात्र एवढी धडपड करून जीं कर्में करतात तीं केवळ स्वतःसाठीं, आपला स्वार्थ साधण्यासाठीं—होत. अधिकारावरून च्युत झालेल्या प्रत्यक्ष सख्या भावाचाहि लोक निष्ठुरपणें त्याग करतात, मग इतर परक्या माणसांची गोष्ट कशाला? समान दर्जाचीं माणसें जें एकमेकांना देतात व घेतात त्यांच्या त्या दानप्रतिग्रहांची योग्यता धर्मशास्त्रदृष्ट्या सारखीच असते. त्यांतल्या त्यांत प्रतिग्रहापेक्षां दान श्रेयस्कर व ब्राह्मणाला दिलेलें तर अधिकच श्रेयस्कर होय. जें धन न्यायानें मिळविलें असेल व न्यायानेंच वाढविलें असेल अशाच द्रव्याचें धर्मासाठीं म्हणून यत्नपूर्वक रक्षण करावें. धर्माचरणासाठीं

लागणारें द्रव्य पापमार्गानें मिळवूं नये. आपल्या शक्तीप्रमाणें सर्व कर्मे करावीं. आपली समृद्धि कशी होईल यावरच केवळ नजर देऊन अंगचोरपणा करूं नये. इंद्रियांचें दमन करून रहाणाऱ्या पुरुषानें आपल्या शक्तीप्रमाणें क्षुधार्त अतिथीला जरी नुसतें पाणी—तापविलेलें किंवा गार कसेंहि—दिलें तरी त्याला त्याच्या दानाचें श्रेय मिळतें. पूर्वी रन्तिदेव नांवाच्या राजानें फलमूलांनीं व पर्णांनींच मुनिजनांची पूजा केली व त्याला त्याच्या कर्माचें फल म्हणून इष्ट लोकांची प्राप्तिहि पण झाली. तसेंच, शैब्य नांवाच्या राजानें सूर्याची अशीच फलमूलांनींच व पर्णांनींच उपासना केली होती व त्यालाहि अढळ असें परमपद मिळालें. या जगांत मनुष्यप्राणी जन्माला येतो तो देवता, अतिथि, नोकरचाकर, आईबाप व स्वतः आपण इतक्यांचें ऋण घेऊन येतो. तेव्हां, यांचीं देणीं देऊन त्यानें ऋणमुक्त व्हावें. स्वाध्यायाचें अध्यापन करून ऋषिऋण; यज्ञकर्माचरणानें देवऋण; श्राद्धकर्मांनीं पितृऋण; योग्य सत्कारानें माणसांची बूज ठेवून, शास्त्रमय वाणीच्या उच्चारानें जीभ पवित्र ठेवून, पंचमहायज्ञांतील शेषान्न सेवन करून, भूतमात्रांवर दया दाखविल्यानें अप्रत्यक्ष रीतीनें एकप्रकारें आत्मरक्षण करून आत्मऋण फेडावें. नोकरचाकरांचा संसार आपला मानून त्यांच्यासाठीं कराव्या लागणाऱ्या गोष्टी करून भृत्यऋण फेडावें. द्रव्याची अनुकूलता नसतांहि केवळ ध्यानधारणादिकांनींच योग्यप्रकारें अग्निहोत्र पाळल्याचें श्रेय संपादून पुष्कळ मुनिजनांना सिद्धि प्राप्त झाल्याचीं उदाहरणें आहेत. यज्ञांत हविर्भाग घेणाऱ्या देवांचीं स्तोत्रें गाइल्यानें ऋचीकपुत्राला विश्वामित्राच्या पुत्रत्वाची पदवी प्राप्त झाली. देवदेवेश भगवान् शंकराची स्तुति केल्यामुळें उशनाऋषीला शुक्रत्व प्राप्त झालें, व देवी पार्वतीची स्तुति केल्यानें तो आकाशांत आपल्या यशोबलामुळें आनंदानें तळपूं लागला. असित, देवल, नारद, पर्वत, कक्षीवान्, जामदग्न्य, राम, आत्मनिष्ठ ताण्ड्य, वसिष्ठ, जमदग्नि, विश्वामित्र, अत्रि, भरद्वाज, हरिश्मश्रु, कुण्डधार, श्रुतश्रवा, इत्यादि ऋषि ऋचांच्या योगानें विष्णूची स्तुति करून समाधान पावते झाले व त्या भगवंताच्या कृपेनें त्यांना नुसत्या तपोबलानें सिद्धि प्राप्त झाली. पुष्कळ अनधिकारी पुरुषसुद्धां भगवान् विष्णूची स्तुति करून त्या उपासनाबलानें योग्यतेस चढल्याचीं उदाहरणें आहेत. या लोकीं निंद्य कर्मे करून त्या योगानें आपलें कल्याण होईल अशी हांव कधींहि धरूं नये. धर्ममार्गानें जाऊन जो अर्थलाभ होईल तोच प्रशस्त व खरा होय. अनीतीच्या मार्गानें झालेला अर्थलाभ हा निंद्य व अशाश्वत असतो.

धनलाभाच्या आशेनें शाश्वत स्वरूपाच्या धर्माचा त्याग कधींहि करूं नये. ज्या धर्मात्म्या पुरुषानें घरांत अग्निहोत्र ठेविलें असेल तो पुण्यवंतांतहि श्रेष्ठ होय. दाक्षिणात्य, गार्हस्पत्य व आहवनीय अशा तीन्ही अग्निस्वरूपांत वेद स्थित असतात. हे राजेंद्रा, ज्याचा कर्मलोप कधींहि होत नाहीं त्यालाच अग्निहोत्री म्हणावें. अग्निकुंड घरीं ठेवून कर्माचा लोप करण्यापेक्षां मुळींच अग्निहोत्र न ठेविलेलें बरें. अग्नि, आत्मा, जन्म देणारे आईबाप व गुरु इतक्यांची सेवा यथाशिस्त रीतीनें केलीच पाहिजे. जो पुरुष अभिमान सोडून वृद्धांची सेवा करितो, वासनाशून्य होऊन आत्मत्वाच्या जाणीवेचें सर्वांकडे दयार्द्र दृष्टीनें पाहतो, अशा हिंसाशून्य, आयासशून्य व धर्मनिष्ठ पुरुषालाच या जगांत मान मिळतो. १२. ३. २९२.

---

## अध्याय २९३ वा.

[ १ वर्णांच्या वृत्तींचें विवेचन. ]

पराशर—ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या त्रैवर्णिकांच्या सहवासांत राहून त्यांची सेवा करणें हाच शूद्रांचा परमश्रेष्ठ आचार होय. त्रैवर्णिकांनीं सांगितलेली सेवा शूद्रांनीं प्रेमानें केली म्हणजे त्यायोगानेंच ते धर्मिष्ठ होतात. पितृपितामहादि परंपरेनें चालत येणारें उपजीविकेचें शाश्वत साधन एकाद्याला मिळणारें नसलें तरी त्यानें सेवावृत्तिखेरीज इतर मार्गांनीं उपजीविका साधण्याचा प्रयत्न करूं नये. सेवावृत्तीचाच अवलंब करावा. आणि सेवा जी करावयाची ती सज्जनांचीच करावी, दुर्जनांची करूं नये. कसलीहि अवस्था प्राप्त झाली तरी धर्मनिष्ठ सज्जनांच्या सहवासांतच सेवेला तेज चढतें. उदयपर्वतावर असलेला पदार्थ त्याच्या सांनिध्यानें जसा शोभून दिसतो तसाच प्राणी जरी हीनवर्ण असला तरी सज्जनांच्या सांनिध्यांत शोभूनच दिसतो. पांढऱ्या वस्त्राला ज्या तऱ्हेचा रंग द्यावा त्या रंगाचें तें होतें. तसेंच हें आहे. म्हणून, मनुष्यानें गुणांकडेच तेवढें लक्ष द्यावें, दोषांत मन कधींहि घालूं नये. मनुष्याचें इहलोकींचें जीवित अशाश्वत व चंचल आहे. सुखाच्या काय किंवा दुःखाच्या काय कोणत्याहि स्थितींत जो शहाणा माणूस चांगल्या गोष्टी तेवढ्याच ग्रहण करितो त्यालाच शास्त्रवेत्ता म्हणतात. जें कर्म धर्माला धरून नाहीं त्यापासून फार मोठी फलप्राप्ति होते असें जरी कदाचित् सकृद्दर्शनीं दिसलें तरी सज्जनानें त्या कर्माचें आचरण

करूं नये. कारण, असलें कर्म कोणींहि हितकारक समजत नाहीं. प्रजांचें यथान्याय रक्षण न करितां एकादा राजा जरी हजारों गाई धरून आणून त्यांचें दान करूं लागला तरी तो केवळ नांवाचाच राजा ठरतो; पण, वस्तुतः तो चोरच होय. स्वयंभू ब्रह्मदेवानें प्रथम लोकांमध्यें पूज्य असलेला असा धाता निर्माण केला. नंतर या धात्यानें लोकांच्या पोषणाची कळकळ असणारा असा एक पर्जन्य रूपी पुत्र निर्माण केला. या पर्जन्याची सेवा करून वैश्यानें आपलें कृषिगोरक्ष्यादि कर्म करावें व अतिशय समृद्ध व्हावें. वैश्यांनीं निर्माण केलेल्या या संपत्तीचें रक्षण राजांनीं करावें व हव्यकव्य यज्ञांचें आचरण करणाऱ्या आणि ज्यांच्यामध्यें शाठ्य, क्रोध व वक्रता हीं नाहींत अशा द्विजांनीं त्याचा उपयोग करावा. शूद्रांनीं भूमि झाडून शुद्ध करणें वगैरे प्रकारची सेवा करावी. चारी वर्णांनीं याप्रकारें आचरण केल्यानें धर्मनाश होत नाहीं. धर्मलोप झाला नाहीं म्हणजे सर्व प्रजा सुखी होतात. प्रजा सुखी असल्या म्हणजे हे राजेंद्रा, स्वर्गींच्या देवतांना आनंद होतो. जो राजा प्रजांचें रक्षण करितो त्याची नुसता नांवाचा राजा म्हणून नव्हे तर प्रजारक्षक म्हणून पूजा होते. हें जसें राजांचें, तसेंच इतर वर्णांचें. जगांत, अध्ययन करणारा ब्राह्मण, द्रव्यार्जन करणारा वैश्य, व इंद्रियदमन करून नित्य सेवाधर्मांत रत रहाणारा शूद्र यांनांच मान मिळतो. हे राजा, यापेक्षां वेगळ्या रीतीचें आचरण जो करील तो स्वधर्मापासून च्युत होतो. स्वतःचें शरीर झिजवून न्याय्य मार्गानें मिळविलेल्या चार कवड्या जरी एकाद्यानें दान दिल्या तरी तेवढ्यानेंहि त्याला फार मोठें पुण्य लाभेल; व या दानाची सर दुसऱ्या (अन्याय्य मार्गानें मिळविलेल्या) हजारों रुपयांच्या दानाला येणार नाहीं. ब्राह्मणांचा सत्कार करून त्यांना जो राजा नित्य दान देतो त्याला त्या दानाचें अत्युत्कृष्ट फल मिळतें. मग तें दान कसलेंहि असो. सत्पात्र पाहून त्याच्या ठिकाणीं स्वयंप्रेरणेनें केलेलें व त्याचा संतोष संपादन करणारें दान हें सर्वश्रेष्ठ दान होय असें सांगतात. लोकांनीं मागितल्यावर दिलेलें दान हें मध्यम स्वरूपाचें होय व अवज्ञेनें आणि अश्रद्धेनें दिलेलें दान हें अधम स्वरूपाचें दान असें सत्यवादी शहाणे शहाणे ऋषि सांगतात. या संसारसागरांत गटंगळ्या खाणाऱ्या प्राण्यानें नानाप्रकारच्या उपायांनीं यांतून तरून जाण्याचा प्रयत्न करावा व गृहपाशाचा संसर्ग ज्यानें तुटेल अशा रीतीचा प्रयत्न करावा. ब्राह्मण हा दांत वृत्तीनें शोभतो, क्षत्रिय विजय मिळविल्यानें शोभतो, वैश्य द्रव्यार्जन करण्यानें शोभतो व सेवावृत्तीचा अवलंब केल्यानें शूद्र शोभतो. १२. ३. २९३.

## अध्याय २९४ वा.

[ १ कामक्रोधांचा विचार. ]

(१) **पराशर**—ब्राह्मणांनीं प्रतिग्रहानें मिळविलेलें, क्षत्रियांनीं युद्धांत लुटून आणलेलें, वैश्यांनीं आपला व्यवसाय करून न्यायानें मिळविलेलें व शूद्रांनीं सेवाधर्मानें मिळविलेलें द्रव्य कितीहि अल्प असलें तरी धर्मकार्यासाठीं तेंच द्रव्य योग्य होय. त्रैवर्णिकांची नित्य सेवा आपल्या हातून घडावी अशी इच्छा धरणारा तो शूद्र होय. ब्राह्मणाला प्रतिग्रह मिळेनासा झाला तर आपद्धर्म म्हणून उपजीविकेसाठीं त्यानें क्षत्रियाची किंवा वैश्याची वृत्ति पत्करावी त्यानें तो पतित होत नाहीं. पण, शूद्राची वृत्ति पत्करल्यानें मात्र ब्राह्मण पतित होतो. वृत्तीचें स्वतःचें साधन नाहींसें झालें असेल त्यावेळीं वाणिज्य, पशुरक्षण व शिल्पादिकला यांचा अवलंब वृत्तीसाठीं शूद्रानेंहि करावा. रंगभूमीवर सोंगें घेणें; जलमंडपिकेसारखे कळसूत्री बाहुल्यांचे खेळ दाखविणें; मद्य, मांस, लोखंड व कातडीं विकणें हे धंदे मात्र ज्यांच्या वंशांत ते पितृपितामहादि परंपरेनें चालत आलेले नसतील त्यांनीं करूं नयेत. हे धंदे परंपरागत आलेले असले तरी त्यांचा त्याग करण्यानें हातून मोठा धर्म घडतो असें श्रुति सांगते. अन्नवस्त्राची ददात नसतांहि जो मनुष्य उन्मत्तपणाच्या आधीन होऊन पापकर्माचरण करतो त्याचें तें कर्म केव्हांहि निषिद्धच होय. पूर्वीं प्रजा दमनशील, धर्मनिष्ठ व न्याय्य-मार्गानें चालणाऱ्या अशा असल्यामुळें त्यांना ‘ धिक्कार ’ एवढाच दंड पुरेसा होई असें पुराणग्रंथांत सांगितलें आहे. हे राजा, इहलोकीं मनुष्याला धर्माचरणच श्रेष्ठ म्हणून सांगितलें आहे. धर्मनिष्ठ पुरुष नेहमीं गुणांचेंच सेवन करितात. मनुष्यां-मध्यें वाढत चाललेलें हें धर्माचरण असुरांच्या डोळ्यांत खुपूं लागलें तेव्हां, हळू-हळू वाढत जाऊन त्यांनीं प्रजांच्यामध्यें प्रवेश केला. पहिल्या प्रथम दर्प प्रजांच्या-मध्यें शिरला व त्यानें धर्मनाशाला आरंभ केला. प्रजांच्यामध्यें गर्वाचें अधिष्ठान झाल्याबरोबर क्रोधानेंहि त्याच्या मागोमाग तेथें प्रवेश केला. गर्व व क्रोध यांनीं आविष्ट होतांच प्रजांच्या हातून लज्जास्पद वर्तन घडूं लागलें. पुढें पुढें त्यांची लज्जाहि नाहींशी होऊन सर्व प्रजा मोहव्याप्त झाल्या. मोहानें ग्रासल्यामुळें त्यांची विवेकदृष्टि नाहींशी झाली व मन मानेल त्याप्रमाणें आपसांत भांडून त्या ऐहिक सुख मिळविण्याचा प्रयत्न करूं लागल्या. अशा प्रजांचा निरोध करण्याचें काम पूर्वीप्रमाणें नुसत्या धिग्दण्डानें आतां होईनासें झालें; व देव व ब्राह्मण यांचा अवमान करून प्रजा विषयसुखांतच गुंग होऊन राहिल्या.

हें पहातांच, सर्व देव मिळून, सर्वश्रेष्ठ, सर्वगुणसंपन्न, अनंतरूपी, धैर्यशील व जगाचें नेहमीं कल्याणच करणारा असा जो श्रीशंकर त्याला शरण गेले. तेव्हां शंकरांनीं आकाशांत विहार करणाऱ्या त्या राक्षसांना त्यांच्या पुरांसकट खालीं पृथ्वीवर पाडलें. शंकरांचा बाण मूळचाच सामर्थ्यवान् त्यांतहि देवांच्या इच्छा-सामर्थ्यामुळें त्याचें तेज वाढलेलें, त्यामुळें त्या एकाच बाणानें ते तीन राक्षस तीन ठिकाणीं होते तरी त्यांचा संहार होऊं शकला. या तीन राक्षसांचा मुख्य, अतिपराक्रमी व महाभयंकर असा जो मोह त्याचा शूलपाणि शंकरांनीं वध केला. त्याचा वध होतांच सर्व मनुष्यप्राणी फिरून ठिकाणावर आले व सर्व शास्त्रें व सर्व वेद यांच्यावरची त्यांची पूर्वींची निष्ठा पुनः जागृत झाली. स्वर्गांत सर्व सप्तर्षींनीं इंद्राला देवराज्याचा अभिषेक केला, व प्रजांचें यथान्याय पालन करण्याचा व त्यांना धर्मानें वागावयास लावण्याचा अधिकार त्यांनीं आपल्याकडे घेतला. सप्तर्षींच्या नंतर विपृथु नांवाच्या राजाकडे हा अधिकार आला व निरनिराळ्या मण्डलांत निरनिराळे क्षत्रिय राजे हा अधिकार चालवूं लागले. याप्रमाणें दर्प, क्रोध व मोह यांचा एकवार शंकरांनीं नाश केला. परंतु, पूर्वींचे जे महाकुलीन व वृद्ध वृद्ध लोक होते अशांच्याहि हृदयांतून हा आसुरभाव समूळ नष्ट झाला नाहीं. दर्प, क्रोध व मोह या तामस भावांचें उच्चाटन कोणत्याहि प्रकारें केलें तरी त्यांचें निर्मूल असें उच्चाटन होत नाहीं. म्हणून, महापराक्रमी राजांनींसुद्धां या राक्षसी भावांना बळी पडून तामस कर्में मोठ्या आवडीनें—आसक्तबुद्धीनें—केलीं, व त्यांचीच प्रतिष्ठा त्यांनीं वाढविली. त्यांचें पाहून, त्यांच्याहूनहि मूर्ख असलेले लोक तामस कर्मांचीच प्रतिष्ठा गातात, व अद्यापिहि त्यांचेंच सेवन करतात. म्हणून हे राजन्, शास्त्रांनीं प्रमाण मानलेला असा, शास्त्रविचारावरून ठरविलेला सिद्धांत मीं तुला सांगतों, तो हा कीं, मनुष्यानें नेहमीं आत्मज्ञान मिळविण्याचा प्रयत्न करावा व हिंसामय कर्म नेहमीं टाळावें. म्हणजे दर्प, क्रोध व मोह यांचा प्रादुर्भाव होणार नाहीं. शहाण्या माणसानें धर्मकृत्यासाठीं सुद्धां अन्याय मार्गानें व निषिद्ध साधनांनीं द्रव्यसंचय करूं नये; मग, स्वतःच्या वृत्तीसाठीं तर नाहींच नाहीं. कारण, त्यांत कल्याण होत नाहीं असें शास्त्र सांगतें. हे राजा, तूं अशा प्रकारचा दमनशील, शूर क्षत्रिय आहेस व तुझे बांधव तुला प्रियहि आहेत. तूं प्रजा, भृत्यवर्ग व पुत्र यांचें स्वधर्मानेंच पालन कर. या जगांत इष्ट गोष्टींचीच प्राप्ति नेहमीं होते असें नाहीं, कांहीं वेळेला अनिष्ट वस्तुहि पत्कराव्या लागतात. इष्ट व अनिष्ट अशा दोन्हीं प्रकारच्या गोष्टी

ज्या जगांत दिसतात तेथें कांहींबद्दल वैर व कांहींबद्दल प्रेम अशा भावना उत्पन्न होतात. शिवाय, या संसाराच्या यातायातींत मनुष्याला सहस्त्रावधि जातींतून फिरावें लागतें. म्हणून, तूं जगांतल्या चांगल्या गोष्टींकडेच पहा, गुणांतच अनुरक्त हो. दोषांकडे दृष्टि देऊं नकोस. मनुष्य कितीहि दुर्बुद्धि किंवा निर्गुण असला तरी त्याला त्याच्या गुणलेशांच्या कीर्तनानें संतोषच होतो. गुणांची आवड जशी गुणी माणसाला तशीच ती निर्गुणी माणसालाहि असते. धर्म व अधर्म या दोहोंची प्रवृत्ति मनुष्यांतच सांपडते. तशी ती मनुष्येतर जीवांत नाहीं. शहाण्या मनुष्यानें त्याला स्वतःला कांहीं मिळवावयाचें असलें वा नसलें तरी सदा धर्मशील व आत्मनिष्ठ वृत्तीनें राहावें व सर्वभूतांच्या ठिकाणीं अहिंसावृत्ति–अद्रोहवृत्तीच–ठेवावी. मनुष्याच्या मनावर कोरलेला वासनालेख ज्यावेळीं पुसला जातो, मन ज्यावेळीं निर्वासन होतें त्यावेळेस त्याचें अज्ञान नाहींसें होऊन त्याचें कल्याण होतें—त्याला ब्रह्मानंदाची प्राप्ति होते. १२. ३. २९४.

---

## अध्याय २९५ वा.

[ १ तपोमहिमा. ]

(१) पराशर—बाबा जनका, गृहस्थाचा आचार कसा असावा, त्यानें धर्माचरण कसें करावें हें मीं तुला आतांपर्यंत सांगितलें. आतां, तपश्चर्येचा विधि कसा तो मीं सांगतों तो ऐक. गृहस्थाश्रम करणाऱ्या पुरुषाच्या मनांत त्याच्या भोंवतालच्या वस्तूंबद्दल आसक्ति उत्पन्न होते. त्यामुळें विविध प्रकारचे राजस व तामस भाव उत्पन्न होतात आणि या भावांच्यामुळें ममत्व उत्पन्न होतें. गाईबैल, शेतीवाडी, पैसाअडका, बायकामुलें व नोकरचाकर यांचा संग मनुष्याला गृहस्थाश्रम केल्यानें जडतो. नित्य यांच्याच सहवासांत गृहस्थ आपलीं कर्में करीत असतो; म्हणून, यांचें अनित्यत्व त्याच्या ध्यानांत येत नाहीं. आणि त्यामुळें याचे रागद्वेषादि विकार वाढतात. मनुष्याच्या मनावर रागद्वेषांचा पगडा बसला, व तो एकदां द्रव्यमोहाच्या आधीन होऊन त्याच्याचमागें लागला, म्हणजे त्याच्या ठिकाणीं अज्ञानजन्य भोगलालसा उत्पन्न होते. विषयोपभोग ज्याला भोगावयास मिळतात तो भाग्यवान् असें समजून मनुष्य विषयांच्याच मागें लागतो; व विषयोपभोगापासून मिळणारें अत्यल्प ग्राम्य

सुख हाच परम श्रेष्ठ लाभ होय–याच्या परता लाभ नाहीं–असें मानूं लागतो. गृहस्थ एकदां असा लोभवश झाला म्हणजे त्याचा संग वाढतो; संगामुळें त्याला आपल्या भोंवतालचा परिवार वाढवावा असें वाटूं लागतें. या वाढलेल्या परिवाराच्या पोषणासाठीं तो अधिक द्रव्यलाभाची इच्छा धरितो, आणि मग, या द्रव्यासाठीं हा गृहस्थ जाणूनबुजून करूं नये त्या गोष्टी करूं लागतो. स्त्रीपुत्रादिकांवरील प्रेमामुळें हा द्रव्याचा दास होतो व मग हें द्रव्य नाहींसें झालें म्हणजे दुःखव्याप्त होतो. द्रव्यामुळें गृहस्थाला चारचौघांत मान मिळतो व मग स्वतःचा अपमान होऊं नये या गोष्टीला जपूं लागतो. ज्याच्या कर्मांनीं विषयोपभोगांचा अधिकांत अधिक लाभ होईल तीं तीं कर्में गृहस्थ करीत रहातो; व अखेर, त्यांतच त्याचा नाश होतो. फलासक्ति न धरतां, काम्य व निषिद्ध कर्मांचा त्याग करून शुभ कर्में तेवढींच करूं इच्छिणाऱ्या ब्रह्मनिष्ठ पुरुषांना शाश्वत सुखाचा लाभ होतो; विषयकर्दमांत लोळणारांना होत नाहीं. ज्यांचा लोभ धरावयाचा तो स्त्रीपुत्रादि परिवार आणि द्रव्य हींच नष्ट झालीं व नानाप्रकारच्या शारीरिक व मानसिक त्रासांमुळें गृहस्थ चोहोंकडून गांजला गेला, म्हणजे त्याला खेद उत्पन्न होतो. खेदामुळें आपण कोण हें ओळखण्याची इच्छा उत्पन्न होते व मग तो शास्त्रें शोधूं लागतो. हे राजा, शास्त्रार्थाचें ज्ञान झाल्यावर त्याला तपश्चर्येची वाट सांपडते व तो तपाचरणाचा निश्चय करितो. स्त्रीपुत्रादिकांपासून मिळणाऱ्या विषयोपभोगासाठीं धडपड करून संत्रस्त झालेला व सदसद्विवेक जागा होऊन तपश्चर्येच्या मार्गाला लागलेला पुरुष दुर्लभ आहे. तपश्चर्या ही सर्वांनीं करावी. ती हीन पुरुषांना सुद्धां विहित आहे. इंद्रियजय करून व दमनशील वृत्तीनें राहून केलेलें तपश्चरण हें स्वर्गप्राप्तीला कारणीभूत होऊं शकतें. पूर्वी सर्वव्यापी प्रजापतीनें तपाचरणाच्या योगानेंच प्रजा निर्माण केल्या. प्रजापतीनें पूर्व पूर्व जन्मांमध्यें ब्रह्मोपासना व निरनिराळया व्रतांचें आचरण करून तपश्चर्याच केली होती व त्याचें फल म्हणजे त्याचें प्रजानिर्मितिसामर्थ्य हें होय. अष्ट वसु, बारा आदित्य, एकादश रुद्र, अग्नि, अश्विनीकुमार, वायु, विश्वेदेव, साध्य, पितर, मरुद्गण, यक्ष, राक्षस, गंधर्व व सिद्ध इत्यादि सर्व देवगण आणि स्वर्गांत वास करणारे इतर जे कोणी त्या सर्वांना तपश्चर्येमुळेंच सिद्धि प्राप्त झालेली आहे. पूर्वी तपःसामर्थ्यानें ब्रह्मदेवानें जे ब्राह्मण निर्माण केले, त्यांना पृथ्वी व स्वर्ग हीं सारखींच वाटतात व त्यांचा संचार दोन्हीं ठिकाणीं अनिरुद्धपणें होतो. हें तपश्चर्येचें फल होय. मोठमोठ्या

कुलांत जन्मास आलेले व प्रजेकरितां सर्वस्वाचा होम करणारे राजे जे या पृथ्वीवर दृष्टीस पडतात तेंहि, हे राजा, तपश्चर्येचेंच फल होय. नानाप्रकारचीं रेशमीं वस्त्रें, उत्तमोत्तम दागिने, वाहनें, आसनें, नानाप्रकारचीं पेय द्रव्यें यांची प्राप्ति होणें हा तपश्चर्येचाच प्रभाव होय. मनाजोग्या हजारों रूपवती स्त्रिया मिळणें, राजवाड्यांत रहावयास सांपडणें हेंहि तपश्चर्येनेंच साध्य होतें. उत्तमोत्तम शय्या, विविधप्रकारचे भोज्य पदार्थ, मनांतील अभिप्रेत गोष्टींची प्राप्ति या सर्वांची प्राप्ति शुभकर्में करणारांनाच होते. या जगांत अशी एकहि गोष्ट नाहीं कीं जी तपश्चर्येनें प्राप्त होणारी नाहीं. ज्या पुरुषांना आत्मबोध झालेला नाहीं व म्हणून जे कृतकृत्य नाहींत अशांनीं तप केलें असतां त्यांच्या ठिकाणीं वैराग्य उत्पन्न होतें हेंच त्यांच्या तपश्चर्येचें फल होय. हे राजा, मनुष्य सुखी वा दुःखी कसाहि असो त्यानें आपल्या बुद्धीनें शास्त्राचें विचारपूर्वक अवलोकन करावें व लोभाचा त्याग करावा. असंतोषामुळें दुःख उत्पन्न होतें, लोभ धरला म्हणजे इंद्रियांच्या वृत्तींचा गोंधळ होतो, व मग, अभ्यास न ठेविल्या-मुळें विद्या जशी नष्ट होते तशी या लोभी पुरुषाची सारासारविचारशक्ति नाहींशी होते. सारासारविचारशक्ति संपली म्हणजे त्याची न्यायदृष्टी लोपते. म्हणून आपलें सुख संपुष्टांत आलें असें वाटूं लागतांच पुरुषानें तपश्चरण करावें. मनुष्याला जें हवेंसें वाटतें तें सुख, व ज्याचा द्वेष करावासा वाटतो तें दुःख होय. केलेल्या शुभकर्मांचें फल सुख, व जें शुभकर्म टाळलें—केलें नाहीं—त्याचें फल तें दुःख होय. निर्दोष तपश्चर्या केल्यानें प्राणिमात्राला सुखाची नित्य प्राप्ति होते, विषयोपभोगांचें सेवनहि करावयास सांपडतें व कीर्तीचाहि लाभ होतो. जो मनुष्य निष्काम तपश्चर्येचा त्याग करून सकाम कर्मांचें आचरण करतो त्याला त्या त्या कर्मांचें विषयात्मक—म्हणजे विषयोपभोगरूपी फल मिळतें; व अनेक अप्रिय गोष्टी, नानाप्रकारचा अपमान, अनेकविध दुःख त्याला भोगावें लागतें. धर्म, तपश्चर्या व दान यांचें आचरण खरोखर विहित असतांना, या पुरुषाला अविहित कर्म—निषिद्ध कर्म—करण्याची इच्छा होते व मग याच्या हातून पापकर्मेंच घडतात व त्यांचें फल जें नरक तेंच त्याला शेवटीं मिळतें. जो मनुष्य, सुखाच्या वा दुःखाच्या कसल्याहि स्थितींत सद्‌वृत्त सोडून चालत नाहीं, त्याला शास्त्रवेत्ता म्हणावें, तो शास्त्रविहित मार्गानें चालतो असें म्हणावें. हे राजा, शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध यांच्या सेवनानें जें सुख मिळतें तें धनुष्यापासून सुटलेला बाण जमिनीवर पडावयास जेवढा वेळ

लागतो तेवढा वेळच टिकणारें म्हणजे अत्यंत क्षणिक असें असतें. नंतर, या क्षणिक सुखाचा नाश झाला म्हणजे मनुष्याला पुनः तीव्र दुःख होतें. मूर्ख माणसांना अत्यंत श्रेष्ठ अशा मोक्षमुखाची आवड असत नाहीं. विषयोपभोगां-पासून दुःख होऊं लागलें व त्यांबद्दल अरुचि उत्पन्न झाली म्हणजे विवेकी पुरु-षाचे ठिकाणीं परमश्रेष्ठ असें मोक्षरूप फल प्राप्त करून देणारे शम दम इत्यादि गुण उत्पन्न होतात व हा पुरुष धर्ममार्गानें चालत असल्यामुळें काम व अर्थ यांची मात्रा त्याच्यापुढें चालत नाहीं. मुद्दाम त्यांच्यासाठीं प्रयत्न न करितां विषयोपभोगांची यदृच्छया प्राप्ति झाली तरच त्यांचें सेवन गृहस्थानें करावें; आणि प्रयत्नपुरःसर खटपट करून धर्माचरण करावें असें माझें मत आहे. चांगल्या कुळांत जन्माला आलेले, नित्य शास्त्रसंमत मार्गानें चालणारे असे मानी पुरुष जीं कर्में करितात तीं मूढ, दुर्बल व धर्मविमुख मनुष्यांच्या हातून होणें शक्य नाहीं. मनुष्यानें करावयाचें यज्ञादि कर्म फलभोगानें संपलें म्हणजे शास्त्र-वेत्त्या माणसांना तपश्चर्येवांचून दुसरें कर्मच करावयाचें उरत नाहीं. हे राजा, स्वधर्माचरण करूं इच्छिणाऱ्या गृहस्थानें अतिशय दक्ष राहून हव्यकव्यादि यज्ञकर्में करण्याची बुद्धि धरावी, व सर्वभावेंकरून हीं कर्में करावीं. सर्व नद्या व नद हे जसे सागरामध्यें सामावूं शकतात, सागर हा जसा त्यांचा आधार, त्या-प्रमाणेंच गृहस्थाश्रमांत सर्व आश्रम सामावतात, गृहस्थाश्रमच सर्व आश्रमांचा आधार होय. १२. ३. २९५.

---

## अध्याय २९६ वा.

[ १. भिन्न गोत्रें व संकरजाति यांची उत्पत्ति. ]

(१) **जनक**—हे महर्षे, ब्राह्मणादि जे निरनिराळे चार वर्ण सांगितलेले आहेत, त्यांपैकीं, प्रत्येकाला कृष्ण, धूम्र, नील, पीत, रक्त व श्वेत यांपैकीं निरनिराळे वर्ण–गति–प्राप्त होतात हें कसें? जो ज्याच्यापासून जन्माला आला तो तद्रूपच असतो अशी श्रुति आहे. मग, सत्त्वरूप ब्रह्मदेवापासून निर्माण झालेले हे जे चार वर्ण त्यांना निरनिराळी गति मिळते हें कसें? सत्त्वरजांच्या न्यूनाधिक्याचें प्रमाण एका ब्रह्मदेवापासून निर्माण झालेल्या प्रजांच्या ठिकाणीं सारखें असावयास पाहिजे तें कमीजास्त कसें?

**पराशर**—ज्याच्यापासून जो जन्मला तो तद्रूपच असतो हें जें तूं म्हणतोस तें, हे राजन्, खरें आहे; व हा न्याय तुझ्या म्हणण्याप्रमाणें ब्रह्मदेवाच्या सृष्टींतहि लागूं असावयास पाहिजे. परंतु, तपश्चर्येच्या कमीअधिक प्रमाणावरून हीन किंवा उत्कृष्ट जाति प्राण्याला प्राप्त होते. आई व बाप दोन्हींहि सात्त्विक असतील तर त्यांच्यापासून उत्पन्न होणारी संततीहि सात्त्विकच असते. पण, या दोघांपैकीं एक जर अवर—म्हणजे कमी दर्जाचा असेल तर ती संतति तितक्या मानानें हीन निपजते. धर्मवेत्ते लोक सांगतात कीं, सृष्टिकर्त्या प्रजापतीच्या तोंडांतून, हातांतून, मांड्यांतून व पायांतून सृष्टि उत्पन्न झाली. हे राजा, प्रजापतीच्या मुखांतून निर्माण झाले ते ब्राह्मण, बाहूपासून निर्माण झाले ते क्षत्रिय, मांड्यांपासून निर्माण झाले ते वैश्य व पायापासून निर्माण झाले ते शूद्र होत. हे पुरुषश्रेष्ठा पहिल्याप्रथम हे चारच वर्ण निर्माण झालेले होते. यांच्याखेरीजचे जे अधिक वर्ण दिसतात ते सर्व संस्कारामुळें निर्माण झालेले आहेत. क्षत्रियापासून ब्राह्मणीचे ठिकाणीं प्रतिलोमसंबंधानें उत्पन्न झालेला तो अतिरथ होय. अंबष्ठ, उग्र, वैदेहक, श्वपच ( चांडाळ ), पुल्कस, स्तेन, निषाद, सूत व मागध या जाति चारी वर्णांच्या अनुलोमसंबंधामुळें उत्पन्न होतात.

**जनक**—एकाच ब्रह्मदेवानें उत्पन्न केलेल्या मनुष्यांत गोत्रभिन्नतेमुळें उत्पन्न होणारें नानात्व हें कसें झालें ? हे मुनिश्रेष्ठा, मनुष्यसमाजांत गोत्रें तर अनेक दिसतात. हीं कशीं झालीं ? पुष्कळसे ऋषि हीनक्षेत्रांत जन्माला येऊनसुद्धां त्यांना हीन जाति प्राप्त झाली नाहीं; असें इतिहास सांगतो. उच्चक्षेत्रांत किंवा हीन क्षेत्रांत जन्मास येऊनहि या ऋषींची जाति तीच राहिली हें कसें ?

**पराशर**—राजा, तपश्चर्येच्या योगानें पवित्र झालेल्या महात्म्यांची उत्पत्ति हीनवर्णापासून झाली कीं कशी झाली याची चिकित्सा करूं नये. मुनिजनांनीं वाटेल त्या क्षेत्रांत प्रजोत्पत्ति केलेली आहे व आपल्या तपःसामर्थ्यानें आपल्या पुत्रांना ऋषिपदवी दिलेली आहे. माझे आजोबा, ऋष्यशृंग, काश्यप, वेद, ताण्ड्य, कृप, काक्षीवत्, कमठ, यवक्रीत, द्रोण, आयु, मतंग, दत्त, द्रुमद व मात्स्य या सर्वांना, हे विदेहाधिपा, त्यांच्या त्यांच्या तपोबलानेंच त्यांची पदवी प्राप्त झालेली आहे. हे वेदवेत्ते ब्राह्मण स्वतःच्या इंद्रियजयाच्या जोरावर व व तपोबलावरच योग्यतेला चढले आहेत. हे राजा, मूल गोत्रें निर्माण झालीं तीं आंगिरस, कश्यप, वसिष्ठ व भृगु एवढीं चारच होतीं. पुढें कर्मभेदामुळें या चारांचीं अनेक गोत्रें झालीं. जशीं कर्मभेदामुळें निरनिराळीं गोत्रें निर्माण झालीं

तशींच कर्मकर्त्यांच्या तपःप्रभावानें त्यांना निरनिराळीं नांवेंहि पण मिळालीं. आचारधर्मांचें पालन करीत असतां हाच गोत्रभेद पाळला जातो.

**जनक**—भगवन्, आतां निरनिराळ्या वर्णांचे विशिष्ट धर्म कोणते, व सर्व वर्णांना सामान्य असे आचार कोणते तें मला सांगा. आपण सर्वकुशल आहांत म्हणून मीं आपणांस हें विचारीत आहें.

**पराशर**—प्रतिग्रह, यज्ञकर्म व अध्ययन हे ब्राह्मणाचे विशेषधर्म होत. प्रजांचें यथान्याय रक्षण करणें हें क्षत्रियाचें विशेष कर्म; कृषि, पशुपालन व वाणिज्य हें वैश्याचें विशिष्ट कर्म तर त्रैवर्णिक द्विजांची सेवा हें शूद्राचें विशिष्ट कर्म होय. हे राजा, चारी वर्णांचे विशेषधर्म मीं तुला सांगितले; आतां, सर्वांना साधारण असे धर्माचार कोणते ते मीं तुला विस्तारानें सांगतों तें ऐक. सौजन्य, अहिंसा, सावधानता, सर्व गोष्टींचा उपभोग इतरांसहवर्तमान घेण्याची बुद्धि, श्राद्धकर्म, आतिथ्य, सत्य, क्रोधराहित्य, स्वस्त्रीचे ठिकाणीं संतोष, पावित्र्य, निर्मत्सरबुद्धि, आपण कोण याची जाणीव व सहिष्णुता हे तेरा सर्व वर्णांना साधारण असे धर्म आहेत. हे पुरुषश्रेष्ठा, ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य हे तीन वर्ण द्विज होत. या सर्वांना या पूर्वोक्त धर्मांचा अधिकार आहे. त्रैवर्णिक द्विजांनीं आपलें कर्म टाकून अकर्म केलें तर त्यांचा अधःपात होतो; व चांगल्या श्रेष्ठ माणसांचा कित्ता डोळ्यांपुढें ठेवून त्यांनीं स्वकर्माचरण केल्यास त्यांची उन्नति होते. शूद्रासंबंधानें त्याचा अधःपात होतो असें निश्चित विधान कोठेंहि नाहीं व तसेंच त्याला संस्काराधिकार आहे असेंहि कोठें म्हटलेलें नाहीं. जशा या दोन गोष्टी तसेंच धर्माचरणाचा निषेधहि शूद्राला सांगितलेला नाहीं. अहिंसादि धर्मांचें आचरण शूद्रालाहि विहित असून त्याचें फल त्याला मिळतें इतकेंच नव्हे, तर विद्वान् ब्राह्मण अशा शूद्राला प्रजापतीच्या–ब्राह्मणाच्या–योग्यतेचा समजतात. मीं मात्र अशा शूद्राला जगाचें मुख्य कारण जो भगवान् विष्णु तत्तुल्य म्हणजे क्षत्रियाच्या योग्यतेचा मानतों. स्वोद्धाराची इच्छा धरणारे शूद्र सज्जनांचा कित्ता पुढें ठेऊन मंत्रोच्चार न करतां कल्याणकारक कर्में करतील तर त्यांत त्यांना कोणत्याहि प्रकारचा दोष नाहीं. जगांतील सर्व माणसें जसजसा सद्वृत्ताचा अवलंब करतील—सज्जनांच्या मार्गानें जाऊन चांगलीं कर्में करतील तसतसें त्यांना सुख प्राप्त होऊन इहपरलोकीं आनंद होईल.

**जनक**—हे महामुने, मनुष्याला हीनत्व येतें तें त्याच्या जातिमुळें येतें कीं

कर्मांमुळें येतें असा मला या ठिकाणीं संशय उत्पन्न झाला आहे. तेव्हां, आपण याचा उलगडा करावा.

**पराशर**—हे महाराजा, या संबंधांत जातिदोष व कर्मदोष हे दोन्हींहि कारण आहेत; परंतु, त्यांतल्या त्यांत या दोहोंत फरक काय तो सांगतों ऐक. जातिदोष व कर्मदोष यांपैकीं कर्मदोष अधिक जाचक होय; म्हणून, जातिदोषाची पर्वा न करतां मनुष्यानें दुष्ट कर्मांचा त्याग करावा. हीनजातींत जन्माला येऊन जो दुष्ट कर्म करीत नाहीं तो धन्य होय. तसेंच उच्चवर्णांत जन्माला येऊन जो निंद्य कर्में करतो त्याचा त्या कर्मदोषांमुळें अधःपात होतो. म्हणून, दुष्ट कर्मांचें आचरण केव्हांहि चांगलें नव्हे.

**जनक**—हे द्विजश्रेष्ठा, या जगांत अशीं कोणतीं धन्य कर्में आहेत कीं ज्यांच्या आचारामुळें प्राणिमात्रांचें कधींहि अकल्याण होत नाहीं?

**पराशर**—'कोणाचेंहि अकल्याण न करितां जीं कर्में मनुष्याचें नेहमींच रक्षण करितात तीं कोणतीं' असें तूं मला विचारलेंस. तीं कर्में मीं तुला सांगतों ऐक. जे पुरुष गार्हस्था धर्मांत ठेवलेलें अग्निहोत्र संपवून–यज्ञयागादिक कर्मांचा त्याग करून, शांत चित्तानें, क्रमाक्रमानें मोक्षाला नेणाऱ्या योगमार्गाकडे वळतात त्यांना तूं जीं कर्में विचारिलींस त्यांचा बोध व्यवस्थित होतो. या अतिशय सूक्ष्म बुद्धीच्या, श्रद्धावान्, दमनशील, विनयसंपन्न अशा पुरुषांना कोणत्याच कर्मांचा दोष लागत नाहीं व ते अव्यय अशा स्थानाला–मोक्षाला–जातात. हे राजा, धर्मकार्यें चांगल्या रीतीनें करून, नेहमीं सत्य आचरण ठेवून, या मनुष्यलोकीं अधर्म टाळल्यानें मनुष्य स्वर्गाला जातो याबद्दल विचार–करीत बसण्याचें कारणच नाहीं; इतकी ही गोष्ट निःसंदिग्ध आहे. १२. ३. २९६.

---

## अध्याय २९७ वा.

[ १. गतिवर्णन ]

(१) **पराशर**—पिता, स्नेही, गुरु व गुरुपत्नी यांची सेवा भक्तिहीन निर्गुणांना कधींच लाभदायक होत नाहीं. जे अनन्यभक्त आहेत, जे वाचेनें नेहमीं गोड बोलतात, कल्याणकारक कर्में करतात, व पित्रादिकांच्या आज्ञेंत वागतात अशांनाच त्यांची सेवा कल्याणप्रद होते. मनुष्याला पिता हेंच परमश्रेष्ठ दैवत आहे. पित्याची योग्यता आईहूनहि श्रेष्ठ आहे. ज्ञानाचा लाभ घडवून देणारा जो गुरु

त्यालाहि पित्यासमान मानतात. शब्दस्पर्शादि विषय ज्यांनीं जिंकले त्यांना परमपदाची प्राप्ति होते. हे राजा, जो राजपुत्र रणांगणावर मारला जातो व ज्याचें दहन बाणांच्या चितेवर होतें त्याला देवांनाहि अत्यंत दुर्लभ असे लोक प्राप्त होतात व तो यथेच्छ स्वर्गसुख भोगतो. दमलेल्या, भ्यालेल्या, हातांतील शस्त्र गळून पडलेल्या, अश्रुपात करणाऱ्या, आपल्याकडे पाठ वळविणाऱ्या, शस्त्रकवचादि साधनें नसणाऱ्या, लढाईला उद्युक्त न होणाऱ्या, रोगी व याचना करीत असलेल्या पुरुषावर घाव घालूं नये. तसेंच, बाल व वृद्ध यांच्यावरहि घाव घालूं नये. जो आपल्या बरोबरीचा असून शस्त्रकवचादि साधनांनीं संपन्न असेल अशा क्षत्रियाच्याच अंगावर राजानें युद्धांत चालून जावें. युद्धांत मरण येणें असेल तर तें बरोबरीच्या माणसाच्या हातून यावें. आपल्याहून अधिक योग्यतेच्या माणसाच्या हातून मृत्यु आला तर तो विशेष होय. आपल्याहून हीन, भित्रा, कृपण अशा पुरुषाच्या हातून होणारा वध हा निंद्य वध होय. हे राजा, पापी, पापाचार करणाऱ्या हीन माणसाकडून आपला वध होण्याची पाळी आली तर तो वध पापस्वरूपच ठरतो व नरकाला कारणीभूत होतो. काळाच्या तडाक्यांत सांपडलेल्या मनुष्याचें रक्षण कोणींहि करूं शकत नाहीं; तसेंच ज्याचें आयुष्य अद्याप अवशिष्ट आहे त्याच्यावर कोणीं घालाहि घालूं शकत नाहीं. आपल्या स्नेहांतील मनुष्यांनीं हिंसात्मक कर्में करण्याचें मनांत आणलें तरी त्या सर्व कर्मांपासून आपण त्यांचें निवारण करावें. दुसऱ्याला दुःख देऊन स्वतः सुख भोगूं नये. तीर्थक्षेत्राच्या ठिकाणीं वास करणाऱ्या मोक्षेच्छु पुरुषाला तीर्थाच्या वाळवंटांत मरण येणें हें शुभावह होय. या देहत्यागाचे प्रकार दोन आहेत. आयुष्य क्षीण झाल्यामुळें येणारा सहज मृत्यु हा एक; व तीर्थावासांत मृत्यु यावा या इच्छेनें अन्य साधनांनीं—म्हणजे जलसमाधि घेणें वगैरे प्रकारांनीं—मुद्दाम ओढवून आणलेला मृत्यु हा दुसरा. दोन्हीं ठिकाणीं मृत्यु हा तीर्थक्षेत्राच्या ठिकाणीं घडत असल्यानें सारखाच मोक्षावह आहे. परंतु, दुसऱ्या प्रकारांत कर्मभोग भोगून संपण्यापूर्वींच हटयोगानें मृत्यु ओढवून आणलेला असतो; म्हणून, शेषकर्मभोग भोगण्यासाठीं याला पुनः देहप्राप्ति होते. हटयोगानें देहत्याग करणाराला यातनाशरीराची प्राप्ति होते. हें यातनाशरीर मनुष्यानें केलेल्या आत्महत्येचें फल भोगण्यासाठींच प्राप्त झालेलें असल्यानें त्याच्यापुढें त्याला पुनः शरीरप्राप्ति होत नाहीं. एकादा

प्रवासी वाटेंतल्या वाटेंतच एका घरांतून दुसऱ्या घरांत शिरला म्हणजे त्याला ठिकाणावर जाण्यास जसा उशीर होतो तसाच मोक्षेच्छु पुरुषानें हटयोगानें मरण ओढवून आणल्यास त्याच्या मार्गांत यातनाशरीराचा अडथळा येतो एवढेंच; व हें यातनाशरीरहि रुद्राच्या पिशाचगणांत प्राप्त होत असल्यानें हाहि अखेर मोक्षास जातो. अध्यात्मशास्त्राचा विचार करणारे पुरुष, कातड्याच्या पांघरुणाखालीं झांकलेल्या, घाणेऱ्या अमेध्य गोष्टींनीं भरलेल्या, शिरा, अस्थि व स्नायु यांच्या संघातानें बनलेल्या पंचमहाभूतें, इंद्रियें व त्रिगुण यांच्या मेळाव्याला शरीर म्हणतात. हटयोगानें शरीरनाश करणाराला प्राप्त होणारें यातनाशरीर हें या देहासारखेंच असतें व यांत वासनामय गुणांचा जरी अभाव असला तरी हें आकारानें मनुष्यदेहासारखेंच असतें. हें शरीर धारण करणारानें याचा त्याग केला म्हणजे हें निश्चेष्ट व चेतनारहित होतें, आणि यांतील पंचमहाभूतें स्वस्वरूपीं लीन झालीं म्हणजे भूमीवर पडतें. हे जनका, या शरीराचा नाश होण्याचे वेळीं ज्या ज्या वासना बीजरूपानें शिलक असतात त्या त्या वासनांना अनुसरून प्राण्यांना जन्म प्राप्त होतात; व तीं तीं कर्मफलें भोगण्याला योग्य असे देह त्यांना प्राप्त होतात. पण, सामान्य जनांचा हा न्याय यातनाशरीरें धारण करणाऱ्या पिशाचादि योनींतील प्राण्यांना मात्र लागू नाहीं. पिशाचादि योनींतील प्राण्याला त्याच्या पापाचा क्षय होईपर्यंत त्याचा पूर्वदेह प्राप्तच होत नाहीं. हे राजन्, एका देहाच्या त्यागानंतर लगेच दुसऱ्या देहाची प्राप्ति असा प्रकार त्याच्या ठिकाणीं होत नसून हा जीव आकाशांत फिरणाऱ्या महामेघाप्रमाणें कांहीं काळपर्यंत परिभ्रमण करीत रहातो, व पुढें योग्य अधिष्ठान प्राप्त झाल्यावर पुनः जन्मास येतो. राजा, मन हें इंद्रियांच्या पलीकडचें आहे व आत्मा हा मनाच्याहि पलीकडचा होय.

हे वैदेहा, प्राण्याला निरनिराळ्या ठिकाणीं मृत्यु आला तर स्थलभेदानें फलभेद कसा होतो त्याचें विवरण आतांपर्यंत झालें. आतां, प्राण्यांच्या अधिकाराअधिकारांतच भेद असेल तर त्यामुळें फलांतहि—गतींतहि—भेद कसा होतो तें सांगतों. या पृथ्वीवर जे अनेकविध प्राणी आहेत त्यांच्यामध्यें जंगम प्राणी श्रेष्ठ होत. जंगमांत द्विपाद श्रेष्ठ. द्विपदांमध्यें द्विज श्रेष्ठ. द्विजांमध्यें सुद्धां बुद्धिमान् प्राणी श्रेष्ठ. बुद्धिमंतांमध्येंहि ज्यांना आत्मज्ञान झालेलें आहे ते श्रेष्ठ व त्यांतहि योगैश्वर्याचा दर्प ज्यांना लेशहि नाहीं ते धन्यतम होत. जो मनुष्य जन्माला आला त्याला मरण हें ठेवलेलें हा निश्चित सिद्धांत होय. गुणसंसर्गाच्या योगानें

मनुष्यमात्र या नश्वर कर्मांचें सेवन करीत असतो. सूर्य उत्तर दिशेला फिरला असतां शुभ नक्षत्र व शुभ मुहूर्त यांवर ज्याला मृत्यु येतो तो प्राणी अत्यंत भाग्यशाली होय. हा मनुष्य भोंवतालच्या माणसांना त्रास न देतां, स्वतःच्या दुष्कृताचा नाश करून व शेवटपर्यंत यथाशक्ति कर्माचरण करून सहज मरणानें मरतो. विषप्रयोगानें, गळफांस घेण्यानें, अग्नींत जळण्यानें, चोरांच्या शस्त्रांनीं किंवा हिंस्र पशूंच्या हातून मृत्यू येणें हा पापांत गोंवणारा मृत्यु होय. मुद्दाम मृत्यु ओढवून आणण्याचे हे किंवा दुसरे बहुविध प्रकार आहेत. हे प्रकार पुण्यशील प्राण्यांना उपयोगांत आणावे लागत नाहींत. हे प्रकार उपयोगांत आणण्याची बुद्धि उत्पन्न होणें म्हणजे एक प्रकारें पापच होय. असो. हे राजन्, पुण्यवंतांचे प्राण स्वर्गमंडल भेदून वर ऊर्ध्व गतीला जातात. मध्यम प्रतीच्या माणसांचे प्राण येथेंच पृथ्वीवर घोंटाळतात. पापी माणसांच्या प्राणांना अधो-गति प्राप्त होते. या जगांत पुरुषांना अज्ञान हा एकच शत्रू असून त्याच्या तोडीचा शत्रू दुसरा कोणी नाहीं. या अज्ञानानें व्याप्त व प्रेरित होऊन मनुष्यप्राणी अनेक घोर व दारुण कर्में करितो. या अज्ञानाचा निरास करण्याचा मार्ग म्हणजे श्रुति व धर्म यांनीं सांगितलेल्या मार्गानें जाऊन वृद्धांची सेवा करणें हा होय. या मार्गाचा अवलंब शहाण्यांनीं करावा. हे राजन् अज्ञान-शत्रूचा निरास करणें ही गोष्ट प्रयत्नसाध्य असून बुद्धिरूपी बाणांनीं या शत्रूचा भेद केल्यास तो नष्ट होतो. ब्रह्मचर्याश्रमांत तपश्चर्या करून वेदाध्ययन करावें. गृहस्थाश्रमांत पंचकर्मेंद्रियांवर योग्य तऱ्हेचा दाब ठेऊन यज्ञादि कर्माचरण करावें. नंतर, स्वतःच्या वंशाची प्रतिष्ठापना योग्य तऱ्हेनें झालीसें पाहून धर्म-कामी व मोक्षकामी पुरुषानें अरण्याची वाट धरावी. उपभोगांनीं शरीराला सोडलें तरी मनुष्यानें शरीराची अवहेलना करूं नये. मनुष्यजन्म चांडाळयोनीं-तला असला तरी तो श्रेष्ठच होय. हे राजा, या जगांत मनुष्ययोनि ही अत्यंत श्रेष्ठ दर्जाची होय. कारण, या मनुष्ययोनींत जन्म घेतल्यानें शुभकर्में करून आत्मरक्षण करणें ही गोष्ट शक्य होते. 'या मनुष्ययोनींतून आपण नाश कसे पावणार नाहीं—आपल्याला याहीपेक्षां खालच्या योनींत जन्म न मिळण्यास आपण काय करावें ' याचा विचार करणारे पुरुष धर्माचरणच करतात याला श्रुति प्रमाण आहे. असें हें दुर्लभ मनुष्यशरीर प्राप्त झालें असतां त्याचा जो द्वेष करतो त्या वासनाव्याप्त पुरुषाच्या हातून धर्माचा अपमान घडतो व तो आपली स्वतःचीच फसवणूक करून घेतो. स्वतःच्या दृष्टींतील प्रेमळपणाचें

आभरण घालून दुसऱ्यांच्या सुखाचे पाजळलेले दीप जो विरक्त बुद्धीनें पाहण्यांत आनंद मानतो, त्यांचें सांत्वन करितो, त्यांना अन्नप्रदान करतो व त्यांच्याशीं गोड बोलून स्वतः सुखदुःखांची किंमत सारखीच मानतो त्या पुरुषाला परलोकीं मोठी योग्यता प्राप्त होते. सरस्वतीचें तीर, नैमिषारण्य, पुष्करतीर्थ हे व असेच दुसरे जे अनेक पुण्यप्रदेश पृथ्वीवर आहेत तेथें जाऊन तेथील तीर्थजलानें व तपश्चर्येनें शरीरशुद्धि करावी व तेथेंच त्या देहाचा त्याग करावा. तीर्थक्षेत्राच्या ठिकाणीं पवित्र तीर्थानें पावन होत असणाऱ्या शरीराला तेथेंच मृत्यु येणें श्रेयस्कर होय. तीर्थाच्या ठिकाणीं स्वाभाविक तऱ्हेनें मृत्यु येण्याचें भाग्य ज्यांच्या नशीबीं नाहीं, ज्यांचे प्राण घरांतच जातात त्यांना तिरडीवर घालून स्मशानांत नेणें व पवित्र प्रकारच्या विधीनें त्यांचें दहन करणें हेंच युक्त होय. इष्टि, पुष्टि, स्वतः यज्ञ करणें व दुसऱ्यांकडून ते करविणें, दान व इतर पुण्यकर्में करणें, सारांश, पितरोद्देशानें जें जें कार्य शास्त्रांनीं विहित म्हणून सांगितलें आहे तें तें सर्व स्वतःच्या कल्याणाची इच्छा असणारा प्रत्येक मनुष्य करीत असतो. हे जनका, धर्मशास्त्र, वेद, षडंगें, हीं सर्व क्लेशरहित कर्में करणाऱ्या पुरुषाचें नेहमीं कल्याणच करतात; त्याला श्रेयःप्राप्ती करून देतात.

भीष्म—हे युधिष्ठिरा, आतांपर्यंत तुला मीं जें हें सांगितलें तें सर्व पूर्वी महात्म्या पराशर मुनींनीं विदेहराज जनकाला त्याच्या कल्याणासाठीं सांगितलें होतें. १२. ३. २९७.

---

## अध्याय २९८ वा.

[ १ पराशरगीतेची समाप्तिः २ पूर्वोक्त विषयांचा उपसंहार. ]

( १ ) भीष्म—मिथिलाधिपति जनकराजानें हें सर्व ऐकून त्या महात्म्या पराशरऋषींना 'धर्माचें परम निश्चित तत्व काय तें सांगा' असा पुनरपि प्रश्न केला.

जनक—हे ब्रह्मन्, या जगांत आत्यंतिक कल्याण कशाला म्हणतात, परमश्रेष्ठ अशी गति कोणती, अधोगति प्राप्त न होण्याला मनुष्यानें काय करावें, व ज्या ठिकाणीं गेलें असतां मनुष्याला पुनरावृत्ति नाहीं असें ठिकाण कोणतें हें सर्व हे महामते, मला सांगा.

पराशर—हे ज्ञानस्वरूप जनका, अनासक्ति हेंच आत्यंतिक कल्याणाचें बीज होय. ज्ञानप्राप्ति हीच परागति. मनुष्यानें या लोकीं जें तपाचरण केलें असेल तेंच कायम टिकणारें असतें—त्याचा नाश होत नाहीं. सत्पात्रीं केलेलें दान जसें नष्ट होत नाहीं तशीच तपश्चर्याहि नष्ट होत नाहीं. अधर्माचे पाश तोडून मनुष्य जेव्हां धर्माचे ठिकाणींच रत होतो व सर्व भूतमात्रांना अभयदान देतो तेव्हां त्याला सिद्धि प्राप्त होते. जो सहस्रावधि गाई व शेंकडों अश्व दान देतो आणि सर्व भूतांना अभय देतो त्याच्या भोंवतालीं अभयच वावरत असतें म्हणजे तो स्वतः अभय स्थितींतच असतो. जो पुरुष बुद्धिमान् आहे तो विषयांत लोळून सुद्धां मनानें त्या विषयांबद्दल अनासक्त राहतो—विषयांत असून त्यांचा दास होत नाहीं. दुर्बुद्धि पुरुष मात्र प्रत्यक्ष विषयोपभोग घडत नसतांहि पुढें प्राप्त होणाऱ्या विषयसुखाचे आज मनोरे बांधून त्यांतच डोलत रहातो. कमलाच्या पानाला ज्याप्रमाणें पाण्याचा संसर्ग बाधत नाहीं त्याप्रमाणें प्रज्ञावान् पुरुषाला अधर्माच्या संसर्गाची बाधा होत नाहीं. अप्राज्ञ पुरुषाला मात्र, झाडाचा डिंक झाडाच्या सालीला चिकटतो त्याप्रमाणें, पाप अधिकाधिकच येऊन चिकटतें. कर्त्याला त्याच्या कर्माचें फल द्यावें याच कारणासाठीं अधर्म आहे; म्हणून, त्या कर्माचें फल भोगल्यावांचून अधर्मांतून कर्त्याची सुटका नाहीं. हें फल योग्य कालीं कर्त्याला प्राप्त होतें. ज्या पुरुषाला आत्मज्ञान झालेलें आहे अशा कृतात्म्या पुरुषाला अशा कर्मफलाची बाधा कधींच होऊं शकत नाहीं. बुद्धि व कर्मेंद्रियें यांचे अनिष्ट व्यापार ज्या दुरात्म्याला समजत नाहींत व जो शुभाशुभ कर्मांतच आसक्त बुद्धीनें लोळत रहातो त्यालाच कर्मफलाच्या बाधेचें मोठें भय असतें. मनुष्यानें योग्य रीतीनें वासनात्याग केला, क्रोध जिंकला म्हणजे त्यानें विषयसेवन केलें तरी त्याला पाप लागत नाहीं. शास्त्राच्या मर्यादेंत बांधलेला हा सेतु ढांसळत नाहीं इतकेंच नव्हे, तर नदींतील बांधामुळें मागील पाण्याचा प्रवाह जसा फुगतो त्याप्रमाणें या धर्मसेतूमुळें मनुष्याच्या तपोबलाची वृद्धीच होते. हे राजश्रेष्ठा, निर्मल रत्न ज्याप्रमाणें सूर्याचें सर्व तेज एकाग्रतेनें ग्रहण करतें त्याप्रमाणें जीव हा ब्रह्मतेजाचें ग्रहण करतो. तिळांना ताज्या ताज्या फुलांच्या ढिगांत वारंवार घातल्यानें त्याचा मूळचा गुण सूक्ष्मतर होत जातो त्याप्रमाणें सत्संगानें मनुष्याच्या अंगचा सात्विकपणाहि आश्रयाधिकाराप्रमाणें वाढत जातो. मोक्षप्राप्तीची इच्छा झालेला मनुष्य ज्यावेळेस स्त्री, धन, आपली श्रेष्ठ पदवी, वाहनादि सुखसाधनें व अनेकविध पुण्यकर्में इत्यादि सर्वांचाच त्याग करतो त्यावेळेस विषयांदिकापासून त्याची

बुद्धि पराङ्मुख होते. हे राजन्, इहलोकींच्या विषयोपभोगांतच लोळत राहून जो पुरुष आत्महिताची उपेक्षा करतो, ज्याला आत्महित कळेनासें होतें तो पुरुष मासा ज्याप्रमाणें गळाला लावलेल्या आमिषानें आकर्षिला जातो त्याप्रमाणें विषयामागें धांवणाऱ्या मनाबरोबर विषयांकडे ओढला जातो. इंद्रियादिकांचा संघात म्हणजे जसा देह, तसाच स्त्री, पुत्र, धन, धान्य इत्यादिकांचा संघात म्हणजेच मर्त्यलोकींचा संसार होय. हा केळीच्या खुंटाच्या अंतरंगाप्रमाणें निःसत्व असतो व फुटकी नाव पाण्यांत बुडावी त्याप्रमाणें याचा नाश होतो. मनुष्यानें धर्माचरण केव्हां करावें याचा नेमलेला असा कोणताच काल नाहीं. मृत्युमुखांत आपण नेहमींचेच उभे आहोंत असें समजून नेहमींच धर्माचरण करीत असावें. मोक्षमार्ग हा अगोचर असला तरी अंधळ्या मनुष्याला ज्याप्रमाणें स्वतःच्या घरांत अभ्यासामुळें वावरतां येतें त्याप्रमाणेंच गुरूच्या उपदेशाप्रमाणें सतत अभ्यास ठेवला तर मोक्षेच्छु पुरुष अचूक मोक्षमार्गालाच लागतो. जन्म आहे त्या ठिकाणीं मरण आहे व मरण आहे त्या ठिकाणीं जन्महि आहे. मोक्षधर्माचें स्वरूप ज्याला कळलें नाहीं असा पुरुष या रहाटगाडग्याच्या चक्रांत सांपडून फेरे खात असतो. बुद्धिमार्गानें—ज्ञानमार्गानें जाणाऱ्या पुरुषाला इहपरलोकीं सुखप्राप्ति होते. वैतानिक यज्ञासारखीं विस्तृत तंत्राचीं कर्में क्लेशदायक होतात व अग्निहोत्रासारखीं संक्षिप्त तंत्राचीं कर्में हीं सुखावह होतात. सर्व विस्तृत तंत्राचीं कर्में जीं आहेत त्यांचीं फलें अनात्मभूत—अर्थात् आत्मविलक्षण जे विषय—तद्रूपच असतात. त्याग हाच खरा आत्महित साधणारा होय. कमलाच्या देंठाला लागलेला चिखल ज्याप्रमाणें ताबडतोब निघून जातो त्याप्रमाणेंच आत्मा हा मनोबंधांतून मुक्त होतो.

मन हें आत्म्याच्या ठिकाणीं योगप्रवणता उत्पन्न करितें—मन हेंच आत्म्याला योगमार्गाला लावितें, व मग जीवात्मा या मनाच्या साहाय्यानेंच योगमार्गाचें आक्रमण करितो. मनाच्याच सहाय्यानें योगप्रवण झालेला व योगमार्गाला लागलेला जीवात्मा ज्यावेळेस योगारूढ होऊन मनालाच स्वतःच्या ठिकाणीं लीन करितो त्यावेळेस त्याला परमात्मस्वरूप दिसतें—जीवाला शिवाची ओळख पटते. इंद्रियांच्या निरनिराळ्या विषयांतच रमून जाऊन त्या त्या विषयांचा उपभोग घेणें हेंच स्वतःचें कार्य होय असें जो मूढपणें समजतो त्याला स्वकार्याचें ज्ञान मुळींच होत नाहीं, तो योगमार्गापासून भ्रष्ट होतो. पक्क्या भाजलेल्या मातीच्या भांड्यांतून ज्याप्रमाणें पाणी स्रवत नाहीं, त्याप्रमाणें तपश्चर्येनें परिपक्क

बनलेल्या शरीरानें कितीहि विषय भोगले तरी त्याचा त्या विषयामुळें नाश होत नाहीं. विषयसुखांत लोळणाऱ्या पुरुषाला मोक्षसुखाची प्राप्ति होणें नाहीं हा सिद्धांत होय. परंतु, जो विषयांचा त्याग करण्यास प्रवृत्त होतो तोच विषयोपभोग घेण्यास लायक होय. मार्ग धुक्यानें व्याप्त झाला असतांना मनुष्याला ज्याप्रमाणें पुढचा रस्ता दिसत नाहीं, त्याप्रमाणें अज्ञानानें व्याप्त झालेल्या व शिश्न आणि उदर यांच्यांतच मग्न झालेल्या मनुष्याला ज्ञानमार्ग दिसत नाहीं. त्याची स्थिति एकाद्या जन्मांधाप्रमाणें होते. समुद्रावर व्यापार करणारा वाणी ज्याप्रमाणें स्वतःच्या मूळ भांडवलावर मिळूं शकेल तेवढाच नफा मिळवूं शकतो त्याप्रमाणेंच हा भवार्णवावर फिरणारा प्राणीहि पण स्वतःच्या कर्ममार्गानें मिळूं शकणारी गतीच मिळवितो. अधिकाची प्राप्ति त्याला होऊं शकत नाहीं. दिवसरात्रीच्या मापांनीं मनुष्यशरीराचें मापन करणारा काल या मर्त्यलोकाला व्यापून राहिला आहे. अशा या कालव्याप्त मर्त्यलोकांत मृत्यु हा म्हातारपणाचें रूप घेऊन वावरत असतो, व सर्पानें वायुभक्षण करावें त्याप्रमाणें भूतमात्राचा ग्रास करितो. जन्मास आलेला प्रत्येक प्राणी आपापल्या कर्मांचींच फलें भोगीत असतो. इहलोकीं कोणींहि फुकटचें सुखदुःख मिळवूं शकत नाहीं. पूर्वजन्मीं कांहीं न करितां इहजन्मीं कोणालाच सुख काय किंवा दुःख काय कांहींच मिळूं शकत नाहीं. मनुष्य निजलेला असो, हिंडत असो, बसलेला असो वा विषयभोगांत मग्न झालेला असो त्याचीं शुभाशुभकर्में त्याच्यापुढें येऊन उभीं रहातात. पाण्यांत पोहायला पडलेला मनुष्य एकदां परतीराला पोंचला म्हणजे जसा पुन्हां पाण्यांत उडी टाकूं इच्छित नाहीं तसाच या संसारमहार्णवांतून परतीराला पोहोंचलेला मनुष्य पुनः त्यांत पडूं शकत नाहीं. एकादा धीवर ज्याप्रमाणें पाण्यांत बुडालेली नौका, हातीं असलेल्या सुकाणूच्या दोरखंडाला धरून वर काढतो व तिला जशी पाण्यावर तरंगावयास लावतो त्याप्रमाणें मन हें भवार्णवांत बुडूं पाहाणाऱ्या शरीराला भावनांच्या दोरखंडांनीं वर खेंचतें व हा भवार्णव तरून परतीराला जाण्यास प्रवृत्त करतें. समुद्राच्या भोंवतालून सर्व बाजूंनीं त्यांत शिरणाऱ्या नद्या जसा त्याचा आश्रय करून त्यांतच लय पावतात तद्वत् योगारूढ झालेलें मन त्रिगुणांची साम्यावस्था जी मूलप्रकृति तिच्यामध्यें लय पावतें. नानाप्रकारच्या स्नेहपाशांनीं ज्यांचें मन जखडलेलें आहे असे अज्ञानानें व्याप्त झालेले पुरुष, पाण्यांत बांधलेली वाळूची इमारत ढांसळावी त्याप्रमाणें नाश पावतात. आपल्या शरीररूपी गृहाचे जे नामरूपादि धर्म ते आपलेच असें समजून चालणारा जीवात्मा अंत-

बाह्य पावित्र्याच्या तीर्थांत स्नान करून आत्मज्ञानाच्या किंवा देवतोपासनेच्या मार्गानें जाईल तर त्याला इहपरलोकीं सुख प्राप्त होईल. कर्मतंत्राचा विस्तृत पसारा हा क्लेशावह होतो व त्याचा जितका संक्षेप करावा तितका तो सुखावह होतो, विस्तृत कर्मतंत्रें हीं नश्वर फलप्राप्ति करून देणारीं असतात व त्याग हाच आत्महित साधून देणारा आहे असें मागें सांगितलेंच आहे. मित्राचें स्नेह-बंधन हें मानलें तरच आहे. तसेच आप्तस्वकीय हेहि पण स्वतःचा स्वार्थ साध-ण्यासाठीं आपले भोंवतीं गोळा झालेले असतात. बायको, मुलें, नोकरवर्ग हीं आपल्याच पैशावर चरण्यासाठीं जमलेलीं असतात. आई, बाप, कोणीं कोणाला कांहीं देत नाहींत. स्वर्गमार्गानें निघालेला प्राणी आपण केलेल्या दानाची पथ्यकर शिदोरी घेऊन चाललेला असतो; व तेथें स्वर्गांत आपल्या कर्मांचींच फलें भोगतो. हे राजा, सोन्याच्या नाण्यावरच्या राजमुद्रेच्या रेघा व आई, पुत्र, बाप, भाऊ इत्यादि नातलगांचा संबंध यांची किंमत सार-खीच होय. नाण्याची किंमत जशी त्यांतील सोन्यावर अवलंबून आहे, वरच्या शिक्क्याच्या रेघांवर नाहीं तशीच मनुष्याला प्राप्त होणारी गति ही त्याच्या कर्मांवर आहे. भोंवतालच्या माणसांच्या संबंधावर नाहीं. मनुष्यप्राण्यानें जीं जीं बरीं वाईट कर्में पूर्वीं केलेलीं असतील तीं तीं आपापलीं फलें कर्त्याच्या पदरांत घालण्यासाठीं त्याचे समोर जणूं उभीं असतात. कोणतेंहि कर्मफल उपस्थित झालें रे झालें कीं त्याचा उपभोग घेण्याविषयीं अंतरात्मा बुद्धीला प्रेरणा करीत असतो. स्वतः उद्योगाला आरंभ करून मग जो साहाय्यक मित्र गोळा करण्याच्या मागें लागतो त्याचें कोणतेंहि कार्य केव्हांहि थबकून रहात नाहीं; नेहमींच सिद्धीस जातें. चित्ताचें ऐकाग्र्य ज्याला साधलें, जो युक्त असून शूर, धीर व शहाणा असतो अशा पुरुषाला, ज्याप्रमाणें सूर्याला त्याचे किरण कधींच सोडून जात नाहींत त्याप्रमाणें, लक्ष्मी ही कधींहि सोडून जात नाहीं. जो पुरुष, आस्तिक्य, उद्योग, उपाय, निगर्वीपणा, व बुद्धिसामर्थ्य इतक्या साधनांनीं कार्याला आरंभ करितो त्याचें तें कार्य नेहमींच सिद्धीस जातें. सर्व प्राणिमात्रांना स्वतः केलेल्या शुभा-शुभ कर्मांचीं फलें निश्चयानें भोगावींच लागतात. मनुष्य मातेच्या गर्भांत अव-तीर्ण झाला रे झाला कीं त्यानें केलेलीं शुभाशुभ कृत्यें त्याच्याजवळ प्राप्त होतात. वारा ज्याप्रमाणें करवतीनें कापलेल्या लाकडाचा भुसा दूर उडवून नेतो त्या-प्रमाणें जीवनाश करण्यासाठीं टपलेल्या कालाच्या साहाय्यानें अनिवार्य मृत्यु मनुष्याला नष्ट करितो. सोनें, पशु, स्त्रीपुत्रादि बांधव इत्यादि वैभव; स्वतःच्या

कुलाचा वेलविस्तार वाढणें; उच्च कुलांत जन्म होणें; द्रव्यादिकांचा संचय जवळ जमून समृद्धि होणें; या सर्व गोष्टी मनुष्यानें पूर्वी जसें शुभाशुभ कर्म केलें असेल त्या त्या त्याच्या कर्मानुसार त्याला प्राप्त होतात.

**भीष्मः**—हे राजन्, याप्रमाणें त्या मनस्वी पराशरऋर्षीनीं जनक राजाला त्यानें विचारलेल्या प्रश्नांचीं उत्तरें यथातथ्य रीतीनें सांगितलीं; व धर्मवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ असलेल्या त्या जनक राजाला तीं ऐकून परमानंद झाला. १२. ३. २९८.

---

## अध्याय २९९ वा.

[ १ हंसानें साध्यांना सांगितलेला मोक्षधर्म; हंसगीता ].

( १ ) **युधिष्ठिर**—हे पितामहा, विद्वान् पुरुष लोकांमध्यें नेहमींच सत्य, दम, क्षमा व प्रज्ञा यांची प्रशंसा करीत असतात; तर यासंबंधांत आपलें निश्चित मत काय तें मला सांगा.

**भीष्म**—या बाबतींतला साध्यदेव व हंस यांच्यामध्यें झालेला एक संवाद पुरातन इतिहास म्हणून सांगतात, तो मीं तुला सांगतों, ऐक. अजन्मा व नित्य-स्वरूप प्रजापति हा उत्तम पंखांच्या हंसाचें रूप घेऊन त्रैलोक्यांत संचार करीत असतांना एकदां साध्यदेवांच्या समीप आला. त्याला पाहून साध्यदेव म्हणतातः—

**साध्य**—हे पक्षिन्, आम्हीं साध्यदेव असून तुला शंका विचारण्यासाठीं आलों आहों. तुला मोक्षधर्माचें ज्ञान आहे म्हणून मोक्षधर्माविषयीं आम्हीं तुला प्रश्न करीत आहों. तूं पंडित असून तुझी वाणी मोठी धीर गंभीर आहे असा तुझा लौकिक आम्हांला ऐकून ठाऊक आहे. शिवाय हे द्विजा 'साधु' ही पदवीहि तुला लावीत असतात. तेव्हां या जगांत सर्वश्रेष्ठ असें काय आहे व तुझें चित्त कशांत रमतें तें आम्हांला सांग. सर्व कर्मांत श्रेष्ठतम असें जें कोणतें एकच एक कर्म तुला वाटत असेल तें हे पक्षिश्रेष्ठा, आम्हांला सांग. जें कर्म केलें असतां मनुष्य सर्व प्रकारच्या बंधनांतून मुक्त होतो असें कर्म कोणतें ?

**हंस**—हे देवहो, तुम्हीं जें श्रेष्ठतम कार्य मला विचारीत आहां त्याचें स्वरूप मला ऐकून माहीत आहे तें असेंः—मनुष्यानें नेहमीं स्वधर्माचरण करावें, इंद्रिय-दमन करून मन जिंकावें. नेहमीं खरें भाषण करावें. हृदयांत वासनांची जी गुंतागुंत झालेली असते त्याच्या गांठी सोडून वासनारहित व्हावें. शुभाशुभ कर्मांचा हर्ष-विषाद मानूं नये. दुसऱ्याचा मर्मच्छेद करूं नये. कठोर भाषण करूं नये, आपल्यापेक्षां

हीन माणसाजवळ शास्त्राध्ययन करूं नये. ज्या आपल्या शब्दांनीं दुसऱ्याला उद्वेग येईल असे शब्द उच्चारूं नयेत. अशा बोलण्यानें आपलेंच अकल्याण होतें व अधःपातहि होतो. आपल्या तोंडांतून निघणारे वाग्बाण ज्याला विद्ध करितील तो रात्रंदिवस तळमळत राहील; वाग्बाण हे नेहमीं दुसऱ्याचा मर्मघातच करितात हें जाणून शहाण्या माणसानें दुसऱ्यांवर वाग्बाण कधींच टाकूं नयेत. दुसऱ्या मनुष्यानें अतिवादाच्या वाग्बाणांनीं जरी आपल्याला जर्जर केलें तरी सुद्धां आपण शांति धरावी. दुसऱ्यांनीं राग आणण्याचा प्रयत्न केला तरीसुद्धां ज्याला राग न येतां हर्षच होतो त्याला त्या मनुष्याची पुण्याई प्राप्त होते. ज्या क्रोधामुळें मनुष्य दुसऱ्याचा अधिक्षेप करतो, व ज्याच्या आहारीं जाऊन दुसऱ्याच्या दृष्टीनें वाईट ठरतो असला क्रोध मनुष्यानें नेहमींच आंवरून धरावा. या उग्र क्रोधाचें जो निर्मत्सरी, आनंदी व खोल मनाचा पुरुष नियंत्रण करील त्याला दुसऱ्याच्या पुण्याईचा लाभ होतो. लोकांनीं मला कितीहि बोलविण्याचा प्रयत्न केला तरी मीं कांहींहि बोलत नाहीं. लोक मला मारूं लागले तरीहि मीं त्यांना क्षमाच करितों. हा जो शम गुण त्याला सर्व आर्य श्रेष्ठ मानतात. तसेंच सत्य भाषण, सरळपणा व दुष्टपणाचा अभाव हेहि गुण याच तोडीचे आहेत. वेदांचें परमरहस्य खरें बोलणें हें होय. सत्याचें परमरहस्य दमनशीलता व दमाचें परमरहस्य मोक्ष असें सर्व शास्त्रांचें अनुशासन आहे. वाचा, मन, क्रोध, हव्यास, भूक व विषयवासना यांचे वेग अनावर झाले असतां त्यांस जो कह्यांत ठेवतो त्याला मीं मुनि व ब्राह्मण असें समजतों. राग येणाऱ्या माणसांपेक्षां ज्याला राग येतच नाहीं तो श्रेष्ठ, ज्यांच्या अंगीं सहनशीलता नाहीं अशांच्यापेक्षां सहिष्णु पुरुष श्रेष्ठ, ज्यांच्यांत माणुसकी नाहीं अशांपेक्षां माणुसकी असलेला प्राणी श्रेष्ठ व अज्ञानी मनुष्यांपेक्षां ज्ञानवान् पुरुष श्रेष्ठ होय. आपल्याला कोणीं बोलूं लागल्यास त्याला उलट उत्तर देऊं नये. सहनशक्ति धरून आपण आवरलेला क्रोधच त्याचा दाह करितो व आपल्याला वाक्ताडन करणाऱ्या पुरुषाचें पुण्य आपल्याकडे ओढून आणतो. कोणीं अति निंदा केली तरी जो रागावत नाहीं, किंवा अतिशय स्तुति केली तरी ज्याला त्यापासून आनंदहि होत नाहीं, जो दुसऱ्यानें केलेला प्रहार धैर्यानें सोसतो व प्रतिप्रहार करीत नाहीं किंवा प्रहार करणाराचें वाईट व्हावें अशीहि इच्छा मनांत धरीत नाहीं, तोच देवांना नेहमीं आवडतो. आपला अपमान कोणीं केला किंवा कोणीं आपणांस ताडन केलें अगर आपली निंदा केली तरी त्या दुष्टांना ते चांगले आहेत असें मानून जो क्षमाच करितो

त्याला सिद्धीची प्राप्ति होते. मीं स्वतः कितीहि मोठा झालों तरी आर्यांना पूज्य मानून त्यांची उपासनाच करीत राहीन. माझ्या मनांत हव्यास किंवा राग यांचा प्रादुर्भाव मीं होऊं देणार नाहीं. कोणत्याहि वस्तूच्या लोभानें मीं धर्मविमुख होणार नाहीं किंवा देवांपासून कोणतीहि वस्तु मिळविण्याच्या इच्छेनें मीं त्यांची प्रार्थना करणार नाहीं. मला कोणीं वाईट बोललें तर त्याला मीं उलट उत्तर कधींच देत नाहीं. दमनशीलता हेंच मोक्षद्वार होय असें मीं समजतों. मीं तुम्हांला फार मोठें असें एक रहस्य सांगतों व तें हें कीं या जगांत मनुष्यत्वापेक्षां श्रेष्ठ असें कांहीं नाहीं. मेघांतून निर्मुक्त झालेल्या चंद्रम्याप्रमाणें पापनिर्मुक्त होऊन स्वच्छ झालेला वैराग्यशील व धैर्यानें योग्य कालाची वाट पहाणारा पुरुष आपल्या धैर्यबलाच्या जोरावर सिद्धि मिळवतो. जो संयमी पुरुष सर्वांच्या पूजेला पात्र होतो, ज्या अभिजात पुरुषाला सर्वांचा आधारस्तंभ म्हणून म्हणवून घेतां येतें व ज्याच्याबद्दल बोलतांना लोक नेहमीं गोड वाणीच बोलतात तो पुरुष देवलोकांत जातो. मनुष्याचे ठिकाणचे गुण कोणीं बोलून दाखवूं इच्छित नाहीं. गुणांकडे दुर्लक्षच केलें जातें. पण, गुणी माणसाची स्पर्धा करणारे मत्सरी पुरुष मात्र त्याचे दोष तेवढे तत्परतेनें बोलून दाखवितात. जो पुरुष आपली वाणी व आपलें मन यांचें नियंत्रण करून त्यांचा योग्य उपयोग करितो त्याला वेदाध्ययन, तपश्चर्या व त्याग या सर्वांचें फल मिळूं शकतें. कोणीं मूर्ख माणसांनीं आपली निंदा किंवा अपमान केला तर आपण त्याच्या नादीं लागून त्याला किंमत देऊं नये व आपली किंमत कमी करून घेऊं नये. शहाण्या माणसानें अपमानाचा अमृताप्रमाणें संतोष मानावा. अपमान झालेला पाहून ज्याला सुखाची झोंप येऊं शकते त्याचा अपमान करणाराचाच अधःपात होतो. एकादा मनुष्य क्रोधवश होऊन यज्ञकर्म करील, दान देईल, तपश्चर्या करील किंवा अग्निहोत्रांत आहुति टाकील तर त्याच्या यज्ञकर्माचें, दानाचें, तपश्चर्येचें व अग्निहोत्राचें पुण्य वैवस्वत म्हणजे यम हरण करतो. रागीट मनुष्याचे याबाबतींतील श्रम फुकट जातात. पोट, हात, वाणी व विषयेंद्रियें हीं चारी द्वारें ज्यानें व्यवस्थितपणें कह्यांत ठेविलीं आहेत त्यालाच, हे देवश्रेष्ठहो, धर्मज्ञ म्हणावें. सत्य, दम, सरळपणा, दयालुता, धैर्य व उपेक्षाबुद्धि या गुणांचें जो सेवन करितो; दुसऱ्याच्या कोणत्याहि गोष्टीची आशा न धरितां जो स्वाध्यायाध्ययनांत नित्य रत असतो; ज्याला विजनवासाची आवड आहे अशा मनुष्याला वरचे वरचे लोक प्राप्त होतात. सत्यादि गुणांचा अवलंब, स्वाध्यायाध्ययन, निर्मत्सरता व

विजनवास या चार गोष्टींचें सेवन जो एकाद्या वासरानें गाईच्या चार सडांचें सेवन करावें त्याप्रमाणें करतो त्याला उत्तम गति मिळते. या चारींत सुद्धां सत्यापेक्षां अधिक पावनतर असें दुसरें कांहीं नाहीं. मीं त्रैलोक्यांत संचार करून मनुष्यांना काय किंवा देवांना काय हेंच सांगत असतों कीं, समुद्रांत तरून जाण्याचें साधन जसें नौका, तसेंच स्वर्गाला जाण्याचें साधन म्हणजे सत्याचरण होय. मनुष्य ज्यांच्या सहवासांत रहातो, ज्यांची सेवा करितो व आपण जसें व्हावें असें त्याला वाटतें तसाच तो होतो. मनुष्य संतांची सेवा करील तर त्यांच्यासारखा, असंतांची सेवा करील तर तसा, तपस्व्यांची सेवा करील तर तपस्व्यांसारखा व चोरांची सेवा करील तर चोरांसारखा होतो. पांढरें शुभ्र वस्त्र जसें त्याला जो रंग द्यावा त्या रंगाचें होतें तसेंच हें आहे. देव नेहमीं साधूंशीं संवाद करतात. मनुष्यांच्या विषयांकडे बघायला सुद्धां ते तयार होत नाहींत. चंद्र अमृतमय म्हटला जातो पण तोहि क्षयवृद्धिशील आहे. वायु समगति म्हटला जातो पण त्यांतहि मंद, मध्यम व तीव्र असले भेद आहेतच. याप्रमाणें सर्वच विषय क्षयवृद्धिशील आहेत असें ज्ञान ज्याला झालें तो खरा ज्ञाता होय. ज्याच्या हृदयांतील अंतर्यामी जीवात्मा हा रागद्वेषरहित असतो अशा सज्जनांच्या मार्गानें जाणाऱ्या पुरुषावर देव संतुष्ट असतात. ज्यांनीं पोट व विषयेंद्रिय एवढींच हातांत धरिलीं आहेत; ज्यांच्या तोंडांतून नेहमीं कठोर वाणी येते व जे चौर्यादिकर्में करितात असल्या मनुष्यांची ओळख देवांना तेव्हांच पटते व कर्मवशात् त्यांचे दोष नाहींसे झाले तरी देव त्यांना दूरदूर ठेवून त्यांचा संपर्क टाळतात. नीच बुद्धीच्या माणसाच्या हातून देवांचा संतोष होणें शक्य नाहीं. तसेंच दुसऱ्याला न देतां सगळें आपण एकटाच खाणाऱ्या व दुष्कम करणाराच्या हातून देवांचा संतोष शक्य नाहीं. जे सत्यव्रत, कृतज्ञ व धर्मरत लोक आहेत अशांनाच देव आपल्या सुखाचा वांटा देतात. बोलण्यापेक्षां गप्प बसणें सर्वश्रेष्ठ होय. बोलणें असेल तर तें सत्य बोलावें हें त्याहून श्रेष्ठ-तर होय. धर्म्य व सत्य त्यापेक्षां श्रेष्ठ आणि धर्म्य, सत्य व प्रिय असलें भाषण श्रेष्ठतम होय.

**साध्य**—हे पक्षिन्, या लोकांवर आवरण कशाचें आहे? लोकांचा अभ्यु-दय कशानें होत नाहीं? सन्मित्रांचा त्याग कशामुळें घडतो? स्वर्गप्राप्ति कशामुळें होत नाहीं तें मला सांग.

**हंस**—या लोकांवर आवरण अज्ञानाचें आहे. मत्सरीपणामुळें लोकांचा अभ्युदय होत नाहीं. लोभामुळें मित्र सोडून जातात व आसक्तीच्यामुळें स्वर्गप्राप्ति दुरावते.

**साध्य**—ब्राह्मणांपैकीं एकटाच असून आनंदांत रहाणारा कोण? अनेकांच्या सहवासांत राहून सुद्धां मौनव्रत धारण करणारा कोण? दुर्बल असूनहि बलवान् कोण? दुसऱ्याच्या कलहांत न पडणारा असा एकटा एकच पुरुष कोण?

**हंस**—ब्राह्मणांमध्यें जो शहाणा असेल त्यालाच एकांतवासांत रहाण्यानें आनंद होतो. अनेकांच्या सहवासांत राहून मौनव्रत धरणारा प्राज्ञच. दुर्बल असून बलवान् असा प्राज्ञच व दुसऱ्याच्या कलहांत न पडणारा तो प्राज्ञच होय.

**साध्य**—ब्राह्मणांचें देवत्व, साधुत्व व मानुषत्व हीं कशांकशांत असतात?

**हंस**—स्वाध्यायाध्ययन हें ब्राह्मणांचें देवत्व होय. व्रताचरण हेंच त्याचें साधुत्व, निंदा हें असाधुत्व व मरण हें मानुषत्व होय.

**भीष्म**—हे युधिष्ठिरा, हा साध्यांचा व हंसाचा अत्यंत श्रेष्ठ असा संवाद मीं तुला सांगितला. मनुष्याचें हें स्थूल सूक्ष्म शरीर हें कर्माचें कारण होय; व केवळ सत्तामात्रानें असणारें आत्मास्तित्व हेंच परम सत्य होय. १२. ३. २९९.

---

## अध्याय ३०० वा.

[ १. सांख्य व योग यांतील भेद. ]

( १ ) **युधिष्ठिर**—हे कुरुसत्तमा, सांख्य व योग यांचे विशेष कोणते ते आपण मला सांगा. हे धर्मज्ञा, आपणांला सर्व कांहीं विदित आहे.

**भीष्म**—सांख्यवादी सांख्यमताची प्रशंसा करितात व योगवादी द्विज योगाची प्रशंसा करितात. दोघेहि वादी आपापल्या पक्षाचा उत्कर्ष–विजय–श्रेष्ठपणा–सिद्ध करण्यासाठीं त्यांच्या त्यांच्या दृष्टीनें निरुत्तर वाटणारे युक्तिवाद पुढें मांडीत असतात. हे शत्रुकर्षणा, योग्य तऱ्हेनें विचार करणारे योगवादी ईश्वराला न मानणाऱ्या पुरुषाला मुक्ति कोठून असा निरुत्तर युक्तिवाद आपल्या बाजूनें पुढें करितात. ' ईश्वर हा अयस्कांतमण्याप्रमाणें उदासीन असला तरी स्वतःच्या सत्तामात्रानेंच अचेतन प्रधानाला प्रवृत्त करितो व तद्द्वारा भक्तांवर अनुग्रह करितो; म्हणून, मोक्षदात्या ईश्वराचें स्वतंत्र अस्तित्व अवश्य कल्पिलें पाहिजे हा योगमार्गीयांचा युक्तिवाद होय. आतां जे ब्राह्मण सांख्यमार्गीय आहेत

त्यांच्या दृष्टीनें योग्य ठरणारा युक्तिवाद असाः मनुष्याच्या अंगीं विषयवैराग्य बाणलें व अज्ञानाच्या निरासाबरोबरच आत्म्याच्या विराट्, सूत्र, ईश व शुद्ध या चारी अवस्थांचें त्याला क्रमानें ज्ञान झालें म्हणजे देहपातानंतर तो आपोआप उघडच मुक्त होतो. तेव्हां, मुक्तीसाठीं निराळ्या ईश्वराचें अस्तित्व कल्पिण्याचें कारण नाहीं. सांख्यांचें मोक्षदर्शन तें हेंच असें मोठमोठे शहाणे लोक सांगतात. सांख्य व योग या दोन्हीं मार्गांच्या बाजूनें याप्रमाणें युक्तिवाद जरी पुढें येऊं शकला तरी स्वतःला ग्राह्य असणाऱ्या बाजूचा युक्तिवादच आपण योग्य मानावा. तसेंच स्वमतपुष्ट्यर्थ उभय पक्षांनाहि वचनांचा आधार दाखवितां येत असला तरी त्यांत आपला जो पक्ष असेल त्याला अनुकूल अशींच वचनें ग्राह्य समजावीं. तुझ्यासारख्या शिष्टसंमत माणसांनीं तर शिष्टांना मान्य असेल तेंच मत स्वीकारावें. योगमार्गानें जाऊन ज्या गोष्टी साध्य व्हावयाच्या त्या ध्यान-धारणादि मार्गांनीं प्रत्यक्ष अनुभवास येतात; म्हणून, प्रत्यक्ष हें त्यांच्या बाजूचें प्रमाण होय. उलट, सांख्य हे जरी प्रत्यक्ष कांहीं अनुभवास आणून देऊं शकत नाहींत तरी त्यांची मदार सर्व शास्त्रावर असते. हे राजा, माझ्या मतें हीं दोन्हीं सारखींच शिष्टसंमत आहेत, व यांचें यथाशास्त्र अनुष्ठान केलें असतां दोन्हींहि परम गति प्राप्त करून देण्यास सारखींच समर्थ आहेत. या दोन्हीं मार्गांत तपश्चर्या, भूतदया व शुचिता हे गुण आवश्यक आहेत व अहिंसा, अस्तेय, सत्य भाषण इत्यादि व्रतांचें आचरणहि सारखेंच आवश्यक आहे. अर्थात्, दोन्हीं मार्गांतील फलभूत गति एकच होय. परंतु, असें जरी असलें तरीहि शास्त्रें मात्र भिन्न आहेत.

**युधिष्ठिर**—हे पितामहा, या दोहीं मार्गांचीं अहिंसादि व्रतें, व पावित्र्य, दया इत्यादि गुण हीं जर एकच तर हीं शास्त्रें एक नव्हेत हें कसें तें मला सांगा.

**भीष्मः**—हे युधिष्ठिरा, मनुष्यानें योगबलाच्या जोरावर राग, मोह, स्नेह, काम व क्रोध या पांच दोषांचा उच्छेद केला म्हणजे त्याला परमपदाची प्राप्ति होते. ज्याप्रमाणें धीवराच्या जाळ्यांत सांपडलेले मोठाले मासे तें जाळें तोडून फिरून पाण्यांत जातात त्याप्रमाणें मनोदोषांचें जाळें तोडून बलवान् योगी परमपदाला पोहोंचतात. तसेंच, मोठमोठे बलवान् हरिण ज्याप्रमाणें जाळयाच्या दोऱ्या तोडून सर्व पाशांतून मुक्त होतात व विमल अशा मोकळ्या मार्गाला लागतात, त्याप्रमाणें बलिष्ठ योगीजन लोभाचीं बंधनें तोडून कल्याणकारक, निर्मल व पवित्र मार्गानें जातात. हे राजन्, आतां दुसरे कित्येक दुबळे हरिण

जाळ्यांत सांपडून नाशहि पावतात यांत संशय नाहीं. यांच्याप्रमाणेंच योगबळ ज्यांना पूर्ण अनुकूल नाहीं असे लोकहि नाश पावतात. शक्तिहीन मासे ज्याप्रमाणें कोळ्याच्या जाळ्यांत सांपडले म्हणजे त्यांचा नाश होतो, त्याप्रमाणेंच दुबळ्या योगमार्गीयांचाहि होतो. हे परंतपा, सूक्ष्म जाळ्यांत सांपडलेले पक्षी तेथेंच आसक्त होऊन राहिले म्हणजे त्यांच्यावर आपत्ति ओढवतात, व जे बलिष्ठ असतात ते सुटून जातात. त्याप्रमाणें कर्मांच्या बंधनांनीं बांधले गेलेले योगी दुबळे असतील तर नष्ट होतात व सबळ असतील तर त्यांतून सुटून जातात. हे राजा, अग्नीचीं ठिणगी लहान असेल तर ती सर्पणाच्या भाराखालीं सांपडून स्वतःच पिचून जाते; पण, तोच अग्नी चांगला पेटलेला असेल तर वाऱ्याबरोबर चोहोंकडे फैलावला जाऊन सर्व पृथ्वीचेंहि भस्म करील. त्याचप्रमाणें योगी दुर्बल असेल तर इंधनाच्या भाराखालीं दडपून जाणाऱ्या ठिणगीप्रमाणें विषयांच्या भाराखालीं चिरडेल. पण, स्वतः बलिष्ठ असलेला व तेजोवर्धन झालेला समर्थ योगी प्रलयकालच्या सूर्याप्रमाणें सगळ्या जगाचें शोषण करूं शकतो. पाण्याच्या प्रवाहाबरोबर दुर्बल मनुष्य जसा वहात जातो त्याप्रमाणें दुर्बल योगी असहाय होऊन विषय नेतील तिकडे त्यांच्याबरोबर वहात जातो. पण, एकादा बलिष्ठ हत्ती तोच पाण्याचा ओघ जसा थोपवून धरतो, त्याचप्रमाणें योगबलाचा लाभ झालेला पुरुष नानाप्रकारच्या विषयांना तुच्छ मानतो. हे पार्था, योगामुळें बंधनरहित झालेले बलिष्ठ योगी लोक आत्मसामर्थ्यानें प्रजापति, ऋषि, देव व पंचमहाभूतें यांच्या ठिकाणींहि प्रवेश करूं शकतात. अपार तेजोबलानें युक्त असलेल्या योग्याच्या सामर्थ्यापुढें महापराक्रमी मृत्यु, संक्रुद्ध झालेला अंतक किंवा प्रत्यक्ष यमधर्म यांच्यापैकीं कोणाचीच मात्रा चालूं शकत नाहीं. योगी माणसाला योगबलाच्या आधारावर हजारों दुसरीं रूपें घेतां येतात व त्यांच्यामुळें त्याला पृथ्वीभर संचार करतां येतो. हे राजा, योग्याच्या इच्छेला वाटेल तर त्या देहांपैकीं कांहीं देहांनीं हा पृथ्वीवर विषयोपभोग घेईल, पुन्हां उग्र तपश्चर्या करील. सूर्य ज्याप्रमाणें आपले किरण पृथ्वीवर फेंकतो व त्यांचा पुनः उपसंहारहि करतो, तसेंच हा योगी अनेक देह धारण करितो व पुनः त्यांचा स्वस्वरूपांत लयहि करितो. विषयांच्या बंधनाचा उच्छेद ज्याला करितां येतो अशा सामर्थ्यसंपन्न योग्याला मुक्ति मिळविण्याचें सामर्थ्य असणें युक्तच होय, यांत शंका नाहीं.

हे राजेंद्रा, योगबलानें प्राप्त होणाऱ्या सामर्थ्याचे निरनिराळे प्रकार जे मीं आतांपर्यंत तुला सांगितले तेच पुनः उदाहरणें घेऊन तुला सूक्ष्म तऱ्हेनें सांगतों.

आत्म्याची समाधि साधण्यासाठीं चित्ताचें ऐकाग्र्य कसें करावें याबद्दल तुला कांहीं सूक्ष्म उदाहरणें देतों. धनुर्धारी कुशल वीर ज्याप्रमाणें कोणताहि प्रमाद होऊं न देतां अत्यंत सावधपणानें आपल्या लक्ष्यावर बाण टाकतो त्याप्रमाणें योग्य तऱ्हेनें योगाभ्यास करणारा योगी निःसंशय मोक्षाला जातो. तेलानें भरलेल्या डोक्यावरच्या घागरींत सगळें लक्ष ठेवून जसा मनुष्य चालतो त्याप्रमाणें चित्त एकाग्र करून योगयुक्त अंतःकरणानें मनुष्यानें मोक्षसोपानाचें आक्रमण करावें. हे राजा, योगी पुरुष ज्यावेळेस आपलें चित्त अत्यंत एकाग्र करील त्याच वेळेस त्याचा आत्मा स्थिर, निर्मल व सूर्याप्रमाणें तेजस्वी होईल. एकादा नावाडी मोठ्या समुद्रांत सांपडलेली नाव ज्याप्रमाणें अत्यंत सावधपणानें जलद काढून नेतो त्याप्रमाणें योगसाधनानें आत्मसमाधि साधून देहत्यागानंतर मनुष्य अत्यंत दुर्लभ अशा स्थानीं जाऊं शकतो. एकादा सारथि ज्याप्रमाणें अत्यंत सावधपणा ठेऊन व रथाला चांगले घोडे जुंपून रथ्याला सत्वर आपल्याला इष्ट अशा ठिकाणीं नेतो, त्याप्रमाणें चित्ताची एकाग्रता साधण्यांत कुशल असलेला योगी, बाण जसा धनुष्यापासून सुटल्याबरोबर आपल्या लक्ष्यावर नेमका पडावा तसा सत्वर व अचूक परमपदाला पोहोंचतो. स्वतःच्या ठिकाणाचें आत्मरूप आपलें आपणच पहात पहात जो योगी निश्चल समाधिसुखांत रहातो त्यांचें सर्व पाप नाहींसें होतें व त्याला पुण्यवंतांचें अक्षय पद प्राप्त होतें. हे अतुलपराक्रमी धर्मराजा, जो योगी नाभिस्थान, कण्ठ, मस्तक, हृदय, वक्षःस्थळ, दोन्ही कुशी, डोळे, कान व घ्राणेंद्रिय इत्यादि ठिकाणीं खेळणारा वायु स्वेच्छेनें यंत्रासारखा जागच्याजागीं खिळून ठेवूं शकतो व अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य व अपरिग्रह या महाव्रतांत निमग्न राहून स्वतःचा आत्मस्वरूपांत लय करूं शकतो त्याचीं शुभाशुभ कर्में, त्यांचे पर्वताएवढाले ढीग सांचले असले तरी—नष्ट होतात. अशा माणसाची इच्छा असेल तर त्याला उत्तम प्रकारच्या योगसाधनांनीं मुक्ति मिळवतां येते.

युधिष्ठिर—योग्यानें कशाप्रकारचा आहार करावा व कशावर विजय मिळवावा म्हणजे त्याला सामर्थ्य प्राप्त होतें तें आपण मला सांगा.

भीष्म—योगाचरण करूं इच्छिणारा पुरुष, जरी नुसत्या कण्या खाऊन राहिला किंवा त्यानें सर्व स्निग्ध पदार्थ वर्ज्य करून जरी नुसती पेंड खाल्ली तरी त्याला सामर्थ्य प्राप्त होतें. वाफेवर शिजविलेले यवधान्याचे पदार्थ किंवा यवाच्या पिठाचा केलेला पदार्थ यांचें जरी योग्यानें, त्यांत स्निग्ध पदार्थ न घालतां दीर्घकालपर्यंत सेवन केलें व त्याच अन्नावर तो राहिला तरी योग्याला बल प्राप्त होतें,

व त्याचें चित्तहि शुद्ध होतें. हा योगी जरी कांहीं पक्ष, महिने, ऋतु, संवत्सर किंवा दिवस अशी मुदत घेऊन तितक्या काळपर्यंत दूध व पाणी यांचें मिश्रण घेऊन राहील तरी सुद्धां त्याला बल प्राप्त होतें. शुद्धचित्त योग्यानें जर सदासर्वकाल मांस, दहीं, कुळीथ, लसूण, भाजीपाला, कडू, आंबट, व तिखट पदार्थ, निःसत्व कोंड्याचे पदार्थ, हिंग, बोरें, मोहऱ्या व तेल इतके पदार्थ वर्ज्य केले तर त्याला सामर्थ्य प्राप्त होतें. योग्यानें एकदां निवालेला पदार्थ पुनः तापवून घेऊं नये असेंहि कांहींजण म्हणतात. योग्यानें काम व क्रोध जिंकावे; थंडी, उन्ह व पाऊस हीं सहन करण्यास शिकावें; भय व शोक हीं टाकावीं; श्वासाचा निरोध करावा; प्राणिमात्राला प्रिय असणारे शब्दादि विषय सोडावे; विषयोपभोग न मिळाल्यामुळें उत्पन्न होणारें दुर्दांत असमाधान व घोर हव्यास हीं जिंकावीं; स्पर्शादि विषय, निद्रा व आळस यांचें दमन करावें. बुद्धिमान् अशा महात्म्या योग्यांनीं अंगचे रागादि दोष घालवून उपास्याचें अखंड ध्यान व प्रणवाचा जप केला म्हणजे ते आत्मतेजाची ज्योत स्वतःच्या ठिकाणीं प्रकट करूं शकतात. शहाण्या शहाण्या ब्राह्मणांना सुद्धां या योगमार्गानें जाणें कठीण पडतें. या मार्गानें सुखानें जाऊं शकणारा मनुष्य एकाददुसरा आढळतो. ज्याप्रमाणें, अनेक जातीच्या सर्पांनीं व्यापिलेल्या; अनेक खांच-खळगे असलेल्या; पाण्याचा अभाव असलेल्या; अतिशय कठिण व कांट्यांकुट्यांनीं भरलेल्या; ज्या ठिकाणीं खाण्यास मिळणें शक्य नाहीं अशा; दाट झाडीनें व्यापिलेल्या व जागोजाग वणव्यामुळें जळून गेलेलीं झाडें ज्यांत दिसत आहेत अशा; वाटमाऱ्या दरोडेखोरांची वस्ती ज्यांत आहे अशा घोर अरण्यांतील रस्त्यानें सुखानें सरळ निघून जाणारा धाडसी तरुण एकादाच आढळतो तसा योगमार्गाला लागून त्यांतून निश्चलपणें बाहेर पडणारा द्विजहि एकादाच सांपडतो. या मार्गांत संकटें अनेक आहेत. हे राजा, एक वेळ वस्तऱ्याच्या तीक्ष्ण धारेवर निश्चलपणें रहातां येणें शक्य आहे; पण, ज्याला आत्मसंयमन झालें नाहीं, अशा पुरुषाला योगधारणा साधणें कठीण आहे. ज्याप्रमाणें कर्णधार नसलेली नौका मनुष्यांना समुद्रपार नेऊं शकत नाहीं—बुडविते—त्याप्रमाणें योगधारणा सरळ सिद्ध न होतां विपरीत झाल्या म्हणजे त्यांच्यामुळें पुरुषाला अशुभगति प्राप्त होते—त्याला रोगादि आघात होतात. हे कौंतेया, शास्त्रानें सांगितल्याप्रमाणें योगधारणा जो सुव्यवस्थित तऱ्हेनें करितो, ज्याला या धारणा साधतात तो जन्ममरणांच्या फेऱ्यांतून सुटतो व सुखदुःखातीत होतो. आतांपर्यंत हें जें योगरहस्य मीं तुला सांगितलें तें योगशास्त्राचा विषय जेथें जेथें

निघाला आहे त्या निरनिराळ्या शास्त्रांत अनेक ठिकाणीं सांगितलें आहे. योगाचें अत्यंत श्रेष्ठ असें जें निश्चित स्वरूपाचें फल सांगितलें आहे तें द्विजांचे ठिकाणीं मात्र प्रत्ययास येतें, त्यांनाच साध्य होतें. योगानें साध्य होणारें हें परम पद म्हणजे ब्रह्मपद व योगसिद्धि म्हणजे ब्रह्मा, विष्णु, इत्यादि देवांपैकीं वाटेल त्याचें रूप घेतां येणें ही होय. ज्या महात्म्या पुरुषाला योग साध्य झाला त्याला ब्रह्मदेव, वरद भगवान् परमेश्वर विष्णु, शंकर, धर्म, षडानन, ऋषभकपिलादि ब्रह्मदेवाचे मानसपुत्र, अतिशय घोर असा तमोगुण, राजस भाव, विशुद्ध सत्व, परा प्रकृति, वरुणपत्नी, सिद्धिदेवी, तेजस्तत्वाचें समष्टिरूप, अपार धैर्य, आकाशांत वावरणारा तारकायुक्त विमल चंद्र, सर्व देव, नाग, पितर, सर्व पर्वत, अथांग महासागर, सर्व नद्या, पाण्यानें भरलेले मेघ, उरग, वृक्ष, यक्षगण, दिशा, गंधर्व, पुरुष व स्त्रिया यांपैकीं कोणाचेंहि रूप केव्हांहि घेतां येतें व तो लौकरच विमुक्त होतो.

हे राजन्, तुला मीं सांगितलेली ही योगासंबंधींची कथा महासामर्थ्यवान् व बुद्धिमान् जो परमेश्वर त्याशीं संबद्ध आहे व म्हणूनच ती अत्यंत कल्याणकारकहि आहे. असो. हा महात्मा योगी सर्व मर्त्यांहून श्रेष्ठ ठरतो व स्वतः नारायणस्वरूप होऊं शकल्यानें सर्व सृष्टि निर्माण करण्याचें सामर्थ्यहि पण त्याच्या अंगीं येतें. १२. ३. ३००.

---

## अध्याय ३०१ ला.

[ १ सांख्यमतवर्णन. ]

(१) युधिष्ठिर—महाराज, माझें शिष्याचें कल्याण करण्याच्या इच्छेनें आपण आतांपर्यंत शिष्टसंमत असा योगमार्ग यथान्याय व योग्य तऱ्हेनें वर्णन करून सांगितला. आतां, सांख्यमार्गाची प्रक्रिया आपण मला साकल्यानें सांगावी अशी माझी इच्छा आहे. सर्व त्रैलोक्यामध्यें ज्ञान, ज्ञान म्हणून जेवढें आहे तेवढें सर्व आपणाजवळ आहे.

भीष्मः—ज्यांच्या बुद्धीला सूक्ष्म आत्मतत्त्वाचा स्पर्श झाला आहे अशा सांख्यमार्गी लोकांचीं तत्त्वें—त्या मार्गाचें रहस्य—मीं तुला सांगतों तें ऐक. कपिलमहर्षीसारख्या महासामर्थ्यवान् अशा सर्व ऋषींनीं याचें कथन केलें आहे. हे राजन्, या मार्गांत संशयाला जागा अशी नाहींच. यांत अपार गुण असून दोषांचा पूर्ण

अभाव आहे. विषय तेवढे सर्व सदोष असें ज्ञानबलानें जाणून; मनुष्याला जिंकतां न येणारे विषय, पिशाचांचे सर्व विषय, राजस गुणांचे सर्व विषय, यक्षांचे विषय, उरगलोकांतील प्राण्यांचे विषय, गंधर्वलोकींचे विषय, पितृलोकांतील विषय, तिर्यग्योनींतील जीवांचे विषय, पक्षियोनींतील जीवांचे विषय, मरुद्गणांचे विषय, राजर्षींचे विषय, ब्रह्मर्षींचे विषय, असुरलोकींचे विषय, विश्वेदेवांचे विषय, देवर्षींचे विषय, महासमर्थ अशा योग्यांचे विषय, प्रजापतीचे विषय, ब्रह्मदेवाचे विषय इत्यादि सर्व सदोष विषयांचें ज्ञान करून घेऊन; आयुष्याची परम मर्यादा किती याचें यथार्थ ज्ञान करून घेऊन; सुखांतील परम रहस्य जाणून; नेहमीं विषयांतच गढून गेलेल्या पुरुषांना त्या त्या कालांत काय दुःख होतें, तिर्यग्योनींतील प्राण्यांना काय दुःखें असतात, नरकांत पडणाऱ्यांचीं दुःखें कोणतीं तीं जाणून; स्वर्गभोगाचे सर्व गुणदोष वैदिक कर्ममार्गामध्यें असलेले, ज्ञानमार्ग व सांख्यज्ञान यामध्यें असलेले गुणदोष इत्यादिकांचें ज्ञान—पूर्ण ज्ञान—करून घेऊन; आनंद, प्रीति, त्याग, संतोष ऐश्वर्य इत्यादि सत्वाचे दहा गुण जाणून; कामक्रोधादि नऊ गुणांनीं युक्त अशा रजाचें ज्ञान करून घेऊन; तमाचे निद्राप्रमादादि आठ गुण ओळखून; बुद्धीचे महदहंकारादि सात गुण जाणून; मनाचे सहा, नभाचे पांच, बुद्धीचे चार, तमाचे तीन, रजाचे दोन व सत्वाचा एकच एक, प्रकाशमय असा गुण जाणून; सृष्टिप्रलयाचे वेळीं या गुणांचा काय प्रकार होतो तें उमजून; आत्मप्राप्तीच्या मार्गाचें ज्ञान झाल्यानंतर;—सारांश, ज्ञान व विज्ञान यांचें स्वरूप ग्रंथांवरून व अनुभवानें जाणल्यावर मोक्षोपयोगी सात्विकभावांचा ज्यांच्या चित्तावर संस्कार होतो अशा पुण्यवान् जीवांना–सूक्ष्म रविकिरणांना आकाशांत जावयास मिळावें त्याप्रमाणें–मोक्षमार्गावर जावयास मिळतें, मोक्षाची प्राप्ति होते. या जगांत दृष्टि म्हणजे नेत्रेंद्रिय हें रूपगुणाशीं संलग्न झालेलें आहे, घ्राणेंद्रिय गंधगुणाशीं, श्रोत्रेंद्रिय शब्दगुणाशीं, जिव्हा रसाशीं, त्वगिंद्रिय हें स्पर्शाशीं संलग्न आहे. याप्रमाणें, पंचकर्मेंद्रियें हीं शब्दादि विषयांशीं संलग्न आहेत. वायु हा आकाशाशीं, मोह हा अज्ञानाशीं, लोभ हा अर्थाशीं, विष्णु हा पराक्रमाशीं, इंद्र हा बाहुबलाशीं, अनल हा जठराशीं, पृथ्वी ही पाण्याशीं तर आपोदेवता तेजाशीं संलग्न आहेत. तेज वायूच्या ठिकाणीं, वायु आकाशाचे ठिकाणीं, आकाश महत्तत्वाचे ठिकाणीं, महत्तत्व बुद्धीचे ठिकाणीं, बुद्धि तमाचे ठिकाणीं, तमोगुण रजाचे ठिकाणीं, रजोगुण सत्वाचे ठिकाणीं, सत्व जीवात्म्याचे ठिकाणीं, जीवात्मा विराट्स्वरूप परमेश्वराचे ठिकाणीं

व विराट्स्वरूप परमेश्वर हा मोक्षाचे ठिकाणीं संलग्न आहे. येणेंप्रमाणें वर सांगितल्याप्रमाणें मोक्षाखेरीज सर्व गोष्टी पराधीन आहेत, व एक दुसऱ्याच्या अधीन, दुसरा तिसऱ्याच्या अशा क्रमानें शेवटीं त्या सर्वांच्या आधीनत्वाचें पर्यवसान मोक्षाधीनत्वामध्यें होतें. सर्व परंपरया या मोक्षाशीं संलग्न आहेत. मोक्ष मात्र स्वतःसिद्ध असून कोणाशींहि संलग्न नाहीं. अशा तऱ्हेनें इंद्रियादिक देवतासृष्टिमध्यें, देवतासृष्टि लोकसृष्टिमध्यें व लोकसृष्टि ब्रह्मरूपामध्यें लीन होते हें ज्ञान ज्याला झालें; स्वप्नसृष्टींत विद्यमान असणारा सूक्ष्म लिंगदेह हा प्राण, श्रद्धा, आकाश, वायु, तेज, आप, पृथिवी, इंद्रियें, मन, अन्न, वीर्य, तप, मंत्र, कर्म, लोक व नाम या सोळा गुणांनीं व्याप्त आहे असें जो जाणतो; पूर्वकर्म व तें उत्पन्न करणारी चेतना हीं दोन्हीं लिंगदेहाशीं संलग्न असतात असें जो उमजतो; व आत्मा हा एकच एक उदासीन, असंग आणि म्हणूनच पापरहित आहे असें जो समजतो त्याला मोक्षप्राप्ति होते, स्वप्नस्थितींत देहानें अनुभविलेल्या सुखदुःखादिकांचा लेप जसा जाग्रदवस्थेंतील आत्म्याला नाहीं तो जसा एका अर्थानें असंग असतो, तसा परमात्मा वस्तुतः असंग असतो व व्यवहारसत्तेंत जीवात्म्यानें भोगलेल्या सुखदुःखांचा व इंद्रियार्थांचा अध्यारोप त्याच्यावर केला जातो. या वास्तविक प्रकाराचें ज्ञान ज्याला होतें तो मोक्षमार्गास जातो, त्याला मोक्षप्राप्ति होते. प्राण, अपान, व्यान, समान व उदान हे पांच; या पांचांना वर खेंचणारा सहावा व खालीं ओढणारा सातवा असे सात वायुप्रकार असून या सातांपैकीं प्रत्येकाचे पुनः सात पोट विभाग असतात असें जाणून, सारांश, एका वटवृक्षामध्यें अनेक बीजें, त्या बीजांपैकीं प्रत्येक बीजांत पुनः अनेक बीजें अशा तऱ्हेनें जसे एका वटवृक्षांतून अनेक वृक्ष निर्माण व्हावे त्याप्रमाणें एका देहापासून अनेक देह प्रकट होऊन संसाराचें अनंतत्व त्यामुळें सिद्ध होतें असें जाणून, संसारबीजभूत जें अज्ञान त्याचाच तत्त्वज्ञानानें उच्छेद करावा व मोक्षमार्गास लागावें. वासनाबीजें अनंत आहेत व त्यामुळें उत्पन्न होणाऱ्या संसाराचें स्वरूपहि अनंत प्रकारचें आहे. तस्मात्, अज्ञानानें उत्पन्न होणाऱ्या वासनेचा तत्त्वज्ञानानें उच्छेद करावा व मोक्षाची वाट धरावी. सप्त प्रजापति, ऋषि, धर्मशास्त्रानें सर्वोत्कृष्ट म्हणून सांगितलेल्या मार्गांनीं जाणारे श्रेष्ठ श्रेष्ठ लोक, अनेक राजर्षि, देवर्षि व सूर्याप्रमाणें अत्यंत तेजस्वी वाटणारे ब्रह्मर्षि हे सर्व कालाच्या झपाट्यांत सांपडून आपापल्या ऐश्वर्यापासून भ्रष्ट झालेले दिसतात. हे राजन्, मोठमोठ्या भूतसंघांचा नाश झाल्याचें आपण ऐकतों. पापाचरण

करणारांना अशुभ गति प्राप्त होते. यमसदनाला जाणाऱ्यांना वैतरणी नदींत जीं अनेक दुःखें भोगावीं लागतात त्यांचीं वर्णनें आपल्या कानीं येतात. आपल्या कर्मफलानुसार निरनिराळ्या योनींत जन्म घेत असतांना अनेक प्रकारचे संसारांतले अशुभ गोष्टींचे अनुभव प्राण्याला घ्यावे लागतात हें आपण पहातों. प्राणी गर्भाशयांत असतांना त्यांना शेंकडों शिरांनीं व्यापिलेल्या; मज्जा, स्नायु इत्यादिकांनीं युक्त असलेल्या; पुरुषवीर्य व स्त्रीचें रज यांच्या सन्निकर्षानें बनलेल्या; अतिशय उग्र अशा दर्पानें व्याप्त झालेल्या; कफ, मूत्र व विष्ठा हीं ज्यांत भरलेलीं आहेत अशा; रक्तानें व उदकानें परिपूर्ण असलेल्या अत्यंत अपवित्र अशा नऊ दरवाजांच्या देहांत रहावें लागतें. तामसी वृत्तीनें वागणाऱ्या लोकांना सुखप्राप्ति व सात्विक आचरण करणारांना दुःखप्राप्ति झाल्याचें कधीं कधीं आपल्या प्रत्ययास येतें. परमतत्वाची ओळख करून घेतलेल्या ज्ञानी पुरुषांची निंदा झाल्याचें आपण पहातों. चंद्र व सूर्य यांच्यासारख्या तेजःसंपन्नांना ग्रहणें लागतात तीं आपल्या अनुभवाला येतात. आकाशांतून तारा पडतात, नक्षत्रें चळतात, कायमचीं म्हणून एकत्र बांधिलीं गेलेलीं जीं स्त्रीपुरुषें त्यांना दारुण वियोगदुःख भोगावें लागतें, अत्यंत दुर्दम अशी पोटाची आग शमविण्यासाठीं प्राणी एकमेकांना खातात. असले अशुभ प्रकार वारंवार आपल्या भोंवतालीं आपण पहातों. बाल्यावस्थेमध्यें मनुष्याला गाढ अज्ञानांत रहावें लागतें व त्याच्या देहाचा क्षय होतो हें आपणांला दिसतें. ही परिस्थिति वस्तुतः अशी आहे कीं सर्वांनीं हिचा त्याग करून मोक्षमार्गाची कांस धरावी. परंतु, आश्चर्य हें या परिस्थितीचें हें घाणेरडें स्वरूप ओळखून सुद्धां मनुष्य त्यांतच गुरफटून रहातो व रागमोहांना जिंकून सत्वगुणाचा आश्रय करून मोक्षमार्गाच्या वाटेनें जाणारा कोणीं सांपडलाच तर तो हजारांत एकादाच सांपडतो. मोक्ष दुर्लभ आहे हें जाणून, स्वतःचें हित कशांत आहे तें पक्केपणीं ओळखून, नानाप्रकारच्या योगमार्गांनीं मनुष्यानें मोक्षसाधन करावें हेंच उचित होय.

हे राजन्, विषय हे अत्यंत दुष्ट असून बंधनकारक आहेत; मनुष्यांच्या देहांना मरणोत्तर अत्यंत अशुभ अवस्था प्राप्त होते; घरदार करून रहाणाऱ्या गृहस्थाश्रमी पुरुषाला अत्यंत कष्ट भोगावे लागतात; ब्रह्महत्या करणारे पतित प्राणी अत्यंत घोर अशा गतीला जातात; सुरापानामध्यें आसक्त असणाऱ्या व गुरुपत्नीशीं गमन करणाऱ्या ब्राह्मणांना अतिशय अपवित्र गति प्राप्त होते; जे आपल्या

आईशीं योग्य प्रकारें वागत नाहींत व देवतांच्या बाबतींतील ज्यांचें आचरण अयोग्य असतें त्या अशुभाचरण करणाऱ्या लोकांना वाईट गति प्राप्त होते; पशु-योनींत जन्म घेतलेल्या प्राण्यांना विविध गति प्राप्त होतात; वेदामध्यें निरनिराळ्या प्रकारचे वाद उत्पन्न होतात; ऋतूंमध्यें फेरबदल होतात आणि संवत्सर, मास, पक्ष व दिवस यांचा संक्षय होतो इत्यादि गोष्टींचें विवेकपूर्वक ज्ञान मनुष्यानें प्राप्त करून घ्यावें. तसेंच चंद्राची वृद्धि व त्याचा क्षय हीं आपणांला डोळ्यांनीं दिस-तात; समुद्राची भरती व ओहोटी आपण पहातों; द्रव्याला व्यय आहे तशीच त्याला वृद्धि आहे हें आपल्या प्रत्ययाला येतें; वस्तूंच्या संयोगाला क्षय आहे हें आपण जाणतों; कालाचीं जीं कृतादि चार युगें आहेत त्यांना क्षय आहे हें आपणांस उमजतें; पर्वत, नद्या, चारी वर्ण इत्यादिकांना क्षय हा आहेच, इतकेंच नव्हे तर क्षय हाहि स्वतः शाश्वत नाहीं. कोणतीहि गोष्ट पुनः उत्पन्न होणें म्हणजे त्या वस्तूच्या एकदां झालेल्या क्षयाचा क्षयच होय, या अर्थानें क्षयालाहि क्षय आहे. तेव्हां मनुष्यानें या गोष्टींचें सूक्ष्म ज्ञान विवेकपूर्वक करून घ्यावें. जन्म, मृत्यु, जरा व व्याधि या देहाच्या पाठीमागें लागलेल्या आहेत; या देहदोषांनीं विविध दुःखें उत्पन्न होतात व त्यामुळें शरीराचे हाल होतात हेंहि मनुष्यानें उमजावयास पाहिजे. ज्या दोषांचा आपण परमात्म्यावर आरोप करितों असे कित्येक दोष आपणांत असतात. या व वर सांगितलेल्या सर्व बाह्य दोषांचें ज्ञान करून घेऊन तत्वज्ञानानें त्यांचा उच्छेद करावा व मोक्षपंथाची कांस धरावी.

युधिष्ठिर—हे पराक्रमी पितामहा, आपल्या दृष्टीनें देहोद्भव असे दोष कोणते आपण समजतां तें मला उलगडून सांगा.

भीष्म—मोक्षमार्गाचें यथावत् ज्ञान असणारे कापिल मतानुयायी ज्ञानी पुरुष देहामध्यें पांच दोष असल्याचें सांगतात. ते दोष मीं तुला सांगतों ते ऐक. काम, क्रोध, भय, निद्रा व श्वास हे ते पांच दोष होत. सर्व सशरीर प्राण्यांच्या ठिकाणीं हे दोष असतात. त्यागी पुरुष क्रोधाचा विच्छेद क्षमावृत्तीनें करितात; वासनेचा निरास संकल्प मारून करितात; सात्विक वृत्तीचा आश्रय करून निद्रा जिंकतात; सर्व गोष्टींत सावधपणा राखून भयाची भीति टाळतात व अल्पाहारानें श्वास आहारीं ठेवतात. विविध प्रकारच्या शेंकडों गुणांचें व दोषांचें पृथक्करण करून आणि नानाप्रकारच्या हेतूंची चिकित्सा करून पदार्थ-मात्रांचे गुणदोष व हेतु यांचें हे पूर्ण ज्ञान करून घेतात. या ज्ञानामुळेंच हा मृत्युलोक म्हणजे पाण्याच्या फेसाप्रमाणें असून भगवान् विष्णूच्या विविध

मायेनें व्यापलेला आहे व तो भिंतीवर काढलेल्या चित्राप्रमाणें निःसार असून गवताच्या काडीप्रमाणें आंतून पोकळ आहे—सारांश हा मृत्युलोक सर्वथा असार आहे असा प्रत्यय ज्ञानी पुरुषाला येतो. हें सर्व जग म्हणजे अंधारांत असलेल्या खड्ड्याप्रमाणें दगा देणारें आहे; पावसाच्या पाण्यावरील बुडबुड्यांप्रमाणें क्षणिक आहे; हें सर्वथा नाशिवंत असून सुखानें विहीन व दुःखानें भरलेलें आहे; याचा नाश झाला तरीसुद्धां हें राजस व तामस विकारांत विलीन झाल्यामुळें चिखलांत रुतलेल्या हत्तीप्रमाणें परवशच असतें असें या जगाबद्दलचें ज्ञान महाबुद्धिमान् सांख्यमार्गी ज्ञात्यांना झालेलें असतें. म्हणून, आपल्या सर्वव्यापी ज्ञानयोगाच्या बळानें हे पुरुष पुत्रदारगृहादिकांचा स्नेह तोडतात व सर्व प्रकारचे राजस किंवा तामस असे अशुभ बंध टाकून देतात. देहाशीं समन्वित असलेले व इंद्रियसंस्पर्शानें उत्पन्न झालेले सुखमय सात्विक भावसुद्धां हे पुरुष तोडून टाकतात. तपोदंडानें युक्त असलेल्या आपल्या ज्ञानशस्त्राच्या सहाय्यानें हे सांख्यज्ञानी महात्मे सात्विक, राजस व तामस अशा सर्व शुभाशुभ भावांचा उच्छेद करून टाकतात व हा संसारसागर तरून जातात.

हा संसारसागर अत्यंत घोर अशा दुःखरूप जलानें भरलेला आहे. चिंता व शोक हे यांच्यांतील मोठाले डोह होत. नानाप्रकारच्या व्याधि व मृत्यु हा या समुद्रांतील मगरी; अत्यंत अनर्थकारक अशा अनेक भीतिदायक गोष्टी हेच या समुद्रांतील सर्प; अज्ञान हें यांतील कांसव; नानाप्रकारचे राजसभाव हे यांतील मासे; मायाममता हाच यांतील चिखल; वृद्धपण हे यांतील खडक व ज्ञान हे दीपस्तंभ होत. हा संसारसागर कर्माइतका अथांग आहे. सत्य हें याचें तीर व स्थिति हीच याची वेला—मर्यादा होय. हा हिंसारूप महावेगानें अत्यंत चपल गतीनें वहातो. हा सागर म्हणजे नानाप्रकारच्या रसांची खाण आहे. नानाप्रकारचीं प्रेमरूप रत्नें यांत सांपडतात, याच्यावर दुःखज्वर इत्यादिकांचीं मोठालीं वादळें होतात, यांत शोक व तृष्णा यांसारखे मोठाले भोंवरे आहेत. नानाप्रकारच्या दुःखद व्याधि हेच यांतील मोठाले हत्ती होत. अस्थींचा समुदाय हाच याच्या तीरावरील तट असून श्लेष्मा हा याच्यावरचा फेंस होय. हा सागर म्हणजे दानरूप मोत्यांची खाण असून याच्यांतील रक्ताचे डोह हेंच यांतील पोंवळयांचें जन्मस्थान होय. प्राणिमात्रांचें हास्य व निरनिराळे ध्वनि हीच या समुद्राची गर्जना असून अनेक विकल्प उत्पन्न करणाऱ्या अज्ञानामुळें हा अत्यंत दुस्तर झाला आहे. जीवांच्या रडण्याचे अश्रु यांत पडल्यामुळें याचें पाणी खारट झालें आहे. वासनात्याग

हेंच याचें परतीर असून बायकामुलांच्या ठिकाणीं असणारी मनुष्याची आसक्ति हाच यांतील जळवांचा थवा होय. स्नेही व आप्तइष्ट हींच यांतील जागोजागींचीं बंदरें होत. या सागराची मर्यादा म्हणजे अहिंसा आणि सत्य व यांतील मोठमोठाल्या लाटा म्हणजे मृत्यु. वेदान्त हें या सागरांतील मुक्कामाचें बेट होय. सर्व भूतमात्रांच्या ठिकाणीं दया दाखविणें हीच हा सागर तारून नेणारी सांगड होय. मोक्षासारखी दुर्लभ गति हाच या सागराच्या पलीकडचा प्रदेश आहे व सामान्य जलसागराच्या पोटांत जसा वडवाग्नि असतो तसाच या समुद्रांत वेश्यासक्ति हा अग्नि आहे. हे भारता, याप्रकारचा हा भवसागर असून महात्मे सिद्ध-मुनि आपल्या ज्ञानबलाच्या जोरावर हा तरून जातात, व जन्मयुक्त अशा या स्थूल शरीराचा त्याग करून विमल आकाशांत—हृदयाकाशांत—प्रवेश करतात. देहाच्या ठिकाणीं परमात्म्याचा केलेला अभ्यास याप्रमाणें नाहींसा झाला म्हणजे सांख्यज्ञानी पुरुषाला व्योमसंवित् प्राप्त होते. कमलनालाच्या द्वारानें ज्याप्रमाणें पाणी वर आकर्षिलें जातें व फुलांना पोंचविलें जातें त्याप्रमाणें सूर्य आपल्या किरणांच्या द्वारें चौदाही भुवनांतील विषय या हृदयाकाशांत रहाणाऱ्या पुण्यवान् सांख्यज्ञानी पुरुषांना पोंचवितो. व्योमसंवित्ति प्राप्त झाली म्हणजे या सांख्यज्ञान्याचे ठिकाणीं सर्वज्ञता, सर्वात्मता इत्यादि गुण येतात. हृदयाकाशांत स्थित असलेल्या या रागरहित, सिद्ध, वीर्ययुक्त व तपोधन मुनींना प्रवह नांवाचा वायु वर खेंचतो व आकाशाच्या परम गतीला नेऊन पोंचवितो. हा प्रवह वायु सूक्ष्म, शीतल, सुगन्धी, सुखस्पर्श व सात प्रकारच्या वायूंत सर्वश्रेष्ठ असून याचा संचार सर्व शुभ लोकांमध्यें असतो. हे राजेंद्रा, आकाशाच्या पराकोटीला हे गेले म्हणजे तेथून आकाशद्वारा रजाच्या पराकोटीला पोहोंचतात व रजांतून सत्वाच्या परमगतीला जातात. हे शुद्धात्म्या युधिष्ठिरा, हे ज्ञानी पुरुष पूर्ण सत्यमय झाले म्हणजे त्या सत्वाच्या द्वारानें ते नारायणरूप होतात. हे ज्ञानीपुरुष नारायणस्वरूपीं लीन झाले म्हणजे नारायणप्रभु त्यांना परमात्मस्वरूपाप्रत पोहोंचवितो. परमात्मस्वरूपापर्यंत पोहोंचून हे शुद्धसत्व ज्ञानी पुरुष त्याच्याशीं तादात्म्य पावतात व हें तादात्म्य हाच मोक्ष असून या स्थितींत त्यांना पुनरावृत्ति नाहीं. सत्य व आर्जव यांच्या ठिकाणीं रत असलेल्या, सर्व भूतमात्रांना दयाशील वृत्तीनें वागविणाऱ्या व द्वंद्वातीत झालेल्या महात्म्या पुरुषांना मिळणारी परमगति ती हीच होय.

युधिष्ठिर : स्थिरव्रत अशा सांख्यज्ञानी पुरुषांना परमेश्वराचें उत्तम पद प्राप्त

झालें असतांना त्या मोक्षस्थितींत जन्ममरणादिकांचें स्मरण असतें कीं नाहीं? मोक्षस्थिति ही सर्वज्ञत्वाची स्थिति होय. तेव्हां, त्या अवस्थेंत जन्ममरणादि पूर्वजन्मीं भोगलेल्या अवस्थाविशेषांचें स्मरण राहूं शकतें कीं नाहीं अशी मला शंका आहे. यासंबंधांत खरें काय असेल तें आपण मला सांगावें. कारण, आपल्यावांचून दुसऱ्या कोणासहि हा प्रश्न विचारण्याची माझी इच्छा नाहीं. मोक्षाचें विवेचन करणारे जे वेदमंत्र आहेत त्यांचें मनन केलें तर मोक्षाचे ठिकाणीं एक मोठा दोष संभवतो. मोक्षस्थितींत सर्वज्ञत्व असतें असें श्रुति सांगते म्हणून, परमपदाला पोंचलेल्या यतींचे ठिकाणीं जन्ममरणाद्यवस्थाविशेषांचें ज्ञान संभवतें. असलें अहंकारविशिष्ट ज्ञान–मीं पूर्वी अमुक होतों असें ज्ञान–जर यांच्या ठिकाणीं असतें असें मानावयाचें तर संन्यासादिकांचें मूल रहस्यच जें अहंकारादिकांचा निरास तेंच नाहींसें झाल्यावर संन्यासांत स्वारस्य तें काय उरलें? अहंकारादिकांचा निरास जर मोक्षावस्थेंतहि होऊं शकत नाहीं तर संन्यासादिकांचें प्रयोजनच उरत नाहीं. मग त्यापेक्षां प्रवृत्तिधर्मच बरा. बरें, याच्या उलट, सुषुप्त्यवस्थेप्रमाणें मोक्षावस्थेमध्यें ज्ञान हें विगलित झालेलें असतें असें मानावें तर मोक्ष हा ज्ञानरूप असल्यानें, हा पक्ष स्वीकारिल्यास, ज्ञानशून्य अवस्थेला ज्ञान असें म्हणण्याचा प्रसंग येईल. तात्पर्य, पूर्वजन्मींच्या अवस्थाविशेषांचें ज्ञान मोक्षस्थितींत शिल्लक रहातें म्हणावें तर संन्यासमार्गावर वैयर्थ्यापत्ति येऊन प्रवृत्तिलक्षण धर्म बरा म्हणण्याची पाळी येते. बरें तसें न मानावें तर ज्ञानशून्य अवस्थेला ज्ञान म्हणण्याची पाळी येते. तेव्हां, यांतील तथ्य काय तें आपण मला उलगडून सांगा.

भीष्मः हे भरतर्षभा, तुझा प्रश्न अत्यंत अवघड आहे; परंतु, तो न्यायाला धरून आहे. या प्रश्नाच्या संबंधांत मोठमोठ्या शहाण्यांची मति कुंठित होते. तथापि, यांतील खरें तथ्य काय तें मीं तुला सांगतों ऐक. या प्रश्नाचा विचार करतांना महात्म्या कपिल ऋषींनीं व सांख्यमतानुयायी ऋषींनीं आपल्या बुद्धिकौशल्याची पराकाष्ठा केली आहे. मनुष्याच्या शरीरांत स्थित असलेल्या इंद्रियांनाच वस्तुतः निरनिराळ्या विशिष्ट वस्तूंचें ज्ञान होतें. आत्म्याला ज्ञान होतें असें जें आपण म्हणतों तें ज्ञान इंद्रियांचे द्वाराच त्याला होत असल्यामुळें इंद्रियांनाच ज्ञान होतें व आत्म्याला होणाऱ्या ज्ञानाचें कारण इंद्रियेंच होत असें म्हणावें लागतें. आत्मा हा सूक्ष्मरूप असून इंद्रियांचे द्वारानेंच तो सर्व गोष्टींचा अनुभव घेतो. आत्म्याला ज्ञान होतें तें इंद्रियद्वारा होतें म्हणून

इंद्रियें हींच ज्ञानसंपन्न आहेत म्हणावें तर तसेंहि होत नाहीं. कारण इंद्रियांचा व आत्म्याचा वियोग झाला असतां इंद्रियें हीं लांकडाच्या निर्जीव तुकड्यांप्रमाणें किंवा समुद्रावरील फेंसाप्रमाणें नाश पावतात. पाण्याच्या फेंसाला त्याचें म्हणून निराळें रूप आहे असा जरी भास झाला तरी पाण्याचें रूप नाहींसें झाल्याबरोबर फेंसाचें रूपहि नाहींसें होतें. म्हणजे, पाण्याच्या आधारावांचून फेंस राहूंच शकत नाहीं. त्याप्रमाणें आत्मा आहे तर इंद्रियें आहेत, त्याच्या अभावीं त्यांना निराळें अस्तित्वच असूं शकत नाहीं. म्हणून इंद्रियें हीं ज्ञानसंपन्न नाहींत, तीं जडस्वरूप आहेत. आत्म्याला जें विषयांचें विशिष्ट प्रकारचें ज्ञान होतें तें तो इंद्रियांच्यामध्यें प्रवेश करून तद्द्वारा करून घेतो. प्राण्यांचे अवस्थाविशेष व अनुभवविशेष यांचें ज्ञान नुसत्या जड इंद्रियांनाहि नाहीं व निरिंद्रिय आत्म्यालाहि नाहीं. आत्म्याच्या ठिकाणीं ज्ञातृशक्ति स्वतंत्र—इंद्रियनिरपेक्ष—आहे; पण, ती प्रकट व्हावयास त्याला इंद्रियांचें साह्य लागतें. उलट, इंद्रियें हीं वस्तुतः जड असल्यानें चेतन आत्म्याच्या साहाय्यावांचून आपलें कार्य करूं शकत नाहींत. देहोपाधिविशिष्ट जीवात्मा सर्व इंद्रियांसहवर्तमान ज्यावेळेस झोंपेंत मग्न झालेला असतो अशा वेळींहि सूक्ष्म अंतरात्मा हा आकाशांत वायूनें संचार करावा त्याप्रमाणें सर्वत्र संचार करीत असतो. हे राजन्, जाग्रदवस्थेप्रमाणें स्वप्नस्थितींतहि सर्व विषयांचें ज्ञान आपल्याला यथापूर्व होतें असा जो अनुभव येतो त्याचें कारण सूक्ष्मरूप अंतरात्म्याचा सर्वत्र संचार हेंच होय. चेतन आत्म्याचें सहाय्य नसलें म्हणजे स्वभावतः दुबळीं असलेलीं इंद्रियें निर्विष सर्पांप्रमाणें आपापल्या जागीं स्वस्थ सुप्तस्थितींत असतात. आपापल्या ठिकाणीं सुप्त असलेल्या इंद्रियांच्या सर्व वृत्ति व्यापून आत्मा ह्यांच्यांतून संचार करीत असतो. चेतन आत्म्याच्या संसर्गामुळेंच इंद्रियांच्या वृत्ति जाग्या होऊन आपापले व्यापार करूं लागतात हा या म्हणण्याचा भावार्थ होय. सात्विक भावाचे धर्म आदिकरून जे गुण त्या सर्वांना; राजसभावाच्या प्रवृत्त्यादि गुणांना; तामसभावाच्या आलस्यादि गुणांना; संशयाचा निरास करून कोणत्याहि वस्तूचें रूप ठाम निश्चित करण्याचा जो बुद्धीचा विशिष्ट गुण त्याला; मनाच्या संकल्पादि गुणांना; पृथ्वी, आप, तेज, वायु व आकाश या पंचमहाभूतांच्या गुणांना व क्षेत्रज्ञाच्या ठिकाणीं संनिहित असलेले जे सर्व गुण त्या सर्वांना परमात्मा आपल्या चित्त्व, सत्त्व, आनंदत्व इत्यादि गुणांनीं व्याप्त करतो व अशा प्रकारें क्षेत्रज्ञ जीवात्म्यालाहि व्यापून टाकतो. शुभाशुभ कर्में हींहि पण क्षेत्रज्ञ आत्म्यालाच व्यापितात. त्यांचाहि संबंध

त्याच्याशींच येतो. आपल्या गुरूची आज्ञा पाळण्यास शिष्य जसे तत्परतेनें उभे असतात त्याप्रमाणें इंद्रियें हीं जीवात्म्याच्या इच्छा पूर्ण करण्यांत तत्पर असतात. मग त्यांच्या सहाय्यानें जीवात्मा निरनिराळ्या विषयांचा उपभोग घेतो. विषयविशेषांचें विज्ञान हें इंद्रियांच्या द्वारें प्रकट झालें एवढ्यापुरतें तें इंद्रियांचें व आत्म्यानें प्रकट केलें एवढ्यापुरतें तें आत्म्याचें होय. ज्या प्रकृतीच्या—मायेच्या—योगानें परमात्मा जीवात्मा होतो ती प्रकृतीची कारणरूप उपाधि व जीवात्म्याच्या हातून कार्ये करविणाऱ्या इंद्रियांची कार्योपाधि अशा दोन्हीं उपाधींचा जीवात्म्यानें त्याग केला—जीवात्मा हा प्रकृति व इंद्रियें यांचें क्षेत्र ओलांडून पलीकडे गेला—म्हणजे तो अव्यय अशा परमात्मस्वरूपांत मिळून जातो. प्रकृतीच्या पलीकडचें द्वंद्वातीत आत्मस्वरूप हाच नारायणस्वरूपी परमात्मा होय. पुण्य व पाप हीं दोन्ही नाहींशीं झाल्यावर त्या निर्गुण व अनामय परमात्मस्वरूपांत जीवात्मा एकदां विलीन झाला म्हणजे त्याला पुनरावृत्ति नाहीं. जीवात्म्याला जरी याप्रमाणें समाधि लावतां आली तरी देहपातापर्यंत ही समाधि कायमची टिकूं शकत नाहीं; या समाधींत मन व इंद्रियें हीं मागेंच राहिलेलीं असतात व तीं जीवात्मा समाधींतून फिरून भानावर आला म्हणजे त्याला येऊन चिकटतात. थोडक्याच काळांत प्राप्त देहाचा वियोग झाला म्हणजे त्रिगुणांची अपेक्षा धरणाऱ्या जीवात्म्याला कायमची शांति मिळते. हे कौंतेया, या प्रकारचें मोक्षप्राप्ति करून देणारें जें हें ज्ञान मीं तुला सांगितलें त्या ज्ञानमार्गानें महाबुद्धिमान् सांख्यज्ञानी पुरुष परमगतीला पोंचतात. या ज्ञानाशीं तुल्यरूप असें ज्ञान जगांत दुसरें नाहीं. सांख्यज्ञान हेंच परमश्रेष्ठ ज्ञान होय, योगापेक्षांहि तें श्रेष्ठ आहे याबद्दल मनांत मुळींच संशय येऊं देऊं नको.

हे राजन्, ब्रह्म हें पूर्ण, सर्वव्यापी, सनातन, नित्य एकच रूपानें असणारें, अविकारि, कधींहि कमीजास्त न होणारें व अढळ असें आहे. ब्रह्माला आदि नाहीं, मध्य नाहीं व अंतहि नाहीं. तें सुखदुःखादि किंवा शीतोष्णादि द्वंद्वांच्या पलीकडचें असून शश्वद्रूप आहे. विचारी पुरुष ज्याला कूटस्थ नित्य म्हणतात, जगाची उत्पत्ति, स्थिति व लय हीं ज्याच्यामुळें होतात व शास्त्रांनीं ज्याचा एवढा ऊहापोह केला आहे तें हें परब्रह्म असें मोठमोठे ऋषि सांगतात. सर्व ब्राह्मण, देव व शमसंपन्न पुरुष याच अनंत परब्रह्माला अच्युत, देव असें म्हणतात. याची प्रार्थना करणारे विप्रर्षि, नानाविध मायिक गुणांनीं अर्थात् विषयांनीं—बुद्धि व्याप्त झाल्यामुळें त्याची तशा शब्दांनीं प्रार्थना करितात. योगाचें विध्युक्त आचरण

करणारे योगी व परमज्ञानी सांख्य हे यालाच जगत्कर्तृ आदिकारण असें म्हणतात. हे राजेंद्रा, त्या निर्गुण निराकार परब्रह्माची साकार मूर्ति म्हणजेच सांख्यज्ञान होय, असें श्रुति सांगते. सांख्यज्ञानाची महति यापेक्षां अधिक काय वर्णावी? हे भरतश्रेष्ठा, या जगांत घटादि विषयांचें जें व्यष्टिरूप ज्ञान आपल्याला होतें त्याचेंच निर्विषय समष्टिस्वरूप म्हणजेच ब्रह्मरूपाचें ज्ञान होय. पृथ्वीवरील भूतमात्रांचे स्थावर व जंगम असे दोन भेद आहेत त्यामध्यें स्थावरापेक्षां जंगम भूतेंच विशिष्ट व श्रेष्ठ होत.

हे राजन, श्रुति, सांख्य, योग इत्यादि निरनिराळ्या शास्त्रांतून जें ज्ञान सांगितलेलें आहे व जें विविध प्रकारच्या पुराणांतहि आहे तें सर्व ज्ञान सांख्यांपासूनच आलेलें होय. मोठमोठ्या इतिहासांतून व राजांनीं आणि शिष्टांनीं आदरिलेल्या अर्थशास्त्रादि शास्त्रांतून सांगितलेलें जें जें कांहीं ज्ञान या लोकांत आहे तें तें सांख्यांमुळेंच. या सांख्यशास्त्रांत शमाचें वर्णन आहे, अत्युत्कृष्ट प्रकारचें बल म्हणजे काय तें येथें सांगितलें आहे. सूक्ष्मस्वरूपाच्या ज्ञानाचें वर्णन यांत आहे. नानाप्रकारचें सूक्ष्म तप व विविध प्रकारचें सुख यांचेंहि वर्णन यांत आहे. कांहीं कारणांनीं सांख्यज्ञान परिपूर्ण रीतीनें झालें नाहीं, त्यांत जर कांहीं उणीव राहिली तर सांख्यमार्गी लोक देवलोकांत जातात. तेथें देवांबरोबर सतत सुखांत विहार करून पुनः ब्राह्मणकुलांत जन्मास येतात. हे राजा, या वेळेस हे ज्ञानी पुरुष, शिष्टांनीं आदरिलेल्या परमोच्च सांख्यज्ञानांत अधिकच रममाण होतात व देवांनीं ज्याप्रमाणें स्वर्गांत प्रवेश करावा त्याप्रमाणें हा पंचभौतिक देह टाकून देवस्वरूपांत प्रवेश करतात—तद्रूप होतात. जे ज्ञानी पुरुष या सांख्यज्ञानांत अनुरक्त होतात त्यांचा अधःपात होत नाहीं, त्यांना जन्म प्राप्त झाला तरी तो नीच योनींत प्राप्त होत नाहीं, त्यांना द्विजातींत सुद्धां हलक्या प्रतीचा जन्म प्राप्त होत नाहीं व पापी लोकांच्या सहवासांत त्यांना रहावें लागत नाहीं. सांख्यज्ञान हें अतिशय जुनाट, शुद्ध, उदार, महासागराप्रमाणें विशाल व रमणीय आहे. हे युधिष्ठिरा, असें हें जें अफाट सांख्यज्ञान तें सर्व महात्मा नारायण स्वतःचे ठिकाणीं धारण करितो. सर्व सांख्यज्ञान नारायणस्वरूपच होय. हें जें जुनाट सांख्यज्ञान मीं आतांपर्यंत तुला सांगितलें हें नारायण स्वरूपाचेंच ज्ञान होय. उत्पत्तिकालीं जगाची उत्पत्ति हा नारायणस्वरूपी भगवान् करतो व संहारकालीं त्याचा लयहि करतो. सर्व जगताचा संहार करून त्याला आत्मस्वरूपीं

लीन केल्यानंतर सर्व जगाला व्यापणारा हा अंतर्यामी भगवान् ~~नारायण ब्रह्म~~ तत्वामध्यें सुखानें झोंप घेत पडतो. १२. ३. ३०१.

---

## अध्याय ३०२ रा.

[ १ क्षराक्षर विचार: २ वसिष्ठकरालजनक संवाद. ]

१ **युधिष्ठिर:** ज्या ठिकाणीं पोहोंचलें असतांना जन्ममरणाची यातायात चुकते तें अक्षरस्वरूप कोणतें, व ज्याच्या प्राप्तीमुळें जन्ममरणाची कटकट संपूं शकत नाहीं असलें क्षरस्वरूप म्हणजे काय तें मला सांगा. क्षराक्षरांचें ज्ञान साकल्यानें व्हावें एवढ्यासाठीं मीं त्यांच्यांतील भेद आपणांस विचारीत आहें. हे शत्रुमर्दना कुरुश्रेष्ठा, वेदपारंगत विप्रर्षि आपणांला ज्ञाननिधि असें म्हणतात. मोठमोठे ऋषि व महात्मे ज्ञानी पुरुष यांचेंहि मत तसेंच आहे. आतां दक्षिणायनाचे दिवस थोडे उरले. दक्षिणायन संपून सूर्य उत्तरेकडे ढळला म्हणजे आपण परमगतीला जाल. मग आपल्यामागें श्रेयासंबंधींचें हें ज्ञान आह्मी कोणाच्या तोंडून ऐकावें ? आपण ज्ञानाच्या तेजानें तेवणारे कुरूंच्या वंशाचे प्रदीप आहां. तेव्हां, आपल्या तोंडून हें ज्ञान ऐकण्याची माझी इच्छा आहे. यासारखें ज्ञानामृत कितीहि प्राशन केलें तरी तृप्ति म्हणून होतच नाहीं.

**भीष्म:** या संबंधांत वसिष्ठाचा व करालजनकाचा झालेला एक संवाद जुना इतिहास म्हणून सांगतात तो मीं तुला सांगतों. पूर्वी एकदां सूर्यासारखे तेजस्वी ऋषिश्रेष्ठ वसिष्ट असेच बसले असतांना राजा जनकानें त्यांना मोक्षविषयक ज्ञानासंबंधीं प्रश्न केला. अध्यात्म्याच्या बाबतींत ऊहापोह करण्यांत वसिष्ठ ऋषि अत्यंत कुशल होते व त्या शास्त्रांतील सिद्धांत अनुभवानें त्यांच्या ठिकाणीं निश्चित ठसलेले होते. असे ते मैत्रावरुणि वसिष्ठ एकदां बसले असतांना, करालजनकानें मोठी कुशल शब्दयोजना करून अत्यंत नम्रपणानें गोड, कुतर्करहित व अर्थपूर्ण भाषेंत त्या ऋषिवरांना प्रश्न केला कीं ' बुद्धिमान् लोक जेथें गेले असतां तेथून परत येत नाहींत, असलें सनातन ब्रह्मतत्व काय आहे तें आपल्या मुखानें ऐकण्याची माझी इच्छा आहे. तसेंच ' क्षर, क्षर,' म्हणून ज्याला म्हणतात तें काय, व हें क्षर ज्यांत लय पावतें, ज्याला अनामय, सुखकारक व आनंदरूप अक्षर म्हणून संबोधण्यांत येतें तें काय आहे हें जाणण्याची माझी इच्छा आहे. ती आपण पूर्ण करावी.

वसिष्ठः हे राजन्, या जगांतील वस्तूंचा नाश कसकसा होतो, व सबंध कालाचा ओघ आटला तरी ज्याचा नाश होऊं शकत नाहीं असें काय आहे तें मीं तुला सांगतों, ऐक. बारा हजार वर्षें म्हणजे देवमानाप्रमाणें एक युग होतें. अशीं चार युगें म्हणजे चतुर्युग होय. यालाच कल्प म्हणतात. अशीं हजार कल्पें म्हणजे ब्रह्मदेवाचा एक दिवस. ब्रह्मदेवाच्या रात्रीचें मानहि इतकेंच आहे. मनुष्याचें एक वर्ष म्हणजे देवांचें एक अहोरात्र. या हिशेबानें देवांचे महिने, वर्षें, युगें व चतुर्युगें यांचें माप करावयाचें. ही रात्र संपल्यानंतर अमूर्तात्मा भगवान् शंकर जागा होतो. अणिमा, लघिमा, प्राप्ति वगैरे अष्टसिद्धि या शंकरांच्या ठिकाणीं स्वयंभूच असतात. या शंकरांना सर्व सत्ताधारी अव्यय तेज असेंहि नांव कोणीं कोणीं देतात. शंकर सर्व भूतांमध्यें श्रेष्ठ अशा हिरण्यगर्भाला उत्पन्न करतात. हा हिरण्यगर्भ अनंतकर्मा व सर्वव्यापी असा असून याला सर्व बाजूंनीं हात, पाय, डोळे, शिरा, मुखें व कान आहेत. या सर्व विश्वाला व्यापून उरणारें याचें रूप आहे. या भगवान् हिरण्यगर्भालाच बुद्धि अशी संज्ञा आहे. योगशास्त्रांत यालाच महान्, विरिंचि किंवा अज असें म्हणतात. विविध रूपांनीं नटणाऱ्या या हिरण्यगर्भाला सांख्यशास्त्रांत अनेक नांवें आहेत. याला विचित्ररूप म्हणतात, विश्वात्मा म्हणतात व एकाक्षर असेंहि म्हणतात. स्वतः उत्पन्न केलेल्या या बहुविध विश्वाला हा आपणच व्यापून रहातो व अनेक रूपें घेतो म्हणून याला विश्वरूप अशी संज्ञा आहे. हा हिरण्यगर्भ अव्ययाचा विकृत झाला म्हणजे आपण आपल्यालाच उत्पन्न करतो. या महातेजस्वी हिरण्यगर्भापासून प्रथम अहंकारतत्व उत्पन्न होतें व अहंकाराच्या उपाधीनें वेढलेला प्रजापति हा नंतर त्या सूत्रात्म्या हिरण्यगर्भापासून निर्माण होतो. हिरण्यगर्भ अव्यक्तांतून व्यक्त स्वरूपांत येतो याला विद्यासृष्टि असें म्हणतात. अक्षर जें परब्रह्मरूप त्यांतून व्यक्त हिरण्यगर्भ निर्माण होणें ही एक सृष्टि; ही विद्यासृष्टि होय. हिरण्यगर्भापासून अहंकारविशिष्ट व विराट्पुरुष निर्माण होणें ही दुसरी सृष्टि. हीच अविद्यासृष्टि होय. मूलकारण अक्षरपरब्रह्म, हिरण्यगर्भरूप असें त्याचें व्यक्तरूप व हिरण्यगर्भापासून उत्पन्न झालेला विराट्पुरुष या तिघांचेंहि वास्तविक ज्ञान होणें हा विधि व यांच्याबद्दल चुकीचे ग्रह उत्पन्न होणें हा अविधि. हें उभयविध ज्ञान नंतर उत्पन्न झालें. श्रुति व शास्त्रें यांचें मनन करणारे महात्मे यालाच अनुक्रमें विद्या व अविद्या असें म्हणतात. सूत्रात्मा हिरण्यगर्भ व विराट्स्वरूप प्रजापति यांच्यानंतर सृष्टयुत्पत्तीच्या क्रमांतील तिसरी पायरी म्हणजे पंचभूतांची उत्पत्ति ही

होय. सूक्ष्म भूतांत–पंचतन्मात्रांत–सत्त्वरजादि गुण उत्पन्न होणें ही चवथी सृष्टि-सृष्ट्युत्पत्तिक्रमांतील चौथी पायिरी–होय. या अवस्थेंत पंचमहाभूतें व त्यांचे शब्दस्पर्शादि पंच विषय अशा दाही गोष्टी एकदमच निर्माण होतात. याच्या-पुढची पांचवी सृष्टि ही इंद्रियें व इंद्रियार्थ यांची सृष्टि होय. कान, त्वचा, डोळे, जिव्हा, व नाक हीं पांच ज्ञानेंद्रियें आणि वाणी, हात, पाय, गुद, व जननेंद्रिय हीं पांच कर्मेंद्रियें व मन या अकरांचा गट, हे राजेंद्रा, एकदमच निर्माण होतो. हीं जीं चोवीस तत्त्वें आतां सांगितलीं या तत्वांचा संघात सर्व देहधारी प्राण्यांच्या ठिकाणीं आढळून येतो. या मूलप्रकृतीचें यथावत् ज्ञान झालें म्हणजे तत्वदर्शी ब्राम्हणांना शोक प्राप्त होत नाहीं.

हे नरश्रेष्ठा, या त्रैलोक्यांत जेवढे जेवढे म्हणून देहधारी प्राणी आहेत–मग ते देव, मनुष्य, राक्षस, यक्ष, भूत, गंधर्व, किन्नर, नाग, चारण, पिशाच, ऋषि, कृमि, कीटक, मशक, उंदीर, कुत्रे, हरिण, हत्ती, घोडे, गाढव, व्याघ्र, झाडें, गाई यांपैकीं कोणींहि असोत–या जगांत जें जें म्हणून मूर्तिमत् आहे त्या त्या सर्वांच्या ठिकाणीं हा चतुर्विंशति तत्वांचा संघात आढळून येतो. पृथ्वी, आप व आकाश या तीहींहून इतरत्र, या चोवीस तत्वांनीं बनलेल्या देहाचा अधिवास असूं शकत नाहीं–या चोवीस तत्वांचा देह धारण करणारे देहधारी या तीन ठिकाणींच असूं शकतात–असें आम्हीं ऐकिलें आहे. या सर्व तत्वांना क्षर अशी संज्ञा असून या तत्वांनीं बनलेला देह दिवसेंदिवस क्षीण होत जातो. अव्यक्तापासून निर्माण झालेलें हें व्यक्तसंज्ञक व मोहात्मक जग ज्याच्या ठिकाणीं विलीन होतें त्याला अक्षर अशी संज्ञा आहे. सर्वांच्या आधीं निर्माण झालेली जी महत्संज्ञक सूक्ष्म बुद्धि तीचा अंतर्भावहि क्षरांतच होतो.

हे राजन्, याप्रमाणें तूं जो मला क्षराक्षराविषयीं प्रश्न केलास, त्याचें उत्तर मी तुला सांगितलें. विष्णु हा या चोवीसांच्या पलीकडला पंचविसावा होय. याला जरी तत्व ही संज्ञा असली तरी वस्तुतः तो तत्वरूप नाहीं. शहाण्या शहाण्या लोकांनीं विष्णूला तत्वसंज्ञा दिली याचें कारण या चोवीस तत्वांचें तो अधिष्ठान आहे हें होय. या जगांत जें जें व्यक्त म्हणून दिसतें तें तें सर्व मूर्तिमत्–देहधारी–आकृतिविशिष्ट–होय. चोवीस तत्वांच्या संघातानें बनलेला देह हा व्यक्त व या व्यक्ताच्या पलीकडला अव्यक्त जो तो अमूर्त परमात्मा होय. हा अमूर्त परमात्मा सर्व मूर्तींच्या—देहधारी प्राण्यांच्या—हृदयांत वास करितो. हा केवल, चेतन, नित्य व सर्व मूर्तींना व्यापूनसुद्धां स्वतः निराकार असा आहे.

वस्तुतः अरूप असलेला हा चिदात्मा उत्पत्ति व लय यांनीं युक्त अशा प्रकृतीच्या सांनिध्यानें उत्पत्तिप्रलयांनीं युक्त आहेसा भासतो; इतकेंच नव्हे तर निर्गुण असूनहि सगुण रूपानें आपणांस गोचर होतो. अशा प्रकारें, उत्पत्ति व प्रलय यांचें ज्ञान असणारा हा विभु आत्मा प्रकृतिसांनिध्यानें विकृत होतो व मोहानें व्याप्त होऊन खोटा अहंपणाचा अभिमान धरतो.

सत्व, रज व तम या त्रिगुणांशीं संबद्ध झाल्यानें त्या त्या सात्विक राजस किंवा तामस अशा निरनिराळ्या योनींशीं हा आत्मा, मूढ अशा त्रिगुणात्मक प्रकृतीच्या संगतीमुळें व स्वतःच्या अज्ञानामुळें एकरूप होऊन जातो. देहादि संघाताच्या सहवासांत आत्म्याचें मूळरूप झांकून जात असल्यानें देहादिकांहून मीं भिन्न नाहीं अशीच त्याची भावना होते. 'मीं हा' 'मीं तो' असा अभिमान धरिल्यानें कुलाभिमान व जात्याभिमान त्याच्या ठिकाणीं प्रकट होतो व मग त्या त्या निरनिराळ्या गुणांचा अभिमान धरून हा वागूं लागतो. प्रकृतीच्या नादीं लागून आत्मा तमोव्याप्त झाला म्हणजे क्रोधादि तामस गुणांचा अंमल त्यावर चढतो. तसाच तो रजोगुणानें व्याप्त झाला म्हणजे 'मीं हें करीन, तें करीन' अशा भावना त्याच्या अंगीं उत्पन्न होतात. सत्वगुणानें आत्मा व्यापिला म्हणजे सात्विक गुण त्याचे ठिकाणीं प्रकट होतात. एवंच, त्रिगुणात्मक–प्रकृतीच्या आधीन झालेला आत्मा त्रिगुण वर्तवतील तसा वर्तूं लागतो. सत्व, रज व तम या तीन गुणांचीं शुक्ल, रक्त व कृष्ण अशीं तीन रूपें आहेत. या जगांत प्रकृतीचीं जीं नानाविध रूपें दिसतात तीं सर्व या तीन रूपांत समाविष्ट होतात. यांपैकीं तामस गुणांचा आश्रय करणारे तामसी जीव नरकांत जातात. राजस जीवांना मनुष्यलोकाची प्राप्ति होते व सात्विक प्राणी जे आहेत त्यांना देवलोकांचीं सुखें अनुभवावयास मिळतात. निर्भेळ पापाचरणानें हलकी पशुयोनि प्राप्त होते. पुण्य व पाप सारखेंच असेल तर मनुष्यलोक प्राप्त होतो व केवळ पुण्याचरणानें देवलोक मिळतो. अशाप्रकारें चोवीस तत्वांच्या पलीकडला पंचविसावा व वस्तुतः असंग असा आत्मा मायावश होऊन विकारी झाला म्हणजे त्याला क्षर ही संज्ञा प्राप्त होते. जो आत्मा वस्तुतः अक्षर व अव्यय असतो तोच माया-संगानें विकारी झाला म्हणजे क्षर होतो. १२. ३. ३०२.

## अध्याय ३०३ रा.

[ १ वसिष्ठकरालजनक संवादः २ मायेच्या संगानें पुरुष वेडा कसा होतो याचें वर्णन. ]

१ **वसिष्ठः**—अशा प्रकारें मोहव्याप्त झाल्यामुळें आत्मा हा अज्ञानजन्य गोष्टींच्या मागें लागतो व त्यामुळें त्याला एक देहाच्या त्यागानंतर दुसरे हजारों देह धारण करावे लागतात. कित्येक वेळां त्याच्या गुणांच्या सामर्थ्यावर त्याला देवतांमध्यें संचार करावयास सांपडतो तर कित्येकदां त्याच गुणांचा क्षय झाला असतांना हजारों तिर्यक् योनींतूनहि त्याला फिरावें लागतें. हा कधीं मनुष्यलोकांतून स्वर्गलोकांत तर कधीं स्वर्गलोकांतून मनुष्यलोकांत तर कधीं मनुष्यलोकांतून शाश्वत नरकांत असा फिरत असतो. कोश घालणारा किडा ज्याप्रमाणें स्वतःच्या जाळ्यांतील तंतूंनींच आपणांस वेढून घेतो त्याप्रमाणें हा असंग निर्गुण आत्मा गुणांनीं आपणांस वेढून घेतो, गुणांनीं बद्ध होतो. स्वतः सुखदुःखातीत असलेला आत्मा प्रकृतिवश होऊन त्या त्या योनींतून फिरूं लागला म्हणजे तेथल्या तेथल्या सुखदुःखांनीं व्याप्त होऊन तीं तीं सुखें किंवा दुःखें आपलीं मानतो. मस्तक, डोळे, दांत व गळा या ठिकाणीं उत्पन्न होणारे विकार; जलोदर, घशाला कोरड पडणें, ताप येणें, अतिसार होणें, अंगावर कोड फुटणें, शरीर भाजलें जाणें, श्वास लागणें, फेंपरं येणें इत्यादि ज्या अनेक विचित्र व्याधि या प्रकृतिजन्य शरीराला होतात त्या त्या सर्व आपल्यालाच होतात असें हा अज्ञानानें मानतो. हजारों पशुयोनींतून हिंडत असतांना हीं दुःखें आपल्यालाच होतात असें ज्याप्रमाणें हा देहाभिमानानें म्हणतो त्याचप्रमाणें देवतांतून संचार करितांना तेथील सुखें आपलीं असेंहि हा याच प्रकारच्या देहाभिमानानें म्हणतो. संसारांत कधीं शुभ्रवस्त्रें धारण करण्यास मिळतात, तर कधीं चिंध्या गाळाव्या लागतात. हा देह कधीं खालीं जमिनीवर पडून झोंप घेतो, कधीं कधीं बेडकाप्रमाणें हातपाय पोटाशीं घेतो, कधीं वीरासन घालून बसतो तर कधीं उत्तम प्रकारचीं वस्त्रें धारण करतो. ह्या देहाला कधीं कधीं उघड्यावर रहावें लागतें व झोंपावें लागतें. हा देह कधीं विटा आंथरून त्यावर, कधीं कांट्याकुट्यांत, कधीं भस्मराशींत, तर कधीं अरण्यांत लोळत रहातो. कधीं वीराला योग्य अशा समरभूमीवर तर कधीं चिखलांत तर कधीं लाकडाच्या फळ्यांवर याला शयन करावें लागतें. फलाशेनें व्याप्त झालेला हा देह नानाप्रकारच्या शय्यांवर झोंप घेतो, रेशमी वस्त्रें धारण करतो, हरिणाचीं कातडीं पांघरतो, कांबळीं पांघरतो, वाघाचीं कातडीं वापरतो,

सिंहाचीं कातडीं वापरतो, झाडांच्या साली नेसतो, कांटेरी कापसाच्या झाडांपासून निर्माण झालेलीं व कोश घालणाऱ्या कृमींपासून झालेलीं वस्त्रें वापरतो, कधीं कधीं मुंज गवताची मेखला घालतो व कधीं नग्नहि असतो. वस्त्रें धारण करणें, झोंपणें, नानाप्रकारच्या वसतींत वास करणें, वगैरे जीं देहाकडून घडणारीं कर्मे तीं आपल्याच हातून घडतात असें हा जीव अज्ञानानें मानतो. नानाप्रकारचीं रत्नें धारण करणें, विविध प्रकारचे आहार करणें हीं देहांचीं कर्मे आपलींच आहेत असें हा प्रकृतिवश जीव मानतो. एक दिवसा आड नक्त भोजन, दिवसांतून एकच वेळ आहार घेणें, दिवसाच्या चौथ्या, आठव्या किंवा सहाव्या अशा ठराविक वेळींच भोजन करणें, सहा दिवसांनीं, आठ दिवसांनीं, सात दिवसांनीं, दहा दिवसांनीं किंवा बारा दिवसांनीं एकदां जेवणें, सबंध महिनाभर उपवास करणें, कंदमुळें किंवा फळें खाऊन रहाणें, वायु भक्षण करणें, जलपान करून रहाणें, पेंड खाणें, दहीं, गोमय, गोमूत्र, पालेभाज्या, फुलें, शेवाळ, भाताची पेज, गळून पडलेलीं पानें, विविध प्रकारचीं फळें इत्यादिकांपैकीं एकेकावर दिवसचे दिवस काढणें, तसेंच विध्युक्त रीतीनें चांद्रायणादि व्रतें करणें, नानाप्रकारची तपश्चर्या करणें, ब्रह्मचर्यादि चारी आश्रमांत सांगितलेल्या मार्गानें जाणें, कधीं कधीं वाममार्गानें जाणें, पाशुपत, पंचरात्र इत्यादि व्रतांची दीक्षा घेणें, नानाप्रकारचीं पाखंडव्रतें करणें, या ज्या गोष्टी देहाकडून घडतात त्या मींच केल्या असें हा जीव अज्ञानानें म्हणतो. नानाप्रकारचे ओट्यांसारखे शिलाखंड, झरे, नदीचीं वाळवंटें, अरण्यें, पवित्र देवालयें, सरोवरें, दिव्य घरांसारख्या भासणाऱ्या पर्वतांतील गुहा, इत्यादि ठिकाणीं देहानें केलेला वास आपल्यालाच घडला असें हा जीव मानतो. नानाप्रकारचे जप, अनेकविध व्रतें, निरनिराळे नियम, तपाचरणाचे प्रकार, यज्ञ व निरनिराळ्या प्रकारचे विधि या देहाच्या हातून घडणाऱ्या गोष्टी आपल्याच हातून घडतात असें हा जीव समजतो. वाणिज कर्म; ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांचीं कर्में; दीन, अंध व दरिद्री यांना दिलेलें बहुविध दान हीं कर्में वस्तुतः देहाचीं, आत्म्याचीं नव्हेत. पण, आत्मा अज्ञानानें तीं आपलीं असें मानतो. धर्म, अर्थ व काम हे तीन्ही पुरुषार्थ व सत्वादि त्रिगुण हे आपलेच असेंहि हा भ्रमानें म्हणतो. स्वधाकार, वषट्कार, स्वाहाकार, नमस्कार, यजन, याजन, अध्ययन, अध्यापन, दान, प्रतिग्रह, जन्म, मृत्यु, विवाद व हिंसा या व यासारख्या दुसऱ्या ज्या अनेक क्रिया आहेत त्यांचीं रूपें घेऊन प्रकृतीच्या साहाय्यानें आत्मा आपणच

अनेकरूप होतो व मग क्रियारूपांनीं आपणच बहुविध झाल्यानंतर त्या क्रिया आपल्याच होत असें भ्रमानें मानतो. वस्तुतः भगवती प्रकृति ही सृष्टीची उत्पत्ति व लय करिते. प्रलयकालाचे वेळीं सत्वरजादि त्रिगुणांचा आपले ठिकाणीं उपसंहार करून घेऊन आत्मा एकटा एकच रहातो. व सूर्यानें दिवसाच्या आरंभीं आपलें किरणजाल पृथ्वीवर पसरावें त्याप्रमाणें त्या त्या वेळेला आत्माच गुणांचा प्रसार करतो. अनेक वेळां केवळ लीलामात्रेंकरून ज्या या गोष्टी त्याचेकडून घडतात त्या मीं करतों असा अभिमान या प्रकृतिवश जीवाला होतो. वस्तुतः अंतःकरणाला आल्हाद देणारे हे गुणधर्म त्याचेच आहेत. याप्रमाणें, स्वतः त्रिगुणांना आपल्या आधीन ठेवणारा हा आत्मा, उत्पत्ति व प्रलय या धर्मांनीं युक्त असलेल्या त्रिगुणात्मक प्रकृतींत विकार उत्पन्न करतो व कर्ममार्गाला लागून त्यांतच आसक्त झाल्यामुळें अमुक क्रिया अमुकच फल देणारी आहे असा भ्रम या जीवात्म्याला होतो.

हे राजन्, याप्रमाणें प्रकृतीच्या गुणधर्मांनीं हें सर्व जग अंधळें बनलेलें असून सत्व, रज व तम या तीन्ही गुणांनीं त्याला अनेक बाजूंनीं वेढलेलें आहे. जगांमधील सुखःदुखें हीं अशा प्रकारें उत्पन्न होतात. हा प्रकृतिवश जीवात्मा मात्र 'हीं माझ्यापासून होतात, मजकडे धांवत येतात, मला हीं तरून गेलें पाहिजे' असें मीपणानें म्हणत असतो. 'मला देवलोकांत जाऊन हीं पुण्यफलें भोगावयाचीं आहेत, इहलोकीं हीं पुण्यफलें भोगावयाचीं आहेत. मीं पुण्यकर्में तेवढींच करावीं; कारण, एकदां पुण्यकर्म हातून घडल्यावर ज्या ज्या जातींत मीं जन्मास येईन तेथें मला शाश्वत सुखव मिळेल; मीं पाप केलें तर त्यापासून मला अनंत स्वरूपाचें दुःख भोगावें लागेल; इहलोकीं दुःख भोगून नरकांत पडावें लागेल; कांहीं काळानें मी नरकांतून मनुष्यलोकांत येईन, मनुष्यलोकांतून देवलोकीं जाईन व देवलोकांतून फिरून मनुष्यलोकीं येईन; मनुष्यलोकांतून फिरून नरकांत पडेन.' असलीं मनोराज्यें हा ममत्वाला व अहंभावाला वश झालेला जीवात्मा करीत असतो. म्हणून स्वतः निर्गुण असलेला हा आत्मा, आपण उत्पन्न केलेल्या गुणांना आपणच वश झाल्यामुळें, देवलोक, मनुष्यलोक व नरक या रहाटगाडग्यांतून अहंभावनेनें फिरत रहातो. सहस्रावधि, कोट्यवधि जन्मांचे ठिकाणीं नाशिवंत देहांचा आश्रय करून जो जीवात्मा अशा प्रकारें अहंभावनेनें शुभाशुभ कर्में करीत रहातो त्या देहधारी जीवाला देव, मनुष्य व नरक या तीन्ही लोकांतील निरनिराळीं शुभाशुभ फलें भोगावीं

लागतात. सर्व शुभाशुभ कर्में जरी प्रकृति-पुरुष या दोघांमुळें होतात तरी प्रकृति ही सविकार व पुरुष निर्विकार असल्यामुळें वास्तविक कर्तृत्व प्रकृतीकडेच जातें; व त्रैलोक्यांत स्वेच्छेनें संचार करूं शकणारी ही प्रकृति त्या त्या कर्मांचें फल भोगीत असते. पशुयोनि, मनुष्यलोक व देवलोक हीं तीन्ही स्थानें–प्रकृतीचींच–प्रकृतीनें निर्माण केलेलींच होत. प्रकृति ही वस्तुतः कोणत्याहि बाह्य चिन्हांनीं जाणतां येण्यासारखी नाहीं. तिचें अनुमान तिच्या कार्यावरून करावयाचें आहे. तसेंच जीवात्म्याचें अस्तित्वहि पण, अनुमानगोचरच आहे. आत्मा आपलें रूप टाकून प्रकृतिस्वरूपांत शिरतो व क्षरदेहाचीं द्वारें जीं इंद्रियें त्यांच्या ठिकाणीं ठाण मांडून प्रकृतीकडून कर्में करवितो आणि तीं कर्में आपण केलीं असें वृथा अभिमानानें म्हणतो. कान आदिकरून पंचकर्मेंद्रियें व वागादि ज्ञानेंद्रियें या सर्वांचे व्यवहार गुणांच्या साहाय्यानें व गुणांच्या ठिकाणींच चालतात. परंतु, आत्मा हा स्वतः निरिंद्रिय असतांना 'हीं इंद्रियें हीं मींच आहें, व तीं इंद्रियें माझ्या ठिकाणीं आहेत' असें भ्रमानें मानतो व स्वतः विकाररहित असून आपणाला विकारवान् समजतो. हा आत्मा स्वतः निर्गुण असून आपणांला सगुण मानतो; कालातीत असून कालधर्मानें आपण युक्त आहोंत असें समजतो. वस्तुतः आत्मा हा देहादिक अनित्य उपाधि, मृत्यु व चरत्व–हालचाल–यांहून वेगळा आहे. आत्मा क्षेत्र-स्वरूप नाहीं, आत्म्याच्या ठिकाणीं उत्पत्ति नाहीं, तपश्चर्या नाहीं, गति नाहीं, भय नाहीं. परंतु, प्रकृतिवश झाल्यानें 'हीं सर्व माझे ठिकाणीं आहेत' असें हा जीवात्मा भ्रमानें म्हणतो, व स्वतः अक्षररूप असूनहि आपण क्षररूप आहोंत असें अज्ञानानें समजतो. १२. ३. ३०३.

---

## अध्याय ३०४ था.

[ तोच विषय पुढें चालू ].

**वसिष्ठः**—अशा प्रकारें मोहव्याप्त होऊन प्रकृतिवश होणारा हा जीवात्मा सहस्रावधि कोट्यवधि नाशिवंत जन्मांच्या फेऱ्यांतून जातो. तिर्यक्‌योनि, मनुष्ययोनि व देवलोक यांच्यांतील सहस्रावधि नश्वर स्थानांतून हा आत्मा स्वतःच्या तेजोरूपानें फिरतो. या भूतसृष्टीमध्यें चंद्र ज्याप्रमाणें आपल्या क्षयवृद्धिशील अशा पंधरा कलांतून सहस्रावधि वेळां फिरतो व पुन त्यांत लीन होतो, तशीच

या अज्ञानांत गुरफटलेल्या जीवाची गोष्ट आहे. दशेंद्रियें व अंतःकरणचतुष्टय या चौदांच्या पुढची जी आभासात्मक मूलप्रकृति ती जीवात्म्याची पंधरावी कला होय. ही जगत्कारणभूत पंधरावी कला मूळ आत्मस्वरूपाला जागृत करिते व हें जागृत झालेलें मूळ आत्मस्वरूप प्रकृतीच्या साहाय्यानें अज्ञानवश होऊन अनेक वेळां जन्म घेतें. मूळ आत्मस्वरूपाची पंधरांपलीकडील जी सोळावी कला तिला चित्कला म्हणतात. हिलाच सोम असें दुसरें नांव आहे. या चित्कलेच्या सामर्थ्यावरच सर्व भूतें जगतात व पुनः पुनः जन्म घेतात. ही जी सोळावी चित्कला सांगितली ती इंद्रियांच्या आधीन न रहातां त्यांनाच आपल्या स्वाधीन ठेऊन त्यांच्याकरवीं निरनिराळे व्यापार करविते. हें सर्व जगत् या चित्कलेपासूनच पण ती चित्कला लेशमात्रहि कमी न करितां, चित्कलेचें स्वरूप जसेंच्या तसेंच पूर्ण कायम ठेऊन, उत्पन्न होतें. या सगळ्या विकारजाताचें उत्पत्तिस्थान ही चित्कला असून याचा नाश होणें—सर्व ब्रह्ममय आहे असें ज्ञान होऊन तद्रूप होणें—हाच मोक्ष होय. धाम किंवा मोक्ष या शब्दांनीं वर्णन केलेलें षोडशकलात्मक रूप हेंच ब्रह्माचें आनंदरूप होय व सचेतन अचेतन अशा भूतांनीं विनटलेलें हें ब्रह्मांड हें त्याचेंच रूप आहे. पूर्वी मूलप्रकृति म्हणून जी पंधरावी कला सांगितली तीहि या आनंदमय ब्रह्मांतून निर्माण झाली असल्यामुळें त्याच्याहून भिन्नरूप नाहीं. या देहाला आपला असें मानून त्याच्यावर ममता करणारा हा जीवात्मा अनेक जन्ममरणांच्या फेऱ्यांत सांपडतो. चोवीस तत्वांच्या पलीकडचा पंचविसावा महान् आत्मा जो मागें सांगितला, त्या विमल व विशुद्ध आत्म्याचें यथार्थ ज्ञान जेथपर्यंत या जीवात्म्याला झालें नाहीं तेथपर्यंत शुद्ध किंवा अशुद्ध कर्मांच्या संगानें हा स्वतः शुद्ध किंवा अशुद्ध होतो. वस्तुतः शुद्धस्वरूप असणारा जीवात्मा शुद्धाशुद्ध कर्मांनीं दिलेलें रूप घेतो. अज्ञानाच्या संगानें ज्ञानीहि अज्ञानी होतो. त्याचप्रमाणें, हे राजन्, विपरीत ज्ञानाचा जरी मूळ आत्मस्वरूपांत संभव नाहीं, तरी त्रिगुणात्मिका प्रकृतीच्या आधीन होऊन हा जीवात्माहि सात्विक, राजस व तामस रूपांनीं युक्त होतो, ते ते भाव घेतो. १२. ३. ३०४.

---

## अध्याय ३०५ वा.

[ १. प्रकृति-पुरुष तुल्यबल असतांना मायानिरास कसा ही जनकाची शंका : त्यावर वसिष्ठांचें उत्तर. ]

**१ जनकः**—हे भगवन्, अक्षर आणि क्षर किंवा पुरुष आणि प्रकृति यांचा संबंध जो आपण आतां सांगितला तो स्त्रीपुरुषांच्या व्यवहारांत दिसणाऱ्या लौकिक संबंधासारखा आहे. व्यवहारांत आपण असें पाहतों कीं, पुरुषसंयोगावांचून स्त्रीच्या ठिकाणीं गर्भ राहूं शकत नाहीं; व पुरुषालाहि स्त्रीसंयोगावांचून आपल्या वीर्यापासून मनुष्यरूप बनवितां येत नाहीं. सर्व जातींच्या ठिकाणीं आपल्या असें प्रत्ययास येतें कीं, एकमेकांच्या संयोगानें व एकमेकांच्या गुणांच्या आश्रयानेंच स्त्रीपुरुषांना दुसरें साकार रूप निर्माण करितां येतें.

रतिक्रियेसाठीं एकत्र येणाऱ्या स्त्रीपुरुषांचा समागम घडतो व मग त्यांच्या गुणसंकराच्या योगानें ऋतुकालीं निरनिराळ्या आकृति उत्पन्न होतात. ही गोष्ट प्राण्यांच्या जेवढ्या योनि आहेत त्या सर्व ठिकाणीं लागू आहे. या गोष्टीला प्रमाण हें कीं ' मनुष्याच्या शरीरांतील अस्थि, स्नायु व मज्जा हीं पित्यापासून तर त्वचा, मांस आणि रक्त हीं आईपासून निर्माण होतात ' असें पित्यापासून व मातेपासून प्राण्याला मिळणाऱ्या गुणधर्मांचें वर्णन वेदामध्यें व शास्त्रग्रंथांत केलेलें आहे. वेदांमध्यें व शास्त्रांमध्यें जें प्रमाण म्हणून सांगितलें तें सत्य मानलेंच पाहिजे. कारण, वेद व शास्त्रें यांचें प्रामाण्य हें सनातन स्वरूपाचें आहे. हें जसें व्यावहारिक स्त्रीपुरुषसंबंधांत होतें त्याप्रमाणें प्रकृतिपुरुषांतहि होत असावयास पाहिजे. एकमेकांच्या गुणांचा संरोध करून व तसाच परस्परांच्या गुणांचा आश्रयहि करून प्रकृति व पुरुप हीं सृष्टि उत्पन्न करतात. म्हणून, यांचा हा संबंध नित्य संबंध होय. प्रकृतिपुरुषांचा हा संबंध नित्य असल्यामुळें प्रकृति पुरुषापासून वेगळी निघणें शक्य नाहीं आणि म्हणूनच मोक्षधर्मेहि शक्य नाहीं. महाराज, आपण सर्वज्ञ आहां; तेव्हां, याला दुसरें कांहीं प्रत्यंतर असेल तर तें आपण मला सांगा. आम्हांला मोक्षाची इच्छा आहे. निरामय, देहरहित, अजर, नित्य, अतींद्रिय व ज्याला कोणीं शास्ता नाहीं असें जें ब्रह्मरूप त्याची प्राप्ति व्हावी असें आम्हांलाहि वाटतें.

**वसिष्ठः**—जनका, तूं जें वेदशास्त्राचें प्रमाण सांगितलेंस तें खरें आहे; व तें जसें आहे तसेंच तूं तें जाणलें आहेस यांतहि शंका नाहीं. पण वेद व शास्त्रें या

दोन्ही ठिकाणचा ग्रंथ-त्यांतील नुसतीं वाक्यें-मात्र तूं जाणलींस, त्या ग्रंथाचा अर्थ तुला बरोबर ग्रहण करतां आला नाहीं. वेद व शास्त्रें यांतील नुसतीं वाक्यें तेवढींच ग्रहण करण्यांत—पाठ करण्यांत-जो तत्पर आहे व ज्याला त्या वाक्यांचें मर्म-अर्थ-कळलें नाहीं त्याचें तें ग्रंथधारण वृथा होय. अर्थावीण पाठांतर वांझें होय. ग्रंथाचा अर्थ ज्याला कळत नाहीं तो नुसता ग्रंथाचा भार मात्र वाहतो. ग्रंथाचा अर्थ ज्याला कळतो त्याचेंच वेदाध्ययन सार्थ व सफल होतें. ग्रंथाचा अर्थ कोणीं विचारला तर त्याला तो अशा रीतीनें सांगितला पाहिजे कीं तो ऐकणाराला ग्रंथांतील वाक्यांचा शब्दार्थ व त्यांतील तत्व या दोहोंचेंहि यथार्थ ग्रहण करितां येईल. ज्या स्थूल बुद्धीच्या पुरुषाला चार चौघांत ग्रंथाचा वाक्यार्थ नीट सांगतां येणार नाहीं अशा जड माणसाला त्या ग्रंथाचें तत्व निश्चित रूपानें कसें सांगतां येईल ? एकाद्या माणसाला जरी ज्ञान झालें असलें तरी तें ज्ञान जर त्याच्या ठिकाणीं स्थिर न रहातां फुटक्या भांड्यांतल्या पाण्याप्रमाणें गळून जाऊं लागलें तर त्याला तत्वनिश्चय यथार्थ रीतीनें करतां येत नाहीं व मग तो उपहासास पात्र होतो. म्हणून या संबंधाचा निश्चय मोठमोठ्या सांख्यमार्गी व योगमार्गी पुरुषांनीं सांगितला आहे तो मीं तुला सांगतों ऐक. या बाबतींत योग्यांचें जें मत तेंच सांख्यांचेंहि मत होय. सांख्य व योग हीं एकच हें ज्याच्या बुद्धीला पटलें तो ज्ञाता पुरुष होय.

हे जनका, तूं आतांच त्वचा, मांस, रक्त, मेद, पित्त, मज्जा व स्नायु यांच्या व इंद्रियांच्या उत्पत्तीचा प्रकार मला सांगितलास. पण त्यांतला खरा अर्थ असा आहे: एका द्रव्यापासून दुसरें द्रव्य निर्माण होतें, इंद्रियांपासून इंद्रियें निर्माण होतात, देहापासून देह उत्पन्न होतो व बीजापासून बीज निर्माण होतें असा उत्पत्तीच्या संबंधाचा नियम आहे. तेव्हां, जो महत्संज्ञक पुरुष निरिंद्रिय, बीज-शक्तिशून्य, द्रव्यत्वरहित, देहरहित व निर्गुण आहे अशा पुरुषापासून प्रकृतिस्थ गुण कसे निर्माण होऊं शकतील ? गुण हे गुणांतूनच निर्माण होतात व त्यांच्या ठिकाणींच फिरून लय पावतात. अशा तऱ्हेनें गुण प्रकृतिसंभव आहेत व त्यांचा लयहि तिच्याच ठिकाणीं होतो. त्वचा, मांस, रुधिर, मेद, पित्त, मज्जा, अस्थि व स्नायु हीं आठी पुरुषवीर्यापासून निर्माण झालीं असलीं तरी वस्तुतः तीं प्रकृतीचींच रूपें आहेत. अविद्येमुळें अंतःकरणाचे ठिकाणीं प्रतिबिंबित झालेला जीवरूप परमात्मा-पुरुष, त्याच्याहून भिन्न अशीं आकाशादि तत्वें व प्रमाता, प्रमेय आणि प्रमाण हीं आत्मरूप ओळखण्याची साधन-त्रिपुटी, हीं सर्व प्रकृ-

तीचींच रूपें होत. जीव व जगत् या दोहोंहूनहि भिन्न—यांच्यापलीकडे असणारा—तो परमात्मा होय. त्याला पुमान् किंवा अपुमान् या संज्ञा कोणीं लावीत नाहीं. अलिंग अशा पुरुषाचे सान्निध्यानें प्रकृति ही आपलीं महदादि कार्यें निर्माण करिते. प्रकृति हीं जीं कार्यें निर्माण करिते तींच त्या प्रकृतीचें स्वरूप ओळखण्याचीं साधनें होत. निरनिराळ्या ऋतूंत निरनिराळ्या वृक्षांना फुलांचा व फळांचा बहर येतो, तो त्या त्या ऋतूंच्या सांनिध्यानें येतो; आणि, आपण ऋतूंची कल्पना जी करितों म्हणजे अमुक कालांत अमुक ऋतु असें जें अनुमान करतों तें त्या त्या ऋतूंत उत्पन्न होणाऱ्या फलपुष्पादिकांच्यावरूनच होय. तसेंच हें आहे. अलिंग पुरुषाच्या सांनिध्यानें प्रकृति जीं कार्यें उत्पन्न करिते त्यांच्यावरून तिचें अस्तित्व अनुमानावयाचें आहे. हीच अनुमानपद्धति आणखी थोडी पुढें नेऊन त्यावरून चोवीस तत्वांच्या पलीकडचा पंचविसावा, सर्व दृश्यजाताला व्यापून असणारा अलिंग परमात्मा त्याचें ज्ञान करून घ्यावयाचें असतें. आत्मा हा वस्तुतः अनादि, अनंत, निर्मर्याद, सर्वदर्शी व निरामय असा आहे. त्याच्या ठिकाणीं गुणांचा अभिमान उत्पन्न झाला म्हणजे तेवढ्यापुरतीच त्याला गुण ही संज्ञा लावण्यांत येते. ज्याच्यामध्यें कांहीं गुण आहेत अशापासूनच गुणांची उत्पत्ति होऊं शकते. निर्गुणापासून गुणोत्पत्ति शक्य नाहीं. म्हणून, गुणांचें तत्व जाणणारे जे ज्ञानी पुरुष आहेत त्यांना अनुभवहि असाच येतो. ज्यावेळेला गुणांचा अभिमान धरणारा हा जीवात्मा श्रवणमनननिदिध्यासनांच्या साहाय्यानें त्या गुणांना-कामादिकांना जिंकतो, त्यावेळेस त्या गुणांच्या नाशामुळें त्याला स्वतःचेंच परमात्मरूप स्वच्छ दिसूं लागतें. जडस्वरूप पदार्थांचा त्याग केल्यानें—म्हणजे हे पदार्थ मिथ्या आहेत असें उमजल्यानें—ज्याचें ज्ञान होतें अशा त्या केवलज्ञानरूप तत्वाला सर्व सांख्य व योगशास्त्रज्ञ बुद्धीच्या पलीकडचें परम तत्व असें म्हणतात. हें परमतत्व अज्ञात, अव्यक्त, सर्वांतर्यामी व गुणांच्या पलीकडचें असून स्वतः गुणरहित आहे. हें नित्यरूप असून सर्व कार्यांची उत्पत्ति याचेपासूनच होते. सांख्यज्ञान व योगज्ञान यांत कुशल असलेले मोठमोठे शहाणे पुरुष हें परमतत्व म्हणजेच चोवीसांच्या पलीकडचें पंचविसावें तत्व होय असें समजतात. बाल्यादि अवस्थांना व जन्ममरणांना भिणारे पुरुष ज्यावेळेस जागृत होऊन त्या अव्यक्त व ज्ञानस्वरूप तत्वाची ओळख करून घेतात त्यावेळेस त्यांना परब्रह्मपदाची प्राप्ति होते. हे अरिंदमा, आतांपर्यंत हा जो मार्ग मीं तुला सांगितला तोच खरा व शास्त्रशुद्ध

मार्ग होय. या क्षराक्षरविचाराच्या शास्त्रासंबंधानें जीव व आत्मा यांना पृथक् मानणारे वादी अनेक प्रकारचे वाद परस्परांत घालीत बसतात. हा सर्व प्रकार अशास्त्रीय म्हणूनच खऱ्या तत्वज्ञाला असंमत असा होय. या सर्वांचें सार म्हणूनच इतकेंच जें एकजिनसी परमतत्व म्हणून म्हणतात तें अक्षर व बहुविध रूपांनीं विनटलेलें हें नानारूप जगत् हें क्षर होय. आत्म्याच्या चैतन्याचा अध्यारोप ज्यांच्या ठिकाणीं केला जातो असल्या पंचवीस तत्वांचें योग्य ज्ञान करून घेण्याच्या इच्छेनें मनुष्य प्रवृत्त झाला म्हणजे जीव व जगत् यांचा अभेद सांगणारें शास्त्र हेंच खरें शास्त्र व भेद कथन करणारें शास्त्र हें अशास्त्र होय अशी त्याची खात्री होते–एकजिनसी परब्रह्मरूप हेंच परम सत्य, व नानात्व हें मिथ्या अशी त्याची समजूत पटते. तत्वरूप जडसृष्टि व त्याच्या पलीकडचें निस्तत्व म्हणजे अजड सत्यरूप यांचें ज्ञान करून घेण्याचीं गमकें याप्रमाणें वेगवेगळीं आहेत. पंचवीस तत्वांची जी सृष्टि तिला बुद्धिमान् पुरुष तत्व असें म्हणतात. तत्व म्हणजे जन्य–उत्पन्न होणारी–जिला उत्पत्ति आहे अशी–सृष्टि होय. पंचवीस तत्वांच्या पलीकडला जो सव्विसावा परमात्मा तो निस्तत्व म्हणजे अजड होय. पंचज्ञानेंद्रियें, पंचकर्मेंद्रियें, पंचमहाभूतें, शब्दादिकरून त्या पंचमहाभूतांचे पंच विषय व मन, बुद्धि, अहंकार, प्रकृति व चिदाभास यांचा समुदाय, हीं पांच पंचकें किंवा पांच वर्ग होत. यांच्या विषयांचें ज्ञान हेंच या पंचविसांच्या पलीकडचें सव्विसावें तत्व असून तेंच काय तें खरें सनातन सत्य होय. १२. ३. ३०५.

---

## अध्याय ३०६ वा.

[ १ वसिष्ठ–करालजनकसंवादः २ सांख्य व योग यांचा पुनः पृथक् विचार ]

**१. जनक :** हे ऋषिसत्तमा, आपण जी नानात्वाची व एकत्वाची फोड करून सांगितली ती संदिग्ध आहे असें मला वाटतें. एकत्व हें अक्षर व नानात्व हें क्षर असें आपण सांगितलें. त्यांत सर्व एकच एक अक्षररूप आहे हा पक्ष स्वीकारला तर बंधमोक्षांची व्यवस्था जी सांगितली तिची उपपत्ति नीट लागत नाहीं. बरें, नानात्वाचा पक्ष स्वीकारला तर आत्म्याचाच नाश होण्याचा प्रसंग ओढवणार. तेव्हां, आपण हें जें तत्व सांगितलें हें मला निःसंदिग्धपणें समजलें नाहीं. तसेंच अज्ञानी लोकांची आत्म्याबद्दलची समजूत व ज्ञानी

लोकांचें आत्म्यासंबंधाचें ज्ञान यांचाहि माझ्या स्थूल बुद्धीला नीटसा उलगडा झालेला नाहीं. अक्षर व क्षर यांचें कारण म्हणून जें आपण सांगितलें त्याचाहि माझ्या चंचल बुद्धीला विसर पडला. म्हणून, नानात्व म्हणजे काय, एकत्व म्हणजे काय, ज्ञानस्वरूप परमात्मतत्त्व कोणतें, प्रधानादि जड तत्वें कोणतीं, जडाजडस्वरूपाचा जीव म्हणजे काय हें सर्व मला सांगा. तसेंच, विद्या व अविद्या, क्षर व अक्षर आणि सांख्य व योग यांचें साकल्यानें व सर्व बाजूंनीं विवरण करून मला सांगा. यांच्यांत भेद कोठें व अभेद कोठें त्याबद्दलहि मला नीट समजूत पाहिजे. तर हें सर्व आपण मला सांगोपांग सांगा.

**वसिष्ठः**—हे राजन्, तूं विचारलेल्या प्रश्नांचीं उत्तरें मीं तुला सांगतों ऐक. प्रथम मी तुला योगाचें स्वरूप पृथक्पणानें सांगतों. योगशास्त्रवेत्त्यांनीं आचरावयाचें मुख्य कर्म म्हणजे ध्यान होय. ज्ञानी पुरुषांच्या मतें हें ध्यान चित्ताची एकाग्रता व प्राणायाम असें दोन प्रकारचें आहे. यांतहि प्राणायाम हा सगुण ध्यानप्रकार व चित्ताची एकाग्रता करणें हा निर्गुण ध्यानप्रकार होय. मूत्रपुरीषोत्सर्ग व भोजन या तीन कृत्यांची वेळ सोडून बाकीच्या सर्व वेळांत योगसाधन करावें. पवित्र स्थितींत राहून मनोजय करावा व तद्द्वारा आपापल्या विषयांकडे धांवणारीं इंद्रियें खेंचून मागें फिरवावीं व त्या इंद्रियांच्या बावीस प्रकारच्या प्रेरणा शास्त्रानें ज्या सांगितल्या आहेत त्यांच्या द्वारें बुद्धिमान् पुरुषानें जीवाला चोवीस तत्वांच्या पलीकडे असणाऱ्या परमतत्वाकडे नेण्याचा प्रयत्न करावा. सर्व शरीरांतील वायूचा निरोध करून त्याला शरीरांतील अठरा मर्मस्थानांच्या ठिकाणीं यंत्रासारखा खिळून ठेवणें या अठरा प्रत्याहारप्रेरणा होत. ध्यान, धारणा व समाधि या त्याच्या पुढच्या तीन व शुद्धसत्वमय भाव ही त्यांच्याहि पुढची प्रेरणा होय. मिळून एकंदर बावीस चोदना होतात. शुद्धसत्वमय भावाच्या स्थितींत जीव आला म्हणजे तो अजर अशा जीवन्मुक्तावस्थेंत आला असें समजावें. मोठमोठ्या शास्त्रवेत्त्यांनीं 'तत्' या नांवानें ज्या परब्रह्माचा उल्लेख केला आहे त्या ब्रह्मरूपांत जीवन्मुक्तानें आपला लय करावा. वर ज्या बावीस प्रकारच्या प्रेरणा सांगितल्या त्यांच्या द्वारें आत्मज्ञान करून घ्यावें. हें योगाचरणाचें व्रत दुबळ्या मनाच्या माणसाच्या हातून होणें अशक्य आहे. ज्याचें चित्त खंबीर असेल त्यालाच योग साधेल असें शहाण्या शहाण्या माणसांच्या तोंडून आम्हीं ऐकत आलों आहों. सर्वसंग टाकून, हलका आहार घेऊन व इंद्रियांचा निरोध करून पूर्वरात्रीं किंवा अपररात्रीं मनाचा आत्म्याच्या ठिकाणीं लय साधावा. मनाचा

ल्गाम खेंचून इंद्रियें स्थिर करावीं. बुद्धीच्या योगानें मनाला स्थैर्य आणावें. अशा प्रकारें बुद्धीच्या योगानें जो पुरुष पाषाणासारखा, एकाद्या स्तंभासारखा किंवा पर्वतासारखा निश्चल व अकंप होतो त्यालाच शास्त्रवेत्ते योगयुक्त असें म्हणतात. ज्या स्थितींत कांहींहि ऐकूं येत नाहीं, कसलाहि वास समजत नाहीं, चित्त कोठेंहि रमत नाहीं, डोळ्यांना कांहीं दिसत नाहीं, कसलाहि स्पर्श समजत नाहीं, मनांत कसलेहि संकल्पविकल्प येत नाहींत, कोणत्याहि वस्तूबद्दलचा अभिमान शिल्लक रहात नाहीं व एकाद्या लांकडाप्रमाणें निःसंज्ञ स्थिति होऊन जाते त्या स्थितीला मनुष्य पोंचला म्हणजे तो पूर्ण योगयुक्त झाला असें मोठेमोठे लोक समजतात. निवांत स्थळीं ठेवलेला दिवा जसा शांत रीतीनें प्रकाशत रहातो त्याप्रमाणें बुध्यादिकांनीं विहीन असलेला हा निश्चल योगी उर्ध्वगति, अधोगति किंवा तिर्यग्गति, यांपैकीं कोणत्याच गतीला न जातां, स्थिर अशा आत्मतेजानें प्रकाशत असतो. हृदयस्थ अंतर्यामी हाच परमात्मा होय असें जेव्हां सांगितलें जातें—अनुभवाच्या जोरावर प्रत्ययाला येतें—तेव्हांच आत्मरूपाचा साक्षात्कार होतो. हे राजन्, माझ्यासारख्यांनीं आत्मतत्व अशा प्रकारेंच जाणावयाचें असतें. आत्म्याच्या प्रतीयमान होणाऱ्या या परमात्म्याचें स्वरूप निर्धूम अग्नीच्या, आपल्या किरणांनीं आकाशांत तळपणाऱ्या सूर्याच्या किंवा विजेच्या प्रकाशासारखें देदीप्यमान असतें. या अज व अमृतमय आत्मस्वरूपाचा प्रत्यय ब्रह्मज्ञान करून देणाऱ्या शास्त्रावर निष्ठा ठेवणाऱ्या, धीर, मनस्वी व महात्म्या ब्राह्मणांनाच येतो. या आत्मस्वरूपालाच ते अणूपेक्षांहि अणु, व स्थूलापेक्षांहि स्थूल असें म्हणतात. हें आत्मतत्व सर्व भूतांचे ठिकाणीं निश्चल स्वरूपांत वास करितें व कोणालाहि दिसत नाहीं. बुद्धिबलाच्या जोरावर व मनोदीपाच्या प्रकाशाच्या साहाय्यानें मनुष्याला याचें दर्शन घडूं शकतें. या आत्मतत्वाच्या ठिकाणीं तमाचा लेशहि सांपडत नाहीं व तें तमाच्या पलीकडचें आहे. सर्वज्ञ व वेदपारंगत ब्राह्मण यालाच अज्ञानाचा नाश करणारा, शुद्धस्वरूप, तमोरहित, इंद्रियातीत आणि म्हणूनच निर्गुण असा परमात्मा म्हणतात. योगशास्त्रज्ञांचा योग तो हाच. याच्यापेक्षां दुसरें योगाचें लक्षण कोणतें असणार? या शास्त्राचें यथार्थ ज्ञान ज्यांना झालें त्यांना अजर अशा परमात्म्याची प्राप्ति होते. हे राजा, आतांपर्यंत मीं तुला यथातथ्य रीतीनें सगळें योगदर्शन सांगितलें. आतां, तुला अज्ञानजन्य भ्रांतीचा निरास करून परमात्मस्वरूपाचें यथार्थ ज्ञान करून देणारें सांख्यदर्शन सांगतों तें ऐक.

( २. ) प्रकृतिकारणवादी सांख्य मूल अविकृत स्वरूपाच्या प्रकृतीला अव्यक्त म्हणतात. हे राजा, मूलप्रकृति ही पहिली, हिच्यापासून उत्पन्न झालेलें महत्तत्व हें दुसरें तत्व, व या महत्तत्वापासून उत्पन्न झालेला अहंकार हें तिसरें तत्व होय असें आमच्या ऐकण्यांत आहे. सांख्यज्ञानी पुरुष अहंकारापासून पंचभूतें निर्माण झालीं असें म्हणतात. मूलप्रकृतीच्या या ज्या सात प्रकृतिविकृति त्यांची गणना प्रकृतिमध्येंच होते म्हणून प्रकृति आठ प्रकारची मानतात. पंचतन्मात्रांतून उत्पन्न होणारीं पंचमहाभूतें व त्यांतून उत्पन्न होणारीं पांच ज्ञानेंद्रियें, पांच कर्मेंद्रियें व मन असे हे सोळा विकार होत. सांख्यमार्गांत नित्य मग्न असणारे, सांख्यशास्त्रांत सांगितलेल्या प्रक्रियांचें ज्ञान यथावत् असणारे बुद्धिमान् पुरुष सांख्यशास्त्रांतील तत्वांची संख्या अष्टधा प्रकृति व षोडशक विकार अशी चोवीस मानतात. जें तत्व ज्यांतून निर्माण झालें तेथेंच त्याचा लय होतो. याप्रमाणें पुढचीं पुढचीं तत्वें मागच्या मागच्या तत्वांत प्रतिलोम प्रकारानें विलीन होतात व अंतरात्मा हा फिरून त्यांची उत्पत्ति करतो. अनुलोम प्रकारानें गुणांतून गुण निर्माण होतात व प्रतिलोम प्रकारानें गुणांतच गुणांचा लय होतो. अशा रीतीनें, सागराच्या पृष्ठभागावर पाण्यांतून उसळणाऱ्या लाटा पुनः पाण्यांतच विलीन व्हाव्या व फिरून त्यांतूनच उत्पन्न व्हाव्या त्याप्रमाणें हा गुणांचा प्रकार आहे. हे राजन्, प्रकृतीचा प्रलय व उत्पत्ति हीं या स्वरूपाचीं आहेत. प्रतिलोम क्रमानें तत्वांचा वरच्या वरच्या तत्वांत लय होऊन अखेर प्रकृतीचाहि पुरुषामध्यें लय झाला म्हणजे पुरुष हा एकटाच रहातो, हेंच त्याचें एकत्व होय; व उत्पत्तिकालीं फिरून अनेकविध विकारजात त्याच्यामधून निर्माण होतें हें त्याचें नानात्व होय. हे राजेंद्रा, अशाच प्रकारें अव्यक्त माया अधिष्ठात्या पुरुषाच्या ठिकाणीं नानात्व उत्पन्न करिते. पृथिव्यादि व्यक्त पदार्थांच्या ठिकाणीं सुद्धां प्रलयकालीं एकत्व व सृष्टिकालीं नानात्व अशीच व्यवस्था असते, असें ज्ञात्या माणसांनीं समजून घ्यावें. पदार्थमात्रांचें स्वरूप यथार्थ रीतीनें जाणणाऱ्या पुरुषाला एकत्व व नानात्व हीं प्रकृतीच्या ठिकाणीं असतात असें समजून येईल. परंतु, असें जरी असलें तरी प्रलयकालीं एकटा एकच असणारा चिदात्मा हाच सृष्टिकालीं प्रकृतींत नानात्व उत्पन्न करीत असल्यामुळें मुख्य अधिष्ठाता तोच होय. प्रकृति गौण हा सिद्धांत निराबाधच राहतो. सृष्टि उत्पन्न करणें हाच जिचा सहजधर्म अशा प्रकृतींत आत्मा हा नानात्व उत्पन्न करतो. या चोवीस तत्वांनीं बनलेल्या प्रकृतीला क्षेत्र असें म्हणतात. चोवीस तत्वांच्या पलीकडचा जो पंचविसावा महान् आत्मा तो

या क्षेत्राचा अधिष्ठाता होय. हे राजेंद्रा, मोठेमोठे मुनि लोक याला अधिष्ठाता असें म्हणतात. क्षेत्राच्या ठिकाणीं याचें अधिष्ठान असतें म्हणून हा अधिष्ठाता होय असें आम्हीं ऐकिलें आहे. चोवीस तत्वांच्या अव्यक्त क्षेत्राचें स्वरूप हा जाणतो म्हणून याला क्षेत्रज्ञ असेंहि म्हणतात. अव्यक्त प्रकृतीच्या ठिकाणीं हा प्रवेश करतो म्हणून याला पुरुष अशी संज्ञा आहे. क्षेत्र हें क्षेत्रज्ञाहून भिन्न, तसाच क्षेत्रज्ञ हाहि क्षेत्राहून भिन्न होय. क्षेत्राला शास्त्रांत अव्यक्त असें नांव आहे. चोवीस तत्वांच्या पलीकडला पंचविसावा हा आत्मा–हा ज्ञाता–क्षेत्रज्ञ–होय असें म्हणतात. जशीं क्षेत्र व क्षेत्रज्ञ हीं दोन्ही एकमेकांहून भिन्न आहेत तशींच ज्ञान व ज्ञेय हींहि एकमेकांपासून भिन्न आहेत. ज्ञान हें अव्यक्त व प्रकृतीच्या पलीकडला पुरुष हें ज्ञेय होय. या अव्यक्ताला क्षेत्र, सत्व, ईश्वर अशीं निरनिराळीं नांवें आहेत. या ईश्वरादि नांवांनीं संबोधल्या जाणाऱ्या अव्यक्ताहून भिन्न असणारें असें नित्य व अपरोक्ष तत्व तें पंचविसावें होय. सांख्यशास्त्र म्हणून जें म्हणतात तें हेंच. स्थूलसूक्ष्मादि क्रमानें सर्व प्रपंचाचा परमात्म्याच्या ठिकाणीं लय करणें हीच सांख्यांची परिसंख्या व या परिसंख्येच्या द्वारानें त्यांना साक्षात्कार होतो. प्रकृति किंवा माया हेंच जगाचें कारण होय असें सांख्यशास्त्रवेत्ते म्हणतात. सांख्यमार्गी लोक तत्वांची संख्या प्रकृतीसह चोवीस आहे असें मानतात व नित्य अपरोक्षरूप चिदात्मा यांच्या पलीकडचा पंचविसावा होय असें त्यांचें मत आहे. या शास्त्रांत तत्वांची संख्या याप्रमाणें बांधलेली आहे म्हणून याला 'सांख्य' असें नांव आहे. प्रकृतीहून भिन्न असणारा हा पंचविसावा आत्मा हा ज्ञाता होय. आपण प्रकृतीहून भिन्न आहों असा आत्मप्रत्यय जेव्हां याला येतो तेव्हां हा केवलरूपच बनतो.

याप्रमाणें आतांपर्यंत मीं तुला हें सर्व सत्य सांख्यशास्त्र यथातथ्य रीतीनें सांगितलें. या शास्त्राचें असें योग्य ज्ञान ज्यांना होतें ते ब्रह्मस्वरूपाशीं एकरूप होतात. नाना गुणरूपानें नटणाऱ्या प्रकृतीचा पसारा ज्याप्रमाणें लौकिक व्यवहारांत प्रत्यक्ष प्रतीत होतो त्याप्रमाणें निर्गुण परब्रह्म प्रतीत होणें, ब्रह्मरूपाचा प्रत्यय येणें, यालाच सम्यक् निदर्शन म्हणतात. अशा प्रकारें ब्रह्मरूपाशीं तादात्म्य पावून जे तन्मय स्थितीला पोंचले त्यांना पुनरावृत्ति–पुनर्जन्म–नाहीं. पण, ब्रह्मस्वरूप ओळखूनहि ज्यांना तादात्म्य पावतां येत नाहीं अशा सदेह पुरुषांना, सत्यकामत्व, सत्यसंकल्पत्व इत्यादि ऐश्वर्य व समाधिकालीं निर्मिश्र सुख प्राप्त होतें. आतां ज्यांना हें परमेश्वराच्या एकत्वाचें ज्ञान होत नाहीं व जे नानात्वांतच

गुरफटून रहातात, त्यांना खरें ज्ञान झालें असें म्हणतांच येत नाहीं. म्हणून ते फिरून फिरून अव्यक्त प्रकृतीच्या फेऱ्यांत सांपडतात व जन्ममरणांची यातायात त्यांच्या मागें लागते. आतांपर्यंत सांगितलेल्या सर्व गोष्टींचें मर्म यथार्थ रीतीनें ज्यांच्या ध्यानीं आलें ते सर्वज्ञच होत. ते शरीर धारण करीत नाहींत व शरीरधर्मांच्या आधीन होऊनहि रहात नाहींत. हें सर्व विकारजात हें अव्यक्त–क्षर–क्षेत्र होय व या चतुर्विंशतितत्वात्मक क्षेत्राच्या पलीकडचा पंचविसावा तो परमात्मा ज्यांनीं जाणला त्यांना या जगांत कोणत्याहि प्रकारचें भय नाहीं. १२. ३. ३०६.

---

## अध्याय ३०७ वा.

[ १ विद्या व अविद्या यांचें रूप. ]

**वसिष्ठः**—हे राजा, आतांपर्यंत मीं तुला सांख्यदर्शनाचें स्वरूप यथावत् रीतीनें सांगितलें. आतां, विद्या व अविद्या म्हणजे काय त्यांचें स्वरूप क्रमशः सांगतों तें ऐक. उत्पत्ति व प्रलय या सहज धर्मांनीं युक्त असणारी अव्यक्त प्रकृति हीच अविद्या होय. चोवीस तत्त्वांच्या पलीकडचा पंचविसावा पुरुष हीच सर्गप्रलयरहित अशा स्वरूपाची विद्या होय. स्थूलमानानें विद्या व अविद्या यांचा हा भेद झाला. आतां, सांख्यशास्त्रवेत्त्या ऋषींनीं याचे सूक्ष्म भेद सांगितले आहेत ते सांगतों ऐक. कर्मेंद्रियांचे सर्व व्यापार टाकून त्यांचा बुद्धींद्रियांत लय करणें व आपण तद्रूप आहों असें मानणें ही बुद्धींद्रियविद्या होय. देहारंभक अशीं जीं स्थूल महाभूतें या स्थूल महाभूतांत बुद्धींद्रियांचा लय करून आपण तद्रूप आहोंत असें समजणें याला विशेषविद्या–पंचभूतविद्या असें नांव असल्याचें आम्हीं ऐकिलें आहे. या सर्व विशेषांचा लय मनाच्या ठिकाणीं करून आपण केवळ मनोरूप आहोंत अशी भावना धरणें ही मनोविद्या होय. मनाचा लय पंचतन्मात्रांच्या ठिकाणीं करून पंचतन्मात्ररूप होणें ही भूतसूक्ष्मविद्या होय. पंचतन्मात्रांचा लय अहंकाराच्या ठिकाणीं करणें व आपणांला तद्रूप समजणें ही अहंकारविद्या; अहंकाराचा लय बुद्धिनामक महत्तत्त्वाच्या ठिकाणीं करणें ही महद्विद्या; महत्तत्त्वाचा लय सर्व तत्त्वांत श्रेष्ठ असणाऱ्या अव्यक्त प्रकृतीच्या ठिकाणीं करणें ही प्रकृतिविद्या; चोवीस तत्त्वांच्या पलीकडे असणाऱ्या पंचविसाव्या पुरुषाचे ठिकाणीं अव्यक्त प्रकृतीचा लय करणें व आपण तद्रूप आहों असें उमजणें ही

पुरुषविद्या होय. नाना विकारांनीं नटलेली सर्व अव्यक्तरूप प्रकृति हाच सर्व ज्ञानाचा विषय आहे. ज्ञान हें अव्यक्तरूप असून पंचविसावा (चोवीस तत्त्वांच्या पलीकडचा) पुरुष हें ज्ञेय होय. अव्यक्तरूप ज्ञानाचा ज्ञाताहि हाच पुरुष. प्रकृतीचें-अव्यक्तरूपाचें-ज्ञान यथार्थ रीतीनें करून घेऊन तद्वारा स्वतःचें ज्ञान स्वतःला करून घेणें हेंच परमश्रेष्ठ ज्ञान होय हा याचा मथितार्थ आहे. विद्या व अविद्या यांचें स्वरूप मीं तुला यथार्थ रीतीनें सांगितलें. आतां क्षर व अक्षर कशाला म्हणतात तें सांगतों ऐक.

प्रकृति व जीव हीं दोन्ही अक्षरहि आहेत व क्षरहि आहेत. या दोघांनाहि क्षर व अक्षर अशा दोन्ही संज्ञा लाविल्या याचें वास्तविक कारण असें: हीं दोन्ही अनादि व अनंत आहेत. सृष्ट्युत्पत्तीचें सामर्थ्य दोघांतहि आहे. मोठे मोठे ज्ञाते पुरुष या दोघांनाहि तत्त्व ही संज्ञा देतात. उत्पत्ति व प्रलय हे सहजधर्म प्रकृतीमध्यें आहेत म्हणून अव्यक्तप्रकृतीला अक्षर म्हणावें लागतें. त्रिगुणात्मक सृष्टीची उत्पत्ति करण्यासाठीं प्रकृति पुनः पुनः विकार पावते व अनादिसंसार उत्पन्न करते. अनादिसंसाराचें कारणहि अनादीच असावयास पाहिजे, म्हणून प्रकृति अनादि-अक्षर-होय. नुसत्या प्रकृतीच्या सामर्थ्यानें अगर नुसत्या जीवाच्या सामर्थ्यानें सृष्ट्युत्पत्ति होत नाहीं, त्यांना एकमेकांचें साहाय्य लागतें. म्हणून, एका अर्थानें जीवाकडेहि त्रिगुणात्मक संसाराचें कर्तृत्व येतें. व या अर्थानें चोवीसांच्या पलीकडला हा पंचविसावा आत्मासुद्धां क्षेत्र या सदराखालीं येतो व म्हणून त्याला प्रकृतीप्रमाणेंच अक्षर मानावें लागतें. संसारांत दिसून येणारा हा गुणांचा पसारा ज्यावेळेस अव्यक्तसंज्ञक प्रकृतींत विलीन होतो, त्यावेळेस गुणांबरोबरच पंचविसाव्या जीवतत्वाचा लय होतो. गुण ज्यावेळीं गुणांमध्यें लीन होतात, त्या वेळेला प्रकृति ही एकटी एक रहाते व जीवात्मा-क्षेत्रज्ञ-हा सुद्धां ज्यावेळेस आपल्या उत्पत्तिस्थानाचे ठिकाणीं-सव्विसाव्या परमतत्वांत—विलीन होतो त्या वेळेला गुणांचा आश्रय करणारी प्रकृति क्षर ठरते. प्रकृतीच्या ठिकाणचे त्रिगुणात्मक भाव देहेंद्रियांच्या द्वारें या स्थितींत प्रकट होऊं शकत नाहींत म्हणून प्रकृति निर्गुण ठरते. याच न्यायानें अव्यक्त क्षेत्राचें ज्ञान नाहींसें झालें म्हणजे क्षेत्रज्ञ जीवात्मा हाहि क्षर ठरतो. प्रकृति व जीवात्मा-पुरुष-हीं दोन्ही जरी याप्रमाणें क्षर ठरत असलीं तरी जीवात्मा हा स्वतःच निर्गुण आहे हा त्याचा विशेष. प्रकृतीच्या ठिकाणीं असणारे गुण जीवात्म्याचें साहाय्य नाहींसें झाल्यामुळें प्रकट होऊं शकत नाहींत या अर्थानें प्रकृति निर्गुण, तर जीवात्म्याला

गुणांचा संसर्ग नसतो म्हणून तो स्वतःसिद्ध रूपानें निर्गुण हा त्यांच्या निर्गुणत्वांत फरक आहे. प्रकृतीला आपले गुण प्रकट करितां येत नाहींत म्हणून ती निर्गुण व आत्म्याचे ठिकाणीं गुणच नाहींत म्हणून तो निर्गुण होय; असें आम्हीं आजवर ऐकत आलों आहों. ज्यावेळेस हा जीवात्मा क्षरस्वरूप होतो त्यावेळेस त्याला त्रिगुणात्मक प्रकृतीची ओळख पटते. ज्यावेळेस हा स्वतःचें निर्गुणत्व ओळखून अव्यक्त प्रकृतीचा स्वतःच्या ठिकाणीं लय करतो त्यावेळेस त्याला विशुद्ध आत्मरूप प्राप्त होतें. प्रकृति वेगळी व मीं वेगळा असें स्पष्ट ज्ञान ज्यावेळेस आत्म्याला होतें त्यावेळेला हा शुद्धस्वरूप होतो व पुनः प्रकृतीशीं संमिश्र होत नाहीं. प्रकृतीचा संग सोडल्यानें आत्मा जेव्हां शुद्धरूप होतो तेव्हां प्रकृतीशीं संमिश्र झालेलें आपलेंच रूप त्याला वेगळें भासूं लागतें व मग प्रकृतीच्या गुणमय पसाऱ्याचा वीट येऊं लागल्यावर त्याला द्रष्टृरूप परमतत्वाची ओळख पटते. एकदां अशी ओळख पटल्यावर मग मात्र त्याला त्याचें विस्मरण होत नाहीं. शुद्धस्वरूपाला पोंचल्यावर प्रकृतीशीं संलग्न असतांना आपण केलेल्या गोष्टींचा याला तिटकारा येऊं लागून तो आपल्याशींच म्हणतोः "इतका वेळ हें मीं काय करीत होतों"? जाळ्यांत सांपडलेला मासा जसा त्या जाळ्याबरोबर ओढला जातो, तसा अज्ञानमोहांत सांपडून, या संसाराच्या प्रवाहाबरोबर मीं वहात चाललों होतों. 'आपलें जीवन उदक हेंच होय अशा समजुतीनें मासा जसा पाण्याच्या मागें धांवतो त्याचप्रमाणें पंचभौतिक देह हेंच माझें जीवन असें मानून त्याच्या संगानें मीं या देहांतून त्या देहांत असा फिरत राहिलों. माशाला ज्ञान नसल्यामुळें आपण पाण्यापासून निराळे आहोंत असें जसें त्याला वाटत नाहीं, त्याप्रमाणें मायामोहांत सांपडल्यामुळें 'आपण देहेंद्रियांहून भिन्न आहों' अशी ओळख माझी मला पटली नाहीं. मोहवश होऊन मीं जो या अनेक दुःखांनीं भरलेल्या देहांमधून—एकांतून दुसऱ्यांत, दुसऱ्यांतून तिसऱ्यांत याप्रमाणें—फिरत राहिलों त्या मला अज्ञान्याला धिक्कार असो. वस्तुतः परमात्मा हाच माझा सखा होय. याचें व माझें साम्य हेंच युक्त; कारण, हा व मीं एकच आहों. जसा हा तसाच मीं. याच्यांत व माझ्यांत सारखेपणा असून आम्हीं दोघे एकमेकांच्या योग्यतेचेच आहों. परमात्मा अत्यंत विमलस्वरूप आहे व मींहि त्याच्यासारखा आहे हें स्पष्ट आहे. अज्ञानानें मोहवश होऊन एवढा वेळपर्यंत मीं या आसक्तीनें व्यापलेल्या प्रकृतीच्या संगतींत—वस्तुतः मीं संगरहित असतांना—काळ काढला व प्रकृतीला वश होऊन

गेल्यामुळें तिच्या नादानें मीं कांहीं चूक करीत आहे हेंहि एवढा वेळ मला समजलें नाहीं. देवयोनि, मनुष्ययोनि व पशुयोनि यांच्याशीं संबद्ध असलेल्या या विकारमय प्रकृतीच्या संगतींत मीं आतां कसा राहूं? आतां मला माझी जाणीव झाल्यानंतर सुद्धां पुनः अज्ञानांतच गुरफटून राहून या प्रकृतीशीं एकरूप होऊन तिच्याच सहवासांत मीं कसा राहीन? आतां मीं सांख्यमार्गानें किंवा योगमार्गानें जाऊन परमात्मस्वरूपीं स्थिर होईन–प्रकृतीच्या सहवासांत रहाणार नाहीं. मीं वस्तुतः निर्विकार असतांहि या विकारमय प्रकृतीनें कपट करून मला नादीं लावून फसविलें. आजपर्यंत लोभाला गुंतून मीं जो शब्द स्पर्शादि बाह्य विषय उपभोगण्यास प्रवृत्त झालों हा माझाच केवळ अपराध होय; यांत प्रकृतीचा दोष नाहीं. मीं स्वतः अमूर्त असूनहि या माझ्या विषयासक्तीमुळें अनेक रूपांच्या नाना देहांतून मला हिंडावें लागलें. स्वतः निराकार असूनहि प्रकृतीच्या नादानें साकार होऊन मीं देहादिकांच्या ठिकाणीं ममत्वबुद्धि धरिली; व या ममत्वबुद्धीमुळेंच मला अनेक योनींत जन्म घ्यावा लागला. वस्तुतः 'मीं' 'माझें' हा मोह मला नसतांहि खोटी ममता उराशीं बाळगून निरनिराळ्या जीवयोनींतून अज्ञानवश होऊन फेरे घालीत रहाण्यानें मीं आजपर्यंत काय साधलें? स्वतःच्या अहंभावानें परमात्म्याचें विमल स्वरूप विकृत करणाऱ्या प्रकृतीशीं मला यापुढें कांहींहि कर्तव्य नाहीं. ही प्रकृति स्वतः अनेक रूपांनीं नटते व मलाहि पुनः पुनः आपल्या नादीं लावते. 'मीं अहंभावरहित व ममत्वशून्य आहें' असें आतां मला माझें ज्ञान झालें आहे. अहंभाव उत्पन्न झाल्यानें शुद्धरूप परमात्म्याची ओळख बुजते व प्रकृतीच्या सांनिध्यानें ममत्वाची भावना जडते म्हणून मीं आतां प्रकृतीचा संग सोडून निरामय आत्मरूपाचा आश्रय करणार. मीं या आत्मरूपाशींच एकरूप होईन. प्रकृतींत तन्मय होऊन रहाणार नाहीं. कारण परमात्म्याच्या विमलरूपाशीं तादात्म्य पावण्यांत मला जें समाधान आहे तें प्रकृतीशीं समरस होण्यांत नाहीं. अशा रीतीनें चोवीस तत्वांच्या पलीकडला जो पुरुष त्याला स्वतःच्या निर्मलस्वरूपाचें ज्ञान होतें व मग तो अव्यक्ताचा–क्षरप्रकृतीचा–त्याग करून अनामय अक्षराशीं एकरूप होतो. विकार्यत्व हा गुण अंगीं असलेल्या प्रकृतीचें–व्यक्त विकारजाताच्या स्वरूपांत व अव्यक्त साम्यावस्थानाच्या स्वरूपांत–सगुण व निर्गुण अशा दोन्ही अवस्थांत–ज्ञान करून घेऊन मग या अव्यक्त प्रकृतीच्याहि पलीकडील जो परमात्मा त्याचें ज्ञान करून घेतल्यानें जीवाला परमात्मरूप होतां येतें.

हे मिथिलाधिपा, वेदांनीं वर्णन केलेल्या अनुभवांवरून क्षराक्षरांच्या ज्ञानाचें हें शास्त्र मीं आतांपर्यंत तुला सांगितलें. तेंच सूक्ष्म, निःसंदिग्ध, शुद्ध व विशिष्ट स्वरूपाचें ज्ञान मीं तुला फिरून सांगतों ऐक. सांख्य व योग या दोन्ही शास्त्रांचा विचार करून मीं तुला आतांपर्यंत सांख्यमार्ग व योगमार्ग हे मार्ग सांगितले. सांख्यमार्गी लोकांनीं जें शास्त्र सांगितलें तेंच योगमार्गी लोकांचें शास्त्र होय. हे राजन्, सांख्यांनीं आपल्या शास्त्राची रचना इतकी स्पष्ट केली आहे कीं शिष्यांच्या अंतःकरणांत त्याच्या तत्वांचा लख्ख प्रकाश पडतो. शिष्यांचें कल्याण व्हावें या इच्छेनें सांख्यमार्गीयांनीं आपल्या शास्त्राची अशी रचना केली आहे. विद्वान् लोक हें सांख्यशास्त्र अत्यंत विस्तीर्ण स्वरूपाचें आहे असें मानतात. योगमार्गी लोकांचाहि या शास्त्राचे ठिकाणीं व वेदांचे ठिकाणीं अत्यंत आदर आहे. व्यक्त व अव्यक्त अशा दोन्ही रूपांनीं प्रतीयमान होणारीं जीं प्रकृतिपुरुष त्यांच्याहि पलीकडे असणारें—अव्यक्त प्रकृतिपुरुषांच्या पलीकडलें—सव्विसावें परम अव्यक्त तत्त्व योगमार्गी लोक मानीत नाहींत व वर वर्णन केल्याप्रमाणें सांख्यमार्गी लोक असलें सव्विसावें तत्व मानतात. हा दोघांच्यांत सूक्ष्म असा भेद आहे. चिदात्मा हा वस्तुतः असंग आहे. परंतु, प्रकृतीच्या संगानें त्याच्या शुद्ध स्वरूपाची ओळख पटत नाहीं; म्हणून तो जिज्ञासेचा विषय होतो. योगमार्ग्यांच्या मतानें दृश्यप्रधान व चिदात्मा एवढेच दोन पदार्थ आहेत. यांचें विवरण करणाऱ्या शास्त्राला योगशास्त्र म्हणतात. १२. ३. ३०७.

---

## अध्याय ३०८ वा.

[ १ बुद्ध, अबुद्ध व गुणविधि यांचें स्वरूप. ]

( १ ) **वसिष्ठः**—हे राजा मीं तुला आतां बुद्ध, अबुद्ध व गुणविधि यांचीं स्वरूपें सांगतों तीं ऐक. लीलाविग्रही आत्मा आपल्या मायेनेंच विश्व, तैजस, प्राज्ञ, विराट्, सूत्र, अंतर्यामी इत्यादि अनेक रूपें धारण करतो व हीं धारण केलेलीं रूपेंच वस्तुतः सत्य आहेत असें मानतो. जीव हा एकदां विकाररूपानें नटला म्हणजे त्याला शुद्ध आत्मरूपाची ओळख रहात नाहीं; व हा गुणांच्या नादीं लागून मीं कर्ता, मीं भोक्ता असा अभिमान धरतो. हे जनाधिपा, हा अज्ञानी जीव केवळ खेळ म्हणून एकसारखा या विकारजाताच्या अनेक रूपांनीं नटत असतो. अशा स्थितींतहि 'ही घागर" 'हें पाणी' असलें

प्रकृतीच्या विकारांचें ज्ञान याला असतें म्हणून याला ज्ञाता ही संज्ञा लावतात. प्रकृतीच्या जाळ्यांत हा सांपडल्यामुळें, याला निर्गुण, निर्लेप परमात्मरूप, ओळखतां येत नाहीं, म्हणून हा अज्ञानी व प्रकृतीच्या विकारांतील भेद याला समजतो इतक्यापुरता हा ज्ञानी होय. अव्यक्त प्रकृतीला सगुण प्रधान किंवा निर्गुण परमात्मरूप यांचें दोघांचेंहि ज्ञान नसतें. म्हणूनच या अव्यक्त प्रकृतीला जडस्वरूप असें मानतात. क्षणभर, वादासाठीं प्रकृतीला ज्ञान असतें असें गृहीत घेऊन चाललें तरीसुद्धां प्रकृतीच्या या ज्ञानाची व्याप्ति चोवीस तत्वें व पंचविसावा जीवात्मा इतक्यापुरतीच असते. असंग, निर्गुण असा जो सव्विसावा परमात्मा त्याची ओळख प्रकृतीला पटत नाहीं. पंचविसावा जीवात्मा हा वस्तुतः अव्यक्त, अच्युत व ज्ञाता असला तरी प्रकृतीच्या नादानें हा पुण्य, पाप, सुख, दुःख इत्यादिकांच्या मोहांत सांपडून त्यांत आसक्त होतो, म्हणून त्याला अज्ञानी किंवा मूढ असें म्हणतात. यालासुद्धां स्वतःचें ज्ञान असत नाहीं. कारण, स्वस्वरूपाचें ज्ञान असेल तर ‘ सव्विसाव्या तत्वापासून मीं भिन्न ’ असें ज्ञान याला होईल. खरें ज्ञातृस्वरूप तत्व तें या पंचविसांपलीकडचें सव्विसावें असून तें विमल व निर्मर्याद आहे. या तत्वाला मात्र पंचविसावा अज्ञानी जीवात्मा व चोवीस तत्वात्मक प्रकृति यांचें ज्ञान असतें. दृश्य व अदृश्य कार्यकारणांचे ठिकाणीं हें तत्व सहज अनुस्यूत असल्याकारणानें विद्वान् पुरुषांना या केवलतत्वाची प्रतीति, तें अव्यक्तरूप असलें तरी, याच देहांत येऊं शकते. वस्तुतः स्वतः ज्ञातृरूप असणारा हा जीव ज्यावेळेस प्रकृतीच्या मोहांत सांपडतो व ‘ मीं परमात्म्याहून भिन्न आहें ’ असें मानूं लागतो त्यावेळेस त्याला चोवीस तत्वांच्या प्रकृतीचें व परब्रह्माचें ज्ञान तर नसतेंच, पण त्याचें त्याला स्वतःचेंहि ज्ञान नसतें. इतका तो प्रकृतीच्या पसाऱ्यांत गर्क होतो. प्रकृतीच्या मायामोहांत सांपडलेला हा जीव अव्यक्तोपासनेनें ज्यावेळेस प्रकृतीवर विजय मिळवितो व तिला आपल्या अधीन करून घेतो तेव्हांच त्याला शुद्ध ब्रह्मरूपसंबंधाच्या सर्वोत्कृष्ट विद्येचें ज्ञान होतें. हे राजशार्दूला, जीवात्म्याला परमतत्वाचें ज्ञान प्राप्त झाल्यानंतर तो पंचवीसांपलीकडचें जें सव्विसावें आत्मतत्व त्याच्याशीं तादात्म्य पावतो, व स्वतःच ज्ञातृरूप होतो. आणि मग, उत्पत्ति व लय या सहजगुणांनीं युक्त असलेल्या प्रकृतीचा त्याच्या हातून त्याग घडतो. अव्यक्ततत्व आपणांहून भिन्न आहे असें ज्ञान या जीवात्म्याला झालें म्हणजे जड अशा गुणमयी प्रकृतीचें यथार्थ ज्ञान त्याला

होऊं शकतें, आणि मग हा केवलस्वरूपानें स्थित होऊन रहातो. हा जीवात्मा केवलस्वरूपाशीं संयुक्त झाला म्हणजे तो प्रकृतीच्या पाशांतून मुक्त होऊन परमात्मरूपाशीं तादात्म्य पावतो. हें केवलस्वरूप म्हणजेच पंचविसांपलीकडचें अजर, अमर व अपरोक्ष असें सव्विसावें तत्व होय. पंचवीस तत्वांमध्यें हें अनुस्यूत असतें म्हणून यालाहि तत्व ही संज्ञा दिली आहे. वस्तुतः इतर पंचवीस तत्वांसारखें हें तत्व या संज्ञेला पात्र नाहीं. म्हणूनच शास्त्रवेत्ते लोक तत्वांची संख्या पंचवीसच मानतात. हा सव्विसावा परमात्मा कार्यरूप नाहीं व कारणरूपहि नाहीं. तो असंग आहे. याचें असंगत्व इतक्या पराकोटीला पोंचलेलें आहे कीं 'मी ब्रह्मरूप आहें' ही भावनासुद्धां हा टाकून देतो. 'मी पंचविसांपलीकडचा अजरामर सव्विसावा परमात्मा आहे' असें उमजणारा व म्हणूनच पूर्वीं अज्ञान असला तरी आतां ज्ञानी झालेला हा जीव स्वतःच्या सत्तासामर्थ्यानेंच परमात्म्याशीं तादात्म्य पावतो यांत संशय नाहीं. ज्या केवलज्ञानस्वरूप अशा सव्विसाव्या तत्त्वाच्या योगानें बाकीच्या पंचविसांची ओळख पटवून घ्यावयाची—त्यांचें ज्ञान करून घ्यावयाचें—त्याचीच ओळख न पटणें हें जें अज्ञान यालाच नानात्व असें म्हणतात. षड्विंशाची ओळख न पटण्यानें जें अज्ञान उत्पन्न होतें त्यांतूनच नानात्व निर्माण होतें, हा सांख्यशास्त्राचा व वेदांचा अभिप्राय आहे. पंचवीस तत्वांचा हा जो सचेतन संघात यांतल्या त्या पंचविसाव्या चेतन जीवानें 'अहं' हा भाव टाकला—अस्मिता टाकली—म्हणजे तो सव्विसाव्या परमतत्वाशीं एकरूप होतो. एखाद्या माणसाला गाढ झोंप लागावी त्याप्रमाणें 'अस्मिता' टाकलेला चेतन जीव गाढ समाधिसुखाचा अनुभव घेतो व त्यांत त्याला परमात्मरूपाशीं ऐक्य पावतां येतें. 'अस्मिते'चें भान शिल्लक असणारा व म्हणूनच प्रकृतीच्या गुणधर्मांत आसक्त असणारा जीवात्मा ज्यावेळीं इंद्रियांदिकांना अगोचर अशा सव्विसाव्या परमात्मतत्वाशीं एकरूप होतो त्यावेळीं त्याची आसक्ति सुटून तोहि परमतत्वाप्रमाणेंच संगरहित व इंद्रियातीत होतो. संगरहित, अज व सर्वव्यापि असें जें सव्विसावें परमतत्व त्याच्याशीं एकरूप होतांच जीवात्मा प्रकृतीचा त्याग करतो. परमतत्वाचें ज्ञान झाल्यावर चतुर्विंशतितत्वात्मक प्रकृति ही असार भासूं लागते व मग जीवात्म्याचा व प्रकृतीचा संग सुटतो.

हे निष्पाप जनकराजा, याप्रमाणें मीं तुला क्षर, अक्षर व या दोघांचा अधिष्ठाता इंद्रियातीत परमात्मा यांचीं स्वरूपें यथातथ्य रीतीनें व वेदशास्त्राला धरून सांगितलीं. उंबराचें फळ व त्यांतील कीड, किंवा पाणी आणि त्यांतील

मासा यांत ज्याप्रमाणें भेदहि आहे व अभेदहि आहे तसाच चोवीस तत्त्वांची प्रकृति व पंचविसावा जीवात्मा यांत भेदहि आहे व अभेदहि आहे. याप्रमाणें या प्रकृतिपुरुषांच्या भेदाभेदाची व्यवस्था जाणावी. अव्यक्त परमात्मस्वरूपाचें ज्ञान होणें या अव्यक्तबोधालाच मोक्ष असें म्हणतात. हें योगमत झालें. प्राणिमात्रांच्या चतुर्विंशतितत्वात्मक देहांतून खेळणाऱ्या या पंचविसाव्या जीवाला प्रकृतीच्या तावडींतून सोडविणें—प्रकृतिधर्मांच्या संगांतून याची मुक्तता करणें—हाच मोक्ष होय असें सांख्यांचें मत आहे. अज्ञानाचा नाश झाल्यानेंच जीवात्मा मुक्त होऊं शकतो, एरवीं नाहीं. प्रकृतीहून वस्तुतः भिन्न असणारा जीवात्मा आपण व प्रकृति एकच असें ज्यावेळेस भ्रमानें समजतो त्यावेळेस प्रकृतीचे गुणधर्म त्याच्या अंगीं चिकटतात. 'आपण प्रकृतीहून भिन्न आहों' असें ज्ञान होऊन हा जीवात्मा स्वतःचें शुद्ध व बुद्ध रूप ओळखूं लागला म्हणजे तो विशुद्धात्मा होतो; व या विशुद्धात्मत्वाच्या अवस्थेंतहि शिल्लक असणाऱ्या अस्मितेचें भान टाकून हा जेव्हां मुक्त व नित्य अशा इंद्रियातीत परमात्म्याशीं एकरूप होतो तेव्हां तो विमुक्तात्मा होतो. संगतीनें स्वरूप पालटणें हा जीवात्म्याचा धर्म होय. विमुक्ताशीं संग घडला तर हा विमुक्त; वियुक्ताशीं संग घडला तर हा वियुक्त; पवित्राशीं संग घडला तर हा अत्यंत तेजस्वी व पवित्र; विमलाशीं संग घडला तर हा विमल; केवलस्वरूपाशीं संग घडला तर हा केवलरूप. स्वतंत्राशीं संग घडला तर हा स्वतंत्ररूप होऊन याचें स्वातंत्र्य याला मिळूं शकतें.

हे महाराजा, याप्रमाणें मीं तुला प्रकृति, पुरुष व परमात्मा यांजबद्दलचें यथार्थ ज्ञान निर्दोष रीतीनें सांगितलें आहे. कोणताहि मत्सरभाव न धरितां तूं याचें रहस्य उमजून घे. म्हणजे तूं सर्व जगाचें आद्य अधिष्ठान असणाऱ्या विशुद्ध व सनातन ब्रह्माशीं एकरूप होशील. राजा, हें अत्यंत पवित्र असें ज्ञान तूं कोणाहि वेदांवर श्रद्धा नसणाऱ्या नास्तिकाला सांगूं नको. ब्रह्मरूपाचें ज्ञान करून घेण्याची ज्याला उत्कट इच्छा असेल व जो त्या इच्छेनें नम्रभाव धरून आला असेल त्याच्या अंतःकरणांत प्रकाश पडावा यासाठीं या ज्ञानदायक शास्त्राचा अवतार आहे. हें ज्ञान खोट्या बुद्धीच्या, कपटी, क्लीब, पाखंडवादी व स्वतःच्या पांडित्याचें निष्कारण प्रदर्शन मांडून दुसऱ्याला ताप देणाऱ्या लोकांना सांगूं नये. हें ज्ञान कोणाला सांगूं नये तें आतांपर्यंत सांगितलें. आतां कोणाला सांगावें तें सांगतों ऐक. ज्या पुरुषाचें अंतःकरण श्रद्धायुक्त आहे, जो गुणी आहे, ज्याला दुसऱ्याला दोष लावणें व वितंडवाद घालणें कधीं आवडत नाहीं, जो विशुद्ध असून शहाणा

आहे व जो सदा प्रवृत्तिशील, क्षमावान् आणि नेहमीं दुसऱ्याचें हित चिंतणारा असा आहे त्याला हें ज्ञान सांगावें. ज्याचें शील शुद्ध असेल, शास्त्रोक्त विधींच्या ठिकाणीं ज्याची निष्ठा असेल, वादविवादाचा ज्याला कंटाळा असेल, जो बहुश्रुत असून ज्ञानसंपन्न असेल, ज्याला अहित खपणार नाहीं व जो शम व दम यांच्यांत तत्पर असेल अशा पुरुषालाच हें ज्ञान सांगावें. हे वर सांगितलेले गुण ज्यांच्या अंगीं नाहींत अशा माणसांना हें विशुद्ध ब्रह्मरूपाचें ज्ञान कधींहि सांगूं नये. अशा गुणहीन पुरुषांना हें ज्ञान सांगितल्यानें वक्त्याचें कल्याण कधींच होत नाहीं; कारण, हें अपात्रीं दान होय. एकाद्या व्रतहीन मनुष्यानें जरी रत्नांनीं भरलेली पृथ्वी संपूर्ण देऊं केली तरी त्याला हें ज्ञान देऊं नये. हे राजेंद्रा, जो पुरुष जितेंद्रिय असेल त्याला मात्र हें ज्ञान निःशंकपणें सांगावें. हे कराला, आदिमध्यांतहीन, शोकरहित व परम पवित्र असें ब्रह्मस्वरूप तुला मीं यथार्थ रीतीनें सांगितलें तें तूं ऐकलेंच आहेस. या ब्रह्मरूपश्रवणानें तुझें सर्व भय नाहींसें होईल. ज्याच्या ज्ञानानें जन्ममरणांचे फेरे चुकतात व जें स्वतः जन्ममरणरहित आहे; जें निरामय, निर्भय व कल्याणमय आहे अशा ब्रह्मरूपाचें आकलन करून घेऊन व हेंच सर्व ज्ञानाचें सार होय असें जाणून तूं मोहाचा त्याग कर. हे राजा, हें ज्ञान सनातन हिरण्यगर्भ सांगत असतांना त्याच्यापासून मीं ऐकलें. याकरितां त्या उग्रस्वभावाच्या हिरण्यगर्भाला मला महाप्रयासानें प्रसन्न करून घ्यावें लागलें. आज जसें तुला या सनातन ब्रह्मरूपाचें ज्ञान झालें तसेंच तें मला त्यावेळीं झालें. आज जसें हें ब्रह्मज्ञान तूं मला विचारलेंस व मीं तुला सांगितलें तसेंच तें मीं पूर्वीं ब्रह्मदेवाला विचारलें व त्यानें मला सांगितलें होतें. हें परमज्ञान प्राप्त करून घेणें हेंच मोक्षनिष्ठ पुरुषांचें परमध्येय होय.

भीष्मः—हे युधिष्ठिरा, चोवीस तत्वांच्या पलीकडचा पंचविसावा जीवात्मा ज्या ब्रह्मरूपाच्या ज्ञानामुळें जन्ममरणांच्या फेऱ्यांत सांपडत नाहीं तें त[illegible] मीं तुला वसिष्ठांसारख्या महर्षींच्या अनुभवांच्या द्वारें सांगितलें. जीव[illegible] या ज्ञानाचें रहस्य ज्यावेळीं पूणपणें उकलूं शकत नाहीं व अजरामर ब्रह्मरू[illegible] यथार्थ ज्ञान ज्यावेळीं त्याला होत नाहीं, अशा वेळीं हा जन्ममरणांच्या फेऱ्यांत सांपडतो. हे राजा, हें अत्यंत निःश्रेयस्कर ज्ञान मीं देवर्षि नारदापासून जसें ऐकलें तसें तुला यथार्थ रीतीनें सांगितलें आहे. हें ज्ञान हिरण्यगर्भापासून महात्म्या वसिष्ठऋषींना मिळालें, वसिष्ठऋषींपासून तें देवर्षि नारदांना मिळालें,

व नारदांच्यापासून हें सनातन ब्रह्मरूपाचें ज्ञान मला प्राप्त झालें. परमात्म्याच्या परमपदाचें वर्णन, हे युधिष्ठिरा, तूं आतां ऐकलें आहेस. तेव्हां तूं सर्व शोक टाकून दे. क्षराक्षरांचें ज्ञान ज्याला पूर्णतया झालें, क्षराक्षरविचार ज्याच्या पूर्ण गळीं उतरला—त्याला कोणत्याहि प्रकारचें भय बाळगावें लागत नाहीं. ज्यांना हें ज्ञान झालें नाहीं त्याला मात्र सर्व बाजूंनीं भय आहे. ब्रह्मरूपाचें यथार्थ ज्ञान न झाल्यामुळें हा मोहवश जीव हजारों योनींत पुनः पुनः येऊन पडतो व मरण येईपर्यंत त्या त्या योनीचा आश्रय करून रहातो. या मोहवश जीवाला देवलोक, मनुष्यलोक व पशुयोनि यांतूनहि फिरावें लागतें. कालवशात् हा जेव्हां अज्ञानसागरांतून शुद्ध होऊन बाहेर निघतो त्यावेळेस याला मुक्ति मिळते. हा अज्ञानसागर महाभयंकर, अव्यक्तरूप व अत्यंत खोल आहे. हे भारता, याच सागरांत प्राणिमात्र रोजच्या रोज बुड्या मारीत असतात. या अगाध, अव्यक्त व सनातन अज्ञानसागरांतून तूं तरून गेल्यामुळें तुझ्यांतील सर्व राजस व तामस भाव नष्ट झाले असून तूं पूर्ण सत्वरूप झाला आहेस. १२. ३. ३०८.

## अध्याय ३०९ वा.

[ १ जनकाला ऋषींचा उपदेश. ]

१ भीष्मः—एकदां जनकाच्या वंशांतील एक राजपुत्र निर्जन अरण्यामध्यें शिकार करीत हिंडत होता. हिंडतां हिंडतां त्याला भृगुवंशांतील एका ऋषींचें दर्शन झालें. हे ऋषि तेथें बसले असतांना या वसुमान् राजपुत्रानें त्यांच्या पायांवर डोकें ठेवलें व त्यांची अनुज्ञा घेऊन त्यांना प्रश्न केला कीं 'भगवन्, श्रेय, श्रेय म्हणून म्हणतात तें काय? व या नश्वर व कामक्रोधादिकांच्या आधीन असलेल्या देहधारी पुरुषाला तें इहपरलोकीं कसें प्राप्त होतें?' वसुमान् राजपुत्रानें मोठा सत्कार करून याप्रमाणें प्रश्न केल्यानंतर त्या महात्म्या तपस्वी मुनींनीं त्याला श्रेयस् म्हणजे काय तें सांगण्यास सुरवात केली.

हे राजन्, तुझ्या मनाला जें आवडतें तें तुला इहपरलोकीं मिळावें अशी तुझी इच्छा आहे. मग तूं जितेंद्रिय हो आणि प्राणिमात्राला प्रतिकूल असणाऱ्या गोष्टींपासून परावृत्त हो. धर्म हा सज्जनांचें हित करणारा आहे. सज्जनांचें आश्रयस्थान म्हणजे धर्मच. या त्रैलोक्यांतील स्थावरजंगम भूतांची प्रवृत्ति धर्मामुळेंच चाललेली आहे. आपल्याला मधुर फळें प्राप्त व्हावींत अशी तुला इच्छा असेल, तर

फलासक्ति–हव्यास–टाकून तूं वितृष्ण हो. हे दुर्बुद्धे, तुला मधाचें पोळें तेवढें दिसतें; पण, तेथला तुटलेला कडा दिसत नाहीं. मधाचें पोळें हस्तगत करण्याच्या नादांत 'आपण कड्यावरून पडूं' हें तुझ्या ध्यानांत येत नाहीं. ज्ञानाचें फल पाहिजे असेल तर ज्ञानाचा जसा परिचय करून घ्यावा लागतो त्याप्रमाणेंच धर्माचें फल पाहिजे म्हणणाऱ्या पुरुषांनीं धर्माचा परिचय करून घेतला पाहिजे. दुर्जन मनुष्याला धर्म आचरण्याची वासना झाली तरी त्याच्या हातून पवित्र कर्मे घडणें हें महाकर्म कठिण होय; पण, सज्जनाला धर्मवासना झाल्यास तो एकादें कठिण कामहि सहज करून दाखवील. अरण्यांत राहूनहि एकादा मनुष्य शहरांतल्याप्रमाणें सुखोपभोग भोगूं लागला तर त्याच्या अरण्यवासाला अर्थच उरणार नाहीं. गांवांत राहून उपभोगिण्याचीं जीं सुखें त्यांचा त्याग ज्यानें मनानें केला नसेल त्याचा अरण्यवास आणि ग्रामवास दोन्ही सारखेच. उलट, गांवांत राहूनहि जो अरण्यांतल्यासारखा विरक्त वृत्तीनें रहातो, त्याचा ग्रामवास म्हणजेच अरण्यवास होय. धर्म प्रवृत्तिलक्षण व निवृत्तिलक्षण असा द्विविध आहे. या उभयविध धर्माचे गुणावगुण नीट समजून घे व सश्रद्ध अंतःकरणानें, मनानें, वाचेनें, व कायेनें धर्माचरण करण्यास प्रवृत्त हो. निर्मत्सर होऊन साधु पुरुषांना पुष्कळ दान नित्य देत जा. व्रतस्थ व पवित्र पुरुषांनीं मागितलेलें व देशकालाला अनुसरून योग्य असलेलें दान साधुपुरुषांना भरपूर द्यावें. शुभ कर्मांनीं द्रव्य मिळवून तें योग्य माणसांना दान द्यावें. दान देतांना क्रोध धरूं नये. दिलेल्याबद्दल पश्चाताप करूं नये. दिल्या दानाचा उच्चार करूं नये. ज्याच्या वृत्तींत कठोरपणा नाहीं, जो जितेंद्रिय आहे, जो पवित्राचरण करणारा असून खरें बोलणारा व सरळमार्गी आहे आणि जन्मानें व कर्मानें विशुद्ध आहे असला वेदवेत्ता ब्राह्मण दानाला सत्पात्र होय. शुद्ध आचरणाच्या व एकनिष्ठेनें पतिव्रताधर्म आचरणाऱ्या स्त्रीच्या पोटीं जन्म घेणारा पुरुष कुलशीलवान् होय. ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेद यांचें अध्ययन करून षट् कर्मांचें आचरण करणारा कुलशीलवान् पुरुष सत्पात्र होय. व असा सत्पात्र पुरुष पाहून त्याला दान द्यावें. पात्रापात्रविचार, कर्ता, देश व काल यांच्या स्वरूपाचा विचार इत्यादिकांवरून एकच कृत्य धर्म्यहि ठरूं शकतें व अधर्म्यहि ठरूं शकतें. कोणत्याहि मनुष्यानें केलेलें कर्म धर्म्य कीं अधर्म्य याचा निर्णय त्या पुरुषानें तें कर्म कोणत्या बुद्धीनें, केव्हां, कोठें व कसें केलें यावर अवलंबून राहील. अंगावरचे बारीक बारीक रजःकण सहज लीलेनें झाडून टाकतां येतात. पण तेंच जर अंगावर मळ पुष्कळ असेल तर तो काढावयास वेळ लागतो. पाप

धुवून काढण्याची गोष्ट तशीच आहे. विरेचन घेतलेल्या माणसाला ज्याप्रमाणें तूप हें पथ्यकर औषधासारखें होतें, त्याप्रमाणेंच ज्या पुरुषाचे सर्व दोष धुवून निघाले आहेत त्याला धर्म परलोकीं सुखावह होतो. प्राणिमात्रांच्या मनांत सर्व प्रकारचे शुभाशुभ विचार नेहमीं येतात. अशुभ विचारांपासून मनाला मागें खेंचून शुभ विचार करण्याकडे त्याची प्रवृत्ति होईल असें कर. जो जो पुरुष ज्या ज्या ठिकाणीं जें जें कांहीं करीत असेल त्या त्या सर्वांबद्दल आदरभाव ठेवावा. कोणालाहि तुच्छ लेखूं नये. स्वधर्माच्याबद्दल तुझ्या मनांत जेवढा अनुराग आहे तेवढाच तो इतरांच्याबद्दलहि ठेव. हे अधीर राजपुत्रा, धैर्यशील हो. हे दुर्बुद्धे, बुद्धिमान् हो. तुझ्या चित्ताला शांति नाहीं ती शांति धारण करण्याचा प्रयत्न कर. मूर्खपणा सोडून शहाण्यासारखा वाग. शहाण्या माणसांची संगति धरिल्यानें व धैर्याचें अवलंबन केल्यानें श्रेयःप्राप्तीचा उपाय सांपडतो. इहपरलोकीं ज्याला श्रेय, श्रेय म्हणून म्हणतात त्याचें मूळ पराकाष्ठेच्या धीरवृत्तींत आहे. हें धैर्य अंगीं नसल्यामुळें महाभिष नांवाचा राजर्षि स्वर्गांतून खालीं आला; व ययाति राजाची पुण्याई संपली होती तरी त्याला धैर्यबलाच्या जोरावर स्वर्गाची प्राप्ति करून घेतां आली. विद्वान्, तपस्वी व धर्मशील अशा लोकांची सेवा केल्यानें तुला विपुल बुद्धि प्राप्त होईल व त्या बुद्धीच्या साहाय्यानें इहपरलोकींचें श्रेय तुला मिळेल."

भीष्मः—हें त्या मुनीचें भाषण ऐकून, त्या सुस्वभाव राजपुत्रानें नानाप्रकारच्या वासनांच्या मागें धांवणारें आपलें मन स्थिर केलें व धर्माचरणाकडे त्याची प्रवृत्ति वळविली. १२. ३. ३०९.

---

## अध्याय ३१० वा.

[ १ याज्ञवल्क्य–जनक संवाद. ]

१ युधिष्ठिरः—धर्म व अधर्म, जन्म व मृत्यु, पुण्य व पाप, या द्वंद्वांच्या पलीकडचें; संशयातीत; स्वतः कल्याणमय व अभयरूप असून दुसऱ्याचें कल्याण साधणारें; पवित्र; अव्यय; अक्षररूप व उपाधींचा संपर्क लागला तरी स्वतःचा कूटस्थभाव न टाकणारें असें तत्त्व कोणतें तें हे पितामहा, आपण मला सांगा.

भीष्म–या बाबतींतला याज्ञवल्क्य व जनक यांच्यामध्यें झालेला एक संवाद जुना इतिहास म्हणून सांगतात. तो मीं तुला सांगतों. देवराताच्या कुळांत

जन्माला आलेल्या महायशस्वी जनकानें नानाप्रकारच्या संशयांचें निरसन करण्यांत अग्रगण्य म्हणून प्रसिद्ध असलेल्या ऋषिश्रेष्ठ याज्ञवल्क्याला प्रश्न केला कीं ' हे विप्रर्षे, इंद्रियें किती आहेत ' प्रकृति किती प्रकारची आहे, अव्यक्त परब्रह्म तें काय, त्याच्याहि पलीकडे काय आहे, सृष्ट्युत्पत्ति कशी होते, तिचा प्रलय कसा होतो, कालगणना कशी करतात, इत्यादि सर्व माहिती आपण मला सांगा. आपला मजवर अनुग्रह व्हावा अशी माझी इच्छा आहे. मीं अज्ञानी असल्यामुळें आपणांस हें विचारीत आहें. आपण निःसंदिग्ध रीतीनें मला सांगा. तें ऐकण्याची माझी इच्छा आहे.

**याज्ञवल्क्य**–हे पृथ्वीपते, तूं जें मला विचारलेंस तें मीं तुला सांगतों ऐक. योगमार्गांतलें–विशेषतः सांख्यमार्गीयांचें-परमज्ञान म्हणून म्हणतात तें हेंच होय. राजन्, तुला माहीत नाहीं असें कांहींच नाहीं. पण, तूं आपला जिज्ञासाबुद्धीनें मला विचारतोस इतकेंच. एखाद्यानें प्रश्न विचारल्यानंतर त्याचें उत्तर दिलें पाहिजे हा सनातन धर्म होय. म्हणून तुझ्या प्रश्नांचीं उत्तरें मीं सांगतों तीं ऐक. प्रकृति ही आठ प्रकारची आहे. प्रकृतीपासून उत्पन्न झालेले विकार सोळा प्रकारचे मानतात. अध्यात्माचा विचार करणाऱ्या पुरुषांच्या मतानें पृथ्वी, आप, तेज, वायु, व आकाश हीं पंचतन्मात्रें आणि अव्यक्त, महान् व अहंकार हीं तीन तत्वें अशी मिळून प्रकृति अष्टधा आहे. या आठ प्रकृति झाल्या; आतां, सोळा विकार कोणते ते सांगतों ऐक. कान, डोळे, त्वगिंद्रिय, जिव्हा व घ्राण हीं पंचज्ञानेंद्रियें; शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध हे त्यांचे पांच विषय; वाणी, हात, पाय, गुद व जननेंद्रिय हीं पांच कर्मेंद्रियें हे पंधरा विकार. शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध आणि वाणी वगैरे पंचकर्मेंद्रियें यांना पंचमहाभूतांतून निर्माण होणारे विशेष असें समजतात; कारण, हे दहा विकार असे आहेत कीं यांतून दुसरे विकार निर्माण होत नाहींत. पंचज्ञानेंद्रियें हीं जशीं सविशेष आहेत तशीं कर्मेंद्रियें हीं नाहींत. वर सांगितलेले पंधरा व सोळावें मन मिळून, अध्यात्मशास्त्राचें चिंतन करणारांच्या मतें सोळा विकार आहेत. हे सोळा विकार तुझ्या व तत्वविशारद अशा तर्ककुशल लोकांच्याहि प्रत्ययाला येतात.

मूल अविकृत व अव्यक्त प्रकृतीमधून महत्संज्ञक आत्मा निर्माण होतो. उत्पत्तीच्या या पहिल्या पायरीला ज्ञाते लोक पहिला प्रधानसर्ग असें नांव देतात. हे राजा, महत्तत्वापासून अहंकार निर्माण होतो. सृष्ट्युत्पत्तीच्या या दुसऱ्या पायरीला बुद्धिसर्ग अशी संज्ञा आहे. अहंकारापासून मन उत्पन्न होतें. या मनामध्येंच

पंचतन्मात्रांचे गुण अंतर्भूत असतात. उत्पत्तीची ही तिसरी पायरी आहंकारिक सर्ग या नांवानें ओळखिली जाते. मन हें स्वतःच्या ठिकाणीं अंतर्भूत असलेलीं पंचतन्मात्रें महाभूतांच्या रूपानें प्रकट करितें. मनापासून होणारी ही जी पंचमहाभूतांची उत्पत्ति ही सृष्टयुत्पत्तीची चौथी पायरी होय. याला मानससर्ग असें म्हणतात. पंचमहाभूतांमधून त्या त्या भूतांचे शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध हे गुण निर्माण होतात. हा पांचवा भौतिकसर्ग होय. श्रोत्र, त्वक्, चक्षु, जिव्हा व घ्राण यांची उत्पत्ति म्हणजे सहावी मानससंज्ञक सृष्टि होय असें शास्त्र-विचार करणारे म्हणतात. श्रोत्रादि ज्ञानेंद्रियांच्या नंतर वाण्यादि कर्मेंद्रियें निर्माण होतात. यांच्या उपत्तीला सातवी इंद्रियसृष्टि असें नांव आहे. ऊर्ध्व गतीनें वहाणारा प्राण व शरीराच्या वरच्या भागांत आडवातिडवा सर्वत्र संचार करणारा समान व्यान व उदान स्वरूपांचा वायु ही आठवी सृष्टि होय. अधोगति वहाणारा अपान व शरीराच्या खालच्या भागांत खेळणारे व्यान, उदान व समान यांची निर्मिति ही नववी सृष्टि होय. या आठव्या व नवव्या अशा दोन्ही सृष्टींना आर्जवकसृष्टि असें नांव देतात. या सृष्टयुत्पत्तीच्या नऊ पायऱ्या व अव्यक्त, महत्, अहंकार व मन हीं चार; पंचकर्मेंद्रियें, पंचज्ञानेंद्रियें, शब्दादि पंचविषय व पंचमहाभूतें मिळून वीस; अशीं एकंदर चोवीस तत्वें मीं तुला सांगितलीं. आतां ही गुणसृष्टि त्या त्या स्वरूपांत किती कालपर्यंत रहाते त्याची कालमर्यादा महात्म्यांनीं सांगितली आहे ती मीं तुला सांगतों ती ऐक. १. ३. ३१०.

---

## अध्याय ३११ वा.

[ १ कालसंख्याविचार ]

(१) **याज्ञवल्क्य**—हे राजन्, उपासनेमुळें अव्यक्तत्वाला पोंचलेली ही जी गुणसृष्टि तिची कालगणना सांगतों ऐक. दहा सहस्र कल्पें म्हणजे या अव्यक्ताचा एक दिवस आहे. याच्या रात्रीचेंहि माप एवढेंच. रात्र संपून हा जागा झाला, म्हणजे, सर्व प्राण्यांचें जीवन ज्यांवर अवलंबून आहे अशा वनस्पति हा प्रथम निर्माण करितो. वनस्पतीनंतर सोन्याच्या अंड्यांतून निर्माण झालेल्या ब्रह्मदेवाची उत्पत्ति होते. हा ब्रह्मा म्हणजे सर्व प्राणिमात्रांची मूर्ति होय असें आम्हीं आजवर ऐकत आलों आहों. एक संवत्सरपर्यंत त्या वासनामय ओढ्यांत वास

करून तो महामुनि प्रजापति बाहेर आला व त्यानें ही सर्व पृथ्वी व वरचा द्युलोक यांच्या रचनेची योजना केली. हे राजा, त्या प्रभूनें द्युलोक व पृथ्वी या दोहोंमध्यें आकाश निर्माण केलें असें श्रुति सांगते. वेद व वेदांगें यांच्यामध्यें पारंगत असलेल्या लोकांनीं या ब्रह्मदेवाचें सुद्धां कालमान सांगितलें आहे. साडे-सात हजार कल्प म्हणजे ब्रह्मदेवाचा एक दिवस. त्याची रात्रहि तेवढीच असते असें अध्यात्मशास्त्राचा विचार करणारे लोक सांगतात. हा ऋषि अहंकार नांवाचें एक दिव्य भूत निर्माण करितो; व स्वतःच्या देहापासून व्यष्टिरूप मन, बुद्धि, अहंकार व चित्त असे चार पुत्र निर्माण करितो. हे ब्रह्मदेवाचे चार पुत्र म्हणजे पंचमहाभूतांचेहि आदिकर्ते होत. यांच्यामधून—पंचमहाभूतांतून—इंद्रियांची उत्पत्ति होते. हीं पंचमहाभूतें चौदाहि भुवनांना व त्यांतील चराचर भूतांना व्यापून राहिलीं आहेत असें आमच्या ऐकण्यांत आहे. परमेष्ठिस्वरूप अहंकारा-पासून पंचमहाभूतें निर्माण होतात. हाच आहंकारिक नांवाचा तृतीयसर्ग होय. या अहंकाराच्या रात्रीचें मान पांच हजार कल्पांचें आहे व याचा दिवसहि तेव-ढाच आहे असें सांगतात. या पंचमहाभूतांचे विशेष शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध हे होत. हीं पंचमहाभूतें आपापल्या विशेषांनीं व्यापृत असतात. हे राजा, पंचभौतिक देह धारण करणारे सर्व प्राणिमात्र रोजच्या रोज एकमेकांच्या सहवासाची इच्छा धरतात; एकमेकांचें हित साधण्याचा प्रयत्न करतात. कधीं कधीं यांतले कित्येक दुसऱ्यांपेक्षां वरचढ होतात व एकमेकांचा हेवा करितात. हे प्राणी कधीं कधीं एकमेकांची हत्याहि करितात व जन्ममरणांची यातायात करावयास लावणाऱ्या या शब्दस्पर्शादि गुणाच्या संगामुळें अनेक तिर्यक् योनींत जन्म घेत घेत या पृथ्वीवरच फेरे घालीत रहातात. या पंचमहाभूतांच्या व मनाच्या कालाचें परिमाण तीन हजार कल्पांचा दिवस व तीन हजार कल्पांची रात्र असें आहे. हे राजा, इंद्रियांना बाजूस ठेवून त्यांचे सर्व व्यापार वस्तुतः मनच करीत असतें. जे जे व्यापार इंद्रियांकडून घडतात असें आपण म्हणतों ते परमार्थतः त्यांच्याकडून घडत नसून मनाकडूनच घडतात. दृष्टीला पदार्थ दिसतात ते मनाच्या साहाय्यामुळेंच दिसतात, चक्षुरिंद्रियाला मनाचें साहाय्य नसेल तर त्याला एकट्याला कांहीं दिसत नाहीं. मन जर ठिकाणीं नसेल तर डोळ्यांसमोर अस-लेला पदार्थहि दिसत नाहींसा होतो. या चक्षुरिंद्रियाच्याप्रमाणेंच बाकीचीं इंद्रियें. यांचे व्यापारहि मनाच्या साहाय्यानेंच घडूं शकतात. मनोव्यापारांनाच आपण इंद्रियव्यापार म्हणतों. मन हेंच सर्व कृति करीत असतें; त्याच्या साहाय्यावांचून

इंद्रियें सर्वथा दुबळीं होत. त्यांच्या हातून कांहीं होत नाहीं. मन शांत असलें म्हणजे इंद्रियेंहि शांत असतात. इंद्रियांचा उपशम म्हणजे मनाचाच उपशम होय. अशाप्रकारें इंद्रियें हीं मनाच्या आधीन असतात हें उमजून घ्यावें. मन हें इंद्रियांचें चालक होय. हे महायशस्वी राजा, पंचमहाभूतें हीं या मनाच्या ठिकाणींच लय पावत असतात. १२. ३. ३११.

---

## अध्याय ३१२ वा.

[ १ जगत्संहार-वर्णन. ]

(१) **याज्ञवल्क्यः** हे राजा, मीं आतांपर्यंत तुला सृष्टींतील तत्वांची संख्या व कालगणनेचें परिमाण हीं यथाक्रम सांगितलीं. आतां, जगताचा संहार कसा होतो त्याचें वर्णन सांगतों ऐक. ब्रह्मदेव हा भूतांचा संहार करून पुनः पुनः त्यांची उत्पत्ति करीत असतो. म्हणून हा अनाद्यनन्त नित्य व अक्षर असा आहे. आपलें दिनमान संपलेंसें वाटतांच रात्रौ झोंप घेण्याच्या उद्देशानें भगवान् अव्यक्त परमात्मा अहंकाराभिमान धरणाऱ्या महारुद्राला जगत्संहार करण्याला प्रवृत्त करतो. मग हा आदित्यरूप महारुद्र त्या अव्यक्ताच्या प्रेरणेनें आपलें तेज शतपट वाढवितो व आपल्या बाराही रूपांनीं अग्नीसारखा तळपूं लागतो. प्रलयकालीं आपलें सर्व तेज प्रकट करणाऱ्या या आदित्याच्या तेजानें जरायुज, स्वेदज, उद्भिज व अंडज अशी चारी प्रकारची भूतसृष्टि ताबडतोब जळून नाहींशी होते. एका निमेषमात्रांत स्थावरजंगम सर्व सृष्टि नष्ट झाल्याबरोबर भोंवतालची सर्व भूमि कांसवाच्या पाठीप्रमाणें सपाट होऊन जाते. याप्रमाणें पृथ्वीच्या पाठीवरील चराचर भूतें दग्ध केल्यावर तो अमितबल परमात्मा ही सर्व पृथ्वी भयंकर वेगानें वहाणाऱ्या पाण्याच्या प्रवाहांत बुडवून टाकतो. चराचर भूतें नाहींशीं होऊन पृथ्वी याप्रमाणें जलमय झाल्यावर कालाग्नि प्रकट होतो व त्याच्या तेजानें हें पाणीहि पण आटून जातें. पाणी नाहींसें झाल्यावर हा महाभयंकर कालाग्नि तसाच कांहीं वेळ जळत रहातो. नंतर, महासामर्थ्यवान्, स्वतःच्या अतुलतेजानें तळपणारा व सर्व भूतांचा दाह करणारा हा जो सप्तज्वालात्मक अग्नि त्याचा ग्रास करण्यासाठीं वायु आपल्या आठहि रूपांनीं प्रकट होतो. अग्नीचा ग्रास केल्यानंतर हा महाबलिष्ठ वायु खालून वरून सर्व बाजूंनीं वहात रहातो. पुढें या बलिष्ठ व भयंकर वायुतत्वालाहि आकाश खाऊन टाकतें. या आकाशापेक्षांहि मोठें असें जें मन तें या

आकाशालाहि नाहींसें करतें. मग, अहंकाररूपी जो प्रजापति तो या मनाला स्वतःचे ठिकाणीं लीन करतो. भूत, भविष्य व वर्तमान जाणणारा महत्संज्ञक आत्मा हा या अहंकाराचा लय आपले ठिकाणीं करतो. या अतुल अशा महत्संज्ञक आत्म्याला सर्व–भूताधिपति भगवान् शंभु ग्रासून टाकतो. हा शंभु अणिमा, लघिमा, प्राप्ति इत्यादि अष्टसिद्धींनीं युक्त असून अव्यय व तेजोरूप आहे. याचे हात, पाय, डोळे, मस्तक, तोंड व कान हीं सर्वव्यापि आहेत. हा शंभु सगळ्यांना व्यापून उरणारा आहे. हा सर्वभूतांच्या हृदयांत वास करीत असून अंगुष्ठमात्र आहे. हा अनंतस्वरूप महात्मा ईश्वर सगळ्या जगाचा उपसंहार करितो. भूत, भविष्य, वर्तमान इत्यादि सर्वांची उत्पत्ति करणारा हा महान् आत्मा स्वस्वरूपीं लीन झाला म्हणजे मग अक्षय, अव्यय व मायादोषरहित असें ब्रह्मरूप प्रकट होतें.

हे राजन्, याप्रमाणें मीं तुला जगत्संहार कसा होतो तें यथावत् रीतीनें सांगितलें आहे. आतां, अध्यात्म, अधिभूत आणि अधिदैव यांचा विचार सांगतों ऐकः १२. ३. ३१२.

---

## अध्याय ३१३ वा.

[ १ अध्यात्म, अधिभूत व अधिदैव. ]

(१) **याज्ञवल्क्यः**—(१) तत्ववेत्ते ब्राह्मण पाय हें अध्यात्म, जाणें हें अधिभूत व विष्णु त्याचें अधिदैवत असें मानतात. तसेंच प्राज्ञ लोक गुदेंद्रिय हें अध्यात्म, पुरीषोत्सर्ग हें अधिभूत व सूर्य हें त्याचें अधिदैवत म्हणतात. उपस्थ हें अध्यात्म, त्यापासून होणारा आनंद हें अधिभूत व प्रजापति हें अधिदैवत होय. हात हें अध्यात्म, कार्य हें अधिभूत व इंद्र हें त्याचें अधिदैवत होय. वाचा हें अध्यात्म, बोलणें हें अधिभूत व तदभिमानी देवता वन्हि हें त्याचें अधिदैव होय. तसेंच चक्षु हें अध्यात्म, रूप हें अधिभूत व सूर्य हें अधिदैवत होय. कान हें अध्यात्म, शब्द हें अधिभूत व दिशा हें अधिदैवत होय. जिव्हा, नासिका, त्वचा, मन, अहंकार व बुद्धि हीं सर्व अध्यात्मरूप आहेत. रस, गंध, स्पर्श, मननक्रिया, अभिमान व ज्ञेयविषय हीं सर्व अनुक्रमानें जिव्हादि अध्यात्माचीं अधिभूतें व जल, पृथ्वी, वायु, चंद्रमा, बुद्धि व क्षेत्रज्ञ हीं त्याच अनुक्रमानें त्यांचीं त्यांचीं

अधिदैवतें होत. हे राजन्, जगाच्या सृष्टि, उत्पत्ति व प्रलय या तीन्ही अवस्थांमध्यें भासमान होणाऱ्या एकाच अद्वितीय परब्रह्माच्या अनेक विभूति मीं तुला वेगवेगळ्या घेऊन वर्णन करून सांगितल्या. हे राजन्, स्वच्छंदानें मन मानेल तशी क्रीडा करण्यासाठीं प्रकृति ही शेंकडों–हजारों–गुण प्रकट करते. मनुष्य ज्याप्रमाणें एका दिव्याच्या साहाय्यानें हजारों दीप प्रकट करतो, त्याप्रमाणें प्रकृति ही पुरुषाच्या ठिकाणीं अनेक गुण प्रकट करते. धैर्य, आनंद, ऐश्वर्य, प्रेम, प्रकाश, सुख, शुद्धि, निरामयता, संतोष, श्रद्धा, अकार्पण्य, कोणत्याहि प्रकारच्या गोंधळाचा अभाव, क्षमा, धृति, अहिंसावृत्ति, समता, सत्य, आनृण्य, मार्दव, विनय, स्थैर्य, पावित्र्य, सरळपणा, कर्मनिष्ठा, अनासक्ति, चित्तस्थैर्य, इष्टानिष्ट गोष्टींच्या योगानें मन व्यग्र न होणें, केलें कर्म बोलून न दाखविणें, दानबुद्धि, आत्मज्ञान, निस्पृहता, परार्थप्रवणता व सर्व भूतांच्या ठिकाणीं दयाशील वृत्ति या गुणांच्या संघाताला सत्त्वगुण म्हणतात. रूप, ऐश्वर्य कलह, त्यागवृत्तीचा अभाव, कठोरपणा, सुखदुःखादि द्वंद्वांच्या ठिकाणीं आसक्ति, दुसऱ्याची निंदा करण्याची आवड, वादविवादांत आनंद मानणें, अहंकार, असत्कार, चिंता, वैर, परिताप, अभिहरण, विनयरहितता, कुटिलता, भेद, नैष्ठुर्य, काम, क्रोध, मद, दर्प, द्वेष व अतिवाद हे राजसगुणांचे प्रकार म्हणून सांगण्यांत येतात. आतां, तामसगुणांचे प्रकार सांगतों ते ऐक. मोह, अंधकार, तामिस्र व अंधतामिस्र हीं तमाचीं लक्षणें होत. तामिस्र म्हणजे क्रोधवृत्ति व अंधतामिस्र म्हणजे मरण होय. सदा खाण्यावर लक्ष; कितीहि खाल्लें किंवा अपेयपान केलें तरी सदा अतृप्ति; सुगंधी पदार्थ, वस्त्रें, नानाप्रकारचे विलास, शय्या, आसनें, दिवसा झोंप घेणें, अतिवाद करणें व बेसावधपणानें वागणें इतक्या गोष्टींत आसक्ति; गायन, वादन व नर्तन यांच्या ठिकाणीं मोहयुक्त आसक्ति व धार्मिकतेचा द्वेष हे तमोगुणाचे विशेष आहेत. १२. ३. ३१३.

---

## अध्याय ३१४ वा.

[ १ पुरुषाधिष्ठित प्रकृतीचें कर्तृत्व; २ जनकाच्या मोक्षधर्माविषयीं शंका. ]

(१) **याज्ञवल्क्यः**—हे पुरुषश्रेष्ठा, सत्त्व, रज, तम हे प्रकृतीचे तीन गुण असून जगांतील कोणत्याहि पदार्थांत हे हटकून सांपडतातच. हे सृष्ट पदार्थांना सोडून कधींच असत नाहींत. षड्गुणैश्वर्यसंपन्न भगवान् स्वतःच शेंकडों, हजारों, लक्षा-

वधि, कोट्यवधि रूपें धारण करून आपणच बहुविध रूपांनीं नटतो. अध्यात्म-विषयाचा विचार करणारे ज्ञाते पुरुष असें सांगतात कीं, सत्वगुणसंपन्न पुरुषाला उत्तमस्थान, राजस पुरुषाला मध्यम स्थान व तामस पुरुषाला अधोगति प्राप्त होते. या जगांत केवळ शुद्ध पुण्यानें स्वर्ग, पुण्य व पाप यांच्या संमिश्रणानें मनुष्यलोक व केवळ पापाचरणानें नरक अशा गति पुरुषाला प्राप्त होतात. सत्व, रज व तम या त्रिगुणांच्या परस्पर मिलाफानें जीं द्वंद्वें किंवा गट निर्माण होतात ते असेः रजोगुण कधींकधीं सत्वाशीं संमिश्र झालेला दिसतो, कधीं तमोगुण रजाशीं संलग्न होतो तर कधीं सत्वगुण आणि तमोगुण एकत्र सांपडतात. सत्वाचा संयोग कधींकधीं अव्यक्ताशींहि झालेला आढळतो. अव्यक्त·पुरुष सत्वगुणसंपन्न झाला म्हणजे त्याला देवलोकाची प्राप्ति होते, तोच रज व सत्व या गुणांनीं युक्त असला म्हणजे मनुष्यलोकांत येतो व रजोगुण आणि तमोगुण यांच्या योगानें त्याला तिर्यक्गति प्राप्त होते. रज, सत्व व तम या तीन्ही गुणांमुळें मनुष्य-जन्माची प्राप्ति होते. ज्यांच्या सर्व पापपुण्यांचा क्षय झाला असेल अशा महा-त्म्यांना शाश्वत, अव्यय, अक्षय व अमृतमय असें स्थान मिळतें. ज्ञानी पुरुषाचा जन्म श्रेष्ठ कुळांत होतो व त्यांना मिळणारें स्थान अढळ, निर्दोष, अतींद्रिय, बीज-रहित व जन्म, मृत्यु आणि मोह यांनीं विरहित असें असतें. हे राजा, अव्यक्त प्रकृतीच्या ठिकाणीं अधिष्ठित असणारें परमतत्व कोणतें असा तूं मला प्रश्न केलास. हा पुरुष अव्यक्त प्रकृतीच्या ठिकाणीं अधिष्ठित असतो व हा पुरुष हेंच तें परमतत्व होय. ही प्रकृति स्वतः अचेतन आहे; पण, हा पुरुष तिच्या ठिकाणीं अधिष्ठित झाला म्हणजे ही पुरुषयुक्त प्रकृति जगाची उत्पत्ति व त्याचा संहार करते.

(२) जनकः—हे महामते, प्रकृति व पुरुष हीं दोन्हीहि अनादि, अनंत, अव्यक्त, अचल व अतींद्रिय आहेत आणि दोघांचेहि गुणदोष स्थिररूप आहेत असें आतांपर्यंत आपण सांगितलें. मग त्यांतील प्रकृति ही अचेतन क्षेत्र व पुरुष हा चेतन क्षेत्रज्ञ होय असें आपण म्हणतां तें कसें? हे विप्रश्रेष्ठा मोक्षधर्मांचा अभ्यास आपण सांगोपांग केला आहे. तेव्हां आपल्या मुखानें मोक्षधर्मशास्त्र संपूर्ण ऐकावें अशी माझी इच्छा आहे. वन्हि आणि उष्णता यांचा नाश जसा एकदम व्हाव-याचा किंवा त्यांचें अस्तित्वहि एकदमच प्रत्ययाला यावयाचें तशीच प्रकृतिपुरु-षांची स्थिति आहे. मग, पुरुषाला स्वतंत्र अस्तित्व कोठून व तें कसें प्रत्ययाला येतें? बरें, स्वतंत्र अस्तित्व मानलें तरी त्याला केवळ विशुद्धत्व कसें येतें व

प्रकृतीशीं त्याचा वियोग कसा घडतो ? हें आपण मला उलगडून सांगा. या देहाच्या ठिकाणीं अधिष्ठित असलेलीं दैवतें कोणतीं; प्राणी देह सोडून जाऊं लागला म्हणजे कालवशात् त्याला कोणती गति प्राप्त होते, सांख्यज्ञानाचें स्वरूप काय, योगज्ञान म्हणजे काय, या दोहोंत फरक कोठें व मृत्युसूचक चिन्हें कोणतीं या सर्व प्रश्नांचा उलगडा मला पाहिजे आहे. आपल्याला हें सर्व ज्ञान करतलामलकवत् आहे. तेव्हां कृपा करून हें सर्व मला उमजून सांगा. १२. ३. ३१४.

---

## अध्याय ३१५ वा.

[ १ जनकाच्या शंकांचीं उत्तरें: सांख्यशास्त्र. ]

(१) **याज्ञवल्क्यः**—हे राजा, स्वभावतःच जें निर्गुण त्याला सगुण करितां येणें शक्य नाहीं. तसेंच जें सगुण आहे त्याला निर्गुण करणें हेंहि अशक्यच आहे. आतां, सगुण व निर्गुण कशाला म्हणतात तें तुला सांगतों ऐक. ज्याच्या ठिकाणीं गुणांचें अस्तित्व आहे तो गुणवान् व ज्याच्या ठिकाणीं गुणांचा अभाव आहे तो निर्गुण असें तत्ववेत्ते महात्मे मुनि सांगतात. गुणांनीं युक्त असणें हा अव्यक्त प्रकृतीचा धर्म होय व हा धर्म तिला टाकतां येणें शक्य नाहीं. ही अव्यक्त प्रकृति स्वभावतः जड व अज्ञ आहे; आणि तिला जो सत्त्वरजादि गुणांचा भोग घडतो तो तिच्या ठिकाणीं आरोपित केलेल्या ज्ञानामुळेंच होय. अव्यक्त प्रकृतीच्या ठिकाणीं ज्ञान नाहीं. परंतु, पुरुष मात्र स्वभावतःच ज्ञाता आहे. ‘सर्वश्रेष्ठ काय तो मीं; मजपरतें जगांत श्रेष्ठ कांहीं नाहीं’ अशी जाणीव या पुरुषाच्या ठिकाणीं जागृत असते. या कारणानें, अचेतन व क्षररूप प्रकृति ज्यावेळेस नित्य व अक्षर पुरुषाशीं संयुक्त होते, त्याचवेळीं ती गुणांचा उपभोग घेऊं शकते. गुण प्रकृतीचे खरे; पण, प्रकृतीला आपल्याच गुणांचा उपभोग पुरुषाच्या साहाय्यावांचून घेतां येत नाहीं. कारण, ती अचेतन आहे. तसेंच, ज्ञातृता हा गुण पुरुषाचा खरा; पण, तें ज्ञान प्रकट होण्यासाठीं त्याला प्रकृतीचें साहाय्य लागतें. प्रकृतीच्या साहाय्यावांचून पुरुषाची ज्ञातृता प्रकट होऊं शकत नाहीं, व पुरुषाच्या साहाय्यावांचून प्रकृतीला स्वतःच्याच गुणांचें ज्ञान होऊं शकत नाहीं असला प्रकृतिपुरुषांचा परस्पर संबंध आहे. अज्ञानानें व्याप्त झाल्यामुळें पुरुष स्वतः गुणांच्या ठिकाणीं पुनः पुनः आसक्त होतो व स्वतःची ओळख विसरतो म्हणून त्याला मुक्ति प्राप्त होत नाहीं. प्रकृतीमधून जी भूतसृष्टि निर्माण होते तिचें कर्तृत्व अज्ञानानें

पुरुषावर आरोपिलें जातें म्हणून पुरुषालाच कर्ता समजतात. योगांचें कर्तृत्व वास्तविक प्रकृतीचें; पण, तेंहि पुरुषाच्या अंगीं चिकटविलें जातें, म्हणून पुरुष हा योगधर्मा होय अशी चुकीची समजूत होते. भूतमात्रांना हालचाल करण्याची प्रेरणा करणारा पुरुषच असल्यामुळें यांचे गुणधर्महि पुरुषावर लादले जातात. सर्व स्थावरवस्तु व कामशमादि गुण यांचें कर्तृत्वहि याच न्यायानें पुरुषाकडे येतें, व यांचा संहारहि याच्याचमुळें होतो असें मानलें जातें. म्हणूनच, लोकांच्या दृष्टीनें पुरुष हा बीजधर्मा ठरतो. याप्रमाणें अज्ञानी लोकांच्या दृष्टीनें पुरुष जरी सर्गधर्मा, योगधर्मा, प्रकृतिधर्मा व बीजधर्मा ठरत असला तरी वस्तुतः तो केवल साक्षी व अद्वितीय आहे. बुद्धीशीं तादात्म्य पावल्यानें हा प्रकृतीचें सुखदुःख हेंच आपलें सुखदुःख मानतो व त्यामुळें सुखी अगर दुःखी होतो. ज्यांचा मोह-ज्वर नाहींसा झालेला आहे असे तत्त्वज्ञ सिद्ध यति हाच सिद्धांत सांगतात. "पुरुष हा स्वतः नित्य व एकरूप असून अनित्य व व्यक्त प्रकृतीच्या संगतीमुळें अव्यक्ताचा व्यक्त व नित्याचा अनित्य असा भासतो" असें आम्हीं आजवर ऐकत आलों आहों. पुरुष हा कारणरूपानें नित्य व अव्यक्त असून कार्यरूपानें अनित्य व व्यक्त आहे. केवल ज्ञानमार्गी व सर्व भूतांवर दया करणारे निरीश्वर सांख्य प्रकृति ही एकच आहे व पुरुष मात्र अनेक आहेत असें मानतात. अनित्यरूप अव्यक्त म्हणजे प्रकृति आणि नित्यरूप पुरुष हीं परस्परांहून भिन्न आहेत. मुंज नांवाच्या गवताची काडी ही जशी वरच्या टरफलाहून भिन्न तशीच प्रकृति पुरुषाहून भिन्न होय. उंबराचें फळ व आंतील मशक हीं जशीं परस्पराहून भिन्न आहेत व तीं जरी अनेक वेळां एकत्र आलीं तरी मशक ज्याप्रमाणें उंबरांत लिप्त होऊन रहात नाहीं तशीच प्रकृतिपुरुषांची गोष्ट आहे. प्रकृति व पुरुष हीं अनेक वेळां एकत्र आलीं तरी पुरुष प्रकृतीच्या गुणांनीं लिप्त होत नाहीं. उदक व मत्स्य हीं परस्परांहून भिन्न आहेत. त्यांचा एकत्र संयोग जरी झाला तरी जलाचे गुण माशाला लागत नाहींत. मातीची शेगडी व विस्तव हीं जशीं परस्परांहून निर्भ्रांत भिन्न आहेत तशींच प्रकृति व पुरुष एक-मेकांहून भिन्न आहेत. मातीच्या शेगडीचा गुण जसा अग्नीला लागत नाहीं तसाच प्रकृतीचा गुण पुरुषाला लागत नाहीं. पाणी व कमल हीं एकमेकांपासून भिन्न आहेत. पाण्याचा संपर्क कमळाला पोंचत नाहीं. तीच प्रकृति—पुरुषांची गोष्ट होय. वर ज्या गोष्टींचीं उदाहरणें घेतलीं या वस्तु एकमेकांच्या सहवासांत असूनहि एकमेकांपासून अलिप्त कशा याचें ज्ञान सामान्य लोकांना केव्हांच होत नाहीं; व या त्यांच्या सहवासाचें रहस्यहि त्यांना उमगत नाहीं. प्रकृतिपुरुषांच्या

परस्पर नात्याबद्दल जे लोक भलत्याच समजुती करून घेतात त्यांना त्यांच्या स्वरूपाचें यथार्थ ज्ञान कधींच होत नाहीं व ते पुनः पुनः घोर अशा नरकांत जाऊन पडतात. हे राजा, याप्रमाणें मीं तुला हें सांख्यदर्शन, प्रकृति–पुरुष–भेद, यथातथ्य रीतीनें सांगितलें आहे. या शास्त्रांत सर्व तत्त्वांचा उत्तम रीतीनें विचार केलेला असून अशा प्रकारचा विचार केल्यामुळेंच सांख्यज्ञानी लोक केवलस्वरूपाशीं तादात्म्य पावतात. जे कोणी इतर विचारी लोक सांख्यमार्गाचा अवलंब करतात त्यांनाहि हीच गति प्राप्त होते. यापुढें मीं तुला योगशास्त्र सांगतों तें ऐक. १२. ३. ३१५.

---

## अध्याय ३१६ वा.

[ १ जनकयाज्ञवल्क्यसंवादः योगशास्त्रकथन. ]

(१) याज्ञवल्क्यः—हे नृपश्रेष्ठा, मीं आतांपर्यंत तुला सांख्यज्ञान सांगितलें. आतां योगशास्त्राचीं तत्त्वें जशीं माझ्या ऐकण्यांत व अनुभवास आलीं तशीं तीं मीं तुला यथार्थ रीतीनें सांगतों तीं ऐक. या जगांत सांख्यज्ञानासारखें दुसरें श्रेष्ठ ज्ञान नाहीं व योगशास्त्राइतकें श्रेष्ठ सामर्थ्यहि दुसऱ्या कोणत्याच शास्त्रांत नाहीं. शमदमादिकांचें आचरण–या गुणांचा अभ्यास–हें दोन्ही शास्त्रांना लागतें. सांख्य व योग हीं दोन्ही शास्त्रें सारखींच मृत्युनाशक आहेत. ज्या पुरुषांची बुद्धि परिपक्व झालेली नसते असेच पुरुष हीं दोन शास्त्रें भिन्न भिन्न आहेत असें मानतात. परंतु, आम्हीं मात्र हीं दोन्ही शास्त्रें एकच होत असें निश्चितपणें मानतों. सांख्यशास्त्राच्या मार्गानें गेलें काय, किंवा योगशास्त्राच्या मार्गानें गेलें काय, योग्यांना जें त्याचें फल मिळावयाचें तेंच सांख्यांनाहि मिळतें. सांख्य व योग हीं दोन्ही एकच आहेत हें ज्याच्या बुद्धीला पटलें तोच खरा तत्त्वज्ञ होय. हे शत्रुतापना, इंद्रियें व प्राण हीं योगाचरणाचीं मुख्य साधनें आहेत. श्वास आंत ओढून घेऊन कोंडून धरणें हा कुंभक म्हणतात. याचेंच दुसरें नांव विधारण असें आहे. उच्छ्वासाच्या रूपानें श्वास पद्धतशीर रीतीनें बाहेर सोडणें हा रेचक होय. याला प्रच्छर्दन असें म्हणतात. प्रच्छर्दन व विधारण या दोन्हीच्या साहाय्यानें इंद्रियांची विषयांकडील प्रवृत्ति थांबवावयाची व मनाची एकाग्रता साधावयाची. चित्तवृत्तिनिरोध हें योगशास्त्राचें ध्येय असल्यानें मनाच्या एकाग्रतेंत सगळा योग येऊं शकतो. हे योगी लोक आपल्या सूक्ष्म देहानें दाही दिशांमधून संचार

करूं शकतात. स्थूलदेहाचा त्याग घडल्यानंतरसुद्धां, अणिमादि अष्टसिद्धींचे गुण ज्याचे ठिकाणीं आहेत अशा सूक्ष्मदेहानें योगी लोकांना प्रलयकाल होईपर्यंत सर्वत्र सुखानें संचार करितां येतो. वेदांमध्यें ज्ञात्या पुरुषांनीं योग हा अष्टगुण म्हणून सांगितला आहे. यम, नियम, प्राणायाम, प्रत्याहार, ध्यान, धारणा, तर्क व समाधि हीं तीं अष्टांगें होत. वेदांत सांगितलेलें हें अष्टविध योगाचें स्वरूप मुख्यतः स्थूल बुद्धीच्या पुरुषांसाठीं असून हाच अष्टविध योग सूक्ष्मरूपानेंहि पण विस्तृत तऱ्हेनें सांगितला आहे. योगाचें याशिवाय दुसरें कोणतेंहि रूप सांगितलेलें नाहीं. योगमार्गी लोकांनीं आचरावयाचीं योगकृत्यें हीं सगुण आणि निर्गुण अशीं दोन प्रकारचीं सांगितलेलीं आहेत. शास्त्रांत सांगितलेल्या—पायाच्या अंगठ्यापासून तों डोळ्यांपर्यंत पसरलेल्या—सोळा मर्मस्थानांच्या ठिकाणीं प्राणवायु खिळून धरणें, अगर पंचमहाभूतांचीं स्थूलदेहांतील जीं निवासस्थानें आहेत त्या त्या ठिकाणीं वायुनिरोध करून पंचभूतांची धारणा करणें हा प्राणायामरूप सगुण योगाचार होय. ध्याता, ध्येय व ध्यान या त्रिपुटीपलीकडे गेलेलें जें परमतत्त्व त्याचें एकाग्रचित्तानें ध्यान करणें हा निर्गुण योगाचार आहे. शरीरांतील सोळा मर्मस्थानांच्या ठिकाणीं वायुनिरोध करून किंवा पंचभूतधारणा करून प्राणायाम केल्यानेंच चित्ताचें एकाग्र्य साधतें व परम वस्तूचें ध्यान घडतें. म्हणून, सगुण योगाचार, व निर्गुण योगाचार हे परस्पर निगडित आहेत. पहिल्यावांचून दुसरा साधत नाहीं व दुसऱ्यावांचून पहिल्याची सार्थकता नाहीं असला त्यांचा परस्पर संबंध आहे. हे मिथिलाधिपा, पूरकादि विधींच्या, किंवा मूलाधार स्वाधिष्ठानादि स्थानांच्या देवतांचें ध्यान केल्यावांचून प्राणायामादि क्रिया केल्यास प्राणवायु प्रकुपित होतो. म्हणून, असला अविधि योगाचार करूं नये. रात्रीच्या पहिल्या प्रहरामध्यें करावयाच्या योगांचे बारा प्रकार शास्त्रानें सांगितले आहेत. झोंप संपल्यानंतर रात्रीच्या शेवटच्या प्रहरांतहि याच बारा प्रकारच्या योगाचें आचरण करावयाचें असतें. मूलाधार, स्वाधिष्ठान, उड्डीयन, जालंधर इत्यादि नऊ स्थानांच्या ठिकाणीं वायुनिरोध करणें हे नऊ प्रकार, व मनाचा समष्टिरूप विश्वांत लय करणें, नंतर क्रमानें व्यक्त कारणरूपांत व निष्कल ब्रह्मरूपांत त्याचा लय करणें हे तीन मनोलय करण्याचे प्रकार मिळून योगाचे बारा प्रकार आहेत. म्हणून, अशाप्रकारें शांत, दांत व एकांतप्रिय अशा योग्यानें स्वतःच्या स्वरूपाचा लय ज्ञानरूप जो आत्माराम परमात्मा त्याचे ठिकाणीं करावा. आपल्या कर्मांमध्यें व्यत्यय न येईल व त्याचा नाश न होईल

अशा तऱ्हेनें पांची इंद्रियांचे पांच प्रकारचे शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध हे दोष नाहींतसे करावे. पंचकर्मेंद्रियें व ज्ञानेंद्रियें यांचा लय मनाच्या ठिकाणीं करावा, मनाला अहंकारांत विलीन करावें. अहंकार बुद्धींत समाविष्ट करावा, बुद्धि प्रकृतीच्या ठिकाणीं लीन करावी. अशा प्रकारें सर्व इंद्रियादिकांचा लय करून मग योगी पुरुष अव्रण, शुद्ध, अनंत, नित्य, विमल, विश्वाला व्यापून उरणाऱ्या, कूटस्थ, अभेद्य, अजरामर, शाश्वत आणि ऱ्हासरहित म्हणून अनश्वर अशा केवल स्वरूप ब्रह्माचें नित्य ध्यान करितात. हे महाराजा, आतां तुला योगस्थ पुरुषांचीं लक्षणें सांगतों तीं ऐक.

सर्व तऱ्हेनें समाधान पावलेल्या व सुखानें झोंप घेणाऱ्या पुरुषाच्या वृत्तीसारखी योग्याची वृत्ति सदा प्रसन्न असते. निवाऱ्याच्या ठिकाणीं ठेवलेला व भरपूर तेल असलेला दिवा ज्याप्रमाणें ज्योत वर करून निश्चलपणानें तेवत असतो तशीच योग्याची मनाची स्थिति आहे. पाषाणावर मुसळधार पाऊस पडला तरी त्या पावसाच्या पाण्यानें तो पाषाण जसा रेंसभरहि हालत नाहीं त्याप्रमाणें योग्याची निश्चल स्थिति असते. शेजारीं शेंकडों शंख किंवा नगारे वाजविले किंवा गाणीं गाऊन वाद्यें वाजविलीं तरीहि ज्याच्या मनाची एकाग्रता ढळत नाहीं.तो योगी. लोक हातांत तरवारी घेऊन दटावीत असतांहि तेलानें भरलेलें भांडें डोक्यावर घेऊन, त्यांतील एक थेंबहि तेल सांडूं न देतां, जिन्यावरून वर चढून जाणाऱ्या पुरुषाचें मन जितकें निश्चल असतें, तितकेंच योग्याचें मन निश्चल असतें. अशा तऱ्हेची मनाची एकाग्रता व निश्चलता साधणें हें योग्याचें अतिश्रेष्ठ लक्षण होय. इंद्रियांचें स्थैर्य व निश्चलता साधणें या एका लक्षणांत मुनीचीं सर्व लक्षणें अंतर्भूत होतात. चोंहोंकडे दाट अंधकार पसरला असतांना त्यांत ज्याप्रमाणें एकदम एकादा तेजोगोल दिसावा त्याप्रमाणें आत्म्याचा स्वस्वरूपीं लय केल्यानंतर अग्नीप्रमाणें तेजस्वी अशा अव्यय परब्रह्माचें स्वरूप योग्याला दिसूं लागतें. असें परमात्मदर्शन झाल्यानंतर योगीपुरुष पुष्कळ कालानंतर जडदेहाचा त्याग करून स्वस्वरूपीं लीन होतो असें सनातन श्रुति सांगते. हे राजन्, योगमार्ग्यांचा योग योग तो हाच. याच्यापेक्षां योगाचें निराळें लक्षण कोणतें असूं शकेल? या योगशास्त्राचें ज्ञान झाल्यानें ज्ञाते पुरुष स्वतःला कृतकृत्य समजतात. १२.३.३१६

---

## अध्याय ३१७ वा.

[ १ योग्यांना प्राप्त होणारीं स्थानें. ]

(१) **याज्ञवल्क्यः**—जडदेहाचा त्याग केल्यानंतर योग्यांना कोणकोणती गति प्राप्त होते तें सांगतों ऐक. ज्याच्या पायांतून प्राण निघून जातो त्याला विष्णुलोक प्राप्त होतो. शरीरामध्यें वायुनिरोधन करण्याचीं जीं मर्मस्थानें आहेत त्यांच्या निरनिराळ्या देवता असून पायांची देवता विष्णु होय. म्हणून पायांवाटे प्राण गेला तर त्याला विष्णुलोक मिळतो असें म्हटलें. याचप्रमाणें पोटऱ्यांतून प्राण गेला तर अष्टवसूंचा लोक प्राप्त होतो, असें आम्हीं ऐकिलें आहे. गुडघ्यांतून प्राण गेला तर साध्यदेवांचा लोक मिळतो. गुदावाटे प्राण गेला तर योगी मित्रलोकाला जातो. जघनावाटे प्राण गेला तर त्याला पृथिवीचें स्थान मिळतें; प्राण मांड्यांतून गेला तर प्रजापतिलोक प्राप्त होतो. कुशींतून प्राण गेला तर मरुद्गणांचा लोक, नाभीवाटे प्राण गेला तर इंद्रलोक, हातांवाटे गेला तरीहि इंद्रलोकच; छातीवाटे प्राण गेला तर रुद्रलोक, मानेंतून प्राण गेला तर नरसंज्ञक मुनिश्रेष्ठाचें स्थान, तोंडांतून प्राण गेला तर विश्वेदेवांचा लोक, कानांवाटे प्राण गेल्यास दिग्लोक, नाकावाटे प्राण गेल्यास वायुलोक, डोळ्यांवाटे गेल्यास अग्निलोक, भुंवयांच्या वाटे प्राण गेला तर अश्विनौ देवांचें स्थान, कपाळावाटे प्राण गेला तर पितृलोकप्राप्ति व डोक्यावाटे प्राण गेला तर देवश्रेष्ठ ब्रह्मदेवाच्या लोकाची प्राप्ति अशीं निरनिराळीं स्थानें योग्यांना मिळतात. हे मिथिलेश्वरा, मरणोत्तर योग्यांना कोणतीं स्थानें मिळतात तें मीं तुला सांगितलें. आतां मृत्यूचीं सूचक चिन्हें सांगतों तीं ऐक.

प्रथमतः मोठमोठ्या ज्ञानी लोकांनीं सांगितलेलीं, ज्यांचें आयुष्य एक वर्षच शिल्लक राहिलें अशा लोकांचीं चिन्हें सांगतों. ज्यांना पूर्वीं पाहिलेला अरुंधतीचा तारा किंवा ध्रुवाचा तारा पुनः दिसत नाहीं किंवा पौर्णिमेच्या चंद्राचा अगर दिव्याचा दक्षिणेकडचा भाग ज्यांना दिसत नाहीं त्यांचें आयुष्य एक वर्षाचें उरलें आहे असें जाणावें. दुसऱ्याच्या डोळ्यांत पडलेलें स्वतःचेंच प्रतिबिम्ब ज्याला दिसेनासें होईल त्याचें शेष आयुष्य एक वर्षाचेंच आहे असें जाणावें. तेजाचा किंवा बुद्धीचा परमोत्कर्ष होणें, अगर हीं दोन्हीहि नाहींशीं होणें व स्वभावधर्मांत जमीनअस्मानाचा फरक पडणें हीं मृत्यु सहा महिन्यांवर आल्याचीं लक्षणें आहेत. देवतांचा व ब्राह्मणांचा अपमान करून त्यांच्याशीं

विरोध करण्याची बुद्धि होणें आणि शरीराचा मूळचा रंग काळसर असून तो फिकट होणें हींहि लक्षणें मृत्यु सहा महिन्यांवर आल्याचींच होत. ज्याला चंद्राचें किंवा सूर्याचें बिंब कोळ्याच्या जाळ्याप्रमाणें सच्छिद्र दिसतें, त्याचा मृत्यु सात दिवसांवर आला असें जाणावें. देवाच्या देवळांत गेलें असतां त्या ठिकाणच्या सुवासिक पदार्थांना ज्याला प्रेताच्या दुर्गंधीसारखी दुर्गंधि येते, त्याचा मृत्यु एक आठवड्यावर आला असें समजावें. कान व नाक एकदम खोल जाणें, दांत व डोळे यांचा रंग पालटणें, जाणीव नाहींशी होऊन एकदम बधिरपणा येणें, अंगांतील उष्मा संपणें हीं तत्काल मृत्यूचीं लक्षणें होत. हे राजा, ज्याचा डावा डोळा एकाएकीं स्रवूं लागेल व ज्याच्या डोक्यांतून धूर निघूं लागेल त्याचा मृत्यु तत्काल होईल असें जाणावें. आतांपर्यंत सांगितलेलीं हीं मृत्युसूचक चिन्हें समजून घेऊन आत्मनिष्ठ मनुष्यानें रात्रंदिवस आपल्या रूपाचा परमात्मरूपीं लय करावा, व आपल्या मरणकालाची वाट पहात रहावें. अशा पुरुषाला मृत्यु यावा अशी इच्छा नसेल तर त्यानें सर्व गंध व सर्व रस जिंकण्याचा प्रयत्न करावा. पृथिव्यादिकांचा जय केला म्हणजे गंधादिकांनाहि हा पुरुष जिंकूं शकतो व पंचमहाभूतांवर जय मिळवितां आला म्हणजे मृत्यु जिंकणें अवघड नाहीं. किंबहुना, भूतजय हाच मृत्युजय होय. हे राजा, ज्ञानी पुरुषानें आत्म्याचा लय परमात्मरूपांत करून, सांख्य व योग या दोन्ही मार्गांच्या योगानें इहलोकचा संसार जिंकावा. अशा इहलोक जिंकणाऱ्या पुरुषाला अक्षय, पूर्णरूप, अज, कल्याणकारक, अव्यय व पापी पुरुषांना प्राप्त न होणारें असें शाश्वत आणि अचल पद मिळतें—ते मोक्षपदाला जातात. १२. ३. ३१७.

---

## अध्याय ३१८ वा.

[ जनक-याज्ञवल्क्य-संवादाची समाप्ति. ]

**याज्ञवल्क्यः**—हे राजा, अव्यक्ताच्या ठिकाणचें परमतत्त्व कोणतें म्हणून तूं मला प्रश्न विचारलास. हा तुझा प्रश्न अत्यंत गूढ आहे. त्याचें उत्तर मीं सांगतों तें सावधानपणानें ऐक. मीं पूर्वीं ऋषींनीं सांगितलेल्या विधीला धरून तपश्चर्या करीत असतांना सूर्याच्या प्रसादानें मला यजुर्वेदाची प्राप्ति झाली. मोठी खडतर तपश्चर्या करून मीं त्या तेजस्वी सूर्यदेवतेची सेवा केली; तेव्हां, तो सर्वव्यापी सूर्यदेव प्रसन्न होऊन मला म्हणाला, "हे विप्रर्षे, तुला हवीशी वाटणारी कोण-

तीहि अत्यंत दुर्लभ गोष्ट तूं मजजवळ माग. मीं ती तुला देईन. माझा प्रसाद फार दुर्लभ आहे." त्यावर त्या देदीप्यमान सूर्यदेवाला मस्तक लववून मीं नमस्कार केला व त्याला म्हटलें "अत्यंत उपयुक्त असा जो यजुर्वेद त्याचें ज्ञान मला सत्वर व्हावें अशी माझी इच्छा आहे." नंतर, सूर्यदेव म्हणाला, "तूं मागितलास हा वर मीं तुला देतों. सरस्वती देवी वाग्रूप धारण करून तुझ्या शरीरांत प्रवेश करील. तूं आपलें तोंड उघड." देवाच्या सांगण्यावरून मीं आपलें तोंड उघडतांच देवी सरस्वतीनें माझ्या शरीरांत प्रवेश केला. त्याबरोबर माझ्या अंगाचा दाह होऊं लागून मीं ताबडतोब पाण्यांत शिरलों. माझ्या अंगाचा दाह होऊं लागतांच मला सूर्याचा राग आला. पण, माझी ती स्थिति पाहून भगवान् सूर्य मला म्हणाला, 'हा दाह क्षणभर सहन कर. तो आतां शांत होईल.' नंतर मीं शांत झालेला पाहून 'तुला यजुर्वेद सांग व सोपनिषद् येईल' असा भगवंतानें मला वर दिला, व सांगितलें कीं 'हे द्विजश्रेष्ठा, तुझ्या हातून शतपथ ब्राह्मण लिहिलें जाईल. तें लिहून झालें म्हणजे तुला मोक्षप्राप्तीची इच्छा होईल; आणि मग, सांख्य व योग या दोन्ही मार्गांतील पुरुष ज्या परमपदाची इच्छा धरतात तें अव्यय पद तुला मिळेल.' असें बोलून भगवान् सूर्यदेव अंतर्धान पावले. सूर्याच्या भाषणाचा विचार करीत मीं आनंदानें घरीं आलों व सरस्वतीचें ध्यान केलें. त्याबरोबर सर्वांचें मंगल करणारी, अत्यंत शुभप्रद, स्वरव्यंजनादि भूषणांनीं शोभायमान दिसणारी, सरस्वती ओंकाराच्या मागोमाग माझ्या ठिकाणीं आविर्भूत झाली. सरस्वतीच्या व सूर्याच्या उपासनेंत मीं नेहमीं तत्पर असें. सरस्वती देवी प्रकट होतांच तिचें विधिवत् पूजन करून तिला व तेजस्विश्रेष्ठ सूर्यदेवाला मीं मला काय पाहिजे होतें तें निवेदन केलें. त्याबरोबर सांग, सरहस्य, ससंग्रह व सपरिशेष असें शतपथ ब्राह्मण माझे ठिकाणीं एकदम स्फुरलें. तें पाहून मला अत्यंत आनंद झाला. मग माझा मामा वैशंपायन याला व त्याच्या शिष्यांना माझा हेवा वाटावा म्हणून उत्तम उत्तम अशा निवडक शंभर शिष्यांना मीं तें शतपथ ब्राह्मण शिकविलें. नंतर, हे राजा, सूर्य जसा आपल्या किरणांच्या प्रभावळीनें शोभतो, तसा मीं माझ्या शिष्यगणांमुळें शोभूं लागलों व शिष्यांसहवर्तमान मीं तुझ्या घरीं येऊन तुझ्या पित्याच्या सांगण्यावरून यज्ञ केला. त्या ठिकाणीं माझ्या मामाच्या पक्षाचा देवल नांवाचा ऋषि उपस्थित होताच, व तो हें सर्व पहात होता. स्वतःच्या वेदाच्या दक्षिणेचा प्रश्न उत्पन्न झाला असतांना, मामा वगैरेबरोबर

त्याबद्दल वाद उत्पन्न होतांच मीं देवलाच्या संमतीनें निम्मी दक्षिणा घेतली. सुमंतु, पैल, जैमिनि, तुझा पिता व इतर मुनि यांचीहि माझ्या या कृत्याला संमति होती. हे निष्पापा, सूर्यदेवापासून मला यजुर्वेदाचीं पंधरा कांडें प्राप्त झालीं, व रोमहर्षण नांवाच्या ऋषीबरोबर मीं पुराणांचें अध्ययन केलें. या अध्ययनाच्या आधारावर व देवी सरस्वती आणि भगवान् सूर्य यांच्या प्रसादाच्या बळावर मीं शतपथ ब्राह्मणाची रचना करण्यास प्रवृत्त झालों. व तें दुर्घट कार्य तडीस नेलें. मीं ज्या तऱ्हेची ग्रंथाची योजना मनाशीं आंखली होती त्याच योजनेला अनुसरून–तशाच पद्धतीनें–मीं तें शतपथ ब्राह्मण सरहस्य, ससंग्रह, साग्र व सांगोपांग आपल्या शिष्यांना पढविलें. नंतर ते शिष्य अत्यंत आनंदित होऊन कृतकार्य होत्साते आपापल्या ठिकाणीं निघून गेले. या प्रकारें सूर्याच्या प्रसादानें मिळविलेल्या यजुर्वेदाच्या पंधरा शाखांची आपल्या इच्छेप्रमाणें व्यवस्था लावल्यावर सर्व ज्ञेय वस्तूंत परम श्रेष्ठ जें अव्यक्त परब्रह्म त्याचें चिंतन करण्याच्या मार्गाला मीं लागलों.

पुढें कांहीं कालानें 'ब्राह्मणजातीचें हित कशांत आहे' 'सत्य म्हणजे काय' 'परम श्रेष्ठ असें ज्ञेय तत्व कोणतें' इत्यादि प्रश्नांचा विचार करीत करीत विश्वावसु नांवाचा गंधर्व तेथें आला व त्यानें वेदज्ञानासंबंधाचे चोवीस प्रश्न मला विचारले. हे राजा, तो गंधर्व वेदांतज्ञानांत पारंगत होता. चोवीस प्रश्न संपल्यानंतर त्यानें पंचविसावा प्रश्न जो विचारला तो आन्वीक्षिकी विद्येबद्दल–तर्कविद्येबद्दल होता. हे राजन्, त्यानें मला विचारलेले प्रश्न असेः "विश्वा कोणती ? व अविश्व कोणतें ? तसेंच अश्वा म्हणजे काय व अश्व म्हणजे काय ? मित्र कोण व वरुण कोण ? निर्गुण कोणतें व सगुण कोणतें ? ज्ञान कशाला म्हणावें व ज्ञेय कोणतें समजावें ? ज्ञाता कोण व अज्ञ कोण ? तपस्वी कोण व तपाचरण न करणारा कोण ? सूर्याचें भक्षण करणारा कोण व सूर्य कोण ? विद्या व अविद्या म्हणजे काय ? वेद्य कोणतें व अवेद्य कोणतें ? चल कशाला म्हणावें व अचल म्हणजे काय ? अपूर्व कोणतें व अक्षय्य कोणतें ? क्षय्य म्हणजे काय ?' असे त्याचे प्रश्न होते.

हे राजन्, त्या गंधर्वश्रेष्ठ राजाचे हे प्रश्न ऐकून त्या यथाक्रम व मार्मिकतेनें विचारलेल्या प्रश्नांचीं उत्तरें देण्यासाठीं मीं त्या गंधर्वाला म्हटलें कीं "या प्रश्नांचा मीं जरा विचार करतों; तूं जरासा थांब." त्यावर बरें म्हणून तो गंधर्व क्षणभर स्तब्ध बसला. नंतर मीं पुनः देवी सरस्वतीचें चिंतन केलें. त्याबरोबर दहीं घुस-

ळतांच त्यांतून जसें तूप निर्माण व्हावें तसेंच माझ्या विचारांच्या मंथनांतून त्या प्रश्नांचें उत्तर माझ्या ठिकाणीं स्फुरलें. मग, युक्तिवादावर भर देऊन मीं उपनिषदांचें व श्रुत्यनुकूल तर्कविद्येचें बराच वेळ चिंतन केलें. नंतर, पंचविसाव्या जीवात्म्यावर अधिष्ठित असलेली; वार्ता, दण्डनीति वगैरे तीन्ही विद्यांच्या पलीकडची चौथी मोक्षदायिनी विद्या जी मीं तुला सांगितली तीच विश्वावसु गंधर्वालाहि सांगितली. पुढें मीं त्या विश्वावसु गंधर्वाला म्हणालों कीं 'हे राजा, तुझ्या प्रश्नांचीं उत्तरें तूं मला विचारिलींस तीं मीं तुला सांगतों, ऐक.'

'विश्वा म्हणजे काय व अविश्व म्हणजे काय असा प्रश्न तूं मला विचारिलास, त्यांत विश्वा म्हणजे भूतभविष्य संसार उत्पन्न करणारी अव्यक्त प्रकृति होय व अविश्व म्हणजे अव्यय, निष्कल आत्मा होय. प्रकृतीच्यामुळें गुण उत्पन्न होतात म्हणून तिला त्रिगुणात्मक म्हणतात. अश्वा व अश्व ही जोडी याच प्रकारची समजावी. प्रकृति ही अव्यक्त होय व पुरुष हा निष्कल, अव्यय होय. तसेंच, मित्र हा पुरुष, वरुण ही प्रकृति; ज्ञान ही प्रकृति, ज्ञेय हें अव्ययरूप. उपाधिविशिष्ट जीव व निरुपाधिक शिव हीं दोन्ही ब्रह्माचींच रूपें असल्यानें अज्ञ जीव व ज्ञानी शिव हे दोघे मिळून परब्रह्मरूप होय. तपा म्हणजे काय व अतपा म्हणजे काय म्हणून तूं विचारलेंस, तर तपा ही विकारशील प्रकृति व अतपा हा निर्विकार पुरुष होय. तसेंच अवेद्य ही प्रकृति व वेद्य हा पुरुष होय. उत्पत्ति व लय यांना कारणीभूत होणारी प्रकृति चला, व पुरुष हा निश्चल होय. उत्पत्ति व लय यांचें कर्तृत्व पुरुषाकडेहि जातें; परंतु, पुरुष हा स्वतः अविकार्य राहून उत्पत्ति व लय करितो व प्रकृतीला हीं कार्यें करितांना स्वतः विकृत व्हावें लागतें हा दोघांच्यामधील फरक आहे. शास्त्राच्या दृष्टीनें प्रकृति अवेद्य व पुरुष वेद्य खरा; पण, व्यवहारांत जें आपल्या निदर्शनास येतें त्यावरून सगळें दृश्यजात हें प्रकृतिस्वरूप आहे म्हणून एका अर्थानें प्रकृति वेद्य व अदृश्य पुरुष अवेद्य होय. सोपाधिक जीवरूपांत,—अज्ञानांत—गुरफटला जातो म्हणून एक अर्थानें पुरुष अज्ञ होय. प्रकृति जडरूप म्हणून अज्ञ. एतावता प्रकृति व पुरुष दोन्हींही अज्ञच. तशींच तीं दोन्हीं ध्रुवरूप, अक्षय, अज व नित्य आहेत असें वेदान्तांत पारंगत असलेले पुरुष सांगतात. उत्पत्तिकालीं पुरुष विकृत होत नाहीं. त्याच्यांत न्यूनाधिक्य न होतां तो जसाचा तसाच रहातो म्हणून त्याला अव्यय, अक्षय असें म्हणतात. त्याला क्षय नाहीं. तशीच मूलप्रकृति ही अविकारी असल्यामुळें तीहि अव्यय होय. उत्पत्तिकालीं व प्रलयकालीं प्रकृतीच्या गुणांचाच केवळ जया-

पजय होतो व मूलप्रकृति अविकृतच रहाते म्हणून ती अविनाशी होय असें शहाणे पुरुष सांगतात. हे गंधर्वश्रेष्ठा, अशा प्रकारची ही मोक्षप्राप्ति करून देणारी व तर्कविद्येवर आधारलेली चौथी विद्या मीं तुला सांगितली आहे. ही जी आन्वीक्षिकी विद्या मीं तुला आतां सांगितली तिच्या साहाय्यानें व गुरुशुश्रूषेसारख्या कर्मांनीं वेदविद्येचें धन हस्तगत करून घ्यावें व सर्व वेदार्थांचें पर्यवसान निश्चयानें नित्यरूप परब्रह्मांतच होतें असें ज्ञान करून घ्यावें. हे विश्वावसो, हीं आकाशादि तत्वें ज्याच्यापासून उत्पन्न होतात व जेथें फिरून लय पावतात, वेदप्रतिपाद्य अशा आद्य ज्ञेय तत्त्वाची ओळख ज्यांना पटलेली नाहीं असले पुरुष ज्या पदापासून च्युत होतात तें पद म्हणजे नित्यरूप परब्रह्म होय. सांगोपांग वेदांचें अध्ययन करूनसुद्धां जर एकाद्या पुरुषाला या वेदप्रतिपाद्य तत्त्वाचें ज्ञान झालें नाहीं तर त्या पुरुषाला वेदार्थज्ञ न म्हणतां वेदांचा नुसता भार वहाणारा असें म्हणावें. वेद्य कोणतें, अवेद्य कोणतें हें ज्या वेदपाठकाला कळत नाहीं, तो मूढमति नुसताच ज्ञानाचा भार वहाणारा होय. त्याचें वेदमंथन म्हणजे गाढवीच्या दुधाचें घुसळण होय. तुपाच्या इच्छेनें गाढवीचें दूध घुसळणाऱ्या मनुष्याला ज्याप्रमाणें दह्यावरची निवळ किंवा तूप यांतील कांहींच मिळत नाहीं, नुसता नरकासारखी घाण येणारा चोथा मात्र हातीं लागतो, तशी या ज्ञानभारवाही पुरुषाची स्थिति होते. अंतःकरण एकाग्र करून मनुष्यानें प्रकृतिपुरुषांचें सत्य स्वरूप नित्य पारखीत असावें. यांचें स्वरूप नीट समजलेल्या ज्ञात्या पुरुषाला जन्ममरणांचे फेरे घ्यावे लागत नाहींत. जन्ममरणयुक्त अशा या अजस्र संसाराचें व कर्मकाण्डानें सांगितलेल्या धर्मांचें स्वरूप अनित्य व नाशिवंत आहे असें विचारानें पटल्यानंतर या अनित्य गोष्टींचा त्याग करून व अक्षय धर्मांची कांस धरून जेव्हां मनुष्य रोज आत्मचिंतन करूं लागतो त्याच वेळेस तो आत्मरूप होतो आणि त्याला पंचविसाव्या पलीकडच्या सव्विसाव्या परमतत्वाचा साक्षात्कार होतो. अव्यक्तरूप शाश्वत परमात्मा व चोवीस तत्त्वांच्या पलीकडे असणारा पंचविसावा जीवात्मा हे दोन्ही निरनिराळे आहेत अशी मूढ लोकांची समजूत असते. पण, ज्ञाते पुरुष परमात्मा व जीवात्मा यांचा अभेद आहे असेंच मानतात. ते एकरूपच आहेत असा त्यांचा सिद्धांत आहे. म्हणूनच परमपदाची इच्छा धरणारे व पुनः पुनः प्राप्त होणाऱ्या जन्ममरणांचें भय बाळगणारे सांख्य व योगी शाश्वत ब्रह्मरूपाहून निराळ्या रीतीनें भासमान होणाऱ्या जीवात्म्याच्या रूपाला किंमत देत नाहींत.

**विश्वावसुः** हे द्विजश्रेष्ठा, चोवीस तत्त्वांच्या पलीकडचा पंचविसावा जो जीवात्मा तो अच्युत आहे असें आपण सांगितलें. परंतु, तो तसा आहे कीं नाहीं याचा मला उलगडा झालेला नाहीं. कारण, जीवात्मा सत्य मानावा तर तो परमात्मा होणें शक्य नाहीं. जीवात्मा शिवात्मा होऊं शकत नाहीं असें म्हटल्यास 'तत्त्वमसि' या वाक्यांत सांगितलेल्या अभेद सिद्धांताला गौणत्व येतें. बरें, अभेदसिद्धांत गौण ठरूं नये म्हणून जीवात्मा असत्य मानावा तर ब्रह्मकांडाला—वेदांताला—अप्रमाण मानावें लागेल आणि बंधमोक्षांच्या व्यवस्थेंत गोंधळ उत्पन्न होईल. तेव्हां जीवात्मा सत्यरूप कीं असत्यरूप हें मला आपण सांगा. या विषयाचें विवरण पूर्वी जैगीषव्य, असित देवल, पराशर, वार्षगण्य, भृगु, पंचशिख, कपिलऋषि, शुक, गौतम, अर्ष्टिषेण, गर्ग, नारद, आसुरि, पुलस्त्य, बुद्धिमान् सनत्कुमार, महात्मा शुक्राचार्य, कश्यपऋषि व माझा पिता इतक्यांनीं केलेलें मीं ऐकिलें आहे. तसेंच धीमान् व विश्वरूप अशा रुद्राकडूनहि मीं हा विषय ऐकला आहे. निरनिराळया देवता, माझे पूर्वज व दैत्यकुळांतील आचार्य इतक्यांच्यापासून हें सर्व ज्ञान मला मिळालें व हे सव लोक ज्ञेयस्वरूप परब्रह्म नित्य आहे असेंच सांगतात. या प्रकारें हें ज्ञान जरी मीं पुष्कळांच्या तोंडून ऐकलें असलें तरीं तें आपल्या मुखानें फिरून एकवार ऐकावें अशी माझी इच्छा आहे. कारण, आपण सर्व शास्त्रवेत्त्या पुरुषांत अग्रगण्य आहांत व वक्तृत्वांतहि निपुण आहांत. आपल्या सारख्या बुद्धिमान् पुरुषाला अज्ञात असें कांहींच नाहीं. आपल्याला सर्व लोक वेदज्ञानाचा सागर समजतात. देवलोकांत व ब्रह्मलोकांतहि आपली ही कीर्ति गाइली जाते असें त्या लोकांतून येणारे महर्षि सांगतात. तेजोमय तत्त्वांमध्यें कायमचा अग्रगण्य म्हणून ठरलेला सूर्यहि आपली स्तुति गातो. हे द्विजश्रेष्ठा, आपण सांख्यज्ञानाचें साकल्यानें आकलन केलेलें आहे. तसेंच योग्यशास्त्रहि पण आपणांस तितक्याच पूर्णपणानें अवगत आहे. आपलें ज्ञान निःसंशय अगाध आहे. सर्व चराचर वस्तु आपल्याला ज्ञात आहेत. म्हणून, दहीं घुसळून त्यांतून मण्डमय घृत जसें काढून द्यावें त्याप्रमाणें आपण आपल्या ज्ञानसागराचें मंथन करून त्याचें सार मला सांगा.

**याज्ञवल्क्यः** हे गंधर्वश्रेष्ठ विश्वावसो, मीं सर्वज्ञ आहें अशी कल्पना करून माझ्यापासून ज्ञान मिळविण्याची तूं इच्छा धरतोस तर हें ज्ञान मला जसें मिळालें व समजलें तसें तें मीं तुला सांगतों ऐक. चतुर्विंशति तत्त्वांची प्रकृति स्वतः जड, अज्ञानी आहे. पुरुषाच्या ज्ञातृत्वाचें प्रतिबिंम्ब तिच्या ठिकाणीं पडलें

म्हणजे तिला ज्ञातृत्व येतें. पुरुषाचें ज्ञातृत्व प्रकृतीच्या ठिकाणीं प्रतिबिंबित होतें म्हणून पुरुष प्रकृतीला चैतन्ययुक्त करतो. प्रकृति पुरुषाला चैतन्ययुक्त करूं शकत नाहीं. कारण, चेतनत्व हा गुणच तिच्या ठिकाणीं नाहीं. अशा पुरुषाच्या चेतनत्वामुळें सचेतन बनलेल्या प्रकृतीला 'प्रधान' असें नांव सांख्यमार्गीय लोकांनीं व योगमार्गीयांनीं श्रुतीच्या आधारावरून दिलेलें आहे. चोवीस तत्त्वांच्या प्रकृतींत प्रतिबिंबरूपानें भासमान होणारा आत्मा ज्यावेळेस प्रकृतिपुरुषांच्या भेदाची जाणीव जागृत ठेऊन त्यांच्याकडे पहातो त्यावेळेस त्याला चोवीस तत्त्वांची सविकार प्रकृति व पंचविसावा जीवात्मा हीं दोन्ही दिसतात. पण, प्रकृतिपुरुषामधील भेद विसरून जाऊन हा जेव्हां स्वस्वरूपीं लीन होतो तेव्हां याला पंचविसाव्या पलीकडचें सव्विसावें मूळ आत्मरूप दिसूं लागतें. पंचविंश जीवात्मा ज्यावेळेस षड्विंश परमात्म्याला ओळखीत नाहीं त्यावेळेस आपल्यापरतें या जगांत श्रेष्ठ कांहीं नाहीं असा अभिमान त्याला उत्पन्न होतो. कांहीं लोक चोवीस तत्त्वांच्या प्रकृतीलाच आत्मा मानतात; पण, ज्ञानी पुरुषांनीं आपली अशी समजूत करून घेऊं नये. प्रकृति–पुरुषांचा संबंध मत्स्य व उदक यांच्या संबंधासारखा आहे. मासा उदकाच्या मागून जातो, उदक वागवील तसा वागतो हें खरें असलें तरी 'हा मासा' आणि 'हें उदक' असें भेदज्ञान होतेंच. त्याचप्रमाणें पुरुष हा प्रकृतीच्या ठिकाणीं स्नेहसंबद्ध असला, त्याचा व प्रकृतीचा नित्य सहवास असला व प्रकृतीचा अभिमान धरून जरी पुरुष मोहवश होत असला तरी प्रकृति निराळी व पुरुष निराळा असें ज्ञान हें व्हावयास पाहिजे. 'आपण षड्विंश परब्रह्माशीं एकरूप आहोंत' हें जेव्हां जीवात्मा विसरतो–परब्रह्मरूपाशीं असलेल्या आपल्या तादात्म्याची ओळख जेव्हां याची बुजते–तेव्हां हा संसारचक्रांत मग्न होतो. पण, तेंच आपण व परब्रह्म एकच हें ज्ञान त्याच्या ठिकाणीं जागृत झालें म्हणजे तो मुक्त होतो. जीवात्म्याला ज्यावेळेस 'आपण प्रकृतीहून भिन्न आहों असें ज्ञान होतें' त्यावेळेस तो केवळस्वरूप होतो व षड्विंश परब्रह्माचा साक्षात्कार त्याला होतो. षड्विंश परमात्मा व पंचविंश जीवात्मा हे दोघे व्यवहारदृष्ट्या भिन्न आहेत खरे; पण परब्रह्माचा साक्षात्कार होण्याच्या पाहिरीला जे साधुलोक पोचलेले आहेत त्यांना तेथून ते एकरूपच भासतात. आणि म्हणूनच, जन्ममरणांच्या फेऱ्यांचें भय ज्यांना वाटतें, जे परब्रह्माचें चिंतन करून तत्परायण होतात, अशा पवित्र सांख्यांना किंवा योग्यांना पंचविसाव्या जीवात्म्याचें स्वरूप सत्य वाटत नाहीं.

कारण, त्यांच्या मतें जीव व शिव हे अभिन्नच असतात. मनुष्य केवलस्वरूप होऊन त्याला परब्रह्माचा साक्षात्कार झाला म्हणजे त्याला सर्वज्ञत्व येतें व तो फिरून जन्ममरणांच्या फेऱ्यांत सांपडत नाहीं. हे अनघा, याप्रमाणें मीं तुला बुद्ध, बुध्यमान व अप्रतिबुद्ध–म्हणजे प्रकृति, जीव व शिव–यांचीं स्वरूपें श्रुतींत सांगितलीं आहेत तशीं सांगितलीं. ज्यांच्या दृष्टीनें द्रष्टा व दृश्य, तसेंच दृष्टि व दृश्य हीं एकच, म्हणजे ज्ञाता, ज्ञेय व ज्ञान या त्रिपुटीपैकीं ज्ञाता व ज्ञेय, आणि ज्ञेय व ज्ञान या जोड्यांत ज्यांना भेद उरला नाहीं; तसेंच केवलरूप परमात्मा व अकेवल जीवात्मा हे दोघे ज्यांच्या दृष्टीनें अभिन्न आहेत, असेच पुरुष मोक्षाधिकारी होत.

विश्वावसुः—हे विभो, आपण मला, सत्य, शुभ व मोक्षप्राप्ति करून देणाऱ्या या परब्रह्माचें स्वरूप साकल्यानें व पद्धतशीर रीतीनें उलगडून सांगितलें. आपलें सदा सर्वदा अखंड कल्याण असो व आपलें विचारप्रवण मन असेंच नेहमीं विचारांत मग्न राहो.

याज्ञवल्क्यः—हे जनका, याप्रमाणें बोलून तो महात्मा विश्वावसु मला उजवी घालून स्वर्गलोकीं निघून गेला. त्याला मिळालेल्या ज्ञानानें त्याचें अत्यंत समाधान झालेलें दिसलें व त्या दिव्य ज्ञानाच्या सामर्थ्यानेंच जणूं त्याचें तेज वाढल्यासारखें दिसत होतें. अंतरिक्षांतील ब्रह्मादि लोक, पृथ्वी व पाताल या सर्व ठिकाणीं रहाणाऱ्या मोक्षाधिकारी लोकांच्यामध्यें त्या त्या ठिकाणीं त्या विश्वावसु गंधर्वानें या सांख्यज्ञानाचा प्रसार केला. सांख्यज्ञानी लोक सांख्यमार्गानें जातात, व योगमार्गी लोक आपल्या योगमार्गानें जातात. सांख्य व योगी यांखेरीज आणखीहि कोणीं मुमुक्षु लोक असतील व तेहि आपल्या मार्गानें जात असतील. कोणीं कोणत्याहि मार्गानें जावो, हें शास्त्र सर्वच मुमुक्षु पुरुषांना प्रत्यक्ष फलप्राप्ति करून देणारें आहे. हे राजसिंहा, मोक्षप्राप्ति ही ज्ञानानें होते; अज्ञानानें मोक्ष नाहीं. शहाणे शहाणे लोक आजपर्यंत हेंच सांगत आले आहेत. म्हणून मनुष्यानें ज्ञानप्राप्ति करून घ्यावयाचा प्रयत्न करावा, व ज्ञानाच्या साहाय्यानें जन्ममरणांच्या फेऱ्यांतून सुटण्यास झटावें. आपणाला मिळणारें ज्ञान ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य किंवा नीच शूद्र यांपैकीं कोणापासूनहि आलेलें असो; जेथून मिळेल तेथून ज्ञान मिळवून श्रद्धावंत मुमुक्षु पुरुषानें त्यावर विश्वास ठेवावा. श्रद्धावंत माणसाला जन्ममरणांचे फेरे घ्यावे लागत नाहींत. सगळे वर्ण ब्राह्मणच आहेत. कारण, ते सर्व ब्रह्मदेवापासून निर्माण झालेले आहेत. चारी वर्णांतले

लोक सदासर्वदा परब्रह्माचाच घोष करीत असतात. मीं आतां तुला हें जें सत्य शास्त्र सांगत आहें हें ब्रह्मबुद्धीनेंच होय. कारण, हें सर्व विश्वच ब्रह्मरूप आहे. ब्रह्मदेवाच्या तोंडापासून ब्राह्मण झाले, बाहूंपासून क्षत्रिय निर्माण झाले; मांड्यांपासून वैश्य निर्माण झाले व पायांतून शूद्र निर्माण झाले असें श्रुति सांगते. तेव्हां, कोणताहि वर्ण कमी किंवा अधिक मानूं नये. मनुष्यप्राणी अज्ञानामुळें या कर्मभूमीवर जन्माला येतो व मरण पावतो. तसेच सर्व वर्णहि घोर अज्ञानामुळें प्रकृतीनें उत्पन्न केलेल्या जन्ममरणांच्या जाळ्यांत सांपडतात. म्हणून, हे राजन्, ज्ञान सर्व मार्गांनीं मिळविण्याचा प्रयत्न करावा. ज्ञान हें सर्व ठिकाणीं सर्व वर्णांत आहे हें मीं तुला आतां सांगितलेंच आहे. ब्राह्मणाची निष्ठा ज्ञानाचे ठिकाणीं असतेच; किंबहुना ज्ञाननिष्ठ तोच ब्राह्मण होय. ब्राह्मणाप्रमाणेंच इतर वर्णांतलेहि जे कोणी लोक ब्रह्मज्ञानावर निष्ठा ठेवितील त्यांना नित्य मोक्षाची प्राप्ति होईल असें शास्त्रज्ञ लोक सांगतात. राजा, आतांपर्यंत तूं मला जें जें विचारिलेंस तें तें मीं तुला यथातथ्य रीतीनें सांगितलें आहे. तेव्हां, तूं शोकरहित हो आणि, ' एतत् ' या पदानें संबोधला जाणारा हा संसार तरून जा. हें शास्त्र मीं तुला योग्य व यथार्थ रीतीनें सांगितलें आहे. तुझें नित्य कल्याण होवो.

भीष्म : बुद्धिमान् याज्ञवल्क्याचा हा उपदेश ऐकून मिथिलाधिपति जनकराजाला मोठा हर्ष झाला व त्यानें याज्ञवल्क्याचा सन्मान करण्यासाठीं त्याला प्रदक्षिणा घातली. तो मुनिश्रेष्ठ याज्ञवल्क्य निघून गेल्यानंतर त्या मोक्षधर्मज्ञ देवरात जनकराजानें त्याच ठिकाणीं कोट्यवधि गाई, अपार सोन्याच्या राशि व रत्नांच्या ओंजळीच्या ओंजळी ब्राह्मणांना दान दिल्या व विदेह देशाच्या राज्याचा भार पुत्रावर सोंपवून आपण संन्यासधर्माचें आचरण करीत राहिला. त्या ठिकाणीं त्यानें सांग सांख्यशास्त्र व योग यांचें अध्ययन सुरू केलें व धर्माधर्म हे प्रकृतीचे गुण असें समजून त्यांची उपेक्षा केली. हे राजा, आपण स्वतः अनंत, नित्य व केवलस्वरूप आहोंत असें जाणून त्या जनकानें धर्माधर्म, पुण्यपाप, सत्यासत्य व जन्ममृत्यु हे प्रकृतीचे खेळ आहेत आणि हा संसार हें व्यक्ताव्यक्त प्रकृतीचेंच कर्म होय असें यथार्थ ज्ञान करून घेतलें.

आपापल्या शास्त्रांच्या आधारें परब्रह्माचें लक्षण बांधणारे सांख्य व योगी हे परात्पर ब्रह्मरूप इष्टानिष्टादि शब्दांच्या पलीकडे केवलरूपानें स्थित आहे असें समजतात. विद्वान् पुरुष हें परब्रह्म नित्य व पवित्र आहे असें

मानतात. म्हणून, हे युधिष्ठिरा, तूं सदा शुचि रहा. जें जें आपणांकडून दिलें जातें, जें जें आपल्याला मिळतें, आणि ज्या ज्या आपल्या दानाला दुसऱ्याची अनुमति असते, तें तें सर्व दान शुचि होय. हे नरश्रेष्ठा, मनुष्य जें जें देतो व जें जें घेतो तें तें सर्व दान अव्यक्तरूपच होय. परमात्मा हा स्वतःच्याच एकच एक केवलस्वरूपानें असतो तेव्हां त्यापेक्षां अधिक श्रेष्ठ असा दुसरा कोण असणार? आतांपर्यंत तुला जें मी सांगितलें त्याच्यावरून तूं हाच एक सिद्धांत मनांत नीट धरून रहा; नानातऱ्हेच्या इतर विकल्पांकडे धांव घेऊं नको. ज्याला अव्यक्ताचें ज्ञान सगुण आणि निर्गुण या दोन्हीही स्वरूपांत झालेलें नाहीं अशा पढिक पुरुषानें यज्ञयागादि कर्मे व तीर्थाटन हीं करावयाचीं आहेत. हे कुरुनंदना, अव्यक्त परब्रह्माचें स्थान हें स्वाध्यायाच्या अध्ययनानें, तपश्चर्येनें किंवा यज्ञकर्मांनीं मिळत नाहीं. अव्यक्ताचें ज्ञान झाल्यानें मनुष्य अव्यक्ताशीं तादात्म्य पावतो. महत्तत्वाचें ज्ञान झाल्यानें महत् तत्त्वाशीं तादात्म्य पावतो. ज्याला अहंकारतत्त्वाचें ज्ञान झालें तो त्याच्याशीं तादात्म्य पावतो. अहंकाराच्या पलीकडील निरनिराळ्या तत्त्वांच्या ध्यानानें त्या त्या तत्त्वाशीं तादात्म्य पावतां येतें. जे शास्त्रज्ञ लोक अव्यक्ताच्या पलीकडील नित्य, जन्ममृत्युरहित व विमुक्त आणि सदसद्रूप अशा परब्रह्माला जाणतात त्यांना त्याच्या पदाची प्राप्ति होते.

हे राजा, पूर्वी हें ज्ञान मला जनकापासून मिळालें व जनकाला याज्ञवल्क्यापासून मिळालें. ज्ञान हेंच श्रेष्ठ होय. ज्ञानाला जें महत्त्व आहे तें यज्ञकर्माला नाहीं. ज्ञानानेंच संकटांतून तरून जातां येतें, यज्ञकर्मांनीं येत नाहीं. हे राजा, ज्ञानी मनुष्यें जन्म व मृत्यू यांना भौतिक संकटें समजत नाहींत. यज्ञ, कर्म, तपश्चर्या, नाना प्रकारचे नियम आणि व्रतें यांनीं मनुष्य स्वर्गाला जातो खरा, पण तेथून तो पुन्हां पृथ्वीतलावर येतो. म्हणून हे राजा, तूं परम कल्याणकारक, मंगल, पवित्र, स्वतः शुद्ध असून दुसऱ्याला शुद्ध करणारें असें जें ब्रह्मरूप त्याचें चिंतन कर. हें क्षेत्रजात म्हणजे काय याचें पूर्ण ज्ञान करून घे, ज्ञानयज्ञ कर व परम तत्त्वाची उपासना कर म्हणजे तूं ऋषिरूप होशील. पूर्वी याज्ञवल्क्यानें जनक राजाला हें उपनिषद्रहस्य सांगून ऋषि केलें. ज्या शास्त्रामध्यें शाश्वत आणि अव्यय अशा ब्रह्मरूपाचें वर्णन आहे, त्या ह्या शास्त्राचें ज्ञान शुभ अमृत व शोकरहित अशा ब्रह्मपदाची प्राप्ति करून देण्यास समर्थ आहे. १२.—३.—३१८.

## अध्याय ३१९ वा.

[ १ पंचशिख-जनक संवाद. ]

( १ ) **युधिष्ठिरः**—हे भरतर्षभा, मोठें ऐश्वर्य, अपार धनसंपत्ति किंवा दीर्घ आयुष्य हीं प्राप्त झाल्यानंतर जर एखाद्याला मृत्यू टाळावासा वाटला तर त्यानें तो कसा टाळावा? अत्यंत मोठी तपश्चर्या, यज्ञकर्में, विद्या किंवा निरनिराळीं रसायनकर्में यांपैकीं कोणत्या मार्गानें म्हातारपण आणि मृत्यू हीं टाळतां येतील ?

**भीष्मः**—या बाबतींत जनक राजा व पंचशिख भिक्षु यांचा एक संवाद जुना इतिहास म्हणून सांगत असतात तो मी तुला सांगतों, ऐक. एकदां जनक राजानें वेदवेत्त्या ब्राह्मणामध्यें श्रेष्ठ असलेल्या व धर्मार्थासंबंधानें ज्याचे सगळे संशय नाहींसे झाले आहेत अशा पंचशिख महर्षीला प्रश्न केला कीं " हे भगवन्, तपश्चर्या, बुद्धि, यज्ञकर्में किंवा विद्या यांच्यापैकीं कोणत्या मार्गानें म्हातारपण आणि मृत्यू यांना जिंकतां येईल ? " यावर अपरोक्ष तत्त्वाचें ज्ञान असलेला तो पंचशिख जनकाला म्हणालाः

" म्हातारपण आणि मृत्यू हीं निश्चयानें टाळतां येतीलच असें नाहीं व टाळतां येणारच नाहींत असेंही पण नाहीं. दिवस, महिने, रात्री यांचा ओघ अखंड असून तो कधींही बंद पडत नाहीं. मनुष्यप्राणी नाशवंत आहे. हा पुष्कळ वेळ ह्या ध्रुवस्वरूपाच्या मार्गानें जाण्याचा प्रयत्न करीत असतो. एखाद्या प्रवाहांत सांपडलेला पदार्थ ज्याप्रमाणें त्याबरोबर वहात जावा त्याप्रमाणें काळाच्या सपाट्यांत सांपडलेले सर्व प्राणी त्याच्याबरोबर वहात जातात. या काळसागरांतून तरून जाण्यास साधन नाहीं. म्हातारपण आणि मृत्यू ह्या या सागरांतील भयंकर स्वरूपाच्या मगरी आहेत. अशा या सागरांत गटंगळ्या खाणाऱ्या व त्याबरोबर वहात जाणाऱ्या मनुष्याला कोणीही सहाय्य करीत नाहीं. त्या ठिकाणीं त्याचा म्हणून कोणीही नसतो व तोहि कोणाचा नसतो. वाटेमध्यें एखादा वाटसरू भेटावा आणि त्याची थोडी ओळख व्हावी तशासारखाच स्त्रियांच्या व इतर बांधवांच्या आपल्याशीं येणाऱ्या संबंधाचा प्रकार आहे. या नातलगांचा कायमचा सहवास पूर्वीं कोणालाही मिळाला नाहीं. यांचा जसा आपणाला सहवास घडतो तशींच हीं आपणाला सोडूनही जातात. वाऱ्यानें चार ढग एकत्र जमावे व पुन्हां ते विसकटले जावे त्याचप्रमाणें काळाच्या प्रभावानें भूतमात्रांचा समागम व वियोग हीं घडतात. मनुष्य बलिष्ठ असो, वा दुर्बल

असो, लहान असो किंवा मोठा असो सर्व प्राणिमात्रांना म्हातारपण आणि मृत्यू हीं लांडग्याप्रमाणें खायला टपलेलीं आहेत. अशा प्रकारानें सर्व भूतें हीं नाशवंत आहेत व त्यांना व्यापून रहाणारा भूतात्मा हा नित्यरूप आहे हें समजल्यानंतर जन्माबद्दल हर्ष व मृत्यूबद्दल शोक हीं करण्यांत काय लाभ? आपण कोठून आलों, आपण कोण आहोंत, कुठें जाणार, आपण आहोंत कोठें, कोठें असूं, त्या गोष्टीचें निश्चित ज्ञान जर आपणाला नाहीं तर आपण कोणाचा आणि कशासाठीं शोक करावयाचा? तुझें जसें पुण्य किंवा पाप असेल त्याप्रमाणें तूं स्वर्गाला किंवा नरकाला जाशील. म्हणून श्रुतिनियमांचें उल्लंघन न करतां यज्ञ व दान ह्या कर्मांचें आचरण करावें हा एवढा म्हातारपण आणि मृत्यू यांनां जिंकण्याचा एकच मार्ग आहे. १२.–३.–३१९.

---

## अध्याय ३२० वा.

[ १ सुलभाजनकसंवाद. ]

( १ ) **युधिष्ठिर**:—हे कुरुश्रेष्ठा, गृहस्थाश्रमाचा त्याग न करतां परमपदाची प्राप्ति कोणाला झाली, व मोक्षतत्त्व म्हणजे काय, तें मला सांगा. सूक्ष्म लिंगदेह व प्रकट दिसणारा स्थूलदेह या दोन्हीं देहांत संन्यास कसा करितात व परमश्रेष्ठ मोक्ष म्हणजे काय तें हे पितामहा, आपण मला सांगा.

**भीष्म**:—या बाबतीमध्यें सुलभा आणि जनक यांच्यांतला एक संवाद जुना इतिहास म्हणून सांगत असतात तो मी तुला सांगतों, ऐक. पूर्वीं मिथिला देशामधल्या जनककुळामध्यें संन्यासाचें उत्तम प्रकारचें ज्ञान असलेला धर्मध्वज नांवाचा एक राजा होऊन गेला. त्यानें वेदविद्या, मोक्षशास्त्र व अर्थशास्त्र यांचा परिश्रमपूर्वक अभ्यास केलेला असून तो स्वतःच्या इंद्रियांचें आकलन करून या पृथ्वीचें राज्य करीत असे. त्या वेदवेत्त्या राजाच्या सदाचाराचा असा लौकिक ऐकून निरनिराळ्या ठिकाणचे दुसरे शहाणे शहाणे पुरुष त्याचा हेवा करीत. तो धर्मयुगाचा काळ होता; तेव्हां योगधर्माचें अनुष्ठान करणारी एक सुलभा नांवाची भिक्षुकी सर्व पृथ्वीवर संचार करीत हिंडत होती. तिनें सगळ्या पृथ्वीवर हिंडतां हिंडतां मिथिलेचा राजा जनक हा मोक्षशास्त्रांत प्रवीण आहे असें पुष्कळ संन्याशांच्या तोंडून ऐकलें होतें. हा त्याचा लौकिक ऐकून याच्यांत तथ्य कितपत आहे असा तिच्या मनांत संशय उत्पन्न झाला

आणि अशा या जनकाची गांठ घ्यावी अशी तिला इच्छा झाली; म्हणून योग-सामर्थ्याच्या बळावर तिनें तेथेंच आपलें पूर्वीचें रूप टाकलें आणि दुसरें सुंदर रूप धारण केलें. तिची गति एखाद्या चपल अश्वाच्या गतीप्रमाणें शीघ्र होती आणि ती कमलनयना डोळ्याचें पातें लवतें न लवतें तोंच विदेहाच्या नगरींत आली. अनेक लोकांनीं गजबजलेल्या त्या रम्य मिथिला नगरींत आल्यावर भिक्षा मागण्याच्या मिषानें तिनें मिथिलाधिपाचें दर्शन घेतलें. तिचें तें अत्यंत सुकुमार शरीर पाहून "ही कोण व कोठून आली" असा राजाच्या मनांत संशय येऊन तो आश्चर्यचकित झाला. नंतर त्यानें तिचें स्वागत केलें. तिला उच्चासनावर बसवून, पाद्यादिकांनीं तिची पूजा करून व उत्तम अन्न अर्पण करून तिला संतुष्ट केलें. भोजन झाल्यानंतर मंत्र्यासहवर्तमान बसलेल्या त्या राजाला सर्व शास्त्रज्ञांच्या सभेमध्यें त्या भिक्षुकीनें मोक्षधर्माच्या संबंधानें प्रश्न विचारावयास सुरवात केली. जनक स्वतः मुक्त स्थितीला पोंचला आहे किंवा नाहीं याबद्दल सुलभेच्या मनांत संशय असल्यानें इतरांना सोडून तिनें त्यालाच प्रश्न विचारले. तिला योगशास्त्राची चांगली माहिती असल्यानें त्या सामर्थ्याच्या बळावर तिनें स्वतःच्या बुद्धीनें जनकाच्या बुद्धितत्त्वांत प्रवेश केला. त्या सुलभेनें स्वतःच्या डोळ्यांतील किरणांनीं त्या जनकाच्या डोळ्यांतील किरणांचें नियंत्रण केलें. अशा-प्रकारें त्याला मोक्षधर्म विचारूं इच्छिणाऱ्या सुलभेनें त्याला प्रथम निरनिराळ्या योगबंधांनीं आत्मवश केलें. जनकराजालाही आपल्या योगसामर्थ्याबद्दल व अजिंक्यत्वाबद्दल अभिमान होताच. त्यानेंही आपल्या योगबलाचा प्रयोग तिजवर करून तिला जिंकलें. तेव्हां एका देहामध्यें अधिष्ठित झालेल्या त्या त्रिदंडांनीं वियुक्त अशा सुलभेचा व छत्रचामरें टाकलेल्या जनकाचा संवाद झाला तो मी तुला सांगतों, ऐक.

**जनकः**—भगवति, हा वेष आपण कोठें धारण केला? आपण कोणीकडे निघालां; आपण कोणाच्या कोण व कोठून आलांत? विद्या, वय व जाति या संबंधानें मनुष्यानें आपली आपली माहिती स्वतःच दिल्यावांचून त्यांचें खरें ज्ञान होत नाहीं. आपण माझी गांठ घेण्याकरितां येथपर्यंत आलां आहांत त्या अर्थीं ही माहिती आपण मला सांगा. माझ्याबद्दल म्हणाल तर छत्रादि राजचि-न्हांचा मोह मला नाहीं. मी त्यांपासून अलिप्त आहें. आपण सन्माननीय आहां अशी माझी समजूत आहे; म्हणून आपल्याबद्दल यथार्थ ज्ञान व्हावें असें मला वाटतें. दुसऱ्या कोणालाही सांगतां न येण्यासारखें हें मोक्षासंबंधाचें

उत्कृष्ट ज्ञान मी कोणापासून मिळविलें आणि मोक्षस्वरूप म्हणजे काय तें मी तुला सांगतों, ऐक. पराशर गोत्रामधील वृद्ध, तपस्वी व महात्मा पंचशिख याचा मी परमप्रिय शिष्य आहें. या ऋषीनें मला सांख्य, योग व राजनीति शिकविली. या त्रिविध मोक्षधर्मात मी पारंगत झालों असून त्यासंबंधाच्या माझ्या सर्व शंका फिटलेल्या आहेत. शास्त्रांत सांगितलेल्या विधीप्रमाणें हे पंचशिख ऋषी एकदां तीर्थाटन करीत असतांना पावसाळयाच्या चार महिन्याच्या मुक्कामांत मजजवळ सुखानें राहिले होते. आपल्या विषयांत निष्णात असलेल्या त्या सांख्यश्रेष्ठ मुनीनीं मला सांख्य, योग व अर्थशास्त्र असा त्रिविध मोक्षधर्म सांगितला व मला राज्यविन्मुखहि केलें नाहीं. अशा प्रकारें पंचशिखापासून मला ज्ञान मिळालें असल्यानें, त्यांनीं सांगितलेल्या सर्व त्रिविध मोक्षधर्माचें आचरण मी सर्व आसक्ति सोडून व एका परब्रह्मपदावरच दृष्टी ठेऊन करीत आहें. या मोक्षमार्गाचा परमश्रेष्ठ विधि म्हणजे वैराग्यधारण हा होय. ज्ञानापासूनच वैराग्य उत्पन्न होतें व त्यानेंच मोक्ष मिळतो. ज्ञान झाल्यानें मनुष्य परमपदप्राप्तीचा यत्न करतो व त्यामुळें त्याला आत्मज्ञान होतें. मनाच्या चंचलपणाचा नाश करणाऱ्या योगाभ्यासानें मनुष्याला आत्मज्ञान झालें म्हणजे तो सुखदुःखादि भावनांतून विमुक्त होऊन द्वंद्वातीत होतो. द्वंद्वातीत झाल्यानें त्याला जी सिद्धि प्राप्त होते त्या सिद्धीमुळें त्याला म्हातारपण आणि मृत्यू हीं जिंकतां येतात. या पृथ्वीवरच अनासक्त व निर्मोह रीतीनें वागून ही निर्द्वंद्वता—कीं जिला शुद्धबुद्धीची पराकाष्ठा असें म्हणतात—ती मीं मिळविली. शेत मऊ असलें आणि त्याला पाणी दिलेलें असलें म्हणजे त्यामध्यें बीं जसें अंकुर धरितें त्याप्रमाणें मनुष्याच्या कर्मालाहि फिरून अंकुर फुटतात. एखाद्या भांड्यांत—किंवा कशांतही—भाजून काढलेलें बीं त्याला अंकुर उत्पन्न होण्याची परिस्थिति निर्माण करून दिली असतांही अंकुर धरीत नाहीं. कारण त्यांतील बीजशक्ति नष्ट झालेली असते. त्याप्रमाणें या पंचशिख ऋषीनीं जें मला शिकविलें त्यामुळें माझी विषयासंबंधाची बुद्धि निर्बीज झालेली आहे आणि म्हणून तिला अंकुर फुटत नाहीं. शत्रुवधासारख्या किंवा विषयोपभोगासारख्या कोणत्याही गोष्टीबद्दल माझ्या मनांत आसक्ति उत्पन्न होत नाहीं याचें कारण यांच्या संबंधाचा मोह व द्वेष हीं दोन्हीही व्यर्थ आहेत याचें ज्ञान मला आहे हें होय. माझ्या उजव्या हाताला कोणी चंदनाची उटी लावली आणि त्याचवेळीं माझा डावा हात कोणी हत्यारानें कापून काढला

तरी तीं दोन्हीं मला सारखींच आहेत. याप्रमाणें मला जें मिळवावयाचें तें मीं मिळविलें आहे. मातीचीं ढेकळें, दगड आणि सोनें ह्या तीहींचीहि किंमत मला सारखीच आहे आणि म्हणून मीं अनासक्त रीतीनें राज्यावर बसतों आणि इतर संन्याशापेक्षां माझ्यामध्यें कांहीं विशेष आहे असें दाखवितों. मोक्षधर्माचें ज्ञान असलेले दुसरे ज्ञानी पुरुष ज्ञान, उपासना व कर्म या तिहींचें आचरण ही एक, ज्ञानाची उपासना ही दुसरी व सांख्ययोगात्मक ही तिसरी अशा तीन प्रकारच्या मोक्षनिष्ठा सांगत असतात. कांहीं मोक्षधर्मज्ञ लोक सर्वकर्मसंन्यासपूर्वक एक ज्ञानाचीच उपासना हा मोक्षमार्ग होय असें समजतात तर दुसरे कांहीं सूक्ष्म ज्ञान असलेले मुनि कर्मांची निष्ठा हाच मोक्ष-मार्ग होय असें म्हणतात. केवळ ज्ञान किंवा केवळ कर्म या दोन्ही निष्ठा बाजूला ठेऊन आमच्या पंचशिख ऋषीनीं मला तिसरीच एक निष्ठा सांगितली आहे. यमनियमादिकांचें आचरण केल्यानें गृहस्थाश्रमांतही संन्यास घडतो व काम, द्वेष, विषयोपभोग, गर्व, दंभ आणि आसक्ति यांनीं व्यापलेला संन्या-शीही गृहस्थाश्रमी ठरतो. त्रिदंडादिक धारण केल्यानंतर ज्ञानानें मोक्ष घडतो असें जर आहे तर तो छत्रादिक धारण केल्यावरही कां न घडावा? कारण मोक्षाचें कारण ज्ञान हें दोन्हीकडे सारखेंच आहे. ज्याला ज्या वेळेला ज्या गोष्टीची गरज लागते त्या वेळेला तो ती ती गोष्ट स्वार्थासाठीं अंगीकारीत असतो. म्हणून कारणपरत्वें त्रिदंड किंवा राज्यछत्र यांचा परिग्रह करण्यांत कांहीं विशेष आहे असें नाहीं. ज्या ज्ञानानें मोक्षप्राप्ति व्हावयाची तें स्थिररूप असलें म्हणजे त्रिदंड आणि छत्र हीं दोन्हीं सारखींच. गृहस्थाश्रमामध्यें दोष आहेत असें वाटून जो दुसरा आश्रम पत्करतो तोहि संगापासून विमुक्त होतो असें नाहीं. कारण एक गोष्ट टाकून दुसरी घेणें हा प्रकार तेथेंही आहे. एखाद्या-वर अनुग्रह करणें किंवा दुसऱ्या एखाद्यावर रोष करणें यामुळें जी एक प्रकारची सत्ता हातीं येते ती राजा आणि संन्याशी या दोघांनाही सारखीच आहे. मग राजा आणि संन्यासी हे दोन्ही सारखेच असतांना संन्याशाला मिळणारा मोक्ष राजाला कां मिळूं नये? निग्रहानुग्रहाची सत्ता हातीं असली काय किंवा नसली काय, एका परमपदाच्या ठिकाणीं लक्ष ठेविलें म्हणजे मनुष्याला सर्व पापांतून विमुक्त होतां येतें. भगवीं वस्त्रें धारण करणें, मुंडण करणें, त्रिदंड धारण करणें, कमंडलू हातामध्यें घेणें, हीं नुसतीं बाह्यचिह्नें असून यांच्यापासून मोक्ष मिळत नाहीं व ज्ञान हें एकटेंच आपल्याला दुःखांतून सोडवितें असें जर आहे

तर नुसतीं संन्यास-चिह्नें धारण करणें हें निरर्थक होय. आतां त्रिदंडादि बाह्य-चिह्नांनीं दुःख कमी होतें असें मानून तीं चिह्नें धारण करावयाचीं म्हटलें तर तोच न्याय छत्रचामरादिकांना कां लावूं नये? मोक्ष दारिद्र्यांत नाहीं व श्रीमंती मोक्षाला आडवी येते असेंही पण नाहीं. श्रीमंतींत काय किंवा गरीबींत काय मनुष्यप्राणी ज्ञानानेंच मुक्त होतो. म्हणून बंधनाला कारणीभूत होणारे धर्म, अर्थ, काम हे पुरुषार्थ व राज्यस्वीकार यांत जरी मी तुला पडलेला दिसत आहें तरी वस्तुतः मी बंधरहित अशा परमपदाच्या ठिकाणींच रत आहें. आसक्तीच्या पाशांनीं बांधून टाकणारा हा राज्य आणि ऐश्वर्य यांचा पाश, मी मोक्षरूपी दगडावर घांसून तीक्ष्ण केलेल्या त्यागरूपी तरवारीनें तोडून टाकला आहेत अशा प्रकारें हे भिक्षुकी, मी विमुक्त आहें. मला तुझ्याबद्दल प्रथमतःच थोडीशी आस्था वाटली; पण आतां हें जें रुप तूं धारण केलें आहेस हें तुझ्या योगज्ञानाला शोभणारें नाहीं. कसें तें सांगतों, ऐक. तुझा सुकुमारपणा, लावण्य, शरीरयष्टि व कोंवळें वय हीं पाहिलीं म्हणजे यां सर्वांशीं विरुद्ध असलेलें असलें हें तपश्चर्येचें व्रत तूं कसें घेतलेंस याचा मला संशय येतो. तुझें वर्तन तुझ्या ह्या वेषाला शोभणारें नाहीं. मी मुक्त आहें किंवा नाहीं अशी माझी परिक्षा पाहाण्यासाठीं तूं माझ्या शरीरामध्यें दांडगाईनें प्रवेश केलास. तुझ्यासारख्या वासनाधीन झालेल्या योगिनीला हें शोभणारें नाहीं. संन्याशाचें चिह्न जो त्रिदंड तो तुझ्या हातांत शोभत नाहीं. संन्यासाश्रम तुझ्याकडून बरोबर पाळला जात नाहीं. माझ्या शरीरांत प्रवेश करून तूं काय काय केलें आहेस तें ऐक. तूं आपल्या सामर्थ्यानें माझ्या शरीरांत प्रवेश केला आहेस, कोणच्या कारणास्तव तूं माझ्या देशांत आणि या गांवांत आलीस? असा तुझा माझा कोणता संकेत झाला होता म्हणून तूं माझ्या हृदयांत शिरलीस? सर्व वर्णांमध्यें श्रेष्ठ असणाऱ्या ब्राह्मणवर्णांत तूं जन्माला आली आहेस आणि मी क्षत्रिय आहें. तेव्हां आपला संयोग शास्त्राला संमत नाहीं, म्हणून तूं वर्णसंकर करूं नको. शिवाय तूं मोक्षधर्मानें वागणारी आहेस व मी गृहस्थाश्रमी आहें. तेव्हां संन्यासाश्रमांतून गृहस्थाश्रमांत येणें हा एक प्रकारचा कष्टप्रद आश्रमसंकर तूं करीत आहेस. शिवाय तूं आणि मी सगोत्र आहोंत कीं भिन्नगोत्री आहोंत हें तुलाही माहीत नाहीं आणि मलाही माहीत नाहीं. अशा स्थितींत यदाकदाचित् आपण सगोत्र असलों तर माझ्या शरिरांत प्रवेश करण्यानें गोत्रसंकराचा तिसरा अपराध तुझ्या हातून घडला आहे. तुझा नवरा

जिवंत असेल, किंवा कोठें परागंदा झाला असेल; तर अशा स्थितींत तूं माझ्या शरी-रांत घुसणें म्हणजे माझ्या हातून परदारागमन करविणें होय. हा तुझ्या हातून घड-लेला धर्मसंकराचा चौथा अपराध आहे. या सगळ्या करूं नयेत त्या गोष्टी ज्या तूं केल्यास त्या कांहीं हेतु पोटांत धरून केल्यास कां अज्ञानानें केल्यास, कां गैर-समजानें केल्यास? अथवा तुला विचारता पुसता कोणी नाहीं म्हणून तुझ्या हातून या गोष्टी घडल्या? 'न स्त्री स्वातंत्र्यमर्हति' या शास्त्रवचनाचें उल्लंघन तुझ्या हातून घडलें असल्यामुळें तुझें सर्व ज्ञान फुकट गेलें. माझ्या शरीरांत प्रवेश करण्यानें तुझ्या व माझ्या भावनांचें आणि अंतःकरणाचें ऐक्य व्हावें अशी तुझी इच्छा असल्यास तीहि आतां सफल होणारी नाहीं. कारण तुझ्या हातून माझ्याशीं वाद घालतांना बाहेर आलेलें असें दुष्ट स्त्रीचें तिसरें लक्षण हें कीं, तूं जय मिळ-विण्याच्या इच्छेनें केवळ माझ्यावर हल्ला चढविलास असें नव्हे तर ही जी माझ्या भोंवतालची सगळी सभा आहे तिलाहि जिंकण्याची तुझी इच्छा दिसते. माझ्या पक्षाचा पराभव व्हावा व आपल्या पक्षाची सरशी व्हावी या हेतूनें तूं या पूज्य लोकांच्याकडे क्रोधानें पहात आहेस. तूं क्रोधानें व्याप्त झाल्यामुळें व तुझ्या सामर्थ्याच्या बळाचा तुला गर्व झाल्यानें तूं नाना प्रकारच्या योगसिद्धि उत्पन्न करीत आहेस व त्यांच्या बळावर दुसऱ्याच्या बुद्धीचा व आपल्या बुद्धीचा संबंध घडवून आणीत आहेस. ही तुझी कृति विष आणि अमृत एकत्र करण्यासारखी होय. स्त्रीला तिला हव्या असलेल्या पुरुषाचा लाभ होणें व पुरुषाला त्याला हव्या असलेल्या स्त्रीचा लाभ होणें ही गोष्ट खरोखर अमृतासारखी होय. माझ्यावर प्रेम करण्याच्या इच्छेनें या ठिकाणीं तूं आलीस पण तुजवर प्रेम करणारा पुरुष तुला भेटला नाहीं. (कारण माझें तुजवर प्रेम नाहीं) अशा तऱ्हेनें एकमेकांविषयीं उदासीन असलेल्या स्त्रीपुरुषांचा संबंध हा विषासारखा होतो. तूं जें संन्यास-व्रत घेतलेंस तें नीट समजून घे, त्याचा त्याग करूं नको व त्याचे नियम जे आहेत ते यथाशिस्त पाळ. "हा मुक्त आहे कीं नाहीं" अशी माझी परीक्षा करण्याची बुद्धि तूं धरिलीस ही गोष्ट तूं आपल्याकडून कितीहि गुप्त ठेवण्याचा प्रयत्न केलास तरी तूं ती माझ्यापुढें गुप्त ठेवूं शकणार नाहींस. तुझें कार्य साध-ण्याच्या इच्छेनें तूं वेषांतर करून दुसऱ्या एखाद्या राजाकडे गेली असतीस तर त्याच्यापासून तुला आपला हेतु गुप्त ठेवितां आला असता; पण माझ्यापासून हा हेतु तुला गुप्त ठेवितां येणार नाहीं. राजा, ब्राह्मण व स्त्रियांना अनुरूप अशा गुणांनीं युक्त असलेल्या स्त्रिया यांच्याकडे जातांना कपटबुद्धीनें केव्हांहि जाऊं नये.

कारण हीं कपटबुद्धीनें येणाराचा नाश करितात. ऐश्वर्य हें राजाचें बळ होय. ब्राम्हणाचें सामर्थ्य ब्रह्मोपासनेमध्यें असतें व रूप, तारुण्य आणि सौभाग्य हें स्त्रियांचें बळ होय. तेव्हां ज्याला आपला कांहीं हेतू साधण्याचा असेल त्यानें वर सांगितलेल्या प्रकारच्या सामर्थ्यावरच अधिष्ठित असलेले राजे, ब्राम्हण आणि स्त्रिया यांच्याकडे नेहमीं सरळ बुद्धीनेंच जावें, यांच्याशीं खोटी बुद्धि धरिली तर ती विनाशालाच कारणीभूत होते. तेव्हां तूं तुझी जात, विद्या, चारित्र्य, भाव, स्वभाव व इथें येण्याचा तुझा हेतु या सगळ्या गोष्टींची माहिती मला सांग.

भीष्मः—अशा प्रकारच्या दुःखकारक, परस्परविरोधी व असमंजस वाक्यांनीं जनक राजानें जरी तिचा धिक्कार केला तरीही सुलभा यत्किंचितही भ्याली नाहीं. राजाचें भाषण झाल्यावर त्या रूपसुंदर सुलभेनें आपल्या रूपापेक्षांही सुंदर असें भाषण करण्यास सुरवात केली.

सुलभाः—राजा, आतांपर्यंत तूं मोठें लांबलचक भाषण केलेंस; पण भाषण म्हणजे काय आणि तें कसें करावें हें तुला माहीत नाहीं असें दिसतें. नऊ प्रकारचे वाग्दोष व तितकेच बुद्धिदोष हे ज्याच्यामध्यें नाहींत व जें अर्थयुक्त असून अठरा गुणांनीं युक्त असतें आणि ज्यांत सौक्ष्म्य, सांख्य, क्रम, निर्णय व प्रयोजन या पांच गोष्टी एकत्र असतात त्याला, हे राजा, शहाणे लोक वाक्य किंवा भाषण असें म्हणतात. हे जे पांच सौक्ष्म्यादि अर्थ तुला सांगितले ह्यांचें एकेकाचें निरनिराळें लक्षण पदाच्या दृष्टीनें व वाक्याच्या दृष्टीनें, पदार्थांच्या दृष्टीनें व वाक्यार्थांच्या दृष्टीनें मीं तुला सांगतें, तें ऐक. डोळयांपुढें असलेल्या वाक्यांत ज्यावेळीं अनेक अर्थ संभवतात व त्यावरून निरनिराळीं अनुमानें निघतात, त्यावेळीं हा अर्थ खरा कीं तो अर्थ खरा असा संशय उत्पन्न होऊन बुद्धीला वाक्यार्थाचा निश्चय करितां येत नाहीं. हा जो वाक्याचा दुर्बोधपणा त्याला सौक्ष्म्य असें म्हणतात. कोणत्याही वाक्यामधील सिद्धांतामध्यें दोन्ही बाजूंच्या गुणदोषाचें जें परिगणन त्याला संख्या असें म्हणतात. जें बोलावयाचें असेल त्यामधील हें आधीं बोलावें हें मग सांगावें असा जो अनुक्रम त्याला भाषणाचें शास्त्र जाणणारे पुरुष क्रम असें म्हणतात. धर्म, काम, अर्थ व मोक्ष ह्या चारी पुरुषार्थांमध्यें आपल्या सिद्धांताचा भाषणारंभीं साभिप्राय उच्चार करून भाषण संपल्यावर 'हें तें' असा त्याचाच पुनरुच्चार करणें याला विनिर्णय असें म्हणतात. इच्छा किंवा द्वेष ह्यामुळें उत्पन्न होणाऱ्या सुखदुःखामुळें अमुक एक गोष्ट करावी किंवा अमुक एक टाळावी अशी जी मनुष्याची प्रवृत्ति होते तिला, हे राजा,

प्रयोजन असें म्हणतात. आतां ज्या सौक्ष्म्यादिकांचीं लक्षणें मी तुला सांगितलीं, तीं ज्या वाक्यामध्यें एकत्र आहेत असलें माझें वाक्य तूं ऐक.

मीं जें वाक्य आतां सांगणार आहें तें अर्थयुक्त असेल, त्यांत भिन्न भिन्न अर्थ संभवणार नाहींत, तें न्यायाला धरून असेल, वाजवीपेक्षां लांब असणार नाहीं, कोमल असेल आणि त्यांत संदिग्धता असणार नाहीं. असलें भाषण मी आतां करणार आहें. तें कठोर अक्षरांनीं भरलेलें असणार नाहीं, तसेंच केवळ सामान्य जनांचेंच मनोरंजन करण्याइतकें ग्राम्यहि असणार नाहीं. तें खोटें असणार नाहीं, धर्मशास्त्र, अर्थशास्त्र व कामशास्त्र यांच्याशीं विरुद्ध असणार नाहीं किंवा प्राकृत भाषेंतहि असणार नाहीं. माझें भाषण अपुरें असणार नाहीं, त्यामध्यें छंद, व्याकरण इत्यादिसंबंधाचे दोष असणार नाहींत, तें उदार असेल, त्यांतील शब्द सहज आलेले असे असतील. मी मला सांगावयाची असणारी कोणतीहि गोष्ट, श्रोत्यांच्या तर्कशक्तीवर सोडून न देतां माझी मीच स्पष्टपणानें सांगेन. मी कोणतीहि गोष्ट निष्कारण किंवा युक्तीजुक्तीला सोडून सांगणार नाहीं. काम, क्रोध, भय, लोभ, दैन्य, गर्व, लज्जा, दया आणि मान हे नऊ बुद्धिदोष माझ्या बोलण्यांत तुला आढळणार नाहींत. हे राजा, कोणत्याहि सिद्धांताच्या बाबतींत, तो सिद्धांत सांगणारा वक्ता, ऐकणारा श्रोता व ज्या वाक्यांनीं तो सिद्धांत सांगितला जातो तीं वाक्यें हीं तीन्ही ज्या वेळेला सारखींच निर्दोष असतात त्या वेळेला त्या सिद्धांताचा पूर्णपणें बोध होतो. एखादी गोष्ट सांगतांना वक्ता श्रोत्यांच्या मताला न जुमानतां आपलाच वाक्यार्थ त्याच्यावर लादूं पहातो त्या वेळेला त्या वाक्याचा खरा उत्कृष्ट अर्थ प्रगट होत नाहीं. याच्या उलट जर एखादा वक्ता स्वतःचें मत अजिबात टाकून देऊन दुसऱ्याला खूष करण्यासाठीं त्याच्यासारखें बोलूं लागेल तर त्याच्या भाषणामध्यें भ्रामकपणासारखे दोष उत्पन्न होतात, तेव्हां असलीं वाक्येंहि दोषयुक्तच होत. जो वक्ता स्वतःच्या आणि श्रोत्यांच्या मतांना योग्य तो मान देऊन बोलूं शकतो तोच वक्ता होय. इतरांना वक्ता हा शब्दच लागूं पडत नाहीं. तेव्हां, हे राजा, मी आतां यापुढें अर्थपूर्ण असें जें भाषण करीन तें तूं एकचित्तानें ऐक.

ज्याप्रमाणें लाख आणि लांकूड किंवा धुळकण आणि पाण्याचे थेंब हे एकमेकांशीं संयुक्त असतात, तशाच तऱ्हेची प्राण्यांच्या उत्पत्तीची गोष्ट आहे. शब्द, स्पर्श, रस, रूप, गंध व पंच ज्ञानेंद्रियें हीं वस्तुतः एकमेकांपासून भिन्नरूप असतांना, लाख आणि लांकूड यांच्याप्रमाणें यांचा पंचमहाभूतांमध्यें मिलाफ होऊं शकतो.

या पंच विषयांमध्यें किंवा इंद्रियांमध्यें स्वतःची अशी प्रेरक शक्ति कोण-चीहि असत नाहीं, यांना विषयांचा अनुभव दुसऱ्यांनीं दिल्यावांचून घेतां येत नाहीं हें निश्चित समज. या पंचेंद्रियांपैकीं कोणत्याहि इंद्रियाला स्वतःचें अगर दुसऱ्याचें ज्ञान असत नाहीं. डोळ्याला आपला डोळेपणा म्हणजे काय हें समजत नाहीं व कानांनाहि आपलें स्वरूप नीटपणानें ओळखतां येत नाहीं. तसेंच या पंचेंद्रियांपैकीं कोणालाहि एकाला दुसऱ्या इंद्रियाचें काम करतां येत नाहीं व त्या दुसऱ्या इंद्रियांना याचें काम करतां येत नाहीं. पाणी आणि माती यांच्याप्रमाणें पंचेंद्रियांचा एकत्र संयोग झाला तरी त्यापासून त्यांना कांहीं अधिक फलप्राप्ति होत नाहीं. हीं इंद्रियें दुसऱ्या बाह्यगुणांच्या साधनावांचून कांहींहि करूं शकत नाहींत, आणि हे बाह्य गुण म्हणजे दृष्टीपुरतें बोलावयाचें तर रूप, चक्षु आणि प्रकाश हे होत. हे जसे डोळ्याचे झाले तसेच इतर इंद्रियें व त्यांचे ज्ञेय विषय यांचेहि निरनिराळे हेतु आहेत. पंचेंद्रियें व त्यांचे ज्ञेय विषय यांच्याखेरीज मन म्हणून एक अकरावा गुण आहे. या मनाच्या सहाय्यानें ज्ञात्याला बऱ्यावाईटचा निर्णय करितां येतो. बुद्धि हा बारावा गुण म्हणून समजला जातो. कोणत्याहि गोष्टीच्या स्वरूपाविषयीं संशय उत्पन्न झाला म्हणजे ती गोष्ट अमुकच स्वरू-पाची आहे असें निश्चितपणें सांगणें हें बुद्धीचें कार्य होय. या बाराव्या बुद्धिगु-णाच्या पलीकडचा सत्त्व म्हणून एक तेरावा गुण आहे. याच्या योगानें प्राणी हा महासत्त्व कीं अल्पसत्त्व याचें अनुमान बांधतां येतें. सत्त्वापलीकडचा चौदावा गुण अहंकार हा होय. या गुणाचा धर्म म्हटला म्हणजे याच्या योगानें 'अमुक एक माझें,' 'अमुक माझें नव्हे,' 'मी याचा कर्ता' इत्यादि भावना उत्पन्न होतात.

हे राजा, याच्या पलीकडचा पंधरावा गुण म्हणजे वासना हा होय. प्राण, श्रद्धा, आकाश, वायु, तेज, आप, पृथ्वी, इंद्रियें, मन, अन्न, वीर्य, तप, मंत्र, कर्म, लोक व नाम या सोळा कलांनीं जगत् हें युक्त आहे असें शास्त्रवेत्ते म्हणतात. हें जगत् वासनेमुळें निर्माण होतें. वासना हा पंधरावा गुण. अविद्या हा त्याही पलीकडला सोळावा गुण होय. सत्त्वरजादि त्रिगुणांचा संघात म्हणजेच अविद्या. ह्या अवि-द्येच्या ठिकाणीं जगदुपादानभूत माया व व्यक्ति हे दोन गुण आहेत. म्हणजे एकंदर गुण अठरा झाले. याच्या पलीकडचा एकोणिसावा गुण म्हणजे सुख-दुःख, जन्म-मरण, लाभ-हानि, प्रियाप्रिय, अशीं जीं निरनिराळीं द्वंद्वें आहेत त्यांचा योग हा होय. या एकोणिसांच्या पलीकडचा काल हा विसावा गुण होय. या

वीस गुणांच्या योगानें प्राणिमात्रांची उत्पत्ति व क्षय हीं होत असतात, असें समज. वीस गुणांचा हा गट, पंचमहाभूतें व अस्तित्व आणि नास्तित्व हे दोन गुण असे मिळून एकंदर सत्तावीस गुण होतात. याशिवाय विधि म्हणजे वासनेला कारणीभूत होणारें पापपुण्य, शुक्र म्हणजे वासना जागी करणारे संस्कार, बल म्हणजे इच्छिलेली वस्तू मिळविण्याकरितां केलेली धडपड, असे तीन निराळे गुण आहेत. तेव्हां वीस आणि दहा अशी मिळून या गुणांची संख्या तीस होते. हे तीस गुण सर्व ज्या ठिकाणीं एकत्र असतात त्याला शरीर असें म्हणतात. या तीस कलांचें उपादान कारण अव्यक्त प्रधान असें निरीश्वर सांख्य समजतात, तर व्यक्त परमाणु किंवा अव्यक्त काल, अदृष्ट, ईश्वर इत्यादिक आहेत असें कणादादि स्थूलदृष्टीचे लोक समजतात. नुसतें अव्यक्त, नुसतें व्यक्त, व्यक्ताव्यक्तांची जोडी व माया, ईश्वर, जीव आणि अविद्या हें चतुष्टय अशीं या तीस कलांचीं चार उपादान कारणें मानणारे चार पक्ष आहेत. हे पक्षोपपक्ष कांहीं म्हणोत, खरे अध्यात्मचिंतक प्रकृतीलाच जगाचें उपादान कारण मानतात; कारण सर्व कलांचें अधिष्ठान तीच आहे. जग प्रकृतीपासून उत्पन्न होतें असें ठरल्यानंतर पुढच्या तपशीलामध्यें अधिक खोल शिरण्यांत अर्थ नाहीं. वर सांगितलेल्या तीस कलांच्यामुळें प्रगट होणारी जी अव्यक्त प्रकृति ही वाचा आणि मन यांच्या पलीकडची आहे व ती प्रकृति म्हणजेच, हे राजेंद्रा, तुझें, माझें व इतर सर्व प्राणिमात्रांचें स्वरूप होय. सारांश, तूं आणि मी अव्यक्तप्रकृतिरूप आहोंत.

हे राजा, मातेच्या उदरांत गर्भाचें आधान झाल्यापासून मनुष्याच्या ज्या निरनिराळ्या अवस्था होतात त्या सर्व पुरुषाचें वीर्य व स्त्रीचें रज यांच्या संयोगानें होतात. स्त्रीच्या रजामध्यें पुरुषाचा वीर्यबिंदु स्थिरावला म्हणजे त्याला कललावस्था असें म्हणतात. कललावस्थेंतील या शुक्रशोणितांपासून एक बुडबुडा निर्माण होतो. या बुडबुड्यापासून पेशी निर्माण होते. पेशीपासून निरनिराळे अवयव व निरनिराळ्या अवयवांतून नखें व केस निर्माण होतात. नऊ मास पूर्ण होऊन प्राणी जन्माला आला म्हणजे त्याच्या ठिकाणच्या चिन्हांवरून तो स्त्री किंवा पुरुष हें ठरतें व त्याला नामरूप प्राप्त होतें. तांबडीं नखें व कोंवळीं बोटें असलेलें तें रूप कांहीं काळानें नाहींसें होऊन प्राण्याला कुमारावस्था येते. कौमारावस्थेंतून तारुण्यावस्था व तारुण्यांतून वृद्धावस्था येते. याचप्रमाणें प्राण्याला निरनिराळ्या अवस्था प्राप्त होतात, व एकेक अवस्था प्राप्त झाली

असतांना मागची मागची अवस्था नष्ट होते. हें शरीर कलांचें बनलें आहे, असें पूर्वीं सांगितलें. या कलांच्यामध्यें सर्व प्राण्यांच्या ठिकाणीं क्षणाक्षणाला फरक होत जातो; पण हा फरक अत्यंत सूक्ष्मरूपानें होत असल्यामुळें आपल्या प्रत्ययास येत नाहीं. ह्या कलांचें एक रूप संपतें केव्हां व दुसरें उत्पन्न होतें केव्हां हें ध्यानांत येत नाहीं. दिव्याची ज्योत निरनिराळ्या अवस्थांमधून जात असतांना तिच्या रूपांत पालट झालेला जसा समजत नाहीं तशीच याची गति आहे. या क्षणाचें श्रेय त्या क्षणाला नाहीं अशी खरोखर शरीराची स्थिति आहे. तेव्हां आपण कोण, कोणाचे असल्या प्रश्नांची उपपत्तीच लागूं शकत नाहीं. जलद धावणारा चपळ घोडा हा जसा अस्थिर तसेच प्राणिमात्र हे अस्थिर होत. तेव्हां कोण कोठून आला अगर न आला, हें सर्व कोणाचें, कोठून आलें हे सर्व प्रश्न असमंजसपणाचे ठरतात. सूर्यापासून किंवा काष्ठांच्या मंथनापासून जसा अग्नि निर्माण होतो त्याप्रमाणें या तीस कलांच्या संयोगानें मनुष्यप्राणी जन्मास येतो. तुझें स्वतःचें रूप स्वतःच्या ठिकाणीं यथार्थतेनें पहाण्याची तुझ्या अंगीं योग्यता असेल तर तुझ्या ठिकाणीं स्थित असलेलें तुझेंच रूप तुझें तुला जसें दिसतें तसेंच तें दुसऱ्याच्या ठिकाणीं तुला कां दिसूं नये? सर्वत्र एकच परमात्मरूप भरलेलें आहे असा प्रत्यय तुला कां येऊं नये? सर्वांच्या ठिकाणीं सारख्या बुद्धीनें पाहाण्याची योग्यता तुझ्या अंगीं असेल तर 'मी कोण?' 'कोणाची?' असे प्रश्न तूं मला कां विचारतोस? राजा, जो द्वंद्वातीत झाला त्याला 'हें मला असावें' 'हें नसावें' इत्यादि वासनांची किंवा 'तूं कोण'? 'कोणाची?' 'कोठून आलीस'? इत्यादि प्रश्नांची काय जरूर आहे? शत्रु, मित्र व उदासीन यांच्याशीं त्यांना योग्य अशा रीतीनें जो वागतो व विजय प्राप्त झाला असतांना, तहाचे वेळीं अगर युद्धाच्या काळीं जो त्या त्या वेळेला योग्य असें वागतो त्याला मुक्त कसें म्हणावें? धम, अर्थ व काम या त्रिवर्गांच्या ठिकाणीं ज्याची आसक्ति कायम आहे व प्रत्येक कर्माच्या ठिकाणीं सात प्रकारांनीं प्रगट होणाऱ्या या तीन्ही पुरुषार्थांचें वास्तविक ज्ञान ज्याला नाहीं त्याला मुक्त कसें म्हणावें? प्राणी आपला आवडता असो किंवा नावडता असो, दुर्बल असो वा बलवान् असो सर्वांशीं समदृष्टीनें ज्याला वागतां येत नाहीं त्याला सर्वांशीं मुक्त कसें म्हणावें? हे राजा, तुझ्या अंगीं अद्याप योगसामर्थ्य आलेलें नाहीं तेव्हां पथ्य न संभाळणाराला औषध जसें व्यर्थ तसा तुला मोक्ष व्यर्थ आहे. तुला झालेला हा मोक्षासंबंधाचा अभिमान तुझ्या मित्रांनीं झाडून टाकावयास हवा, तुझ्या अंगीं जडूं देतां कामा

नये. हे अरिंदमा, मनुष्याला मोह पाडणारीं जीं जीं स्थानें जगांत आहेत तीं तीं सर्व आपल्याच ठिकाणीं वास करतात असें अंतर्दृष्टीनें पहाणें हेंच मुक्ताचें लक्षण होय.

मोक्षाच्या आड येणारीं अशीं दुसरीं कांहीं सूक्ष्म संगाचीं स्थानें मी सांगतें तीं मजपासून ऐकून घे. हीं संगस्थानें शयन, उपभोग, भोजन व आच्छादन या चार गोष्टींना प्रवृत्त करणारीं आहेत. तूं आपल्याला राजा म्हणवितोस व पृथ्वीचें एकछत्री राज्य आपण करतों असा तुला गर्व आहे, पण तुझी वस्ति त्या पृथ्वींतल्या एकाच गांवांत आहे आणि त्या गांवांतसुद्धां एका घरांतच आहे. तें घरसुद्धां सगळें तुझ्या वांट्याला येत नाहीं तर रात्रीं तूं ज्याच्यावर झोंपतोस तेवढी एक शय्याच तुझी. त्या शय्येंतसुद्धां अर्धी शय्या तुझ्या स्त्रीच्या मालकीची आहे. मग तूं जें पृथ्वीचें एकछत्री राज्य माझें म्हणून म्हणतोस त्यांतील कितीसा भाग तुला उपभोगावयास सांपडतो याचा तुझा तूंच विचार कर. उपभोग, भोजन, आच्छादन इत्यादि मर्यादित स्वरूपाचे असे जे क्षुद्र विषय त्यांचा त्याग किंवा स्वीकार करण्याचे बाबतींत राजा हा नेहमींचाच परतंत्र आहे; मग, एकाद्याशीं तह करणें, किंवा लढाई करणें या बाबतींत राजाला स्वतंत्रता कोठून? स्त्रियांच्या बाबतींत विषयोपभोगासंबंधानें जर राजा इतका परतंत्र तर प्रधानमंडळाशीं एकादी सल्ला-मसलत करण्याचे बाबतींत त्याला स्वतंत्रता कोठून येईल? दुसऱ्याला आज्ञा करून त्यांच्याकडून राजा कार्य करून घेतो म्हणून तो स्वतंत्र म्हणावा, तर नोकर-लोक ज्या क्षणीं जसें कार्य करतील तसें त्याला करून घ्यावें लागतें, म्हणून याहि बाबतींत तो परतंत्रच होय. अमुक वेळेला आपण झोंप घेऊं असें राजानें मनांत आणिलें तर, स्वतःचीं कामें करून घ्यावयाला आलेलीं माणसें हें झोंप घेण्याचें स्वातंत्र्यसुद्धां त्याला लाभूं देत नाहींत. ‘महाराजांनीं आतां झोंपावें’ ‘आतां उठावें’ असें लोकांनीं सांगितल्यानंतर राजाला झोंप घेतां येते व उठतां येतें. ‘आतां स्नान करा, पाणी प्या, अग्नींत आहुति टाका, यज्ञ करा, बोला, ऐका,’ अशा तऱ्हेनें लोकांनीं राजाला त्या त्या गोष्टी सांगाव्या लागतात. या राजाकडे द्रव्याची याचना करण्यासाठीं अनेक लोक नेहमीं धांव घेत असतात, पण, याला आपल्या खजिन्याचें रक्षण करावयाचें असल्यानें येईल त्या याचकाला हा द्रव्य देऊं शकत नाहीं. दान द्यावें तर खजिना रिकामा पडतो व दान न द्यावें तर लोकांशीं वैर जोडल्यासारखें होतें. या राज्यामध्यें वैराग्य उत्पन्न करणारे असे अनेक दोष आहेत. चार शहाणीं माणसें, चार शूर माणसें

किंवा चार धनवान् माणसें नुसतीं एकत्र जमलीं तरी सुद्धां राजाला त्यांचा संशय येतो आणि ज्या आपल्या नोकरांचें भय बाळगूं नये त्यांची सुद्धां राजाला भीति वाटते. हे राजा, जीं जीं माणसें तुला आतां मीं सांगितलीं त्यांच्या ठिकाणींहि पण निरनिराळे दोष उत्पन्न होतात आणि त्यांच्यापासून राजाला भय उत्पन्न होतें. कारण एकानें अविश्वास दाखविला म्हणजे दुसऱ्याला अविश्वास दाखवावासा वाटतो व त्यामुळें परस्परांचा एकमेकांविषयींचा संशय वाढतो. जो तो आपापल्या घरचा राजा आहे. आणि आपापल्या घरामध्यें स्वतंत्रपणानें निग्रहानुग्रह करण्याची सत्ता ज्याला त्याला आहे. या दृष्टीनें राजा आणि इतर गृहस्थ हे सारखेच. मुलेंबाळें, स्त्रिया, द्रव्यनिधि हे ज्या ज्या कारणाकरितां राजा जोडतो, त्याच कारणाकरितां सामान्य मनुष्यहि जोडतो. या सर्व गोष्टी राजा आणि सामान्य मनुष्य यांना एकाच गोष्टीसाठीं हव्याशा वाटतात. 'माझा देश गेला,' 'गांव जळाला,' 'माझ्या मर्जीतला प्रधान किंवा आवडता हत्ती मेला,' असें म्हणून खोट्या अज्ञानानें राजाहि पण सामान्य लोकांप्रमाणें दुःख करतो. याच्या मनांतली इच्छा, द्वेष आणि भय यामुळें उत्पन्न झालेलीं दुःखें नाहींशीं होत नाहींत. हा राजा मस्तकशूलासारख्या रोगांनीं, तसेंच सुखदुःखादि द्वंद्वांनीं नेहमींच मारलेला असतो. याला सर्व ठिकाणीं संशयित दृष्टीनें पहाण्याची संवय लागलेली असते व रात्रीमागें रात्र मोजीत हा राजा अनेक विघ्नांनीं भरलेलें आपलें राज्य उपभोगीत असतो. तेव्हां ज्यामध्यें सुख अत्यल्प, दुःख फार व सार कांहीं नाहीं, जें गवताच्या काड्या जाळल्याप्रमाणें निष्फळ अशा फेंसाच्या बुडबुड्यासारख्या राज्याची इच्छा कोण धरील व असलें राज्य आपणाला मिळालें म्हणून कोणास शांतता वाटेल ? तूं जें आपलें आपलें म्हणून म्हणतोस तें हें गांव, तो हा देश कोणाचा ? हे राजा, हें सैन्य, हा खजिना व हें प्रधानमंडळ हीं कोणाचींहि नाहींत. मित्र, अमात्य, गांव, राष्ट्र, दंड, खजिना आणि राजा हीं राज्याचीं सात अंगें आहेत. तिकाटण्याच्या तीन काठ्या ज्याप्रमाणें एकमेकींच्या आश्रयानें समभावानें असतात, तशींच हीं सात अंगें समभावानें असतात. त्यामध्यें एखादें अधिक व बाकीचीं कमी असा भाग नसतो. ज्या काळीं ज्यानें कार्य साधतें त्या काळीं तें तें अंग विशेष मानून त्याला प्राधान्य देण्यांत येतें. हीं सात अंगें व उदयस्थान, वृद्धिस्थान आणि क्षयस्थान अशीं तीन मिळून दहा अंगें या राज्याचा उपभोग राजाप्रमाणेंच घेत असतात. जो राजा उत्साही आणि क्षत्रियधर्मानें वागणारा असेल त्यानें प्रजेच्या उत्पन्नापैकीं दहाव्या हिश्शावर संतोष मानावा. कांहीं कांहीं राजे यापेक्षां कमी करावर

संतुष्ट रहाणारे आहेत. असाधारण राजा असा या जगांत सांपडणार नाहीं व जसा सर्वांशीं निर्दोष राजा नाहीं तसेंच सर्वस्वी अराजक असें राज्यहि सांपडणार नाहीं. राज्य नसेल तर त्या ठिकाणीं धर्म कुठला व ज्या ठिकाणीं धर्म नाहीं त्या ठिकाणीं मोक्षाचा संभव तरी कुठला? राजा व राज्य या दोघांनाहि पावन करणारा असा धर्म हा एकच आहे. या धर्माचें जो पालन करील, त्याला सबंध पृथ्वी ही ज्यामधील दक्षिणा असा अश्वमेध केल्याचें पुण्य लाभेल. असो. हे जनक राजा, राज्यभोगामध्यें असणारीं अनेक दुःखें व करावीं लागणारीं अनेक कष्टप्रद कर्मे यांचीं मी तुला शेंकडोंच काय पण हजारों देखील उदाहरणें देऊं शकेन.

मी तुझ्या देहांत प्रवेश करून आश्रमसंकर, गोत्रसंकर, इत्यादि पातकें केलीं म्हणून तूं मला दोष दिलास, पण माझी स्वतःच्या देहाच्या ठिकाणींच आसक्ति नाहीं ती दुसऱ्याच्या देहाच्या ठिकाणीं कोठून येईल? अशा प्रकारची योग-शास्त्रांचें अध्ययन केलेली मी, त्या मला असली भाषा वापरणें, तुला शोभत नाहीं. पंचशिख ऋषीजवळ तूं निदिध्यासन, श्रवण, मनन व यमनियमादि ध्यानाचीं अंगें ज्यांत सांगितलीं आहेत व जें ब्रह्मात्मैक्याचा अनुभव आणून देतें अशा मोक्षशास्त्राचा अभ्यास केला आहेस असें तूं म्हणतोस. तेव्हां तुझी आसक्ति नाहींशी झाली असली पाहिजे व कामादि विषयांचे पाश तूं तोडले असले पाहिजेस. मग या छत्रचामरादि राज्यविशेषांचे ठिकाणीं तुझी आसक्ति कां? मला असें वाटतें कीं तूं शिकलास ही विद्या विद्या नव्हे किंवा मी ही विद्या शिकलों असें तूं खोटें तरी सांगत असला पाहिजेस. अगर तिसरी कल्पना म्हणजे विद्येच्या नांवाखालीं विद्येचा आभास उत्पन्न करणारें भलतेंच कांहींतरी कोणीतरी तुला सांगितलें असलें पाहिजे. किंवा, एकाच मोक्षशास्त्राची हीं निर-निराळीं नांवें आहेत, असें कदाचित् तूं समजत असलास तर, तुला अजून ज्या-अर्थी राज्यादि गोष्टींची आसक्ति व अन्तःपुरांतील स्त्रियांची आवड आहे त्या-अर्थी तुझें हें ज्ञान वरवरचें असलें पाहिजे. तूं म्हणतोस कीं परकाया–प्रवेशाच्या साधनानें मी तुझ्या देहांत प्रवेश केला, यांत माझा अपराध झाला. पण, तूं जर आपल्याला सर्वथा विमुक्त समजतोस तर माझ्या ह्या करण्यानें तुझें तरी काय वांकडें झालें? ब्राह्मणादि वर्गांत, यतींनीं शून्यगृहामध्यें वास करावा असा नियम आहे. तेव्हां तुझ्या शून्य हृदयामध्यें येऊन राहण्यानें मी कोणाचा काय अपराध केला? हे राजा, मी माझ्या हातांनीं, दंडांनीं, पायांनीं, मांड्यांनीं किंवा दुसऱ्या

कोणत्याहि अवयवांनीं स्पर्श केला नाहीं. शिवाय तुम्ही आम्ही दोघांनीं मिळून केलेली गोष्ट—मग ती चांगली असो वा वाईट असो—सभेमध्यें बोलून दाखविणें हें तुझ्यासारख्या कुलीन, विनयशील व दूरदर्शी पुरुषाला शोभत नाहीं. या ठिकाणीं जमलेले हे ब्राह्मण, हे सर्व गुरुश्रेष्ठ आहेत, व पूज्यहि आहेत. तसेंच वर्ण आणि आश्रम यांचा राजा या नात्यानें तूं शास्ता आहेस. म्हणून दोघांनींहि एकमेकांचा मान ठेवला पाहिजे. तेव्हां या गोष्टीचा विचार करून, काय बोलावें व काय न बोलावें याचा विवेक करूं शकणाऱ्या तुझ्यासारख्या पुरुषानें तुझा माझा—स्त्रीपुरुषांचा—हा संबंध सभेमध्यें उघड बोलून दाखविणें योग्य नव्हे. कमळाच्या पानावरचा पाण्याचा थेंब जसा त्या पानाला स्पर्श न करतांना त्याच्यावर रहातो त्याप्रमाणें, हे जनक राजा, मी तुझ्या ठिकाणीं राहतें. बरें समज, माझा स्पर्श तुला झाला, आणि तो स्पर्श तुला समजला. मग त्या पंचशिख भिक्षूनें तुझें ज्ञान निर्बीज केलें म्हणतोस तें कसें? तुझें ज्ञान जर निर्बीज तर माझा स्पर्श तुला कसा समजला? तूं गृहस्थाश्रमापासून च्युत झालास आणि अत्यंत दुलभ असा मोक्षहि तुला मिळाला नाहीं. तेव्हां दोघांच्यामध्यें लोंबणारा मोक्षवार्तिक असें तुला म्हणण्यास काय हरकत आहे? परमात्म्याचें एकरूपत्व व पुरुष आणि प्रकृति यांचें भिन्नत्व जाणणाऱ्या मुक्त मनुष्याचा दुसऱ्या मुक्ताशीं संयोग होणें हा वर्णसंकर नव्हे. पुरुष आणि प्रकृति यांचें भिन्नत्व मानणाऱ्या पुरुषाला वर्ण आणि आश्रम हे पृथक् पृथक् असे वाटतात. एक हें दुसरें नव्हे म्हणजे सर्व एकरूपच आहे असें ज्ञान झाल्यानंतर एक गोष्ट दुसऱ्या ठिकाणीं राहूंच शकत नाहीं. ती स्वस्वरूपींच असते. हातावर भांडें घ्यावें, त्या भांड्यांत पाणी घालावें आणि त्या पाण्यांत एकादी माशी पडावी म्हणजे तीं जशीं भिन्न भिन्न असून आश्रित आणि आश्रय या संबंधानें संबद्ध झालेलीं दिसतात तसाच हा प्रकार आहे. भांड्याच्या ठिकाणीं पाण्याचें रूप नाहीं व पाणीहि पण माशी नव्हे. यांपैकीं प्रत्येक गोष्ट आपापल्या रूपानेंच त्या ठिकाणीं स्थित असते. ती दुसऱ्याचें रूप घेत नाहीं. आश्रम आणि वर्ण हीं वस्तुतः परब्रह्मरूपापासून भिन्न आहेत व ते कुंड, जल आणि मक्षिका यांच्याप्रमाणें परस्परहि भिन्न आहेत. तेव्हां हें ज्ञान असणाऱ्या तुझ्यासारख्या ब्रह्मनिष्ठ पुरुषानें वर्णसंकराची भीति कां धरावी? मी जातीनें सर्वोत्तम ब्राह्मण कुलांत जन्माला आलेली नाहीं, वैश्य नव्हे व नीच-याति शूद्रहि नव्हे. राजा, तुझा आणि माझा वर्ण एक आहे. मी शुद्ध कुळांत जन्मास आलेली असून माझें

ब्रह्मचर्य अजून कायम आहे. राजा, तुझ्या कानावर प्रधान या नांवाच्या राजर्षीचें नांव आलें असलेंच पाहिजे. त्या राजाच्या कुळांत माझा जन्म झालेला असून माझें नांव सुलभा आहे. माझ्या पूर्वजांनीं केलेल्या यज्ञांत द्रोण शतशृंग व चक्रद्वार या पर्वतांचा उपयोग प्रत्यक्ष इंद्रानें स्वतः येऊन, स्थंडिलांतील विटांच्या जागीं केला होता. अशा कुलांत जन्माला आलेली मी, मला माझ्या योग्य भर्ता मिळाला नाहीं, म्हणून मी मोक्षधर्माचा अभ्यास करून एकटी संन्यासव्रत घेऊन हिंडत आहें. मी खोटा वेष घेतला नाहीं, दुसऱ्याच्या द्रव्याचा अभिलाष मला नाहीं, मी धर्मसंकर केला नाहीं. मी माझा योग्य तो धर्म पाळीत आहें. माझी प्रतिज्ञा मोडण्याचा मोह मला झाला नाहीं, मी विचार न करतां बडबडणारी नाहीं. हे राजा, मी जी तुझ्याजवळ आलें, ती कांहीं, कांहीं विचार न करतां चुकून आलेली नाहीं. तुझी बुद्धि मोक्षाच्या ठिकाणीं स्थित झाली आहे असें ऐकून तुझें कुशल जाणण्याच्या इच्छेनें व हा तुझा मोक्ष कसलासा आहे हें जाणण्याच्या इच्छेनें मी येथें आलें आहें. आपण एकमेकांच्या विरुद्ध उभे राहून जरी बोलत असलों तरी मी पक्षाभिमानाला पेटून बोलत नाहीं. जो वाद जिंकण्यासाठीं फुकट पांडित्य करीत नाहीं, व परब्रह्माच्या ठिकाणीं जो शांत होतो त्याला मुक्त म्हणतात. एकादा भिक्षु ज्याप्रमाणें गांवांतल्या एकाद्या ओसाड घरांत एक रात्र रहावा, त्याप्रमाणें तुझ्या या शरीरांत मी एक रात्र वस्ति करणार आहें. तूं मला योग्य आदरानें वागविलेंस आणि मला वादभिक्षा घातलीस. आतां आजची रात्र येथें विसांवा घेऊन उद्यां मी मोठ्या आनंदानें येथून जाईन.

भीष्मः—अशा प्रकारचीं युक्तिवादानें भरलेलीं आणि अर्थपूर्ण अशीं तिचीं वाक्यें ऐकून त्याच्यावर उत्तर काय द्यावें हें त्या राजाला सुचेनासें झालें. १२. ३. ३२०.

---

## अध्याय ३२१ वा.

[ १. पावकाध्ययन: व्यासांचा शुकांना उपदेश. ]

**युधिष्ठिर**—हे पितामहा, पूर्वी व्यासपुत्र शुकाचार्याला वैराग्य कसें उत्पन्न झालें हें आपल्यापासून ऐकण्याची माझी इच्छा आहे. कारण त्याबद्दल मला अत्यंत उत्कंठा लागली आहे. या जगाचें कारण, हें जगत् आणि परब्रह्म यांचा

निश्चित स्वरूपनिर्णय मला आपण सांगा, व हा जो अज नारायण त्याचें रूपहि पण मला सांगा.

भीष्मः—भगवान् वेदव्यासानें सुवृत्तानें चालणाऱ्या आपल्या निर्भय पुत्राला कुलपरंपरेनें चालत आलेला वेदभाग शिकविला व नंतर इतर शाखांमधले मंत्र त्याला शिकविले.

व्यासः—हे पुत्रा, धर्माचें सेवन कर, अत्यन्त कठिण अशीं शीतोष्ण व क्षुत्पिपासादि द्वंद्वें यांचा निरोध करून जितेंद्रिय वृत्तीनें प्राणायाम कर. सत्य, सरळपणा, अक्रोध, निर्मत्सरता, दम, तपश्चर्या, अहिंसा व दुष्टपणाचा अभाव या धर्मांचें यथायोग्य पालन कर. सत्याला धरून रहा, सर्व आडमार्ग टाकून देऊन धर्माच्या ठिकाणीं निष्ठा ठेव आणि देवता व अतिथि यांना देऊन उरेल तेवढ्याच अन्नावर आपली उपजीविका चालीव. हा देह फेंसाच्या बुडबुड्याप्रमाणें अनित्य आहे. एखादा पक्षी एखाद्या फांदीवर बसून उडून जावा, त्याप्रमाणें ह्या जीवाच्या वसतीची स्थिति आहे. आपल्या प्रियजनांचा सहवास क्षणिक आहे हें सर्व समजून, हे पुत्रा, तूं झोंप कशी घेतोस? तुझे कामादिक शत्रु मोठ्या सावधानपणानें जागरूक राहून तुझ्यांतलें व्यंग शोधावयास टपलेले आहेत. पण तूं बाल असल्यामुळें तें तुला समजत नाहीं. तुझें आयुष्य दिवसादिवसांनीं मापलें जात असून कमीकमी होत आहे, अशा स्थितींत तूं देव किंवा गुरू ह्यांना शरण कां जात नाहींस? ह्या जगांतल्या अत्यंत नास्तिक लोकांची धांव मांस आणि रक्त यांचीच भर करणाऱ्या ऐहिक विषयोपभोगाकडे असते. त्यांचें लक्ष परमार्थाकडे जात नाहीं. बुद्धीला व्यामोह झालेलीं माणसें धर्माचा तिटकारा करतात आणि आडवाटेनें जातात. यांचे अनुयायीहि पण यांच्याचसारखे पीडा पावतात. हे पुत्रा, महासमर्थ महात्मे समाधानवृत्तीनें वेदविहित मार्गानें जातात. त्यांची सेवा कर, आणि त्यांच्या उपदेशाप्रमाणें चाल. त्या धर्मज्ञ शहाण्यांच्या मतांचा नीट विचार करून आपलें आडवाटेनें धांवणारें मन विवेकानें आंवरून धर. ज्यांची बुद्धि वर्तमानकाळापुरतीच कोत्या स्वरूपाची आहे, ज्यांना भविष्यकाळ अजून दूर आहे असें मानून निर्भय रीतीनें रहावेंसें वाटतें व जे भक्ष्याभक्ष्याचा निषेध मानीत नाहींत त्यांना पृथ्वी ही कर्मभूमि आहे याचा उमज पडत नाहीं. धर्म ही एक शिडी आहे असें समजून तिच्या पायऱ्या तूं क्रमाक्रमानें चढून जा. एकादा कोळी जसा जाळ्यामध्यें गुरफटला जावा तसाच तूं ह्या विषयांच्या जाळ्यांत गुरफटला जात आहेस,

पण हें तुझें तुला समजत नाहीं. ज्यानें सर्व मर्यादा टाकल्या, व जो महानदीच्या पुराप्रमाणें अमर्याद असतो अशा नास्तिक पुरुषाला तूं नेहमीं टाळीत जा. हा मनुष्य एकाद्या बांबूप्रमाणें उद्धतवृत्तीचा असतो. पंचेंद्रियांच्या जलानें युक्त असलेली ही संसाराची नदी आणि काम, क्रोध व मृत्यु यांच्यांतून तरून जाण्यास धैर्य ही एकच नाव आहे. तिचा उपयोग करून तूं आयुष्यांमधील संकटांमधून तरून जा. हें सर्व जग मृत्यूनें व्यापलेलें असून म्हातारपणानें पछाडलेलें आहे. काळ तुझें आयुष्य घडीघडीनें नेत आहे. जो दिवस गेला तो व्यर्थ न जातां तुझ्या आयुष्याच्या मापांत हिशेबीं धरिला जातो. अशा स्थितींत तूं धर्माची नाव करून ही भवनदी तरून जा. मनुष्य जागा असो, बसलेला असो किंवा निजलेला असो मृत्यु त्याला नेहमीं हुडकीत असतो. तेव्हां मृत्यूनें एकदम गिळून टाकलें असतां प्राण्याला सुख कोठून मिळणार? नेहमीं धनसंचयाच्या पाठीमागें लागलेल्या व ज्याच्या वासना कधींहि तृप्त झालेल्या नाहींत अशा प्राण्याला मृत्यु हा लांडगीनें एकादी बकरी उचलून न्यावी त्याप्रमाणें उचलून नेतो. ज्याची ज्योत क्रमाक्रमानें मोठी होत जाते असा हा मोठा ज्ञानरूप दीप अतिशय प्रयत्नानें सांभाळ. कारण, तुला या संसारांत शिरून त्यांतून तरून जावयाचें आहे. अनेक प्रकारच्या देहांतून जात जात, क्वचित् काळीं प्राण्याला मनुष्यजन्म मिळतो व त्यांतहि ब्राह्मण्य हें त्याच्या वांट्याला क्वचित्च येतें. तेव्हां तुला मिळालेलें ब्राह्मण्य मोठ्या तजविजीनें सांभाळ. तुला प्राप्त झालेला हा ब्राह्मणाचा देह वासनांच्यामध्यें रममाण होण्यासाठीं नाहीं तर या पृथ्वीवर खडतर तपश्चर्या करण्यासाठीं आहे. या देहाचा त्याग केल्यानंतर ब्राह्मणाला आत्यंतिक सुखाची प्राप्ति होते. अनेक प्रकारची तपश्चर्या केल्यानें ब्राह्मण्य प्राप्त होतें. असलें ब्राह्मण्य तुला मिळालें आहे, तर वासनाधीन होऊन तूं त्याची उपेक्षा करूं नको. स्वाध्यायाचें अध्ययन कर, तपश्चर्या कर, दमनशील वृत्तीनें रहा आणि नित्ययुक्त होऊन स्वतःचें कल्याण साधण्यासाठीं नित्य प्रयत्न कर. मनुष्याचें आयुष्य हें घोड्यासारखें आहे. याचें स्वरूप अव्यक्त आहे. मागें सांगितलेल्या षोडशकला हें याचें शरीर असून याचा आत्मा सूक्ष्म आहे. क्षण ह्या याच्या त्रुटि असून डोळयांची होणारी उघडझांप हे याच्या अंगावरील केंस होत. दोन्ही संध्या हे याचे खांदे होत. तुल्यबल असे जे शुक्ल व कृष्णपक्ष हेच याचे डोळे व निरनिराळे महिने हेच याचे अवयव. असला हा आयुष्यरूपी घोडा जोरानें एकसारखा नित्य धांवत असतो. भयंकर स्वरूपाच्या,

उग्र वेगाच्या या घोड्याला सतत धांवतांना पाहून, तुझे डोळे जर ठिकाणावर असतील तर मोठमोठ्यानें लोकांनीं सांगितलेलें परब्रह्माचें रूप समजाऊन घेऊन तूं आपलें चित्त धर्माकडे लाव. या जगांत जे लोक धर्ममार्गापासून परावृत्त होतात व त्यामुळें दुःखांत पडून नेहमीं आक्रोश करतात त्यांना त्यांच्या अनेक पापांमुळें दुःख भोगावें लागतें व शेवटीं यमलोकांमध्यें यातना–शरीर घेऊन हाल भोगावे लागतात. जो राजा नेहमीं धर्माचरणानें वागतो, सर्व प्रकारच्या बऱ्यावाईट गोष्टींचें रक्षण करितो व पात्रापात्र विचार करून दान देतो, त्याला पुण्यवंतांची गति प्राप्त होते; आणि त्याला पूर्वीं कधीं न मिळालेलें असें अनेक प्रकारचें निर्दोष सुख प्राप्त होतें. पण जे लोक गुरुजनांचा द्रोह करितात त्यांच्या मृत शरीरांवर मोठमोठे भयंकर कुत्रे, लोखंडासारख्या कठिण चोंचींचे पक्षी व बलिष्ठ गिधाडांचे थवे आणि रक्त शोषणारे दुष्ट किडे हे तुटून पडतात. या जगांत ब्रह्मदेवानें शौच, संतोष, तपश्चर्या, स्वाध्यायाध्ययन व ईश्वरसेवा अशा विधिरूप पांच व हिंसा, असत्य, चोरी इत्यादिकांचा त्याग करावयास सांगणाऱ्या पांच अशा ज्या दहा मर्यादा घालून दिल्या आहेत त्या जो पाळीत नाहीं तो पापी पुरुष कष्टप्रद अशा यम-लोकाला जातो व तरवारीच्या धारेप्रमाणें तीक्ष्ण असलेल्या त्या अरण्यासारख्या ठिकाणीं पुष्कळ वेळ रहातो. जो मनुष्य अत्यंत लोभी, खोट्याची आवड धरणारा, दुसऱ्याला फसविण्यांत व घाणेरडीं कर्म करण्यांत आनंद मानणारा व कपटानें दुसऱ्याला कष्ट देणारा असा असतो त्याला स्वतःच्या पापाचें फळ म्हणून अनंत कालपर्यंत दुःख भोगावें लागतें. त्याला वैतरणी नांवाच्या कढत पाण्याच्या नदींत डुंबावें लागतें. त्याचीं गात्रें तरवारीच्या धारेप्रमाणें तीक्ष्ण असणाऱ्या यम-लोकांतील झाडांच्या पानांनीं कापलीं जातात, त्याला परशूंची शय्या करून त्यांवर निजावें लागतें; व अशा प्रकारें अनेक हाल भोगीत महानरकामध्यें रहावें लागतें. तूं मोठमोठ्या शहाणपणाच्या गोष्टी सांगतोस, पण तुला अजून ब्रह्मरूपाची ओळख पटली नाहीं. तुला मृत्युवश करणारें हें म्हातारपण पुष्कळ वेळ तुझ्या डोळ्यांसमोर उभें आहे, पण तें प्रत्यक्ष अंगीं येऊन चिकटल्याशिवाय तुला दिसत नाहीं. ऊठ, बसलास काय? चल. तुझ्या सुखाच्या मार्गांत विघ्न करणारें अतिशय दारुण असें मोठें संकट उत्पन्न झालें आहे, तें दूर करण्याचा प्रयत्न कर.

यमाच्या आज्ञेवरून मेलेल्या माणसाला प्रथम यमलोकीं नेण्यांत येतें, म्हणून तूं नानाप्रकारच्या खडतर तपाचरणानें व सन्मार्गानें जाऊन सुख मिळविण्याचा

प्रयत्न कर. दुसऱ्याच्या दुःखाची जाणीव नसणारा यमराज तुझें आयुष्य तुझ्या आप्तेष्टांसकट हरण करून नेईल आणि त्यावेळीं त्याचें निवारण करणें हें कोणाच्याहि हातीं रहाणार नाहीं. यमरायाच्या बोलावण्याची सूचना देणारा असा हा वारा वाहूं लागल्यानंतर तुला यमापुढें एकटेंच उभें करण्यांत येईल. तेव्हां आतांपासूनच परलोकीं ज्यांनीं तुझें कल्याण होईल अशीं कृत्यें कर. तुझ्या मृत्यूची सूचना देणारा हा वारा आतां दूर आहे. प्रत्यक्ष मृत्यूचें भय डोळ्यांपुढें उभें राहिलें म्हणजे सर्व दिशा भ्रमतातसें वाटून तुझ्या डोळ्यांपुढें एकप्रकारें अंधारी आल्यासारखें होईल आणि तूं मृत्युवश होऊन यमलोकाच्या मार्गानें चाललास म्हणजे तुला वेदविहित मार्गाचा विसर पडेल. म्हणून उत्तम प्रकारच्या समाधीचा तूं आजच अवलंब कर. आज केलेल्या बऱ्यावाईट कर्मांचा पुढें तुला पश्चात्ताप होऊं नये व चुकीनें तुझ्या हातून झालेल्या गोष्टींची टोंचणी तुला लागूं नये, एवढ्यासाठीं आत्यंतिक सुखाचा एकच ठेवा असें जें परब्रह्मरूप त्याची जोड कर. तुझें सामर्थ्य व सौंदर्य यांचा नाश करणारी जरा पुढें तुझें शरीर जर्जर करून टाकील; येवढ्यासाठीं आज तूं परमसुखाची खाण असें जें परब्रह्म त्याची जोड कर. रोगरूपी सारथ्याची मदत घेऊन यमराज तुझ्या इच्छेची किंवा अनिच्छेची पर्वा न करितां तुझें शरीर विदारून टाकील व तुझा जीव घेईल. म्हणून तूं अत्यंत मोठी तपश्चर्या कर. मनुष्याच्या देहामध्यें वास करणारे असे लांडग्यासारखे भयंकर षड्रिपु सर्व बाजूंनीं तुजवर हल्ला करतील, तेव्हां आजपासून तूं पुण्यसंचय कर. पुढें तुला एकच एक अंधःकार दिसूं लागेल; पर्वताच्या माथ्यावर सोन्याचे वृक्ष दिसूं लागतील. हीं चिन्हें तुझा मृत्यु जवळ आला आहे असें दर्शवितील; आटप, त्याला टाळावयाचा प्रयत्न कर. वरून मित्रासारखे भासणारे पण वस्तुतः तुझे शत्रु असे कामक्रोधादि विकार तुझ्या दृष्टीला मोह पाडतील आणि वाईट लोकांच्या संगतीनें तुला भुरळ पडेल, तेव्हां तूं परब्रह्मरूपाची जोड कर. ज्या द्रव्याला राजापासून किंवा चोरापासून भय नाहीं आणि जें द्रव्य आपल्याला मृत्यूनंतर येथल्या येथेंच टाकावें लागणार नाहीं अशा पुण्यधनाचा संचय कर. या धनामध्यें कोणालाही वांटणी द्यावी लागत नाहीं. विवाहामध्यें मिळालेलें धन हें जसें व्यक्तिशः ज्याच्या त्याच्या मालकीचें असतें त्याप्रमाणें ह्या ज्ञानधनाचा उपभोग ज्याचा त्यालाच मिळतो. ज्या दानकर्मानें परलोकींचें जीवन सुखकारक होईल तेंच दान इहलोकीं दे व कधींही क्षीण न होणाऱ्या अक्षय ज्ञानधनाचा तूं संचय कर. श्रीमंतांच्या घरचीं

पक्कान्नें शिजून जरी तयार झालीं, तरी तीं त्यांच्या तोंडांत पडण्याच्या आंतच मृत्यु कदाचित् त्यांना उचलून नेईल. तुझ्या घरांत तयार होणारें पक्कान्न शिजतें न शिजतें तोंच तूंहि कदाचित् मृत्युवश होशील. मनुष्याचें आयुष्य इतकें क्षण-भंगुर आहे कीं, डोळ्यांसमोर दिसत असलेले भोगसुद्धां त्याला भोगतां येतील कीं नाहीं याची शंका आहे. संकटांमध्यें एकट्याच सांपडलेल्या माणसाला आई, भाऊ, मुलगे किंवा ज्यांची त्यानें जन्मभर मर्जी संपादन केली असेल असे कोणतेहि आप्तइष्ट उपयोगी पडत नाहींत. त्यानें जन्मभर जीं कांहीं बरींवाईट कृत्यें केलीं असतील तींच परलोकच्या वाटेनें त्याच्याबरोबर येतात. बऱ्यावाईट कर्मांनीं जमवलेला सोन्याचा किंवा रत्नांचा निधि देहपात झाल्यावर प्राण्यांच्या उपयोगीं पडत नाहीं. परलोकीं जाणाऱ्या मनुष्यानें केलेलीं बरींवाईट कर्में हीं जशीं त्याचीं त्याला समजतात, तशीं तीं इतरांना समजत नाहींत. परलोकीं जाणाऱ्या मनुष्याचा मनुष्यदेह नष्ट होतो व त्याला जें कांहीं समजतें व जें कांहीं दिसतें तें हृदयाकाशांत प्रविष्ट झालेल्या आत्मतत्त्वाच्या ज्ञानचक्षूंनीं दिसतें. मनुष्याच्या शरीरामध्यें अग्नि, सूर्य आणि वायू ह्या तीन देवता वास करितात व त्या देवतांच्या साहाय्यानें त्याला शुभाशुभ कर्म समजतें. दिवस आणि रात्र हीं सर्व तऱ्हांनीं मनुष्याचीं उजेडांतील आणि अंधारांतील सर्व कर्में पहात आहेत. तेव्हां तूं स्वधर्माचेंच परिपालन कर. नानाप्रकारचे लोखंडाच्या तोंडांच्या पक्ष्यां-सारखे अनेक शत्रु या मार्गामध्यें आहेत. आणि दिसण्यांत विद्रूप आणि भयंकर असे चावणारे कृमीहि पण या मार्गामध्यें आहेत. म्हणून तूं आपलें कर्म संभाळ, तें एकच तेथें येईल आणि तेंच तुझें रक्षण करील. या कर्मांत कोणालाहि हिस्सा मिळत नाहीं. परलोकीं कोणाच्याहि कर्मांची अदलाबदल होणें शक्य नाहीं. ज्यानें जें कर्म जसें केलें असेल त्या कर्माचें तें फळ त्यानें—आणि त्यानेंच—भोगिलें पाहिजे. अप्सरा आणि महर्षि यांना जशीं चांगलीं फळें मिळतात, त्याप्रमाणें मनुष्यालाहि त्यानें केलेल्या कर्मांचीं फळें, इच्छेस येईल तिकडे नेणाऱ्या विमानांच्या रूपानें मिळत असतात. निष्पाप, कृतकृत्य व पवित्र माणसांनीं इह-लोकीं जीं शुभ कर्में केलीं असतील त्यांचीं त्यांचीं त्या त्या प्रकारचीं फळें मनु-ष्याला मिळतात. गार्हस्थ्य धर्माचा सेतु करून हीं माणसें, प्रजापति किंवा इंद्र यांच्या लोकाला जातात. अशा प्रकारचीं शेंकडों हजारों उदाहरणें तुला देतां येतील. सर्व प्राणिमात्रांना पावन करणारा असा धर्म सगळ्या शहाण्या लोकांना पावन करितो पण जे खरोखरीच बुद्धिहीन आहेत ते मात्र या बाबतींत मोह-

व्याप्त होतात. बाबारे, तुझीं आठ त्रिक चोवीस वर्षें संपलीं, तुला आतां पंचविसावें वर्ष लागलें, म्हणून तूं धर्म–संचय कर. तुझें वय जात चाललें. काळ हा व्यंग पहातांच त्या ठिकाणीं घाव घालणारा आहे. तो तुझ्या इंद्रियांची भोगशक्ति नाहींशी करील. म्हणून तूं ऊठ, जागा हो आणि स्वतःचा देह एवढें एकच साधन घेऊन त्वरेनें धर्मरक्षणाच्या मार्गें लाग. जेथें मागें तूंच आणि पुढेंहि तूंच अशा स्थितींत तुला एकट्यालाच या मोक्षमार्गानें जावयाचें आहे, तुला तुझी स्वतःची किंवा इतरांची पर्वा करून काय करावयाचें आहे? परलोकीं जाणाऱ्या सज्जनांना संकटकाळीं उद्धरून नेण्यास समर्थ असा जो एकच एक पारमार्थिक धर्म त्याचा तूं अवलंब कर आणि परब्रह्मतत्त्वाची जोड करून घे. हा निष्काम, असंग प्रभु तुझ्या कुळासकट आणि आप्तेष्टांसकट तुझें हरण करील आणि त्यावेळीं त्याचें निवारण कोणींहि करूं शकणार नाहीं, म्हणून तूं धर्माचें पालन कर आणि पुण्याईची जोड करून ठेव. हे पुत्रा, हें मानवधर्मशास्त्र मी तुला सांगितलें आहे. याचें तूं योग्य प्रकारें मनन कर आणि त्याप्रमाणें आचरण ठेव. जो आपल्या कर्मांनीं स्वतःच्या देहाचेंच केवळ पोषण करितो व आपल्याला अमुक फळ मिळावें असें म्हणून फलाशेनें दान करितो, त्याला अज्ञान आणि मोह यांच्या दुःखादिक गुणांमध्यें गुरफटावें लागतें. सत्कर्माचरण करणाऱ्या पुरुषाचें ज्ञान सगळ्या ब्रह्मांडाला व्यापून उरतें. असलें हें सर्वज्ञत्व प्राण्याला निश्चयानें मोक्षमार्गाला नेतें. ही विद्या उत्तम पुरुषालाच सांगावी म्हणजे तिचा चांगला उपयोग केल्यासारखें होतें. गांवांत राहून तेथील सुखोपभोग भोगण्याची मनुष्याला जी आवड असते, तिच्यामुळेंच तो या संसारबंधनांत जखडला जातो. पुण्यवान् माणसें हा आसक्तीचा पाश तोडून टाकितात, पापी माणसांना ही गोष्ट शक्य होत नाहीं. बाबारे, तुला एक दिवस मरावयाचें आहे. हा पैसा, हे बांधव, हे पुत्र यांच्याशीं तुला काय करावयाचें आहे? अंधाऱ्या गुहेंत असणाऱ्या एखाद्या पदार्थाप्रमाणें गूढ असणाऱ्या परमात्मतत्त्वाचें तूं चिंतन कर. तुझे वाडवडील कोठें गेले, याचा तुला पत्ता आहे काय? बाबारे, उद्यांचें कार्य आज करावें, व दुपारसाठीं योजलेलें कार्य सकाळींच करून टाकावें; कारण, आपलें उद्दिष्ट कार्य मनुष्यानें केलें आहे कीं नाहीं याची मृत्यु वाट पहात नाहीं. देहपात होईपर्यंत आप्तेष्ट लोक आपली संगति कायम ठेवतात, आणि देहपात झाल्यावर आपल्या गोताचे लोक, आपले मित्र हे सर्व आपल्याला अग्नीच्या स्वाधीन करून निघून जातात. म्हणून वाईट मार्गानें चालणाऱ्या निष्ठुर व नास्तिक लोकांना तूं नेहमीं टाळीत जा. आणि परम-

पदाच्या प्राप्तीसंबंधांत नेहमीं जागरूक रहा. हा इहलोक या प्रमाणें काळानें सर्व बाजूंनीं व्यापला आहे, व काळ हा त्याला सारखा पीडा देत आहे. तेव्हां तूं धैर्याचा अवलंब कर आणि एकचित्तानें आपली सर्व शक्ति एकवटून धर्माचरण कर. धर्ममार्ग सांगणाऱ्या या शास्त्राचें रहस्य ज्याला पूर्णपणें पटलें तो मनुष्य धर्माचरण करतो व त्याला त्यामुळें परलोकीं सुखप्राप्ति होते. देहांत पालट होणें म्हणजे मृत्यु नव्हे असें ज्ञान ज्यांना झालें व जे शिष्टांनीं अवलंबिलेल्या मार्गानें जातात त्यांचा कधींहि नाश होत नाहीं. जो धर्माचें संवर्धन करितो तोच पंडित व जो धर्ममार्गापासून च्युत होतो तो अपंडित, तोच या जगामध्यें अज्ञानांत गुरफटून राहतो. आपापल्या वर्णाप्रमाणें आणि आश्रमाप्रमाणें मनुष्य जीं जीं कर्मै करितो त्या त्या कर्मांचें फल त्याला यथाशिस्त मिळतें. ज्याचीं कर्मै वाईट असतील तो नरकांत जातो व धर्माचरण करणारा पुरुष स्वर्गलोकाला जातो. मनुष्यजन्म ही स्वर्गमार्गाला नेणारी एक दुर्लभ शिडी आहे. तीवरून घसरून खालीं पडूं नये यासाठीं मनुष्यानें योग्य प्रकारें योगमार्गाचें अवलंबन करावें. मोक्षांत गुंतलेलें ज्याचें मन पुनः संसाराकडे धांव घेत नाहीं त्याला पुण्य पुरुष म्हणावें व तो मेला असतांना त्याच्या आप्तेष्टांनीं त्याच्याबद्दल शोक करूं नये. ज्याच्या बुद्धीमध्यें कोणत्याहि प्रकारचा पालट झालेला नाहीं व ज्याची बुद्धि संशयरहित असते अशा पुरुषाला तो स्वर्गांत गेला असतांना कोणत्याहि तऱ्हेचें भय रहात नाहीं. जीं माणसें तपोवनांतच जन्माला आलीं आणि त्या ठिकाणींच ज्यांचें देहावसान झालें त्यांच्या धर्माचरणाला फारशी किंमत नाहीं. कारण, त्यांना विषयोपभोगांचें ज्ञानच नसतें. पण जो समजून उमजून भोगफलांचा त्याग करितो आणि देहदंडन करून तपश्चर्या करितो त्यानें मिळविलें नाहीं असें या जगांत कांहींच नाहीं. त्याला मिळणाऱ्या फळाची किंमत मी सर्वांत अधिक समजतों. मागच्या मागच्या जन्मांतून हजारों आईबापांशीं तुझा संबंध आला असेल, हजारों स्त्रीपुत्रांचा सहवास तुला घडला असेल व पुढच्या पुढच्या जन्मांतून हा सहवास घडेलहि. पण हीं आईबापें कोणाचीं व आम्ही कोणाचे ? मी या जगांत एकटा आहें, येथें माझा कोणी नाहीं आणि मीहि कोणाचा नाहीं. ज्याचा मी किंवा जो माझा असा एकहि मनुष्य मला येथें दिसत नाहीं. म्हणून हे पुत्रा, तुला त्यांच्याशीं कांहीं कर्तव्य नाहीं व त्यांनांहि तुझ्याशीं कांहीं कर्तव्य नाहीं. त्यांच्या कर्मांनीं तीं जन्माला आलेलीं आहेत व तुला हा इहलोक सोडून जावयाचें आहे. या लोकामध्यें मनुष्याजवळ द्रव्य असेल तर आप्तेष्ट लोक त्याच्या बरोबर नात्याची

ओळख ठेऊन वागतात; पण, दरिद्री मनुष्य जिवंत असला तरी तो मृतच होय. त्याचे बांधव त्याला असून नसल्यासारखे होतात. मनुष्य बायकोसाठीं नानाप्रकारचीं अशुभ कर्में करितो व त्यामुळें इहपरलोकीं त्याला क्लेश भोगावे लागतात. स्वतःच्या कर्मांनीं या जीवलोकाचा नाश होतो हें त्याला दिसत असतें. म्हणून आतांपर्यंत जें जें तुला मी सांगितलें त्याचा त्याचा नीट विचार करून त्याप्रमाणें तूं आचरण कर. शास्त्राचा नीट विचार कर, पृथ्वी ही कर्मभूमि आहे हें ध्यानांत ठेव आणि परलोकाची प्राप्ति व्हावी अशी तुला इच्छा असेल तर शुभकर्मांचें आचरण कर. हा काल, महिने आणि ऋतु इत्यादि पळ्यांनीं ढवळून, अहोरात्रांच्या सर्पणानें सूर्यरूपी अग्नि चेतवून व आपलें सर्व सामर्थ्य खर्चून हे सगळे प्राणिमात्र शिजवून काढीत आहे. हे प्राणिमात्र जीं जीं कर्में करितात तीं तीं सर्व हा काल पहात असतो. ज्या द्रव्याचा उपयोग दानालाहि नाहीं आणि भोगालाहि नाहीं तें द्रव्य घेऊन काय करावयाचें आहे? ज्या सामर्थ्याचा उपयोग शत्रूचा प्रतिकार करण्या-कडे होऊं शकत नाहीं तें सामर्थ्य निरुपयोगी होय. ज्या विद्येचा उपयोग धर्माचरणाकडे करतां येत नाहीं ती विद्या निष्फळ होय आणि जितेंद्रिय वृत्तीनें स्वतःला आपल्याच ताब्यांत ठेवण्याचें सामर्थ्य ज्याला नाहीं असला दुबळा पुरुष कुचकामाचा होय.

भीष्म—व्यासांचें हें कल्याणकारक भाषण ऐकून तो शुकाचार्य पित्याचा त्याग करून आपल्याला योग्य असा गुरु शोधण्यास निघून गेला. १२. ३. ३२१.

---

## अध्याय ३२२ वा.

### [ १. धर्ममूलिक ]

(१) युधिष्ठिरः—हे पितामहा, गुरुजनांची सेवा करणें, तपश्चर्या, कर्म किंवा दान यांपैकीं कोणत्या कोणत्या कर्मापासून कोणतीं कोणतीं फलें प्राप्त होतात हें मला सांगा.

भीष्म—मनुष्याची बुद्धि एकदां वाईट मार्गाकडे वळली म्हणजे त्याला पाप करावेंसें वाटतें आणि तो वाईट कर्में करून मोठ्या संकटांत सांपडतो. पाप-कर्म करणारे पुरुष निंद्य योनींत जन्माला येतात. व आगींतून निघून फुपाट्यांत सांपडल्याप्रमाणें एक प्रकारच्या दारिद्र्यांतून दुसऱ्या प्रकारच्या दारिद्र्यांत जातात. एका तऱ्हेचे क्लेश टळले तर दुसऱ्या तऱ्हेचे क्लेश त्यांच्या वांट्याला येतात.

एक संकट संपलें तर दुसरें संकट त्यांच्यापुढें दत्त म्हणून उभें राहतें आणि ते मेल्यापेक्षां मेले होऊन त्यांना दारिद्र्यावस्थेंतच जन्म काढावा लागतो. त्याच्या उलट चांगल्या कर्मांचें आचरण करणाऱ्या लोकांना एकामागून एक अधिकाधिक आनंद देणाऱ्या गोष्टींची प्राप्ति होते व ते उत्तरोत्तर चढत्या क्रमानें एका लोकांतून दुसऱ्या लोकांत जातात. त्यांना एकामागून एक उच्च सुखांची प्राप्ति होते. त्यांचें अन्तःकरण श्रद्धायुक्त असतें व ते दमनशील असतात. जगांत अशाच लोकांना वैभवाची प्राप्ति होते. उलटपक्षीं आंधळ्यांनीं हातांनीं वाट चांचपडावी त्याप्रमाणें सर्प व हत्ती यांचें भय असलेल्या व दरवडेखोरांनीं आणि चोरांनीं व्यापलेल्या अरण्यांतून नास्तिकांस असहायपणें मार्ग काढावा लागतो. ज्यांना देव व अतिथि प्रिय आहेत, सज्जनांचा सहवास ज्यांना आवडतो असे उदार व दानशूर पुरुष आत्मज्ञानी लोकांच्या हितकर मार्गानें जातात. धान्यावरचें फोल धान्याच्या सहवासांत असलें म्हणून तें जसें धान्य नव्हे, किंवा दुर्गंधियुक्त कृमि हे पक्ष्यांमध्यें असले म्हणून ते जसे पक्षी नव्हेत, त्याप्रमाणेंच धर्माची चाड नसणारीं मनुष्यें हीं मनुष्यें नव्हेत. ज्या ज्या मनुष्यानें जें जें कर्म केलें असेल तें तें कर्म त्याच्या पाठीस लागलेलें असतें. मनुष्य कर्माच्या भयानें कितीहि जलद पळूं लागला तरी कर्म त्याची पाठ सोडीत नाहीं. तो निजला असला तर त्याचें कर्म त्याच्या बरोबर झोंप घेतें, तो बसला असला तर त्याचे बरोबर त्याचें पापहि पण बसूनच राहतें. तो धांवूं लागला तर त्याच्या मागें हें पाप धांवतें. सारांश एखाद्याच्या छायेप्रमाणें मनुष्यानें केलेलें कर्म त्याच्या मागें धांवतें. ज्या मनुष्यानें जें कर्म पूर्वीं केलें असेल तें त्याचेंच कर्म त्याला पुढें भोगावें लागतें. कर्माचा लोप, कर्मांचें विधान व त्याचें रक्षण या संबंधाच्या नियमांनीं सारख्याच बद्ध असलेल्या प्राणिमात्रांना हा काल चोहींकडून ओढीत असतो. ज्याप्रमाणें फलें आणि पुष्पें बाह्य प्रेरणेवांचूनहि योग्य काळीं परिपक्व होतात, त्याप्रमाणें मनुष्यानें केलेलें कर्म योग्य काळीं आपलें फळ कर्त्याला दिल्यावांचून रहात नाहीं. मानापमान, लाभालाभ, किंवा ऐश्वर्य अथवा अधोगति यांची प्रवृत्ति बंद करणें हें कोणाच्याहि हातचें नाहीं व मनुष्य आत्मज्ञानानें सर्वथा मुक्त होईपर्यंत प्रत्येक जन्मांत ह्या द्वंद्वांचें रहाटगाडगें पावलोपावलीं असेंच चालावयाचें. मनुष्यानें पूर्वजन्मांत आचरलेलें पाप किंवा पुण्य त्याला पुनः जन्म घेऊन भोगावें लागतें. मनुष्य बाल असो, तरुण असो, किंवा वृद्ध असो, त्यानें त्या त्या अवस्थेंत केलेलीं कर्में त्याला

जन्मोजन्मीं भोगावीं लागतात. वांसरूं ज्याप्रमाणें हजारों गाईंच्या कळपांतून आपली आई अचूक हुडकून काढतें, त्याचप्रमाणें पूर्वजन्मीं केलेलें पापपुण्य कर्त्याला आपोआप हुडकीत येतें. मलिन वस्त्र ज्याप्रमाणें पाण्यानें धुतलें म्हणजे स्वच्छ होतें त्याप्रमाणें उपवासादि तपश्चर्येनें पापी माणसाला दीर्घकालपर्यंतचें सुख प्राप्त होतें. हे बुद्धिमंता युधिष्ठिरा, दीर्घकालापर्यंत तपश्चर्या केल्यानें व धर्माचरणानें मनुष्यांचीं पातकें नाहींशीं होतात व त्यांचे मनोरथ सिद्धीला जातात. आकाशामध्यें ज्याप्रमाणें पक्ष्यांचीं पावलें दिसत नाहींत किंवा माशांचीं पावलें जशीं पाण्यांत दिसत नाहींत, तसाच पुण्यवान् माणसांच्या गतीचा मार्गहि सांपडत नाहीं. असो. दुसऱ्यांची निंदा करणें किंवा त्यांचे दोष चव्हाट्यावर मांडणें यापासून कांहीं एक फायदा नाहीं. तेव्हां मनुष्यानें स्वतःला पथ्यकर, अनुरूप आणि सुंदर अशा गोष्टी नेहमीं आचराव्या. १२. ३. ३२२.

---

## अध्याय ३२३ वा.

[ १. शुकोत्पत्ति. ]

( १ ) युधिष्ठिर—व्यासांच्या पोटीं महातपस्वी धर्मात्मा शुकाचार्य कसे जन्माला आले, व त्यांना श्रेष्ठ प्रकारची सिद्धि कशी मिळाली, तें हे पितामहा, मला सांगा. व्यास महर्षींना शुकाचार्य हे कोणत्या स्त्रीपासून झाले ? शुकाचार्यांच्या जननीचें नांव व त्यांच्या जन्माची हकिगत मला माहीत नाहीं, ती आपण मला सांगा. शुकाचार्य हे बाल असतांनाच त्यांची बुद्धि सूक्ष्म ज्ञानामध्यें कशी शिरली—त्यांच्या बुद्धीला ज्ञानाचें आकलन कसें झालें—हें मला कळलें नाहीं. या जगांत दुसऱ्या कोणाहि माणसानें इतक्या कोंवळ्या वयांत असें ज्ञान संपादन केल्याचें आमच्या ऐकिवांत नाहीं. म्हणून हे बुद्धिमंता, ही हकिगत आपल्यापासून ऐकून घ्यावयाची माझी इच्छा आहे. आपल्या मुखांतून स्रवणारें हें अमृतासारखें भाषण कितीहि ऐकिलें तरी माझी तृप्तीच होत नाहीं. शुक्राचार्यांचें माहात्म्य, त्यांना प्राप्त झालेली योगसिद्धि व त्यांचें ज्ञान या संबंधाची माहिती योग्य क्रमानें आपण मला सांगा.

भीष्म—युधिष्ठिरा, ऋषींनीं धर्मस्थापना जी केली ती त्यांच्या वयाच्या बलावर नव्हे, पांढऱ्या केंसांच्या बलावर नव्हे, पैशाच्या बलावर नव्हे, आप्तेष्टांच्या साहाय्यानें नव्हे तर, ही धर्मस्थापना वेदाध्ययनाच्या बलावर झालेली

आहे. जो वेदाध्ययन करितो तोच महात्मा होय. हे पांडवा, ज्या ज्या गोष्टी तूं मला विचारल्यास त्या सर्वांचें मूल अधिष्ठान म्हणजे तपश्चर्या आहे. आणि इंद्रियांचें नियमन केल्यावांचून तपश्चर्या होत नाहीं. जितेंद्रियालाच तपश्चर्या शक्य आहे. इंद्रियांचा पगडा आपल्यावर बसूं दिल्यानें मनुष्याच्या हातून निःसंशय दोष घडतात, पण तींच इंद्रियें त्यानें ताब्यांत ठेविलीं म्हणजे त्याला सिद्धि प्राप्त होते. हजारों अश्वमेध यज्ञ किंवा शेंकडों वाजपेय यज्ञ जरी मनुष्यानें केले तरी त्याला योगसाधनाच्या सोळाव्या हिश्शाइतकीहि किंमत नाहीं. असो. मी तुला शुकाचार्यांची जन्मकथा व अज्ञानी लोकांना न मिळणारी अशी त्यांना प्राप्त झालेली गति या संबंधाची माहिती सांगतों, ती ऐक.

पूर्वी एके काळीं मेरूपर्वताच्या शिखरावरील एका कर्णिकार वृक्षांनीं भरलेल्या वनामध्यें भगवान् शंकर आपल्या भयंकर भूतगणांसहवर्तमान विहार करीत होते. भगवती देवी पार्वती हीहि पण त्या वेळीं तेथें होती. कृष्णद्वैपायन व्यासांनीं त्या मेरूपर्वताच्या शिखरावर अत्यंत उग्र अशी तपश्चर्या केली. त्या योगधर्मामध्यें पारंगत असलेल्या व्यासऋषींनीं योगबलाच्या सामर्थ्यावर स्वतःचा आत्म्याच्या ठिकाणीं लय करून पुत्रप्राप्त्यर्थ घोर तपश्चर्या आरंभिली. त्यांनीं आपल्या तपश्चर्येनें देवेश शंकरांना संतुष्ट केलें व त्यांच्यापासून आपल्याला अग्नि, पृथ्वी, जल, वायु आणि आकाश यांच्या सारखा धैर्यवान् पुत्र व्हावा, असा वर मागून घेतला. ज्यांच्या हातून पुण्याचरण घडत नाहीं, त्यांना असले वर मिळणें कठिण असतें. त्या व्यासप्रभूंनीं शंभर वर्षें वायुभक्षण करून अनेक रूपें धारण करणाऱ्या महादेव उमापतीची आराधना केली. त्या ठिकाणीं सर्व ब्रह्मर्षि, सर्व राजर्षि, सगळे लोकपाल, साध्यदेव, अष्टवसु, बारा आदित्य, एकादश रुद्र, चंद्र, सूर्य, मरुद्गण, सप्तसागर, सगळ्या नद्या, अश्विनौ देव, गंधर्व, नारद आणि पर्वत हे ऋषि, विश्वावसु गंधर्व, सिद्ध व अप्सरा हीं सर्व भगवान् शंकराची आराधना करण्याकरितां जमलीं होतीं. त्यावेळीं शंकरांनीं कर्णिकारफुलांची माळ गळ्यांत धारण केली होती व त्यामुळें चांदण्यानें चंद्र शोभावा तसे भगवान् शंकर शोभून दिसत होते. अशा त्या देव आणि देवर्षींनीं गजबजलेल्या दिव्य आणि रम्य वनामध्यें वेदव्यासऋषींनीं पुत्राकरितां योगमार्गानें तपश्चर्या केली. ते तपश्चर्या करीत असतांना त्याचें बल कोणत्याहि प्रकारें कमी झालें नाहीं. त्यांना केव्हांहि ग्लानि आली नाहीं. असली त्यांची तपश्चर्या पाहून त्रैलोक्यांतल्या सर्व लोकांना आश्चर्य वाटलें. व्यासांच्या अंगीं त्यावेळीं योगबलाचें

तेज संचरलें असल्यानें त्यांच्या जटा अग्नीच्या ज्वालांप्रमाणें तेजानें तळपत होत्या. ही सगळी हकीगत भगवान् मार्कंडेय ऋषींनीं मला सांगितली व आतांपर्यंत सर्व देवचरित्रेंहि तेच मला सांगत आले आहेत. त्या तपश्चर्येच्या प्रभावानें भगवान् व्यासाच्या जटा ज्या एकदां अग्नीसारख्या पिंगट झाल्या आहेत त्या अद्याप तशाच आहेत. व्यासांच्या ह्या असल्या तपश्चर्येनें व भक्तीनें भगवान् महेश्वर शंकर प्रसन्न झाले व त्यांनीं मनाशीं कांहीं वेळ विचार करून हांसत हांसत व्यासांना सांगितलें कीं "तूं मागितलास तसा पुत्र तुला होईल! ज्याप्रमाणें अग्नि, वायू, भूमि, जल आणि आकाश हीं पंच-महाभूतें शुद्ध आहेत तसाच तुझा मुलगाहि पण शुद्ध स्वरूपाचा होईल. मी पर-ब्रह्म आहें अशीच भावना तुझ्या मुलाच्या ठिकाणीं उत्पन्न होईल, परब्रह्माच्या ठिकाणीं त्याची श्रद्धा जडेल, तो ब्रह्मरूपाशीं तादात्म्य पावेल, व त्याच्या ठिकाणीं निरंतर वास करील, आणि आपल्या तेजानें त्रैलोक्य व्यापून दिगंत कीर्ति मिळवील." १२. ३. ३२३.

---

## अध्याय ३२४ वा.

[ १. शुकोत्पत्ति. ]

(१) भीष्म—सत्यवतीसुत व्यासांना भगवान् शंकरांपासून उत्तम प्रकारचा वर मिळाला आणि त्यांनीं अग्नि उत्पन्न करण्याच्या इच्छेनें दोन अरणी घेऊन त्यांचें मंथन केलें. हे राजा, अरणी एकावर एक घांसल्याबरोबर स्वतःच्या तेजानें आणि सौंदर्यानें तळपणारी अशी घृताची नांवाची अप्सरा त्यांना दिसली. ती अप्सरा पाहिल्याबरोबर त्या वनामध्यें भगवान् व्यासऋषि एकदम काममोहित झाले आणि व्यासांना कामानें घेरलेलें पाहिल्याबरोबर ती घृताची शुकीचें रूप धारण करून तेथें आली. त्या अप्सरेला दुसरें रूप धारण करून आलेली पाहिल्याबरोबर व्यासऋषींच्या सर्व शरीरामध्यें कामाचा संचार झाला. त्या मुनिश्रेष्ठानें मोठ्या धैर्यानें आपला मनोविकार दाबण्याचा प्रयत्न केला; परंतु, त्यांना आपलें चंचल मन आवरतां आलें नाहीं. पुढें होणाऱ्या अनिवार्य भवितव्यामुळें व्यासऋषींना आपलें मन आवरतां आलें नाहीं, इतकेंच नव्हे, तर ते घृताचीच्या सौंदर्यजालांत अधिकच सांपडले. त्यांनीं मोठ्या प्रयत्नानें आपलें मन आवरण्याचा प्रयत्न केला पण व्यर्थ. अखेर अग्निमंथन करण्याच्या इच्छेनें

ते अरणी घांशीतच राहिले; आणि त्या अरणीवरच त्यांचें वीर्यस्खलन झालें. असा प्रकार झाला तरी सुद्धां व्यासऋषींनीं अरणी घांसण्याचा क्रम तसाच चालू ठेवला, त्यामुळें व्यासांचें अरणीवर पडलेलें वीर्य घुसळल्यासारखें होऊन त्यांतून तेजस्वी शुकाचार्यांचा जन्म झाला. अरणीमधून जन्माला आलेले ते मुनिश्रेष्ठ, महायोगी शुकाचार्य आपला हविर्भाग वाहून नेणाऱ्या यज्ञिय अग्नीप्रमाणें तेजस्वी दिसूं लागले. हे गुरुश्रेष्ठा, पित्याचें अनुपम रूप आणि वर्ण हीं त्या शुकाचार्यांच्या ठिकाणीं दिसत होतीं. अशा रीतीनें स्वतःच्या तेजानें तळपणारे शुकाचार्य जन्माला आले व ते निर्धूम अग्नीप्रमाणें शोभून दिसत होते. हे राजा, सर्व नद्यांमध्यें श्रेष्ठ असलेली जी गंगा तिनें प्रत्यक्ष त्या मेरुपृष्ठावर येऊन आपल्या पाण्यानें शुकाचार्यांना संतुष्ट केलें. त्या महात्म्या शुकाचार्यांच्या उपयोगासाठीं अंतरिक्षांतून देवांनीं दंड आणि कृष्णाजिन टाकलें; गंधर्वांनीं गायन सुरू केलें; अप्सरांनीं नाच आरंभिला व देवांचीं दुंदुभि वगैरे वाद्यें मोठमोठ्यानें दुमदुमूं लागलीं. विश्वावसु गंधर्व, नारद तुंबर ऋषि, हाहा व हूहू नांवाचे गंधर्व या सर्वांनीं शुकजन्माचें अभिनंदन केलें. तसेंच, त्या ठिकाणीं सर्व लोकपाल, देव, देवर्षि, ब्रह्मर्षि हे इंद्राला पुढें घालून जमा झाले. सर्व प्रकारच्या सुगंधि पुष्पांची वृष्टि तेथें होऊं लागली व सर्व स्थावरजंगम जगत् शुकजन्माच्यामुळें आनंदित झालें. व्यासपुत्र शुकाचार्य जन्मास आले न आले तोंच भगवान् शंकरानें पार्वतीसहवर्तमान तेथें येऊन त्यांचें अभिनंदन केलें व त्यांना आपले शिष्य केलें. देवेश्वर इंद्रानें शुकाचार्यांना एक सुंदर कमंडलु व स्वर्गीय वस्त्रें दिलीं. त्यावेळेस हंस, शतपत्र, पोपट, चास व शेंकडों सारस शुकाला उजवी घालून गेले. अशा तऱ्हेनें अरणीमधून मोठ्या अद्भुत रीतीनें जन्म पावलेले ते महातेजस्वी, बुद्धिमान् व व्रतनिष्ठ शुकाचार्य त्याच ठिकाणीं राहिले. सर्व वेद ज्याप्रमाणें व्यासांना आपोआप प्राप्त झाले त्याचप्रमाणें शुकाचार्य जन्मास आले न आले तोंच सर्व वेद, सांग, सरहस्य, ससंग्रह असे त्यांच्या सेवेला उभे राहिले. वेद, वेदांगें व भाष्यें यांचें परिपूर्ण ज्ञान असलेल्या त्या शुकाचार्यांनीं बृहस्पतीला लौकिकाचार पाळण्यासाठीं म्हणून गुरु केलें. हे राजा, उपाध्यायांना धर्मस्वरूप मानून त्यांनीं (शुकाचार्यांनीं) बृहस्पतीजवळ सरहस्य आणि ससंग्रह अशा वेदांचें अध्ययन केलें. तसेंच सर्व इतिहास आणि राजशास्त्र यांची त्यांनीं माहिती करून घेतली व गुरूला दक्षिणा देऊन त्यांनीं आपली विद्या संपविली. पुढें ब्रम्हचर्यव्रतानेंच राहून त्यांनीं अतिशय उग्र अशी तपश्चर्या आरंभिली. आपल्या ज्ञानानें व




**शंकर**—तूं मागितलास तसा पुत्र तुला प्राप्त होईल. ज्याप्रमाणें अग्नि, वायु, भूमि, जल आणि आकाश हीं पंच-महाभूतें शुद्ध आहेत, तसाच तुझा मुलगाहि शुद्ध स्वरूपाचा होईल. ( शांतिपर्व, अध्याय ३२३, पृष्ठ ३९१. )

तपश्चर्येनें ते तपस्वी शुक्राचार्य लहान वयांत सुद्धां देवता आणि ऋषि यांना पूज्य होऊन बसले. हे राजा, मोक्षधर्माकडे शुकाचार्यांचें लक्ष लागल्यामुळें गृहस्थाश्रमावर अधिष्ठित असलेले जे ब्रम्हचर्य, गार्हस्थ्य आणि वानप्रस्थ असे तीन आश्रम त्यांच्याकडे त्यांचें लक्ष लागेना. १२.३.३२४.

---

## अध्याय ३२५ वा.

[ १. शुकाचार्य व्यासांना मोक्षधर्माविषयीं प्रश्न विचारतात. ]

**भीष्म**—मोक्षमार्गाचा विचार करीत करीत ते शुकाचार्य व्यासांच्याकडे आले, व त्यांनीं गुरुसमान असलेल्या आपल्या पित्याला आपलें कल्याण व्हावें या इच्छेनें व मोठ्या विनयानें मोक्षधर्मासंबंधानें प्रश्न विचारले.

**शुक**—भगवन्, आपण मोक्षधर्मामध्यें अत्यंत कुशल आहांत तेव्हां माझ्या चित्ताचें पूर्ण समाधान ज्या तऱ्हेनें होईल त्या तऱ्हेनें हे मोक्षधर्म आपण मला सांगा.

**भीष्म**—पुत्राचें तें वचन ऐकून महर्षि व्यासांनीं त्यांना अनेक प्रकारच्या धर्मांचें व मोक्षशास्त्राचें अध्ययन करण्यास सांगितलें. पित्याच्या आज्ञेवरून धर्मज्ञांमध्यें श्रेष्ठ असलेल्या शुकाचार्यांनीं सर्व योगशास्त्राचें व कापिलसांख्य-शास्त्राचें परिपूर्ण अध्ययन केलें. आपला पुत्र दैवी संपत्तीनें युक्त झाला, ब्रह्मदेवासारखा पराक्रमी व मोक्षशास्त्रज्ञ झाला असें पाहून भगवान् वेदव्या-सांनीं त्याला सांगितलें कीं, तूं मिथिलेश्वर जनक राजाकडे जा. तो तुला मोक्ष-धर्म सांगेल. शुकाचार्यांनीं पित्याचा निरोप घेतला आणि धर्मांची परमश्रेष्ठ अवस्था असें जें मोक्षरूप त्याच्यासंबंधानें त्याला प्रश्न विचारले. व्यासांनीं शुकाचार्यांना सांगितलें होतें कीं, जनकराजाकडे जातांना सामान्य मनुष्यें ज्या मार्गानें जातात, त्याच मार्गानें तूं जा. योगसिद्धीच्या बलावर एकदम अकस्मात् त्याच्यापुढें उभा राहूं नको; किंवा आकाशमार्गानेंहि जाऊं नको. जनकाकडे सरळ साधेपणानें जा. आपल्याला सुख मिळेल ह्या आशेनें जाऊं नको. वाटेनें उगीच नसत्या बारीकसारीक गोष्टींची चौकशी करीत बसूं नको. असली चौकशी केल्यामुळें कदाचित् तूं संकटांत सांपडण्याचा संभव आहे. त्या जनक-राजाकडून आपल्याला यज्ञ करावयाचे आहेत. तो आपला यजमान आहे, तेव्हां

त्याच्याशीं ताठ्यानें वागूं नको, तो सांगेल तसा वाग. तो तुझ्या मनांतले सर्व संशय फेडील. तो धर्मकुशल राजा मोक्षशास्त्रांत विशारद आहे. मी त्याच्याकडून यज्ञ करवीत असतों तेव्हां तो जें जें सांगेल तें तें निःशंक मनानें कर. व्यास महर्षींनीं असें सांगितल्यानंतर धर्मात्मा शुकाचार्य हे मिथिला नगरीला गेले. समुद्रासकट सर्व पृथ्वी आकाशमार्गानें पालथी घालण्याचें सामर्थ्य असूनहि भगवान् शुकाचार्यांनीं मिथिलेपर्यंतचा प्रवास पायांनींच केला. मोठमोठाले पर्वत, नद्या, तीर्थें, सरोवरें, हत्ती व हरिणें यांनीं भरलेलीं अनेक अरण्यें, इलावर्त, हरिवर्ष, किं-पुरुषवर्ष इत्यादि सर्व देशांचें आक्रमण करून शुकाचार्य भारतवर्षांत आले. चीन, हूण इत्यादि लोकांनीं भरलेले नानाप्रकारचे देश पहात पहात ते मुनिश्रेष्ठ शुक्राचार्य या आर्यावर्त देशामध्यें आले. पित्याच्या आज्ञेवरून मोक्षशास्त्राचाच विचार करीत करीत, एखादा पक्षी जसा अंतरिक्षांतून फिरावा त्याप्रमाणें शुकाचार्य आपल्या मार्गानें चालले होते. वाटेनें त्यांना नानाप्रकारचीं रम्य गांवें, मोठमोठीं शहरें, नानाप्रकारचीं रत्नें दिसलीं. परंतु, त्यांचें लक्ष आपल्याच विषयांत रमलेलें असल्यामुळें त्यांना तीं दिसून न दिसून सारखींच होतीं. नानाप्रकारच्या रम्य बागा, तशींच अनेक सुंदर देवळें, हींहि पण त्यांना वाटेनें लागलीं. त्यांनीं अनेक प्रकारचीं रत्नेंहि पण पाहिलीं. अशा तऱ्हेनें शुकाचार्य थोडक्याच कालामध्यें महात्म्या जनकराजानें पुत्रवत् पालन केलेल्या त्या विदेह देशांत आले. त्या विदेह देशांत नानाप्रकारच्या षड्रसान्नाच्या साहित्यानें भरलेले मोठमोठे गांव, मोठमोठे समृद्ध गौळवाडे, हंसांनीं व सारस पक्ष्यांनीं सेविलेलीं अशीं नानाप्रकारच्या कमलांनीं युक्त असलेलीं सरोवरें व भात आणि जवस यांनीं समृद्ध असलेले प्रदेश पहात पहात व श्रीमंत आणि सुखवस्तु लोकांनीं गजबजलेले प्रदेश ओलांडित ते शुकाचार्य अत्यन्त समृद्ध व रमणीय असणाऱ्या अशा मिथिला नगरीच्या बागेपर्यंत येऊन पोहोंचले. त्या बागेमध्यें हत्ती, घोडे आणि रथ हीं होतीं व नानाप्रकारच्या स्त्रीपुरुषांनीं ती बाग फुललेली होती. परंतु त्यांच्याकडे जवळ जवळ दुर्लक्ष करून शुकाचार्य मिथिला नगरींत आले. त्यांच्या मनामध्यें एकसारखा तोच विचार चाललेला होता, आणि त्यांचें चित्त त्याच विचारानें प्रसन्न झालेलें होतें. मिथिलेच्या वेशीपाशीं आल्यानंतर शुकाचार्यांनीं निःशंकपणें आंत प्रवेश केला. परंतु, त्या ठिकाणीं तेथल्या पहारेकऱ्यानें त्यांचा तीव्र शब्दांनें निषेध केला. त्या द्वारपालांपैकीं कोणालाहि शुकाचार्य हे उन्हानें, वाटेच्या श्रमानें, भुकेनें किंवा तहानेनें व्याकुळ झाले

आहेत असें दिसलें नाहीं, व कोणत्याहि प्रकारचें रागाचें चिन्ह न दाखवितां ते तसेच तेथें उभे राहिले होते. शुकाचार्यांना उन्हाचा त्रास होत नाहीं, त्यांना ग्लानि येत नाहीं किंवा ते ऊन्हांतून बाजूलाहि जात नाहींत असें पाहून त्या द्वारपालांपैकीं एकाला वाईट वाटलें. माध्यान्हीं आलेल्या सूर्याप्रमाणें आत्म-तेजानें तळपणाऱ्या शुकाचार्यांना त्यानें हात जोडून नमस्कार केला व त्यांची यथाशिस्त रीतीनें पूजा करून त्यांना राजवाड्याच्या दुसऱ्या चौकांत नेलें. त्या चौकांत बसूनहि शुकाचार्यांनीं मोक्षचिंतन केलें व ऊन आणि सावली यांचें सुखदुःख सारखेंच मानलें. शुकाचार्यांचें तेज उन्हांत काय किंवा सावलींत काय, सारखेंच चमकत असे. शुकाचार्यांना दुसऱ्या चौकांत येऊन थोडा वेळ झाला नाहीं तोंच जनकराजाचे प्रधान त्या ठिकाणीं आले व त्यांनीं मोठ्या आदरानें त्यांना राजवाड्याच्या तिसऱ्या चौकांत नेलें. त्या ठिकाणीं खास स्त्रियांच्या करितां म्हणून असलेलें, कुबेराच्या चैत्ररथ उद्यानासारखें मोठें, जागजागीं जलक्रीडा करण्यासाठीं ज्यांत मोठाल्या पुष्करणी आहेत असें फुललेल्या झाडांनीं युक्त असलेलें प्रमदावन होतें. राजमंत्र्यांनीं त्यांना त्या ठिकाणीं नेलें. तेथें त्यांना एका आसनावर बसवून तो मंत्री तेथून निघून गेला. नंतर सुंदर वेष धारण केलेल्या, दिसावयास सुंदर असणाऱ्या, तरुण, पुष्ट अंगाच्या, तांबडट रंगाचीं वस्त्रें धारण केलेल्या, तप्त कांचनाचीं भूषणें अंगावर घातलेल्या, संभाषण करण्यांत कुशल, नृत्य व गीत या कला पूर्णपणें जाणणाऱ्या, दुसऱ्याशीं नेहमीं हंसून गोड बोलणाऱ्या, रूपानें अप्सरांसारख्या असणाऱ्या, कामोपचारांमध्यें प्रवीण, दुस-ऱ्याच्या अंन्तकरणांमधला भाव जाणणाऱ्या, व सर्वज्ञ अशा पन्नास वारयोषिता त्या ठिकाणीं आल्या व पाद्यादिक उपचारांनीं त्यांनीं त्या शुकाचार्यांची पूजा केली व त्या काळांत उपलब्ध असलेलें गोडगोड अन्न देऊन त्यांचा संतोष केला. शुकाचार्यांचें भोजन झाल्यानंतर त्यांनीं तें अंत:पुरांतलें सुरम्य उपवन त्यांना भागशः दाखविलें व हें दाखवीत असतांना त्या उपवनामध्यें त्या सारख्या हंसत, खेळत आणि गात होत्या. त्या सत्वज्ञ स्त्रियांनीं उदारचरित शुकाचार्यांची पूजा केली, पण त्या शुद्धात्म्या आरणेय शुकाचार्यांना कोणत्याहि प्रकारचा विकल्प बाधला नाहीं व ते निर्विकार मनानें आपलीं कर्में करीत होते. त्यांनीं सर्व इंद्रियें आपल्या स्वाधीन ठेविलीं होतीं, क्रोध आणि द्वेष जिंकिला होता, ते राग आणि द्वेष यांच्या पलीकडे गेले होते. त्या स्त्रियांनीं देवांना योग्य असें रत्नखचित आसन आणि शय्या त्यांना दिली होती. त्या आसनावरचें आस्तरणहि पण दुसऱ्यांनीं

हेवा करण्यासारखें होतें. हातपाय धुवून व संध्यादि नित्यकर्मे आटोपून शुकाचार्य त्या आसनांवर बसले खरे, पण मनांत चिंतन मात्र मोक्षधर्मांचेंच चाललें होतें. अशा तऱ्हेनें रात्रीचा पूर्वभाग ध्यानस्थ स्थितींत घालवून शुकाचार्यांनीं मध्यरात्रीं झोंप घेतली व नंतर मुहूर्तभरानें उठून पुनः हातपाय धुवून ध्यानाला सुरवात केली. त्यांच्या भोंवतालचा स्त्रियांचा परिवार तसाच कायम होता. तो धैर्याचा मेरू शुकाचार्य त्या स्त्रियांच्या सहवासांत क्षणमात्रहि डगमगला नाहीं, व त्यानें तो उरलेला दिवस आणि पुढील रात्र त्या राजकुलांत तेथेंच घालविली. १२.३.३२५.

## अध्याय ३२६ वा.

### [ शुकजनक-संवाद. ]

**भीष्म**—हे राजा, नंतर त्या जनकानें आपले सर्व मंत्री, पुरोहित व अंतःपुरांतल्या स्त्रिया यांना बरोबर घेऊन, नाना प्रकारचीं रत्नें, उत्तम उत्तम आसनें व पूजासाहित्य घेऊन व्यासपुत्र शुकाचार्य यांचें स्वागत केलें. दुसऱ्यांना ज्याचा हेवा वाटावा अशा आस्तरणानें आच्छादलेलें, नानाप्रकारच्या रत्नांनीं भूषित व सर्व बाजूंनीं कल्याणकारक असलेलें तें मंगल आसन पुरोहिताच्या हातांतून आपल्या हातांत घेऊन जनकराजानें त्या व्यासपुत्र शुकाचार्यांना अर्पण केलें व त्या आसनावर त्यांना बसवून त्यांची शास्त्रोक्त रीतीनें पूजा केली. प्रथम पाद्य व नंतर अर्घ्य देऊन त्या राजानें शुकाचार्यांना एक गाय अर्पण केली. याप्रमाणें जनकानें केलेली ती समंत्रक पूजा ग्रहण करून त्या गाईचा शुकाचार्यांनीं स्वीकार केला व राजाचा गौरव करून त्याला त्याचें कुशल वृत्त विचारिलें. तसेंच त्याच्या बरोबर असलेल्या इतर लोकांचाहि समाचार घेऊन शुकांनीं जनकाला बसण्याला अनुज्ञा दिली. शुकांची आज्ञा होतांच तो कुलीन आणि उदार हृदयाचा राजा हात जोडून जमिनीवरच बसला व त्यानें शुकांना त्यांचें कुशल विचारिलें आणि "आपण इकडे कां आलां," असा प्रश्न केला.

**शुक**—राजा, तुझें कल्याण असो. मला माझे पिते व्यास ऋषि यांनीं सांगितलें कीं, विदेह देशाचा राजा जनक हा आमचा यजमान असून तो मोक्षशास्त्रांत प्रवीण आहे असें आमच्या ऐकिवांत आहे. मोक्षशास्त्रासंबंधानें तुझ्या अंतःकरणांत जर कांहीं संशय असेल, प्रवृत्तिधर्माबद्दल अगर निवृत्तिधर्माबद्दल

जर कांहीं शंका असतील तर त्यांचें निवारण त्याच्या हातून होईल. म्हणून वडिलांच्या आज्ञेवरून तुला मोक्षधर्मासंबंधानें प्रश्न विचारण्यासाठीं मी येथें आलों आहें; तेव्हां, हे ज्ञानश्रेष्ठा, मला हें ज्ञान तूं यथायोग्य रीतीनें सांग. ब्राह्मणानें या जगांत जन्माला येऊन काय करावयाचें, मोक्ष म्हणजे काय, तो ज्ञानानें मिळतो कीं तपानें मिळतो या सर्व गोष्टींचा उलगडा करून मला आपण सांगा.

जनक—ब्राह्मणानें जन्मास आल्यापासून जीं जीं कार्यें करावयाचीं असतात तीं मी तुला सांगतों, ऐक. उपनयन झाल्यानंतर वेदाध्यन करून ब्राह्मणानें त्यामध्यें पारंगत व्हावें. तपश्चर्येनें, गुरुशुश्रूषेनें ब्रह्मचर्यामध्यें काळ काढावा, देवांचें आणि पितरांचें ऋण फेडावें, जितेंद्रिय राहून वेदाध्ययन केल्यानंतर गुरूला दक्षणा द्यावी आणि त्याची अनुज्ञा घेऊन मग समावर्तन करावें. गृहस्थाश्रमांत पाऊल ठेवल्यानंतर स्वस्त्रीच्याच ठिकाणीं संतुष्ट रहावें. कोणाचाहि हेवा करूं नये व यथान्याय अग्निहोत्राचें पालन करावें. आपल्या पोटीं पुत्र, व पुत्राच्या पोटीं पुत्र झाला म्हणजे वानप्रस्थाश्रम स्वीकारावा व शास्त्रोक्त रीतीनें अतिथींची सेवा करीत पूर्वींचेंच अग्निहोत्र पुढें चालवावें. शेवटीं धर्मज्ञ ब्राह्मणानें निर्द्वंद्व व निर्वासन होऊन अग्नींचा लय आपल्या ठिकाणीं करावा आणि संन्यासाश्रम घ्यावा.

शुक—चित्त द्वंद्वातीत झालें व ज्ञान-विज्ञान उत्पन्न झालें म्हणजे संन्यासा-पूर्वींच्या तीन्ही आश्रमांचें पालन करणें आवश्यकच आहे काय, अशी मला या ठिकाणीं शंका येते, ती आपण उलगडून सांगावी. शास्त्रांनीं याचा उलगडा कसा केला आहे तें आपण मला सांगा.

जनक—ज्ञानविज्ञानावांचून मोक्षप्राप्ति नाहीं व गुरूवांचून ज्ञान नाहीं. भवसागर तरून जाण्याला ज्ञान ही एकच नौका आहे व गुरु हा त्या नौकेचा कर्णधार आहे. गुरूच्या साहाय्यानें ज्ञान मिळवून कृतकृत्य झाल्यानंतर व हा भवसागर तरून गेल्यानंतर या दोघांनाहि टाकून आपण परब्रह्मरूपीं लीन व्हावें. लोकांचा बुद्धिभेद होऊं नये व कर्मांचाहि उच्छेद होऊं नये, येवढ्याकरितां चारी आश्रमांतील नाना प्रकारच्या कष्टांनीं भरलेला धर्म आपल्या पूर्वींच्या लोकांनीं आचरिला. नाना प्रकारच्या जन्ममालिकांमधून जात जात, याच प्रकारच्या कर्मांचें आचरण करीत व अखेर सर्व शुभाशुभ कर्मांचा त्याग करून मनुष्यानें मोक्षाची

मजल गांठली आहे. पूर्वजन्मांमध्यें इंद्रियादिकांचें दमन करून आत्म्याचें शोधन झालें असल्यामुळें एखाद्या शुद्धात्म्या मनुष्याला कदाचित् पहिल्याच आश्रमामध्यें मोक्षप्राप्ति होईल. मोक्षप्राप्ति झाल्यानंतर व ईश्वराचा साक्षात्कार झाल्यानंतर ब्रह्मचार्यादि तीन्ही आश्रमांमध्यें त्याच्या दृष्टीनें कांहींच अर्थ उरणार नाहीं. मुमुक्षु पुरुषानें राजस व तामस दोष नेहमीं टाळावे व सात्विक मार्गाचा अवलंब करून स्वतःचा लय स्वतःच्या ठिकाणीं करावा. सर्व भूतें आपल्या ठिकाणीं आहेत आणि आपणहि सर्व भूतांच्या ठिकाणीं आहोंत, असें ज्ञान करून घेऊन जलापासून अलिप्त असणाऱ्या जलचर प्राण्याप्रमाणें या सर्वांपासून अलिप्त असावें. पृथ्वी-वरून आकाशांत संचार करणारा पक्षी एका पर्वतावरून दुसऱ्या पर्वतावर जातांना जसा पर्वताच्या अनुसंधानानें उंच किंवा सखल मार्गानें जात नाहीं, तसाच ज्ञानी पुरुष देहाची आसक्ति सोडून व द्वंद्वातीत होऊन परब्रह्मपदाला जातो. या संबंधानें राजा ययातीनें पूर्वीं कांहीं गाथा म्हटलेल्या होत्या व त्या गाथा मोक्षधर्मज्ञ ब्राह्मणांनीं अद्याप ध्यानांत ठेविल्या आहेत. सर्व प्राणिमात्रांमध्यें भरून राहिलेलें व स्वतःच्या अंतरात्म्याच्या ठिकाणीं स्थित असलेलें असें ब्रह्मतेज, अंतःकरणाचें नियमन करून स्वरूपीं लय लावणाऱ्या पुरुषाला त्याचें त्यालाच दिसतें. तें दुसऱ्यांनीं दाखवून दिसत नाहीं किंवा दुसऱ्याला दाखवितांहि येत नाहीं. ज्याला दुसरे भीत नाहींत व ज्याला कोणापासूनहि भय नाहीं, ज्याला कसलीहि इच्छा नाहीं व जो कोणाचाहि द्वेष करीत नाहीं, त्याला ब्रह्मपदाची प्राप्ति होते. जेव्हां कोणत्याही प्राण्याच्या ठिकाणीं मनुष्य पापबुद्धि धरीत नाहीं व कायेनें, मनानें आणि वाचेनें कोणाचाहि द्वेष करीत नाहीं तेव्हांच त्याला मोक्ष-प्राप्ति होते. मनाचा आत्म्याच्या ठिकाणीं लय केला, जगाला मोह पाडणारी ईर्षा टाकली व काम आणि मोह यांचा त्याग केला, म्हणजे मनुष्य ब्रह्माशीं तादात्म्य पावतो. कोणतीहि श्रव्य किंवा दृश्य गोष्ट असो, ज्या वेळेस तिच्या बाबतींत जो सर्वांभूतीं समभाव धरतो आणि द्वंद्वातीत होतो, त्या वेळेला तो ब्रह्माशीं तादात्म्य पावतो. स्तुति आणि निंदा, सोनें आणि लोखंड, सुख आणि दुःख, शीत आणि ऊष्ण, ऐश्वर्य आणि दारिद्र्य, इष्ट आणि अनिष्ट व जीवित आणि मरण ह्या द्वंद्वांच्या पलीकडे गेल्यानंतर मनुष्य मोक्षाला लायक होतो. कांसव ज्याप्रमाणें आपलीं गात्रें प्रसृत करून पुन्हां आंखडून घेतें त्याप्रमाणें संन्याशानें मनाच्या साहाय्यानें इंद्रियांचें नियंत्रण करावें. अंधारानें व्यापलेलें घर ज्याप्रमाणें दीपाच्या साहाय्यानें दिसतें, तद्वत् बुद्धीच्या प्रदीपानें आत्म्याचें निरीक्षण करतां

येणें शक्य आहे. हे शुका, तूं सर्व बुद्धिमंतांमध्यें श्रेष्ठ आहेस, व तुझ्या ठिकाणीं हे सर्व गुण आहेत अशी मला खात्री आहे. याखेरीज जें जें या जगांत जाणण्यासारखें म्हणून आहे त्याचें ज्ञान तुला साकल्यानें झालेलें आहे. हे ब्रह्मर्षे, तुझें अध्ययन झालेलें आहे व तूं विषयांना जिंकलें आहेस. हा सर्व तुझ्या गुरूचा प्रसाद आणि तुझ्या अध्ययनाचें फळ होय. हे महामुने, त्याच व्यासगुरूंच्या प्रसादानें मला हें दिव्य ज्ञान झालें आणि त्याच्यामुळेंच मला तुझी योग्यता कळूं शकली. तुझें ज्ञान, तुझी ग्राहकशक्ति आणि तुझें ऐश्वर्य माझ्यापेक्षां अधिक आहे, पण तें तुझें तुलाच उमगत नाहीं. आपलें वय लहान आहे, त्यामुळें संशयानें, भीतीनें किंवा आपल्याला मोक्ष मिळणार नाहीं अशा समजुतीनें आपलें विज्ञान कोणच्या तोडीचें आहे याची आपली आपल्यालाच कल्पना नाहीं. म्हणून बुद्धीचा शुद्ध निश्चय करून माझ्यासारख्याच्याकडून आपण आपला संशय फेडून घेत आहां व अंतःकरणांतील कुशंकांचें जाळें तोडून आपली ज्ञानमार्गांतील गति वाढवीत आहां. आपल्याला ज्ञानप्राप्ति झालेली आहे. आपली बुद्धि स्थिर झालेली आहे. आपल्या अंगीं लोलुपता नाहीं. हे ब्रह्मन्, बुद्धीचा ठाम निश्चय झाल्यावांचून मनुष्याला मोक्षप्राप्ति होत नाहीं. आपल्या दृष्टीनें सुख आणि दुःख यांत फरक नाहीं, आपलें चित्त कोठेंही आसक्त झालेलें नाहीं. नृत्यगीतासंबंधानें आपल्या अंतःकरणांत उत्सुकता नाहीं व आपल्या मनांत कोणतीहि वासना उत्पन्न होत नाहीं. आप्तेष्टांच्या संबंधानें आपल्याला प्रेम नाहीं व भीतिप्रद गोष्टींचीहि आपणाला भीति वाटत नाहीं. हे महाभागा, आपल्याला मातीचें ढेंकूळ, दगड आणि सोनें सारखेंच आहे. आपण अक्षय, निराबाध आणि परमश्रेष्ठ अशा मोक्षमार्गाच्या वाटेवरच आहां असें मला दिसतें. आणि हें मला दिसतें एवढेंच नव्हे तर दुसऱ्याही कित्येक तपस्व्यांना आपली स्थिति दिसत आहे. ब्राह्मणानें जन्माला येऊन जें करावयाचें व ज्या स्थितीला मोक्षस्थिति म्हणतात त्याच स्थितीमध्यें आज आपण आहांत. आपणाला आणखी काय प्रश्न विचारावयाचे आहेत ते विचारा. १२-३-३२६

---

*

## अध्याय ३२७ वा.

[ हिमालयवर्णन ]

**भीष्मः**—जनकाचें हें वचन ऐकून, बुद्धि संशयरहित झालेले व त्यामुळें आपण कृतकृत्य झालों असे वाटणारे ते शुकाचार्य स्वतःचा लय आत्म्याच्या ठिकाणीं करून आणि आपणच ब्रह्मरूप आहोंत असें जाणून, सुखानें व शांतपणानें उत्तरेकडे हिमालय पर्वताच्या रोखानें वायुगतीनें चालले. त्याच वेळीं देवर्षि नारद हे हिमालय पर्वत पाहण्यासाठीं तेथें आले. त्या हिमालयावर सिद्ध व चारण रहात असत. तो पर्वत निरनिराळ्या प्रकारच्या मंजुळ आवाजांनीं भरून गेला होता. त्या ठिकाणीं हजारों किन्नर होते. भृंगे, मद्गु, खंजरीट, नाना प्रकारचे पक्षी, अनेक प्रकारचे आवाज काढणारे चित्रविचित्र रंगांचे मोर, राज-हंसांचे कळप व काळ्या कोकिळा यांनीं तो पर्वत गजबजलेला होता. पक्षिराज गरूड, हा त्या पर्वतावर नित्य वास करीत असे. चारी लोकपाल, ऋषिगणासहित सर्व देव, हे सगळे लोकांचें हित साधण्यासाठीं त्या पर्वतावर नित्य येत. त्या ठिकाणीं, पूर्वीं एकदां विष्णूनें पुत्रप्राप्तीसाठीं तपश्चर्या केली होती. याच पर्वतावर कुमार कार्तिकस्वामींनीं एक शक्ति लहानपणीं ठोकून ठेवली व सगळ्या जगाचा धिःकार करीत त्या स्कंदानें अशी गर्वोक्ति काढली कीं माझ्यापेक्षां जो सामर्थ्यानें अधिक असेल, ज्याच्या मनांतला ब्राह्मणांविषयींचा आदरभाव मजपेक्षांहि अधिक असेल, ब्राह्मणांचें रक्षण करण्याच्या कामीं जो स्वतःला अद्वितीय मानीत असेल व आपण त्रैलोक्यामध्यें वीर्यवान् आहोंत असें ज्याला वाटत असेल त्यानें मी रोवलेली ही शक्ति उपटावी किंवा निदान नुसती हलवावी तरी. कार्तिकस्वामींची ही गर्वोक्ति ऐकून ही शक्ति कोण उपटून काढील याविषयीं लोकांना मोठी चिंता लागून राहिली. या एकाच चिंतेनें सर्व देवांचीं अंतःकरणें आणि इंद्रियें व्याकुळ झालीं आहेत असें भगवान् विष्णूच्या निदर्शनाला आलें. देव, असुर आणि राक्षस या सर्वांचाच कुमार कार्तिकेयानें अपमान केला ही गोष्ट विष्णूला सहन झाली नाहीं. तेव्हां आतां देवादिकांचें कल्याण करण्याकरितां काय करावें असा विचार करीत करीत त्यांनीं आपली अग्नीसारखी प्रखर दृष्टि कुमार कार्तिकेयाकडे लावली व ती तेजानें तळपणारी शक्ति आपल्या उजव्या हातानें धरून हालविली. भगवान् विष्णु याप्रमाणें ती शक्ति हालवीत असतांना, पृथ्वी, तिच्या वरील सर्व पर्वत व अरण्यें



**व्यास**—शिष्यांनो, तुमचा सांप्रदाय वाढो, आणि वेदविद्येचा प्रसार करण्याचें कार्य तुमच्या हातून होवो. ही विद्या तुम्ही वाईट शिष्याला देऊं नये. जो पुण्यात्मा नाहीं व ज्यानें कोणत्याहि व्रताचें आचरण केलें नाहीं, असल्या शिष्याला कोणतीच विद्या सांगूं नये. ( शांतिपर्व, अ० ३५७, पृ० ४०२. )

कंपायमान होऊं लागलीं. ती शक्ति उपटून काढण्याचें सामर्थ्य असतांहि भगवान् विष्णूंनीं ती नुसती हालविली व स्कंदराजाच्या शक्तीचा बोज राखला. अशा प्रकारें, ती शक्ति हालवून भगवान् प्रल्हादाला म्हणतात, 'पहा हा कार्तिकेयाचा पराक्रम! असलें कर्म कोणाच्याहि हातून होण्यासारखें नाहीं.' प्रल्हादाला कार्तिकेयाची केलेली ही स्तुति सहन झाली नाहीं. म्हणून ती शक्ति उपटण्याचा निश्चय करून त्यानें त्या शक्तीला हात घातला पण त्याच्यानें ती हालेना. तेव्हां मोठा थोरला सुस्कारा सोडून तो त्या पर्वतावर मूर्च्छित पडला.

त्याच हिमालयाच्या एका बाजूस उत्तर दिशेला भगवान् शंकर नित्य दुष्कर तपाचरण करीत असत. त्यांचा आश्रम नेहमीं तेजस्वी अग्नीनें वेढलेला असे. त्या ठिकाणाचें नांव 'आदित्यपर्वत, असें असून त्या ठिकाणीं जाणें हें पापी लोकांना अत्यंत कठिण होई. यक्ष, राक्षस आणि दानव यांनाहि त्या ठिकाणीं जातां येत नसे. त्या जागेचा विस्तार दहा योजनें होता व ती नेहमीं अग्नीच्या ज्वालांनीं वेढलेली असे. भगवान् अग्निदेव स्वतः त्या ठिकाणीं वास करीत असत आणि धीमान् महादेवाचीं सर्व विघ्नें हरण करीत. त्या ठिकाणीं महाव्रत महादेवानें एका पायावर उभें राहून देवांचीं हजार वर्षेंपर्यंत तप केलें, व देवांच्या पोटांत भीति उभी केली.

त्याच पर्वताच्या पूर्व दिशेला, अगदीं एका बाजूच्या शिखरावर महातपस्वी पाराशर व्यास यांनीं आपल्या शिष्यांना वेदविद्या पढविली. महाभाग सुमंतु, वैशंपायन, बुद्धिमान् जैमिनि व तपस्वी पैल हे व्यासांचे चार शिष्य होत. ज्या आश्रमामध्यें आपल्या या शिष्यांसहवर्तमान व्यासऋषि राहात असत त्या ठिकाणीं आकाशींच्या तेजाप्रमाणें शुद्ध असे अरणीपुत्र शुकाचार्य आले. पेटलेल्या अग्नीप्रमाणें तेजोवलयानें वेढिलेल्या व सूर्यासारख्या तेजस्वी अशा आपल्या पुत्राला व्यासऋषींनीं दुरून येतांना पाहिलें. धनुष्याच्या दोरीपासून सुटलेला बाण जसा कोठेंहि अडखळत नाहीं त्याप्रमाणें तो महात्मा योगयुक्त आरणेय (शुकाचार्य) झाडें, पर्वत किंवा निरनिराळे देश यांच्यामध्यें अडखळत नसे. त्यांनीं येऊन एकदम पित्याचे पाय धरले, व इतर मुनींनाहि यथाधिकारें गौरविलें. नंतर जनकराजाशीं झालेला आपला संवाद शुकांनीं मोठ्या आनंदानें व्यासांना सांगितला. अशा प्रकारें शिष्यांना आणि पुत्राला विद्यादान करीत व्यासऋषि हिमालय पर्वतावर राहात असत.

म. भा. ११–२६.

नंतर असाच कांहीं काल गेल्यावर एक वेळ ते जितेंद्रिय, शांत व वेदाध्ययन-संपन्न असे शिष्य आपल्या गुरूच्या भोंवतीं बसले होते. त्यांनीं हात जोडून गुरूंना विनंति केली कीं, "महाराज, आपल्या कृपाप्रसादानें आम्हीं अत्यंत तेजःसंपन्न झालों आहोंत, व आमचा लौकिकहि वाढला आहे. आतां आपण आमच्यावर एकच अनुग्रह करावा, एवढीच आमची इच्छा आहे." शिष्यांचें हें भाषण ऐकून, "तुमचा कोणता मनोरथ मी पुरवूं तें मला सांगा" असें त्या ब्रह्मर्षि व्यासांनीं त्यांना विचारिलें. गुरूचें हें भाषण ऐकून त्या शिष्यांनीं पुनः हात जोडून त्यांना नमस्कार केला आणि ते त्यांना म्हणाले, "गुरुमहाराज, आपण जर आमच्यावर प्रसन्न झालां असाल तर आम्ही स्वतःला धन्य समजूं. आपण आम्हाला आतां एकच वर द्यावा अशी आमची इच्छा आहे व तो वर हा कीं, आम्ही चौघेजण व आपले पुत्र शुकाचार्य यांच्याखेरीज कोणत्याहि सहाव्या मनुष्याला प्रसिद्धि मिळूं नये. वेदविद्येचे प्रस्थापक म्हणून आम्हां पांचजणांचींच नांवें जगांत प्रसिद्ध रहावीं येवढीच आमची इच्छा आहे." शिष्यांचें हें वचन ऐकून मोक्षधर्माचें चिंतन करणारे, वेदार्थ यथार्थ रीतीनें जाणणारे, पराशरात्मज बुद्धिमान् धर्मात्मे व्यासऋषि शिष्यांना म्हणाले, "ही वेदविद्या ब्राह्मणाला आणि त्यांतहि शिकण्याची इच्छा असणाऱ्या ब्राह्मणाला सांगावी, दुसऱ्याला सांगूं नये. वेदविद्या शिकण्याचा अधिकार ब्रह्मलोकप्राप्तीची दृढ इच्छा ज्याला आहे, अशाच पुरुषाला असतो. शिष्यांनो, तुमचा सांप्रदाय वाढो, आणि वेदविद्येचा प्रसार करण्याचें कार्य तुमच्या हातून होवो. ही विद्या तुम्ही वाईट शिष्याला देऊं नये. जो पुण्यात्मा नाहीं व ज्यानें कोणत्याहि व्रताचें आचरण केलें नाहीं असल्या शिष्याला कोणतीच विद्या सांगूं नये. शिष्याच्या स्वभावाची पारख केल्यावांचून त्याला विद्यादान करूं नये. शिष्याचा स्वभाव चांगला असणें, तो व्रती असणें, त्याचें मन शुद्ध असणें हीं सच्छिष्याचीं लक्षणें होत. तापविल्यानें, छेद घेतल्यानें व कसोटीच्या दगडावर घांसल्यानें जसें सोनें शुद्ध कीं अशुद्ध हें समजतें त्याप्रमाणें शिष्याची परीक्षा, कुल व त्याच्या अंगीं असणारे इतर गुण यांनीं होते. शिष्याला अयोग्य अशा प्रकारचें कष्टप्रद कार्य कधींहि सांगूं नये, म्हणजे शिष्यांच्या बुद्धिमत्तेच्या कुवतीप्रमाणें व त्यांच्या परिश्रमाप्रमाणें विद्या फळाला येते. तुमचें सर्वांचें कल्याण होवो. तुमचीं सगळीं संकटें नाहींशीं होवोत. ब्राह्मणाला पहिला मान देऊन चारी वर्णांच्याकडून वेद श्रवण करवावे हेंच वेदाध्ययन व वेदविद्येचा असा प्रसार

करणें हेंच महत्कार्य होईल. स्वयंभू ब्रह्मदेवानें देवांचीं स्तोत्रें गाण्यासाठीं वेद निर्माण केले. जो कोणी मोहवश होऊन वेदविद्येंत पारंगत असलेल्या ब्राह्मणाची निंदा करील त्याला ब्राह्मणाचा अधिक्षेप केल्यामुळें नेहमीं पराभूतच व्हावें लागेल. जो ही विद्या अधर्माच्या मार्गानें सांगेल व अधर्माच्या मार्गानें विचारील, त्या दोघांहि गुरुशिष्यांना अधोगति प्राप्त होईल व त्यांच्यांत प्रेमभाव न नांदतां ते परस्परांचा द्वेषच करूं लागतील. स्वाध्यायाध्ययन कसें करावें, याच्यासंबंधानें जें जें सांगण्यासारखें होतें तें तें सर्व मी तुम्हांला सांगितलें आहे. हें तुमच्या अंतःकरणामध्यें नीट ठसो, व तुम्ही ज्या ज्या शिष्यांना ही विद्या पढवाल, त्यांना त्यांना याचा उपयोग होवो. १२. ३. ३२७.

---

## अध्याय ३२८ वा.

[ १ व्यास–शिष्यांनीं केलेले वेदविभाग. २ व्यासकृत वायुवर्णन. ]

(१) भीष्म—गुरूचें हें वाक्य ऐकून त्या महातेजस्वी व्यासशिष्यांनीं संतुष्ट चित्तानें एकमेकांना आलिङ्गन दिलें, आणि ते आपसांत एकमेकांना म्हणाले कीं, सर्वकाळीं सदा सर्वदा उपयोगी पडण्यासारखें असें हें जें भाषण आतां आपल्या गुरूंनीं केलें, तें आपण आपल्या चित्तांत नेहमीं वागवूं या. असें बोलून त्या आनंदित झालेल्या शिष्यांनीं व्यासांना विनंति केली कीं, "महामुने, आपली अनुज्ञा असेल तर, या पर्वतावरून पृथ्वीवर जाऊन त्या ठिकाणीं वेदांच्या अनेक शाखांचा प्रसार करावा अशी आमची इच्छा आहे." शिष्यांचें हें वचन ऐकून व्यासांनीं त्यांना धर्मार्थाला धरून असणारें व हितकर असें उत्तर केलें कीं, "बावांनो, तुमची इच्छा असेल तर, तुम्ही पृथ्वीवर जा, किंवा देवलोकाला जा; मात्र तुमच्या हातून कोणताहि प्रमाद घडणार नाहीं याविषयीं खबरदारी घ्या. कारण, वेदविद्येच्या प्रचारामध्यें अनेक प्रमाद होण्याचा संभव असतो. याप्रमाणें सत्यवादी गुरूंची अनुज्ञा दिल्यानंतर ते सर्व शिष्य व्यासऋषींना उजवी घालून, व त्यांच्यासमोर मस्तक नम्र करून पृथ्वीवर आले व त्या ठिकाणीं त्यांनीं अग्निहोत्रापासून तों सोमयागापर्यंतचे सर्व यज्ञ स्वतः केले, व ब्राह्मण, क्षत्रिय, आणि वैश्य या सर्व वर्णांच्याकडून त्यांनीं यज्ञ करविले. त्या शिष्यांची ब्राह्मणांच्याकडून योग्य संभावना होत असे व यज्ञकर्म आणि अध्यापन यांच्यामध्यें रममाण होऊन ते लोकविश्रुत शिष्य पृथ्वीवर आपला काळ घालवूं लागले.

याप्रमाणें चारी शिष्य मृत्युलोकीं निघून गेल्यानंतर व्यास एक दिवस आपल्या पुत्रासहवर्तमान एकांतामध्यें मौनव्रत धरून ध्यानस्थ बसले असतांना त्या ठिकाणीं महातपस्वी नारद ऋषि उपस्थित झाले, व मोठ्या गोड वाणीनें ते व्यासांना म्हणाले, "हे ब्रह्मर्षे, आपण वेदघोष करीत नाहीं, हें काय ? कसल्या-तरी विचारांत निमग्न झाल्याप्रमाणें आपण मौनव्रत धारण करून ध्यानस्थ बसल्यासारखे दिसतां हें काय ? ग्रहण लागलेला चंद्र ज्याप्रमाणें शोभून दिसत नाहीं तसाच रजोगुणानें व तमोगुणानें व्याप्त झालेला आणि वेद-घोषानेंहि विरहित असलेला हा पर्वतहि पण कलाहीन दिसतो. या ठिकाणीं देवांची आणि ऋषींची वस्ति आहे खरी, पण येथें वेदघोष नसल्याकारणानें हा हिमालय पर्वत कोळ्यांच्या वस्तीप्रमाणें दिसत आहे व याची पूर्वीची सर्व शोभा नष्ट झाली आहे. या ठिकाणीं रहाणाऱ्या ऋषींचें, देवांचें आणि गंधर्वांचें पूर्वीचें सर्व तेज वेदघोषाच्या अभावामुळें लोपून गेल्यासारखें दिसतें." नारदाचें हें भाषण ऐकून कृष्णद्वैपायन व्यास म्हणाले, "हे महर्षे, आपण वेदविद्येचें स्वरूप यथार्थ रीतीनें जाणतां, व आपण आतां जें म्हणालां तें सर्व माझ्या मनाला पटणारें आहे. आपण सर्वज्ञ आहांत. आपल्याला त्रैलोक्यांत चाललेल्या गोष्टी समजतात. कोठें काय चाललें आहे, हें समजून घेण्याची जिज्ञासा ज्याला आहे असे त्रैलोक्या-मधील सर्व प्राणी आपल्या विचारानें चालतात तर हे विप्रर्षे, मी काय करावें अशी आपली इच्छा आहे तें मला सांगा. सध्याच्या या स्थितींत काय करणें मला उचित होईल तें बोला. माझे शिष्य आपली विद्या संपवून मजजवळून निघून गेल्यामुळें मला कांहीं सुचेनासें झालें आहे."

नारद—वेदांची आवृत्ति न होणें हा वेदविद्येच्या ठिकाणचा दोष होय. ब्राह्मणानें व्रतावांचून राहाणें हा त्याच्या ठिकाणचा दोष होय. वाहीक लोकांची वस्ति हा पृथ्वीचा दोष होय आणि जिज्ञासाबुद्धि—आपल्याला जरूर नसलेल्या गोष्टीची रिकामी चौकशी—हा स्त्रियांच्या ठिकाणचा दोष होय. आपल्या बुद्धिमान–पुत्रासहवर्तमान आपण वेदाध्ययनाला आरंभ करा व वेद-घोषानें राक्षसादिकांच्यापासून उत्पन्न होणारें भय नाहींसें करा.

भीष्म—नारदाचें हें वचन ऐकून त्या परमधर्मज्ञ व्यासांनीं त्यांना बरें म्हणून सांगितलें आणि वेदाभ्यासाच्या ठिकाणीं दृढनिष्ठा ठेवून त्यांनीं आपले पुत्र शुकाचार्य यांच्यासहवर्तमान वेदांचीं आवर्तनें सुरू केलीं. त्या वेळचा त्याचा आवाज स्वरोच्चारशास्त्रांत सांगितल्याप्रमाणें अतिशय उंच व सर्व लोकांना

व्यापून टाकणारा होता. ते पितापुत्र याप्रमाणें वेदांचीं आवर्तनें करीत असतांना व नानाप्रकारच्या धर्मासंबंधानें बोलत असतांना एकाएकीं समुद्रावरून येणारा वावटळी वारा सोसाट्यानें वाहूं लागला. ही अनध्यायाची सूचना पाहून व्यासांनीं आपल्या पुत्राला वेदाध्ययनापासून परावृत्त केलें. वेदांचीं आवर्तनें थांबतांच शुकांच्या मनामध्यें जिज्ञासाबुद्धि उत्पन्न झाली व त्यांनीं हें वायुतत्त्व कोठून उत्पन्न झालें व याचें कार्य काय तें मला सांगा असा आपल्या पित्याला प्रश्न केला. शुकाचें हें वचन ऐकून व्यासांना अत्यंत आश्चर्य वाटलें व अनध्यायाला निमित्तभूत झालेल्या त्या वायूसंबंधानें त्यांनीं शुकाला माहिती सांगितली.

व्यास—हे पुत्रा, तुला दिव्यदृष्टि उत्पन्न झाली आहे. तुझें स्वतःचें मन अत्यंत निर्मल असून तुझ्या ठिकाणचे राजस व तामस गुण नाहींसे झाले असून तूं आतां पूर्ण सत्वस्थ झाला आहेस. आरशांत मनुष्यानें स्वतःची छाया पहावी त्याप्रमाणें स्वतःच्या ठिकाणीं परब्रह्मरूप प्रतिबिंबित झालेलें तुला दिसतें. तेव्हां वेदांचा स्वतःच्या बुद्धीच्या योगानें नीट ऊहापोह करून वायुतत्व कोठून उत्पन्न झालें याचा निश्चय तुझा तूंच कर. देवयान आणि पितृयान असे मनुष्याला देहपातानंतर स्वर्गलोकीं व मृत्युलोकांत नेणारे दोन मार्ग आहेत. देवयान मार्गानें जाणारा विष्णुलोकाला जातो व तेथून मर्त्यलोकीं परत येत नाहीं. धूम्रादि पितृयानपंथानें जाणाराला तामस गति प्राप्त होते व तेथून त्याला मृत्युलोकीं परत यावें लागतें. या पृथ्वीवर व अंतरिक्षामध्यें वायूचे वहाण्याचे सात मार्ग आहेत ते मी तुला यथा—युक्त सांगतों, ऐक. साध्य म्हणून महासामर्थ्यवान् असे देवगण आहेत. त्यांच्या पोटीं समान नांवाचा दुर्जय असा पुत्र झाला समानाचा पुत्र उदान, उदानाचा पुत्र व्यान, व्यानाचा अपान व त्याचा पुत्र प्राण होय. शत्रूंचा नाश करणारा व अजिंक्य असा प्राणवायु हा मात्र अनपत्यच राहिला. या पांची प्रकारच्या वायूंचीं कर्में आतां मी तुला सांगतों तीं ऐक. वायु हा प्राणिमात्रांची सर्व प्रकारची हालचाल घडवून आणतो व त्याच्यामुळें जीवांचें प्राणन—जीवन—शक्य होतें. म्हणून त्याला प्राण असें म्हणतात. धूर आणि तेज यांच्यामुळें उत्पन्न झालेले मेघ आकाशामध्यें इकडे तिकडे जो चालवितो त्याला प्रवह नांवाचा पहिला वायु म्हणतात. वायूच्या सात मार्गांपैकीं हा पहिला मार्ग होय. याच वायूला पुढें आकाशांत विजेचें रूप प्राप्त झालें म्हणजे, त्या ठिकाणीं मोठा शब्द करीत करीत जो वायु वहातो त्याला आवह असें म्हणतात. हा दुसरा वायुमार्ग होय. जो वायु आकाशामध्यें चंद्रादि तेजोगोलांचा उदय

करितो व मनुष्याच्या देहामधील जठराग्नि प्रदीप्त करितो; जो चारी समुद्रामधील पाणी आपणामध्यें शोषून घेऊन आकाशांत मेघांना पोहोंचवितो व मेघांना जलभारानें जड करून त्यांच्या द्वारें पाऊस पाडवितो असल्या सदा वहात राहाणाऱ्या वरिष्ठ वायूला उद्वह, म्हणतात व हा तिसरा वायुप्रकार होय. चवथा 'संवह,' नांवाचा वायु पर्वतांचा सुद्धां चुरा करूं शकण्याइतका बलिष्ठ आहे. हा प्राणिमात्रांचीं विमानें आकाशांतून वाहून नेतो. याच्या योगानें होहवश झालेले मेघ सर्व ठिकाणीं पांगले जातात, व यथाकालीं पर्जन्यवर्षाव करून रिते होतात. आणि त्यांचें मेघत्व नाहींसें होतें. या वायूनें एकत्र आणलेले मेघ मोठा गडगडाट करतात व या त्यांच्या गडगडाटामुळेंच त्यांना नद, असें नांव मिळतें. हे मेघ लोककल्याणासाठीं एकत्र होऊन पृथ्वीवर जलवर्षाव करितात, हा संवह नांवाचा चवथा वायु होय. पांचवा वायु 'विवह' नांवाचा आहे. हा वायु अतिशय वेगवान् असून तो जोरानें सों सों करीत वाहूं लागला म्हणजे मोठमोठाले वृक्षहि उन्मळून पडतात. या वायूच्या योगानें जे मेघ एकत्र जमतात त्यांना बलाहक अशी संज्ञा आहे. हा वायु आकाशांत गडगडाट करूं लागला म्हणजे धूमकेतू, प्रलयकाळच्या मेघांचें दर्शन इत्यादि उत्पात सूचित होतात. जो वायु वहात असतांना पाण्याचा ओघ पृथ्वीवर न पडतां वरचेवर थोंपविला जातो व आकाशमार्गानें वाहूं लागतो, ज्या वाऱ्याच्या योगानें आकाशगंगेचें पाणी आकाशांतच जागच्याजागीं थोंपवून धरिलें जातें, ज्या वाऱ्याच्या सोंसाट्यामुळें सहस्ररश्मि सूर्यसुद्धां मंदतेज होतो, व ही पृथ्वी हें सूर्याचें उत्पत्तिस्थान आहे असा भास होतो, ज्यामुळें पृथ्वी शोभून दिसते, ज्याच्यामुळें क्षीण झालेला चंद्र पुनः संपूर्ण होऊं शकतो, तो 'परिवह,' नांवाचा सर्वांत श्रेष्ठ असा सहावा वायु होय. सर्व प्राणिमात्रांचे प्राण जो कल्पान्ताचे वेळीं हरण करितो, मृत्यु आणि यम हे ज्याच्या पावलावर पाऊल ठेवून चालतात तो परावह नांवाचा सातवा वायु होय. हे मुमुक्षा, प्रशांत बुद्धीनें परमात्मपदाचें चिंतन करणाऱ्यांना व ध्यानाभ्यासामुळें ज्यांचें चित्त रंगतें अशा लोकांना हा वायु मोक्ष देणारा आहे. या वायूच्या आधारावर प्रजापति दक्षाचे दहा हजार मुलगे ब्रह्मांड फोडून निघून गेले; याच वायूच्या योगानें मनुष्य एकदां आपलें प्रारब्धकर्म भोगून मृत झाला म्हणजे पुनः जन्मास येत नाहीं. अशा प्रकारचा हा सातवा परावह वायु दुर्जय आहे. असे हे अतिशय अद्भुत स्वरूपाचे अदितीचे सात पुत्र होत. ते सर्वत्र संचार करूं शकतात, सर्वांचें धारण करितात, आणि अप्रतिबंध रीतीनें

वहातात. एकदां अशी एक मोठी आश्चर्यकारक गोष्ट झाली कीं हा वारा मोठ्या सोसाट्यानें वाहात असतांना आपला हा पर्वतोत्तम हिमालयसुद्धां त्याच्या वेगानें कांपूं लागला होता. हे शुका, भगवान् विष्णूचा निश्वासच असा हा परावह वायू जेव्हां मोठ्या वेगानें वाहूं लागतो, त्या वेळेस सर्व जगच दुःखांत पडतें. म्हणून वेदवेत्ते ब्राह्मण वारा सुटला असतांना वेदाध्ययन करीत नाहींत. वेदाक्षरांचा उच्चार हाहि एक प्रकारचा वायु आहे. त्याला या बाह्य वायूपासून पीडा उत्पन्न होऊं नये, येवढ्यासाठीं हा निषेध सांगितला आहे."

अशा प्रकारचें भाषण करून त्या पराशरसुत व्यास ऋषींनीं आपल्या पुत्राला वेदाध्ययन करावयाला सांगितलें व ते आकाशगंगेकडे गेले. १२.३.३२८.

---

## अध्याय ३२९ वा.

[ १. शुकांना नारदाचा उपदेश. ]

(१) भीष्म—त्या व्यासऋषींच्या आश्रमांत शुकाचार्य वेदाध्ययन करीत असतांना वेदांचा अर्थ विचारण्यासाठीं एकदां नारदमुनि तेथें आले. देवर्षि नारदमुनि आलेले पाहून शुकाचार्यांनीं अर्घ्यपाद्यादिकांनीं त्यांची वेदोक्त विधीनें पूजा केली. नंतर नारदांनीं संतुष्ट होऊन शुकांना विचारिलें, कीं, "हे धर्मज्ञा, मी तुझें कोणतें कल्याण करूं तें मला सांग? नारदांचें तें आनंदकारक भाषण ऐकून शुकाचार्य त्यांना म्हणाले, "या जगांत जें हितकारक असेल तें हे भगवान्, आपण मला द्या."

नारद—पूर्वीं ब्रह्म जाणण्याची इच्छा करणाऱ्या महात्म्या ऋषींना भगवान् सनत्कुमारांनीं जो उपदेश केला तो मी तुला सांगतों, ऐक. "या जगांत विद्येसारखी दृष्टि नाहीं. सत्यापरतें तप नाहीं. आसक्तीसारखें दुःख नाहीं व त्यागाइतकें सुख कशांतच नाहीं. पापकर्माला पराङ्मुख असणें, पुण्यमार्गानें जाणें, चांगली वृत्ति ठेवणें व शहाण्या लोकांच्या मार्गाचा अवलंब करणें याला उत्कृष्ट प्रकारचें श्रेय असें म्हणतात. हा दुःखमय मनुष्यजन्म प्राप्त झाला असतांना त्याच्या ठिकाणीं जो रत होतो तो मोहांत सांपडतो. याच्या हातून दुःखाचा परिहार होणें शक्यच नाहीं. मनुष्यदेहाचा संयोग हेंच दुःखाचें लक्षण होय. जो प्राणी या देहाच्या ठिकाणीं आसक्त झाला त्याची बुद्धि चळते व त्यामुळें मोहाचें जाळें अधिकच पसरलें जातें आणि प्राणी एकदां मोहाच्या जाळ्यांत सांपडला कीं,

त्याला इहपरलोकीं दुःखच भोगावें लागतें. म्हणून श्रेयःप्राप्तीची इच्छा धरणाऱ्या मनुष्यानें सर्व उपाय करून काम आणि क्रोध हे दोन शत्रू जिंकावे; कारण हेच दोघे मुख्यतः श्रेयाचा घात करणारे आहेत. आपल्या तपश्चर्येचें क्रोधापासून रक्षण करावें, संपत्तीला मत्सराची बाधा होऊं देऊं नये, विद्येला मानापमानाचा संसर्ग लागूं देऊं नये व स्वतःच्या हातून प्रमाद होऊं देऊं नये. कोणाशींहि कठोरपणानें न वागणें हा परमश्रेष्ठ धर्म होय. क्षमा हें उत्कृष्ट प्रकारचें बल होय. आत्मज्ञान हें सर्वश्रेष्ठ ज्ञान होय आणि सत्यापेक्षा श्रेष्ठ असें तर कांहींच नाहीं. खरें बोलणें श्रेयस्कर तर खरेंच व त्याहिपेक्षां जें सत्य असून पथ्यकर असेल तेंच भाषण मनुष्यानें करावें. प्राणिमात्राचें आत्यंतिक कल्याण यालाच माझ्या मतें सत्य म्हणतात. ज्या पुरुषानें सर्व कर्मांचा त्याग केला, ज्याच्या मनच्या आशा नाहींशा झाल्या, ज्याला कोणतेंहि बंधन उरलें नाहीं व ज्यानें सर्वसंगपरित्याग केला तोच विद्वान्, त्यालाच पंडित ही संज्ञा शोभते. जो पुरुष इंद्रियांना आपल्या ताब्यांत ठेवून अनासक्ततेनें त्या त्या इंद्रियांच्या विषयांत वावरूं शकतो, ज्याचें चित्त शांत आहे, जो योगयुक्त रीतीनें देहेंद्रियांच्या संगतीमध्यें किंवा त्यांना सोडून सारख्याच आनंदानें राहूं शकतो त्याला थोड्याच अवकाशांत श्रेयःप्राप्ति होते. जो इतर भूतांकडे कधीं पहात नाहीं व ज्याला त्यांचा संपर्क घडत नाहीं किंवा त्यांच्याशीं भाषण करण्याचा प्रसंग येत नाहीं त्याला परमश्रेयाची प्राप्ति होते. कोणत्याहि प्राण्याची आपण हिंसा करूं नये. प्रत्येकाशीं मित्रत्वानें वागावें. मनुष्यजन्म प्राप्त झाला असतांना कोणाशींहि वैर करूं नये. हे मुने, अकिंचनत्व, उत्तम प्रकारचा संतोष, अनासक्तता व चांचल्याचा अभाव यालाच 'श्रेय' म्हणतात व जितेंद्रिय आत्मज्ञानें मिळवावयाचें तें हेंच. हे शुका, भोंवतालचीं बंधनें तोडून तूं जितेंद्रिय हो. ज्या ठिकाणीं कसलेंहि भय नाहीं व इहपरलोकीं ज्या ठिकाणीं शोक करण्याची पाळी येणार नाहीं, अशा ठिकाणीं तूं रहा. ज्यांना या जगांत कसलेंहि आमिष नाहीं त्यांच्यावर शोक करण्याची पाळी येत नाहीं, म्हणून प्राणिमात्रानें आसक्ति टाकावी. हे मुने, आसक्ति टाकल्यानें तूं दुःखाच्या जंजाळांतून सुटशील. ज्याला हे दुर्जय षड्रिपु जिंकावयाचे आहेत त्यानें नित्य तपश्चर्या करावी, दमनशील असावें, जितेंद्रिय रहावें व आसक्ति उत्पन्न करणाऱ्या पदार्थांचा मोह टाळावा. त्रिगुणांचा संपर्क ज्याला बाधत नाहीं, जो सर्वदा ध्यानमार्गांमध्यें रत असतो, अशा ब्राह्मणाला थोडक्याच वेळांत परमसुख प्राप्त होतें. सर्व प्राणिमात्र सुखदुःखादि द्वंद्वामध्यें रमलेले असतांना जो मुनि एकटाच

आणि स्वतःच्याच ठिकाणीं संतुष्ट असतो, त्याला प्रज्ञानतृप्त असें म्हणावें. अशा ज्ञानतृप्त पुरुषांवर शोक करण्याची पाळी येत नाहीं. मनुष्यप्राणी हा कर्माधीन आहे. त्याला शुभकर्मांनीं देवयोनि प्राप्त होते. शुभ आणि अशुभ अशा मिश्र कर्मांनीं तो मनुष्य जन्मास येतो आणि त्यानें केवळ अशुभ कर्में केलीं म्हणजे त्याला नीचयोनींत जन्म घ्यावा लागतो. त्या ठिकाणीं मृत्यु आणि जरा यांच्या दुःखांनीं प्राणी सतत पीडिला जातो आणि संसारांत पिचत पडतो, याची जाणीव तुला कशी नाहीं? हा संसार दुःखकारक असून त्यालाच तूं सुख मानतोस. ह्या नाशवंत संसाराला तूं चिरकाल टिकणारा समजतोस. हा निःसार संसार सारयुक्त आहे असें तुला वाटतें. बाबारे, अजून तुझ्या डोक्यांत उजेड कसा पडत नाहीं? स्वतःच्याच उदरांतून निघणाऱ्या अनेक तंतूंनीं कोळी जसा स्वतःला वेढून घेतो तसा तूं आपणाला वेढून घेत आहेस, याची जाणीव तुला नाहीं काय? हीं बंधनें टाकून दे; कारण यांच्यामध्यें अनेक प्रकारचे दोष भरले आहेत. आपल्या भोवतीं जाळें विणणारा कोळी हा अशाच बंधनांनीं जखडला जातो. मोठमोठाले रानहत्ती ज्याप्रमाणें सरोवराच्या चिखलामध्यें पडावे आणि तेथेंच अडकून रहावे त्याप्रमाणें मनुष्यप्राणी स्त्री-पुत्रादि परिवारामध्यें आसक्त होऊन दुःख पावतात. कोळयाच्या जाळयांत सांपड-ल्यामुळें पाण्यांतून जमिनीवर आलेले मासे जसे दुःखानें तडफडतात, तसेच आसक्तीच्या जाळयांत सांपडलेले प्राणी दुःख पावतात. आपले आप्तेष्ट, स्त्रीपुत्र किंबहुना आपलें शरीर व आपण केलेला धनसंचय हीं आपल्याबरोबर येत नाहींत. हीं अनर्थकारी आहेत, नाशिवंत आहेत, आपलीं नव्हेत. आपण केलेलें पापपुण्य येवढेंच काय तें आपलें असें म्हणतां येईल. तुझी इच्छा असो वा नसो, या सर्वांचा त्याग करून तुला एक दिवस जावयाचें आहे; तर ह्या अनर्थांत तूं कां गुंतून राहिला आहेस? आणि महासमर्थ अशा ज्ञानाचा आश्रय कां करीत नाहींस? ज्या ठिकाणीं विश्रांति मिळणें शक्य नाहीं, ज्या ठिकाणीं कोणाचाहि आधार नाहीं, जेथें कसलीहि शिदोरी तुला बरोबर नेतां येणार नाहीं, असा हा मोहरूप अंध-कारानें व्यापलेला मार्ग तुला एकट्याला कसा आक्रमण करितां येईल? या मार्गानें तूं जाऊं लागलास म्हणजे तुझ्या मागून कोणीहि येणार नाहीं. तूं जें काय पाप किंवा पुण्य केलें असशील तेवढेंच या मार्गावर तुझी सोबत करील. विद्या काय, कर्म काय, शुचित्व काय आणि अत्यन्त विस्तृत असें ज्ञान काय हीं सर्व मोक्षाचीं साधनें आहेत व त्यासाठींच मनुष्य यांचा अवलंब करीत असतो.

आणि ज्याचा अर्थ सिद्ध झाला—या साधनानें मिळवावयाचें फळ ज्याला मिळालें—तो या संसारबंधनांतून सुटतो. गांवामध्यें राहून तेथील सुखोपभोग भोगण्याची इच्छा हीच मनुष्याला संसारबंधनांत जखडून ठेवणारी रज्जु होय. पुण्यवान् प्राणी या दोरीचे पाश तोडून जातात व पापी माणसें हीं बंधनें तोडण्याचे प्रयत्नहि करीत नाहीं. संसार ही एक नदी आहे. ती रूपाच्या तीरांतून वहाते. मन हा तिचा प्रवाह होय. स्पर्श हें त्या नदींतील बेट होय. रस हे तिच्यांतील भोवरे होत. गंध हा या नदींतला चिखल व शब्द हें या नदींतील पाणी होय. ही नदी स्वर्गमार्गाच्या वाटेमध्यें आड येणारी आहे. या नदींतून तरून जाण्यास सत्यधर्म ही एकच नौका आहे. क्षमा ही नौका चालविणारीं वल्हीं होत. धर्माच्या ठिकाणची स्थिर आसक्ति ही ह्या नावेला बांधलेली दोरी आहे. त्यागाचा अनुकूल वारा सुटला म्हणजे ही नौका जलद चालते. अशा या नौकेचा आश्रय करून मनुष्यानें ही भवनदी तरून जाण्याचा प्रयत्न करावा. हे मुने, तूं धर्म आणि अधर्म हीं दोन्हीं सोडून दे. खरें आणि खोटें या दोघांचाहि त्याग कर. ह्यांचा त्याग केल्यावर ज्या अहंकारानें टाकणारा मी आणि घेणारा मी ही भावना तुझ्यांत उत्पन्न होते तो अहंकारहि टाक. कोणत्याहि प्रकारचा संकल्प मनांत न ठेवणें म्हणजेच धर्मत्याग होय. असला धर्मत्याग तूं कर. आसक्तीचा त्याग हाच अधर्माचा त्याग. हा अधर्मत्याग तूं कर. तूं आपल्या बुद्धीच्या योगानें खरें आणि खोटें यांचा त्याग कर, आणि परब्रह्माच्या ठिकाणीं मनाचा लय केल्यानंतर बुद्धीसुद्धां टाकून दे. हा मनुष्यदेह अतिशय घाणेरडा व अनित्य आहे. अस्थि ह्या याच्यांतल्या खुंट्या होत. हा स्नायूंनीं व्यापलेला आहे. मांस आणि रक्त यांचे लेप याच्यावर चढलेले असून हा चर्मानें झांकलेला आहे. हा मनुष्यदेह मूत्रपुरीषांनीं भरलेला असून अत्यंत दुर्गंधयुक्त आहे. जरा आणि शोक यांनीं हा व्यापलेला असून हा सर्व रोगांचें माहेरघर होय. या देहाचा तूं त्याग कर. हें सर्व स्थावरजंगम जगत् पंचमहाभूतांनीं बनलेलें आहे. महत्तत्त्व हें देहाहून भिन्न आहे. दशेंद्रियें, मन, पंचप्राण, सत्व, रज, तम, हे तीन गुण मिळून एक, अशा सतरा तत्त्वांच्या गटाला, अव्यक्त म्हणतात. हीं सतरा तत्त्वें, शब्दस्पर्शादि पांच, इंद्रियांचे पांच विषय आणि बुद्धि व मन हीं चोवीस तत्वें मिळून व्यक्ताव्यक्त सृष्टि होते, आणि या सृष्टीलाच पुरुष म्हणजे जीव ही संज्ञा आहे. धर्म, अर्थ आणि काम या त्रिवर्गांचें, सुख, दुःख, जीवन आणि मरण या सर्वांचें ज्ञान ज्याला झालें त्याला विश्वाच्या उभारणीचें आणि संहारणीचें ज्ञान झालें. हें ज्ञान

क्रमाक्रमानेंच करून घेणें इष्ट आहे. कर्मेंद्रियांनीं ज्याचें ग्रहण करितां येतें तें तें सर्व व्यक्त व ज्याचें ज्ञान इंद्रियांनीं होत नाहीं व जें केवळ बुद्ध्यादि साधनांच्या द्वारानें समजून घ्यावयाचें असतें, त्याला अव्यक्त असें म्हणतात. पावसाच्या धारांनीं मनुष्य जसा तृप्त होतो, त्याप्रमाणें इंद्रियांचा निग्रह करणाऱ्या माणसाला एक प्रकारचें सुख लाभतें. आपण लोकांच्या रूपानें विनटलेले आहोंत व सर्व भूतेंहि त्याचप्रमाणें आपल्या ठिकाणीं स्थित झालेलीं आहेत असें ज्ञान या पुरुषाला होतें. ब्रह्मज्ञान झालेल्या पुरुषाची ज्ञानावर आधारलेली शक्ति कधींहि नष्ट होत नाहीं व याला सर्व भूतें कोणत्याहि अवस्थेंत आणि कोणत्याहि काळांत सारखींच दिसतात. स्वतःच्या ज्ञानबळावर, मोहामुळें उत्पन्न होणाऱ्या अनेक संकटांतून ज्ञान्याला तरून जातां येतें आणि म्हणून कोणत्याहि प्राण्याची संगति याला अशुभ अशी वाटत नाहीं. याच्या अंतकरणामध्यें ज्ञानाचा स्वच्छ प्रकाश पडला असल्याकारणानें या जगाच्या संसारांतील दोष याला दिसत नाहींत. प्राणी हा मूळचा जन्ममरणरहित, अकर्ता, अमूर्त व अव्यय असा असून तो परमात्म्याच्या ठिकाणीं स्थित असतो असें मोक्षशास्त्रज्ञ म्हणतात. आपण केलेल्या कर्मांनींच मनुष्य नेहमीं दुःखजालांत सांपडत असतो व हें दुःख नाहींसें करण्यासाठीं तो अनेक प्रकारें इतर प्राण्यांची हिंसा करीत असतो आणि पुनःपुनः नवें नवें कर्म याच्या हातून घडत असतें. रोगी माणसानें अपथ्य करावें, त्याप्रमाणें मनुष्य नवें नवें कर्म करीत असतो आणि त्यामुळें त्याला त्रास होतो. परंतु, हा मोहांध होऊन त्या दुःखालाच सुख समजतो. रवीनें एकादा पदार्थ घुसळला जावा त्याप्रमाणें मनुष्यप्राणी आपापल्या कर्मांमुळें घुसळला जातो व त्या कर्मांनीं आपापल्या योनींच्या ठिकाणीं जखडला जातो. अशा तऱ्हेनें अनेक दुःखें भोगीत ह्या संसारामध्यें मनुष्यप्राणी चक्रासारखा फिरतो. तेव्हां तूं सर्व बंधनें टाकून दे. सर्व कर्मांचा त्याग कर. सर्व मोह उत्पन्न करणाऱ्या गोष्टींचा जय कर, सर्वज्ञ हो. सर्व भाव टाकून दे आणि सिद्ध हो. संसारांत उत्पन्न होणारीं नवीं नवीं बंधनें तपश्चर्येच्या आणि संयमाच्या बळावर ज्यांनीं टाकून दिलीं अशा पुष्कळ लोकांना आजपर्यंत निराबाध आणि सुखकारक अशी सिद्धि प्राप्त झाली आहे. १२.३.३२९.

---

## अध्याय ३३० वा

[ नारदांचा शुकांना उपदेश ]

(१) **नारद**—परम कल्याणकारक, शांतिप्रद आणि शोकरहित असें हें शास्त्र स्वतःच्या दुःखाचा परिहार करण्यासाठीं जो ऐकतो, त्याला व्यवसायात्मिका बुद्धीचा लाभ होतो, आणि त्यामुळें त्याला सुख मिळतें. मूढ पुरुषाला प्रत्येक दिवशीं हजारों वेळां शोक करण्याचा प्रसंग येतो व शेंकडों गोष्टींपासून त्याला भय उत्पन्न होतें. परंतु पंडिताची तशी स्थिति नाहीं. तेव्हां अनिष्टाचा नाश व्हावा, यासाठीं मी तुला एक इतिहास सांगतों, तो ऐक. मनुष्याची बुद्धि त्याची त्याच्या स्वाधीन असेल तर त्याला या शोकाचा नाश करणाऱ्या शास्त्राचा लाभ होतो. आपल्याला नको तें कपाळीं आलें व हवें तें मिळेनासें झालें म्हणजे कोत्या बुद्धीचीं माणसें अनेक मानसिक दुःखांनीं व्याप्त होतात. जे पदार्थ आपल्या डोळ्यांसमोर नाहींत त्यांच्या गुणांचें मनुष्यानें चिंतन करीत बसूं नये. त्या गुणांचा विचार करीत बसणारांचा स्नेहपाश कधींहि तुटत नाहीं. ज्या ज्या ठिकाणीं वासनेचा प्रादुर्भाव होऊं शकतो, त्या ठिकाणीं दोष आहेत असें मनुष्यानें समजून चालावें. वासना ही अनिष्ट गोष्टी वाढविणारी आहे असें समजून चालावें म्हणजे त्याला लवकर वैराग्य उत्पन्न होईल. नष्ट झालेल्या गोष्टींचा जो शोक करीत बसतो त्याला धर्म, अर्थ व यश यांपैकीं कांहींहि मिळत नाहीं. एकदां नाश पावलेली वस्तु पुनः मिळेल म्हणावें तर तसेंहि होत नाहीं. प्राणिमात्र गुणसंघाताच्या योगानें जन्माला येतात आणि हा संघात विसकटला म्हणजे नाहींसे होतात. म्हणून नष्ट झालेल्या गोष्टीबद्दल शोक करीत बसणें हें अनुचित होय. मृत्यूनें किंवा दुसऱ्या कोणत्याहि कारणानें नष्ट झालेल्या वस्तूचा जो शोक करीत बसतो त्याला दुःख तर होतेंच, पण त्या दुःखांतून दुसरीं अनेक दुःखें निर्माण होतात. स्वतःला इष्ट असलेल्या वस्तूचा वियोग तर त्याला घडतोच, पण त्यामुळें त्याच्या शरीरालाहि ताप होतो. जगामध्यें सुखदुःखांचें रहाटगाडगें सारखें चालूं आहे हें समजून बुद्धिमान् पुरुष गतगोष्टींचा शोक करीत नाहींत. योग्य तऱ्हेनें जगाच्या स्थितीचा विचार करणारांना गतगोष्टींबद्दल अश्रु ढाळणें शोभत नाहीं. ज्या शारीरिक दुःखाचा अगर मानसिक व्यथेचा प्रतिकार करितां येणें शक्य नाहीं त्याची चिंता करूं नये. दुःखाचा विचार न करणें हेंच त्याच्यावरचें औषध होय.

दुःखाचा विचार केल्यानें तें नाहींसें तर होत नाहींच, उलट अधिक वाढतें. मानसिक दुःखें विचारसामर्थ्यानें नाहींशीं करावीं, शारीरिक दुःखें औषधानें नाहींशीं करावीं. ज्ञानविज्ञानामध्यें अशा प्रकारचें सामर्थ्य आहे, हें जाणून मनुष्यानें लहान मुलांसारखें वर्तन करूं नये. तारुण्य, जीवित, द्रव्यसंचय, आरोग्य व प्रिय माणसांचा सहवास हीं सर्व अनित्य आहेत, असें जाणून पंडितानें त्यांचा लोभ धरूं नये. ज्या गोष्टींबद्दल सगळया लोकांना दुःख व्हावयास पाहिजे ती गोष्ट एकाच्याच जिवाला लावून घेऊन मनुष्यानें उगीच तळतळूं नये. अशा दुःखाचा परिहार, त्याबद्दल शोक न करितां, आपल्याला करितां आला तर तो करण्याचा प्रयत्न करावा. या जगामध्यें सुखापेक्षां दुःखच जास्त आहे यांत शंका नाहीं. मनुष्य मोहवश होऊन पंचकर्मेंद्रियांच्या ताब्यांत सांपडतो व त्याला मरण अप्रिय वाटतें. जो पुरुष सुख आणि दुःख ह्या दोहींचाहि त्याग करितो त्याला परब्रह्मपदाची प्राप्ति होते व त्याच्याबद्दल पंडितांवर शोक करण्याची पाळी येत नाहीं. द्रव्याचा त्याग करण्याची पाळी आली म्हणजे मनुष्याला दुःख वाटतें व तें जवळ बाळगून ठेवण्यामध्यें सुख वाटतें. द्रव्य मिळविणें ही अत्यन्त कष्टप्रद गोष्ट आहे. याचा नाश व्हावा असें मनांतहि आणूं नये, असें जीवाला वाटत असतें. मनुष्याला निरनिराळ्या ऐश्वर्यावस्था प्राप्त झाल्या तरी त्याची तृप्ति न होतां तो असंतुष्टच राहतो आणि त्यांतच त्याचा नाश होतो. पंडितांना मात्र त्यामध्यें संतोष होतो. सर्व प्रकारचे कोश हे कधींतरी नाश पावणारे आहेत, चढणारे प्राणी कधींतरी पडावयाचे आहेत. आज इष्ट गोष्टींची संगति लाभली तरी कधींकाळीं त्याचा वियोगच व्हावयाचा आहे व जीविताचा शेवट मरणानें व्हावयाचा आहे.

या जगांत ज्याला अन्त नाहीं अशी जर कोणती गोष्ट असेल तर ती एक वासना ही होय. खरें सुख संतोषांतच आहे, म्हणून संतोष हेंच धन होय असें पंडित समजतात. मनुष्याचें आयुष्य घडीघडीनें नाहींसें होत असतें व तें कोणाचीहि निमिषमात्रहि वाट पहात नाहीं. मनुष्याचें शरीरच जेथें अनित्य त्या ठिकाणीं कोणती गोष्ट म्हणून नित्य मानावयाची व तिचें चिंतन करीत बसावयाचें ? प्राणिमात्रांच्या स्वरूपाचा विचार करितां करितां तें विचारातीत आहे, हें उमजून जे परमपदाचा विचार करितात, त्या शहाण्या माणसांना कसलाच शोक करण्याचें कारण उरत नाहीं. उलट ऐहिक संसाराचाच केवळ जे विचार करीत बसतात त्यांना त्यांच्या इच्छा तृप्त झाल्या नसतांना देखील मृत्यु

घेऊन जातो व वाघानें पशूंवर झडप घालावी तशी मृत्यु यांच्यावर झडप घालतो, म्हणून, दुःखाचा नाश होण्याचा उपाय शोधावा आणि कोणत्याहि प्रकारचा शोक न करितां तो उपाय योजून दुःखांतून मुक्त व्हावें व सर्व संकटांतून मुक्त व्हावें. शब्द, स्पर्श, रूप, गंध व रस या पांच विषयांशीं, दरिद्याला काय किंवा श्रीमंताला काय, त्यांचा उपभोग घेण्यापलीकडे कांहींच कर्तव्य नसतें. यांची प्राप्ति होण्यापूर्वीं यांच्यापासून उत्पन्न होण्याऱ्या दुःखाचा संबंधच येत नाहीं. तेव्हां मनुष्यानें आपली बुद्धि स्थिर ठेवून या विषयांच्या वियोगापासून जें दुःख व्हावयाचें तें होऊं देऊं नये म्हणजे झालें. क्षुधा आणि विषयवासना यांचें धैर्यानें नियमन करावें. हात, पाय इत्यादि अवयवांचें नियमन डोळ्यांनीं करावें. डोळे आणि कान यांच्यावर मनाचा दाब ठेवावा आणि मन व वाणी यांना ज्ञानानें कह्यांत ठेवावें. आपली कोणी स्तुति केली किंवा निंदा केली तरी त्याबद्दल सारखीच भावना ठेवून मनुष्यानें नम्रपणानें वागावें, म्हणजे त्याला सुख होतें, तोच पंडित या पदवीला लायक होतो. अध्यात्माच्या ठिकाणीं ज्याची आसक्ति आहे, ज्याला कसलीहि अपेक्षा नाहीं व मोहहि नाहीं, जो स्वतःच आपलें आपण सहाय्य करितो अशाच पुरुषाला सुखाचा लाभ होतो. १२. ३. ३३०.

---

## अध्याय ३३१ वा.

[ १ नारदांचा शुकांना उपदेश. ]

(१) नारद—मनुष्यानें सुखाला दुःख आणि दुःखाला सुख मानून त्यांच्या संबंधानें एकदां भ्रामक कल्पना करून घेतली म्हणजे त्यांतून त्याला सोडविणें हें कार्य त्याची बुद्धि, विद्या किंवा पराक्रम यांपैकीं कोणालाच साधत नाहीं. या दुःखांतून सुटण्याचा प्रयत्न मनुष्यानें करीत असावा. असा प्रयत्न करणाऱ्या माणसाला अधोगति कधींच प्राप्त होत नाहीं. म्हातारपण, मृत्यु आणि रोग यांच्या घाल्यापासून मनुष्यानें आपली सुटका करून घ्यावी. उत्कृष्ट प्रकारच्या धनुर्धारी पुरुषानें सोडलेल्या तीक्ष्ण बाणांनीं शरीर ज्याप्रमाणें व्यथित व्हावें त्याप्रमाणें तें शारीरिक आणि मानसिक रोगांनींहि व्यथित होतें. मनुष्य अशा तऱ्हेनें रोगांनीं व्यथित झाला म्हणजे तो वासनादिकांच्या योगानें तळमळूं लागतो व सर्वस्वी पराधीन बनतो. यामुळें त्याच्या शरीराचा हळूहळू नाश

होतो. गंगेचा प्रवाह एकदां वाहूं लागला म्हणजे तो जसा पुनः परतत नाहीं त्याप्रमाणें क्षणाक्षणांनीं मनुष्याचें आयुष्य वाहून नेणारीं अहोरात्रेंहि पण (दिवसहि पण) माघारीं फिरत नाहींत. महिन्याच्या शुक्ल व कृष्ण या दोन्हीं पक्षांत हा एकसारखा होणारा ऱ्हास प्रत्येक जन्मास आलेल्या प्राण्याला व्यथित करितो, व त्याला क्षणाचीहि फुरसत देत नाहीं. हा अजर काल मनुष्यप्राण्याचीं सुखदुःखें नाहींशीं करितो. सूर्य एकदां अस्ताला जातो, व पुनः उदयाला येतो. पण मनुष्याच्या आयुष्याची तशी गोष्ट नाहीं. प्राण्याला इष्ट असलेल्या व अनिष्ट असलेल्या अशा सर्वच गोष्टी काल घेऊन जातो. अशा गोष्टींची मनुष्याला कधीं कल्पनाहि नसते व त्या त्यानें पूर्वीं कधीं पाहिलेल्याहि नसतात. मनुष्याच्या कर्मांनीं त्याला मिळणारें फळ जर पराधीन नसतें तर त्याला वाटेल त्या ईप्सित फळाची प्राप्ति झाली असती. पण या जगांत असा प्रकार दिसतो कीं, दक्ष, बुद्धिमान् आणि संयमी अशा पुरुषांचीं सर्व कर्में निरुपयोगी ठरतात व त्याला त्याचें कांहींच फल प्राप्त होत नाहीं. याच्या उलट कांहीं गुणहीन व मूर्ख अशा पुरुषाधमांना आशीर्वाद मिळाल्याचें नजरेस येतें व त्याच्या सर्व इच्छा सफल झालेल्या दिसतात. आणखी कोणीं मनुष्य नेहमीं प्राणिमात्रांची हिंसा करण्याला व लोकांना फसवावयास उद्युक्त झालेला असतो. आणि असला पुरुष सुखांत लोळतांना आढळतो. कांहींएक कर्म न करितां नुसतें पायावर पाय घालून बसलेल्या पुरुषाला लक्ष्मी प्राप्त झाल्याचें दिसतें तर दुसऱ्या कांहीं मनुष्यांना काबाडकष्ट करून सुद्धां कित्येक दुर्लभ वस्तु प्राप्त होत नाहींत. या एकंदर प्रकाराला तूं पाहिजे तर मनुष्यांचा दैवदोष समज. पुरुषाच्या देहांत तयार झालेलें वीर्य हें स्त्रीच्या ठिकाणीं जातें. तेथें तरी त्या वीर्याचें गर्भांत नियमानें रूपान्तर होतेंच असें नाहीं. कित्येक प्रसंगीं आंब्याचा मोहोर धरून तो झडावा त्याप्रमाणें पुरुषवीर्यहि निष्फल ठरतें. या जगांत कांहीं माणसें, आपल्याला पुत्र व्हावा यासाठीं धडपडत असतात व आपला मनोरथ सिद्धीला जावा म्हणून अनेक खटपटी करितात पण त्यांना संततिलाभ होत नाहीं असा प्रत्यय येतो; तर, कांहीं ठिकाणीं असें दिसतें कीं गर्भधारणा म्हटली म्हणजे तिच्यावर जो रागावलेल्या सर्पाप्रमाणें रागावतो त्यांच्या पोटीं आयुष्मान् पुत्र जन्माला येतो. देवांचें पूजन करून व तपश्चर्या करून कांहीं लोकांनीं दहा महिने पोटांत वाढविलेलीं पोरें कुलांगार निपजतात तर त्याच

प्रकारच्या कृत्यांनीं दुसऱ्यांच्या पोटीं जन्माला आलेलीं मुलें आईबापांनीं संचय करून ठेवलेल्या धान्यादिकांचा व द्रव्याचा उपभोग घेतात. कित्येक प्रसंगीं स्त्री-पुरुषांच्या समागमापासून आईबापांना पिशाचाप्रमाणें त्रास देणारीं मुलें जन्माला येतात. मांस आणि कफ यांनीं वेढलेल्या शरीराचा नाश झाला म्हणजे त्याला वेढून टाकावयाला दुसरीं अनेक शरीरें तयार असतात. प्राण्याचा एक देह जाळला तर त्याच्यासाठीं तेथें दुसरा देह तयार असतो. जशी एखादी फुटकी नाव दुसऱ्या नावेवर घालून चालवावी त्यांतलाच हा प्रकार होय. स्त्री-पुरुषांच्या समागमानें जो अचेतन रेतोबिंदु स्त्रीच्या उदरांत पडतो त्याचा जीवंत गर्भ कोणत्या यत्नांनीं होतो याची तुला काय माहिती आहे? स्त्रीनें खाल्लेलें अन्न व प्यालेलें पाणी ज्या जठरामध्यें जिरून जातें, त्याच जठरांत गर्भ जिरत नाहीं, हें एक आश्चर्यच नव्हे काय? गर्भाच्या ठिकाणीं मूत्र व पुरीष यांच्या गति स्वभावधर्मानुसार चालत रहातात. गर्भाचें धारण किंवा विसर्ग ह्या दोन्हीं गोष्टी, जीव हा परतंत्र असल्यामुळें, त्याच्या आधीनच्या नसतात. कांहीं जीव आईच्या गर्भांतून अकालीं पतन पावतात, कांहीं मृतावस्थेंतच जन्माला येतात तर कांहीं जन्माला येऊन मरण पावतात. या स्त्रीपुरुषसमागमांच्या संबंधांत जो बीज-सिंचन करितो, त्याला कोणत्या तरी प्रकारची संतति लाभते व तो पुनः या संसारांतील निरनिराळ्या द्वंद्वांमध्यें आसक्त होऊन रहातो. देहाला गर्भवास, जन्म, बाल्य, कौमार, पौगण्ड, यौवन, स्थाविर्य, जरा प्राण, रोध व नाश अशा दहा दशा प्राप्त होतात. हें शरीर ज्या पंचमहाभूतांचें बनलेलें असतें, तीं पंचमहाभूतें या दशांपैकीं सातव्या व नवव्या दशेपर्यंत जाऊन नष्ट होतात. या दशा पंचमहाभूतांच्याच आहेत, आत्म्याच्या नव्हेत. एखाद्या पारध्यानें लहानसहान हरिणांना त्रास द्यावा, त्याप्रमाणें रोग मनुष्याला त्रास देतात आणि त्यांच्या त्रासांतून सुटून वर येण्याला मनुष्याला सामर्थ्य राहात नाहीं. अनेक प्रकारच्या व्याधींनीं पीडिलेल्या रोग्यांनीं कितीहि द्रव्य खर्च केलें तरी मोठमोठ्या वैद्यांच्या कष्टांनीं सुद्धां त्यांच्या वेदना नाहींशा होत नाहींत. किंबहुना जे वैद्य अतिशय निपुण, कुशल व नानाप्रकारच्या औषधांचा संग्रह करणारे असतात त्यांना देखील रोग, पारध्यांनीं हरिणाला त्रास द्यावा त्याप्रमाणें त्रास देतात. नानाप्रकारचे काढे, नानाप्रकारचीं रसायनें घेऊन सुद्धां हे लोक, हत्तीनें टकरा खेळून पाडलेल्या पर्वताप्रमाणें भग्न झालेले दिसतात. हरिणें, निरनिराळे पक्षी, श्वापदें, व दरिद्रि माणसें

यांना रोगानें ग्रासिलें असतांना त्यांची चिकित्सा कोण करितो? यांना काय दुखणें येत नाहीं? मोठमोठ्या महातेजस्वी आणि अजिंक्य राजांना देखील रोग हे हिंस्र पशूंनीं बारीकसारीक पशूंच्यावर झडप घालून त्यांना न्यावें त्याप्रमाणें ओढून नेतात. याप्रमाणें सर्व प्रकारच्या वेदनांनीं पछाडलेले व मोह आणि शोक यांनीं व्याप्त झालेले हे सर्व लोक एखाद्या प्रवाहाच्या सपाट्यांत वहात जावे त्याप्रमाणें दैवाच्या फेऱ्यांत सांपडून वहात जातात. प्राणिमात्रांना दैवानें ज्या ज्या गोष्टी नेमून दिल्या आहेत, त्या त्यांना कधींहि टाळतां येत नाहींत. या कामीं पैसा, राज्य किंवा उग्र तपश्चर्या यांचा कांहींएक उपयोग होत नाहीं. मनुष्याच्या मनांत उत्पन्न होणारी प्रत्येक इच्छा सफल झाली असती तर या जगांत कोणीच मेला नसता, कोणीच म्हातारा झाला नसता व सर्वांच्या इच्छा पूर्ण झाल्या असत्या. आणि मग, नावडत्या गोष्टीकडे कोणी ढुंकूनहि पाहिलें नसतें. आपण सर्वांच्यापेक्षां वरचढ व्हावें अशी प्रत्येकाला इच्छा असते व त्याप्रमाणें प्रत्येकजण यथाशक्ति प्रयत्न करीत असतो. परंतु, त्याच्या मनाप्रमाणें सर्वदा घडतेंच असें नाहीं. हातून कोणताहि प्रमाद होऊं न देणारे शठ किंवा शूर पराक्रमी माणसें वगैरे सर्वच ऐश्वर्याच्या मदानें धुंद झालेल्या व दारूच्या धुंदींत बोलणाऱ्या उन्मत्तांची सेवा करतांना दृष्टीस पडतात. कित्येकांना त्यांच्या न कळत क्लेश प्राप्त होतात, तर कित्येकांना त्यांच्या स्वतःच्या मालकीचें धन मिळत नाहीं. शिवाय कर्माकर्मांच्या फलाच्या ठिकाणीं बरेंच वैषम्य दिसून येतें. प्रत्येक मनुष्याला ऐश्वर्याची हांव असते; पण कांहीं लोक पालखींत बसतात तर दुसरे कांहीं तीच पालखी खांद्यावर घेतात. कांहीं रथांतून जातात. कांहीं लोकांना विधुरावस्थेंत दिवस काढावे लागतात तर कांहीं लोकांच्या अंतःपुरांमध्यें शेंकडों स्त्रिया असल्याचें आढळून येतें. सुखदुःखादि द्वंद्वांच्या मोहामध्यें सांपडलेल्या मनुष्यांच्या ठिकाणीं देखील कर्मांचीं फलें भोगण्याच्या बाबतींत याप्रमाणें वैषम्य आढळतें. तेव्हां तूं द्वंद्वातीत असलेलें जें परब्रह्म तिकडे लक्ष लाव व या संसाराचा मोह धरूं नको. धर्म आणि अधर्म या दोहोंचाहि त्याग कर, खरें आणि खोटें हीं दोन्ही सोड, व खरेंखोटें सोडल्यानंतर तूं स्वत्वाची जाणीव पण टाक. हे ऋषिसत्तमा, याप्रमाणें मीं तुला हें अत्यंत गुह्य असें ज्ञान सांगितलें आहे, या ज्ञानाच्या योगानें देवसुद्धां हा मृत्युलोक सोडून स्वर्गाला गेले.

नारदाचें हें वचन ऐकून, महाबुद्धिमान् शुकाचार्यांनीं त्याच्यावर पुष्कळ विचार केला. पण त्यांच्या मनाचा निश्चय होईना. स्त्री-पुत्रादिक हे महादुःखद,

वेदविद्या संपादन करण्यांत श्रम फार. मग ज्यांत क्लेश थोडे आणि फळ मोठें अशी शाश्वत गोष्ट कोणती, यांवर शुकाचार्यांनीं विचार केला. याप्रमाणें क्षणभर विचार करून त्या धर्मज्ञ शुकाचार्यांनीं परमश्रेष्ठ अशी मोक्षस्थिति प्राप्त करून घ्यावयाची असा निश्चय केला. जगाच्या सर्व उपाधींतून मुक्त होऊन मला उत्तम गति कशी मिळेल? व लक्षावधि योनींच्या बुजबुजाटानें भरलेल्या या संसारसागरांत पुनः परत यावें लागूं नये म्हणून मीं काय करावें? जेथें जाऊन पोहोंचल्यानंतर पुनः परत संसारांत यावें लागणार नाहीं, असली मोक्षस्थिति मला पाहिजे आहे. तव्हां सर्वसंगपरित्याग करून माझ्या मनानें ठरविलेल्या त्या मोक्षस्थितीला मी जाईन. ज्या ठिकाणीं माझ्या आत्म्याला शांति मिळेल व ज्या ठिकाणीं मला अक्षय आणि अव्यय स्थितींत शांततेनें रहावयास मिळेल अशा ठिकाणीं मला जावयाचें आहे. मला हवी असलेली ही परमश्रेष्ठ गति योगसाधनाशिवाय प्राप्त होणें शक्य नाहीं. ज्ञानी पुरुषाला कर्मांचे पाश देहोपाधीमध्यें टाकूं शकत नाहींत. म्हणून योगमार्गाचा आश्रय करून व या देहाची उपाधि टाकून देऊन मी वायुरूपानें ह्या तेजस्वी सूर्याच्या बिंबांत आतां प्रवेश करितों. हा सूर्य क्षय पावत नाहीं. सुरगणानें चंद्राच्या ठिकाणचें अमृत पिऊन टाकल्यानें तो क्षीण होतो. चंद्रलोकाला गेलेला मनुष्य त्याची पुण्याई संपल्यावर पुनः मृत्युलोकांत येतो आणि पुण्यसंचय करून पुनः चंद्रलोकाला जातो. हा चंद्र नेहमींच क्षीण होतो, व वृद्धिंगतहि होतो. चंद्राच्या ह्या उदाहरणावरून धडा घेऊन ही क्षयवृद्धीची यातायात मी टाकून देईन. आपल्या तेजस्वी किरणांनीं सूर्य लोकांना तापवून सोडतो, त्याच्या बिंबाला ऱ्हासवृद्धि कधीं माहीत नाहींत व तो सर्वांना आपलें तेज देत असतो; म्हणून, मला अत्यंत तेजस्वी अशा सूर्यमंडळांत जाऊन रहाणें आवडतें. मीं त्या ठिकाणीं निःशंकपणें सर्वांना अजिंक्य होऊन राहीन. सूर्यलोकामध्यें हा माझा देह ठेवून, सर्व ऋषींसहवर्तमान त्या अतिशय दुःसह अशा सूर्याच्या तेजांत मी प्रविष्ट होऊन राहीन. वृक्ष, हत्ती, पर्वत, पृथ्वी, सर्व दिशा, स्वर्गलोक, देव, दानव, गंधर्व, पिशाच, उरग, राक्षस व या लोकांतले सर्व प्राणिमात्र यांचा निरोप घेऊन मी सूर्यमंडळांत प्रवेश करीन यांत शंका नाहीं. देवांनीं आज सगळ्या ऋषींसहवर्तमान माझें योगसामर्थ्य काय आहे याची प्रचीति पहावी.

याप्रमाणें आपण ठरविलेला बेत शुकाचार्यांनीं नारदांना कळविला व त्यांची अनुज्ञा घेऊन ते आपले पिते व्यासऋषि यांजकडे गेले. त्यांनीं महात्म्या कृष्ण-

द्वैपायन मुनीला नमस्कार करून प्रदक्षिणा घातली आणि त्यांचा निरोप घेतला. शुकाचार्यांचें तें वचन ऐकून महात्म्या व्यासऋषींना आनंद झाला आणि ते पुनः शुकांना म्हणतात. "थांब शुका, आजचा दिवस थांब; मी तुला एकदां डोळे भरून पाहून घेतों," परंतु, त्या निरपेक्ष, स्नेहरहित व संशयाच्या जालांतून विमुक्त झालेल्या शुकाचार्यांनीं आपलें सर्व लक्ष मोक्षमार्गाकडेच लावलें आणि तेथून निघून जाण्याचा निश्चय केला. पित्याला त्याच ठिकाणीं सोडून मुनिश्रेष्ठ शुकाचार्य हे सिद्धलोकांची वस्ति असलेल्या कैलास पर्वताच्या भव्य पठारावर आले. १२. ३. ३३१.

---

## अध्याय ३३२ वा.

[ १. शुकाचार्यांचें योगसामर्थ्य. ]

(१) भीष्म—त्या कैलासशिखरावर गेल्यावर व्याससुत शुकाचार्यांनीं एका निर्जन, सपाट व गवत बिलकूल नसलेल्या जागेवर आपलें आसन घातलें व शास्त्रानें सांगितलेल्या विधीप्रमाणें योगधारणा करावयास सुरवात केली. त्यांनीं योगशास्त्राच्या क्रमाप्रमाणें पायापासून एकेक गात्रें निरुद्ध करीत आणलीं व पूर्वेकडे तोंड करून त्या धीमान् मुनींनीं आपल्या सर्व गात्रशक्तींचा लय नुकत्याच उगवलेल्या सूर्याच्या ठिकाणीं केला, आणि ते त्या स्थितींत विनम्रपणानें बसले. व्यासपुत्र शुकाचार्यांनीं ज्या ठिकाणीं योगसाधन आरंभिलें तेथें कोणी पक्षी देखील नव्हते, तेथें कोणाचा शब्दहि ऐकूं येत नव्हता व त्या ठिकाणीं त्यांच्या स्वतःखेरीज कोणीहि प्राणि दृष्टोत्पत्तीस येत नव्हता. त्या ठिकाणीं, आपण सर्वसंग टाकून देऊन मुक्त झालों आहोंत, असें शुकांच्या प्रत्ययाला आलें, व हा आनंददायक प्रकार पाहून ते मोठ्यानें हंसले. मोक्षमार्गाची प्राप्ति व्हावी म्हणून शुकाचार्यांनीं पुनः योगसाधन केलें, व आपल्या आत्यंतिक योगसाधनाच्या बळावर ते अंतरिक्ष ओलांडून पलीकडे गेले. त्या ठिकाणीं त्यांनीं देवर्षि नारदाला प्रदक्षिणा घातली व योगसामर्थ्याच्या बळावर आपण काय केलें तेंहि त्यांना सांगितलें.

शुक—हे तपोधना, आपलें कल्याण असो. मोक्षमार्ग माझ्या नजरेसमोर स्पष्टपणें दिसत आहे व मी तिकडे जाण्यास प्रवृत्त झालों आहें. हे महाभागा, आपल्या आशीर्वादानें मी मला इष्ट असलेल्या ठिकाणीं जाईन.

नारदांची अनुज्ञा घेऊन द्वैपायनपुत्र शुकाचार्यांनीं त्यांना नमस्कार केला आणि पुनः आपल्या योगसामर्थ्यानें आकाशांत प्रवेश केला. कैलासाच्या पठारावरून उड्डाण करून ते वायुरूपानें आकाशांत गेले व त्या मार्गानें पुढें चालले. मनासारख्या व वायूसारख्या वेगानें धांवणाऱ्या व गरुडासारखी कांति असलेल्या त्या तेजस्वी द्विजश्रेष्ठाला सर्व लोकांनीं पाहिलें. अग्नि आणि सूर्य यांच्याप्रमाणें तेजःसंपन्न असलेल्या व दीर्घ आकाशमार्गानें जाणाऱ्या त्या शुकाचार्यांना त्यांच्या निश्चित बुद्धिसामर्थ्यामुळें तीन्ही लोक परब्रह्मरूप भासले. शुकाचार्य एकाग्रचित्तानें व निर्भय तऱ्हेनें आकाशमार्गानें जात आहेत हें सर्व स्थावरजंगम भूतांनीं पाहिलें व त्यांची यथाशक्ति आणि यथोचित पूजा केली. देवांनीं स्वर्गांतून त्यांच्यावर दिव्य फुलांचा वर्षाव केला. गंधर्व, अप्सरा व सर्व ऋषि त्या शुकाचार्यांना पाहून अत्यंत आश्चर्यचकित झाले व "तपश्चर्येच्या सिद्धिसामर्थ्यानें मान वर करून व सर्व शरीर खालीं सोडून हा आकाशांतून कोण चालला असावा? हा आपल्या नेत्रांनीं आम्हांला आनंदित करीत आहे," असें ते ऋषि आपापसांत म्हणूं लागले. परंतु, त्यांच्या म्हणण्याकडे लक्ष्य न देतांना तो त्रैलोक्यांत प्रसिद्धीस आलेला धर्मात्मा शुक कांहीं न बोलतां सूर्याच्या बिंबावर नजर ठेवून पूर्वदिशेच्या रोखानें चालला. आपल्या शब्दानें सर्व आकाश दुमदुमून सोडणाऱ्या त्या शुकाचार्यांना येतांना पाहून पंचचूडाप्रभृति सर्व अप्सरांना आश्चर्य वाटून त्यांच्या चित्ताचा गोंधळ उडाला व डोळे मोठे करून त्या त्यांच्याकडे पाहूं लागल्या आणि "उत्तम गतीला पावलेलें असें हें कोणतें दैवत आपल्याकडे येत असावें बरें?" असें त्या आपसांत म्हणूं लागल्या. नंतर शुकाचार्य, उर्वशी आणि पूर्वचिति या नांवाच्या अप्सरांनीं सेविलेल्या मलयपर्वतावर आला. त्या व्यासपुत्र शुकाचें सामर्थ्य पाहून त्या दोन्ही अप्सरांना अत्यन्त आश्चर्य वाटलें व त्या आपसांत म्हणाल्या, "वेदाभ्यासामध्यें रत असलेल्या या ब्राह्मणाचें हें योगसामर्थ्य अत्यन्त श्रेष्ठ आहे. याची बुद्धि स्थिर असून हा थोडक्याच काळांत चंद्राप्रमाणें आकाश-मार्गानें गमन करितो. ही बुद्धि याला पित्याची सेवा केल्यामुळेंच प्राप्त झाली आहे यांत शंका नाहीं. हा पितृभक्त आहे, याची तपश्चर्या दृढ आहे व हा आपल्या बापाचा आवडता मुलगा आहे. याच्या बापाची याच्या ठिकाणीं अनन्य आसक्ति आहे; असें असून त्यानें याला जाऊं कसें दिलें?" उर्वशीचें हें वचन ऐकून शुकाचार्यांचें लक्ष त्या आवाजाकडे वेधलें गेलें व त्यांनीं सर्व दिशांकडे निरखून पाहिलें. अंतरिक्ष,

पर्वत व अरण्यें यांनीं युक्त असलेली पृथ्वी, नद्या, सरोवरें यांच्याकडे शुकाचार्यांनीं नजर फेंकली. त्यांच्या भोंवतालीं सर्व देवता हात जोडून मोठ्या आदरानें त्यांच्याकडे पहात होत्या. धर्मात्म्या शुकाचार्यांनीं त्या देवतांना सांगितलें कीं, "माझे पिते व्यास जर "हे शुका, हे शुका" असें म्हणत म्हणत माझ्यामागें येथपर्यंत येतील तर आपण सर्वांनीं त्यांना प्रत्युत्तर द्यावें. माझ्यावर कृपा करून, आपण सर्वांनीं ही गोष्ट करावी." शुकाचार्यांचें हें वचन ऐकून सर्व दिशा, अरण्यें, समुद्र, नद्या व पर्वत यांतून एकच ध्वनि निघाला कीं, "हे द्विजा, आम्हांला तूं जी ही आज्ञा केलीस ती आम्हीं निःसंशय पाळूं. व्यासऋषींनीं उच्चारलेल्या वाक्याला आम्हीं निःसंशय उत्तर देऊं." १२.३.३३२.

---

## अध्याय ३३३ वा.

[ शुकाख्यानाची समाप्ति. ]

**भीष्म**—अशा प्रकारचें भाषण करून ह्या महातपस्वी ब्रम्हर्षि शुकाचार्यांनीं वितर्क, विचार, आनंद आणि अस्मिता असे चारी प्रकारचे मोक्षाला आडवे येणारे दोष टाकले व सिद्धि मिळविली. त्यांनीं अष्टविध तमोगुण, पांच प्रकारच्या विषयांकडे मनुष्याची प्रवृत्ति करणारा रजोगुण व शेवटीं सत्वगुण या सर्व त्रिगुणांचा त्याग केला. शुकाचार्यांनीं त्रिगुण टाकिल्याबरोबर त्या ठिकाणीं अद्भुत प्रकार घडून येऊं लागले. ते शुकाचार्य नित्य, निर्गुण व सर्व चिन्हांनीं वियुक्त अशा शाश्वत परब्रह्मपदीं स्थित झाल्यावर निर्धूम अग्नीप्रमाणें शोभूं लागले. हे राजा, त्या ठिकाणीं उल्कापात होऊं लागले, दाही दिशा पेटल्याप्रमाणें दिसूं लागल्या. तसेंच तेथें धरणीकंप होतोसा वाटूं लागला, झाडांच्या फांद्या मोडून पडूं लागल्या, पर्वतांचीं शिखरें गळून पडतातशीं वाटूं लागलीं आणि त्यांच्या शब्दांनीं हिमालय विदीर्ण होतो कीं काय असें वाटूं लागलें. सूर्य मंदतेज झाला; अग्नींतून ज्वाळा निघेनाशा झाल्या; तलाव, नद्या व समुद्र हीं सगळीं प्रक्षुब्ध झालीं. पण त्याचवेळीं इंद्रानें मात्र अत्यंत सुगंधयुक्त व चवदार पाण्याचा पृथ्वीवर वर्षाव केला. पवित्र व सुगंधयुक्त असा वारा वाहूं लागला. नंतर, उत्तरेच्या बाजूला हिमालयाचें एक व मेरुपर्वताचें एक अशीं एकाला एक लागलेलीं दोन शिखरें शुकाचार्यांच्या दृष्टीला पडलीं. त्या शिखरांचा रंग अनुक्रमें पांढरा व पिवळा असा होता.

हिमालयाचें शिखर रुप्याचें आहे असा भास होत होता व मेरूचें शिखर सोन्याचें होतें. त्या शिखरांचा विस्तार शंभर योजनें असून तीं सुंदर, कांहींशीं तिरकस व उंच गेलेलीं अशीं होतीं. त्या शिखरांना न जुमानतां शुकाचार्यांनीं निःशंक मनानें उड्डाण केलें. त्याबरोबर तीं दोन्हीं शिखरें एकदम दुभंग झालेलीं दिसलीं. हे राजा, तो प्रकार सर्वच अद्भुत होता. नंतर शुकाचार्य त्या शिखरांच्या मधून निघून गेले आणि तो हिमालय पर्वत त्यांच्या वाटेंत आडवा येऊं शकला नाहीं. तो पर्वत दुभंगलेला पाहून व शुकाचार्य त्यांतून पार निघून गेलेले पाहून तेथें वस्ति करून राहाणारे गंधर्व, ऋषि व अंतरिक्षांतील सर्व देव यांनीं एकच शब्द केला व त्यांच्या त्या 'शाबास' 'शाबास' या शब्दांनीं तो प्रदेश दुमदुमून गेला. देव, ऋषि, गंधर्व, यक्ष, राक्षस व विद्याधर या सर्वांनीं त्या शुकाचार्यांची पूजा केली व त्या वेळेला तो आकाशमार्ग सर्व बाजूंनीं दिव्य फुलांनीं भरून गेला होता. त्या आकाशमार्गानें जात असतांना शुकाचार्यांना मंदाकिनी नदी लागली. त्या नदीच्या कांठावर फुललेल्या झाडांचीं वनें होतीं. त्या ठिकाणीं अप्सरांचे गण जलक्रीडा करीत होते. शून्याकार शुकांना पाहून त्या अप्सरांना वस्त्रविरहित स्थितींतहि जलक्रीडा करण्यास संकोच वाटला नाहीं. इतकें शुकाचार्यांचें चित्त निर्विकार होतें. शुकाचार्य निघून चालले आहेत असें पाहून त्यांचे पिते व्यासऋषि हे प्रेमानें मोहित होऊन त्याच मार्गानें त्यांच्यामागून चालले. शुकांनीं वायूच्या कक्षेच्या पलीकडे जाऊन अंतरिक्षामध्यें प्रवेश केला व अशा प्रकारें आपलें अद्भुत योगसामर्थ्य दाखवून ते ब्रह्मरूप झाले. व्यासांनीं आपल्या तपःप्रभावानें योगगतीचा अवलंब करून एका क्षणांत शुकाचार्यांच्या मागें प्रयाण केलें. तों पर्वताचें शिखर दुभंग करून शुकमुनि त्यांतून निघून गेले असें त्यांच्या दृष्टीस पडलें. असलें अद्भुत कर्म केल्याबद्दल ऋषिजन आपल्या पुत्राची स्तुति करिताहेत असेंहि त्या ठिकाणीं व्यासांच्या नजरेला आलें. नंतर व्यासांनीं "शुका, शुका" म्हणून मोठ्यानें हांक मारिली व त्या आवाजानें त्रैलोक्य दुमदुमून सोडलें. धर्मात्म्या शुकाचार्यांनींहि पण सर्व भूतमात्रांच्या ठिकाणीं प्रवेश करून सर्व बाजूंनीं 'भोः' अशा शब्दांनीं त्यांच्या हांकेला प्रत्युत्तर दिलें. त्या वेळेला सर्व स्थावर जंगम जगानें 'भोः' असा एकाक्षरी शब्दाचा उच्चार केला व शुकाचार्यांना साथ दिली. त्या दिवसापासून आजपर्यंत पर्वतांच्या गुहेमध्यें किंवा सपाटीवर कोणतेहि निरनिराळे शब्द उच्चारले तरी त्यांचा प्रतिध्वनि ऐकावयास येत असतो. हा प्रतिध्वनि म्हणजे जणुं काय त्या शुकाला दिलेलें प्रत्युत्तरच होय.

अशा प्रकारें आपला प्रभाव दाखवून शुकाचार्य अंतर्धान पावले आणि शब्दादि पंचगुणांचा त्याग करून परब्रह्मपदाला गेले. आपल्या महातेजस्वी पुत्राचा तो महिमा डोळ्यानें पाहून व्यासऋषि त्याचें चिंतन करूं लागले व तेथेंच त्या पर्वताच्या पृष्ठावर बसले. मंदाकिनीच्या जलामध्यें विहार करणाऱ्या अप्सरांनीं व्यासांना येतांना पाहिलें मात्र; तोंच त्यांना गोंधळल्यासारखें होऊन कांहीं सुचेनासें झालें. त्यांच्यांतल्या कांहींजणी पाण्यांत बुडी मारून बसल्या. कांहींजणींनीं तीरावरल्या लताकुंजांचा आश्रय केला तर कांहींजणी आपापलीं वस्त्रें घेण्यासाठीं धांवल्या. त्या मुनिश्रेष्ठाला पाहून वस्त्रविरहित स्थितींत जलक्रीडा करणाऱ्या अप्सरांचा असा एकंदर गोंधळ उडाला. शुकाचार्यांच्या व आपल्या परिस्थितींतील हें अंतर पाहून शुकाचार्य हे किती विदेही आहेत व त्या मानानें आपण अजून किती आसक्त आहोंत याची खात्री व्यासांना पटली व त्यांना पुत्राच्या स्थितीबद्दल आनंद तर झालाच पण त्याच्याच बरोबर स्वतःबद्दल लज्जाहि वाटली.

अशा प्रकारें व्यास ऋषि तेथें बसले असतांना त्या ठिकाणीं महर्षींनीं ज्यांची पूजा केली आहे असे, देव आणि गंधर्व यांनीं वेढिलेले व पिनाक धनुष्य हातामध्यें धारण केलेले भगवान् शंकर त्या ठिकाणीं आले. व पुत्रशोकानें संतप्त झालेल्या व्यासांचें सांत्वन करण्यासाठीं त्यांनीं त्यांना पुढील उपदेश केला. "हे मुने, अग्नि, पृथ्वी, जल, वायु व आकाश इत्यादि पंचमहाभूतांची आपल्या सामर्थ्यानें बरोबरी करणारा मुलगा तूं पूर्वीं मजपासून मागून घेतलास व त्या प्रकारचा तो झालाहि. पुढें तुझ्या तपश्चर्येनें त्याचें सामर्थ्य वाढलें व अखेर माझ्या प्रसादानें तो पवित्र व ब्रह्मतेजानें युक्त असा झाला. अंगीं जितेंद्रियत्व नसेल तर देवतांना सुद्धां प्राप्त होणार नाहीं अशी परम गति तुझ्या मुलाला प्राप्त झाली. त्याबद्दल तूं शोक कां करतोस? जेथपर्यंत पर्वत उभे आहेत आणि समुद्र जाग्यावर आहेत तेथपर्यंत तुझी आणि तुझ्या पुत्राची कीर्ति अक्षय राहील. हे महामुने, माझ्या प्रसादामुळें तुला ह्या प्रदेशांत कधींहि नाहींशी न होणारी अशी तुझ्या पुत्रासारखी छाया सर्वत्र दिसेल." अशा प्रकारें भगवान् रुद्रांनीं व्यासांचें सांत्वन केल्यानंतर त्यांना त्यांच्या पुत्रासारखी छाया सर्वत्र दिसूं लागली आणि ते मोठ्या आनंदानें त्या ठिकाणीं राहिले. हे भरतर्षभा, याप्रमाणें शुकाचार्यांचें जन्म व त्यांना प्राप्त झालेली गति यांचा इतिहास तूं मला विचारलास, तो मीं तुला विस्तारानें सांगितला. राजा, हा इतिहास पूर्वीं देवर्षि नारदांनीं व

महायोगी व्यासऋषींनीं प्रसंगाप्रसंगानें मला वेळोवेळीं सांगितला होता. मोक्षधर्मानें युक्त असा हा परम पवित्र इतिहास जो ऐकेल व वाचील त्याला शांतिसुख मिळून तो परमपदाला जाईल. १२. ३. ३३३.

## अध्याय ३३४ वा.

[ नारायणीयोपाख्यानाचा प्रारंभ. ]

(१) **युधिष्ठिर**—गृहस्थ, ब्रह्मचारी, वानप्रस्थ किंवा संन्यासी यांच्यापैकीं कोणालाहि सिद्धि मिळविण्याची इच्छा झाली तर त्यानें कोणत्या देवतेचें पूजन करावें? त्यांना शाश्वत स्वर्गप्राप्ति कशानें होईल? परम निःश्रेयसपद कशानें प्राप्त होईल? या लोकांनीं आपले दैवयज्ञ व पितृयज्ञ कोणत्या विधीनें करावे? देहपातानंतर यांना कोणती गति मिळेल? मोक्ष मोक्ष म्हणजे काय? स्वर्गांत गेल्यानंतर तेथून खालीं यावें लागूं नये म्हणून या लोकांनीं काय करावें? देवतांच्या मधील परमश्रेष्ठ देव कोण? पितृलोकांतला पितृश्रेष्ठ कोण? आणि या सगळ्यांच्या पलीकडे परमश्रेष्ठ असें काय आहे? तेंहि हे पितामहा, आपण मला सांगा.

**भीष्म**—हे अनघा, प्रश्न कसे विचारावे ही विद्या तूं चांगली जाणतोस. तूं मला विचारलेला प्रश्न अत्यंत गूढ असून हा बुद्धिवादाच्या मार्गानें शेंकडों वर्षें सोडवीत बसलें तरी सुटणारा नव्हे. राजा, याला देवाचा प्रसादच पाहिजे; किंवा, पूर्ण ज्ञानप्राप्ति झाली पाहिजे. असो. हे शत्रुमर्दना, तुला हें गहन आख्यान मीं सांगतों, तें ऐक. या बाबतींत नारद ऋषि आणि नारायण यांच्यामध्यें झालेला एक संवाद जुना इतिहास म्हणून सांगत असतात. विश्वात्म्या नारायणानें धर्माच्या पोटीं चार मूर्तींनीं अवतार घेतला, असें पूर्वीं माझ्या पित्यानें मला सांगितलें आहे. हे महाराजा, पूर्वीं कृतयुगामध्यें स्वायंभुव मन्वन्तरांत नर, नारायण, हरि व कृष्ण असे भगवान् नारायणाचे चार स्वयंभू अवतार झाले. त्यांच्यापैकीं नरनारायण ह्या अव्यय जोडीनें बदरिकाश्रमीं जाऊन सोन्याच्या रथांत बसून तपश्चर्या केली. त्या रथाला आठ चाकें होतीं. व पंचमहाभूतें हेच त्या रथाचे घोडे होते. तो रथ अत्यंत मनोरम दिसत होता. त्या ठिकाणीं ते लोकनायक नरनारायण तपश्चर्या करितां करितां कृश झाले व त्यांच्या शरीरांतील शिरा स्पष्ट दिसूं लागल्या. ते इतके

तेजःसंपन्न व तपोनिष्ठ होते कीं, देवांनाहि त्यांचें दर्शन घडणें दुर्लभ होतें. त्यांच्या प्रत्यक्ष कृपाप्रसादाचाच ज्याला लाभ होईल त्यानांच त्यांचें दर्शन होणें शक्य होय. सर्व लोकांत संचार करणारे महाभगवद्भक्त व शीघ्रगामी नारद हे जे त्या महामेरु पर्वताच्या शिखरावरून गंधमादन पर्वतावर येऊन बदरिकाश्रमाला आले ही तरी त्या नारायणानें हृदयस्थ होऊन केलेली प्रेरणाच होय. हे नरनारायण आपलें आह्निक करीत बसले असतांना नारदाच्या मनांत आलें कीं, सर्व लोकांचा आधार ज्याच्यावर असलें हें देव, असुर, गंधर्व, किन्नर व नाग या सर्वांचें अधिष्ठान. प्रथम या चारी मूर्ति एकरूपच होत्या व पुढें एकाच्या चार झाल्या. धर्माची अभिवृद्धि करण्यासाठीं यांनीं धर्मसंवर्धन केलें व या ठिकाणीं या देवतांनीं धर्मावर एक प्रकारचा अनुग्रह केला असेंच मला वाटतें. नर, नारायण, कृष्ण व हरि यांच्यापैकीं कृष्ण व हरि हे कांहीं कारणासाठीं पूर्वीं येथेंच होते. हे धर्मश्रेष्ठ नरनारायण त्या ठिकाणीं आज तपश्चर्या करीत आहेत. सर्व लोकांनीं मिळवावयाची परम गति तेच हे नरनारायण असून स्वतः तपश्चर्या कसली करतात ? हे यशस्वी ऋषि भूतमात्रांच्या पितृस्थानीं आहेत व त्यांचें दैवत आहेत. अशा स्थितींत हे बुद्धिमान् ऋषि कोणत्या देवतेची पूजा करितात, अगर कोणत्या पितरांची आराधना करितात हेंच समजत नाहीं." असा विचार करीत करीत भक्तियुक्त अंतःकरणानें नारदऋषि एकदम त्या नरनारायणांच्या समोर येऊन उभे राहिले. त्या नरनारायण ऋषींचें दैव व पितृसंबंधीं सर्व आह्निक संपल्यानंतर त्यांचें लक्ष यांच्याकडे गेलें आणि त्यांनीं नारदांची शास्त्रोक्त विधीनें पूजा केली. तें परम अद्भुत कर्म पाहून व त्यांचा तो पूजाविस्तार पाहून भगवान् नारदऋषि अत्यंत आनंदित झाले. त्यांनीं त्या दोघांच्या जवळ बसून प्रसन्न अंतःकरणानें नारायणाचें निरीक्षण केलें व त्या देवाधिदेवाला नमस्कार करून प्रश्न विचारिला.

नारद—हे भगवन्ता, सांगोपांग वेद व पुराणें तुझीं स्तुतिस्तोत्रें गातात. तूं अज, शाश्वत आहेस, असें म्हणतात. या जगाचा धारणकर्ता तूं, या जगाची आई तूं, तुझें पद हें अत्यंत श्रेष्ठ असें अमृतपद आहे, असें तुझें वर्णन केलें जातें. तुझ्या ठिकाणीं हें सर्व जगत्–पूर्वीं होऊन गेलेलें, आतां असलेलें व पुढें होणारें– प्रतिष्ठित आहे. गृहस्थाश्रमावर अवलंबून असलेले चारी आश्रम हे तुझ्या ठिकाणीं स्थित आहेत. हे देवाधिदेवा, तुझीं रूपें अनंत आहेत व त्या अनंत मूर्तींच्या पूजनाच्या द्वारें सर्व लोक तुझीच पूजा करितात. या सगळ्या जगाचे आईबाप

तूं. याचा शाश्वत गुरू तूं. अशा स्थितींत तूं आणखी कोणत्या देवाची पूजा करितोस? व कोठल्या पितरांना उद्देशून यज्ञकर्म करतोस, हें आम्हांला सांग.

श्रीभगवान्—हे ब्रह्मन्, हें सनातन आत्मगुह्य कधीं कोणाला सांगूं नये, पण तुझ्यासारख्या भक्तिमान् पुरुषाला हें मी सांगतों ऐक. अत्यंत सूक्ष्म, जाणतां न येण्यासारखें, अव्यक्त, अचल, शाश्वत व ज्यामध्यें इंद्रियें, इंद्रियांचे विषय आणि पंचमहाभूतें यांचा संबंध नाहीं असलें प्राणिमात्रांच्या अंतरंगामध्यें असणारें जें तत्त्व त्याला क्षेत्रज्ञ म्हणतात व त्रिगुणांनीं रहित असलें जें तत्त्व त्याला पुरुष असें म्हणतात. त्रिगुणात्मक अव्यक्ताची उत्पत्ति या पुरुषापासून आहे. जगांत प्रकट दिसणाऱ्या प्रत्येक वस्तुमात्राच्या ठिकाणीं जी सत्ता–अस्तित्व–दिसतें, ती सत्ता म्हणजेच अव्यय प्रकृति होय. ती प्रकृति हेंच आमचें अधिष्ठान होय. सत् आणि असत् या दोहोंनीं भरलेल्या आनंदात्म्याचेंच आम्ही नित्य पूजन करितों, आमच्याकडून दैवयज्ञ व पितृयज्ञ तोच करवितो. हे ब्रह्मन्, देवलोकांत किंवा पितृलोकांत त्याच्यापेक्षां श्रेष्ठ कोणी नाहीं. तो आमचा केवळ आत्माच आहे. आणि म्हणून आम्ही त्याचें पूजन करितों. त्यानेंच "दैवयज्ञ व पितृयज्ञ करावे" अशी ही लोकयात्रा चालविणारी मर्यादा घालून दिली. नित्यकर्में करण्यासंबंधीची ही त्याचीच आज्ञा आहे. ब्रह्मा, स्थाणू, मनु, दक्ष, भृगु, धर्म, यम, मरीचि, अंगिरा, अत्रि, पुलस्त्य, पुलह, क्रतु, वसिष्ठ, परमेष्ठि, विवस्वान्, सोम, कर्दम, क्रोध आणि विक्रीत असे एकवीस प्रजापति पुढें निर्माण झाले व त्यांनीं अनाद्यनन्त देवानें घालून दिलेली सनातन मर्यादा पुढें पाळली; त्याच्यापासून दैवयज्ञ व पितृयज्ञ यांचें ज्ञान प्राप्त करून घेऊन तीं तीं कर्में करून त्यांच्या बळावर आत्मप्राप्ति करून घेतली. स्वर्गांत जाणारे जे जे देहधारी प्राणी या प्रजापतींना नमस्कार करितात, ते ते त्या परमात्म्याच्या प्रसादानें त्यानें नेमून दिलेल्या गतीला जातात. पंचप्राण, पंचकर्मेंद्रियें, पंच ज्ञानेंद्रियें आणि मन व बुद्धि असे मिळून जे सतरा गुण त्यांच्यापासून अलिप्त राहणारे व सर्व कर्में व पंधरा कला यांचा ज्यांनीं त्याग केला तेच मुक्त होत, हें निश्चित समजावें. मुक्तांना जी गति मिळते, तो क्षेत्रज्ञ चिदात्मा होय. तो जसा सर्वगुणसंपन्न तसाच निर्गुणहि आहे. आमच्या ज्ञानयोगाच्या योगानें आम्हांला त्याचें दर्शन होतें. आम्हीं त्याच्यापासून उत्पन्न झालेले आहोंत. अशा प्रकारें त्या आत्म्याचें ज्ञान करून घेऊन आम्हीं त्याचेंच पूजन करीत असतों. नानाप्रकारच्या मतानें युक्त असलेले वेद व चारी आश्रमांतील सर्व लोक याच आत्म्याचें मोठ्या भक्तीनें पूजन करितात. त्यांना गतीहि याच्याचपासून

मिळते. या लोकांमध्यें परमात्म्याशीं एकरूप होऊन जे त्याची भक्ति करितात व त्याच्या आदराला प्राप्त होतात, त्यांना याहीपेक्षां अधिक श्रेय प्राप्त होतें आणि तें हें कीं, ते परमात्म्याशीं एकरूप होतात. हे नारदा, याप्रमाणें मी हा अत्यंत गुह्य असा भक्तिप्रकार तुला सांगितला आणि तूंहि पण भक्तीनें, प्रेमानें आणि आमच्या बद्दलच्या आदरानें ऐकिलास. १२, ३. ३३४.

---

## अध्याय ३३५ वा.

[ नारायणीयोपाख्यान, पुढें चालू ]

भीष्म—भूतमात्रांमध्यें श्रेष्ठ असलेल्या त्या नारदाला उद्देशून पुरुषोत्तम नारायणानें अशा तऱ्हेचें भाषण केल्यानंतर ते नारदऋषि लोकहितासाठीं अवतार घेतलेल्या नारायणाला म्हणाले, " जिच्यामुळें आपण धर्माच्या गृहामध्यें चार रूपांनीं जन्म घेतलात ती आपली आद्य प्रकृति मी पहावयास जातों. आपला लोककल्याणाचा हेतु आपण आतां साधावा. मी गुरूंची सतत पूजा करीत असतों. दुसऱ्याचें गुह्य मी यापूर्वीं कधींहि फोडलें नाहीं. हे लोकनाथा, मी वेदाध्ययन चांगल्या प्रकारें केलें आहे, तपश्चर्याहि उत्तम केली आहे. मी यापूर्वीं कधीं खोटें बोललों नाहीं. हात, पाय, पोट व विषयेंद्रियें यांचें मी वेदविहित मार्गानें दमन केलें आहे. मी शत्रु आणि मित्र यांच्याशीं नेहमींच समभावानें वागतों व त्या अजस्र आदिदेवाला अनन्यभावानें सतत शरण जाऊन त्याच्या पासून आशीर्वाद मागतों. अशा प्रकारच्या तपोविशेषानें मी शुद्धसत्व झालों आहें, तेव्हां त्या अनंत परमेश्वराचें दर्शन मला कां न घडावें ?" ब्रह्मदेवाचे मानसपुत्र जे नारदऋषि त्यांचें हें असलें भाषण ऐकून सनातन व शाश्वत धर्माचें रक्षण करणाऱ्या भगवान् नारायणानें योग्य प्रकारें त्यांची पूजा केली, व त्यांना निरोप दिला. नारायणांनीं निरोप दिल्यानंतर नारदऋषींनीं पण त्यांचा उलट सत्कार केला आणि आपल्या योगसामर्थ्याच्या बलावर आकाशांत उड्डाण केलें व ते एकदम मेरुपर्वतावर येऊन प्राप्त झाले. त्या पर्वताच्या शिखरावर नारदमुनींनीं क्षणभर एकांतामध्यें विश्रांति घेतली. वायव्य दिशेकडे त्यांनीं नजर टाकली असतांना, त्या नारदऋषींना अद्भुत रूपाचें, क्षीरसागराच्या उत्तरेला असलेलें श्वेत नांवाचें बेट दिसलें. हें श्वेतद्वीप मेरूपर्वतापासून बत्तीस हजार योजनें दूर आहे असें याचें वर्णन मोठमोठालीं माणसें करतात. या

श्वेतद्वीपांत ज्यांना इंद्रियें नाहींत, जे कांहीं खात नाहींत, ज्यांच्या डोळ्यांच्या पापण्या हालत नाहींत, ज्यांच्या अंगाला सुगंध येतो, ज्यांचीं पापें सर्वस्वी नाहींशीं झालेलीं आहेत, पापी माणसांना ज्यांच्याकडे पाहतांना दिपल्यासारखें होतें, ज्यांचीं हाडें वज्रासारखीं कठिण होतीं, ज्यांना मान आणि अपमान हीं दोन्ही सारखीं वाटत, ज्यांचें सामर्थ्य अत्यंत पवित्र व शुद्ध स्वरूपाचें होतें ज्यांचीं मस्तकें छत्राच्या आकृतीचीं होतीं, ज्यांचा आवाज मेघाच्या गडगडाटासारखा होता, ज्यांचे वृषण आणि खांदे आणि कंबर यांचे मधला भाग हा फार मांसल नव्हता, ज्यांचीं पावलें कमळाच्या पानासारखीं होतीं, ज्यांना साठ शुभ्र दांत व आठ दाढा असत व सूर्यासारखें तेजस्वी असें हें विश्वरूप चक्र जे आपल्या जिभांनीं चाटण्याचा प्रयत्न करीत, असले पांढऱ्या वर्णाचे पुरुष त्या श्वेतद्वीपांत होते.

युधिष्ठिर—ज्यांना इंद्रियें नाहींत, ज्यांना आहार नाहीं, ज्यांच्या डोळ्यांच्या पापण्या हालत नाहींत, ज्यांच्या अंगास सुवास येतो असले पुरुष कसे जन्माला आले व त्यांना कोणती उत्तम गति मिळते? आतां श्वेतद्वीपांत रहाणाऱ्या लोकांचीं म्हणून जीं आपण लक्षणें सांगितलीं हीं लक्षणें आणि जीवन्मुक्ताचीं लक्षणें हीं जवळ जवळ एकच आहेत. तेव्हां माझी ही जिज्ञासा आपण पूर्ण करावी. कारण या बाबतींत मला अत्यंत उत्कंठा लागली आहे. आपण सर्व इतिहास आणि गोष्टी यांचे सागर आहांत आणि आम्ही आपणाकडे आलेले आहोंत.

भीष्म—राजा, मी माझ्या वडिलांच्यापाशीं ही फार मोठी कथा ऐकलेली आहे. तीच मी आतां तुला सांगणार आहें. ती कथा ही सगळ्या कथांचें सार आहे.

पूर्वीं उपरिचर नांवाचा एक राजा होऊन गेला. तो इंद्राचा मित्र असून नारायणाचा परमभक्त होता. तो अत्यंत धार्मिक असून मोठा पितृभक्त होता व त्याच्यामध्यें आळस असा कोणत्याहि प्रकारचा नव्हता. पूर्वीं नारायणाच्या वरप्रसादामुळें त्याला साम्राज्यप्राप्ति झाली. त्यानें पूर्वीं सूर्याच्या तोंडून निघालेल्या पंचरात्रोक्त विधीनें नित्य नारायणाची पूजा करावी व त्या पूजा-सामग्रींतून जें शेष राहील त्याच्या योगानें पितरांची पूजा करावी व त्यांतूनहि जें शेष राहील त्यानें

ब्राह्मणांची पूजा करावी, ब्राह्मणांच्या पूजेंतून शेष राहील तें आश्रितांना द्यावें, व शेवटीं जो शेष राहील त्याचा स्वतः उपभोग घ्यावा. तो सत्यनिष्ठ असे. कोणाहि प्राण्याची हिंसा करणें हें त्याला माहीतच नव्हतें. देवदेव जनार्दनाच्या ठिकाणीं त्याची परमभक्ति असे. त्या राजाची, सर्व सृष्टि उत्पन्न करणाऱ्या अव्यय व जरामरणरहित अशा नारायणाच्या ठिकाणीं असलेली ती परमभक्ति पाहून इंद्रानें स्वतः त्याला आपल्या अर्ध्या आसनावर बसण्याचा मान दिला होता. आपलें स्वतःचें राज्य, पैसा, स्त्रिया, वाहनें वगैरे सर्व गोष्टी त्यानें परमेश्वराच्या अशा समजून त्या त्याच्या चरणीं वाहिल्या होत्या. हे राजा, त्यानें काम्य व नैमित्तिक अशा यज्ञसंबंधीच्या सर्व क्रिया पांचरात्रोक्त विधीनें केल्या. त्या महात्म्याच्या घरांत पंचरात्रदर्शनामध्यें पारंगत असलेल्या अशा मोठमोठ्या लोकांना भगवंताला अर्पण केलेलें अन्न सर्वांच्या आधीं मिळे. तो शत्रुकर्षण राजा राज्य करीत असतांना कोणाच्याहि तोंडून असत्य भाषण निघत नसे व कोणाच्याहि मनांत दुष्ट भावना येत नसत. त्यानें मनानें, शरीरानें अगर वाचेनें अणुभरसुद्धां पाप केलें नाहीं. चित्रशिखंडी या नांवानें प्रसिद्ध असलेले जे सप्तर्षि त्या सप्तर्षींनीं एकमतानें ह्या महामेरुपर्वतावर चारी वेदांचें मंथन करून एक शास्त्र निर्माण केलें. त्यांनीं आपल्या सात मुखांनीं लोकधर्म सांगितला. मरीचि, अत्रि, अंगिरस, पुलह, पुलस्त्य, क्रतु व वसिष्ठ हे ते चित्रशिखंडी नांवाचे सप्तर्षि होत. हे सप्तर्षि या सात प्रकृति व स्वायंभुव मूलप्रकृति आठवी. अशा आठ प्रकृतींनीं या लोकांचें धारण केलें जातें व हें शास्त्र त्यांच्या तोंडून बाहेर पडलें आहे. त्या एकाग्रचित्त, दमनशील, संयमी व भूत भविष्य वर्तमान जाणणाऱ्या सत्यधर्मपरायण मुनींनीं हें अत्यंत श्रेष्ठ, हितकर व श्रेयोरूप असें वेदब्रह्म जाणून व सर्व लोकांचाहि विचार करून नंतर हें शास्त्र निर्माण केलें. या शास्त्रामध्यें धर्म, अर्थ आणि काम हे तिन्ही पुरुषार्थ प्रथम सांगितले असून मोक्षधर्म पाठीमागून सांगितला आहे व स्वर्गवास आणि इह-लोकचा वास यासंबंधाचीं अनेक बंधनें सांगितलीं आहेत. या मुनींनीं अनेक ऋषींसहवर्तमान पूर्वी भगवान् नारायणाची आराधना केली. ही तपश्चर्या ते देवांचीं एक हजार वर्षे भरेपर्यंत करीत होते. त्यावेळीं सर्व लोकांचें नियमन करणारा व त्यांना मार्ग दाखविणारा भगवान् नारायण आणि देवी सरस्वती यांनीं लोकांवर अनुग्रह करण्याच्या इच्छेनें त्या सर्व ऋषींच्या अंतःकरणामध्यें प्रवेश केला. त्या तपोनिष्ठ ब्राह्मणांनीं योग्य प्रकारें प्रवृत्त केलेली सरस्वती शब्द, अर्थगांभीर्य व युक्तिवाद या सर्व दृष्टींनीं निर्दोष अशा शास्त्ररूपानें

प्रथम प्रगट झाली. ओंकाराच्या स्वरोच्चारानें पावन झालेलें तें शास्त्र ऋषींनीं त्या पूर्वींच ऐकलें होतें आणि ती त्या परम कारुणिक भगवंताचीच कृपा होती. त्या अदृश्य भगवंतानें प्रसन्न होऊन आकाशवाणीच्या रूपानें त्या ऋषींना सांगितलें कीं, "हें एक लक्ष श्लोकांचें लोकव्यवहारशास्त्र तुम्ही निर्माण केलें असून हें उत्कृष्ट आहे. या शास्त्राच्या योगानें धर्माची प्रवृत्ति होईल व हें शास्त्र लोकांना प्रवृत्तिनिवृत्ति मार्ग शिकवील. ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, अथर्ववेद व अंगिरस यांच्या आधारावर हें रचलेलें आहे. मी याच्या प्रसादापासून ब्रह्मा यथाप्रमाण निर्माण केला. क्रोधापासून रुद्र निर्माण केला. तुम्ही सर्व ब्राह्मण हे प्रकृतिमूल आहांत. सूर्य, चंद्र, वायु, भूमि, आप, अग्नि, सगळीं नक्षत्रें व "भूत" ही संज्ञा ज्याला ज्याला लावली जाईल ते ते सर्व आपापल्या अधिकारामध्यें प्रमाणभूत मानले जातात. तसेंच वेदघोष करणारे ब्राह्मण वेदविद्येंत प्रमाण मानले जातात; त्याप्रमाणेंच तुमचें हें शास्त्र प्रमाण मानलें जाईल, ही माझी आज्ञा आहे. ब्रह्मदेवाचा मानसपुत्र मनु, उशना, बृहस्पति हे याच शास्त्रांतून पुढें सगळ्यांना धर्म शिकविणार आहेत. हे स्वायंभुव-धर्म औशनस शास्त्राच्या रूपानें प्रगट झाल्यानंतर व बृहस्पतीची स्मृति प्रगट झाल्यानंतर तुम्ही लिहिलेलें हें शास्त्र बृहस्पतीपासून वसु नांवाच्या राजाला मिळेल व तो उत्तम प्रकारचा राजा होऊन माझा उत्तम प्रकारचा भक्त होईल, आणि त्या शास्त्राच्या आधारानें सर्व लोकव्यवहार चालवील. तुम्ही लिहिलेलें हें शास्त्र सर्व शास्त्रांमध्यें उत्कृष्ट ठरेल व धर्म आणि अर्थ हे पुरुषार्थ या शास्त्राच्या योगानें उत्कृष्ट तऱ्हेनें साधले जातील. या शास्त्राचा प्रसार केल्यामुळें तुमची जगांत ज्ञाते म्हणून प्रसिद्धि होईल व तो महात्मा वसु राजैश्वर्यानें युक्त होईल. तो महात्मा वसु राजा मरण पावल्यानंतर हें सनातन शास्त्र त्याच्याच बरोबर अंतर्धान पावेल. ही सर्व हकीकत मी तुम्हांला सांगितली आहे." अशा प्रकारचें भाषण करून भगवान् पुरुषोत्तम अदृश्य झाला व त्या ऋषींचा निरोप घेऊन कोणच्या तरी दिशेनें निघाला. नंतर लोकांच्या पितृस्थानीं असलेल्या त्या ऋषींनीं सर्व लोकांच्या हिताहिताचें चिंतन करून तें सनातन व धर्ममूल असें शास्त्र प्रगट केलें. पुढें कृतयुगामध्यें अंगिराऋषीच्या कुलांत बृहस्पति उत्पन्न झाले. त्या वेळेला हें शास्त्र सांग व सोपनिषद् असें त्या बृहस्पतीच्या स्वाधीन करून ते ऋषि तपश्चर्या करण्याचा निश्चय करून आपल्या ईप्सित देशाला निघून गेले.

सर्व लोकांची धारणा करण्याचें सामर्थ्य सर्व धर्मांचें प्रवर्तन करणाऱ्या ऋषीमध्यें होतें. १२. ३. ३३५.

---

## अध्याय ३३६ वा.

[ उपरिचर वसूचें उपाख्यान ]

भीष्म—महाकल्पाचा काल निघून गेल्यानंतर अंगिरा ऋषीचा पुत्र देवगुरु बृहस्पति जन्माला आला व त्याच्या जन्मामुळें सर्व देवांना अत्यंत समाधान झालें. बृहत्, ब्रम्ह आणि महत् हे तिन्ही शब्द एकाच अर्थाचे वाचक आहेत. हे राजा, तो देवगुरु बृहस्पति या तीन गुणांनीं युक्त झाला. त्या बृहस्पतीच्या शिष्यांमध्यें उपरिचर वसुराजा हा सर्वश्रेष्ठ होता आणि त्यानें या चित्रशिखंडिज शास्त्राचें योग्य तऱ्हेनें अध्ययन केलें. पूर्वी देवांच्या विधींनीं सत्कारिलेल्या या वसु राजानें, इंद्रानें स्वर्गाचें पालन करावें त्याप्रमाणें पृथ्वीचें पालन केलें. त्यानें एकदां अश्वमेध यज्ञ आरंभिला असतांना देवगुरु बृहस्पति हा त्या यज्ञामध्यें 'होता' होता. एकत, द्वित व त्रित असे तीन प्रजापतीचे मुलगे हे त्या अश्वमेध यज्ञामध्यें सदस्य होते. धनुष्य, रैभ्य, अर्वावसु, परावसु, मेधातिथि, तांड्यऋषि, शांतिऋषि, वेदशीर्ष, शालिहोत्राचा पिता ऋषिश्रेष्ठ कपिल, कठ, तित्तिरि, कण्व, देवहोत्र व तीन प्रजापति पुत्र असे सोळा जण त्या अश्वमेध यज्ञांत सभासद होते. हे राजा, त्या महायज्ञामध्यें सर्व प्रकारचे साहित्यसंभार सिद्ध होते. त्या यज्ञांत पशुहिंसा झाली नाहीं. कारण, त्या राजाची सांगीच तशी होती. तो राजा पवित्र, उदार हृदयाचा असून हिंसाकर्माच्या विरुद्ध होता. त्याच्या अंतःकरणांत कोणत्याहि तऱ्हेची आशा नव्हती. त्याला सर्व कर्मांचें यथायोग्य ज्ञान होतें. त्या ठिकाणीं जे हविर्भाग कल्पिलेले होते ते सर्व अरण्यामध्यें उत्पन्न झालेल्या पदार्थांचे होते. नंतर देवदेवेश्वर पुरातन भगवंतानें वसुराजावर संतुष्ट होऊन त्या उपरिचर राजाला साक्षात् दर्शन दिलें व इतर कोणाच्याही तो नजरेस पडला नाहीं. प्रभुनारायणानें आपला हविर्भाग स्वतः हुंगला व आपल्याबरोबर नेला. भगवान् हरीनें अशा प्रकारें आपला हविर्भाग अदृश्य रूपानें नेलेला पाहून बृहस्पतीला राग आला आणि त्यानें आपल्या हातांतील, अग्नींत हविर्भाग घालण्याची स्रुचा उगारली आणि आकाशांत फेंकली व रागामुळें त्याच्या डोळ्यांतून अश्रु गळूं लागले. मग तो त्या उपरिचर राजाला

म्हणाला, कीं मी हा हविर्भाग येथें ठेवतों. भगवंतानें हा माझ्या समक्ष येऊन न्यावा म्हणजे संशयाला जागा रहाणार नाहीं.

युधिष्ठिर—यज्ञामध्यें अर्पण केलेले हविर्भाग देवांनीं साक्षात् येऊन ज्याचे त्यांनीं नेले. मग हरीनेंच प्रत्यक्ष येऊन दर्शन कां दिलें नाहीं?

भीष्म—नंतर तो महात्मा वसुराजा व त्या यज्ञांत भाग घेणारे सर्व सदस्य या सर्वांनीं मिळून त्या मुनीला प्रसन्न करण्याचा प्रयत्न केला व कोणत्याहि प्रकारचा मनाचा गोंधळ होऊं न देतां ते त्याला म्हणाले, "हे मुने, आज आपण क्रोधाविष्ट झालां खरे, पण हा कृतयुगांतला धर्म नव्हे. ज्या देवाच्याकरितां हा हविर्भाग आपण योजिला त्या भगवान् नारायणाला राग माहीत नाहीं. त्या नारायणाचें दर्शन, तुम्हांला काय किंवा आम्हांला काय, होणें शक्य नाहीं. कारण नारायणाचें दर्शन व्हायला त्याचीच कृपा व्हावी लागते." एकत, द्वित आणि त्रित या पंचरात्रशास्त्राचें यथाशिस्त ज्ञान असणाऱ्या ऋषींनीं त्या उपरिचर वसूला सांगितलें कीं "आम्ही तिघेजण ब्रह्मदेवाचे मानस पुत्र म्हणून प्रसिद्ध आहोंत. मोक्षप्राप्त्यर्थ तपश्चर्या करण्याच्या इच्छेनें आम्हीं उत्तर दिशेकडे गेलों. क्षीरसमुद्राच्या कांठीं मेरुपर्वताच्या उत्तर भागावर जाऊन त्या ठिकाणीं आम्ही अत्यंत दारुण अशी तपश्चर्या केली. एक हजार वर्षेपर्यंत एका पायावर लांकडा-सारखे अचेतन होऊन उभे राहिलों. तपश्चर्या करण्यामध्यें आमच्या मनांतला हेतु हा होता कीं तो देवदेवेश्वर सनातन नारायण प्रभु आमच्या नजरेस पडावा. आमची तपश्चर्या संपल्यावर अंगावर रोमांच उभे करणारी अशी स्निग्ध व गंभीर आकाशवाणी झाली. त्या वाणीनें आम्हांला आनंदानें असें सांगितलें कीं "हे विप्रश्रेष्ठहो, तुम्ही फार घोर अशी तपश्चर्या केलीत. नारायण प्रभूचें दर्शन आपणाला कसें होईल याची तुम्हांला उत्कंठा लागली आहे; तेव्हां, तें दर्शन कसें घडेल तें ऐका. क्षीरसागराच्या उत्तरेला श्वेतद्वीप नांवाचें एक बेट आहे. त्या ठिकाणीं नारायणाच्या भक्तीमध्यें गढून गेलेल्या अशा चंद्रासारख्या तेजस्वी मानवांची वस्ति आहे. ते लोक पुरुषोत्तमाचे अनन्य भक्त असून ते इंद्रियविर-हित आहेत, त्यांना भूक लागत नाहीं, त्यांच्या डोळ्यांच्या पापण्या हालत नाहींत व त्यांच्या अंगाला सुवास येतो. त्यांना सहस्रधाम सनातन परमेश्वराशीं तादात्म्य पावतां येतें. इतके ते श्वेतद्वीपांत राहणारे पुरुष परमेश्वराचे अनन्य भक्त आहेत. हे मुनिजनहो, तुम्ही त्या ठिकाणीं जा. माझा आत्मा त्या ठिकाणीं प्रगट झालेला आहे." ही आकाशवाणी ऐकून आम्ही सर्वजण त्या

आकाशवाणीनें सांगितलेल्या मार्गानें गेलों. श्वेतद्वीपाचें ध्यान करीत करीत व तें कधीं बघावयास मिळेल अशा उत्कंठेनें आम्हीं त्या ठिकाणीं आलों. नारायणाच्या तेजामुळें डोळे दिपून गेल्यामुळें आम्हांला कांहींच दिसलें नाहीं. अखेर ईश्वराच्या प्रेरणेनुसार आम्हांला एकाएकीं अंतःस्फूर्ति झाली कीं ज्यानें कांहींहि तपश्चर्या केली नाहीं त्याला नारायणाचें दर्शन होणें अशक्य होय. पुढें देवांचीं शंभर वर्षें-पर्यंत आम्हीं त्या ठिकाणीं खडतर तपश्चर्या केली व आमचें व्रत संपल्यानंतर आम्हांला पांढऱ्या शुभ्र वर्णाचीं माणसें दिसलीं. तीं मनुष्यें सर्वलक्षणसंपन्न असून त्यांचें तेज चंद्रासारखें शांत होतें. तीं माणसें पूर्वेकडे तोंड करून हात जोडून परब्रह्माचा जप करीत होतीं. त्यांनीं केलेली तपश्चर्या मानसिक स्वरूपाची होती व एकाग्र चित्तानें त्यांनीं केलेल्या तपश्चर्येमुळें भगवान् नारायण त्यांच्यावर प्रसन्न झाले. हे मुनिश्रेष्ठा, कल्पांताच्या वेळच्या सूर्याच्या प्रखर तेजासारखें त्या माणसांपैकीं एकेकाचें तेज होतें. तें श्वेतद्वीप म्हणजे तेजाचें माहेरघर असें आम्हांस वाटतें. तेथील मनुष्यें तेजानें सर्व एकासारखीं एक असून त्यांच्यांत कोणीच कमीजास्ती नव्हता. नंतर कोटिसूर्यांचें तेज एकदम प्रगट झाल्या-प्रमाणें एक मोठा थोरला तेजाचा लोळ आम्हांला एकाएकीं दिसूं लागला; त्या-बरोबर त्या ठिकाणीं राहणारीं तीं माणसें सुद्धां सगळींच धांवत धांवत दूर जाऊं लागलीं. त्यांनीं परमेश्वराला बलि अर्पण करतांना काढलेला मोठा थोरला ध्वनि तेवढाच आम्हांला ऐकावयाला येत होता. बाकी त्यांच्या तेजानें आमच्या डोळ्यांची शक्ति कुंठित झाल्यामुळें आम्हांला त्या ठिकाणीं कांहींच दिसूं शकलें नाहीं. त्या माणसांनीं उच्चारलेला व भोंवतालच्या वातावरणांत सर्वत्र पसरलेला असा एकच शब्द आम्हांला ऐकावयाला येत होता. "हे पुंडरीकाक्षा, तुझा जयजयकार असो. हे विश्वभावन हृषीकेशा, तुला नमस्कार असो."

जितं ते पुंडरीकाक्ष नमस्ते विश्वभावन ।
नमस्तेऽस्तु हृषीकेश महापुरुषपूर्वज ॥

अशा तऱ्हेचा शब्दोच्चार शास्त्राच्या पद्धतीला धरून केलेला आमच्या कानीं आला. इतक्या अवधींत सर्व बाजूंनीं अत्यंत पवित्र व सुगंधी असा वारा वाहूं लागला. त्याबरोबर अनेक प्रकारच्या यज्ञीय औषधी व फुलेंहि वाहून आलीं व त्या यज्ञाचार जाणणाऱ्या माणसांनीं या सामुग्रीनें हरीची पूजा केली. काया, वाचा आणि मन यांचें नियमन करून अत्यंत भक्तियुक्त अंतःकरणानें त्यांनीं श्रीहरीची पूजा केली. त्या शब्दोच्चाराबरोबर श्रीहरी त्यांच्यापुढें प्रत्यक्ष प्रगट झाले. त्याच्या

मायेनें आम्ही मोहित झाल्यामुळें आम्हांला मात्र त्याचें दर्शन घडलें नाहीं. नंतर वारा वाहण्याचा कमी झाला व त्यांचा एकंदर पूजाविधीहि पण आटोपला. तरी सुद्धां त्यांच्यापैकीं कोणीहि आमच्याकडे पाहिलेंहि नाहीं व आमची आठवणहि त्यांना झाली नाहीं. तेथें हजारों माणसें होतीं पण तीं सर्व परमेश्वरभक्तीमध्यें इतकीं गढून गेलीं होतीं कीं त्यांच्या त्या ब्रह्मनिष्ठेमुळें आमच्याकडे कोणाचेंहि लक्ष गेलें नाहीं. अखेर आम्ही अतिशय दमलों आहोंत व तपश्चर्येनें खुष झालों आहोंत असें पाहून त्या ठिकाणीं आकाशवाणी झाली व देवांनीं आम्हांला सांगितलें "हे ब्राह्मणहो, तुम्हीं आतांच सर्व इंद्रियांनीं रहित असलेले श्वेतवर्णाचे पुरुष पाहिलेत. या पुरुषांचें दर्शन घेतल्यानें भगवंताचेंच दर्शन घडल्यासारखें होतें. हे मुनिजनहो, तुम्ही आल्या मार्गानें जा. ज्याच्या अंतःकरणांत भक्तीचा ओलावा नाहीं अशा मनुष्याला देवाचें दर्शन होणें शक्य नाहीं. पुष्कळ वेळपर्यंत अनन्यभावानें भगवंताची उपासना केली तर आपल्या तेजाच्या वलयानें लोकांचे डोळे दिपविणारा तो भगवान् दृष्टीस पडणें शक्य आहे. हे ब्राह्मणश्रेष्ठहो, तुम्हांला या जगामध्यें फार मोठें कार्य करावयाचें आहे. आतां हें कृतयुग संपलें; दुसऱ्या युगाला सुरवात झाली व त्रेतायुगाचें वैवस्वत मन्वंतर प्राप्त झालें म्हणजे देवांच्या कार्यामध्यें साहाय्य करण्याचा प्रसंग तुम्हांला लाभेल." परमेश्वराचें तें अमृतासारखें अद्भुत वाक्य ऐकून त्याच्याच प्रसादानें आम्ही आपल्या इष्ट देशाला आलों. अशा प्रकारें मोठ्या तपश्चर्येच्या साधनानें व हव्यकव्यांनीं त्या परमेश्वराचें दर्शन आम्हांला घडलें, तें तुम्हांला कसें घडणार? भगवान् नारायण हा सर्व भूतांमध्यें श्रेष्ठ, विश्वाचा स्रष्टा व हव्यकव्यांचा भोक्ता आहे. त्याला आदि नाहीं, अंत नाहीं. तो अव्यक्त आहे. देव व दानव हे सारख्याच आदरानें त्याची पूजा करतात." अशाप्रकारें एकतानें भाषण केलें व द्वित आणि त्रित यांनीं त्याला अनुमति दर्शविली. तसेंच त्या यज्ञांतील सदस्यांनीं पण उदारधी बृहस्पतीचें मन वळविण्याचा प्रयत्न केला. नंतर त्यानें आपल्या यज्ञदैवताची योग्य प्रकारें पूजा केली. यज्ञ समाप्त झाल्यानंतर त्या वसुराजानें प्रजांचें यथाशास्त्र पालन केलें. नंतर ब्रह्मदेवाच्या शापामुळें तो राजा स्वर्गांतून पृथ्वीवर आला व हे राजशार्दूला धर्मावर निष्ठा आणि प्रेम ठेवणाऱ्या त्या राजानें अनन्य भावानें नारायणाचा जप केला आणि त्याच्याच प्रसादानें तो फिरून पृथ्वीतलावरून स्वर्गांत गेला. पृथ्वीतलावरून तो ब्रह्मलोकांत गेल्यानंतर त्याला परमगति प्राप्त झाली. १२.३.३३६.

---

## अध्याय ३३७ वा.

[ १ ऋषि व देव यांचा यज्ञबलीसंबंधाचा संवाद. ]

(१) **युधिष्ठिर**—हे पितामहा, तो वसुराजा अत्यंत श्रेष्ठ प्रकारचा भागवत होता तर त्याला स्वर्गांतून खालीं कां यावें लागलें व तो पाताळांत कां गेला? हें मला कृपा करून सांगा.

**भीष्म**—या संबंधांत ऋषीचा आणि देवांचा झालेला एक संवाद जुना इतिहास म्हणून सांगत असतात तो मी तुला सांगतों ऐक—"यज्ञामध्यें बोकडाचा बळी द्यावा. आणि यज्ञांत बळी द्यावयाचा जो बोकड त्यालाच "अज" ही संज्ञा लागते. यज्ञपशू म्हणून दुसऱ्या कोणत्याही गोष्टीचा उपयोग करतां येत नाहीं असें शास्त्र आहे." असें देव ऋषिश्रेष्ठांना म्हणाले, त्यावर ऋषि म्हणाले कीं "यज्ञामध्यें धान्याचा बलि द्यावा अशी श्रुति आहे. धान्याला "अज" ही संज्ञा आहे. तेव्हां हे देवहो, तुम्ही जिवंत पशूचा बळी देऊं नका. ज्या ठिकाणीं जिवंत पशु मारला जातो तो धर्मयज्ञ नव्हे. हें सर्वश्रेष्ठ कृतयुग आहे. या युगांत आपण पशुहत्या कशी करतां?" अशा प्रकारें ऋषि आणि देव यांचा संवाद चालला आहे इतक्यांत वसुराजा आपल्या वाटेनें फिरत फिरत त्या ठिकाणीं आला. त्याला आपल्या सगळ्या सैन्यासहवर्तमान आकाशांतून चाललेला पाहून ते ऋषि देवांना म्हणाले, कीं हा वसुराजा तुमच्या शंकांचें निरसन करील. हा अत्यंत श्रेष्ठ असून मोठा दानशूर, यज्ञनिष्ठ, व सर्वभूतांचें कल्याण करणारा आहे. हा राजा कधींहि अन्यथा भाषण करणार नाहीं असा विचार करून ते देव व ऋषि मिळून वसुराजाजवळ गेले व त्याला म्हणाले, "राजा, यज्ञामध्यें अजाचें हवन करावें किंवा वनस्पतीचें हवन करावें यासंबंधानें आमच्या मनांत शंका उत्पन्न झाली आहे तरी तिचें निरसन तूं कर. या बाबतींत आम्ही तुझें मत प्रमाण मानून चालूं," हें ऐकून वसुराजानें त्या ऋषींना हात जोडून विचारलें कीं, "हे ऋषिश्रेष्ठहो, तुम्हांपैकीं कोणाचें मत काय आहे हें खरें खरें मला सांगा." तेव्हां ऋषि म्हणाले, कीं "यज्ञामध्यें धान्याचें हवन करावें असें आमचें मत व पशुहत्या करावी असें देवांचें मत, यांतला कोणचा पक्ष तुला मान्य आहे तें आम्हांला सांग."

देवांचा अभिप्राय लक्षांत घेऊन त्यांचा पक्षपात करण्याच्या इच्छेनें वसुराजानें यज्ञांत पशूचें हवन करावें असा निर्णय दिला. तेव्हां ते सूर्यासारखे तेजः-

संपन्न असणारे ब्राह्मण त्याच्यावर रागावले आणि देवाचा पक्ष घेऊन बोलणाऱ्या व विमानांतून जाणाऱ्या वसुराजाला म्हणाले, "राजा, तूं देवांचा पक्ष घेतलास त्याअर्थी तूं स्वर्गांतून खालीं पडशील. आजपासून तुला आकाशमार्गानें जातां येणार नाहीं. आमच्या शापाच्या प्रभावानें तूं पृथ्वीतल फोडून पाताळांत जाशील." त्याचक्षणीं तो उपरिचर राजा स्वर्गांतून खालीं पडला आणि तावडतोब पृथ्वीतल फोडून पाताळांत गेला. पण नारायणाच्या आज्ञेनें त्याची स्मृति मात्र नाहींशी झाली नाहीं. राजा, वसुराजाचें नशीब मोठें म्हणून देवांनाहि त्याला शापांतून मुक्त करण्याची बुद्धि झाली. या महात्म्या वसुराजाला आमच्यामुळें शाप झाला तेव्हां आम्हीं सर्वांनीं मिळून याच्या उपकाराची फेड केली पाहिजे असा मनाचा निश्चय करून ते सर्व देव उपरिचर राजाकडे जाऊन त्याला मोठ्या आनंदानें म्हणाले, "हे राजा, तुझी ब्राह्मणांच्या ठिकाणीं निष्ठा आहे, तूं देवभक्त आहेस व भगवान् नारायण हरि हा सगळ्या सुरासुरांचा गुरु आहे. तेव्हां तो संतुष्ट झाला तर या शापांतून तुझी मुक्तता होईल यांत संशय नाहीं. परंतु, आपल्याला या महात्म्या ऋषींचाहि पण मान ठेवला पाहिजे. हे राजन्, त्यांच्या तपश्चर्येचें फळ त्यांना मिळालेंच पाहिजे. तूं तर आतां स्वर्गांतून पृथ्वीतलावर खालीं आलासच; तथापि आम्हीं तुझ्यावर एक अनुग्रह करतों. तूं ब्राह्मणांच्या शापामुळें जेथपर्यंत पाताळांत राहशील तेथपर्यंत ब्राह्मणांनीं यज्ञामध्यें अर्पण केलेली "वसुधारा" नांवाची आहुति तुला आमच्या प्रसादानें मिळत राहील व त्यामुळें तुला केव्हांहि ग्लानि येणार नाहीं अगर भूक अगर तहान याचीहि पण बाधा होणार नाहीं. वसुधारा नांवाची आहुति तुला नित्य मिळत गेल्यामुळें तुझें तेज वाढेल व आमच्या वराच्या सामर्थ्यानें तो नारायण देव संतुष्ट होऊन तुला ब्रह्मलोकाला नेईल."

अशा प्रकारें त्या राजाला वर देऊन ते देव आणि तपोनिष्ठ ऋषि सगळेच आपापल्या ठिकाणीं गेले. नंतर त्या वसुराजानें विष्वक्सेनाची यथाविधि पूजा केली व नारायणाच्या मुखानें बाहेर पडलेला जपमंत्रहि पण त्यानें जपला. हे अरिंदमा, त्या ठिकाणीं सुद्धां वसुराजानें पांच वेळ यथाकाल पांची प्रकारचे यज्ञ केले व त्या योगानें नारायणाची पूजा केली. त्या पूजेनें संतुष्ट होऊन भगवान् नारायण आपल्या जितेंद्रिय व अनन्य अशा भक्ताला वर देण्याच्या इच्छेनें जवळ असलेल्या पक्षिश्रेष्ठ गरुडाला उद्देशून म्हणाले, "हे पक्षिश्रेष्ठा, मी तुला सांगतों तें ऐक. वसु नांवाच्या धर्मात्म्या सम्राटानें आतांपर्यंत तपाचरण केलें

आहे. तो ब्राह्मणांच्या रागामुळें पाताळांत गेला आहे. त्यानें आजपर्यंत त्या ब्राह्मणांचा मान राखला आहे. म्हणून तूं येथून जा आणि पाताळामध्यें गुप्त असलेल्या त्या राजाला माझ्या आज्ञेवरून वर काढ आणि त्याला त्याचा पूर्वींचा आकाशमार्ग मोकळा करून दे." हें ऐकून वाऱ्याच्या वेगानें धांवणाऱ्या त्या गरुडानें आपले पंख हालविले व तो वसुराजा असलेल्या ठिकाणीं गेला आणि त्यानें तेथून त्याला उचलून घेऊन आकाशांत आणून सोडून दिलें. त्याचक्षणीं उपरिचर राजा फिरून पूर्वींसारखा झाला व सदेह ब्रह्मलोकाला गेला. हे कौंतेया, या प्रकारें ब्राह्मणाच्या शापामुळें आणि वाग्दोषांमुळें देवतांच्या आज्ञेनें त्या महात्म्या वसुराजाला अधोगति प्राप्त झाली. नंतर त्यानें केवळ भगवान् नारायणाची सेवा केली. त्या सेवेमुळें त्याची शापांतून मुक्तता होऊन तो ब्रम्ह-लोकाला गेला.

हे राजा, आतापर्यंत मानवांची उत्पत्ति कशी झाली त्यासंबंधाची हकीकत मी तुला सांगितली. आतां नारद ऋषि श्वेतद्वीपाला कसे गेले त्याची हकीकत सांगतों ती शांत चित्तानें ऐक. १२.३.३३७.

---

## अध्याय ३३८ वा.

[ १ नारदकृत नारायण स्तुति. ]

(१) भीष्म—भगवान् नारद ऋषि श्वेतद्वीपाला आल्यावर त्यांना तींच चंद्रासारखीं तेजस्वी अशीं श्वेतवर्णांचीं माणसें दिसलीं. त्यांचा नारद ऋषींनीं मोठ्या आदरानें सन्मान केला व त्यांनींही त्यांचा परम गौरव केला. नंतर, कसल्याही संकटांत सांपडले तरी ज्यांचा जप कधींच अंतरत नाहीं अशा त्या नारद ऋषींनीं हात वर करून एकाग्रचित्तानें त्या गुणस्वरूप असूनहि निर्गुण असणाऱ्या सर्वव्यापक परमेश्वराची स्तुति आरंभिली.

नारद—हे देवदेवेशा, निष्क्रिया, निर्गुणा, हे लोकसाक्षिन्, क्षेत्रज्ञा, पुरुषोत्तमा, अनंता, स्थूल, सूक्ष्म व कारण शरीराचा नाश करणाऱ्या पुरुषा, महापुरुषा—पुरुषोत्तमा, हे त्रिगुणोत्तमा, हे प्रधाना, हे अमृता, हे अमृताख्या, हे अनंताख्या, हे विमुखरूपा सनातना, तुझें रूप कार्यकारणांच्या रूपानें व्यक्त आहे तसेंच अव्यक्तहि पण आहे. हे ऋतधामा, सत्य हें तुझें निवासस्थान आहे. हे आदिदेवा, तूं सर्व लोकांना त्यांच्या त्यांच्या कर्मांचीं फलें प्राप्त करून देतोस. हे प्रजापते,

हे सुप्रजापते, हे वनस्पते, हे महाप्रजापते, हे ऊर्जस्पते, वाचस्पते, जगत्पते, दिवस्पते, मरुत्पते, हे सलिलपते, हे पृथ्वीपते, हे दिक्पते, हे पूर्वनिवास, महाप्रलयाच्या वेळेला सर्व जगाला तुझाच आधार असतो. हे गुह्य, हे ब्रह्मपुरोहित, हे ब्रह्मकायिक, तूं ब्रह्मदेवाला वेद शिकविलेस, तूं ब्रह्मस्वरूप आहेस. हे महाराजिक, हे चातुर्महाराजिक, देवाचे निरनिराळे चार गण हीं तुझींच स्वरूपें होत. हे भासुर, हे महाभासुर, हे सप्तमहाभागा, गायत्र्यादि मंत्रांनीं मोठमोठाले सात हविर्भाग तुला यज्ञांत अर्पण करावयाचे असतात. हे याम्या, महायाम्या, चित्रगुप्तादि सर्व त्वद्रूपच आहेत. हे संज्ञासंज्ञा यमपत्नी जी संज्ञा तिचें नांव तुला दिलें आहे. हे तुषिता, हे महातुषिता, या नांवाचे देवगण हीं तुझींच रूपें होत. हे प्रमर्दना, तूं मृत्युस्वरूप आहेस, तूं मृत्यूला सहाय करतोस म्हणून तुला परिनिर्मित म्हणतात. तसेंच अपरिनिर्मित हें पण तुझेंच नांव होय. हे वशवर्तिन्, हे अपरिनिन्दित, हे अपरिमित, शास्य तूंच शास्ताहि तूंच.

यज्ञस्वरूपा, हे महायज्ञा, अग्निहोत्र आणि ब्रह्मयज्ञ हीं तुझींच रूपें आहेत. हे यज्ञसंभवा, हे यज्ञयोने, हे यज्ञगर्भा, हे यज्ञहृदया, हे यज्ञस्तुत, तूं यज्ञांतील भाग हरण करून नेतोस म्हणून तुला यज्ञभागहर असें म्हणतात. हे पंचयज्ञा, अहोरात्र मास, ऋतु, अयन आणि संवत्सर या पांच कालांचा अधिपति तूं व प्रत्येक कर्माला लागणारीं जीं अधिष्ठानादि पांच कारणें त्यांचाहि अधिपतीहि तूंच. हे पांचरात्रिका, हे वैकुंठा, हे अपराजिता, हे नामनामिका, हे परस्वामिन्, हे सुस्नात, हे हंस, हे परमहंस, हे महाहंस, हे परमयाज्ञिक, हे मानसिका, हे सांख्ययोगरूपा, हे सांख्यमूर्ते, हे अमृतेशया, हिरण्येशया, देवेशया, कुशेशया, ब्रह्मेशया, पद्मेशया, विश्वेश्वरा, विष्वक्सेना, तूं या जगाच्या ठिकाणीं सत्तारूपानें स्थित आहेस. तूं या जगाचा आधार, अग्नि हें तुझें मुख. वडवाग्नि हेंही तुझेंच रूप. आहुति तूं, सारथी तूं, वषट्कार तूं, ओंकार तूं, आणि तपही तूंच. मन, चंद्रमा हीं तुझींच रूपें. डोळ्यांनीं पाहून एकप्रकारचा दृष्टिसंस्कार केलेलें यज्ञांतलें तूपहि तूंच. तूं सूर्य, तूं दिग्गज, दिशांच्या ठिकाणीं प्रकाश उत्पन्न करणारा दिक्भानु, दिशांच्या कान्याकोपऱ्यांतून प्रकाश फांकविणारा विदिक्भानु तूंच, हयग्रीव हें तुझेंच रूप. प्रथम त्रिसुपर्ण हें तुझेंच रूप. ब्राह्मणादि चारी वर्णांची धारणा तूंच करतोस. हे पंचाग्ने, गार्हपत्य, दक्षिण, आहवनीय, सभ्य व आवसथ्य हे पांच अग्नी हीं तुझींच रूपें होत. हे त्रिणाचिकेता शिक्षादि सहा वेदांगें हीं तुझ्या ठिकाणीं स्थित आहेत. हे प्राग्ज्योतिषा, हे ज्येष्ठसामगा, हे वेदव्रत धारण करणाऱ्या, अथर्व

शिरस्उपनिषद् हें तुझेंच रूप होय. हे पंचमहाकल्पा, हे फेनपाचार्या, हे वाल-खिल्या, हे वैखानसा, हे अभग्नयोगा, हे अभग्नपरिसंख्यान, हे युगादे, हे युगमध्या, हे युगनिधना, हे आखंडला, दे प्राचीनगर्भा, हे कौशिका, हे पुरु-ष्टुता, हे पुरुहूता सर्व विश्व तुझ्यापासून निर्माण झालें म्हणून तूं विश्वकृत् आहेस. हे विश्वरूपा, हे अनंतगते, हे अनंतभोगा, तुझीं शरीरें अनेक आहेत. हे अनंता, हे अनादे, हे अमध्या, हे व्यक्तमध्या, हे अव्यक्तनिधना, हे व्रतावासा, हे यशोवासा, हे समुद्राधिवासा, हे यशोवासा, हे तपोवासा, हे दमावासा, हे लक्ष्म्यावासा, हे विद्यावासा, हे कीर्तिवासा, हे श्रीवासा तूं सर्वांचा आवास म्हणजे माहेरघर आहेस. हे वासुदेवा, तूं सर्वांचे मनोरथ पुरविणारा सर्वच्छंदक आहेस. कपि हे तुझे घोडे म्हणून हरिहय म्हणतात. तुला हरिमेध असें नांव आहे. तूं महायज्ञांतला भाग हरण करणारा; तूं वरप्रद, सुखप्रद व धनप्रद आहेस. तूं हरिभक्त, यम तूं, नियमन तूं, महानियमन तूं, कृच्छ्र तूं, अतिकृच्छ्र, महाकृच्छ्र व सर्वकृच्छ्र तूंच आहेस. तुला नियमधर म्हणतात, तुझा श्रम नाहींसा झालेला म्हणून तुला निवृत्तश्रम असें म्हणतात. तूं अध्ययन करतोस म्हणून प्रवचनगत, पृश्नि ही तुझी माता म्हणून तुला पृश्निगर्भप्रवृत असें म्हणतात. सगळ्या वेदक्रिया तुझ्यापासून निर्माण होतात. तूं अज आहेस, सर्वगत आहेस. सर्व-दर्शीहि आहेस. तुझें रूप कोणासहि ग्रहण करतां येत नाहीं. तूं अचल आहेस. तुझ्या विभूति फार मोठ्या आहेत. तूं विराट्स्वरूप आहेस, पवित्र आहेस, महापवित्र आहेस. तूं बृहत् आहेस, अप्रतर्क्य आहेस, अविज्ञेय आहेस, ब्रह्माग्र्य आहेस, प्रजांची उत्पत्ति आणि लय हीं तुझ्या आधीन आहेत. हे महामायाधरा, हे चित्रशिखंडिन्, हे वरप्रदा, तूं पुरोडाशभाग हरण करतोस. तूं गताध्वर आहेस, तुझी तृष्णा आणि सर्व संशय नाहींसे झालेले आहेत. तूं सर्वतोवृत आहेस. तूं निवृत्तिरूप आहेस, ब्राह्मणरूप आहेस, ब्राह्मणप्रिय आहेस. हे विश्वमूर्ते, हे महामूर्ते, हे बांधव, हे भक्तवत्सला, हे ब्रह्मण्यदेवा, मी तुझा भक्त असून तुझें दर्शन निश्चितपणानें व्हावें अशी इच्छा आहे. तुला माझा वारंवार नमस्कार असो. १२.३.३३८.

---

## अध्याय ३३९ वा.

[ १ नारदांना विश्वरूपदर्शन ]

**भीष्म**—अशा प्रकारें नारदांनीं अत्यंत गूढ व सार्थ नांवांनीं नारायणाची स्तुति केल्यावर भगवंतानें त्यांना विश्वरूप दाखविलें. तें भगवंताचें विश्वरूप कांहीं ठिकाणीं चंद्रापेक्षांहि शुद्ध तर कांहीं ठिकाणीं त्याच्यापेक्षां कांहीं विशिष्ट स्वरूपाचें दिसत होतें. कांहीं ठिकाणीं तो भगवान् परमात्मा अग्नीसारखा भासे तर कांहीं ठिकाणीं तो नक्षत्रांच्या पुंजासारखा तेजस्वी दिसे. कांहीं ठिकाणीं त्याचें स्वरूप पोपटाच्या पंखाप्रमाणें हिरवट दिसे तर कांहीं ठिकाणीं तो स्फटिकासारखा शुभ्र आहे असा भास होई. कांहीं ठिकाणीं तो नीलवर्ण भासे तर कांहीं ठिकाणीं त्याचें रूप सोन्यासारखें आहे असा भास होई. कांहीं ठिकाणीं हा भगवान् नारायण पोंवळयांच्या कोंवळया कांड्यांप्रमाणें तांबडट भासे तर कांहीं ठिकाणीं त्याचें स्वरूप शुभ्र वर्णाचें आहे असें दिसे. त्या परमेश्वराच्या विश्वरूपांत कोठें कोठें सोन्यासारखा, तर कोठें कोठें वैडूर्य रत्नासारखा; कोठें नीलवैडूर्य रत्नासारखा तर कोठें इंद्रनीलमण्यासारखा; कोठें मोराच्या मानेसारखा तर कोठें मोत्याच्या हारासारखा रंग आहे असे वाटे. त्या सनातन परमेश्वरानें ह्या निरनिराळ्या वर्णांचीं अनेक रूपें घेतलीं होतीं. त्याला हजार डोळे, शंभर मस्तकें, हजार पाय, हजार उदरें आणि बाहु होते. व इतकें असूनहि त्याचें स्वरूप पुष्कळसें अव्यक्तच होतें. त्या भगवंताच्या एका तोंडांतून ओंकाराचा ध्वनि निघत होता व त्याच्या मागून दुसऱ्या तोंडांतून सावित्रीचा ध्वनि निघत होता; आणि बाकीच्या तोंडांतून चारी वेदांचा अनेकवार घोष होत होता. तो भक्तांना नेहमीं वश असणारा व संयमी भगवान् नारायण आरण्यक गात होता. भगवान् यज्ञेशानें आपल्या हातामध्यें कमंडलु, दंड, कृष्णाजिन, वेदि, पांढरे स्वच्छ मणि, दर्भ, उपानह आणि पेटलेला अग्नि हीं धारण केलीं होतीं. त्या प्रसन्नस्वरूप भगवंताला पाहून द्विजश्रेष्ठ नारदांना आनंद झाला आणि वाचेचा संयम करून त्यांनीं नम्रपणानें परमेश्वराला नमस्कार केला. नारद आपल्यापुढें नम्र झालेले पाहून देवाधिदेव अव्यय भगवान् त्यांना म्हणतातः—

**श्रीभगवान्**—एकत, द्वित व त्रित हे महर्षि माझ्या दर्शनाची इच्छा धरून या ठिकाणीं आले पण त्यांना माझें दर्शन झालें नाहीं व माझ्या अनन्य भक्ताशिवाय कोणालाहि होणार नाहीं. हे नारदा, माझ्या अनन्य भक्तांमध्यें तूं श्रेष्ठ

आहेस आणि धर्माच्या गृहामध्यें हीं जीं माझीं चार श्रेष्ठ रूपें प्रगट झालीं त्यांचें तूं सतत यथाविधि अर्चन कर व तुझ्या मनांत काय असेल तें साधून घे. मी विश्वमूर्ति, अव्यय परमात्मा आज तुला प्रसन्न झालों आहें. तुला ज्या वराची इच्छा असेल तो वर तूं माझ्यापासून मागून घे.

**नारद्**—परमेश्वरा, आज माझ्या तपश्चर्येचें आणि यमनियमांचें सर्व फळ मला मिळालें. कारण, तुझें अत्यंत दुर्लभ दर्शन मला या ठिकाणीं घडलें हाच मला वर मिळाला असें मी समजतों. हे भगवंता, तूं विश्वमूर्ति, विश्वदृक् असा आहेस.

**भीष्म**—अशा प्रकारें ब्रम्हदेवाचे मानसपुत्र नारद ऋषि यांना आपलें विश्वरूप दाखवून भगवंतानें त्यांना पुन्हां सांगितलें कीं, " नारदा, या ठिकाणाहून तूं लव-कर जा. हे इंद्रियरहित, निराहार असे चंद्रासारखे तेजस्वी असणारे माझे भक्त एकाग्र मनानें माझें ध्यान करीत आहेत. यांच्या भक्तिमार्गांत विघ्न येऊं नये. हे पूर्वीं माझे अनन्य भक्त होते. या महाभागांना आतां सिद्धि प्राप्त झाली आहे व यांच्यांतील तामस आणि राजस भाव नाहींसे होऊन हे पूर्णपणें सात्विक बनले आहेत. तेव्हां हे माझ्याशीं तादात्म्य पावतील यांत संशय नाहीं. जो डोळ्यांनीं दिसत नाहीं, कातडीला ज्याचा स्पर्श समजत नाहीं, नाकांनीं ज्याचा वास घेतां येत नाहीं व पंच विषयांचे रस ज्यामध्यें सांपडत नाहींत असला हा परमात्मा आहे. सत्व, रज व तम, हे तीन्ही गुण याच्या ठिकाणीं नाहींत. हा सर्व व्यापून उरलेला आहे. हा सर्व लोकव्यवहारांचा साक्षी आहे. हा लोकांचा आत्मा आहे. सर्व प्राणिमात्रांचीं शरीरें नष्ट झालीं तरी हा नाश पावत नाहीं. हा अज, नित्य, शाश्वत, निर्गुण आणि निष्कल आहे. चोवीस तत्त्वांच्या पलीकडला पंचविसावा अकर्ता पुरुष हाच. याचें दर्शन पूर्णज्ञानावांचून होत नाहीं. ज्याच्याशीं तादात्म्य पावल्यानें सर्व ब्राह्मणश्रेष्ठ मुक्त होतात तो सनातन परमात्मा वासुदेव होय. हे नारदा, या देवाचा मोठेपणा व कर्तृत्व काय सांगावें ! कोणत्याहि शुभाशुभ कर्मांचा लेप याला लागत नाहीं. सत्व, रज आणि तम यांना गुण अशी संज्ञा देतात, कारण ते प्रत्येक प्राणिमात्राच्या शरीरांत असून त्या ठिकाणीं विहार करतात. क्षेत्रज्ञ परमात्मा या गुणांचा उपभोग घेतो पण हे गुण मात्र त्याचा उपभोग घेत नाहींत. हा निर्गुण असून गुणांचा भोक्ता आहे. हा गुणस्रष्टा असून त्यांच्या पलीकडचा आहे. हा सर्व जगताचा आधार आहे. हे देवर्षे, प्रलयाच्या वेळीं पृथ्वी जलाच्या ठिकाणीं लीन होते. जल तेजांत मिस-

ळून जातें, तेज वायूशीं एकरूप होतें. वायु आकाशांत मिळून जातो, आकाश मनामध्यें लीन होतें. हें जें मनोरूपी महाभूत तें अव्यक्त प्रकृतींत लीन होतें व ही अव्यक्त प्रकृति अकर्त्या पुरुषामध्यें लय पावते. या सनातन पुरुषाच्या पलीकडे श्रेष्ठ असें कांहीं नाहीं. हा सनातन पुरुष वासुदेव एवढा एकच नित्यरूप आहे व त्याच्याखेरीज या जगांतील सर्व स्थावरजंगम भूतें अनित्य होत. हा महाबलिष्ठ वासुदेव सर्व भूतांच्या अंतरंगांत भरला आहे. पृथ्वी, वायु, आकाश, जल आणि पांचवें तेज या पंचमहाभूतांचा संघात म्हणजे शरीर होय. हा महापराक्रमी प्रभु ज्यावेळेला या शरीरांत प्रवेश करतो व त्याच्याकडून हालचाल करवितो त्यावेळेस तो प्रगट होतो असें समजावें. धातुसंघातावांचून या जगांत शरीराची उत्पत्ति नाहीं व जीवावांचून वायु या शरीरामध्यें हालचाल उत्पन्न करूं शकत नाहीं. त्या जीवाला शेषसंकर्षण असें म्हणतात. स्वतःच्या ध्यानादिकर्मानें याला जीवन्मुक्तत्व प्राप्त होतें व प्रलयकाळीं सर्व भूतें याच्याच ठिकाणीं लय पावतात. या जीवापासूनच प्रद्युम्न नांवाचा दुसरा व्यूह उत्पन्न होतो. या व्यूहापासून सर्व स्थावर जंगम जगत् उत्पन्न होतें. हा प्रद्युम्न म्हणजेच अनिरुद्ध होय. यालाच ईशान म्हणतात. सर्व कर्मांमध्यें हा प्रगटरूपानें दिसतो. भगवान् क्षेत्रज्ञ निर्गुण वासुदेव हाच संकर्षणरूपी जीव होय. संकर्षणापासून मनोरूपी प्रद्युम्न उत्पन्न होतो. प्रद्युम्नापासून अनिरुद्ध उत्पन्न होतो. अनिरुद्ध हाच अहंकार व हाच ईश्वर होय. हें सगळें स्थावर जंगम जगत् माझ्यापासून उत्पन्न होतें. सर्व क्षराक्षराची व सदसताची उत्पत्ति माझ्यापासूनच आहे. माझे एकांतिक भक्त माझ्याशीं तादात्म्य पावल्यानें मुक्त होतात. चोवीस तत्त्वांच्या पलीकडला पंचविसावा अकर्ता पुरुष म्हणजे मीच. माझ्या ठिकाणीं गुण नाहींत. मी निश्चल आहें. मी द्वंद्वातीत आहें. मला परिग्रह नाहीं. मी तुझ्यापुढें सगुणरूपानें उभा असल्यानें माझें यथार्थ रूप तुझ्या चटदिशीं ध्यानांत यावयाचें नाहीं. मी या जगताचा गुरु आहें, शास्ता आहें. मी मनांत आणीन तर एका क्षणांत मला अंतर्धान पावतां येईल. हे नारदा, हें जें माझें विश्वरूप तूं पहात आहेस ही मी उत्पन्न केलेली माया होय. आतां मी प्राणिमात्राच्या गुणांनीं प्रगट झालों असल्यामुळें या स्थितींत माझ्या निर्गुणस्वरूपाचें ज्ञान तुला होणें शक्य नाहीं. नारदा, हा चतुर्व्यूहांचा प्रकार मी तुला योग्य तऱ्हेनें सांगितला आहे. मला जीव ही संज्ञा दिली जाते व जीव हा माझ्या ठिकाणीं लीन आहे. तेव्हां असें विश्वरूप पाहिल्यानें "मी जीव

पाहिला" अशी खोटी समजूत तूं करून घेऊं नकोस. हे द्विजश्रेष्ठा माझा संचार सर्वत्र आहे. मी प्राणिमात्रांच्या शरीरांमध्यें वास करीत असतों व यांचीं शरीरें नष्ट झालीं तरी माझा नाश होत नाहीं. जे पुरुष माझी अनन्य भक्ति करितात त्या महाभागांना सिद्धि प्राप्त होते व त्यांच्यांतले तामस आणि राजस भाव नाहींसे होऊन ते माझ्या ठिकाणीं लीन होतात. निरुक्ताच्या योगानें ज्याच्या विषयींची समजूत पटते असा लोकश्रेष्ठ सनातन हिरण्यगर्भ चतुर्वक्त्र ब्रह्मदेव माझीं सर्व कार्यें घडवून आणतो. माझ्या कपाळामधून क्रोधरूप रूद्रदेवाची उत्पत्ति आहे. हे पहा माझ्या दक्षिण बाजूला अकरा रुद्र उभे आहेत. तसेंच डाव्या बाजूला बारा आदित्य आहेत. माझ्यापुढें देवश्रेष्ठ अष्टवसु आहेत. नासत्य व दस्त्र हे देवांचे वैद्य माझ्या पाठीमागें उभे आहेत. सर्व प्रजापति, सर्व सप्तर्षि, सगळे वेद, शेंकडों यज्ञ, अमृत, निरनिराळ्या प्रकारच्या वनस्पति, नानाप्रकारचीं पुरश्चरणें, अनेक यमनियम व अष्ट गुणांनीं युक्त असें ऐश्वर्य हीं सर्व या माझ्या विश्वरूपांत प्रगटून एकत्र झालीं आहेत तीं पहा. तेजस्वी लक्ष्मी, कीर्ति, पर्वतांनीं युक्त असलेली पृथ्वी व सर्व वेदांना मातृस्थानीं असणारी सरस्वती या सर्व माझ्या या विश्वरूपांत व्यापलेल्या आहेत असें दिसेल. सर्व ताऱ्यांमध्यें श्रेष्ठ असलेला हा ध्रुव माझ्या ह्या विश्वरूपांत आहे. हे सज्जनश्रेष्ठा, मेघ, समुद्र, तळीं, नद्या व मूर्तिमंत असे चारीहि पितृगण माझ्या ठिकाणीं स्थित असलेले तुला दिसतील. हे मुने, माझ्या ठिकाणीं सत्व, रज व तम हे त्रिगुण अमूर्त स्वरूपांत आहेत. देवकार्यापेक्षां सुद्धां पितृकार्याची महती या जगांत अधिक मानतात. देव आणि पितर या सर्वांचा आरंभापासूनच मी उत्पत्तिकर्ता आहें. समुद्राच्या वायव्य भागांत मी हयग्रीवाचा अवतार घेऊन लोकांनीं श्रद्धेनें अग्नीमध्यें हवन केलेले हव्य आणि कव्य पदार्थ घेतों. मीं पूर्वी ब्रह्मदेवाची उत्पत्ति केली आणि त्या ब्रह्मदेवानें माझ्या यज्ञस्वरूपाची पूजा केली. तेव्हां मी प्रसन्न होऊन त्यांना अतिशय उत्कृष्ट अशा स्वरूपाचे वर दिले. मी त्याला माझ्या पुत्रत्वाचा मान दिला. "कल्पारंभीं तूं लोकनायक होशील" असा वर दिला. अहंकार हें त्याचें पर्यायनाम ठेवलें व 'तूं घालून दिलेली मर्यादा कोणींहि मोडणार नाहीं. तुजजवळ जे वर मागावयास येतील त्यांना वर देण्याचें सामर्थ्य तुला येईल. देव, राक्षस, ऋषि, पितर आणि सर्व प्रकारचीं भूतें हीं तुझी उपासना करतील. हे संशितव्रता, देवाच्या कार्यासाठीं ज्या ज्या वेळेला मी अवतार घेईन त्या त्या वेळेला तूं मला सल्ला

देत जा व पिता पुत्राला काम सांगतो त्याप्रमाणें तूं मला मी काय करावें हें सांगत जा. हे व दुसरे अनेक उत्तम उत्तम प्रकारचे वर त्या महातेजस्वी ब्रह्मदेवाला मी दिले. मी प्रसन्न होऊन हे वर त्या ब्रह्मदेवाला दिले आणि सर्व गोष्टीपासून निवृत्त झालों. निवृत्ति हें सर्व धर्मांचें पर्यवसान आहे म्हणून सर्व गोष्टींपासून निवृत्त होऊन मनुष्यानें सर्वदा सुखी असावें. ज्ञानसंपन्न व सूर्यबिंबाच्या ठिकाणीं स्थित असलेला कपिल ऋषि तो मीच असे सांख्यशास्त्रवेत्ते आचार्य समजतात. भगवान् हिरण्यगर्भ या नांवानें वेदमंत्र माझी स्तुति करतात. हे ब्रह्मन्, योगशास्त्रामध्यें योगरति म्हणून माझाच उल्लेख केला जातो. अशा स्वरूपाचा मी स्वर्गामध्यें प्रगट होऊन त्या ठिकाणीं शाश्वतरूपानें राहतों. सहस्रयुगाइतका काळ लोटला म्हणजे मी जगाचा संहार करीन. सर्व भूतांना व स्थावर जंगम जगाला आपल्या ठिकाणीं विलीन करून घेऊन मी ज्ञानसंपन्न स्थितींत, एकटा सगळ्या जगभर विहार करीन आणि माझ्या ज्ञानबलावर मी हें जग पुन्हां उत्पन्न करीन. चतुर्व्यूहांमधली चौथी मूर्ति जी अनिरुद्ध तिच्यापासून अव्यय स्वरूपाचा शेष उत्पन्न झाला, त्याला संकर्षण म्हणतात. संकर्षणापासून प्रद्युम्न उत्पन्न झाला. प्रद्युम्नापासून मी अनिरुद्ध. अशाप्रकारें ही सृष्टि मी पुन्हां पुन्हां उत्पन्न करीत असतों. अनिरुद्धापासून त्यांच्या नाभिकमलांतून ब्रह्मदेव निर्माण झाला. ब्रह्मदेवापासून सर्व स्थावर जंगम भूतें उत्पन्न झालीं. प्रत्येक कल्पाच्या ठिकाणीं सृष्टीचा हा क्रम पुन्हां पुन्हां सारखा चालूच राहतो. आकाशामध्यें सूर्यांचे उदयास्त ज्याप्रमाणें सारखे चालू असतात त्याप्रमाणें हा प्रकार आहे. अत्यंत तेजस्वी काल हा ज्याप्रमाणें नष्ट झालेल्या गोष्टी पुन्हां उत्पन्न करीत असतो त्याप्रमाणें मी वराहाचें रूप घेऊन सर्व प्राणिमात्रांनीं आक्रांत झालेली व समुद्राचा पट्टा कमरेला असलेली अशी पृथ्वी सर्व भूतांच्या हितासाठीं पुन्हां उत्पन्न करीन. वराहावतारामध्यें स्वतःच्या सामर्थ्याचा गर्व वाहणाऱ्या हिरण्याक्ष नांवाच्या दैत्याचा मी वध करीन व नृसिंहावतार घेऊन हिरण्यकश्यपूला मारीन. देवांचें कार्य साधण्यासाठीं यज्ञामध्यें विघ्न करणाऱ्या राक्षसांना मी मारीन. विरोचन नांवाच्या राक्षसाच्या पोटीं बलिराजा जन्माला येऊन तो सर्व लोकांना व देव, असुर आणि राक्षस यांना अवध्य होईल. त्याच्या पराक्रमानें इंद्राचें सिंहासनसुद्धां डळमळूं लागेल. त्या बलिराजानें त्रैलोक्याचें हरण करून इंद्राचा पराभव केल्यानंतर मी अदिति आणि कश्यप यांच्या पोटीं जन्म घेईन व तेजस्वी इंद्राला त्याचें राज्य परत देईन. हे नारदा, सर्व देवतांची स्थापना त्यांच्या त्यांच्या ठिकाणीं केल्यानंतर सर्व

देवांना अजिंक्य असणारा असा जो बलिराजा त्याला पाताळांत वास करावयास लावीन. त्रेतायुगाच्या ठिकाणीं भृगुकुलाचें भूषण असा जो परशुराम त्याच्या रूपानें अवतार घेऊन समृद्ध व बलिष्ठ अशा क्षत्रियांचा मी नाश करीन. त्रेता व द्वापर या युगांच्या संधिकालांत मी दाशरथी राम होईन, व प्रजापतीचे मुलगे जे द्वित, आणि एकत ऋषि त्यांना त्रिताचा घात केल्यामुळें विरूपता येऊन ते वानर होतील. त्याच्या वंशामध्यें जन्माला आलेली बलिष्ठ, महापराक्रमी व इंद्रासारखी सामर्थ्यसंपन्न वानरमंडळी माझें सहाय करतील व त्यांच्या सहाय्यानें मी देवकार्य साधीन; नंतर पुलस्त्याच्या कुलाला काळोखी फांसणाऱ्या व लोकांच्या डोळयांत कांट्यासारख्या सलणाऱ्या घोर आणि भयंकर राक्षसराज रावणाचा त्याच्या परिवारासहवर्तमान मी घात करीन. द्वापर आणि कलि या दोन युगांच्या संधिकालांत मी कंसाचा नाश करण्याकरतां मथुरेंत जन्म घेईन. त्यावेळेस देवांना त्रास देणाऱ्या अनेक राक्षसांना मारून मी द्वारकेमध्यें जाऊन राहीन. द्वारकेमध्यें गेल्यानंतर अदितीला दुःख देणाऱ्या भूमिपुत्र नरकासुर राक्षसाला मी मारीन. नंतर मुर व कैटभ या राक्षसांचा नाश मी करीन. नानाप्रकारच्या धनांनीं युक्त असलेलें प्राग्ज्योतिष नांवाचें नगर उध्वस्त करून, तेथल्या राक्षसराजाला मारून त्या गांवची संपत्ति मी द्वारकेंत आणीन. बाणासुराचें हित चिंतणाऱ्या महेश्वर व महादेव नांवाच्या देवांचा मी पराभव करीन आणि बलीचा मुलगा जो सहस्रबाहु बाणासुर त्याचा सर्व सौभनिवासी लोकांच्यासकट मी नाश करीन. गर्गमुनींच्या आशीर्वादानें बलिष्ठ बनलेला कालयवन राक्षस हा माझ्याच हातून नाश पावेल. सर्व राजांना विरोध करणारा बलिष्ठ जरासंध हा गिरिव्रजाचें राज्य करीत असतांना अत्यंत उन्मत्त होईल व माझ्याशीं विरोध केल्यामुळें त्याचा वध होईल. आर्यपुत्र धर्मराजाच्या यज्ञामध्यें मी शिशुपाळाचा वध करीन. पृथ्वीवर सर्व राजे युद्धासाठीं एकत्र जमले असतांना एकट्या अर्जुनाचें सहाय्य घेऊन मी युधिष्ठिराची त्याच्या राज्यावर स्थापना करीन. अशा प्रकारें "नरनारायण हे ऋषि लोककार्यार्थ उद्युक्त झाले असून या महासमर्थ मुनीच्या हातून क्षत्रियांचा नाश होईल." अशी लोक आमची कीर्ति गातील. आमच्या इच्छेप्रमाणें पृथ्वीचा भार हरण केल्यावर व यादव कुळांतील मुख्य मुख्य पुरुषांचा नाश केल्यावर व मला माझ्या ज्ञानस्वरूपाची आठवण झाल्यानंतर मी घोर प्रलय करीन. नारदा, माझीं कर्में असंख्य आहेत. माझीं रूपें चार प्रकारचीं आहेत. असलीं कर्में केल्यावर ब्रह्मदे-

वालाहि पूज्य असणाऱ्या माझ्या लोकाला मी जाईन. हंस, कूर्म, मत्स्य, वराह, नारसिंह, वामन, परशुराम, राम, कृष्ण व कलंकी हे माझेच अवतार असून ते मी लोककल्याणाकरितां धारण केले आहेत. पूर्वी ज्यावेळीं वेदश्रुति नष्ट झाल्या होत्या त्यावेळीं त्या मींच पुन्हां परत आणल्या. पूर्वी कृतयुगामध्यें या वेदश्रुति मींच उत्पन्न केल्या होत्या. तूं जर कधींकाळीं पुराणें ऐकलीं असशील तर या गोष्टी तुझ्या कानावर आल्या असतीलच. माझे यापूर्वी पुष्कळ उत्तमोत्तम अवतार होऊन गेले आहेत व हे अवतार घेऊन आणि अनेक लोककार्यें करून मी पुन्हां आपल्या प्रकृतीच्या ठिकाणीं लीन झालों आहें. हे नारदा, तुझ्या अनन्य भक्तीमुळें तुला आज जें माझें दर्शन झालें, असलें दर्शन ब्रम्हदेवालाहि कधीं झालें नाहीं. हे नारदा, तूं माझ्यावर भक्ति करतोस म्हणून तुला या पूर्वी झालेल्या आणि पुढें होणाऱ्या गोष्टी त्यांतील रहस्यासकट सांगितल्या.

भीष्म—हे युधिष्ठिरा, तो भगवान् विश्वरूपानें नटणारा अव्यय परमेश्वर अशा प्रकारचें भाषण करून त्याच ठिकाणीं अंतर्धान पावला. नंतर महातेजस्वी नारदसुद्धां आपल्याला हवा असलेला वर मिळवून नरनारायणांचें दर्शन घेण्याकरतां बद्रिकाश्रमामध्यें आला. त्या नारदानें चारी वेदांचें सार ज्यांत सांठविलें आहे असलें हें सांख्य व योग यांनीं बनलेलें व पंचरात्र या नांवानें ओळखलें जाणारें, नारायणाच्या मुखांतून स्रवलेलें महोपनिषद् ब्रह्मदेवाच्या घरीं पुन्हां सांगितलें.

युधिष्ठिर—हे पितामहा, त्या धीमान् नारायणाचें माहात्म्य नारदापासून ब्रह्मदेवांनीं ऐकलें असें आपण म्हणतां तर तें काय त्याला माहीत नव्हतें? ब्रह्मदेव हा तर भगवान् नारायणाच्या नंतरचा. त्या तेजस्वी नारायणाचा प्रभाव त्याला माहीत नाहीं असें कसें होईल?

भीष्म—हे राजेंद्रा, आतांपर्यंत हजारों, शेंकडों महाकल्प होऊन गेले व या प्रत्येक कल्पाच्या ठिकाणीं उत्पत्ति व प्रलय हीं तितक्याच वेळां होऊन गेलीं आहेत. प्रत्येक सर्गाच्या वेळीं प्रजांची उत्पत्ति ब्रह्मदेवाच्या हातून होते व या प्रत्येक वेळीं भगवान् नारायणाची ब्रह्मदेवाला आठवण होते. हा परमात्मा आपलाहि उत्पत्तिकर्ता आहे अशी याला जाणीव होते. ब्रह्मदेवाच्या घरीं जे दुसरे सिद्ध जमले होते त्यांना ब्रह्मदेवानें हें वेदांना संमत असलेलें पुराण सांगितलें. त्या एकनिष्ठ सिद्धापासून हें पुराण सूर्यानें ऐकलें व त्यानें तें आपल्या अनुचराकडून

ऐकविलें. पूर्वीं सूर्याचे भोंवतीं फिरण्यासाठीं निर्माण केलेले जे सहासष्ठ हजार ऋषि त्यांना हें पुराण सूर्यानें सांगितलें. व त्या सूर्यानुयायी महात्म्या ऋषींनीं मेरुपर्वताच्या पठारावर जमलेल्या देवांना तें ऐकविलें. देवापासून हें पुराण असित नांवाच्या ऋषीनें ऐकलें. हे राजेंद्रा, त्याच्यापासून तें पितरांना मिळालें व मला हें पुराण माझा पिता शांतनु यानें सांगितलें आणि मी आज हें पुराण तुला सांगत आहें. ज्या ज्या देवांनीं किंवा मुनींनीं आजवर हें पुराण ऐकलें ते सर्व परमात्म्याचे भक्त आहेत. हे राजा, अशा परंपरेनें चालत आलेलें हें आर्षेय आख्यान तूं वासुदेवभक्तावांचून इतर कोणालाहि सांगूं नकोस. माझ्यापासून आतांपर्यंत तूं दुसरीं जीं शेंकडों उपाख्यानें ऐकलींस त्यांचें, देवदानवांनीं समुद्राचें मंथन करून त्यांतून अमृतरूपी सार काढावें तसें हें सार काढलें आहे. हें कथामृत जो पठण करील व जो ऐकेल तो परमेश्वराचा अनन्य व एकांतिक भक्त होऊन श्वेतद्वीपाला जाईल व त्या ठिकाणीं चंद्रासारखा तेजस्वी होऊन सहस्रधाम परमेश्वराशीं तादात्म्य पावेल यांत संशय नाहीं. ही सर्व कथा मुळापासून ऐकल्यानें रोगी मनुष्याची रोगापासून मुक्तता होईल, जिज्ञासु माणसाची इच्छा तृप्त होईल व भक्ताला त्याला योग्य अशी गति प्राप्त होईल. हे राजा, तूं पण या पुरुषोत्तमाची नित्य पूजा करत जा; कारण, तोच या सगळ्या जगताचे आईबाप असून त्याला गुरुस्थानीं आहे. तो सनातन ब्रह्मण्यदेव भगवान् जनार्दन तुझ्यावर नित्य कृपा करो.

वैशंपायन—हे जनमेजया, हें उत्तम प्रकारचें आख्यान ऐकून धर्मराज युधिष्ठिर आणि त्याचे ते सर्व भाऊ नारायणाची एकांतिक भक्ति करूं लागले व "त्या भगवान् पुरुषोत्तमाचा जय असो" अशी जपवाणी ते उच्चारूं लागले. आमचे गुरु कृष्णद्वैपायनमुनि यांनींही पण नारायणाच्या त्या परमश्रेष्ठ जपमंत्राचा घोष सुरू केला आणि आकाशमार्गानें त्यांनीं अमृतानें भरलेल्या क्षीरसमुद्राला जाऊन तेथें देवाधिदेवाची पूजा केली व पुन्हां ते आपल्या आश्रमाला परत आले.

भीष्म—नारदानें सांगितलेलें हें आख्यान मी तुला यथार्थ रीतीनें सांगितलें आहे. हें आख्यान जसें परंपरेनें आलें तसेंच माझ्या पित्यानें मला पूर्वीं सांगितलेलें होतें.

सौति—वैशंपायनानें सांगितलेलें हें आख्यान मी आपणांस सर्व सांगितलें आहे. जनमेजयानें हें आख्यान ऐकल्यानंतर नारायणाचें यथाविधि पूजन केलें.

हे ब्राह्मणहो, आपणहि तपश्चर्या केली आहे व नाना प्रकारचीं व्रतें केलीं आहेत. आपण वेदवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ आहांत व नैमिषारण्यामध्यें राहाणाऱ्या शौनक ऋषीच्या महासत्रासाठीं येथें जमलां आहांत. तेव्हां त्या शाश्वत परमेश्वराचें आपण उत्तम प्रकारच्या आहुति घातलेल्या यज्ञांनीं पूजन करा. हें आख्यान परंपरेनें जसें आलें तसेंच माझ्या पित्यानें मला सांगितलें. १२. ३. ३३९.

---

## अध्याय ३४० वा.

[व्यास–नारायणसंवाद]

**शौनक**—हे सौते, यज्ञामध्यें आपला भाग प्रथम उचलून नेणाऱ्या, सतत यज्ञकर्त्या व वेदवेदांगें जाणणाऱ्या अशा भगवान् परमेश्वरानें निवृत्तिधर्माचें अवलंबन कसें केलें? ज्या प्रभूनें निवृत्तिधर्म सांगितले त्यानेंच प्रवृत्तिकर्मरूप यज्ञांमध्यें देवतांना भाग घ्यावयास कसें लावलें व एकच देव यज्ञकर्ता आणि यज्ञभोक्ता कसा ही एक मला शंका येते, हिचें आपण निवारण करा. धर्मानें सांगितलेल्या नारायणाच्या कथा आपण ऐकल्या आहांत तेव्हां हा संशय आपण दूर करूं शकाल.

**सौति**—जनमेजयानें व्यासशिष्य वैशंपायनाला जें विचारलें व त्यानें जें त्याला सांगितलें तेंच पुराण कथानक मी तुला सांगतों. प्राणिमात्राच्या ठिकाणीं अंतर्यामिरूपानें राहणाऱ्या परमेश्वराचें हें माहात्म्य ऐकून महाबुद्धिमान् जनमेजय वैशंपायनाला म्हणाला,

**जनमेजय**—ब्रह्मदेव, सर्व इतर देव, राक्षस आणि मानव यांच्यासकट सर्व लोक सर्व बाजूंनीं अभ्युदय प्राप्त करून देणाऱ्या क्रियांमध्येंच गुंतून राहिलेले दिसतात. हे ब्रह्मन् आपण मोक्षधर्म हेंच निर्वाणीचें सुख होय असें सांगितलें. पुण्य आणि पाप हीं दोन्ही नाहींशीं होऊन ज्यांना मोक्षप्राप्ति झाली ते सहस्रधाम पुरुषोत्तमाच्या ठिकाणीं प्रवेश करतात असें आम्हीं ऐकलें आहे. हा सनातन मोक्षधर्म आचरणांत आणणें अत्यंत कठीण आहे. सर्व देवता हा मोक्षमार्ग टाकून यज्ञामधल्या हव्यकव्यांचा उपभोग घेत आहेत. ब्रह्मदेव, रुद्र, इंद्र, सूर्य, चंद्र, वायु, अग्नि, वरुण, आकाश, पृथ्वी, व बाकीचे सर्व देव या सर्वांना आपली निर्वाणीची गति आपणच निर्माण केलेली आहे याची जाणीव नाहींशी दिसते. आणि म्हणून निवृत्तीचा शाश्वत, अक्षर व

अव्यय असा मार्ग टाकून देऊन ते स्मृतीमध्यें सांगितलेल्या व मर्यादित फल देणाऱ्या प्रवृत्तिमार्गांचाच अवलंब करतात. कर्मकांडाच्या मागें जे लोक लागले त्यांच्या क्रियेमध्यें हा एक मोठा दोष आहे कीं त्यांचें फल मर्यादित स्वरूपाचें असतें. हे ब्रह्मन् या संशयाचें शल्य माझ्या अंतःकरणांत कसें टोंचून राहिलें आहे म्हणून आपण इतिहास सांगून या संशयाचें निरसन करा. त्याविषयीं मला उत्कंठा लागली आहे. यज्ञामध्यें देवतांना भाग कसा मिळाला व त्यांचें यजन यज्ञामध्यें काय हेतूनें केलें जातें? यज्ञांत ज्यांना भाग मिळतो ते देव स्वतः मोठाले यज्ञ करीत असतात. असे यज्ञ करून ते कोणाला भाग देतात?

**वैशंपायन**—राजा, तूं विचारलेला प्रश्न अत्यंत गूढ आहे. ज्याच्या गांठीं तपश्चर्येचें पुण्य नाहीं, ज्याला वेदांचें आणि पुराणांचें ज्ञान नाहीं त्याच्या हातून या प्रश्नाचें नीट विवरण होणें शक्य नाहीं. पूर्वी माझ्या गुरूंनीं यासंबंधांत मीं अशीच शंका घेतल्यावरून मला जें सांगितलें तेंच मी आतां तुला सांगतों. पूर्वी सिद्ध आणि चारण यांनीं सेविलेल्या गिरिश्रेष्ठ मेरुपर्वतावर महर्षि कृष्ण-द्वैपायन व्यासांनीं आपले चार शिष्य व पांचवे त्यांचे पुत्र शुक्राचार्य या सर्वांना चार वेद आणि पांचवें महाभारत शिकविलें. व्यासांचे हे चार शिष्य म्हणजे सुमंतु, जैमिनि, तपस्वी पैल व चौथा मी हे होत. हे सर्व व्यासशिष्य दमनशील शुद्ध आचरणाचे व जितेंद्रिय होते आणि त्यांनीं क्रोध जिंकलेला होता. आम्हीं एकदां वेदाध्ययन करीत असतांना आम्हांला तूं विचारलीस हीच शंका आली होती व या आमच्या शंकेचें निरसन व्यासांनीं त्या वेळीं केलें होतें. व्यासांनीं केलेलें समाधान मी त्यावेळीं जसें ऐकलें तसेंच आज हे भारता, मीं तुला सांगत आहें.

सर्व अज्ञानांधकाराचा नाश करणाऱ्या श्रीमान् पाराशर व्यासांनीं शिष्यांचें तें वचन ऐकून त्यांना म्हटलें " मी अतिशय दारुण व फार मोठी अशी तपश्चर्या केली. नारायणाच्या प्रसादानें क्षीरसमुद्राच्या कांठावर मला माझ्या इच्छेप्रमाणें हें त्रिकालज्ञान प्राप्त झालें. मी तुमच्या शंकेचें समाधान न्यायाला धरून यथा-शिस्त रीतीनें करतों तें ऐका. हें ज्ञान मला माझ्या ज्ञानचक्षूंनीं युगारंभीं प्राप्त झालें. सांख्य आणि योग या शास्त्रांत निष्णात असलेले पुरुष ज्याला परमात्मा म्हणून म्हणतात त्यालाच त्याच्या स्वतःच्या कर्मांनीं महापुरुष अशी संज्ञा मिळते. या महापुरुषापासून अव्यक्ताची उत्पत्ति होते व या अव्यक्तालाच शहाणे लोक प्रधान

असें म्हणतात. या समर्थ अव्यक्तापासून प्रजेची निर्मिति करण्यासाठीं जें व्यक्त तत्त्व निर्माण झालें त्याला या लोकांच्यामध्यें महान् आत्मा व अनिरुद्ध असें म्हणतात. या व्यक्त तत्त्वापासून ब्रह्मदेवाची उत्पत्ति झाली. याला अहंकार असें म्हणत असून तो सर्व तेजानें युक्त असा आहे. पृथ्वी, वायु, आकाश, जल, आणि तेज हीं पंचमहाभूतें अहंकारापासून निर्माण झालीं. हीं पंचमहाभूतें निर्माण करून ब्रह्मदेवानें त्यांचे गुण निर्माण केले. या पंचमहाभूतांपासून जे साकार प्रजापति निर्माण झाले त्यांचीं नांवें मीं सांगतों ऐक. मरीचि, अंगिरा, अत्रि, पुलस्त्य, पुलह, क्रतु, वसिष्ठ व स्वायंभुव मनु या त्या आठ प्रकृति होत. या प्रकृति सर्व लोकांचें अधिष्ठान आहेत. वेद आणि वेदांगें, यज्ञ आणि यज्ञांगें या सर्वांनीं युक्त असलेल्या या प्रकृति पितामह ब्रह्मदेवानें लोकांच्या उत्पत्तीसाठीं निर्माण केल्या व हें सर्व जग या आठ प्रकृतिपासून निर्माण झालें आहे. ब्रह्मदेवाच्या क्रोधापासून रुद्र निर्माण झाला व या क्रोधात्मक रुद्रानें दुसरे दहा रुद्र स्वतः निर्माण केले.

हे अकरा रुद्र म्हणजे विकारपुरुष होत असें समजलें जातें. अकरा रुद्र, आठ प्रकृति व सर्व देवऋषि हे सृष्टि निर्माण करण्याकरितां उत्पन्न झाले आहेत. हे एक दिवस ब्रह्मदेवाकडे जाऊन त्याला म्हणाले, "प्रभो भगवन् आमची उत्पत्ति आपल्यापासून झाली; तेव्हां आम्ही आतां काय काय काम करावें तें आम्हांला सांगा. आमच्याकरतां कांहीं विशिष्ट उद्देशानें जे जे अधिकार ज्याला ज्याला आपण नेमून दिले असतील ते ते अधिकार आम्हीं कसे कसे चालवावे व ते चालविण्यासाठीं आपण आमच्या हातांत कोणती सत्ता ठेवली आहांत याचा खुलासा आपण करावा. देवांचें हें भाषण ऐकून ब्रह्मदेव त्यांना म्हणाला "हे देवहो, तुम्हीं मला चांगला प्रश्न विचारलात; तुमचें कल्याण असो; तुमच्या मनांत जी चिंता घोळत होती तीच चिंता मलाहि उत्पन्न झाली आहे. या सगळ्या त्रैलोक्याचा कारभार तुमच्या आणि माझ्या सामर्थ्याचा क्षय होऊं न देतां कसा चालवावयाचा हा प्रश्न आहे. तेव्हां आपण येथून निघून त्या लोकसाक्षी अव्यक्त महापुरुषाला शरण जाऊं या; म्हणजे तो आपल्याला योग्य तें सांगेल. नंतर ते देव आणि ऋषि ब्रह्मदेवासहवर्तमान लोकांचें हित करण्याच्या इच्छेनें क्षीरसमुद्राच्या उत्तर तीरावर गेले. त्या ठिकाणीं ब्रह्मदेवानें सांगितलेलें वेदविहित तपाचरण त्यांनीं सुरू केलें. त्यांची ती तपश्चर्या सर्व प्रकारच्या तपश्चर्यांमध्यें अत्यंत दारुण होती. त्यांनीं आपली दृष्टि वर लावली होती,

बाहू वर केलेले होते, मन एकाग्र केलें होतें व एका पायावर उभे राहून त्यांनीं आपलीं शरीरें लांकडासारखीं वाळवून घेतलीं होतीं. अशा प्रकारें देवांनीं एक हजार वर्षेंपर्यंत अतिशय दारुण तपश्चर्या केल्यावर वेद आणि वेदांगें यांच्यामुळें शोभून दिसणारी मधुर वाणी त्यांच्या कानावर पडली.

श्रीभगवान्—हे ब्रह्मदेवा, तपस्वी ऋषि, व इतर देवहो, मी तुमचें मोठ्या आनंदानें स्वागत करून तुम्हांला कांहीं सांगतों तें ऐका. तुम्ही काय हेतु धरून येथें आलां आहांत तें मी जाणलें व तुमचा हेतु अत्यंत लोककल्याणकारक आहे, यांतहि शंका नाहीं. तुम्ही प्रवृत्तिमार्गाला लागा. तशी व्यवस्था करून मी तुमचें सामर्थ्य वाढवीन. माझी आराधना करण्याच्या इच्छेनें तुम्ही फार मोठी तपश्चर्या केलीत. या तपश्चर्येचें फळ तुम्हांला मिळेल. सर्व लोकांचा गुरु पितामह ब्रह्मदेव याच्यासहवर्तमान, हे देवश्रेष्ठहो, तुम्ही माझें योग्य प्रकारें पूजन करा. यज्ञाच्या ठिकाणीं माझा भाग नित्य ठेवीत जा आणि तुमच्या अधिकारभेदाप्रमाणें मी तुमचें कल्याण करीन.

वैशंपायन—देवदेवांचें तें वाक्य ऐकून सर्वांच्या अंगावर आनंदाचे रोमांच उभे राहिले व देव, ऋषि आणि ब्रह्मदेव या सर्वांनीं मिळून वेदविहित मार्गानें वैष्णवयज्ञ आरंभिला. त्या यज्ञामध्यें ब्रह्मदेवानें स्वतः विष्णूच्या नांवाचा भाग काढून ठेविला; तसेंच देव व देवर्षि यांनींहि पण विष्णूकरितां निरनिराळे भाग काढून ते त्याला अर्पण केले. कृतयुगांतील विधीप्रमाणें ते भाग अंधकाराच्या पलीकडे असलेल्या, सूर्यासारख्या तेजस्वी, सर्वव्यापी, सर्वांचें शासन करणाऱ्या, व वरद भगवंताला देवांनीं मोठ्या आदरानें अर्पण केले. नंतर त्या ठिकाणीं उपस्थित झालेल्या देवांना उद्देशून त्या गुप्त परमात्म्यानें आकाशवाणीच्या रूपानें भाषण केलें. "ज्यानें जो भाग ज्या प्रकारें मला दिला तो त्या प्रकारें माझ्यापर्यंत येऊन पोहोंचला आहे. हे सर्व भाग मला मिळाल्यामुळें मी संतुष्ट झालों आहें व तुमच्या भक्तीचें फळ मी आतांच तुम्हांला देतों. पण, यानें जन्ममरणाची यातायात मात्र चुकणार नाहीं. हे देवहो, माझ्या प्रसादामुळें हें फळ तुम्हांला प्राप्त होईल. नानाप्रकारच्या श्रेष्ठ दक्षिणांनीं युक्त असलेल्या यज्ञांनीं देवतांचें तुम्हीं यजन करीत असतांना युगायुगाच्या ठिकाणीं अशींच प्रवृत्तीपर फळें तुम्हांला प्राप्त होतील. हे देवहो, या पृथ्वीतलावर जीं जीं कोणीं माणसें यज्ञ करितील त्या त्या यज्ञामध्यें तुम्हांला वेदानें सांगितलेल्या नियमाप्रमाणें भाग मिळेल. आतांच्या या महायज्ञांत ज्यानें ज्यानें ज्या ज्या प्रकारचा भाग मला दिला त्याच्या त्याच्या मानानें

त्याला यज्ञांमध्यें हविर्भाग मिळावा अशी योजना मी वेदसूत्रांमध्यें करून ठेविली आहे. तुम्ही लोकांची नेहमीं बूज ठेवीत जा. यज्ञाचें फळ प्राप्त करून देण्याला समर्थ अशा प्रवृत्तिफल देणाऱ्या ज्या ज्या क्रिया लोकांमध्यें त्यांच्या त्यांच्या अधिकारभेदाप्रमाणें घडत जातील, त्या क्रियांच्यामुळें तुमचें सामर्थ्य वाढेल व या वाढत्या सामर्थ्यानें तुम्ही लोकांची धारणा करा. सर्व प्रकारच्या यज्ञांमध्यें मनुष्यें यज्ञांनीं तुमचें पूजन करतील व त्यानंतर तुम्ही त्याच मार्गानें माझेंहि पूजन करा. वेद, यज्ञ आणि सर्व वनस्पति यांची उत्पत्ति यासाठींच मीं केली आहे. यांचा योग्य तऱ्हेनें प्रयोग केल्यानें सर्व देवता संतुष्ट होतात. हे सुरश्रेष्ठहो, मी तुमच्यासाठीं हें प्रवृत्तिगुणांनीं युक्त असें फल निर्माण केलें आहे. हें फल कल्पान्तापर्यंत टिकून राहील. हे देवहो आपापल्या अधिकाराप्रमाणें तुम्ही नेहमीं लोकहिताचें चिन्तन करीत रहा. मरीचि, अंगिरा, अत्रि, पुलस्त्य, पुलह, क्रतु व वसिष्ठ हे सात माझे मानसपुत्र आहेत. हे मुख्य मुख्य वेदवेत्ते होत. यांना वेदाचार्य असें म्हणतात. हे सात प्रजापति प्रवृत्तिधर्माचा प्रसार करणारे आहेत. कर्ममार्गानें जाणाऱ्या लोकांचा सनातन रस्ता कोणता हा याच्यावरून व्यक्त होईल. सृष्टि उत्पन्न करणाऱ्या प्रभूला अनिरुद्ध अशी संज्ञा आहे. सन, सनत्सुजात, सनक, सनंदन, सनत्कुमार, कपिल व सनातन हे सात ऋषि ब्रह्मदेवाचे मानसपुत्र होत. त्यांचे ठिकाणीं ज्ञान आपोआप स्फुरल्यामुळें त्यांनीं निवृत्तिधर्माचा आश्रय केला. हे योगशास्त्रामध्यें श्रेष्ठ आहेत. सांख्यमार्गाचें ज्ञान यांना उत्तम प्रकारचें आहे. धर्मशास्त्रामध्यें हे आचार्यपद्धतीला पावलेले आहेत. मोक्षधर्माची प्रवृत्ति यांच्यापासूनच. पूर्वी अव्यक्तापासून त्रिगुणात्मक अहंकार उत्पन्न झाला; या अहंकाराच्या पलीकडलें जें तत्व त्याला क्षेत्रज्ञ असें नांव आहे. तो क्षेत्रज्ञ तो मींच. या मार्गानें जाणाऱ्याला पुनर्जन्म नाहीं. मनुष्यप्राणी जीं जीं प्रवृत्तिपर किंवा निवृत्तिपर कर्मे करतो तसलें तसलें फळ त्याला प्राप्त होतें. हा ब्रह्मदेव सर्व जगताचा आदिकर्ता प्रभु असून सर्व लोकांना पूज्य आहे. हा ब्रह्मदेव तुमच्या आईबापांच्या ठिकाणीं असून तुमचा पितामहहि तोच आहे. माझ्या आज्ञेनें या ब्रह्मदेवाला सर्व प्राणिमात्रांना वर देण्याचें सामर्थ्य येईल. याच्या कपाळामधून निर्माण झालेला याचा मुलगा जो रुद्र तो ब्रह्मदेवाच्या अनुशासनानें सर्व भूतांचें धारण करील. हे देवहो, तुम्ही आतां आपापल्या ठिकाणीं जा व तुम्हांला नेमून दिलेल्या अधिकारांचें यथायोग्य चिंतन करा. लोकांच्यामध्यें

कर्ममार्गाची प्रवृत्ति उत्पन्न करा. कोणी कोणी काय काय कर्मे करावयाचीं त्या कर्मांनीं मिळणाऱ्या गति कोणत्या व प्राणिमात्रांच्या आयुष्याचें माप किती या सगळ्या गोष्टी तुम्ही पृथ्वीवरच्या लोकांना समजावून सांगा. हे देवहो, हा कृतयुग नांवाचा श्रेष्ठ काल आहे. या युगामध्यें यज्ञपशूंची हिंसा करूं नये असें सांगितलें आहे तें खोटें नव्हे. या युगांत धर्म चतुष्पाद राहील. या कृतयुगाच्या मागून जें त्रेता नांवाचें युग येईल त्यामध्यें या चतुष्पाद धर्मांपैकीं एका पादाचा लोप होऊन त्रयीधर्माचाच प्रसार होईल. या युगांत पशूंचें प्रोक्षण करून नंतर यज्ञ पशूचा वध करण्याची चाल पडेल. त्रेतायुगानंतर द्वापार नांवाचें मिश्रयुग सुरू होईल व त्यामध्यें धर्माचे दोन भाग नाहींसे होतील. नंतर चवथें कलियुग सुरू झाल्यावर धर्माचा चतुर्थांश भागच शिल्लक राहील." भगवान् नारायण अशा तऱ्हेनें बोलत असतांना देव व देवर्षि त्याला म्हणाले, "कलियुगामध्यें एकपाद धर्मच शिल्लक राहिला आणि त्याची प्रवृत्ति यदृच्छया कोठेंतरी व्हावयाची अशी स्थिति आली म्हणजे आम्ही काय करावें, तें हे भगवन्, आम्हांला सांगा."

भगवान्—ज्या ठिकाणीं तुमचें वेदाध्ययन, यज्ञाचरण, तपश्चर्या, सत्यपालनाचें व्रत व दमनशीलता याला विघ्न येणार नाहीं व ज्या ठिकाणीं अहिंसा धर्माचें आचरण करीत तुम्हांस सुखानें राहातां येईल त्याच देशामध्यें तुम्ही रहा म्हणजे अधर्माची सांवलीसुद्धां तुमच्यावर पडणार नाहीं.

व्यास—भगवंतानें या प्रमाणें आज्ञा केल्यावर त्या देवांनीं आणि ऋषींनीं भगवंताला नमस्कार केला आणि नंतर ते आपल्या ईप्सित देशाला निघून गेले. सगळे देव निघून गेल्यानंतर अनिरुद्धाचें रूप घेतलेल्या त्या भगवंताला पाहण्याच्या इच्छेनें एकटा ब्रह्मदेव तेवढाच मागें राहिला. तेव्हां भगवंतानें मोठें थोरलें घोड्याचें तोंड धारण करून त्याला दर्शन दिलें व त्यानें सर्व वेद परत आणले. त्याच्या हातामध्यें कमंडलु व त्रिदण्ड हीं होतीं. घोड्याचें तोंड धारण केलेल्या त्या अत्यंत तेजस्वी देवाला पाहून लोककर्त्या प्रभु ब्रह्मदेवानें लोकांचें हित करण्याच्या उद्देशानें त्याला मस्तक नम्र करून प्रणाम केला व तो त्याच्यापुढें हात जोडून उभा राहिला. इतकें होतांच देवानें त्याला आलिंगन दिलें व त्यांना म्हणाला "तूं लोकांचीं कर्मे कशीं चाललीं आहेत तीं यथाविधि नीटपणानें पहात जा. तूं सर्व जगताचा धाता आहेस, प्रभु आहेस, गुरु आहेस. हा भार मी आतां तुझ्यावर टाकला असून त्यामुळें मी एकप्रकारें निश्चिन्त

झालों आहें. देवांचें कार्य साधणें ही गोष्ट ज्या वेळेस तुला तुझ्या आहाराबाहेरील वाटेल त्या वेळेला मी अवतार घेईन आणि आत्मज्ञानाच्या बलावर मी तुझें कार्य करीन. अशा प्रकारें भाषण करून तो हयग्रीव भगवान् त्याच ठिकाणीं अंतर्धान पावला. मग त्याची आज्ञा घेऊन ब्रह्मदेव लवकरच स्वतःच्या ब्रह्मलोकाला आला. या सनातन भगवान् पद्मनाभाला यज्ञभोक्ता व यज्ञकर्ता असें जें म्हणतात त्याची उपपत्ति ही अशी आहे. जगताला अक्षय सुख देणारा जो निवृत्तिधर्म त्याचा या भगवंतानें स्वतः आश्रय केला असून नानाप्रकारच्या लोकांच्यासाठीं म्हणून त्यानें प्रवृत्तिधर्महि सांगितला आहे. हा भगवान् प्रभु, भूतमात्रांचा आदि, मध्य व अंत आहे. धाता तोच आधेय तोच. कर्ता तोच आणि कार्यहि तोच. प्रत्येक युग संपल्यानंतर त्रैलोक्याचा उपसंहार करून हा झोपीं जातो व युगारंभीं जागा झाल्यानंतर जगताची उत्पत्ति हाच करितो. हा महात्मा देव निर्गुण आहे, अज आहे, विश्वरूप आहे व सर्व देवांचें आश्रयस्थान आहे. हा पंचमहाभूतांचा अधिपति असून एकादश रुद्रांचा, द्वादश आदित्यांचा व अष्ट वसूंचा शास्ता आहे. हा अश्विनौ देवांचा पति व मरुद्गणांचा नायक असून वेद, यज्ञ व वेदांगें यांचा अधिपति आहे. हा नित्य समुद्रांत वास करितो. या हरीचे केस मुंज गवतासारखे असून हा शांत देवाधिदेव प्राणिमात्रांना मोक्षधर्म शिकवितो. तपश्चर्येचा, तेजाचा, यशाचा, वाचेचा आणि नद्यांचाहि अधिपति हाच. कपर्दि हाच, एक शिंगाचा धीमान् वराह हाच. हा भगवान् हाच विवस्वान् होय. घोड्याचें तोंड हाच धारण करितो. चतुर्मूर्ति याच्याच. हाच गुह्यस्वरूप होय. ह्या क्षराक्षर भगवंताचें दर्शन ज्ञानामुळेंच होणें शक्य आहे. हा अकुंठित गतीचा अव्यय परमेश्वर सर्व ठिकाणीं संचार करितो. विज्ञानाच्या योगानें ज्याचें ज्ञान करून घ्यावें लागतें, असलें परब्रह्म म्हणजे हाच होय. मीं माझ्या ज्ञानचक्षूंनीं हें परब्रह्मस्वरूप पाहिलें आहे आणि तूं मला विचारल्यावरून त्याचें वर्णन मीं तुजपुढें केलें आहे. हे शिष्यहो, मी सांगितलेली गोष्ट करा व भगवान् हरीची वेदांतील स्तोत्रांनीं स्तुति करून त्याची यथाविधि पूजा करा.

**वैशंपायन**—त्या धीमान् वेदव्यासांनीं आम्हांला आमच्या सर्व शंका याप्रमाणें उलगडून सांगितल्यानंतर आमच्या गुरूंनीं आम्हीं चौघे शिष्य व पांचवा त्यांचा मुलगा शुकाचार्य यांच्यासहवर्तमान चारी वेदांतील ऋचांनीं त्या भगवंताची स्तुति गायिली. हे राजा, याप्रमाणें जें जें तूं विचारिलेंस तें तें मीं सर्व तुला सांगितलें. पूर्वीं आमच्या द्वैपायन गुरूंनीं आम्हांला

असेंच सांगितलें. जो मनुष्य एकाग्र चित्तानें भगवंताला नमस्कार करून हें आख्यान ऐकेल किंवा वाचील तो बुद्धि, सामर्थ्य, आणि सौंदर्य यांनीं युक्त होऊन सर्व रोगांपासून मुक्त होईल. या आख्यानामुळें रोगी मनुष्याची रोगपीडा नाहींशी होईल. बंधनांत सांपडलेला मनुष्य आपल्या बंधनांतून मुक्त होईल. कांहीं हेतु मनांत धरून हें आख्यान ऐकणाऱ्या माणसाच्या इच्छा पूर्ण होऊन त्याला दीर्घायुष्य प्राप्त होईल. या कथानकामुळें ब्राह्मणांना सर्व वेदांचें ज्ञान होईल; क्षत्रिय विजयी होतील; वैश्याला पुष्कळ नफा मिळेल व शूद्राला सुखप्राप्ति होईल; निपुत्रिकाला पुत्र होईल; कुमारीला तिच्या इच्छेप्रमाणें पति मिळेल; अडलेली गर्भिणी मोकळी होईल; गर्भिणीला पुत्र होईल; वंध्येचा वंश पुत्र-पौत्रादि परंपरेनें वाढेल; रस्त्यानें जातांना जो हें आख्यान म्हणेल त्याला वाटेंत विघ्न येणार नाहीं. सारांश, जो जो जी जी इच्छा मनांत धरील त्याची त्याची ती ती इच्छा या आख्यानाच्या श्रवणपठनानें पूर्ण होईल. राजा, त्या महर्षींचें तें ठाम स्वरूपाचें भाषण, पुरुषश्रेष्ठ महात्म्या नारायणाची ती कीर्ति व देव आणि ऋषि यांच्या समागमाचा हा वृत्तान्त ऐकून भक्तिमान् पुरुष अत्यंत सुखी होतात. १२. ३. ३४०.

## अध्याय ३४१ वा

[ १ व्यासकृत नारायणस्तुति ]

( १ ) **जनमेजय**—व्यासानें आपल्या शिष्यांसहवर्तमान भगवंताची स्तुति करितांना ज्या विविध नामांचा उच्चार केला त्याची निरुक्ति, हे भगवंता, आपण मला सांगा. प्रजापतींचाहि अधिपति जो भगवान् हरि त्याच्या निरनिराळ्या नामांची व्युत्पत्ति ऐकण्याची माझी इच्छा आहे. ती आपण सांगा म्हणजे त्याच्या योगानें शरदृतूंतील चंद्राप्रमाणें मी विमल होईन.

**वैशंपायन**—राजा, भगवंतानें अर्जुनाला आपल्या नांवांची व्युत्पत्ति प्रसन्न अंतःकरणानें जशी सांगितली तशीच ती मीं तुला सांगत आहें. शत्रुहन्त्या अर्जुनानें नारायणाच्या नामांचा उच्चार करून त्याला त्या नांवांची व्युत्पत्ति विचारली.

**अर्जुन**—भगवन् भूतभव्येशा, हे सर्व प्राणिमात्रांची उत्पत्ति करणाऱ्या अव्यया, हे लोकधामा, हे जगन्नाथा, हे लोकांचें भय हरण करणाऱ्या परमेश्वरा,

महर्षींनीं ज्या ज्या नामांनीं तुझें स्तोत्र केलें व तुझ्या कर्मांनीं जीं गूढ नांवें वेदांत आणि पुराणांत तुला दिलीं आहेत, त्या नांवांची व्युत्पत्ति तुझ्या तोंडून ऐकावी अशी माझी इच्छा आहे. तुझ्या नांवांची निरुक्ति सांगावयास तुझ्या-वांचून दुसरा कोणीहि समर्थ नाहीं.

**भगवान्**—अर्जुना, ऋग्वेद, यजुर्वेद, अथर्ववेद व सामवेद या चारी वेदांमध्यें, पुराणांत, उपनिषदांत, तसेंच ज्योतिष, सांख्य, योग व आयुर्वेद या शास्त्रांत माझीं पुष्कळ नांवें महर्षींनीं सांगितलेलीं आहेत. त्यांपैकीं कांहीं नांवें गौण आहेत व कांहीं माझ्या कृतींवरून पडलेलीं आहेत. त्यांपैकीं कृतींवरून पडलेल्या नांवांची व्युत्पत्ति मी तुला सांगतों, ती हे अनघा, एकाग्र चित्तानें ऐक. तूं पूर्वीं माझा अर्धा भाग समजला जात असस. सर्व प्राणिमात्रांच्या ठिकाणीं वास कर-णारा, अति यशस्वी, सर्वव्यापी, आणि निर्गुण असून गुणात्म्या त्या नारायणाला नमस्कार असो. त्या नारायणाच्या प्रसादानें ब्रह्मदेव उत्पन्न झाला व त्याच्याच क्रोधा-पासून रुद्राची उत्पत्ति झाली. हा भगवान् नारायण सर्व स्थावरजंगम भूतांचें उत्प-त्तिस्थान आहे. हे सात्त्विकश्रेष्ठा, अठरा गुणांनीं युक्त असलें जें सत्त्व तें सत्व म्हणजे हा नारायणच होय. प्रीति, सुख, संतोष, क्षमा, धृति, अहिंसा, पावित्र्य, सरळ-पणा, सत्यपरायणता, समता व निर्मत्सरता इत्यादि हीं अठरा सत्त्वें होत. अठरा प्रकारचे गुण हीच माझी श्रेष्ठ प्रकृति होय. ही आकाश आणि पृथ्वी यांची बन-लेली असून स्वतःच्या योगबलानें लोकांचें धारण करिते. ती मनुष्यांच्या कर्मांचें फल असून सत्यरूप, अमर व दुर्जय अशी आहे आणि सर्व लोकांचा आत्मा असें याच प्रकृतीला म्हणतात. यापासूनच उत्पत्ति आणि लय इत्यादि क्रिया घडतात. तपश्चर्या, यज्ञ, यज्ञकर्ता यजमान, व विराट स्वरूपाचा पुराण पुरुष या सर्वांना अनि-रुद्ध असें म्हणतात. ब्रह्मदेवाची रात्र संपत आली असतांना त्या अत्यंत तेजस्वी अनिरुद्धाच्या प्रसादानें एक कमळ उत्पन्न झालें व हे पद्मलोचना, त्या कमळांतून ब्रह्मदेव उत्पन्न झाला. हाही त्याचाच प्रसाद होय. ब्रह्मदेवाचा दिवस संपून रात्रीला सुरवात होतांच त्या परमेश्वराच्या कपाळांतून, त्याच्या क्रोधापासून जगताचा क्षय करणारी अशी रुद्रदेवता उत्पन्न झाली. ब्रह्मदेवाच्या प्रसादापासून व क्रोधापासून उत्पन्न झालेल्या ह्या जोडीला त्यानेंच निरनिराळे मार्ग दाखवून दिले. त्याप्रमाणें सृष्टीचा संहार व उत्पत्ति करण्याचें आपलें काम ह्या दोन देवता करीत आहेत. वस्तुतः सर्व प्राणिमात्रांस वर देणाऱ्या या देवता सृष्टिप्रलयाच्या बाबतींत नुसत्या निमित्तमात्र आहेत. हे पांडवा, डोक्यांवर जटांचा भार वहाणारा कपर्दी, जटाधारी,

मुंड, स्मशानांत वास करणारा, उग्र व्रताचरण करणारा परमयोगी, दक्षयज्ञाचा विध्वंस करणारा, भगनेत्रहर रुद्र हाहि पण नारायणच. युगायुगाच्या ठिकाणीं ह्या देवदेव महेश्वराची पूजा केली असतांना प्रभु नारायणाची पूजा केल्यासारखी होते. हे पांडुनंदना, मी सर्व लोकांचें अंतःकरण व्यापून आहें. म्हणून मीं माझेंच दुसरें रूप जी रुद्रदेवता तिचेंच पहिल्याप्रथम पूजन करीत असतों. परमकल्याण-कारक वरद शंकराची पूजा मी जर न करीन तर माझी स्वतःची पूजा कोण करील, अशी माझी स्वतःची समजूत आहे. मी ही जी मर्यादा घालून दिली ती ही मर्यादा लोक पाळतात. आपण घालून दिलेल्या मर्यादा प्रथम स्वतः पाळल्या पाहिजेत. भगवान् रुद्राची मी पूजा करितों. ज्याला रुद्राचें ज्ञान झालें त्यानें मला जाणलें आणि मला ज्यानें ओळखलें तो रुद्रालाहि जाणतो. रुद्र आणि नारायण हे तत्वतः एकच पण स्वरूपतः मात्र भिन्न आहेत. हे कौंतेया, प्रत्येक व्यक्तिमात्राच्या कर्माच्या ठिकाणीं ह्या सत्वाचा वास हा आहेच. हे पांडवनंदना, मला वर देण्याला कोणीहि समर्थ नाहीं असें मनांत आणून मी पुत्रप्राप्तीच्या इच्छेनें पुराणपुरुष महेश्वररुद्राची,—म्हणजे माझीच—आराधना केली. भगवान् विष्णु स्वतःवांचून दुसऱ्या कोणाहि देवाला नमस्कार करीत नाहींत. रुद्र हें माझेंच स्वरूप आहे म्हणून मी रुद्राची सेवा करितों. ब्रह्मदेव, रुद्र, इंद्र, सर्व ऋषि इत्यादिकांच्यासह सगळे देव सुरश्रेष्ठ नारायण हरीची पूजा करितात. पूर्वीं होऊन गेलेल्या, आज असणाऱ्या व पुढें होणाऱ्या सर्व गोष्टींचा नेता विष्णु आहे त्याची नित्य पूजा करावी; विष्णू हा एकच दाता आहे, आसरा आहे. वर देणारा आहे व दैव आणि पितृयज्ञामध्यें आहुतींचा भोक्ता आहे. माझे भक्तजन चार प्रकारचे आहेत असें तूं ऐकिलेंच आहेस. त्यांपैकीं माझी अनन्यभावानें भक्ति करणारे एकांतिक भक्तच श्रेष्ठ होत. कोणत्याहि प्रकारची आशा न ठेवतां सर्व कर्मे करणाऱ्या त्या भक्तांची परमगति म्हणजे मींच. बाकीचे जे तीन प्रकारचे भक्त राहिले त्यांचीं मनें फलप्राप्तीमध्यें गुंतलेलीं असतात. या सर्वांना केव्हांतरी प्रच्युति प्राप्त होते. ज्ञानी भक्तच सर्वांत श्रेष्ठ होय. ब्रह्मा काय, शितिकंठ काय, किंवा इतर कोणत्याहि देवता काय, ज्ञानी भक्तानें यांपैकीं कोणाचीहि पूजा केली तरी तो त्या पूजेमुळें मलाच येऊन मिळेल यांत संशय नाहीं. हे पार्था, तुझ्यासारख्या भक्ताच्या ठिकाणीं एक विशेष आहे तो असा कीं, तूं आणि मी एकरूपच असून आपण नरनारायण या नांवानें ओळखिले जातों व पृथ्वीचा भार हरण करण्यासाठीं आपणच मनुष्यदेह धारण केला आहे. मला अध्यात्म

योगाचें ज्ञान आहे. मी कोण, कोठला याचेंहि ज्ञान मला आहे. मी निवृत्तिलक्षण धर्म आणि अभ्युदयधर्म हे दोन्ही जाणतों. सर्व प्राणिमात्र माझ्यामध्यें प्रविष्ट होतात म्हणून मला नरांचें अयन (=नारायण) असें म्हणत. शिवाय जलाची उत्पत्ति नरापासून असल्यानें जलाला नारा अशी संज्ञा आहे व जल हें माझें पूर्वींचें अयन म्हणून मला नारांचें अयन(=नारायण) असें म्हणतात. सूर्यानें आपल्या किरणांनीं सर्व जग व्यापावें त्याप्रमाणें हें सर्व जग मीं व्यापून टाकतों. सर्व भूतांचे ठिकाणीं माझा विश्वास आहे, म्हणून मला वासुदेव असें म्हणतात; मी सर्व भूतांचा आधार; मी सर्व भूतांचा उत्पत्तिकर्ता; मी सर्व आकाश आणि पृथ्वी व्यापून टाकिली आहे व त्यामुळें माझी कांति अधिकच वाढली आहे. सर्व प्राणिमात्र देहावसान झाल्यानंतर ज्याच्या प्राप्तीची इच्छा करितात तें परब्रह्मपद मी. मीं त्रैलोक्याचें आक्रमण केलेला म्हणून मला विष्णू अशी संज्ञा आहे. दमनशील वृत्तीनें राहून सिद्धि मिळवूं इच्छिणारीं माणसें ज्याची इच्छा करितात, तो मी. पृथ्वी, स्वर्ग आणि अंतरिक्ष हीं तिन्ही मींच आहें. म्हणून मला दामोदर म्हणतात. अन्न, वेल, जल व अमृत या चारांना पृश्नि असें म्हणतात. हीं चारी माझ्या उदरांत आहेत, म्हणून मला पृश्निगर्भ असें नांव देण्यांत येतें. एकदां एकत आणि द्वित यांनीं आपल्या त्रित नांवाच्या भावाला विहिरींत लोटून दिलें तेव्हां त्यानें “ हे पृश्निगर्भा, माझें रक्षण कर, अशी त्या कूपांतून देवाची विनवणी केली. त्याबरोबर पृश्निगर्भ या नांवाच्या उच्चारानें तो ब्रह्मदेवाचा आद्यपुत्र ऋषिश्रेष्ठ त्रित पाण्यांतून वर आला असें ऋषि सांगतात. माझ्या पृश्निगर्भ या नांवाचें माहात्म्य येवढें आहे. सूर्य, अग्नि आणि चंद्र हे आपापल्या तेजानें लोकांमध्यें तळपत असतांना त्यांचे जे किरण चोहींकडे फांकले जातात, तेच माझे केश होत आणि म्हणून सर्व ब्राह्मणश्रेष्ठ मला केशव असें म्हणतात. महात्म्या उतथ्य ऋषीची पत्नी गर्भिणी असतांना एकदां कांहीं देवमायेमुळें उतथ्यऋषि अन्तर्धान पावले. हें पाहून बृहस्पति त्या महात्म्याच्या पत्नीपाशीं आला. त्या ऋषिपत्नीजवळ बृहस्पति मैथुनेच्छेनें आला असतांना तिच्या पोटांतील पंचभूतात्मक गर्भ त्याला म्हणाला कीं, “ मीं पूर्वींच या ठिकाणीं आलों आहें, तेव्हां माझ्या आईला निष्कारण त्रास देऊं नकोस.” हें ऐकून बृहस्पतीनें त्याला रागावून शाप दिला. “ मी मैथुनेच्छेनें येथें आलों असतां तूं माझें निवारण केलेंस; तेव्हां माझ्या शापामुळें तूं खात्रीनें आंधळा होशील.” त्या ऋषिश्रेष्ठाच्या शापानें तो उतथ्यपुत्र पूर्ण आंधळा झाला आणि

पुढें त्याला दीर्घतमा असें नांव पडलें. त्याला सनातन चारी वेद, सांगोपांग प्राप्त झाले व त्यानंतर त्यानें माझ्या केशव या नांवाचा यथाविधि प्रयोग केला. त्याबरोबर तो पुनः चक्षुःसंपन्न होऊन त्याची दृष्टि त्याला परत मिळाली. अशा प्रकारें हे अर्जुना, माझें केशव हें नांव मोठें वरद आहे. ऋषि व देव यांच्यांपैकीं जे कोणी केशव हें नांव उच्चारितील त्यांना हें असेंच लाभकारक होईल. अग्नि आणि सोम हे एकत्र होऊन एकरूप होतात, म्हणून हें सर्व स्थावरजंगम जगत् अग्निमय व सोममय आहे असें म्हणतात. शिवाय पुराणांतहि असें सांगितलें आहे कीं, अग्नि व सोम हे एकरूप असून देव हे अग्निमुख आहेत ते एकमेकांना पोषक होऊन समाजाची धारणा करतात. १२. ३. ३४१.

---

## अध्याय ३४२ वा.

[ अग्नि व सोम यांचें माहात्म्य ]

**अर्जुन**—अग्नि व सोम हे पूर्वीं एकाच ठिकाणाहून कसे जन्माला आले याच्याबद्दल माझ्या मनांत संशय आहे तो, हे मधुसूदना, खोडून काढ.

**श्रीभगवान्**—माझ्या स्वतःच्या तेजामुळें उत्पन्न झालेला एक जुना इतिहास मी तुला सांगतों तो तूं एकाग्रचित्तानें ऐक. चार हजार युगांचा काळ संपून प्रलयाची वेळ आली असतांना सर्व स्थावरजंगम भूतें नाहींशीं होतात व सर्व ठिकाणीं प्रलय माजून राहतो. व्यक्त सृष्टि अव्यक्तांत विरून जाते. तेज, पृथ्वी व वायू हीं नाहींशीं होऊन चोहींकडे पाणीच पाणी होऊन घनदाट अंधःकार पसरला जातो, व आप एवढें एकच अद्वितीय ब्रह्मसंज्ञक तत्त्व शिल्लक रहातें आणि नंतर त्या ठिकाणीं रात्र नाहीं, दिवस नाहीं; सत् नाहीं, असत् नाहीं; व्यक्त नाहीं, अव्यक्त नाहीं अशी स्थिति उत्पन्न होते. अशी स्थिति उत्पन्न झाल्यावर नारायणाच्या गुणप्रभावानें त्या अजरामर, इंद्रियरहित, समजण्याला कठिण, असंभाव्य, सत्य, अहिंस्र, नानाप्रकारच्या प्रवृत्तिविशेषांना उत्पन्न करणाऱ्या, निर्वैर, अक्षय, निराकार, सर्वव्यापी व सर्वकर्त्या शाश्वत अंधकारापासून अव्ययस्वरूपाचा विराट् पुरुष हरि निर्माण झाला. याला श्रुतीमध्येंहि प्रमाण आहे तें असें : सृष्टयारंभीं दिवसहि नव्हता व रात्रहि नव्हती; सतूहि नव्हतें आणि असतूहि नव्हतें; तर एकलेंएक विश्वरूपी तम सर्वांना व्यापून राहिलें होतें. हा अंधकार म्हणजे विश्वरूप नारायणाची रजनी होय असा याचा

अर्थ लावावयाचा आहे. नंतर या अंधकारापासून विराटपुरुषाची उत्पत्ति झाल्यावर त्यानें ब्रह्मदेवाला निर्माण केलें व सृष्टि उत्पन्न करण्याच्या इच्छेनें त्यानें आपल्या डोळ्यांमधून अग्नि व चंद्र यांची उत्पत्ति केली. नंतर पंचमहाभूतें उत्पन्न केल्यावर क्रमानें प्रजोत्पत्ति करितां करितां त्यानें ब्राह्मण व क्षत्रिय हे वर्ण निर्माण केले. विराट्पुरुषाच्या नेत्रांतून उत्पन्न झालेला चंद्र हेंच ब्रह्म व जें ब्रह्म तेच ब्राह्मण. त्याच्या डोळ्यांतून निर्माण झालेला अग्नि हेच क्षत्रिय होत. क्षत्रियापेक्षां ब्राह्मण अधिक सामर्थ्यवान् आहेत; कारण, लोकांमध्यें याचा प्रत्यय येतो. ब्राह्मणांच्यापेक्षां श्रेष्ठ असा कोणताहि प्राणी ब्रह्मदेवानें निर्माण केलेला नाहीं. जो ब्राह्मणाच्या मुखामध्यें आहुति घालतो त्यानें प्रज्वलित अग्नीमध्येंच आहुति घातल्याप्रमाणें आहे. आणि या समजुतीनेंच ब्रह्मदेवानें ही सृष्टि उत्पन्न केली व या भूतांची नीट प्रतिष्ठापना करून ब्रह्मदेव त्रैलोक्याचा संसार चालवीत आहे. असा मंत्रवादहि पण आहे कीं, हे अग्ने, तूं यज्ञामधला होता आहेस, सर्व देवांचें, मनुष्यांचें आणि जगताचें कल्याण करणारा आहेस. याला श्रुतीचें प्रमाण असें: हे अग्ने, तूं सर्व यज्ञाचा होता व देवांचें, मनुष्यांचें, आणि जगताचें हित साधणारा आहेस.

अग्नि हा यज्ञाचा होता आणि यज्ञकर्ता आहे. हा अग्नि हेंच ब्रह्म होय. मंत्रावांचून हवन होऊं शकत नाहीं; व पुरुषावांचून तपश्चर्या नाहीं. देव, मनुष्य आणि ऋषि यांनीं मंत्रयुक्त आहुति दिल्या म्हणजे त्यांची पूजा संपूर्ण होते, म्हणून तुला होता असें म्हणतात. मनुष्याला यज्ञासंबंधाचे जे अधिकार आहेत त्यांत दुसऱ्याकडून यज्ञ करविण्याचा अधिकार फक्त ब्राह्मणाचाच आहे, आणि क्षत्रिय व वैश्य हे द्विजाति असून सुद्धां त्यांना हा अधिकार नाहीं. म्हणून ब्राह्मण हे अग्निरूप होऊन यज्ञ करितात. ब्राह्मणांनीं केलेल्या त्या यज्ञामुळें देव संतुष्ट होतात आणि देवांच्या संतोषानें पृथ्वीचाहि संतोष होतो. ब्राह्मणग्रंथांत श्रेष्ठ मानलेल्या शतपथ ब्राह्मणामध्यें असें म्हटलें आहे कीं, जो विद्वान् ब्राह्मणाच्या मुखामध्यें आहुति टाकतो तो प्रज्वलित अग्नीमध्येंच आहुति टाकतो असें समजावें. अग्नीमध्यें आहुति टाकल्यानें ब्राह्मणाची तृप्ति होऊं शकत नाहीं; पण ब्राह्मणमुखामध्यें आहुति टाकिल्यानें अग्नीची मात्र तृप्ति होते. अशा प्रकारें अग्निरूप झालेले ब्राह्मण अग्नीची पूजा करितात. अग्निस्वरूपी विष्णु प्राणिमात्रांच्या शरीरामध्यें प्रवेश करून त्यांचे प्राण धारण करीत असतो. सनत्कुमारांनीं याच अर्थाचे श्लोक सांगितलेले आहेत. सर्वादि-

ब्रह्मदेवानें पूर्वी सृष्टि निर्माण केली त्या वेळेस ब्राह्मणांनीं वेदघोष करून निर्मल अशा स्वर्गाची प्राप्ति करून घेतली व ते अमर झाले. ब्राह्मणांच्या बुद्धीच्या, शब्दांच्या, कर्मांच्या, श्रद्धेच्या आणि तपश्चर्येच्या आधारावर स्वर्गाचा आणि भूमीचा व्यवहार चालला आहे. शिंक्यावर ज्याप्रमाणें गोरसाचे सर्व पदार्थ ठेविले जातात त्याप्रमाणेंच हा प्रकार होतो. इहपरलोकीं आपलें कल्याण व्हावें अशी ज्यांना इच्छा असेल त्यांच्या दृष्टीनें सत्यासारखा दुसरा धर्म नाहीं; मातेसारखा गुरू नाहीं; आणि ब्राह्मणापरतें श्रेष्ठ दैवत नाहीं. ज्या राजांच्या राज्यांत ब्राह्मण वृत्तिहीन राहतात त्या ठिकाणीं बैल नांगर ओढीत नाहींत; घोडे रथ ओढीत नाहींत व रवी घालून कितीहि घुसळलें तरी ताकां-तून लोणी निघत नाहीं. असल्या राजांचा नाश होऊन ते दस्यूसारख्या नीच गतीला जातात. याप्रमाणें वेद, पुराण, इतिहास यांतील प्रमाणांवरून ब्राह्मण हे नारायणाच्या मुखांतून उत्पन्न झालेले, सर्वात्मरूप, सर्वकर्ते आहेत असें ठरतें. आपल्या वाणीचा संयम करावा असा ज्या वेळीं देवदेवेश्वरांनीं निश्चय केला होता त्या वेळेस ब्राह्मण त्याच्यापासून प्रथमतः निर्माण झाले व ब्राह्मणापासून बाकीचे वर्ण उत्पन्न झाले. अशा प्रकारें देव आणि असुर ह्यांच्याहूनहि विशिष्ट असलेले असे हे ब्राह्मण मी पूर्वी स्वतः उत्पन्न केले आहेत व देव, असुर आणि महर्षि इत्यादि प्राणिविशेषांची ब्राह्मणानंतर उत्पत्ति करून मी त्यांच्या त्यांच्या अधि-कारावर ते नियुक्त केले आहेत. अहल्येचा अपमान केल्यामुळें गौतमऋषीच्या शापानें इंद्राचे केस पिंगट वर्णाचे झाले; तसेंच कौशिकऋषीच्या शापानें इंद्राचे वृषण नष्ट होऊन पुढें उःशापामुळें त्याला बोकडाचे वृषण प्राप्त झाले. ब्राह्म-णसामर्थ्याचें आणखी एक उदाहरण म्हणजे अश्विनौ देवांना यज्ञभाग घेऊं न देण्याच्या इच्छेनें इंद्रानें त्यांच्यावर वज्र उगारलें असतांना च्यवनऋषीनें त्याचे हात जागच्याजागीं खिळून धरले.

आपल्या यज्ञाचा विध्वंस झाल्यामुळें रागावलेल्या दक्षानें घोर तपश्चर्या केली आणि रुद्राच्या कपाळावर दुसरी एक नेत्रासारखी आकृति निर्माण केली; तसेंच त्रिपुरवधाकरितां कंबर कसलेल्या रुद्राच्या जटा उशना नांवाच्या ऋषीनें त्याच्या मस्तकावरून उपटून टाकल्या. त्या जटांचे सर्प झाले आणि त्या सर्पांनीं त्याच्या गळयाला उपद्रव दिल्यामुळें रुद्राचा गळा निळा झाला. पूर्वी स्वायंभुव मन्वंतरामध्यें नारायणाच्या हातानें रुद्राचा गळा दाबला गेल्यामुळें तो नीलकंठ

झाला अशीहि दुसरी एक कथा आहे. पूर्वी अमृत उत्पन्न करण्याच्या इच्छेनें पुरश्चरण करीत असतांना अंगिरा कुळांतील बृहस्पतीनें उदकाला स्पर्श केला पण त्यानें स्पर्श करूनहि उदक स्वच्छ झालें नाहीं. म्हणून बृहस्पति पाण्यावर रागावला आणि त्यानें उदकाला शाप दिला कीं ज्या अर्थी माझ्या स्पर्शानें हें उदक स्वच्छ न होतां गढूळ झालें त्या अर्थी आजपासून मासे, सुसरी, कांसवें इत्यादिकांनीं हें नेहमींच गढूळ होत राहील. त्या दिवसापासून उदक हें जलचरांनीं व्याप्त होऊं लागलें. विश्वरूप नांवाचा त्वष्ट्याचा पुत्र हा देवांचा पुरोहित होता. हा राक्षसांचा भाचा; हा यज्ञांतील हविर्भाग देवांना प्रत्यक्ष रीतीनें पोहोंचवी व राक्षसांना अपरोक्ष रीतीनें पोहोंचवीत असे. एक दिवस हिरण्यकशिपूला पुढें घालून सर्व राक्षस विश्वरूपाच्या आईकडे म्हणजे आपल्या बहिणीकडे जाऊन तिजजवळ त्यांनीं वर मागितला कीं, "हे भगिनि, त्वष्ट्याचा पुत्र त्रिशिरा विश्वरूप हा देवांचा पुरोहित आहे आणि हा देवांना यज्ञभाग प्रत्यक्ष देतो व आमच्याकडे परोक्ष रीतीनें पाठवितो. त्यामुळें देवांचें बलसंवर्धन होतें आणि आम्ही मात्र क्षीण होत जातों. तेव्हां तूं आपल्या पुत्राचें निवारण कर व त्याचें लक्ष आमच्याकडे जाईल असें कर." नंतर तो विश्वरूप नंदनवनांत आला असतांना त्याची आई त्याला म्हणते कीं, "तूं शत्रूचें सामर्थ्य वाढविण्याचे उद्योग करून आपल्या मामाचा पक्ष दुर्बल करीत आहेस, हें काय म्हणून? असें करणें तुला योग्य नाहीं." तेव्हां आईची आज्ञा उल्लंघन करणें योग्य नव्हे असें म्हणून त्यानें तिच्या वाक्याचा आदर केला आणि तो हिरण्यकशिपूकडे आला. हिरण्यकशिपूला हिरण्यगर्भाचा पुत्र वसिष्ठ यानें असा शाप दिला होता कीं, "ज्या अर्थी तूं मला सोडून दुसऱ्याला यज्ञाचें पुरोहितत्व दिलेंस त्या अर्थी तुझा यज्ञ शेवटाला जाणार नाहीं आणि अत्यंत अपूर्व अशा प्राण्याच्या हातून तुला मृत्यु येईल." या शापामुळें हिरण्यकशिपूला मरण प्राप्त झालें. इकडे विश्वरूपानें आपल्या मामाच्या पक्षाचें सामर्थ्य वाढावें म्हणून बिकट तपश्चर्या चालविली. त्याच्या व्रताचा भंग करण्यासाठीं त्यानें अनेक सुंदर सुंदर अप्सरा त्याच्याकडे पाठविल्या. त्या अप्सरा पाहून विश्वरूपाचें चित्त चंचल झालें व तो त्यांच्या ठिकाणीं लवकरच आसक्त झाला. त्याचें चित्त आपणावर जडलें आहे असें पाहून त्या अप्सरा त्याला म्हणाल्या कीं, "आम्ही आलों तशा निघून जातों." त्यावर तो विश्वरूप म्हणतो कीं, "तुम्ही कोठें चाललांत? येथेंच बसा. माझ्या सहवासांत तुमचें कल्याण होईल." तेव्हां त्या अप्सरा त्याला म्हणतात

कीं "आम्ही देवस्त्रिया अप्सरा असून अत्यंत प्रभावशाली व वरद असा जो इंद्र त्याच्या सहवासाची इच्छा धरीत असतों."

त्या अप्सरांचें हें भाषण ऐकतांच तो विश्वरूप म्हणाला कीं, "आतांच इंद्रासकट सगळ्या देवांना होते कीं नव्हते करून टाकितों." असें म्हणून त्यानें मंत्र जपावयास सुरवात केली व त्या मंत्रांच्या सामर्थ्यानें त्यानें आपलें रूप अतिशय मोठें केलें. त्या त्रिशिरानें एका तोंडानें त्रैलोक्यांतील कर्मठ ब्राह्मणांनीं यज्ञवेदीमध्यें घातलेला सोमरस सगळाच पिऊन टाकला; दुसऱ्या तोंडानें अन्न खाऊन टाकलें; आणि तिसऱ्या तोंडानें इंद्रासकट सर्व देवांना खाण्याचा उद्योग चालविला. त्या विश्वरूपाचें वाढतें तेज पाहून व सोमरस प्याल्यामुळें त्याचीं गात्रें पुष्ट झालीं आहेत असें पाहून, इंद्राला आणि सर्व देवांना मोठी चिंता पडली. अखेर ते सगळे मिळून ब्रह्मदेवाकडे गेले आणि त्याला म्हणतात कीं "हा विश्वरूप यज्ञामध्यें विधियुक्त रीतीनें घातलेला सोमरस सर्वच पिऊन टाकतो, त्यामुळें आम्हांला आमचा हविर्भाग मिळत नाहीं व राक्षसांचें बल वाढत असून आम्ही मात्र क्षीण होत चाललों आहोंत; तेव्हां आमचें कल्याण ज्यानें साधेल ती गोष्ट आपण करावी." नंतर ब्रह्मदेव त्यांना म्हणाला कीं, "भृगुकुलोत्पन्न दधीचि ऋषि तपश्चर्या करीत आहे. त्याच्याजवळ जाऊन तुम्ही देहत्यागाचा वर मागा व नंतर त्याच्या अस्थि घेऊन त्यांचें वज्र करा." पुढें सर्व देव भगवान् दधीचि ऋषि तपश्चर्या करीत होते त्या ठिकाणीं गेले व इंद्रासहवर्तमान सर्व देवांनीं त्या ऋषींना "आपलें तप सुव्यवस्थित रीतीनें अखंड चाललें आहे ना?" असा प्रश्न विचारिला. दधीचि ऋषींनीं त्यांचें स्वागत करून त्यांना विचारिलें कीं, "हे देवहो, तुमच्याकरितां मी काय करूं तें सांगा. तुम्ही म्हणाल त्याप्रमाणें मी करीन." ते देव त्यांना म्हणतात, "भगवन्, आपण लोकहितासाठीं देहत्याग करा." तें ऐकून सुखदुःख सारखें मानणाऱ्या त्या महायोगी दधीचि ऋषीच्या चित्ताचा मुळींच प्रक्षोभ झाला नाहीं; व त्यांनीं आत्मा ब्रह्मांडीं नेऊन शरीराचा त्याच ठिकाणीं त्याग केला. दधीचि ऋषीचे प्राण निघून गेले असें पाहून ब्रह्मदेवानें त्या अस्थि गोळा करून त्यांचें वज्र बनविलें. ब्राह्मणाच्या अस्थीपासून उत्पन्न झालेल्या त्या अभंग आणि दुर्जय अशा वज्रांत विष्णूनें आपलें तेज ठेविलें व तें वज्र घेऊन इंद्रानें विश्वरूपाला मारून त्याच्या मस्तकाचा चुराडा केला. पुढें विश्वरूपाच्या गात्रांचें मन्थन करून त्वष्ट्यानें वृत्राची उत्पत्ति केली. या वृत्रालाहि पण पुढें इंद्रानें मारिलें. असली

दोन प्रकारची ब्रह्महत्या पाठीस लागल्यामुळें इंद्रानें भीतीनें देवराज्याचा त्याग केला आणि मानससरोवरामधील पाण्यांत निर्माण झालेल्या शीतल नलिनींत त्यानें प्रवेश केला आणि तेथें आपल्या सामर्थ्याच्या योगानें अणुमात्र होऊन तो त्या कमळाच्या एका तंतूमध्यें प्रविष्ट होऊन राहिला. ब्रह्महत्येच्या भयानें त्रैलोक्याचा राजा इंद्र नाहींसा झालेला पाहून सर्व जग अनाथ झालें, आणि देव रजोगुणानें व तमोगुणानें व्याप्त झाले. महर्षींच्या मंत्रांचा उपयोग होईनासा झाला, जिकडे तिकडे राक्षसांचा प्रादुर्भाव होऊन वेदविद्या नष्ट झाली व इंद्रावांचून उघडे पडलेले सर्व लोक दुर्बल झाले. अशी स्थिति आल्यानंतर देवांनीं आणि ऋषींनीं मिळून आयुराजाचा पुत्र नहुष याला स्वर्गाच्या गादीवर बसविलें. सगळ्यांचें तेज हरण करणारीं अशीं पांचशें नक्षत्रें त्याच्या कपाळावर चमकत होतीं. त्यामुळें त्यानें स्वर्गाचें पालन केलें. तेव्हां, लोकव्यवहाराची घडी पुनः पूर्वींसारखी बसली व ते लोक शांत आणि आनंदी झाले. एक दिवस तो नहुपराजा सर्वांना म्हणाला, "इंद्राचें सर्वस्व मजकडे आलें पण इंद्राणी मात्र आली नाहीं." असें म्हणून तो इंद्राणीकडे जाऊन म्हणाला, "हे सुभगे, मी देवांचा इंद्र आहें तेव्हां तूं माझी सेवा कर." त्यानंतर ती शची त्याला म्हणते, "हे राजा, तूं सोमवंशांत उत्पन्न झाला असून स्वभावानें धर्मवत्सल आहेस, तेव्हां परस्त्रीचा अभिलाष धरणें हें तुला योग्य नव्हे." त्यावर तो नहुष राजा तिला म्हणतो कीं, "मी इंद्राच्या पदावर बसलेला आहें व इंद्राचें श्रेष्ठ असें राज्य मी चालवीत असून इंद्रानें भोगलेल्या शचीचा सहवास करण्यांत माझ्या हातून कोणताच अधर्म होणार नाहीं." त्यावर ती शची त्याला म्हणाली, "मी घेतलेलें कांहीं व्रत अद्याप अपूर्ण राहिलें आहे, तें संपलें म्हणजे मी कांहीं दिवसांनीं तुजकडे येईन." शचीचें हें भाषण ऐकून नहुष निघून गेला.

नंतर दुःखानें पीडिलेली व नहुपाच्या भयानें गांजलेली शची नवऱ्याच्या दर्शनाची इच्छा धरून बृहस्पतीकडे गेली. शची अत्यंत उद्विग्न झालेली आहे असें पाहून व आपल्या नवऱ्याचें कार्य करण्यासाठीं ही अत्यंत उत्सुक झाली आहे, असें अंतर्ज्ञानानें जाणून बृहस्पति तिला म्हणतात, "याच तुझ्या तपाचरणाच्या सामर्थ्यावर वरदायिनी उपश्रुति देवीला तूं हांक मार, म्हणजे ती तुला इंद्राचें दर्शन करवील." त्याप्रमाणें अत्यंत कडकडीत तपश्चर्या करून शचीनें वरदायिनी उपश्रुति देवीचें मंत्रांनीं आवाहन केलें. त्याबरोबर ती उपश्रुति देवी इंद्राणीच्या समीप येऊन म्हणाली कीं, "ही मी तुजकडे तुझ्या बोलावण्या-

वरून आलें. तुझें काय कल्याण करूं तें सांग." नंतर तिच्यापुढें मस्तक नम्र करून शची तिला म्हणाली कीं, "भगवति, तूं जर खरी सत्यरूप आणि ऋतरूप असशील तर माझ्या पतीचें दर्शन मला घडव." नंतर उपश्रुतीनें शचीला मानससरोवरावर नेलें व तेथें कमलनालाच्या तंतूमध्यें प्रविष्ट होऊन राहिलेल्या इंद्राचें तिला दर्शन करविलें. ती आपली पत्नी कृश व म्लान झालेली पाहून इंद्राच्या मनांत विचार आला कीं, "अशा तऱ्हेच्या दुःखद स्थितीला पावलेल्या आणि जवळ जवळ नष्ट झालेल्या, माझा शोध करीत करीत ही येथें आली, हें केवढें आश्चर्य?" नंतर आपली पत्नी शोकाकुल होऊन आपणाकडे आली हें पाहून इंद्रानें तिला तिचें कुशल विचारिलें. त्यावर ती इंद्राला म्हणाली कीं, "नहुष राजा मला आपली पत्नी होण्यास सांगत आहे व त्याला मी कांहीं कालाची मुदत दिली आहे." त्यावर इंद्र तिला म्हणाला कीं, "तूं नहुषाकडे जा, आणि ऋषींनीं वाहून आणलेल्या अपूर्व स्वरूपाच्या वाहनांत बसून तूं मजकडे ये. इंद्राच्या राज्यांत माझ्या आवडीच्या अनेक वाहनांतून मी बसलेली आहें तेव्हां त्यांच्याखेरीज निराळ्या वाहनांतून बसून तूं मजकडे यावेंस अशी माझी इच्छा आहे असें त्याला सांग." इंद्राचें हें भाषण ऐकून शचीला अत्यंत आनंद झाला व ती आपल्या ठिकाणीं गेली. इंद्रानेंहि पण परत कमळाच्या तंतूमध्यें प्रवेश केला. इंद्राणी परत आलेली पाहून नहुषानें तिला आपली मुदत पूर्ण झाल्याची आठवण दिली. त्यावर शचीनें इंद्रानें सांगितल्याप्रमाणें त्याला सांगितलें. तें ऐकून नहुष राजा ऋषींनीं वाहून नेलेल्या वाहनांत बसून शचीकडे आला. मग कुंभयोनि अगस्तिऋषीनें नहुषाला महर्षींचा धिक्कार करतांना पाहिलें व त्यानें त्याला पायानें स्पर्शहि केला. नंतर तो नहुषाला म्हणाला कीं "वाईट काम करण्यास प्रवृत्त झालेल्या प्राण्या, जा, पृथ्वीवर जाऊन पड, आणि सरड्याचें रूप धारण करून पृथ्वी आणि पर्वत हे जेथपर्यंत उभे आहेत तेथपर्यंत तसाच रहा." त्या ऋषीचे हे शब्द संपतात न संपतात तोंच नहुष राजा वाहनांतून खालीं पडला. याप्रमाणें त्रैलोक्य पुनः अनाथ झालेलें पाहून सगळे देव व ऋषि भगवान् विष्णूला, इंद्राकरितां म्हणून, शरण गेले आणि त्याला म्हणतात "भगवन्, ब्रह्महत्येनें पछाडलेल्या इंद्राला आपण सोडवा." तेव्हां त्या वरद विष्णूनें इंद्राला वैष्णव अश्वमेध यज्ञ करण्यास सांगितलें व त्या अश्वमेध यज्ञानें परत स्वर्गप्राप्ति तुला होईल असें त्याला आश्वासन दिलें. पुढें देवांना आणि ऋषींना इंद्र कोठें सांपडेना, म्हणून ते शचीकडे गेले आणि त्यांनीं तिला इंद्राला घेऊन येण्याबद्दल

सांगितलें. त्यावरून शची पुनः त्या सरोवरावर गेली आणि इंद्रहि पण त्या तळ्यांतून बाहेर येऊन तिजबरोबर बृहस्पतीकडे आला. बृहस्पतीनें त्याच्याकडून अश्वमेध नांवाचा महायज्ञ करविला. त्या यज्ञामध्यें एक यज्ञीय अश्व सोडून आणि त्याचाच वाहन म्हणून उपयोग करून बृहस्पतीनें इंद्राला परत आपल्या ठिकाणीं आणलें. नंतर स्वर्गांत आल्यावर देवांनीं आणि ऋषींनीं त्या इंद्राची स्तुति केली व तो निष्कल्मष झाला. पुढें त्यानें ब्रह्महत्येची स्त्रिया, अग्नि, वनस्पति आणि गाई अशा चार ठिकाणीं वांटणी करून दिली. ब्राह्मणांच्या प्रसादानें त्याचें सामर्थ्य वाढत जाऊन त्यानें आपल्या शत्रूंचा वध केला, व तो आपल्या आसनावर स्थिर झाला.

आकाशगंगेवर जाऊन पूर्वीं महर्षि भरद्वाजानें जलाचें उपस्पर्शन केलें. तेव्हां तीन पावलांनीं त्रैलोक्याचें आक्रमण करणाऱ्या विष्णूनें त्यांच्यावर हल्ला केला. त्यावरून रागावून भरद्वाजानें हातांत पाणी घेऊन तसेंच विष्णूच्या छातीवर मारिलें. त्या वेळेपासून विष्णूच्या छातीवर त्याचीं चिन्हें अद्याप आहेत. महर्षि भृगूच्या शापानें अग्नि हा सर्वभक्षक झाला आहे.

पूर्वीं अदिति देवांसाठीं अन्न शिजवीत असे. तिचा हेतु असा कीं, देवांनीं तें अन्न खाऊन असुरांचा वध करावा. एक दिवस बुध आपलें व्रत संपवून अदितीकडे आला आणि तिच्याकडे येऊन त्यानें तिजजवळ भिक्षा मागितली; तेव्हां हें अन्न देवांनीं प्रथम भक्षण करावयाचें आहे, त्यांच्या अगोदर तें कोणालाहि द्यावयाचें नाहीं, असें अदितीनें त्याला सांगितलें. भिक्षा न घातल्यामुळें बुधानें अदितीला शाप दिला कीं, "तुझ्या पोटांतून विवस्वान् अंड्याच्या रूपानें पुनः जन्माला येईल त्यावेळीं तुझ्या उदरामध्यें व्यथा उत्पन्न होईल. पुढें विवस्वान् अंडरूपानें जन्माला आल्यानंतर आदितीनें तें अंडें फोडलें. हा मार्तंड विवस्वान् हाच श्राद्धदेव यम होय. दक्षप्रजापतीला साठ मुली होत्या; त्यांतल्या तेरा त्यानें कश्यपाला दिल्या, दहा धर्माला दिल्या; दहा मनूला दिल्या व उरलेल्या सत्तावीस चंद्राला दिल्या. चंद्राला दिलेल्या सत्तावीस कन्या हींच सत्तावीस नक्षत्रें होत. यांच्यांपैकीं सगळ्याच सारख्या असतांना चंद्र रोहिणीवर मात्र विशेष प्रेम दाखवूं लागला त्यामुळें बाकीच्या पत्न्यांना मत्सर वाटून त्यांनीं बापाला सर्व हकीगत सांगितली व त्याला म्हणाल्या कीं, "चंद्राला आम्हीं सगळ्या सारख्याच असतांना तो रोहिणीवर अधिक प्रेम दाखवितो." दक्ष म्हणाला, "चंद्राच्या या

कृतीनें चंद्राला क्षय लागेल. तेव्हांपासून दक्षशापामुळें चंद्राला क्षय लागला. क्षयरोगानें पछाडल्यावर सोम दक्षाकडे आला आणि त्याला म्हणतो कीं, " तूं केलेंस हें बरोबर नव्हे. तेव्हां तेथील ऋषींनीं सोमाला सांगितलें कीं, " तुला क्षयरोग लागला आहे तर तूं पश्चिमसमुद्रावर जा व तेथें हिरण्यसर नांवाचें तीर्थ आहे त्या ठिकाणीं त्या तीर्थांत जाऊन स्नान कर.' त्यांच्या सांगण्यावरून चंद्रानें त्या तीर्थावर जाऊन स्नान केलें व स्वतःची पापापासून मुक्तता करून घेतली. चंद्रानें त्या तीर्थांत स्नान केल्यापासून त्याचें तेज वाढलें म्हणून त्या तीर्थाला 'प्रभास' असें नांव पडलें. त्या दक्षाच्या शापामुळें चंद्र अद्यापि पौर्णिमेपासून अमावास्येपर्यंत कमाक्रमानें क्षीण होत जातो व पौर्णिमेच्या दिवशींच पूर्ण बिंबानें युक्त होतो. शिवाय त्याच्या शरीरावर मेघासारखे काळे डाग उत्पन्न झाले असून त्यांना शशलक्ष्म असें म्हणतात.

स्थूलशिरा नांवाच्या महर्षीनें मेरूपर्वताच्या ईशान्य टोंकाला जाऊन तपश्चर्या केली. त्या ठिकाणीं तो तपश्चर्या करीत असतांना सर्वगंधवह असा पवित्र व शीतल वायु त्याच्या शरीराला येऊन स्पर्श करूं लागला. तपश्चर्येच्या श्रमानें त्या महर्षीचें शरीर आधींच संतप्त झालेलें होतें. तेव्हां शरीराचा संताप घालविणारा हा वायु त्याच्या अंगावरून जातांच त्याला संतोष झाला. या वाऱ्याच्या योगानें याचा संतोष झाला असतांना झाडांनाहि एकदम फळेंफुलें आलीं. तीं पाहून "तुम्हांला सर्व ऋतूंमध्यें फुलें येणार नाहींत" असा त्या स्थूलशिरा ऋषीनें झाडांना शाप दिला. पूर्वी एकदां नारायणानें लोकहित साधण्यासाठीं वडवामुख नांवाचा अवतार घेतला होता. हा महर्षि तपश्चर्या करीत असतांना त्यानें समुद्राला हाक मारिली पण तो गेला नाहीं. तेव्हां रागावून जाऊन या वडवामुख ऋषीनें स्वतःच्या अंगांतील ऊष्णतेनें समुद्राचें पाणी थोपवून धरलें व त्याच्या अंगीं घामाच्या बिंदूप्रमाणें खारटपणा निर्माण केला आणि त्याला सांगितलें कीं, तुझें पाणी आजपासून कोणी पिणार नाहीं व भक्त वडवामुखानें हें पाणी घेतलें असतांना तेवढें पाणी मधुर राहील. तेव्हांपासून आतांपर्यंत वडवामुख समुद्राचें पाणी शोपून घेत आहे.

हिमालय पर्वताची कन्या—उमा हिला रुद्रानें अगोदर मागणी घातली असतांना महर्षि भृगु हिमालयाकडे येऊन त्याला म्हणाला कीं, "ही कन्या मला दे." तेव्हां हिमालय पर्वत त्याला म्हणतो कीं, "या कन्येला रुद्र हा वर पूर्वीच

योजून ठेविला आहे.” त्यावर भृगु म्हणतो कीं, “तुझ्या कन्येला मागणी घालण्याच्या उद्देशानें मी येथें आलों असतांना तूं माझा धिक्कार केलास त्याअर्थी तुझ्या ठिकाणचीं सर्व रत्नें नाहींशीं होतील.” त्या ऋषिवचनाचा परिणाम जशाचा तसा कायम दिसत आहे. ब्राह्मणांचें माहात्म्य हें असें आहे. क्षत्रियांना सुद्धां ब्राह्मणांच्या प्रसादामुळेंच शाश्वत आणि अव्यय अशा पृथ्वीचें राज्य मिळालें. म्हणून हे राजा, ब्राह्मण आणि क्षत्रिय यांच्या ठिकाणीं अग्नि व सोम यांचें जें तेज आहे त्या तेजानें आज हें जग चाललें आहे. सूर्य व चंद्र हे ह्या विराट्पुरुषाचे डोळे, व यांचे किरण हे केश होत. जगताला आनंद देणारें तें याचें चंद्ररूप होय व तापवून सोडणारें तें याचें सूर्यरूप होय. या दोन्ही रूपांनीं हा जगताचें पोषण करीत असतो. हे पांडुनंदना, सूर्य आणि चंद्र यांच्या हातून हीं जीं बोधनाचीं आणि तापनाचीं कर्मैं घडतात त्यांच्यामुळें जगताला आनंद होतो व त्यामुळें त्यांनाहि आनंद होतो. असले हे हृषी चंद्रसूर्य माझे केश म्हणजे किरण होत. म्हणून मला लोकांचें कल्याण करणारा व लोकशास्ता असा हृषीकेश म्हणतात.

“इळोपहूता” या मंत्रानें माझें आवाहन केल्यानंतर मी यज्ञभागाचें हरण करतों म्हणून मला हरी म्हणतात, व माझा रंगहि हिरवा म्हणूनहि मला हरी असें नांव देण्यांत येतें. लोकांच्यामध्यें परम श्रेष्ठ व अत्यंत महत्वाचें असें जें सार त्याला धाम अशी संज्ञा आहे. माझें सामर्थ्य ( धाम ) हें ऋत ( अबाधित ) असल्यामुळें ऋषिजन मला ऋतधामा, असें म्हणतात. पूर्वीं गुहांच्या उदरामध्यें दडून बसलेली पृथ्वी मी बाहेर काढली म्हणून देव आपल्या वाणीनें माझी ‘गोविंद’ या नावानें स्तुति करूं लागले. मला ‘शिपिविष्ट’ असेंहि म्हणतात. ज्याच्या सर्व अवयवांवरचे केस गळून पडले आहेत त्याला शिपि असें म्हणतात. व अशा निष्फल शिपिरूपानें मी जगताला वेढलें म्हणून मला शिपिविष्ट म्हणतात. यास्क ऋषींनीं अनेक प्रकारच्या यज्ञांमध्यें शिपिविष्ट या नांवांनीं माझें स्तवन केलें आहे, म्हणून, मी तें गुह्य नांव पत्करलें आहे. शिपिविष्ट या नांवानें माझी स्तुति केल्यामुळें माझ्या प्रसादानें पाताळांत गेलेलें निरुक्त नांवाचें वेदांग यास्कानें पुन्हां प्रकट केलें. मी यापूर्वीं कधीं जन्माला आलों नाहीं; पुढें येणार नाहीं व आजही मला जन्म नाहीं. प्राणिमात्रांच्या ठिकाणीं मी क्षेत्रज्ञ रूपानें स्थित आहें. म्हणून मला अज म्हणतात. मी यापूर्वीं ग्राम्य किंवा अश्लील भाषण केलें नाहीं. ब्रह्मदेवाची कन्या जी ऋता व सत्या देवी सरस्वती ती मजजवळ नेहमीं असते. सत् आणि असत् या दोहोंचाहि समावेश मीं सत् स्वरूप असणाऱ्या कम-

त्याचे ठिकाणीं म्हणजे ब्रह्मदेवाचे उत्पत्तिस्थानीं केला असल्यानें ऋषिजन मला सत्य असें म्हणतात. मी पूर्वी सत्त्वापासून कधींहि ढळलों नाहीं. किंबहुना सत्त्व हें मींच निर्माण केलेलें आहे. या जन्माच्या ठिकाणीं जें सत्व माझ्या ठिकाणीं आहे तें मींच पूर्वजन्मीं उत्पन्न केलेलें सत्त्व होय. कोणत्याहि प्रकारची आशा न ठेवतांना मी माझीं कर्में करितों व सात्विकपणानें सर्व कर्में करीत असल्यानें मला कोणताहि दोष लागत नाहीं. सात्वतांचें म्हणजे पंचरात्रमार्गाचें ज्ञान मला झालें आहे. या दृष्टीनें—सात्वतांचा तो सात्वत या न्यायानें—मला 'सात्वत' म्हणतात. हे पार्था, नांगराचा लोखंडी फाळ होऊन मी जमीन नांगरतों म्हणून मला 'कार्ष्णायस' म्हणतात व माझा रंग काळा आहे म्हणून मला 'कृष्ण' म्हणतात. मी भूमीची जलाशीं सांगड घातली; आकाश व वायू हीं तत्त्वें एके ठिकाणीं आणलीं आणि वायु व तेज यांचा मिलाफ करून दिला म्हणून मला 'वैकुंठ' असें म्हणतात. परब्रह्म हेंच परम श्रेष्ठ निर्वाण होय; तोच परम श्रेष्ठ असा धर्म होय. या धर्मापासून मी पूर्वी कधींहि च्युत झालों नाहीं. म्हणून मला 'अच्युत' असें म्हणतात. पृथ्वी व आकाश हीं दोन्हीं सर्वव्यापी आहेत, हें प्रसिद्धच आहे. त्यांना आधार देणारा मी म्हणून मला 'अधोक्षज' असें नांव देतात. वेदांतील शब्दांच्या अर्थांचा विचार करणारे जे वेदवेत्ते ब्राह्मण आहेत त्यांनीं अधोक्षज या शब्दांनीं यज्ञशाळेमध्यें माझें स्तवन केलें आहे. मोठमोठे ऋषि नारायणप्रभूशिवाय अधोक्षज ही पदवी कोणालाहि द्यावयाची नाहीं अशी माझी स्तुति गातात. या जगामध्यें माझ्या घृतरूप ज्वाला प्राण्यांचें पोषण करितात म्हणून अव्यग्र वेदवेत्ते लोक "घृतार्चिः" या नांवानें माझी स्तुति करितात. मनुष्यप्राण्याच्या शरीरामध्यें पित्त, श्लेष्मा व वायु असे तीन धातु आहेत. या तीन धातूंमुळें प्राण्यांचें पोषण होतें व हे क्षीण झाले म्हणजे शरीर क्षीण होतें. आयुर्वेदवेत्ते पुरुष या कारणासाठीं मला 'त्रिधातु' असें म्हणतात. निघंटूंतील शब्दांचें विवरण करतांना भगवान् धर्माला 'वृष' असें म्हटलें आहे, म्हणून मला 'वृष' असेंहि म्हणतात. कपि हा श्रेष्ठ वराह व धर्म हा वृष म्हणून मला कश्यप प्रजापतीनें 'वृषाकपि' असें नांव दिलें आहे. माझा आदि, मध्य आणि अन्त यांचा देव आणि राक्षस यांनासुद्धां पत्ता लागत नाहीं म्हणून मला अनादि, अमध्य, अनन्त, लोकसाक्षी, सर्वव्यापी परमेश्वर' असें म्हणतात. मी पवित्र तेवढ्याच गोष्टी आपल्या कानावर येऊं देतों आणि पापी गोष्टींचा उच्चारहि करीत नाहीं म्हणून हे धनंजया, मला 'शुचिश्रवा' असें नांव दिलें

आहे. पूर्वी मी एक शिंगाच्या वराहाचा अवतार घेऊन सर्व पृथ्वीचा उद्धार केला म्हणून मला 'एकशृंग' असें म्हणतात. मी वराहाचें रूप धारण केलें त्या वेळेस मला तीन ककुदें म्हणजे वशिंडें होतीं म्हणून शरीराच्या मापावरून मला 'त्रिककुद' असें नांव पडलें. सांख्यमार्गांतील ज्ञानी पुरुषानें ज्याला 'विरिंच' असें नांव ठेविलें, तो मींच. सर्व लोकांच्यामध्यें चैतन्य उत्पन्न करणारा प्रजापति तो मींच होय. परमतत्व निश्चयानें जाणणारे सांख्यवेत्ते पुरुष, आदित्याच्या ठिकाणीं असलेलें सनातन व विद्येनें युक्त असें सूर्याच्या ठिकाणचें तेज म्हणजे कपिल ऋषि तें मींच असें म्हणतात. तेजस्वी हिरण्यगर्भ म्हणून ज्याची वेदामध्यें स्तुति केली जाते व योगमार्गी लोक नित्य ज्याचें पूजन करितात, तोच मी या पृथ्वीवरचा हिरण्यगर्भ होय. एकवीस हजार ऋचांचा ऋग्वेद मीच; हजार शाखांचा सामवेद मीच; माझे एकान्तिक भक्त, अत्यंत दुर्लभ असलेले ब्राह्मण ज्याचें स्तोत्र गातात तोहि मीच. छप्पन्न, आठ, आणि सदतीस अशा मिळून १२१ शाखा ज्यामध्यें आहेत असला कर्मकांडप्रधान यजुर्वेदहि मीच होय. कृत्यांनीं वाढविलेल्या पांच कल्पांच्या अथर्ववेदाच्या द्वारें अथर्ववेद जाणणारे पुरुष माझीच स्तुति करितात. पृथ्वीवर जे नाना प्रकारचे शाखाभेद आहेत, या शाखांच्यामधून ज्या नानाप्रकारच्या गीति व जे स्वरांच्या आणि वर्णांच्या प्रकारांचे उच्चार आहेत, ते सर्व मी केलेले आहेत. हे पार्था, घोड्याच्या तोंडाचा वरप्रद असा जो अवतार तो मीच. वेदामध्यें जे क्रम, अक्षर इत्यादि भाग कल्पिले आहेत ते मीच होय. माझ्या प्रसादामुळें पांचालाला, वामदेवानें सांगितलेल्या भक्तिमार्गानें गेल्यामुळें क्रमशास्त्राचें उत्तम ज्ञान झालें व बाभ्रव्य गोत्रांतला पहिला क्रमशास्त्रज्ञ म्हणून त्याची प्रसिद्धि झाली. नारायणापासून वर मिळाल्यामुळें योगशास्त्रांत पारंगत होऊन त्या बाभ्रव्य कुळांतील गालवानें 'क्रम व शिक्षा' या शास्त्रावर ग्रंथ लिहिले. पुढें कंडरीक कुळांतला ब्रह्मदत्त नांवाचा राजा सप्तजन्मांतील जन्ममरणाचें दुःख आठवून अतिशय दुःखित झाला व योगी लोकांचें ऐश्वर्य त्याला वैराग्यामुळें प्राप्त झालें. हे पार्था, पूर्वी कांहीं कारणानें मला धर्माच्या पोटीं जन्म घ्यावा लागला म्हणून मला 'धर्मज' असें म्हणतात.

पूर्वी नर व नारायण या दोघांनीं अत्यंत दृढ अशी तपश्चर्या केली व त्या वेळेस ते गंधमादन पर्वतावर सोन्याच्या धर्मयानामध्यें बसलेले होते. त्यावेळेस दक्षाच्या येथें यज्ञ चालला असून त्यानें रुद्राच्या नांवानें यज्ञांत हविर्भाग दिला

नाहीं; म्हणून, दधीचि ऋषीच्या सांगण्यावरून रुद्रानें दक्षयज्ञाचा विध्वंस केला. रुद्रानें आपल्या कोपापासून अत्यंत तेजस्वी असा शूल निर्माण केला. त्या शूलानें सगळया दक्षयज्ञाचा विध्वंस केल्यानंतर तो बद्रिकाश्रमामध्यें आम्ही होतों तेथें आला आणि मोठ्या वेगानें नारायणाच्या छातीवर येऊन आदळला. त्या शूलाच्या तेजाशीं संलग्न झाल्यामुळें नारायणाचे केश मुंजवर्ण झाले. म्हणून मला 'मुंजकेश' असें म्हणतात. महात्म्या नारायणानें नुसत्या हुंकारानें तो शूल परतवला आणि त्यानें परतवलेला तो शूल शंकराच्या हातांमध्यें परत आला. तेव्हां त्या नरनारायण ऋषींकडे रुद्र धांवतच झाला. त्याला धांवत येतांना पाहून विश्वात्म्या नारायणानें त्याच्या गळयाला मिठी घातली म्हणून रुद्राला 'शितिकण्ठ' किंवा 'नीलकण्ठ' असें म्हणतात. त्या नरनारायणांपैकीं नरानें रुद्राचा नाश करण्याच्या हेतूनें एक इषीका उपटली. तिचें त्यानें अभिमंत्रण केलें. त्याबरोबर त्या इषीकेचा परशु झाला. तो महान् परशु रुद्राच्या आंगावर टाकला असतांना तो मोडला गेला. त्यांतून माझ्या परशूचें खण्डन झाल्यानें मला 'खंडपरशु' असें म्हणतात. अर्जुन विचारितो, "हे वार्ष्णेया, त्रैलोक्याचा नाश करणाऱ्या त्या युद्धामध्यें कोणाला जय मिळाला तें मला सांगा.

भगवान्—त्या रुद्रनारायणांचें युद्ध चाललें असतांना सर्व लोक उद्विग्न झाले. यज्ञामध्यें विध्युक्तरीत्या टाकलेल्या आहुति अग्नीपर्यंत पोहोंचेनाशा झाल्या. वेदांचें तेज मावळलें व विद्वान् ऋषींनाहि वेदांची उपस्थिति राहिली नाहीं. रजोगुणानें व तमोगुणानें देवांच्या शरीरांत प्रवेश केला. पृथ्वी कांपूं लागली; आकाश कोसळतें कीं काय असें वाटूं लागलें; नक्षत्रें निस्तेज झालीं. ब्रह्मदेवाचें आसन ढळलें; समुद्र आटला व हिमालय कोसळतो कीं काय, अशी भीति वाटूं लागली. हे पांडुनंदना अशा प्रकारचीं चिन्हें दिसूं लागल्यानंतर देव आणि मोठमोठे ऋषि यांच्यासहवर्तमान ब्रह्मदेव युद्ध चाललेल्या ठिकाणीं आले व हात जोडून रुद्राला म्हणतात, "हे रुद्रा, लोकांचें कल्याण होऊं द्या व हे विश्वेशा, जगताचें हित करण्याच्या उद्देशानें आपलीं अस्त्रें खालीं ठेवा. लोकांमध्यें चैतन्य उत्पन्न करणारें अक्षर, अव्यय, कूटस्थ, निर्द्वंद्व असलें जें तत्त्व तें नरनारायणांच्या रूपानें प्रगट झालें आहे. नर व नारायण हे धर्माच्या कुळामध्यें उत्पन्न झालेले ऋषि. हे दोघे मिळून त्या अव्यक्त तत्वाची व्यक्तमूर्ति होत. हे नरनारायण फार मोठे तपस्वी आहेत. पूर्वीं सृष्ट्युत्पत्तीच्या वेळीं या नरनारायणांनीं आपल्या प्रसादापासून माझी निर्मिति केली व हे रुद्रा, क्रोधापासून तुमची निर्मिति केली.

तेव्हां, आपण आपला क्रोध आवरा व लोकांमध्यें शांतता नांदेल असें करा. ब्रह्म-देवानें सांगितल्यावर रुद्रानें आपला क्रोध टाकला आणि नारायण प्रभूला प्रसन्न करून त्या वरद देवश्रेष्ठाला तो शरण गेला. नंतर तो जितक्रोध व जितेंद्रिय नारायण प्रभु संतुष्ट झाला व रुद्राशीं एकरूप होऊन गेला. ब्रह्मदेव देव आणि ऋषि यांनीं त्या नारायणाची पूजा केली व नंतर तो प्रभु रुद्राला म्हणाला, "ज्याला तुझें ज्ञान आहे त्याला माझेंहि ज्ञान आहे. तसेंच ज्याला माझें ज्ञान आहे, त्याला तुझेंहि ज्ञान आहे. तुला भजणारे लोक माझे भक्त होत व मला भजणारे लोक हे तुझे भक्त होत. तुझ्यामाझ्यामध्यें मुळींच अंतर नाहीं. याबद्दल तुझ्या मनांत मुळींच संशय ठेवूं नकोस. आजपासून माझ्या गळ्यांतील श्रीवत्सावर शूलाची खूण राहील व माझ्या हाताची खूण तुझ्या गळ्यांत असल्यानें तुलाहि श्रीकण्ठ म्हणतील.

भगवान्—अशा प्रकारें ते नरनारायण रुद्राशीं सख्य करून व देवांचा निरोप घेऊन अव्यग्र मनानें तपश्चर्या करूं लागले. हे पार्था, मीं याप्रमाणें नारायणानें युद्धांत जय कसा मिळविला त्याची हकिगत तुला सांगितली व माझीं नाना प्रकारचीं गूढ नांवेंही तुला उलगडून सांगितलीं. ऋषींनीं ज्या ज्या नांवांनीं माझें संकीर्तन केलें तीं तीं सर्व नांवें तुला मीं सांगितलीं आहेत. हे कौन्तेया, अशा प्रकारें मी अनेक प्रकारचीं रूपें घेऊन पृथ्वी, ब्रह्मलोक आणि गोलोक या सर्व ठिकाणीं भ्रमण करीत असतों. युद्धांत तुझें रक्षण मींच केलें; तुला विजय प्राप्त झाला तो माझ्यामुळें. युद्ध उपस्थित झालें असतांना जो युद्धांत तुझ्यापुढें धांवतो तो देवदेवेश्वर रुद्र होय. माझ्या क्रोधापासून निर्माण झालेला "काल काल" तो तोच. ज्या शत्रूंना पूर्वी तूं मारिलेंस, ते या कालाच्या हातून आधींच मारले गेले होते. या शंकराचा प्रभाव अतर्क्य आहे, तेव्हां आत्मसंयमन करून या अक्षय विश्वेशाला नमस्कार कर. हे धनंजया, आतांपर्यंत तूं ही जी कथा ऐकिलीस तो माझ्या रागापासून उत्पन्न झालेल्या रुद्राचाच प्रभाव होय. १२. ३. ३४२.

## अध्याय ३४३ वा.

[ नारदाचें श्वेतद्वीपवर्णन ]

**शौनक**—हे सौते, आपण अतिशय मोठें असें आख्यान आम्हांस सांगितलेंत. हें आख्यान ऐकून सर्व मुनींना खरोखरच अत्यंत विस्मय झाला असला पाहिजे. नारायणाची कथा अत्यंत पावन असून तिच्याइतकें पुण्य सर्व आश्रमांचें यथावत् पालन केलें, किंवा सर्व तीर्थांच्या ठिकाणीं अवगाहन केलें तरीहि मिळणारें नाहीं. नारायणाच्या संबंधाची सर्व पापें नाहींशीं करणारी ही कथा आम्ही आरंभापासून ऐकली व त्यामुळें आमचीं शरीरें पावन झालीं आहेत. सर्व लोकांनीं ज्याला वंदन करावें असा हा भगवान् परमेश्वर महर्षींनाच काय, पण सगळया देवांना आणि ब्रह्मदेवाला सुद्धां दिसणें कठिण आहे. भगवान् नारायण नारदाच्या दृष्टीस पडले याला कारण त्या परमेश्वराच्या मनांतच तसें होतें हें होय. अनिरुद्धाच्या ठिकाणीं असणाऱ्या जगन्नाथाचें दर्शन घेतल्यानंतर नारद ऋषींनीं देवश्रेष्ठ नरनारायणऋषि यांचें दर्शन घेण्याकरितां पुनः त्यांच्याकडे धांव घेतली याचें कारण काय, तें मला सांगा.

**सौति**—राजा, परिक्षिताचा पुत्र जनमेजय याचा तो यज्ञ चालू असतांना व सर्व कर्मे यथास्थित चालू असतांना त्या राजेंद्रानें वेदनिधि कृष्णद्वैपायन व्यास ऋषि यांना विचारिलें.

**जनमेजय**—सुरर्षि नारद भगवद्वाक्याचें चिंतन करीत करीत श्वेतद्वीपाहून परत आल्यानंतर त्यांनीं पुढें काय केलें? बद्रिकाश्रमीं येऊन नरनारायणांच्या संगतींत त्यांनीं किती काळ घालविला? त्यांना कोणकोणच्या कथा विचारिल्या? भारताच्या एक लक्ष श्लोकांच्या अफाट सागरांतून आपण आपल्या बुद्धिरूप रवीनें घुसळून हें नारायणाख्यान, दह्यांतून लोणी काढावें, मलयपर्वतावरून चंदन घ्यावें, वेदांमधून अरण्यक घ्यावें, किंवा ओषधीपासून अमृत काढावें त्याप्रमाणें काढलें आहे. हे तपोनिधे, नारायणाच्या संबंधाची ही कथा आपण सांगितली आहे. सर्व भूतांना व्यापून असणारा प्रभु भगवान् नारायण हा सर्वांचा शास्ता आहे. हे ब्रह्मन्, त्या नारायणाचें तेज काय वर्णावें? ज्या नारायणाच्या ठिकाणीं प्रलयाच्यावेळीं ब्रह्मदेवासकट सर्व देव, ऋषि, गंधर्व व सर्व स्थावरजंगम भूतें लय पावतात, त्याच्याखेरीज या जगांत आणि स्वर्गलोकांतहि दुसरी पवित्रतर वस्तु असणें शक्य नाहीं. सर्व आश्रमांचें यथाशिस्त रीतीनें

पालन करणें, सर्व तीर्थांमध्यें स्नान करणें या गोष्टींनीं सुद्धां नारायणाची कथा श्रवण करण्याइतकें पुण्य प्राप्त होत नाहीं. भगवान् विश्वेश्वर हरि याची सगळ्या पापांचा नाश करणारी ती कथा आरंभापासून ऐकून आम्ही खरोखर सर्वस्वीं पावन झालों आहोंत. अर्जुनाला वासुदेवाच्या सहाय्यानें युद्धांत मोठा जय प्राप्त झाला यांत आश्चर्य नाहीं. भगवान् त्रैलोक्यनाथ विष्णु हा ज्याचा सहाय्यकर्ता त्याला दुर्लभ अशी गोष्ट या त्रैलोक्यांत नाहीं. ज्यांचें हित करण्यासाठीं भगवान् जनार्दनानें कंबर कसली, ते माझे सर्व पूर्वज खरोखर धन्य होत. जो लोकपूज्य भगवान् मोठी तपश्चर्या करूनहि दिसणें कठीण, त्या श्रीवत्सांक परमेश्वराला ज्यांनीं प्रत्यक्ष पाहिलें, ते त्रिवार धन्य होत. ब्रह्मदेवाचा मानसपुत्र नारदऋषि हा त्यांच्याहूनहि धन्य. त्या अव्यय नारदऋषीची योग्यता कांहीं कमी नाहीं. कारण त्यानें श्वेतद्वीपाला जाऊन स्वतः नारायणाचें दर्शन घेतलें. अनिरुद्धाच्या ठिकाणीं स्थित असलेल्या भगवंताचें नारदांना दर्शन झालें हा खरोखर परमेश्वराचाच प्रसाद होय, यांत शंका नाहीं. परमेश्वराचें दर्शन घेतल्यानंतर नारदानें नरनारायणांचें दर्शन घेण्याकरितां बद्रिकाश्रमाकडे कां धांव घेतली व तेथें येऊन नरनारायणांच्या संगतींत त्यानें किती काळ काढला ? त्यांना काय काय प्रश्न विचारले ? ते नारदऋषि श्वेतद्वीपाहून परत आल्यानंतर महात्मे नरनारायणऋषि त्यांना काय म्हणाले. हें सर्व यथातथ्य रीतीनें आपण मला सांगा.

**वैशंपायन**—व्यासांच्या प्रसादानें ही नारायणाची कथा मी सांगत आहें. त्या अत्यंत तेजस्वी भगवान् व्यासांना नमस्कार असो. हे राजा, श्वेतद्वीपाला जाऊन व हरीचें दर्शन घेऊन परतल्यानंतर नारदऋषि परमेश्वरानें सांगितलेल्या गोष्टीचें अंतःकरणांत चिंतन करीत करीत मोठ्या वेगानें मेरुपर्वतावर आले. आपण इतक्या दूर जाऊन पुनः सुखरूप परत आलों याबद्दल त्यांना समाधान वाटलें आणि मेरू पर्वत ओलांडून ते गंधमादन पर्वतावर आले व तेथून आकाशमार्गानें बद्रिकाश्रमाच्या रोखानें निघाले. तेथें आल्यावर त्यांच्या दृष्टीला आत्मनिष्ठ व व्रती असे महात्मे नरनारायण ऋषि तपश्चर्या करितांना दिसले. त्यांचें तेज सर्व लोकांना प्रकाश देणाऱ्या सूर्याच्या तेजाहूनहि अधिक होतें. त्यांनीं श्रीवत्सचिन्हें धारण केलीं होतीं. त्या पूज्य ऋषींनीं जटा धारण केल्या असून त्यांच्या पायांवर आणि हातांवर हंसाचीं व चक्राचीं लक्षणें दिसत होतीं. त्याचे बाहु पिळदार होते. त्यांना साठ दांत व आठ दाढा होत्या. त्यांचा आवाज

मेघासारखा गंभीर असून त्यांच्या चेहऱ्याची ठेवणहि सुबक होती. त्यांचीं कपाळें विस्तृत असून त्यांच्या भुंवया, हनुवट्या आणि नाकें हीं शोभिवंत होतीं. त्या नरनारायणांचीं डोकीं छत्राच्या आकाराचीं होतीं. अशा प्रकारच्या लक्षणांनीं युक्त असलेल्या त्या ऋषींची नारदानें पूजा केली, व त्यांनींहि नारदाचा परत सत्कार करून त्याचें स्वागत केलें आणि त्याला कुशल विचारलें. त्यांच्याकडे पाहून नारदानें आपल्या मनाशीं विचार केला तेव्हां श्वेतद्वीपाच्या ठिकाणीं आपल्याला ज्या निरनिराळया मूर्ति दिसल्या त्यांच्या सारखेच हे नरनारायण ऋषि आहेत असें त्याला वाटलें. नंतर नारदानें नारायणाला प्रदक्षिणा घातली व तो तेथेंच दर्भासनावर बसून राहिला. शमदमादि साधनसंपत्तीनें युक्त असलेल्या त्या तेजस्वी, यशस्वी, व तपस्वी ऋषींनीं आह्निक आटोपलें आणि नंतर त्या अव्यग्र ऋषींनीं पाद्य व अर्घ्य हीं देऊन नारदाची पूजा केली. ते दोघे आपलें आह्निक व आतिथ्यक्रिया आटोपून आपल्या आसनावर बसले. तुपाच्या धारा आंत पडल्यामुळें प्रज्वलित झालेल्या व ज्याच्या ज्वाळा गगनाला पोहोंचताहेत अशा अग्नीमुळें यज्ञभूमि जशी शोभून दिसावी त्याप्रमाणें त्या नरनारायणांच्या सान्नि-ध्यानें तो प्रदेश अत्यंत शोभिवन्त दिसूं लागला. नंतर विश्रांति संपून व आति-थ्याचा स्वीकार करून नारद सुखानें आपल्या जागीं बसल्यानंतर नरनारायणांनीं त्याला प्रश्न विचारिला कीं, "हे द्विजश्रेष्ठा, आम्ही ज्याला आपली मूळ प्रकृति समजतों तो परमात्मा समर्थ भगवान् तूं श्वेतद्वीपांत पाहिलास का ?"

**नारद**—मी श्रीमान् विश्वरूप अव्यक्त परमेश्वराचें त्या ठिकाणीं दर्शन घेतलें आणि तेथें असलेले सर्व लोक, ऋषि, देव व महर्षि या सर्वांनाहि त्याचें दर्शन घडलें. आज आपल्या रूपानें तो सनातन ईश्वरच माझ्यापुढें आहे, असें मला वाटतें. तो अव्यक्तरूप परमेश्वर ज्या लक्षणांनीं युक्त होता तींच लक्षणें आज तुम्हां व्यक्तस्वरूप नरनारायणांच्या ठिकाणीं मला दिसत आहेत. त्या परमेश्वराच्या आजूबाजूंस मला तुमचें दर्शन झालें. परमेश्वराचा निरोप घेऊन आज मी येथें आलों आहें. धर्मापोटीं जन्म घेतलेले तुम्ही नरनारायण ऋषि; तुमच्याशिवाय या त्रलोक्यामध्यें तेज, यश आणि ऐश्वर्य या बाबतींत श्रेष्ठ असा कोण आहे ? त्यानें ( परमेश्वरानें ) मला क्षेत्रज्ञ या नांवाचा सगळा धर्म सांगितला व इहलोकीं जे जे अवतार व्हावयाचे आहेत त्या सर्वांचें वर्णन मला सांगितलें. त्या ठिका-णचे पंचेंद्रियरहित असे जे श्वेतपुरुष ते ज्ञानवंत असून ते सगळे देवाचे भक्त होते; ते नेहमीं त्याची पूजा करीत व देवही त्यांच्याबरोबर क्रीडा करीत असे.

कारण परमात्म्याला आपले भक्त नेहमींच प्रिय असतात म्हणून त्याची पूजा केली असतांना तो भक्तवत्सल देव भक्तांमध्यें रंगून जातो. तो विश्वभोक्ता असून त्याचा संचार सर्वत्र आहे. या जगांत तो महासामर्थ्यवान् आणि तेजस्वी देव हाच एक कारण, कार्य आणि कर्ता होय. तो महायशस्वी असून धर्माज्ञा व धर्माचा विधि हीं त्याचींच रूपें होत. स्वतःचें तपोबल वाढवून हा देव श्वेतद्वीपाच्या पलीकडे असणारें तेज नांवाचें स्वयंप्रकाश स्थान निर्माण करितो. हा देव स्वतः शांत रूपाचा आहे. व तो त्रलोक्याला शांति देतो. आणि शुद्ध बुद्धीनेंच त्यानें एकनिष्ठपणानें तपश्चर्या चालविली आहे. हा अव्यक्त देवेश ज्या ठिकाणीं तप करितो त्या ठिकाणीं सूर्य, चंद्र किंवा वायु यांपैकीं कोणाचाहि प्रवेश होऊं शकत नाहीं. आठ अंगुळें उंचीची वेदी तयार करून या विश्वकर्म्या परमेश्वरानें एका पायावर उभें राहून, हात वर करून, दृष्टि ऊर्ध्व लावून व सर्व सांग वेदांचें आवर्तन करीत करीत, अत्यंत खडतर तपश्चर्या चालविली आहे. ब्रह्मदेव, ऋषि, स्वतः पशुपति, इतर देव, दैत्य, दानव, राक्षस, नाग, सुपर्ण, गंधर्व, सिद्ध, राजर्षि इत्यादि सगळे जे जे हव्ययज्ञ किंवा कव्ययज्ञ विध्युक्त रीतीनें करतात ते ते सर्व परमेश्वराच्या चरणाजवळ पोहोंचतात. एकांतिक भक्तीमध्यें ज्यांची बुद्धि गढून गेली आहे अशा लोकांनीं केलेल्या सर्व क्रिया देव शिरसामान्य मानतो. महात्म्या ज्ञानी भक्ताशिवाय नारायणाला प्रियतर असें या जगांत कांहीं नाहीं, म्हणून देव आणि अनन्य भक्त यांचें तादात्म्य होतें. परमात्म्यानें निरोप दिल्यावरून मी येथें आलों. हें सर्व शास्त्र व हे विधि परमेश्वरानें मला स्वतः सांगितले. आतां तुमच्याबरोबर परमात्म्याच्या ठिकाणीं तल्लीन होऊन मी नित्य तुमच्या संगतींत राहीन. १२.३.३४३.

---

## अध्याय ३४४ वा.

[ १ नरनारायण व नारद यांचा संवाद. ]

(१) **नरनारायण**—नारदा, परमेश्वराचें प्रत्यक्ष दर्शन तुला झालें तेव्हां खरोखर तूं धन्य आहेस, देवाची तुजवर खरीच कृपा दिसते. भगवान् ब्रह्मदेवाला सुद्धां प्रभूचें दर्शन झालें नाहीं. त्या अव्यक्तरूप भगवान् पुरुषोत्तमाचें रूप दुर्लभ आहे. नारदा आम्हीं हें तुला सत्य स्मरून सांगत आहों. या देवाला स्वतःच्या

भक्ताशिवाय त्रैलोक्यांत कांहीं प्रिय नाहीं आणि म्हणून त्यानें स्वतः आपलें दर्शन दिलें. त्या परमात्म्याची तपश्चर्या करण्याची जी जागा आहे त्या ठिकाणीं आम्हांखेरीज कोणाचाहि प्रवेश होऊं शकत नाहीं. स्वतःच्या तेजानें शोभून दिसणाऱ्या त्या स्थानाचें तेज, हजारों सूर्य एकदम उगवले तर त्यांचें जसें तेज दिसेल तसें आहे. हे ब्रह्मन्, क्षमाशील पुरुषामध्यें तूं श्रेष्ठ आहेस आणि पृथ्वीचा गुण जो क्षमा तो या विश्वकर्त्या परमेश्वरापासून निर्माण झाला आहे. सर्व भूतांच्या हितामध्यें तत्पर असणाऱ्या याच परमेश्वरानें रस हा गुण निर्माण केला व या गुणानें युक्त झाल्यामुळें पाणी द्रवरूप झालें. याच्यापासूनच तेज हें तत्व निर्माण झालें आणि या तत्वाचा गुण म्हणजे रूप होय. हा रूप-गुण सूर्याला मिळाला म्हणजे तो लोकांमध्यें शोभून दिसूं लागतो. याच पुरुषोत्तमापासून स्पर्शगुण उत्पन्न होतो. आणि या स्पर्शगुणानें युक्त झालेला वायु तिन्ही लोकांमध्यें संचार करतो. सर्वलोकेश्वर भगवान् नारायण याच्याचपासून शब्दगुण निर्माण होतो. व शब्दगुणाशीं संयुक्त झाल्यामुळेंच आकाश एवढें अफाट पसरलें आहे. त्रैलोक्याला प्रकाश देणारा चंद्र हा ज्याच्याशीं संयुक्त आहे, तें मन याच देवापासून निर्माण झालें. ज्या ठिकाणीं भगवान् विद्यासाहाय्य परमेश्वर हव्य आणि कव्य यज्ञांचा उपभोग घेतो, त्या स्थानाला 'सद्भूतोत्पादक' असें श्रुतीनें नांव दिलें आहे. या जगांत पुण्य आणि पाप यांनीं रहित असे निष्कलुष लोक आपल्या कल्याणकारक मार्गानें जात असतांना त्यांना त्रैलोक्याचा अंधकार नाहींसा करणाऱ्या सूर्यरूपी द्वारांतून जावें लागतें. हा सूर्य त्यांचीं सर्व शरीरें भस्मसात् करितो व त्यामुळें सर्वांना अदृश्य झालेले असे ते लोक परमाणुरूप होऊन त्या देवामध्यें प्रविष्ट होतात. तेथून ते मुक्त झाल्यावर ते अनिरुद्धाच्या शरीरांत प्रवेश करितात व तेथून मनोरूप होऊन प्रद्युम्नामध्यें लय पावतात. प्रद्युम्नामधून निघून ते संकर्षणजीवाच्या ठिकाणीं प्रवेश करितात. नंतर त्या ब्राह्मणश्रेष्ठांची त्रिगुणाच्या तडाक्यांतून मुक्तता होते व ते क्षेत्रज्ञ निर्गुण जो परमात्मा त्याच्या ठिकाणीं प्रवेश करितात. सर्वांचें निवासस्थान जो वासुदेव तोच क्षेत्रज्ञ परमेश्वर होय. आपल्या जीवाचा लय ज्यांनीं साधला आहे, ज्यांनीं आपलीं इंद्रियें स्वाधीन ठेविलीं आहेत व ज्यांनीं यमनियमांचें साधन केलें आहे, असले एकांतिक भक्त वासुदेवाच्या ठिकाणीं प्रविष्ट होतात. हे ब्रह्मन्, आम्हीं धर्माच्या घरीं अवतार घेऊन या विशाल बद्रिकाश्रमामध्यें तप करीत राहिलों आहोंत. त्या परमेश्वराचे देवांच्या कल्याणासाठीं जगामध्यें

जे जे अवतार होतील त्यांचें अभीष्टचिंतन करण्यासाठीं आमची तपश्चर्या आहे. हे द्विजश्रेष्ठा, पूर्वींपासून चालत आलेल्या शास्त्रोक्त विधीनें आम्हीं सर्व व्रतें आचरीत आलों आहोंत. हे तपोधना, आम्हांलाहि पण श्वेतद्वीपामध्यें तुझें दर्शन घडलें होतें. नारायणाचें दर्शन तुला घडल्यानंतर तूं तुझ्या मनाशीं एक संकल्प केला आहेस. ह्या चराचर त्रैलोक्यामध्यें जीं जीं कांहीं शुभाशुभ कर्में घडतात, घडलीं असतील व घडतील तीं तीं सर्व आम्हांला कळतात. हे महामुने, त्या नारायणानें आम्हांला हें सर्व सांगितलें आहे.

**वैशंपायन**—अतिशय उग्र तपश्चर्या करणाऱ्या त्या नारायणांचें हें वाक्य ऐकून नारदानें हात जोडले, व नारायणस्वरूपीं लीन होऊन त्या बद्रिकाश्रमामध्यें त्यानें नारायणासंबंधाच्या अनेक मंत्रांचा जप केला व नारायणाची आणि त्या दोघां ऋषींची पूजा करीत तो त्या ठिकाणीं राहिला. १२.३.३४४.

---

## अध्याय ३४५ वा.

[ पिंडपूजेचा आचार कसा पडला ? ]

**वैशंपायन**—कांहीं काळ गेल्यानंतर ब्रह्मदेवाचे मानसपुत्र जे नारदऋषि यांनीं यथाविधि दैवयज्ञ केल्यानंतर मग पितृयज्ञ केला. त्यावर धर्माचे ज्येष्ठ पुत्र भगवान् नारायण त्याला म्हणतात, "हे द्विजश्रेष्ठा, दैव आणि पितृयज्ञाचा संकल्प करून तूं या ठिकाणीं कोणाची पूजा करीत आहेस तें मला श्रुत्युक्त रीतीनें सांग. तूं हें काय करीत आहेस ? व याचें काय फळ मिळावें, अशी तुझी इच्छा आहे ?"

**नारद्**—देवा, देवांना उद्देशून यथासांग कर्में करीत जा असें आपणच मला पूर्वीं सांगून ठेविलें आहे आणि सनातन परमात्मा हेंच परमश्रेष्ठ दैवत असून तो यज्ञस्वरूप आहे, असेंहि तूं मला सांगून ठेविलें होतेंस. त्यामुळें मी त्या अव्यय वैकुंठाचें नित्य पूजन करीत असतों. लोकांचा पितामह जो ब्रह्मदेव तो याच्यापासूनच उत्पन्न झाला. ब्रह्मदेवानें संतुष्ट होऊन माझा पिता दक्षप्रजापति याला निर्माण केलें. मी ब्रह्मदेवाचा पहिला मानसपुत्र आहें. हे साधो, भगवान् नारायणानें घालून दिलेल्या विधीला अनुसरून मीहि पितृयज्ञकर्में करीत आहें. अशा प्रकारें सर्व जगताचा पिता, माता, आणि पितामह असलेला हा भगवान्

परमेश्वरच पितृयज्ञामध्यें नित्य पूजिला जातो. पूर्वी देवांनीं प्रत्यक्ष देव असलेल्या-देवस्वरूप असलेल्या-श्रुतीचें अध्ययन आपल्या पुत्रांकडून करविलें. पुढें असुरांशीं युद्धांत गुंतल्यामुळें देवांची श्रुति नष्ट झाली. त्यावेळीं पुत्रांनीं, फिरून त्यांच्याकडून वेदाध्ययन करविलें. या कारणानें त्या मंत्रदात्या पुत्रांना फिरून पितृपदवी प्राप्त झाली. त्यानंतर पुढें देवांनीं काय केलें तें तुमच्यासारख्या शुद्धात्म्यांना माहीतच आहे. अशा प्रकारें ते पुत्र आणि पितर यांनीं परस्परांची पूजा केली. प्रथम यांनीं जमिनीवर दर्भ अंथरून त्यावर पितरांना उद्देशून तीन पिंड ठेविले. पण या पितरांना 'पिंड' ही संज्ञा कशी प्राप्त झाली तें मला सांगा.

नरनारायण—पूर्वी एकदां ही समुद्रवलयांकित पृथ्वी नष्ट झाली असतांना देवानें वराह अवतार घेऊन ती चट्दिशीं वर काढली आणि त्यानें तिची स्वस्थानीं स्थापना केली. लोककार्यासाठीं उद्युक्त झालेल्या परमेश्वराचें सर्वांग पाण्यानें व चिखलानें भरलें आहे अशा स्थितींत सूर्य माध्याह्नीं येऊन आह्निक कर्में करावयाची वेळ आली असतांना त्यानें आपल्या दाढेमध्यें अडकून बसलेले तीन पिंड बाहेर काढले व जमिनीवर दर्भ पसरून त्यांच्यावर ठेविले. त्या पिंडांच्या ठिकाणीं परमात्मा आहे अशी कल्पना करून भगवंतानें यथाविधि पितृपूजा केली; नंतर प्रभूनें त्या तीन पिंडांचें स्वतःच घालून दिलेल्या नियमाप्रमाणें स्वतःच्या अंगांतील ऊष्म्यापासून उत्पन्न झालेल्या स्नेहयुक्त तिळांनीं प्रोक्षण केलें व ते पितरांना अर्पण केले. पितरांना उद्देशून पिंड कसे द्यावे, याचें ज्ञान लोकांना होण्यासाठीं परमेश्वरानें पुढील भाषण केलें.

वृषाकपि—"मीं लोकांची उत्पत्ति केली आहे आणि आतां पितरांची उत्पत्ति करण्याचें मनांत आणलें आहे. पितरांना उद्देशून कोणते श्रेष्ठ विधि करावे याचा माझ्या मनाशीं मीं विचार करीत असतांना माझ्या दाढांतून निघालेले हे तीन पिंड जमिनीवर दक्षिण दिशेला पडलेले आहेत; म्हणून, हे पितरच होत. या तीन पिंडांच्या ठिकाणीं मी सनातन पितर अमूर्त स्वरूपांत निर्माण केले आहेत असें समजावें. या तीन पिंडांमध्यें पिता, पितामह, आणि प्रपितामह ह्या तिघांच्या स्वरूपांत मींच आहें असें समजावें. माझ्यापेक्षां श्रेष्ठ या जगांत कोणी नाहीं; तेव्हां मी स्वतः आणखी कोणाचें पूजन करूं ? मी सगळ्या जगाचा पितामह आहें तेव्हां माझा आणखी पिता कोण? ब्रह्मदेवाला मींच उत्पन्न केलें, व जगाचा उत्पत्तिकर्ताहि मीच आहें."

अशा प्रकारें भाषण करून, हे ब्रह्मन्, "त्या देवदेव वृषाकपीनें त्या वराह-पर्वतावर विस्तृत रीतीनें यथाविधि पिंडदान केलें व त्या पिंडदानाच्या द्वारानें स्वतःचीच पूजा करून घेऊन तो तेथेंच अंतर्धान पावला. पितरांना पिंडसंज्ञा कशी प्राप्त झाली याची हकिगत ही अशी आहे." वृषाकपीच्या सांगण्याप्रमाणें ह्या पिंडांची पूजा नित्य होत असते. जे लोक पितर, देव, गुरु, अतिथि, गाई, ब्राह्मण व पृथ्वी यांची पूजा करितात ते कायावाचामनानें भगवान् विष्णूचीच पूजा करितात यांत शंका नाहीं. सर्व प्राण्यांच्या शरीरांमध्यें विहार करणारा तो भगवान् प्रभू सर्वांतर्यामी आहे. सर्व प्राणिमात्रांच्या ठिकाणीं समबुद्धीनें राह-णारा हा सर्वात्मा ईश्वर नारायणच होय. १२. ३.३४५.

---

## अध्याय ३४६ वा.

[ नारायणाची प्रशंसा ]

( १ ) **वैशंपायन**—नरनारायणांनीं सांगितलेलें हें वाक्य ऐकून नारदांनीं अत्यंत भक्तियुक्त अंतःकरणानें देवाशीं तादात्म्य साधलें. बद्रिकाश्रमीं हजार वर्षें राहून भगवंताची कथा ऐकून आणि त्याचें दर्शन घेऊन नारदऋषि हिमालय पर्व-तावर स्वतःचा आश्रम होता त्या ठिकाणीं आले. ते नरनारायण ऋषीहि पण आपल्या त्या रम्य बद्रिकाश्रमांतच तप करीत राहिले. हे राजा, तूं पांडवांच्या कुळाचा उद्धार-कर्ता आहेस; तूं अतिशय पराक्रमी असून ही कथा आरंभापासून अखेरपर्यंत ऐकल्यामुळें आज पवित्र झाला आहेस. जो कायेनें, वाचेनें किंवा मनानें विष्णूची निंदा करील त्याला हा लोकहि मिळत नाहीं, व परलोकहि मिळत नाहीं. त्याचे पितर अनंतकालपर्यंत नरकांत पिचत राहतात. जो देवश्रेष्ठ नारायणाचा द्वेष करतो त्याला दुर्गति प्राप्त होते. लोकांचा आत्मा हा विष्णुस्वरूप आहे, त्याचा लोकांनीं द्वेष कसा करावा? आमचे गुरु, गंधवतीसुत व्यासऋषि, यांनीं हें अव्ययमाहात्म्य आम्हांला सांगितलें व त्यांच्यापासून ऐकून घेऊन मी हें तुला सांगितलें. हे राजा, साक्षात् जगन्नाथ नारायणापासून हा धर्म रहस्यासकट आणि संग्रहासकट नारदांना प्राप्त झाला. पूर्वीं हाच धर्म संक्षेपानें हरिगीतेमध्यें सांगि-तला होता. कृष्णद्वैपायन व्यास म्हणजे साक्षात् नारायण होत. त्यांच्यावांचून महाभारत करण्याचें सामर्थ्य कोणाचे अंगीं आहे? त्या व्यास प्रभूवांचून नाना-प्रकारचे धर्म कोण सांगणार? हे राजा, तूं अश्वमेध यज्ञाचा संकल्प केला आहेस

व नाना प्रकारचे धर्महि पण तुझ्या कानावरून गेले आहेत. तुझ्या संकल्पाप्रमाणें तुझा महायज्ञ चालूं दे.

**सौति**—ही मोठी कथा ऐकून त्या जनमेजय राजानें यज्ञसमाप्तीच्या सर्व क्रिया आरंभिल्या. याप्रमाणें नैमिषारण्यांत रहाणाऱ्या ऋषींच्या सहवर्तमान हें जें नारायणीय आख्यान तूं मला विचारलेंस, तें हे शौनका, मी तुला सर्व सांगितलें. पूर्वी कृष्ण, भीष्म, पांडव व सर्व ऋषि यांच्यासमक्ष नारदानें हें आख्यान बृहस्पतींना सांगितलें. तो त्रैलोक्याचा नाथ, ऋषिश्रेष्ठ, या विशाल पृथ्वीचा आधार, वेदविद्येचा प्रवर्तक, शम आणि नियम यांचा जणूं निधि, यमनियमांचें आचरण करणारा, नेहमीं ब्राह्मणांच्या सान्निध्यांत राहणारा व देवांचें हित करणारा भगवान् हरि हीच तुझी गति असो. राक्षसांचा वध करणारा तपोनिधि, अत्यंत मोठ्या अशा कीर्तीचा आधार, मधु आणि कैटभ ह्या राक्षसांचा नाश करणारा, धर्मवेत्ता व धर्माचरणानें चालणारा, लोकांना सद्गति देणारा, त्यांना अभय देणारा आणि यज्ञांतील हविर्भाग हरण करणारा श्रीहरि हाच तुझा आधार होवो. जो त्रिगुणात्मक असून निर्गुण आहे, जो वासुदेवादि चार रूपें धारण करितो, जो इष्टापूर्तादिकांच्या फलांचा भाग ग्रहण करितो, असा अजित व अतिचपल भगवान् हरि पुण्यात्म्या ऋषींना प्राप्त होणारी गति तुम्हांला देवो. त्या लोकसाक्षी, आदित्यवर्ण, अज पुराणपुरुषाला एकाग्र चित्तानें नमस्कार करा; कारण, प्रत्यक्ष शेषशायी भगवान्सुद्धां त्या वासुदेवापुढें नमले आहेत. तो भगवान् वासुदेव लोकांचा उत्पत्तिकर्ता आहे. अमृत मोक्षपदाचें स्थान, लोकांची अत्यंत सूक्ष्म अशी गति, शाश्वत स्थान, हीं तोच. हे उदारा, सांख्यज्ञानी आणि योगी पुरुष आत्मसंयमन करून याच पदाचें चिंतन करीत असतात. १२. ३. ३४६.

## अध्याय ३४७ वा.

[ हयग्रीवावतारवर्णन. ]

**शौनक**—हे ब्रह्मन्, त्या महात्म्या भगवान् परमात्म्याचें वैभव आपण वर्णन केलें तें मीं ऐकिलें. नरनारायणांच्या रूपानें भगवंतानें धर्माघरीं जन्म घेतल्याची हकिगत आपण सांगितली तीहि आम्हीं ऐकली. महावराहाचा अवतार घेऊन विष्णूनें पिंडोत्पत्ति केल्याची हकिगत आपण सांगितली. प्रवृत्तिधर्म व निवृत्तिधर्म यासंबंधानें आपण जी व्यवस्था सांगितलीत तीहि पण

आम्हांला समजली. हव्य आणि कव्य यज्ञांमध्यें भाग घेणारा विष्णू यानें धारण केलेलें घोड्याचें मुख महासागराच्या ईशान्य कोपऱ्यामध्यें ब्रह्मदेवानें पाहिलें, असें आपण कथेच्या ओघामध्यें आम्हांस सांगितलेंत. तें घोड्याचें तोंड त्या हरीनें पूर्वी उत्पन्न करून ठेविलें होतें किंवा कसें ? तें घोड्याचें तोंड त्यानें काय हेतूनें निर्माण केलें ? त्याचें रूप, त्याचा प्रभाव हीं कशा स्वरूपाचीं होतीं ? तें अत्यंत तेजस्वी असें अश्वमुख पाहिल्यानंतर ब्रह्मदेवानें काय केलें, ती हकिगत आम्हांला सांगा. हे बुद्धिमंता, महापुरुषांच्या संबंधानें आम्हांला उत्पन्न झालेली ही शंका आपण दूर करा. हे ब्रह्मन्, या पवित्र कथा सांगून आपण आम्हांला धन्य केलें आहे.

**सौति**—वेदाला संमत असलेला हा सर्व जुना इतिहास मी तुला सांगतों. भगवान् वेदव्यासानें हा इतिहास पूर्वी परीक्षित जनमेजयाला सांगितला होता. परमेश्वराच्या हयग्रीवावताराची हकिगत ऐकून जनमेजयाला असाच संशय उत्पन्न झाला होता आणि त्यानें प्रश्न विचारला कीं, “ ब्रह्मदेवानें हयग्रीवावतार धारण केलेल्या देवाचें दर्शन घेतलें असें आपण मला सांगितलें तर हा हयग्रीवावतार कशासाठीं झाला तें मला सांगा.

**वैशंपायन**—या जगतांत जें जें म्हणून देहधारी आहे तें तें सर्व ईश्वराच्या संकल्पानें उत्पन्न होणाऱ्या पंचमहाभूतांनीं व्यापलेलें आहे. नारायणस्वरूपी प्रभु विराट्पुरुष हा जगाचा उत्पत्ति-कर्ता असून तो सर्व भूतांच्या अंतरंगांत वास करितो. हा वरद असून जसा सगुण तसाच निर्गुणहि आहे. आतां हे राजन्, तुला महाप्रलयाची व्यवस्था सांगतों, ती ऐक. समुद्रासारख्या चोहींकडे पसरलेल्या एकच एक अफाट जलतत्वामध्यें पृथ्वी लीन झाली; जलतत्व तेजामध्यें लीन झालें; तेजस्तत्त्व वायुतत्वामध्यें लीन झालें; वायू आकाशांत लीन झाला; आकाश मनामध्यें लीन झालें. मन महतत्वामध्यें लीन झालें; व्यक्त महत्तत्त्व अव्यक्त झालें; अव्यक्त परब्रह्मांत लीन झालें व शेवटीं सगळ्या विज्ञानाचा लय होऊन सर्वत्र अंधकारच झाला. त्या तमापासून जगत्कारण ब्रह्म उत्पन्न झालें. या ब्रह्मरूपानें विराट्पुरुषाच्या शरीराचा आश्रय केल्यानंतर हें नामरूपात्मक जगत् त्यांतून निर्माण झालें. हे राजा, या सूक्ष्मरूप अव्यक्तालाच अनिरुद्ध किंवा प्रधान म्हणतात. हें अव्यक्त त्रिगुणात्मक आहे. भगवान् विष्णूनें आपली मनोवृत्ति निर्विशेष परब्रह्माच्या ठिकाणीं लावून त्या पाण्यामध्येंच शयन केलें आणि निद्रायोग साधला. अनेक गुणांमधून उत्पन्न झालेल्या बहुविध सृष्टीचें चिंतन

भगवान् करीतच होते. सृष्ट्युत्पत्तीचा विचार करीत असतांना त्या भगवंतापासून महत्तत्त्व निर्माण झालें. महत्तत्वापासून अहंकार निर्माण झाला. हा अहंकार म्हणजेच त्रैलोक्याचा पितामह चतुर्मुख हिरण्यगर्भ ब्रह्मदेव होय. अनिरुद्धापासून कमळाच्या ठिकाणीं निर्माण झालेला तो सनातन, तेजस्वी आणि कमलनयन ब्रह्मदेव सहस्रपत्र कमळामध्यें बसला असतांना त्याला सर्व सृष्टि जलमय दिसली. नंतर त्यानें सगळीं भूतें निर्माण केलीं. सूर्याच्या किरणाप्रमाणें तेजस्वी असलेल्या त्या कमळाच्या पानावर नारायणानें पाण्याचे दोन बिंदु टाकलेले दिसले. हे दोन बिंदु रजोगुण आणि तमोगुण यांनीं युक्त असे होते. या दोन बिंदूंपैकीं एक बिंदु मधासारखा दिसत असून त्याचें तेज अलौकिक होतें. नारायणाच्या आज्ञेनें हाच बिंदु तामसी मधुराक्षस झाला व दुसरा कठिण आणि राजस बिंदु हा कैटभ नांवाचा राक्षस बनला. हे दोघेहि दैत्यश्रेष्ठ महासामर्थ्यवान् होते आणि रजस्तमानें युक्त होऊन हातांत गदा घेऊन त्या कमलाच्या पानाच्या रोखानें ते धावत सुटले. त्या कमळपत्राच्या ठिकाणीं त्यांनीं चारी वेद उत्पन्न करीत असलेला तेजस्वी ब्रह्मदेव पाहिला. त्या वेदांच्या मूर्ति मोठ्या सुंदर होत्या. तेव्हां त्या असुरश्रेष्ठानें ब्रह्मदेवाच्या देखत त्या सर्व वेदांना पकडलें व तें दोघेहि सनातन वेदांना घेऊन समुद्राच्या ईशान्य बाजूला जाऊन तेथून पाताळांत शिरले. वेदांचें हरण केलेलें पाहिल्याबरोबर ब्रह्मदेवाला गोंधळल्यासारखें झालें आणि जवळचे वेद नाहींसे झालेले पाहिल्याबरोबर तो परमेश्वराला म्हणाला, "वेद हीच माझी दिव्य दृष्टि; वेद हेंच माझें आत्यंतिक सामर्थ्य; वेद हेंच माझें श्रेष्ठ आश्रयस्थान व वेद तेंच माझें परब्रह्म होय. या दोघां दानवांनीं माझे वेद जबरदस्तीनें चोरून नेले. वेद नाहींसे झाल्यामुळें मला सर्व जग अंधकारमय झालें आहे. वेदांच्यावांचून मी ही सृष्टि आतां कशी निर्माण करूं? या वेदांच्या नाशानें मला फार मोठें दुःख होत आहे. शोकानें व्यापलेल्या हृदयाला तीव्र यातना होत आहेत. या दुःखसमुद्रांत बुडालों असतांना माझा उद्धार करील व नष्ट झालेले वेद पुनः मला आणून देईल असा ह्या जगांत कोण आहे? माझ्यावर एवढी कृपा कोण करील?" हे बुद्धिमान् राजा, त्या ब्रह्मदेवाला असलें भाषण करीत असतांना नारायणाची स्तुति करण्याची इच्छा झाली. व त्या प्रभूनें हात जोडून पुढील स्तोत्र जपण्यास सुरवात केली.

ब्रह्मा—हे परमेश्वरा, वेद हें तुझें हृदय आहे. तूं माझा पूर्वज आहेस. त्रैलोक्याचा आदिनाथ तूं, त्रिभुवनांत श्रेष्ठ तूं, सांख्य आणि योग या

ज्ञानाचा समुद्र तूं. हे व्यक्त व अव्यक्त सृष्टि उत्पन्न करणाऱ्या परमेश्वरा, तूं नेहमीं कल्याणप्रद मार्गानें चालणारा आहेस. तूं विश्वाचा भोक्ता आहेस. सर्व प्राणिमात्रांच्या अंतरात्म्यांत वास करणारा आहेस. तूं अयोनिज आहेस. मला तुझ्याच प्रसादानें जन्मलाभ झाला. तूं लोकांना प्रकाश देणारा असा स्वयंभू देव आहेस. तुझ्या मनापासून माझा पहिला अवतार झाला. ब्राह्मणांना हा माझा अवतार पूज्य वाटत असे. दुसरा माझा अवतार म्हणजे तुझ्या डोळ्यांमधून निघालेला तो पुरातन अवतार होय. तसेंच तुझ्या कृपाप्रसादानें मला तिसरा वाणीमय जन्म प्राप्त झाला. हे विभो, तुझ्या कानापासून मला चवथा जन्म मिळाला. पुढें तुझ्या नासिकेपासून झालेला माझा हा पांचवा जन्म होय. पुढें माझा जन्म एका अंड्यांतून झाला आणि हा माझा सहावा अवतार होय. आणि आतां कमळामधून झालेला हा माझा सातवा जन्म होय. हे त्रिगुणरहित परमेश्वरा, या प्रत्येक जन्माजन्माच्या ठिकाणीं तुझें माझें नातें पितापुत्रांचें होतें व आहे. हे पुण्डरीकाक्षा, तूं ईश्वर आहेस व स्वयंभू आहेस. पण तुझें ईश्वरत्व हें कांहीं तरी संकल्पानेंच तुला प्राप्त झालें असल्यामुळें तेंहि एक प्रकारचें बंधनच होय. तूं मला निर्माण केलें आहेस. वेद हेच माझे डोळे असून मी कालाला जिंकलें आहे. ते माझे वेदरूप नेत्र राक्षसांनीं हिरावून नेले. मी आंधळा झालों. परमेश्वरा, जागा हो. माझे नेत्र मला परत दे. तूं आणि मी हे एकमेकांचे आवडते आहोंत.

याप्रमाणें ब्रह्मदेवानें स्तुति केली असतांना तो सर्वतोमुख भगवान् परमेश्वर जागा झाला. आणि वेद शोधण्याचें कार्य करण्याला प्रवृत्त झाला. नंतर त्यानें आपल्या योगसामर्थ्यानें एक दुसरें शरीर धारण केलें. या शरीराचें नाक मोठें सुंदर असून त्याची कांति चंद्रासारखी होती. या शरीराला वेदांचा जणूं आधार असें अत्यंत श्वेतवर्ण असें घोड्याचें मुख होतें. परमेश्वराचें हें शरीर येवढें विशाल होतें कीं, नक्षत्रें आणि तारे यांच्यासकट सबंध आकाश त्याच्या मस्तकामध्यें सामावलें होतें. त्याचे केश लांब आणि सूर्याच्या किरणासारखे तेजस्वी होते. आकाश व पाताळ हेच याचे कान. पृथ्वी हेंच याचें कपाळ. गंगा आणि सरस्वती या याच्या श्रोणि व दोन्ही बाजूंचे महासागर याच याच्या भ्रुकुटि होत्या. चंद्र व सूर्य हे त्या विराट्पुरुषाचे डोळे होते तर संध्या ही त्याची नासिका होती. राजा, ओंकार ही त्या पुरुषाची स्मृति, विद्युत् ही त्याची जिव्हा, सोमपान करणारे पितर हे त्याचे दोन हात असें आम्हीं ऐकिलें आहे. गोलोक आणि

ब्रह्मलोक हे त्या महात्म्याचे ओंठ होत. गुणांनीं युक्त असलेली कालरात्रि ही त्या पुरुषाची मान होय. नाना प्रकारच्या मूर्तींनीं युक्त अशा या हयग्रीवाचें दर्शन घडून तो विश्वेश्वर परमात्मा अंतर्धान पावला आणि पाताळांत गेला आणि त्या ठिकाणीं योगसमाधि लावून बसला. नंतर त्यानें शिक्षाशास्त्रांत सांगितलेला सूर लावून त्या सुरामध्यें सामगायन आरंभिलें. त्याचा तो आवाज सर्व ठिकाणीं दुमदुमून राहिला होता आणि अत्यंत स्निग्ध असा होता. त्या सुरामध्यें लोकांचें हित करण्याचें अलौकिक सामर्थ्य होतें. त्या दोघां असुरांनीं वेदाला करारानें बांधून घेऊन पाताळांत डांबून ठेविलें व नंतर, ते दोघेजण आवाज ज्या बाजूनें येत होता तिकडे धांवले. इतक्या अवकाशांत हयग्रीवावतार धारण केलेल्या परमेश्वरानें पाताळांतील सर्व वेद हरण केले व ते ब्रह्मदेवाला देऊन टाकून तो पुनः आत्मस्वरूपीं लीन झाला. त्या हयग्रीवाची स्थापना त्यानें समुद्राच्या ईशान्य कोंपऱ्याला केली व त्या दिवसापासून तें घोड्याचें तोंड वेदांचें आश्रयस्थान होऊन बसलें. इकडे शब्दाच्या मार्गें धांवतां धांवतां त्या मधुकैटभ राक्षसांना अखेर जेव्हां कांहींच सांपडलें नाहीं तेव्हां ते अत्यंत वेगानें धांवत आले व ज्या ठिकाणीं त्यांनीं ते वेद ठेविले होते तें स्थान शून्य आहे असें त्यांच्या नजरेस पडलें. नंतर अत्यंत वेगवान् अशा त्या राक्षसांनीं त्या पाताळामधून पुनः एकदां उड्डाण केलें व सर्व सृष्टीचा आदिकर्ता जो नारायणप्रभु याचें दर्शन घेतलें. त्या भगवंताचें शरीर गौरवर्णाचें असून त्याची कांति चंद्रासारखी होती व तो अनिरुद्धरूपानें त्या ठिकाणीं स्थित होता. तो अमितपराक्रमी भगवान् त्या ठिकाणीं पाण्यावर रचलेल्या व त्याच्या बेताच्या अशा सर्पशय्येवर निद्रिस्त झाला होता. त्याची शय्या चारी बाजूंनीं अग्निज्वाळांनीं वेढिलेली होती. त्याचें सत्व निर्दुष्ट असून त्याची प्रभाहि पण सुंदर होती. त्या शेषशायी भगवंताला पाहिल्याबरोबर त्या दोघां राक्षसांनीं विकट हास्य केलें. रजोगुणानें व तमोगुणानें व्याप्त झालेले ते राक्षस आपसांत म्हणतात, "हा कोणीतरी गौरवर्णाचा पुरुष या ठिकाणीं झोंप घेत पडला आहे. यानेंच बहुधा पाताळांतून वेद हरण करून आणले असले पाहिजेत. हा कोण? कोणाचा? आणि या ठिकाणीं सर्पशय्येवर कां निजला असावा?" असें बोलून त्या दोघांनीं हरीला जागें केलें. युद्ध करण्याच्या इच्छेनें हे दोघेजण आले आहेत असें पाहून भगवान् पुरुषोत्तम जागा झाला. आणि त्या राक्षसांचें एकदां निरीक्षण करून त्यानें युद्ध करण्याचें मनांत आणलें. नंतर त्या दोघांचें व नारायणाचें फार मोठें युद्ध झालें. रजोगुणानें व तमोगुणानें व्याप्त झालेल्या त्या मधुकैटभ

राक्षसांचा मधुसूदनानें, ब्रह्मदेवाचें दुःख हरण करण्याच्या उद्देशानें वध केला. मधुकैटभांचा वध करून भगवान् पुरुषोत्तमानें ब्रह्मदेवाचा शोक वेद त्याचे त्याला परत देऊन नाहींसा केला. वेदांचें साहाय्य मिळाल्यामुळें ब्रह्मदेवाचें सामर्थ्य वाढलें आणि त्यानें सर्व स्थावरजंगम लोकांची उत्पत्ति केली. नंतर भगवान् हरीनें ब्रह्मदेवाला सृष्ट्युत्पत्तिसंबंधाचें अलौकिक बुद्धिसामर्थ्य दिलें व तो ज्या ठिकाणांतून आला तेथेंच अंतर्धान पावला. या हरीनें मधुकैटभ राक्षसांना मारिलें, व जगामधील प्रवृत्तिधर्म चालूं राहावा म्हणून तेंच हयग्रीवरूप घेऊन भगवंतानें आपलें कार्य चालूं केलें. परमेश्वरानें हयग्रीवावतार घेतल्याची कथा ही अशी आहे. पुराणांतील ही प्रख्यात कथा यशस्विनी व वदायिनी आहे. जो ब्राह्मण ही कथा नित्य ऐकेल व वाचील त्याची विद्या कधींहि नाश पावणार नाहीं. या हयग्रीवरूप परमेश्वराची आराधना करून देवानें सांगितलेल्या मार्गानें पंचाल राजानें क्रमविद्येचें ज्ञान संपादिलें. हे राजा, हयग्रीवाचें हें आख्यान तूं मला विचारिलेंस त्यावरून मी तुला सांगितलें आहे. ज्या ज्या वेळेस जें जें कार्य करण्याची पाळी येईल त्या त्या वेळेस त्या त्या कार्याला अनुरूप असलें रूप परमेश्वरानें आपणांमधूनच उत्पन्न करून तें तें कार्य पार पाडलें आहे. या भगवंताच्या ठिकाणीं सर्व वेद समावलेले असून हा तपश्चर्येचा अत्यंत मोठा असा निधि आहे. हा योगस्वरूप आहे, हा सांख्य होय. हा विभु परमेश्वर म्हणजे परब्रह्म असून यज्ञांतील अत्यंत श्रेष्ठ हविर्भाग तो हाच. वेद, यज्ञ, तपश्चर्या, सत्य व ऋत हीं सर्व नारायणपर आहेत. ज्या धर्माच्या आचरणानें पुनर्जन्माचा नाश होतो, तो धर्महि पण नारायणस्वरूपी असून परमात्मा नारायण हीच लोकांची परम गति होय. प्रवृत्तिलक्षण धर्मसुद्धां नारायणरूप आहे. पृथ्वीच्या ठिकाणचा श्रेष्ठतम गुण गंध, पाण्याचा गुण रस, तेजाचा गुण रूप, वायूचा गुण स्पर्श व आकाशाचा गुण शब्द हे सर्व नारायणात्मक आहेत. अव्यक्ताच्या गुणांनीं युक्त असलेलें मनसुद्धां नारायणापासून निर्माण झालेलें असून आकाशांतील तेजोगोलांच्या गतीचें नियमन करणारा काल हाहि पण नारायणरूप होय. कीर्ति, वाक्, आणि लक्ष्मी ह्या देवता आणि सांख्य व योग हीं शास्त्रें हीं सर्व नारायणात्मक आहेत. पुरुष, प्रधान, स्वभाव, कर्म व दैव हीं पांच जगत्कारणें परमेश्वररूपच होत. कोणत्याहि कार्याच्या सिद्धीला अवश्य असलेलीं, अधिष्ठान, कर्ता, करण, चेष्टा व दैव हीं पांच कारणें म्हणजे नारायणच होय. नाना प्रकारच्या युक्तिवादानें परमतत्त्व शोधूं इच्छिणाऱ्या जिज्ञासूंचें एकलें एक तत्त्व म्हणजे हा

नारायण प्रभु होय. ब्रह्मादि सगळे लोक, मोठमोठे महात्मे ऋषि, सांख्यशास्त्रवेत्ते व योगशास्त्रवेत्ते आणि ज्ञानी यति या सर्वांचें मनोगत नारायण जाणतो. पण नारायणाचें मनोगत कोणींहि जाणत नाहीं. सर्व लोकांमध्यें जे जे पुरुष दैवयज्ञ आणि पितृयज्ञ करितात, नाना प्रकारचीं दानें देतात व मोठमोठालीं पुरश्चरणें करतात त्या सर्वांचा आधार भगवान् विष्णु आहे. आपल्या ऐश्वर्याच्या सामर्थ्यानें हा सर्व भूतांच्या ठिकाणीं वास करितो म्हणून याला वासुदेव असें म्हणतात. हा नित्य आहे, परम श्रेष्ठ आहे, महर्षि आहे. याच्या विभूति फार मोठ्या असून हा स्वतः निर्गुण असूनहि गुणांशीं संयुक्त होतो. ऋतूंनीं प्रयुक्त केलेला काल, स्वतः ऋतुरूप नसतांना, ऋतुप्रेरणेनें जसा ऋतुरूप होतो त्याचप्रमाणें या परमेश्वराची स्थिति आहे. या महात्म्याची गति व अगति या दोहोंचेंहि ज्ञान इहलोकच्या पुरुषांना नाहीं. ज्ञानी महर्षींना मात्र हा गुणातीत पुरुष नित्य पाहावयास सांपडतो. ११.३.३४७.

---

## अध्याय ३४८ वा.

[ सात्वत धर्म अथवा एकांतिक धर्म ]

(१) जनमेजय—भगवान् परमेश्वर आपल्या सर्व एकांतिक भक्तांना संतुष्ट करतो व त्यांनीं केलेली पूजा ग्रहण करतो असें आपण सांगितलें; पण हें मोठें आश्चर्यकारक दिसतें. ज्या लोकांच्या वासना नाहींशा झाल्या आहेत व पुण्य व पाप हीं दोन्हींहि ज्यांच्या ठिकाणचीं नाहींशीं झालीं अशा लोकांना परंपरागत रीतीनें प्राप्त होणारें ज्ञान कसलें असतें तें आपण मला सांगितलें. अनिरुद्ध, प्रद्युम्न, संकर्षण व वासुदेव ह्या चतुर्व्यूहांपैकीं चवथी गति नारायणाच्या एकांत भक्तांना मिळते, असेंहि आपण मला सांगितलें. अनन्य भक्तीचा हा धर्म अत्यंत श्रेष्ठ असून नारायणाचा अत्यंत आवडता असा आहे. कारण ह्या भक्तीच्या योगानें अनिरुद्ध, प्रद्युम्न व संकर्षण ह्या तीन गतींतून जावें न लागतां एकदम चवथी श्रेष्ठ गति भक्तांना मिळते. जे ब्राह्मण वेदांचें व उपनिषदांचें यथाशिस्त अध्ययन करितात व जे संन्यासधर्मानें राहतात त्यांना मिळणाऱ्या गतीपेक्षांहि अनन्य भक्तांना मिळणारी गति श्रेष्ठ आहे असें मला वाटतें. हा धर्म कोणत्या महर्षीनें किंवा कोणत्या देवानें सांगितला; अनन्य भक्तांचा आचार कसा असावा व हा आचार कोणी व कसा घालून दिला, याबद्दल मला संशय आहे व ही माहिती

मला मिळावी अशी उत्कट इच्छाहि पण आहे. तेव्हां ही माहिती मला सांगून आपण माझ्या संशयाचें निरसन करा.

**वैशंपायन**—पूर्वी कौरव-पांडवांच्या उभय बाजूंचीं सैन्यें एकत्र जमलीं असतांना अर्जुनाच्या चित्तांत विषण्णता उत्पन्न झाली. त्या वेळेला प्रत्यक्ष भगवंतानें सांगितलेला ज्ञानमार्ग आणि उपासनामार्ग मी तुला सांगितला. ज्यांच्या पदरीं कांहीं पुण्य नाहीं अशा माणसांना हा गहन धर्म समजणें कठिण आहे. हा धर्म सामवेदाला संमत असून पूर्वी कृतयुगामध्यें हा निर्माण झालेला आहे. राजा, स्वतः नारायण या धर्माचें परिपालन करितात. हे महाराजा, पूर्वी याच संबंधांत अर्जुनानें नारदाला कृष्ण व भीष्म यांच्या देखत प्रश्न विचारिले होते. त्या वेळेला ऋषिमंडळीमध्यें बसलेल्या त्या महाभागाला नारदानें हा धर्म सांगितला. हा धर्म माझे गुरु जे व्यास त्यांनीं मला सांगितला व नारदानें त्या वेळेस जें सांगितलें तें मी तुला आतां सांगतों तें ऐक.

**नारद्**—ज्या वेळेला नारायणाच्या मुखांतून ब्रह्मदेवाचा जन्म झाला, त्या वेळेला स्वतः भगवान् नारायण आपलीं देवकार्यें आणि पितृकार्यें या धर्माला अनुसरून करीत असे. पुढें हा धर्म नारायणापासून फेनप ऋषींना मिळाला. फेनप ऋषींपासून तो वैखानस ऋषींना मिळाला आणि वैखानस ऋषींपासून तो धर्म सोमाला प्राप्त झाला. पुढें कांहीं काल हा धर्म गुप्त होता. पुनः ज्या वेळेला ब्रह्मदेवाचा दुसरा जन्म नारायणाच्या डोळ्यांवाटे झाला त्या वेळेला ब्रह्मदेवानें हा धर्म सोमापासून ऐकून घेतला व राजन्, त्यानें हा नारायण धर्म रुद्राला दिला. पुढें त्याच कृतयुगामध्यें योगधर्माचें आचरण करणाऱ्या रुद्रानें हा धर्म वालखिल्य ऋषींना शिकविला व नंतर ईश्वरी मायेनें हा पुनः कांहीं काळ लुप्त झाला. पुनः ब्रह्मदेवाचा तिसरा वाचिक जन्म ज्या वेळेला झाला, त्या वेळेला हा धर्म फिरून स्वतः नारायणापासूनच निर्माण झाला. नारायणापासून या धर्माची प्राप्ति सुवर्ण नांवाच्या ऋषीला झाली. उत्तम प्रकारच्या तपाचरणाच्या सामर्थ्यानें, दमानें व नियमानें या सुपर्णऋषीनें या धर्माचें रोज तीनदां आवर्तन केलें. त्यामुळें, या व्रताला 'त्रिसौपर्ण' असें म्हणतात. या त्रिसौपर्ण व्रताचा उल्लेख ऋग्वेद मंत्रांतून 'चतुष्कपर्दा युवतिः सुपेशा' इत्यादि तीन मंत्रांतून केलेला आहे. हें व्रत अत्यंत कठीण आहे. या सनातन धर्माचें अध्ययन सुपर्णापासून वायुदेवानें केलें, व वायूपासून हा धर्म विघसान्न भक्षण करणाऱ्या ऋषींना मिळाला व त्या ऋषींपासून हा धर्म महासागराला मिळाला.

तेथून तो पुन्हां एकदां नारायणाच्या ठिकाणीं लुप्त झाला. राजा, महात्म्या ब्रह्मदेवाचा फिरून ज्या वेळेला नारायणाच्या कानांतून जन्म झाला, त्या वेळेस काय झालें तें सांगतों, ऐक. पूर्वीं नारायणाच्या मनांत जगत्सृष्टि करण्याचें आलें. त्या वेळेला सृष्टि उत्पन्न करण्याला समर्थ असा पुरुष कोण, असा विचार भगवान् करूं लागले असतांना त्यांच्या कर्णांतून प्रजापति ब्रह्मदेव निर्माण झाले व नारायण ब्रह्मदेवाला म्हणतात, " हे पुत्रा, आपल्या तोंडापासून आणि पायापासून सर्व प्रजा निर्माण कर. मी तुझें कल्याण करीन व तुला बल आणि तेज हीं देईन. मी तुला सात्वत या नांवाचा धर्म शिकवीन तो शीक व त्या धर्मांत त्यांतून आधारावर कृतयुगांतील लोकांना आचाराचे नियम घालून दे." नंतर ब्रह्मदेवानें नारायणाला नमस्कार केला व त्याच्याजवळ या सात्वत धर्माचें त्याच्या रहस्यासकट आणि संग्रहासकट अध्ययन केलें. नारायणाच्या तोंडांतून निघालेल्या त्या धर्मांत त्यांतून निघालेल्या आरण्यकांचाहि अंतर्भाव झाला होता. ब्रह्मदेवाला हा धर्म शिकवून व तूं कृतादि युगधर्मांचा कर्ता होशील, असें सांगून भगवान् नारायण तमापलीकडच्या अव्यक्तांत लीन झाले. नंतर, सर्व लोकांचा पितामह वरद ब्रह्मदेव यानें सर्व स्थावर-जंगम लोक निर्माण केले. तेव्हां पहिल्या प्रथम शुभस्वरूप कृतयुग निर्माण झालें आणि या कृतयुगामध्यें सात्वत धर्माची प्रवृत्ति लोकांमध्यें झाली होती. जगताची उत्पत्ति करणाऱ्या ब्रह्मदेवानें याच आद्य सात्वत धर्मानें भगवान् नारायणाची पूजा केली. हा धर्म जगांमध्यें रूढ व्हावा व लोकांचें हित व्हावें या हेतूनें ब्रह्मदेवानें स्वारोचिष मनूला हा धर्म शिकविला. नंतर स्वारोचिषानें हा धर्म शंखपदाला शिकविला. पुढें शंखपदानेंहि हा धर्म आपला औरस पुत्र दिक्पाल सुवर्णाभ याला शिकविला. आणि तेथून पुढें तो अंतर्धान पावला. हे राजश्रेष्ठा, पुढें त्रेतायुगामध्यें ब्रह्मदेवाचा जन्म ज्या वेळेला नारायणाच्या नासिकेंतून झाला त्या वेळेला भगवंतानें हा धर्म ब्रह्मदेवाला पुनः कथन केला. व त्याच्या समक्ष भगवान् सनत्कुमारानें या धर्माचें अध्ययन केलें. सनत्कुमारापासून हा धर्म वीरण प्रजापतीला मिळाला. हे कुरुशार्दूला, वीरणानें हा रैभ्याला शिकविला. रैभ्यानें आपला शुद्ध आचरणाचा पुत्र जो सुवेधा त्याला हा धर्म सांगितला व पुढें सुवेधापासून दिक्पाल आणि धर्मिष्ठ असा जो कुक्षि नांवाचा राजा, त्याला हा धर्म मिळाला आणि तेथून तो अंतर्धान पावला. पुनः ब्रह्मदेवाचा ज्या वेळेस अंडज जन्म झाला त्या वेळेस हा धर्म नारायणाच्या मुखांतून पुनः उत्पन्न झाला. राजा, ब्रह्मदेवानें त्या धर्माचें स्वतः अध्ययन केलें व तो बर्हिषद नांवाच्या मुनिगणाला

शिकविला. बर्हिषदानें हा धर्म सामवेदाचें यथासांग अध्ययन केलेल्या व ज्येष्ठ सामाचें व्रत आचरण करणाऱ्या ज्येष्ठ नांवाच्या विख्यात ब्राह्मणाला शिकविला. हें ज्येष्ठसामव्रत परमेश्वराला अत्यंत आवडणारें आहे. त्या ज्येष्ठ नांवाच्या ब्राह्मणा-कडून हा धर्म अविकंपन राजाला मिळाला; नंतर, नारायणाचा हा धर्म पुढें कांहीं काळ गुप्तच राहिला. पुढें ब्रह्मदेवाचा हा सातवा पद्मज जन्म जेव्हां झाला त्या वेळेला स्वतः नारायणानें हा धर्म सृष्टिकर्त्या शुद्धरूप ब्रह्मदेवाला युगारंभीं सांगितला; नंतर ब्रह्मदेवानें हा धर्म दक्षाला सांगितला; दक्षानें हा आपला ज्येष्ठ दौहित्र बारा सूर्यरूपांत श्रेष्ठ जो आदित्य त्याला सांगितला; आदित्यानें विवस्वानाला दिला, विवस्वानानें मनुला दिला; मनूनें लोककल्याण करण्याच्या इच्छेनें आपला मुलगा इक्ष्वाकु याला शिकविला. इक्ष्वाकूनें शिकविलेला हा धर्म सर्व लोकांना व्यापून राहील व प्रलयाच्यावेळीं हा पुन्हां नारायणस्वरूपीं लीन होईल. हे राजा, यतींना विहित म्हणून जो धर्म सांगितला तो मी तुला या पूर्वींच हरिगीतेमध्यें संक्षेपानें सांगितला आहे. हा धर्म जगन्नाथ नारायणापासून नारदाला ससंग्रह व सरहस्य असा मिळाला. हे राजा, अशा प्रकारें चालत आलेला हा सनातन आद्य धर्म समजण्याला अत्यंत कठिण असून, याचें आचरण घडणेंहि कठिण आहे. सात्वत कुळांतले लोक याचेंच आचरण करितात. या धर्मज्ञानानें व त्याच्या सहाय्यानें यथाविधि केलेल्या अहिंसाप्रधान कर्मांनीं भगवान् नारायण संतुष्ट होतो. या धर्मांत आपापल्या अधिकाराप्रमाणें कांहीं लोक एकाच वासुदेवाच्या व्यूहाची उपासना करतांना दिसतात तर कांहीं वासुदेव आणि संकर्षण या दोन व्यूहांची उपासना करितांना दिसतात. कांहीं वासुदेव, संकर्षण व प्रद्युम्न या तीन व्यूहांची उपासना करतांना दिसतात, तर कांहीं वासुदेव, संकर्षण, प्रद्युम्न व अनिरुद्ध या चारहि व्यूहांची उपासना करतांना दिसतात. भगवान् हरि हा ममत्वरहित व निष्कल असा, सर्व प्राणि-मात्रांच्या ठिकाणचा क्षेत्रज्ञ जीव असून तो पंचमहाभूतांच्या शब्दादि गुणांना अगोचर आहे. पंचेंद्रियांना प्रेरणा देणारें जें मन तें मन म्हणजे हा हरीच होय. हा बुद्धिमान् नारायण हाच लोक-विधि. सृष्ट्युत्पत्तिकर्ताहि हाच. कर्ता आणि अकर्ता हाच. आणि कार्य व कारणहि हाच. राजा अव्यय पुरुष त्याच्या मनाला येईल त्या तऱ्हेनें क्रीडा करीत असतो. हा एकांतिक धर्म मीं गुरुप्रसादानें तुला सांगितला आहे. ज्यांच्या पदरीं पुण्य नाहीं, अशांना याची समजूत पटणें कठिणच होय. राजा, माझे गुरु, भगवान् धर्मरत वेदव्यास यांनीं धर्मराजाला

असें सांगितलें आहे कीं, परमेश्वराचे अनन्य भक्त या जगांत अत्यंत दुर्लभ आहेत. सगळें जग जर सर्वभूतहितरत, अहिंसक आणि ज्ञानी अशा नारायणाच्या अनन्य भक्तांनीं व्यापलें गेलें तर निष्काम कर्माचें आचरण करणारें कृतयुग पुनः प्राप्त होईल. व्यासांनीं सात्वत धर्माचें हें माहात्म्य कृष्ण, भीष्म व इतर महर्षि यांच्या देखत सांगितलें होतें. व्यासांना देखील हा धर्म नारदांनीं सांगितला होता. नारायणाचे अनन्य भक्त ज्या ठिकाणाला पोहोंचतात तें ठिकाण म्हणजे चंद्रासारखें तेजस्वी असें गौर वर्णाचें अच्युत ब्रह्मपदच होय.

**जनमेजय**—अशा प्रकारें शहाण्या शहाण्या लोकांनीं आचरलेला हा बहुविध धर्म आहे; तर मग, दुसऱ्या अनेक व्रतांचें आचरण करणारे लोक या धर्माचें आचरण कसें करीत नाहींत?

**वैशंपायन**—राजा, प्राणिमात्रांमध्यें परमेश्वरानें तीन प्रकारच्या प्रकृति निर्माण केल्या आहेत. कांहीं लोक सात्विक वृत्तीचे असतात, तर कांहीं राजस व कांहीं तामस वृत्तीचे असतात. हे गुरुश्रेष्ठा, सर्व प्राण्यांमध्यें सात्विक वृत्तीचा पुरुष श्रेष्ठ होय व तोच निश्चितपणें मोक्षाधिकारी होऊं शकतो. या मोक्षाधिकारी पुरुषाला ज्ञातिश्रेष्ठ असा कोणी तरी गुरु गांठावाच लागतो. मोक्ष हा नारायणस्वरूप असल्यानें तो सात्विकच होय. नारायणाच्या ठिकाणीं निष्ठा असणाऱ्या अनन्य भक्ताला परमेश्वराच्या चिंतनानें त्याच्या मनची गोष्ट प्राप्त होते. मोक्षमार्गाला लागणारे जे कोणी महात्मे संन्यासी सर्व वासनांचा त्याग करितात त्यांचा योगक्षेम परमेश्वर स्वतःच चालवितो. जन्ममरणाच्या प्रवाहांत सांपडलेल्या ज्या पुरुषावर परमेश्वराची कृपादृष्टि होईल तो सात्विक होय; आणि मोक्षमार्गाचा अधिकारीहि पण तोच. हा परमेश्वराच्या अनन्य भक्तांनीं आचरिलेला एकांतिक धर्म सांख्य व योग या शास्त्रांच्या तोडीचा आहे. मोक्ष हा नारायणस्वरूप असल्यानेंच नारायणाचे अनन्य भक्त नारायणपदाला म्हणजे मोक्षालाच जातात. मनुष्याला ज्ञानप्राप्ति सुद्धां नारायणाच्या कृपाप्रसादानेंच होते. स्वेच्छेनें ज्ञानप्राप्ति होणें हें कठिण आहे. राजा, राजस व तामस ह्या दोन्हीं प्रकृति सदोष आहेत. या प्रकृतींच्या लोकांकडे परमेश्वर स्वतः पहात नाहीं; तर, यांच्या वृत्तीकडे लोकपितामह ब्रह्मदेव पहात असतात. यांचें मन राजस आणि तामस भावांनीं व्याप्त झालेलें असतें. हे राजा, देव आणि महर्षि सात्विक असतात खरे, परंतु यांच्यामध्यें सत्वाचें, थोडें कां होईना, न्यून आढळतें आणि म्हणून यांना विकारयुक्त असें म्हटलें आहे.

**जनमेजय**—राजस व तामस प्रकृतीच्या अहंकारयुक्त माणसांना पुरुषोत्तमाची प्राप्ति कशी होते? जीवाला ब्रह्मात्मता कशी येते? हें सर्व आपणाला माहीत असेल तसें क्रमानें मला सांगा.

**वैशंपायन**—चोवीस तत्वांच्या पलीकडचा पंचविसावा निष्क्रिय जीवात्मा हा अत्यंत सूक्ष्म, तत्त्वस्वरूप आणि अकार उकार व मकार या तीन अक्षरांनीं युक्त असलेल्या ॐकाररूप परब्रह्माचे ठिकाणीं लीन होतो. हे राजा, पांचरात्र, सांख्यशास्त्र, योगशास्त्र व वेदांचा आरण्यक भाग हे परस्परांहून भिन्न नसून एकमेकांना पोषकच आहेत. नारायणाच्या भक्तीवर आधारलेला हा एकांतिक धर्म म्हणजे या सर्व मार्गांचें सार होय. समुद्रापासून निघालेले निरनिराळे जलौघ ज्याप्रमाणें फिरून त्याच्याच ठिकाणीं लीन होतात, त्याप्रमाणें नारायणापासून निघालेले हे ज्ञानाचे निरनिराळे जलौघ फिरून त्याच्याच ठिकाणीं लय पावतात.

हे राजा, याप्रमाणें हा सात्वत धर्म मीं तुला सांगितला आहे. या धर्माचें तूं यथान्याय व यथाशक्ति आचरण कर. पूर्वीं हा धर्म अशाच रीतीनें महाभाग नारदांनीं माझे गुरु महर्षि व्यास यांना सांगितला होता. या धर्माच्या आचरणानें गृहस्थ व संन्यासी या दोघांनाहि एकच कैवल्यगति मिळते. व्यासांनीं हा धर्म धर्मपुत्र युधिष्ठिराला सांगितला. तोच हा धर्म आज मी तुला सांगत आहें. ह्या धर्माचा प्रसार माझ्या गुरूंनीं केला. राजन्, ह्या धर्माचें आचरण अत्यंत कठिण असून तुझ्याप्रमाणेंच सर्व लोकांना या धर्मासंबंधानें व्यामोह उत्पन्न होतो. भगवान् श्रीकृष्ण हा सर्वांचा पालक असून लोकांना व्यामोह उत्पन्न करणारा, व त्याचा सत्वर लय करणाराहि तोच. तोच या जगाचें आदिकारणहि आहे. १२. ३. ३४८.

---

## अध्याय ३४९ वा.

[ ( १. ) सांख्य, योग, पंचरात्र व आरण्यक हीं एकस्वरूप कीं भिन्न ?

( २. ) व्यासांची उत्पत्ति. ]

( १ ) **जनमेजय**—सांख्य, योग, पंचरात्र व आरण्यक हे सर्व ज्ञानमार्ग या लोकांमध्यें प्रचलित आहेत. हे सर्व एकस्वरूप आहेत कीं भिन्नस्वरूप आहेत, याचें विवेचन मला नीट करून सांगा.

( २ ) **वैशंपायन**—सत्यवतीनें पराशराशीं संगम करून ज्या परमज्ञानी व अत्युदार व्यास महर्षींना द्वीपामध्यें जन्म दिला त्या अज्ञानांधकाराचा नाश करणाऱ्या मुनींना माझा नमस्कार असो. पितामह ब्रह्मदेवाचा आदियंता जो भगवान् नारायण याचा सहावा अवतार असें व्यासांना म्हणतात. व्यास हे हिरण्यगर्भ ऋषीच्या सर्व ऐश्वर्यानें युक्त असून नारायणाच्या अंशानें अवतीर्ण झालेले आहेत. व्यास महर्षि हा वेदज्ञानाचा अपार सागरच होय. पूर्वींच्या काळीं विभूतिमान् व उदारतेज नारायणानें अज, पुराण व वेदार्थसागर अशा महात्म्या व्यासांना आपले पुत्र म्हणून निर्माण केलें.

**जनमेजय**—हे ब्रह्मन्, वसिष्ठाचा पुत्र शक्ति, शक्तीचा पुत्र पराशर व पराशराचा पुत्र कृष्णद्वैपायन व्यास अशी परंपरा आपण पूर्वी वंशकथन करितांना सांगितली होती. आणि, आतां आपणच पुन्हां व्यास हे नारायणाचे पुत्र असें म्हणतां; तेव्हां नारायणापासून झालेला व्यासांचा जन्म हा पराशरापासून झालेल्या जन्मापूर्वींचा तर एकादा जन्म नव्हे ना? नारायणापासून झालेल्या व्यासजन्माची हकीकत, हे महामुने, आपण मला सांगा.

**वैशंपायन**—महाभारताची रचना करून तपश्चर्येनें श्रांत झालेले आमचे ज्ञाननिष्ठ व तपोनिधि गुरु वेदार्थ जाणण्याचे इच्छेनें हिमालय पर्वतावर बसले असतां आम्हीं त्यांची एकनिष्ठेनें शुश्रूषा करीत होतों. सुमंतु, जैमिनि, पैल, मीं व व्यासपुत्र शुकाचार्य असे आम्हीं पांचजण भोंवतालीं बसलों असतांना ते व्यासमहर्षि भूतांच्या परिवारानें भूतपति शंकर जसा शोभून दिसावा तसे शोभून दिसत होते. सांग वेदांचीं आवर्तनें करीत असणाऱ्या, भारतार्थाचा सर्व बाजूंनीं एकाग्र चित्तानें विचार करणाऱ्या व दमनशील अशा व्यास महर्षींची आम्हीं युक्तचित्तानें उपासना केली. एकदा कांहीं गोष्टीवरून आम्हीं त्यांना वेदार्थासंबंधानें, भारतार्थासंबंधानें व त्यांच्या नारायणापासून झालेल्या जन्माबद्दल प्रश्न विचारले. त्यावर व्यासांनीं पहिल्या प्रथम वेदार्थ आणि भारतार्थ यांचें विवरण केलें व नारायणापासून झालेल्या आपल्या जन्माची हकिगत सांगण्यास सुरवात केली.

**व्यास**—हे ब्राह्मणहो, फार पूर्वींच्या काळीं सांगितलें गेलेलें, माझ्या तपोबलाच्या योगानें समजलेलें असें हें ऋषिप्रणीत उत्तम प्रकारचें आख्यान मी तुम्हांला सांगतों, तें ऐका. ब्रह्मदेवाच्या सातव्या पद्मज जन्माच्या वेळीं सृष्टि

उत्पन्न करण्याचा प्रसंग उत्पन्न झाला असतांना शुभाशुभाचा विधिनिषेध नसलेल्या अत्यंत तेजस्वी महायोगी नारायणानें आपल्या नाभिकमलांतून प्रथम ब्रह्मदेवाला निर्माण केलें व नंतर स्वतः प्रकट होऊन त्या ब्रह्मदेवाला भगवान् नारायण म्हणाले, " हे ब्रह्मदेवा, तूं माझ्या नाभिकमलापासून सृष्टि निर्माण करिण्याकरितां उत्पन्न झाला आहेस; तेव्हां, सर्व प्रकारच्या विविध प्रजा तूं निर्माण कर." हें वाक्य ऐकून ब्रह्मदेवानें तोंड फिरविलें; आणि चिंतेनें व्यथित होऊन वरद परमेश्वराला नमस्कार करून तो त्याला म्हणतो, " भगवन्, आपणांला नमस्कार असो. सृष्टि निर्माण करण्याचें असें कोणतें सामर्थ्य माझ्या ठिकाणीं आहे ? देवा, मी अज्ञानी आहें. यावर आपण काय उपाय योजावयाचा असेल तो योजा." हें ब्रह्मदेवाचें भाषण ऐकून भगवान् अंतर्धान पावले आणि त्या बुद्धिमच्छ्रेष्ठ भगवंतानें बुद्धीचें ध्यान केलें. त्याबरोबर बुद्धि प्रत्यक्ष रूपांत प्रकट होऊन प्रभूच्या पुढें उभी राहिली. स्वतः योगरहित असणाऱ्या भगवंतानें त्या बुद्धीला योगयुक्त केलें व ऐश्वर्ययोगाशीं युक्त झालेल्या त्या बुद्धीला अव्यय भगवान् म्हणाले कीं, सृष्ट्युत्पत्तीचें कार्य सिद्ध करण्यासाठीं तूं ब्रह्मदेवाच्या शरीरांत प्रवेश कर. नंतर ईश्वराच्या आज्ञेनें, बुद्धीनें ब्रह्मदेवाच्या शरीरांत प्रवेश केला व त्या बुद्धियुक्त झालेल्या ब्रह्मदेवाला भगवंतांनीं पुनः त्याच्यासमोर प्रकट होऊन सांगितलें कीं, आतां ह्या सर्व विविध प्रजा निर्माण कर. ब्रह्मदेवानें " आपली आज्ञा प्रमाण, " असें उत्तर दिल्यावर भगवान् नारायण त्याच ठिकाणीं अंतर्धान पावले आणि क्षणार्धामध्यें आपल्या देव नांवाच्या ठिकाणीं येऊन तेथें प्रकृतीशीं एकरूप होऊन राहिले.

इकडे ब्रह्मदेवानें नाना प्रकारची सृष्टि निर्माण केली. दैत्य, दानव, गंधर्व, राक्षस इत्यादिकांनीं गजबजलेली ती पृथ्वी पाहून भगवान् नारायणाच्या मनांत असा आणखी एक विचार आला कीं, ही बिचारी पृथ्वी दैत्यदानवांच्या भाराखालीं वांकून गेली आहे. हे दैत्य, दानव आणि राक्षस पृथ्वीवर अत्यंत बलिष्ठ होतील व नाना प्रकारची तपश्चर्या करून उत्तम उत्तम वर प्राप्त करून घेतील. वरप्राप्तीच्या साधनानें गर्विष्ठ झालेले ते असुर आमच्या तपोधन ऋषींना व देवांना अत्यंत त्रास देतील. म्हणून ह्या पृथ्वीचा भार हलका करणें हें न्याय्य होय. याकरितां क्रमाक्रमानें मला नाना प्रकारचीं रूपें धारण करावीं लागतील. पापी लोकांचा नाश केल्यानें व साधूचें रक्षण केल्यानें या बिचाऱ्या पृथ्वीचें धारण केल्यासारखें होईल. पाताळांत जाऊन व शेषाचें रूप घेऊन मीच ही

पृथ्वी उचलून धरितों व मीं धारण केलेली ही पृथ्वी सर्व चराचर विश्वाचा आधार होत असते. म्हणून अवतार घेऊन मला पृथ्वीचें रक्षण करणें जरूर आहे.

अशा प्रकारचा विचार करून त्या भगवान् मधुसूदनानें पृथ्वीच्या धारणासाठीं आपलीं नाना प्रकारचीं रूपें प्रकट केलीं. वराह, नारसिंह व मनुष्यरूपानें वामन असे अवतार घेऊन त्यानें असा विचार मनांत आणला कीं, या रूपांनीं मला देवांच्या दुष्ट शत्रूंना मारावयाचें आहे. एकदां त्या जगत्स्रष्ट्या परमेश्वरानें 'भोः' या शब्दानें भोंवतालचा प्रदेश दुमदुमून सोडून तोंडांतून कांहीं शब्द उच्चारिले. त्या भगवंताच्या वाणीपासून 'अपांतरतमा' नांवाचा पुत्र निर्माण झाला. हा पुत्र सत्यवादी व दृढव्रत असून त्याला भूत, भविष्य व वर्तमान या तीन्हीं कालांचें ज्ञान होतें. तो देवापुढें मस्तक नम्र करून उभा राहिला असतांना भगवान् त्याला म्हणतात, "हे धीमच्छ्रेष्ठा, वेदांचा प्रसार करण्याकडे तूं आतां आपलें लक्ष लाव. हे मुने, मी सांगतों याप्रमाणें कार्य कर." पुढें स्वायंभुव मन्वंतराच्या वेळीं त्या ऋषीनें वेदांचे विभाग केले. त्या त्याच्या कृत्यानें भगवंताला अत्यंत संतोष झाला व त्यानें त्या ऋषीला सांगितलें कीं, "तुझ्या दृढ तपश्चर्येनें, यमनियमांनीं व आचारांनीं तूं प्रत्येक युगांत अशाच प्रकारें वेदांचा प्रवर्तक होशील. हे ब्रह्मन्, तुझी कीर्ति अढळ राहून कोणीहि तुझा पराभव करूं शकणार नाहीं. कलियुग प्राप्त झालें असतांना भरत—कुलामध्यें कुरु नांवाचे विख्यात महात्मे राजे होतील. त्यांच्याशीं तुझ्यापासून उत्पन्न झालेल्या तुझ्या वंशजांचा विग्रह होईल. या कलहामुळें त्या सर्वांचा नाश होईल. पण त्यांतून तूं मात्र वांचशील. त्या कलियुगांतसुद्धां तुझ्या तपोबलानें तूं वेदांचे अनेक विभाग करशील. कलियुगाचा वर्ण काळा; म्हणून, कलियुग प्राप्त झालें असतांना तुझा वर्ण काळा होईल. तूं नाना प्रकारच्या धर्मांचा प्रणेता व ज्ञानांचा प्रसारकर्ता होशील. तुझ्या ठिकाणीं तपासंबंधींची निष्ठा राहील. पण, वासनाजालांतून मात्र तूं सर्वथा विमुक्त होणार नाहींस. तुझा मुलगा मात्र शंकराच्या प्रसादानें सर्वथा वासनारहित होईल. हे ऋषे, माझें हें वचन कदापिहि खोटें होणार नाहीं. ब्रह्मदेवाचा बुद्धिमान् मानसपुत्र म्हणून मोठेमोठे ब्राह्मण ज्याची कीर्ति गातात, ज्याचें तेज सूर्याहूनहि आगळें आहे, अशा सर्वश्रेष्ठ व तपोनिष्ठ वसिष्ठाच्या कुलांत पराशर नांवाचा महाप्रभावशाली महर्षि निर्माण होईल. हे मुने, तो अत्यंत श्रेष्ठ प्रकारचा वेदार्थसागर व तपश्चर्येचें जणूं माहेरघर

असा महातपस्वी ऋषि तुझा पिता होईल व आईवांचून केवळ बापाच्या घरीं वाढलेल्या एका कुमारीच्या पोटीं या ऋषींपासून तुझा जन्म होईल. भूत, भविष्य व वर्तमान या तीन्ही कालाबद्दल तुला कोणतीहि शंका राहाणार नाहीं. कृतादि चारी युगांचे पूर्वी जे हजारों फेरे होऊन गेले त्या सर्वांचें तुझ्या तपःसामर्थ्यानें तुला दर्शन होईल व या चतुर्युगांचें पुढें होणारे हजारों फेरेहि पण तुझ्या दृष्टिपथांत येऊं शकतील. तसेंच ज्या ज्या वेळीं तूं माझें ध्यान करशील, त्यावेळीं अनादिनिधन असा चक्रहस्त परमेश्वर तुला दर्शन देईन. हे मुने, माझें हें वचन अन्यथा होणार नाहीं. हे महासत्त्वा, जगामध्यें तुझी ख्याति चांगली होईल. पुढें सूर्याचा पुत्र शनैश्वर हा मनु होणार आहे. त्याच्या मन्वंतरामध्यें मन्वादिगणांनीं युक्त असा व्यास तूंच होणार आहेस, यांत कांहीं संशय नाहीं. या जगांत जें जें कांहीं आहे, तें तें सर्व मींच केलेलें आहे. आतां अज्ञानानें कोणी कोणालातरीच कर्ता समजतो. बाकी मी मात्र माझ्या इच्छेला येईल तें करतों." अशा प्रकारें भगवंतांनीं अपान्तरतमा ऋषींना उद्देशून भाषण केल्यानंतर त्यांना 'जा' म्हणून निरोप दिला. पुढें त्या भववंताच्या प्रसादानें व त्याच्या आज्ञेनें अपान्तरतमा या नांवानें मीं जन्म घेतला. आणि नंतर पुनः वसिष्ठाच्या कुळांत पाराशर म्हणून या व्यासरूपानें अवतीर्ण झालों. हे विप्रहो, नारायणाच्या प्रसादानें व त्याच्याच अंशानें प्राप्त झालेल्या माझ्या पूर्वींच्या जन्माची हकिगत मी तुम्हांला सांगितली. पूर्वीं मीं फार मोठी तपश्चर्या केली. हे शिष्यहो, तुम्ही मला जी हकिगत विचारलीत, ती सर्व मागचीपुढची हकिगत तुमच्यावरच्या माझ्या प्रेमामुळें मी तुम्हांला सांगितली.

**वैशंपायन**—हे राजा, आमचे गुरु, जे शांतचित्त व्यासमहर्षि त्यांच्या जन्माची ही हकीगत मी तुला सांगितली. हे राजर्षे, सांख्य, योग, पांचरात्र, वेद व पाशुपतदर्शन हीं नाना प्रकारच्या मतांचीं निदर्शक अशीं दर्शनें आहेत. महर्षि कपिल हे सांख्यशास्त्रवेत्ते होत. हिरण्यगर्भाइतका पुरातन योगशास्त्रवेत्ता दुसरा कोणीहि नाहीं. अपांतरतमा ऋषि हा वेदाचार्य होय. याच ऋषीला कांहीं लोक प्राचीनगर्भ असें म्हणतात. पाशुपत शास्त्राची उत्पत्ति ब्रह्मदेवाचे पुत्र, उमापति, भूतपति, व श्रीकंठ असे जे अव्यग्र शंकर त्यांच्यापासून झाली. सगळ्या पांचरात्र शास्त्राचा उत्पत्तिकर्ता स्वतः भगवान् नारायण हा आहे. हे राजा, हें पांचरात्रागमाचें ज्ञान सर्व ज्ञानांना व्यापून आहे व शास्त्रें व दर्शनें हीं कितीहि भिन्न झालीं, तरी त्या सर्वांची परम गति म्हणजे भगवान् नारायणच होय. आतां,

कांहीं मोहग्यास लोकांना ही गोष्ट उमगत नाहीं, हा भाग निराळा. मोठमोठे शास्त्रवेत्ते लोक, "हा नारायणऋषि हीच सर्वांची अखेरची गति होय" असें सांगतात आणि त्याच्यावांचून दुसरी गतीच नाहीं, असें माझेंहि मत आहे. सर्व निःसंशय व स्वच्छ अशा तत्त्वांमध्यें भगवान् वास करीत असतो. ज्या ठिकाणीं संशयाचीं व कुतर्कांचीं जाळीं पसरलीं आहेत अशा जागीं भगवंताचा वास नाहीं. हे राजा, पांचरात्रदर्शनाचें ज्ञान ज्यांना यथाक्रम रीतीनें झालें व ज्यांची निष्ठा अनन्य झाली, ते सगळे हरीच्या ठिकाणीं लीन होतात. सांख्य आणि योग हीं दोन सनातन दर्शनें आहेत. व सगळे वेद हेहि पण सनातन आहेत. सगळ्या ऋषींनीं असें सांगितलें आहे कीं, हा नारायण म्हणजेच हें विश्व होय. सर्व लोकांमध्यें जीं जीं शुभाशुभ कर्मे केलीं जातात, तीं तीं सर्व स्वर्गांतलीं, अंतरिक्षांतलीं, पृथ्वीतलावरलीं व जलांतलीं कर्मे या नारायणऋषीच्या प्रेरणेनें होतात असें समजावें. १२. ३. ३४९.

---

## अध्याय ३५० वा.

[ पुरुष एक कीं अनेक ? १ यांतील श्रेष्ठ कोण व सृष्टिकर्ता कोण ? ब्रह्मरुद्र संवाद. ]

**जनमेजय**—ब्रह्मन्, पुरुष एक कीं अनेक ? अनेक असतील तर यांच्यांतील श्रेष्ठ कोण ? व या सर्वांचें उत्पत्तिस्थान कोणतें ?

**वैशंपायन**—सांख्यशास्त्र आणि योगशास्त्र यांच्या म्हणण्याप्रमाणें जगांत अनेक पुरुष आहेत. हे कुरुकुलोद्धारा, एकच पुरुष या जगाला व्यापून राहिला आहे, हें मत या शास्त्रांना मान्य नाहीं. आतां अनेक पुरुषांचें उत्पत्तिस्थान असें ज्याला म्हणतां येईल अशा त्या गुणातीत विश्वरूप परमेश्वराबद्दलचें निरूपण मी तुला सांगतों, तें ऐक. पण असें करण्यापूर्वी तपोनिष्ठ, दान्त, आत्मज्ञानी व वंद्य अशा व्यासगुरूंना मी प्रणाम करितों. हे राजा, सर्व वेदांमध्यें हें पुरुषसूक्त ऋत व सत्य म्हणून विख्यात आहे व ऋषिश्रेष्ठ व्यासांनीं याचा विचार केला आहे. हे भारता, कपिलादि ऋषींनीं तत्वज्ञानविषयक अशीं जीं शास्त्रें लिहिलीं, त्यांची मांडणी त्यांनीं मुख्य सिद्धांत व त्यावरील अपवाद अशा तऱ्हेची केली आहे. परंतु, व्यास ऋषींनीं विश्वाला व्यापून असणारा पुरुष एकच एक आहे या संबंधाचें संक्षिप्त विवरण केलें आहे. तें त्यांच्याच प्रसादामुळें मी तुला सांगतों, तें ऐक. या संबंधामध्यें ब्रह्मदेवाचा आणि शंकराचा झालेला एक जुना संवाद पुरा-

तन इतिहास म्हणून सांगतात. हे राजा, क्षीरसमुद्राच्या मध्यभागीं सोन्यासारखा तेजस्वी असा ' वैजयन्त ' नांवाचा एक पर्वत आहे. या वैजयन्त पर्वतावर अध्यात्मशास्त्राचें एकांतांत चिंतन करण्यासाठीं ब्रह्मदेव आपल्या वैराग नांवाच्या ठिकाणाहून नित्य येत असतात. एकदां तो चतुर्वक्त्र भगवान् ब्रह्मदेव त्या वैजयन्त पर्वतावर बसला असतांना त्याच्या कपाळांतून जन्माला आलेला शिव सहज त्या ठिकाणीं आला. हा महायोगी शंकर प्रभु आकाशमार्गानें जात असतांना सहज त्या पर्वताच्या माथ्यावर उतरला आणि पुढें जाऊन त्यानें ब्रह्मदेवाच्या पायांचें वंदन केलें. भगवान् शंकरानें याप्रमाणें आपल्या पायांचें वंदन केलेलें पाहून ब्रह्मदेवानें आपल्या उजव्या हातानें त्याला उठविलें, व फार दिवसांनीं भेटलेल्या आपल्या पुत्राला तो म्हणाला, "हे महाबाहो, तुझें मी आनंदानें स्वागत करितों. तूं आतां माझ्या समीप आलास ही मोठ्या आनंदाची गोष्ट होय. पुत्रा, तुझें कुशल आहेना ? तुझें अध्ययन आणि तपश्चर्या हीं नीट चाललीं आहेत ना ? तूं अत्यंत खडतर तपश्चर्या करणारा आहेस म्हणून ही गोष्ट मी तुला पुनःपुनः विचारीत आहें.

रुद्र—भगवन् आपल्या कृपाप्रसादानें माझें अध्ययन व तपश्चर्या हीं ठीक चाललीं आहेत व मी कुशल आहें. तसेंच सर्व जगहि ठीक आहे. फार दिवसांपूर्वीं मी आपल्याला वैराजसदनामध्यें पाहिलें होतें. नंतर, आपल्या चरणस्पर्शानें पावन झालेल्या या पर्वतावर मी आज आलों आहें. भगवंता, आपल्या एकांतवासानें माझ्या मनामध्यें अत्यंत उत्कंठा उत्पन्न केली असून आपल्या या एकांत-वासाचें कारण तसेंच कांहीं मोठें असावें, असें मला वाटतें. हे पितामहा, ज्या ठिकाणीं भूक व तहान यांची बाधा नाहीं, जेथें अत्यंत तेजस्वी ऋषि व देव-दानव रहातात, ज्या ठिकाणीं गंधर्व व अप्सरा यांचा सततचा वास आहे असलें तें आपलें श्रेष्ठ ठिकाण टाकून या पर्वतावर आपण एकटे कां आलां ?

ब्रह्मदेव—या वैजयन्त पर्वतावर सतत राहून मी एकाग्र मनानें विराट्पुरुषाचें चिन्तन करीत असतों.

रुद्र—हे ब्रह्मन् आपण स्वयंभू आहांत. आपण आजपर्यंत अनेक पुरुष निर्माण केले; व पुढेंहि कराल. आपण सांगतां हा विराट्पुरुष एकचएक आहे. आपण ज्याचें चिन्तन करतां, असा हा एकचएक पुरुषोत्तम कोण; याबद्दल माझ्या मनांत संशय आहे, तो आपण दूर करावा. कारण, याबद्दल मला मोठी जिज्ञासा उत्पन्न झाली आहे.

ब्रह्मदेव—हे पुत्रा, तूं अनेक पुरुष म्हणून जें सांगितलेंस तें तर स्पष्टच आहे. तेव्हां या गोष्टीला शास्त्रप्रामाण्याची जरूर नाहीं. शास्त्र हें न समजणारी गोष्ट समजून सांगण्याकरितां आहे. तेव्हां या जगाला व्यापून राहणारा पुरुष एकच एक आहे, या न समजणाऱ्या गोष्टीला शास्त्राचा आधार काय, तो मी तुला सांगतों. याच आधारावर हा विश्वरूप परमात्मा या अनेकांचा आधार आहे, असें समजलें जातें. या अत्यंत श्रेष्ठ सूत्रात्म्या विराट्पुरुषाच्या ठिकाणींच हे सर्व अनिरुद्धादि चारी व्यूह निगुण होऊन प्रवेश करीत असतात. अर्थात् काय ज्याच्या ठिकाणीं लीन होतें तें त्या कार्याचें कारण या न्यायानें या अनेक पुरुषांचा आधार हा एकला एक विराट्रूपी परमेश्वरच होय, हें उघड आहे. १२.३.३५०.

---

## अध्याय ३५१ वा.

[ नारायणाख्यानाची समाप्ति. ]

ब्रह्मदेव : हे पुत्रा, हा पुरुष शाश्वत, अव्यय, अक्षय, अप्रमेय व सर्वग आहे असें याचें निर्वचन केलें जातें. हा पूर्ण म्हणून पुरुष; अनाद्यनंत म्हणून शाश्वत; याच्यांत कधींहि फेरबदल होत नाहीं म्हणून हा अव्यय; याला क्षय नाहीं म्हणून हा अक्षय; मनानें व वाचेनें याचें मान ठरवितां येत नाहीं, म्हणून हा अप्रमेय व याचा संचार सर्वत्र आहे म्हणून हा सर्वग होय. या पुरुषाचें दर्शन तुला किंवा मला अगर कोणत्याहि सगुण किंवा निर्गुण प्राण्याला घडणें दुर्लभ होय. फक्त ज्ञानामुळेंच याचें दर्शन होऊं शकतें. हा स्वतः अशरीर असून प्राणिमात्रांच्या शरीरांचे ठिकाणीं वास करतो व त्यांच्या शरीरांत राहूनहि त्यांनीं केलेल्या कर्मांचा लेप याला लागत नाहीं. हा जसा माझ्या देहांत आहे तसाच तुझ्याहि देहांत आहे. या जगांत जेवढे म्हणून देहयुक्त प्राणी आहेत त्या सर्वांच्या ठिकाणीं हा साक्षिरूपानें आहे. परंतु, कोणाला आणि कोठेंच सांपडत मात्र नाहीं. याला सर्व बाजूंनीं तोंडें, हात, पाय, डोळे आणि घ्राणेंद्रियें आहेत व हा एकटा एकच मनाला येईल त्याप्रमाणें सर्व देहांतून संचार करीत असतो. हीं सर्व शरीरें हीं क्षेत्रें व मनुष्याच्या ज्या शुभाशुभ कर्मांनीं त्याला जन्म येतो तीं कर्में हीं बीजें असें ज्ञान या योगात्म्या पुरुषाला असतें म्हणून याला क्षेत्रज्ञ म्हणतात. प्राणिमात्रांच्या ठिकाणची याची गति किंवा अगति यांचें ज्ञान कोणालाच होणें शक्य नाहीं. सांख्यशास्त्र व योगशास्त्र यांच्या सहाय्यानें मीं याचें सारखें चिंतन

करून राहिलों आहें. परंतु, त्याची ती परमगति मला अजूनहि उमजली नाहीं. तथापि, मला समजेल त्याप्रमाणें त्या सनातन पुरुषाचें स्वरूप मीं तुला सांगतों, ऐक. हा सनातन पुरुष एकलाएक केवलरूप असून सर्वश्रेष्ठ आहे. महापुरुष हा शब्द त्याला एकट्यालाच लागू पडण्यासारखा आहे. अनेक मनुष्यें ज्याप्रमाणें एकाच अग्नींत हवन करितात; तपश्चर्या करणारे अनेक पण सर्वांचें उपास्य जसें सूर्य हा एकच देव; पाण्याचे प्रवाह अनेक पण त्यांची गति जशी समुद्र ही एकच, त्याप्रमाणें प्राणिमात्रांची एकच एक गति म्हणजे हा केवलस्वरूप परमेश्वर होय. सर्व प्राणी त्या निर्गुणाच्या ठिकाणीं लीन होतात. सर्व गुणात्मक कर्मांचा, सर्व शुभाशुभांचा व सत्यानृतांचा त्याग केल्यानें याला निर्गुणत्व येतें. या अचिंत्य परमेश्वराचें ज्ञान करून घेऊन, सत्तामात्रानें स्थित असलेल्या त्याच्या अनिरुद्धादि चतुर्व्यूहांचें ज्ञान करून घेऊन जो मनुष्य गर्वरहित रहातो त्यालाच त्या पुरुषाच्या चरणापाशीं शुभ गति मिळते. कांहीं पंडित याला परमात्मा म्हणतात; कांहीं एकात्मा म्हणतात तर कांहीं तत्त्ववेत्ते याला नुसतें 'आत्मा' असेंच म्हणतात. या सर्वांच्या ठिकाणीं एकरूपानें स्थित असणारा परमात्मा हा नित्य व निर्गुण आहे. हाच नारायण व सर्वव्यापी पुरुष तो हाच. कमळाच्या पानांवर पडलेल्या पाण्याच्या थेंबांनीं तें पान जसें ओलें होत नाहीं त्याप्रमाणेंच कर्मांच्या फलांचा लेप या पुरुषाला लागत नाहीं. कर्मांच्या उपाधींनीं बद्ध होणारा जीव हा या निर्गुण पुरुषाहून भिन्न असून मोक्षाची व बंधाची भाषा त्याला लागू पडते. सतरा तत्वांच्या संघातानें बनलेल्या लिंगशरीरांची उपाधि मागें लागली असल्यानें हा जीव नाना रूपें धारण करितो आणि म्हणूनच पुरुष अनेक आहेत असें म्हणतात. सर्व लोकव्यवहारांचा प्रेरक जो परमात्मा तेंच ज्ञेय होय. परमात्म्याचें सोपाधिक रूप जो जीवात्मा तो ज्ञाता होय. ज्ञाता आणि ज्ञेय हीं दोन्ही एकरूपच आहेत. विचार करणारा आणि त्याच्या विचाराचा विषय; पिणारा आणि प्राश्य वस्तु; वास घेणारा आणि वासाची वस्तु; स्पर्शाचा विषय व त्याला स्पर्श करणारा; पाहणारा व त्याच्या दृष्टीचा विषय; ऐकणारा व त्याच्या श्रवणाचा विषय; ज्ञाता आणि ज्ञेय; सगुण आणि निर्गुण या सर्व जोड्या एकरूपच होत. बाबारे, या जगांत प्रधान ही संज्ञा ज्याला लावतात तें सर्व या शाश्वत व अव्यय पुरुषाचेंच रूप होय. ब्रह्मदेवानें जें तत्त्व पहिल्या प्रथम उत्पन्न केलें त्याला द्विजश्रेष्ठ ऋषि अनिरुद्ध असें म्हणतात. लोकांमध्यें जीं जीं काम्य वैदिक कर्में व्यवस्थित तऱ्हेनें केलीं जातात तीं सर्व व हें अनिरुद्ध तत्त्व

हीं सगळीं त्या विराट्स्वरूप पुरुषार्चींच रूपें होत. सर्व कर्मे त्याला उद्देशून करावयाचीं असतात. सर्व देव व शांतात्मे मुनि याच यज्ञपुरुषाला उद्देशून होमशाळेंत यज्ञाहुति देतात. मीं सर्वश्रेष्ठ ब्रह्मदेव; प्रजांचा आदिशास्ताहि मींच. पण मलाहि त्या नारायणापासूनच जन्म घ्यावा लागला. तुझा जन्म माझ्यापासून आहे. हें सर्व स्थावरजंगम जगत् व सरहस्य असे सर्व वेद हे माझ्यापासूनच निर्माण झाले. विराट्स्वरूप परमात्मा अनिरुद्धादि चार रूपें घेऊन त्याच्या इच्छेस येईल त्याप्रमाणें क्रीडा करीत असतो. याप्रकारें परमात्मस्वरूपाची प्रतीति त्याच्या ज्ञानामुळेंच होऊं शकते. म्हणजे, सोपाधिक जीवाला आत्मस्वरूपाचें ज्ञान झालें म्हणजे तोच परमात्मरूप होतो. जीवाची ही परमात्मदशा म्हणजेच परमात्म्याची प्रतीति होय. हे पुत्रा, याप्रमाणें तूं विचारल्यावरून सांख्य व योगशास्त्रांत वर्णन केल्याप्रमाणें हें दर्शन मीं तुला सांगितलें. यावरून पुरुष हा एकच कसा व त्याला अनेकत्व केव्हां येतें याची समजूत तुला पडेल. १२.३.३५१.

---

## अध्याय ३५२ वा.

[ उंच्छवृत्त्युपाख्यान. ]

**युधिष्ठिर**—हे पितामहा, आपण शुभस्वरूपाचे मोक्षधर्म आतांपर्यंत सांगितले. आतां आश्रम्यांना योग्य असणारा असा धर्म कोणता, तें आपण मला सांगा.

**भीष्म**—प्रत्येक आश्रम्याला शास्त्रानें धर्म सांगितला आहे व धर्म हा स्वर्गफल देणारा व मोक्षाचें अबाधित फल देणारा आहे. धर्माला अनेक द्वारें असून त्यांपैकीं कोणत्याहि मार्गाचा आचार मनुष्यानें केला, तरी तो विफल होत नाहीं. ज्याची बुद्धि ज्या मार्गाकडे लागते व स्थिर होते, त्याला तो आणि तेवढाच मार्ग कळतो. इतर मार्गांचें आकलन त्याला होत नाहीं. हे नरव्याघ्रा, या संबंधानें पूर्वी महर्षि नारदांनीं इंद्राला सांगितलेली कथा मी तुला सांगतों ऐक. राजा, त्रैलोक्याला संमत असणारे नारदमहर्षि वायूसारख्या अप्रतिहत गतीनें सर्व लोकांत फिरत असतात. एकदां ते महाभाग ऋषि इंद्रलोकांत गेले असतांना त्या ठिकाणीं महेंद्रानें त्यांचें स्वागत केलें. नारद आपल्या आसनावर स्थित झाल्यानंतर शचीपति इंद्र त्यांना विचारितो, "हे महर्षे, आपण या जगांत कांहीं

आश्चर्यकारक गोष्ट पाहिली आहांत कां? आपल्या सिद्धिबलानें आपण सगळें चराचर त्रैलोक्य जिज्ञासाबुद्धीनें हिंडतों, आपल्याला अज्ञात असें या जगांत कांहीं नाहीं. तेव्हां, आपण ऐकिलेली किंवा आपल्या अनुभवाला आलेली अशी एखादी गोष्ट आपण मला सांगा. त्यावर वक्तृश्रेष्ठ नारदांनीं त्या इंद्राला फार मोठी कथा सांगितली. ती गोष्ट नारदांनीं इंद्राला जशी सांगितली तशीच आणि त्याच पद्धतीनें मी तुला सांगतों ती तूं ऐक. १२. ३. ३५२.

---

## अध्याय ३५३ वा.

[ उंच्छवृत्त्युपाख्यान ( पुढें चालू ). ]

भीष्म—पूर्वी गंगेच्या दक्षिण तीरावर असलेल्या एका महाशय नांवाच्या नगरामध्यें एक व्रतस्थ ब्राह्मण राहात असे. त्याचा स्वभाव सौम्य असून तो वेदांत पारंगत होता. त्याचे सगळे संशय नाहींसे झालेले होते. तो धर्मामध्यें नित्य रत असे. त्यानें क्रोध जिंकलेला होता. तो नेहमीं संतुष्ट असून जितेंद्रियवृत्तीनें राही. तो तपश्चर्या आणि अध्ययन यांच्यामध्यें रत होता. तो सत्याचें आचरण करीत असून, सज्जनांना संमत अशा मार्गानें जात असे. न्याय्यमार्गानें जेवढें धन मिळेल तेवढ्याच कष्टार्जित धनावर, आपलें शील ढळूं न देतां आपली उपजीविका चालवीत असे. त्याचें कुटुंब मोठें व प्रसिद्ध होतें. त्याचा गोतावळा मोठा होता व आल्यागेल्याला त्याच्या घरीं आश्रय मिळत असे. त्याच्या पोटीं पुत्रसंततिहि पुष्कळ होती. मुलें मोठीं झालेलीं पाहून आपल्या कुळाचाराप्रमाणें आपण आतां परमार्थाला लागावें असा विचार त्याच्या डोक्यांत आला. तेव्हां वेदोक्तधर्म, शास्त्रोक्तधर्म आणि शिष्टांनीं आचरलेला धर्म यांपैकीं कोणता धर्म चांगला? आपल्याला कल्याणकारक असा यांतील धर्म कोणता; व कशाचें आचरण केलें असतां आपल्याला परम गति मिळेल? या विचारांत तो चूर होऊन गेला. पण त्याच्या मनाचा कांहींच निश्चय होईना. अशा प्रकारें तो चिंतामग्न स्थितींत असतांना, त्याच्याकडे एक दिवस एक धर्मनिष्ठ आणि योगयुक्त असा ब्राह्मण पाहुणा आला. त्याचें स्वागत करून त्यानें त्याचा सत्कार केला व त्या ब्राह्मणाचा श्रमपरिहार झाल्यानंतर त्याला प्रश्न विचारला. १२. ३. ३५३.

---

## अध्याय ३५४ वा.

[ उंच्छवृत्त्युपाख्यान—पुढें चालू. ]

**ब्राह्मण**—हे अनघा, आपल्या मधुर वाणीच्या मोहिनीनें मी जणूं काय बांधला गेलों आहें. आपली व माझी आतां मैत्री जडली असल्यानें आपल्याला मी काय सांगतों तेवढें ऐका. हे ब्रह्मन्, प्रपंचाचा भाग मुलांच्यावर सोंपवून आतां श्रेष्ठ अशा धर्ममार्गाला लागावें, अशी माझी इच्छा आहे. तेव्हां श्रेष्ठ धर्ममार्ग कोणता, तें मला सांगा. माझी फक्त एकटें राहून आत्मज्ञान मिळविण्याची व संन्यास घेण्याची इच्छा आहे. पण परमात्म्याच्या ठिकाणीं लीन होण्याचा हा श्रेष्ठ मार्ग पत्करण्याची माझी इच्छा असली तरी, सामान्य लोकांप्रमाणें मी विषयपाशानें बद्ध झालों असल्यामुळें मला हा मार्ग पटतो पण हातून बठत नाहीं. आतांपर्यंतचें माझें आयुष्य पुत्रादिकांच्या संगतीमध्यें गेलें. आतां परलोकाची शिदोरी जमविण्याच्या मार्गाला लागावें, असें मला वाटतें. या संसारसागराच्या पलीकडील तीरावर जावें, अशी इच्छा उत्पन्न होतांच हा सागर तरून जाण्याला धर्मनौका कोणती, असा माझ्या मनांत प्रश्न उत्पन्न झाला आहे. या लोकामध्यें सात्त्विक माणसें पीडा पावतात; व लोकांच्या डोक्यावर अनेक प्रकारच्या रोगाची ध्वजा यमानें फडकत ठेविली आहे, असेंहि दिसतें. हें पाहून या संसारांतल्या भोगांमध्यें माझें चित्त रमत नाहीं; आणि म्हणून मुनींचें दर्शन घेऊन परलोकाचा मार्ग त्यांना विचारावा अशी बुद्धि मला झाली आहे. म्हणून हे अतिथे, आपल्या बुद्धिसामर्थ्यानुसार आपण मला धर्म सांगा आणि परमार्थाला लावा. त्या धर्माभिलाषी ब्राह्मणाचें तें भाषण ऐकून तो अतिथि मोठ्या गोड व अर्थपूर्ण वाणीनें त्याला म्हणतो, " बाबारे, माझी सुद्धां हीच इच्छा आहे. पण मार्ग कोणचा याबद्दल मलाहि तुझ्यासारखा संशय पडला आहे. स्वर्गाचीं द्वारें अनेक आहेत, त्यांतून कोणत्या द्वारानें आंत प्रवेश करावा हें कोडें मला उलगडत नाहीं. कांहीं लोक मोक्षमार्गाची प्रशंसा करितात; कांहीं यज्ञादि कर्में करावीं असें म्हणतात; कांहीं वानप्रस्थाश्रम स्वीकारावा म्हणतात तर दुसरे कित्येक गृहस्थाश्रमाची प्रशंसा करितात. कांहीं राजधर्म आचरावे म्हणतात, तर कांहीं आत्मफलाचा आश्रय करितात. कोणी गुरूंची सेवा करितात, तर कोणी वाचेचें नियमन करून मौन स्वीकारतात. कोणी आईबापांची सेवा करितात, कोणी अहिंसाव्रताचें आचरण करितात, तर कोणी सत्य-

निष्ठा हाच श्रेष्ठ धर्म समजतात. युद्धामध्यें शत्रूसमोर उभें राहून त्याला पाठ न दाखवितां धारातीर्थीं मरणें कोणाला आवडतें; तर कांहीं लोक उंच्छवृत्तीनें रहातात आणि आपापल्या मार्गानें जाऊन हे सर्व लोक स्वर्गाला जातात. कांहीं अध्ययनामध्यें गर्क झालेले दिसतात, कांहीं वेदव्रत पाळण्यामध्यें मग्न झालेले दिसतात व कांहीं ज्ञानी पुरुष संतुष्ट चित्तानें आणि जितेंद्रियवृत्तीनें राहून स्वर्गाला जातात. कांहीं सरळमार्गी लोकांचा दुष्ट लोक घात करतात खरे, पण हे शुद्धात्मे पुरुषसुद्धां स्वर्गपदाला पोहोंचतात. लोकांमध्यें अशीं नानाप्रकारचीं धर्मद्वारें उघडीं असलेलीं पाहून, वायूनें मेघमाला ज्याप्रमाणें हलावी, त्याप्रमाणें माझें चित्त डळमळत आहे. १२.३. ३५४.

## अध्याय ३५५ वा.

[ उंच्छवृत्त्युपाख्यान—पुढें चालू. ]

अतिथि—असें जरी आहे तरी मी तुला क्रमवार रीतीनें माझ्या गुरूनें सांगितल्याप्रमाणें धर्ममार्ग सांगतों, तो तूं नीट रीतीनें ऐकून घे. पूर्वीच्या युगांत हें धर्मचक्र ज्या ठिकाणीं फिरविलें गेलें, त्या ठिकाणीं म्हणजे नैमिषारण्यांतील गोमती नदीच्या कांठीं एक ‘ नाग ’ नांवाचें नगर होतें. त्या ठिकाणीं सर्व देवांनीं मिळून यज्ञ केले होते. तेथेंच ‘ मांधाता ’ नांवाच्या राजानें यज्ञ करून इंद्रालाहि खालीं पहावयास लावलें. त्या ठिकाणीं ‘ पद्मनाभ ’ नांवाचा एक धर्मात्मा नाग रहात आहे. त्याला बहुधा ‘ पद्म ’ असेंच म्हणतात. कर्म, ज्ञान व उपासना या तिन्ही मार्गांचा आश्रय करून हा कायेनें, वाचेनें आणि मनानें प्राणिमात्रांना संतुष्ट करीत असतो. साम, दाम, दंड आणि भेद या चारी उपायांनीं तो प्राणिमात्रांना संतुष्ट ठेवीत असतो व आपल्या चक्षुरादि इंद्रियांचा लय परमात्म्याचे ठिकाणीं करून त्यांचा योग्य विनियोग करीत असतो. हे ब्रह्मन्, योग्य मार्गाचें उल्लंघन न करितां या ब्राह्मणाकडे जाऊन तुला हवी असलेली गोष्ट त्याला विचार. तो परम श्रेष्ठ धर्म कोणता, हें तुझी दिशाभूल न करितां तुला सांगेल. हा नाग सर्वांचा सत्कार करणारा आहे. तो ज्ञानमार्गामध्यें मोठा प्रवीण असून सर्व प्रकारचे उत्तमोत्तम आणि स्पृहणीय गुण त्याच्या ठिकाणीं आहेत. तो प्रकृतीनें पाण्यासारखा आहे; अध्ययनाच्या ठिकाणीं त्याची निष्ठा आहे; तो तपस्वी असून दान्त आहे; त्याचें चारित्र्य अत्यंत शुद्ध आहे. तो यज्ञकर्में करितो

दान देतो. तो क्षमावृत्तीचा आहे. त्याचा आचार श्रेष्ठ आहे. तो सत्य-भाषणी आहे; त्याच्या ठिकाणीं मत्सर नाहीं, व तो जितेंद्रिय असून शीलसंपन्न आहे. सर्वांना देऊन उरेल तेवढेंच अन्न तो भक्षण करितो. त्याचें भाषण सर्वांना अनुकूल असें असतें. तो सर्वांचा हित-कर्ता आहे, सरळमार्गी आहे व त्याच्या ठिकाणीं कार्याकार्यविवेक उत्तम प्रकारचा आहे. तो कोणाशीं वैर करीत नाहीं व प्राणिमात्रांचें हित साधण्यांत तत्पर असतो. गंगेच्या डोहांतील पाण्याप्रमाणें तो पवित्र व सज्जनांनीं परिवृत असा असतो. १२.३.३५५

---

## अध्याय ३५६ वा.

[ उंच्छवृत्त्युपाख्यान—पुढें चालू. ]

**ब्राह्मण**—या धर्मचिंतेचा माझ्या डोक्यावर फार मोठा भार झाला होता. हा भार आपण आपल्या समाधानकारक वाक्यांनीं उतरला आहांत. वाट चालून थकलेल्याला शय्या, उभें राहून थकलेल्याला आसन, तहानेलेल्याला पाणी आणि भुकेलेल्याला अन्न, पाहुण्याला योग्य वेळीं इष्टान्नाची प्राप्ति, म्हातारपणीं पुत्राची प्राप्ति व मनानें चिंतिलेल्या प्रेमळ स्नेह्यांचें दर्शन, या गोष्टी जशा आनंददायक असतात तसेंच आपलें बोलणें मला आनंददायक वाटतें. आपण मला ज्ञानपूर्ण असा उपदेश जो केला, त्यामुळें मला जणूं नवीन दृष्टि आली, आणि आपल्या म्हणण्यावर मी आतां त्या दृष्टीनें विचार करीत आहें. आपण म्हणतां तसेंच मी करीन. हे साधो, हा मंदतेज सूर्य आतां अस्ताला चालला आहे तर आजची रात्र माझ्या घरीं राहून व सुखानें विश्रान्ति घेऊन सकाळीं येथून जावें.

**भीष्म**—हे शत्रुसूदना, त्या ब्राह्मणाचा सत्कार स्वीकारून तो सबंध रात्रभर त्या ब्राह्मणाच्या घरीं राहिला व त्या दोघांनीं ती सबंध रात्र मोक्षधर्मासंबंधीचीं भाषणें करण्यांत सुखानें दिवसासारखी घालविली. नंतर उजाडल्यावर त्या ब्राह्मणानें आपलें कार्य सिद्धीस जावें या इच्छेनें त्या अतिथीचें यथाशक्ति पूजन केलें. नंतर त्या धर्मनिष्ठ ब्राह्मणानें आपण काय करावें, याबद्दल मनाशीं ठाम निश्चय केला आणि आपल्या माणसांची अनुज्ञा घेऊन, तो त्या अतिथीनें सांगितल्याप्रमाणें त्या पद्मनाभाकडे गेला. १२.३.३५६.

## अध्याय ३५७ वा.

[ उंच्छवृत्त्युपाख्यान—पुढें चालू. ]

**भीष्म**—तो ब्राह्मण नानाप्रकारच्या अरण्यांतून, तीर्थांवरून व सरोवरांवरून जात असतांना त्याला एक मुनि भेटला. त्या मुनीला त्यानें त्या ब्राह्मणानें सांगितलेल्या नागाची माहिती विचारिली व त्यानें सांगितलेल्या मार्गानें तो गेला. त्या ज्ञानी ब्राह्मणानें नागाच्या घरीं जाऊन यथान्याय रीतीनें 'भोः' या अक्षरांनीं युक्त अशी 'अहमस्मि' अशी वाणी उच्चारिली. त्याचें तें वचन ऐकून त्या नागाची धर्मनिष्ठ, रूपवती आणि पतिव्रता पत्नी बाहेर आली. व तिनें त्याची विधिवत् पूजा करून त्याचें स्वागत केल; आणि आपल्याकरितां मी काय करूं, म्हणून त्याला विचारिलें. त्यावर तो ब्राह्मण तिला म्हणाला, "आर्ये, तुझ्या पूजेनें व मधुर वाणीनें मी संतुष्ट झालों आहें. मला नागश्रेष्ठ पद्माची गांठ घ्यावयाची आहे. माझें महत्त्वाचें काम तें हेंच; आणि याच उद्देशानें मी येथें आलों आहें."

**नागभार्या**—आर्य पद्मनाभ सूर्याचा रथ वहाण्यासाठीं गेले आहेत. त्यांची महिन्याची मुदत भरण्यास सात आठ दिवसांचा अवकाश आहे. त्यानंतर ते येतील. ते आज येथें नसून प्रवासांत आहेत, याचें कारण मी आपणाला सांगितलें. आतां आपल्याकरितां मी आणखी काय करूं, तें मला सांगा.

**ब्राह्मण**—साध्वि, नागाचें दर्शन घ्यावयाचें असा पूर्ण निश्चय करून मी या ठिकाणीं आलों आहें. या वनामध्यें त्याची वाट पहात मी राहीन. तो पद्मनाभ नाग येथें आल्याबरोबर ताबडतोब त्याला मी आल्याचें कळीव व माझ्या येण्याचा हेतूहि त्याला सांग. मी या गोमतीच्या पवित्र तीरावर तूं दिलेली मुदत संपेपर्यंत मिताहार करून वाट पहात रहातों. नंतर त्या ब्राह्मणानें त्या नागपत्नीचें पुनः पुनः समाधान केलें व तो गोमती नदीच्या पवित्र वाळवंटामध्यें गेला. १२.२.३५७.

---

## अध्याय ३५८ वा.

[ उंच्छवृत्त्युपाख्यान पुढें चालू. ]

**भीष्म**—तो तपस्वी ब्राह्मण कांहीं आहार न घेतांना त्या वाळवंटांत रहात आहे, असें पाहून त्या नागांना अतिशय दुःख झालें. नंतर त्या नागाचे बांधव सर्व मिळून त्या ब्राह्मणाकडे गेले. त्या ठिकाणीं तो ब्राह्मण कांहीं आहार न घेतां व्रतस्थ राहून एकसारखा जप करीत पडला आहे, असें पाहून त्या मंडळींनीं त्याची पुनः पुनः पूजा केली व त्याला स्वच्छ भाषेनें म्हटलें, "हे तपोधना, आपल्याला येथें आल्याला आज सहावा दिवस. आपण कोणताहि आहार घेतला नाहीं. हे धर्मवत्सला आपण आमच्याकडे आलांत, आणि आम्ही आपल्या उपासनेमध्यें तत्पर आहोंत. आपलें आतिथ्य करणें हा आमचा धर्म आहे. कारण आम्ही सर्व कुटुंबी आहोंत. तेव्हां कंद, मुळें, फळें, पानें किंवा निदान पाणी, यापैकीं कांहींतरी आहार आपण घ्यावा. आपण या अरण्यांत राहून आहाराचा त्याग करीत आहांत. ह्या धर्मसंकरामुळें येथील आबालवृद्धांना पीडा होत आहे. आमच्या कुळांत आजपर्यंत कोणी भ्रूणहत्या केली नाहीं; संकटांत सांपडला असतांहि कोणी खोटें बोलला नाहीं व देवता, अतिथि आणि बांधव यांना खाऊं घालण्यापूर्वीं कोणीं अन्नग्रहणहि केलें नाहीं.

**ब्राह्मण**—तुमच्या म्हणण्याप्रमाणें मी आहार केला आहे, असें घेऊन चाला. नागाला यावयास अद्याप आठ दिवस आहेत. आठ दिवसांनीं जर तो नाग आला नाहीं, तर आठवे दिवशीं मी आहार घेईन. कारण हें व्रत मी त्याच्याकरितांच घेतलें आहे. आपण व्यर्थ संताप करून घेऊं नका; जसे येथें आलांत तसेच आल्या ठिकाणीं परत जा. मी घेतलेलें हें व्रत त्या नागासाठीं असून हें मला मोडावयास लावूं नका.

त्या ब्राह्मणानें अशा तऱ्हेनें निरोप दिल्यावर ते सर्व नाग, त्यांचें कांहीं न चालल्यामुळें आपापल्या घरीं गेले. १२.३.३५८.

---

## अध्याय ३५९ वा.

[ उंच्छवृत्त्युपाख्यान पुढें चालू. ]

**भीष्म**—नंतर, असाच पुष्कळ काल गल्यावर, आपलें काम संपवून व सूर्याची अनुज्ञा घेऊन तो नाग घरीं आला. घरीं आल्यानंतर त्याच्या पत्नीनें पादोदक वगैरे देऊन त्याच स्वागत केलें. तेव्हां, त्या नागानें आपल्या पत्नीला विचारलें कीं "हे कल्याणि, तुला पूर्वी सांगितलेल्या विधीनें व तुला स्वतःला सुचणाऱ्या तशाच दुसऱ्या मार्गांनीं तूं आजपर्यंत देवता व अतिथि यांचें पूजन करीत होतीस ना? हे सुश्रोणि, माझ्या वियोगामुळें व स्त्रीबुद्धीमुळें तुझ्या धर्माचरणांत न्यून तर पडलें नाहीं?"

**नागभार्या**—गुरुशुश्रूषा हा शिष्यांचा धर्म होय. वेदाध्ययन हा ब्राह्मणाचा धर्म; धन्याची आज्ञा पाळणें हा सेवकाचा धर्म; प्रजांचें पालन करणें हा राजाचा धर्म; सर्व प्राणिमात्रांचें रक्षण करणें हा क्षत्रियांचा धर्म. आतिथ्यधर्म संभाळून यज्ञ करविण हा वैश्यधर्म व ब्राह्मण, क्षत्रिय आणि वश्य या त्रैवर्णिकांची सेवा करणें हा शूद्रधर्म होय. सर्व प्राणिमात्रांच्या हिताची इच्छा करणें हा गृहस्थाचा धर्म आहे. आहार परिमित ठेवणें, नित्य व्रतस्थ रहाणें, इंद्रियें आपल्या आहारीं ठेवणें, मीं कोण कोणाचा, कोठून आलों व या जगांत माझा कोण या प्रश्नांचा विचार करीत राहणें हा संन्याशाचा धर्म होय. पतीशीं एकनिष्ठ रहाणें हा पत्नीचा परम श्रेष्ठ धर्म आहे. हे नागेंद्रा, आपल्या उपदेशामुळेंच या धर्मांचें यथार्थ ज्ञान मला झालें आहे. धर्माचें ज्ञान मला असतांना व आपल्या धर्माचरणाचें उदाहरण डोळ्यांपुढें असतांना मीं सन्मार्ग सोडून कशी जाईन? हे महाभागा, देवांचें पूजन व्यवस्थित चाललें असून त्यांत खंड पडलेला नाहीं. तसेंच अतिथींचा सत्कारहि मीं नित्य निरलसपणें करीत असतें. आज, सात आठ दिवस झाले, एक ब्राह्मण येथें आला आहे. तो आपलें कार्य मला सांगत नाहीं व आपलेंच दर्शन पाहिजे असें म्हणतो. गोमती नदीच्या तीरावर वेदांचा जप करीत व आपल्या दर्शनाची वाट पहात तो ब्राह्मण व्रतस्थ राहिला आहे. आपण आल्याबरोबर आपल्याला त्याच्याकडे घेऊन जाव असें त्या ब्राह्मणानें मला पुनः पुनः सांगितलें आह. तेव्हां, आपण त्या ठिकाणीं जाऊन त्याला दर्शन द्यावें हें उचित होय. १२.३.३५९.

## अध्याय ३६० वा.

[ उंच्छवृत्त्युपाख्यान पुढें चालू ]

**नाग**—हे शुचिस्मिते, तो ब्राह्मणच आहे कीं ब्राह्मणवेषधारी कोणी देव आहे याचा तूं विचार केलास का? माझें दर्शन घेण्याची इच्छा धरून, दर्शन देण्याविषयीं मला जवळ जवळ आज्ञा करण्याइतका महासमर्थ मनुष्यप्राण्यामध्यें कोण आहे? आम्हीं नाग मोठे पराक्रमी, चपल व देवादिकांनाहि पूज्य असे आहों. आमच्या अनुयायांना आम्हीं वर देत असतों. आमचें दर्शन दुर्लभ आहे हें तर खरेंच; पण, त्यांतहि मनुष्यांना आमचें दर्शन विशेषच दुर्लभ होय असें माझें मत आहे.

**नागभार्या**—हे पवनाशना, त्याच्या सरळपणावरून तो देव नसावासें वाटतें. त्याच्यामध्यें एक गोष्ट मात्र प्रामुख्यानें दिसते व ती म्हणजे त्याची आपल्या ठिकाणची आत्यंतिक निष्ठा ही होय. चातकपक्ष्याला जशी पाण्याचीच एक आस असते, तशी त्याला आपल्या दर्शनाची आस आहे. मोराला ज्याप्रमाणें पावसाचा वर्षाव आवडतो व तो जशी त्याचीच इच्छा धरितो त्याप्रमाणेंच तो आपल्या दर्शनाची वाट पहात आहे. आपलें दर्शन होण्यापूर्वींच त्याला कांहीं विघ्न न येवो म्हणजे झालें. उत्तम वंशांत जन्मास आलेल्या कोणत्याहि नागानें आजपर्यंत आतिथ्यधर्म सोडला नाहीं. तेव्हां, राग टाकून आपण त्या ब्राह्मणाला दर्शन द्यावें हें उचित होय. त्याचा आशाभंग करून आपण स्वतःची पुण्याई कमी करून घेऊं नये, असें मला वाटतें. आपल्याकडे आशेनें आलेल्या माणसांचे दुःखाश्रु पुसून न काढणाऱ्या माणसाला भ्रूणहत्येचें पातक लागतें. मग, तो राजा किंवा राजपुत्र कोणींहि असो, मौन धारण केल्यानें ज्ञानाचें फल प्राप्त होतें. दान केल्यानें महद्यश पदरीं पडतें. खरें बोलल्यानें वाक्संयम केल्याचें पुण्य घडतें व परलोकीं या माणसाची कीर्ति पसरते. भूमिदान केल्यानें आश्रमधर्मांचें आचरण केल्यासारखें होतें. न्याय्य गोष्ट मिळविण्याची खटपट केल्यानें त्याचेंहि फल मिळतें. स्वतःच्या हिताची व आपल्याला आवडणारी अशी गोष्ट केल्यानें मनुष्याला नरकांत पडावें लागत नाहीं, असा धर्मशास्त्रवेत्त्यांचा सिद्धांत आहे.

**नाग**—हे साध्वि, माझा राग हा गर्वामुळें उत्पन्न झालेला नसून तो एक स्वभावसिद्ध जातिदोष आहे. तूं आपल्या वाचारूप अग्नीनें माझा राग जाळून टाकला आहेस. रागाच्या आहारीं जाऊन अधिकच तमोभ्यास होण्याची माझी

इच्छा नाहीं. सर्पांची जात अति रागीट असा त्यांचा आधींच दुर्लौकिक झालेला आहे. रागाच्या सपाट्यांत सांपडल्यामुळेंच, एरवीं इंद्राचाहि पराभव करूं शकणाऱ्या प्रतापी रावणाला रामानें युद्धांत जिंकलें. अंतःपुरांतून कामधेनूचा वत्स परशुरामानें नेल्याची वार्ता ऐकतांच कार्तवीर्याचे पुत्र क्रोधवश झाले व त्या क्रोधामुळेंच त्यांचा नाश झाला. एका रागाच्या आहारीं गेल्यामुळेंच इंद्रासारख्या तजस्वी कार्तवीर्याला जामदग्न्य रामाच्या हातून युद्धांत मरण आलें. तेव्हां, हा तपश्चर्येचा शत्रु व कल्याणाच्या मार्गांत विघ्न आणणारा क्रोध तुझ्या सांगण्यावरून मीं आंवरून धरीत आहें. हे विशालाक्षि, तुझ्यासारखी गुणी व संकटांत सांवरून धरणारी गुणी भार्या मिळाल्यामुळें मीं स्वतःला विशेष धन्य समजतों. तो ब्राह्मण ज्या ठिकाणीं आहे तेथें हा मीं आतांच चाललों पहा. तो आज कृतार्थ होऊन जाईल यांत शंका नको. १२. ३. ३६०.

---

## अध्याय ३६१ वा.

[ उंच्छवृत्त्युपाख्यान पुढें चालू ]

**भीष्म**—पुढें तो नागश्रेष्ठ त्या ब्राह्मणाचें व त्याच्या अपेक्षित कार्याचें चिंतन करीत करीतच गोमती तीरावर गेला. त्या ब्राह्मणाजवळ गेल्यावर त्या बुद्धिमान् व जातीच्याच धर्मवत्सल अशा नागश्रेष्ठानें त्याला मधुर वाणीनें म्हटलें, "हे ब्राह्मणा, तूं मजवर राग धरूं नकोस; मला क्षमा कर. तूं येथें आलास तो कशासाठीं व तुला काय पाहिजे तें मला सांग. माझा तुझ्याशीं कसलाहि वैरभाव नाहीं. मीं तुझ्याजवळ येऊन स्नेहानें तुला तुझी हकीकत विचारीत आहें. गोमतीच्या या निर्जन वाळवंटांत राहून तूं कोणाची उपासना करीत आहेस तें मला सांग."

**ब्राह्मण**—हे द्विजश्रेष्ठा, माझें नांव धर्मारण्य असून मीं पद्मनाभ नांवाच्या नागाचें दर्शन घेण्यासाठीं येथें आलों आहें. माझें त्याच्याशीं काम आहे. तो येथें नसतांना त्याच्या आप्तेष्टांनीं तो कामाला गेल्याचें मला सांगितलें. त्यावरून, चातकानें पर्जन्याची वाट पाहावी त्याप्रमाणें मी त्याची सारखी वाट पहात आहें आणि त्याचे क्लेश निवारण व्हावे व त्याचें कल्याण व्हावें या इच्छेनें या ठिकाणीं राहून मीं योगयुक्त व निरामय स्थितींत वेदमंत्रांचा जप करीत आहें.

**नाग**—हे ब्रह्मन् , दुसऱ्याचें कल्याण इच्छिण्याची आपली मनोवृत्ति खरोखरच अवर्णनीय आहे. आपण साधुपुरुष असून सज्जनवत्सल आहांत. आपल्यांत दोष काढावयास जागा नसून आपण अत्यंत दयाळू आहांत. आपल्याला ज्याच्या दर्शनाची इच्छा आहे तो पद्मनाभ नाग मींच. हे विप्रर्षे, मीं आपलें काय प्रिय करावें त्याबद्दलची मला आज्ञा करा. आपल्याबद्दलची माहिती मला आतांच माझ्या माणसांनीं सांगितली. ती ऐकून मीं स्वतःच आपल्या दर्शनासाठीं आलों आहें. आपण येथपर्यंत आल्यासारखे येथून कृतार्थ होऊन जावें अशी माझी इच्छा आहे. तेव्हां, आपलें काय कार्य असेल तें आपण मला निःशंकपणें सांगा. आपण स्वहिताकडे दुर्लक्ष करून माझ्या हिताची इच्छा धरितां हें विशेष असून, या तुमच्या विशिष्ट गुणांनीं तुम्हीं आम्हां सर्वांना जणूं विकत घेतलें आहे.

**ब्राह्मण**—हे महाभागा, तुझ्या दर्शनाची इच्छा धरूनच मीं येथें आलों असून मला न समजणारा असा एक विषय तुला विचारावयाचा आहे. जीवात्म्याची परम गति जो परमात्मा त्याचें मीं अंतर्मुख दृष्टीनें ध्यान करण्याचा प्रयत्न करीत आहें. पण माझें चंचल चित्त विषयांपासून पराङ्मुख होत नाहीं व मला विषय हे दुःखद असल्याचें ज्ञान असल्यामुळें संसारांतहि धड लक्ष लागत नाहीं. तुझ्या गुणांमधून यशोरूपी किरण बाहेर पडत आहेत व त्यांचा प्रकाश सर्वत्र पसरला आहे. तुझे गुण चंद्राप्रमाणें आल्हाददायक व मनोहर असून ते स्वयंप्रकाश आहेत; म्हणून, मला आलेल्या संशयाचें तूं प्रथम निरसन कर; म्हणजे मग, मीं माझें कार्य काय तें तुला सांगेन. १२.३.३६१.

---

## अध्याय ३६२ वा.

[ उंच्छवृत्त्युपाख्यान—पुढें चालू ]

**ब्राह्मण**—हे सर्पश्रेष्ठा, तूं आपली पाळी असेल त्यावेळेस सूर्याचा एकचाकी रथ ओढावयास जात असतोस. त्या ठिकाणीं तुला आश्चर्यकारक असें कांहीं दिसलें असल्यास तें मला सांग.

**नाग**—भगवान् रवि हा नानाप्रकारच्या आश्चर्यांचा एक निधीच आहे. त्रैलोक्यसंमत अशा सर्व भूतांची प्रवृत्ति याच्यापासूनच होते. झाडांच्या शाखांवर ज्याप्रमाणें अनेक पक्षी बसावे त्याप्रमाणें सूर्याच्या हजारों किरणांच्या आश्रयानें हजारों सिद्ध मुनि आपापल्या दैवतांसह रहातात. वायूसुद्धां सूर्यकिरणांचा आश्रय

करून रहातो व तेथून निघून नंतर सर्व आकाशभर पसरतो. तेव्हां, यापेक्षां अधिक मोठें आश्चर्य कोणतें? आपल्या आत्यंतिक तेजानें तळपणारा महान् अंतर्यामी देखील सूर्यमंडळाच्या मध्यभागीं राहून लोकांचें निरीक्षण करतो; यापेक्षां आणखी मोठें आश्चर्य तें काय? शुक्र या नांवाचा एक काळा मेघ आकाशांत असून तो सूर्याचाच एक किरण होय. हाच पावसाळ्यांत पाऊस पाडीत असतो. यापेक्षां अधिक आश्चर्य तें काय? आठ महिने आपल्या पवित्र किरणांनीं शोषून घेतलेलें पाणी सूर्य योग्यकालीं पुनः पृथ्वीवर परत पाठवितो यापेक्षां अधिक मोठें आश्चर्य तें काय? ज्याच्या तेजोविशेषाच्या ठिकाणीं आत्मस्वरूप स्थित असतें, व ज्याच्यामुळें स्थावरजंगम पृथ्वी बीजधारणा करते व ज्याच्या ठिकाणीं अनादिनिधन महाबाहु अशा शाश्वत पुरुषोत्तमाचा वास असतो अशा सूर्यापेक्षां अधिक आश्चर्यकारक तें काय असणार? परंतु, सूर्याच्या संगतींत आकाशांतून विहार करीत असतांना माझ्या दृष्टीस पडलेली सर्वांत आश्चर्यकारक गोष्ट मी तुला सांगतों ती ऐक. पूर्वीं एकदां सूर्य सर्व लोकांवर तळपत असतांना मध्यान्हाच्या वेळेला एकाएकीं दुसराच एकादा सूर्य उगवल्याप्रमाणें प्रकाश चोंहीकडे दिसूं लागला. तो तेजाचा लोळ आपल्या प्रकाशानें सर्वांना दिपवून टाकीत टाकीत, व आकाश जणूं फोडीत फोडीत सूर्याकडे येत होता. अग्नीमध्यें आहुति टाकल्यानंतर तो जसा पूर्ण प्रज्वलित झालेला दिसतो, तसा स्वतःच्या तेजानें जगाला तो व्यापून राहिला होता. त्याच्या तेजामुळें त्याचें स्वरूप आम्हांला नीट उमगत नव्हतें व तो दुसरा जणूं सूर्यच, असा भास होत होता. तो तेजाचा लोळ आपल्याकडे येतो असें पाहून सूर्यानें आपले दोन्ही हात त्याच्या स्वागतासाठीं पुढें केले व त्यानेंहि सूर्याचा मान राखण्यासाठीं आपला हात पुढें केला. नंतर तो आकाश जणूं फोडून टाकून सूर्याच्या तेजांत प्रविष्ट झाला. तें तेज क्षणार्धांत सूर्यांत मिसळून जाऊन त्याच्याशीं एकरूप झालें. तेव्हां आम्हांला असा संशय आला कीं, या दोन तेजोगोलांपैकीं खरा सूर्य कोण? हा रथांतला किंवा तो बाहेरून आलेला? तेव्हां आम्ही आमची शंका सूर्याला विचारिली कीं, हा स्वर्गाचें आक्रमण करणारा व दुसऱ्या सूर्याप्रमाणेंच असणारा हा कोण? १२. ३. ३६२.

---

## अध्याय ३६३ वा.

[ उंच्छवृत्त्युपाख्यान—पुढें चालू ]

**सूर्य**—हा देव नाहीं, अग्नि नाहीं. हा राक्षस नव्हे, हा नाग नव्हे, तर उंच्छवृत्तीनें राहण्याचें आपलें व्रत संपवून व त्यांत सिद्धि मिळवून स्वर्गाला आलेला एक ऋषि आहे. या ब्राह्मणानें योग-युक्त चित्तानें तपश्चर्या केली होती व क्रमाक्रमानें कंद, मुळें, फुलें, गळून पडलेलीं पानें, पाणी आणि वायु यांचा आहार करीत तो राहिला होता. या ब्राह्मणानें संहितामंत्रांनीं शंकराची स्तुति केली होती. स्वर्गद्वारासाठीं त्यानें अशा तऱ्हेची खटपट केल्यावरून त्याला स्वर्गलोकाची प्राप्ति झाली. त्यानें सगळा संग टाकून दिला होता. त्याला कसलीहि आशा नव्हती व तो नेहमीं शिलोंच्छवृत्तीनें राहात असे. सर्पहो, हा ब्राह्मण सर्व प्राणिमात्रांच्या हितासाठीं खटपट करीत असे. देव, गंधर्व, असुर आणि नाग यांपैकीं कोणाचीहि सत्ता अशी उत्तम गति मिळालेल्या लोकांच्यावर चालूं शकत नाहीं.

हे ब्रह्मन्, आम्ही त्या ठिकाणीं जी आश्चर्यकारक गोष्ट पाहिली ती हीच. तो मुनि मनुष्य असूनहि या व्रतामुळें त्याला सिद्धि मिळाली; आणि सूर्याशीं एकरूप होऊन त्याच्याबरोबर तो सर्व पृथ्वीभोंवतीं फिरत आहे. १२.३.३६३.

---

## अध्याय ३६४ वा.

[ उंच्छवृत्त्युपाख्यान—पुढें चालू. ]

**ब्राह्मण**—हे सर्पश्रेष्ठा, तूं सांगतोस ही गोष्ट आश्चर्यकारक आहे, यांत शंका नाहीं. मी तुझ्यावर अत्यंत संतुष्ट झालों आहें व तूं मला मोठ्या अन्वर्थक अशा शब्दांनीं माझा मार्ग सांगितला आहेस. हे साधो, मी आतां जातों. तुझें कल्याण असो. कांहीं काम लागेल तर, त्या वेळेस माझी आठवण ठेऊन मला निरोप पाठव.

**नाग**—आपल्या मनांतलें कार्य सांगितल्यावांचून आपण कोणीकडे चाललां? हे ब्रह्मन्, ज्या कार्यासाठीं आपण येथें आलांत, तें कार्य मला सांगा. आपण आपलें कार्य मला उघड सांगितलें नसेल, व कदाचित् मी तें करूनहि गेलों असेन. तरी पण मला विचारून माझा निरोप घेऊन नंतर आपण जावें, हें योग्य होय. तुमचा आमचा स्नेह जमला असतांना एकाद्या झाडाखालीं भेट झाल्याप्रमाणें

नुसतें माझें दर्शन आपण घेऊन जावें, हें योग्य नव्हे. हे द्विजश्रेष्ठा, आपली माझ्या ठिकाणीं व माझी आपल्या ठिकाणीं भक्ति आहे. हे अनघा, मी असतांना आपल्याला चिंता कसली ?

ब्राह्मण—हे महाप्राज्ञा, ज्ञानी सर्पश्रेष्ठा, तूं म्हणतोस तें खरें आहे. देव तुझ्या पलीकडे नाहींत. आदित्यमंडळांतील पुरुष तो तूंच, मीहि तोच; आणि जो मी, तोच तूं. सर्व भूतांची परम गति जो परमपुरुष तो आणि आपण दोघे एकच. पुण्यसंचय कसा करावा याबद्दल माझ्या मनांत संशय होता. पण, हे साधो, माझा अर्थ सिद्ध करून देणारें उंच्छव्रत मी यापुढें आचरीन हा माझा निश्चय समज. माझें कार्य उत्तम प्रकारें झालें. मी कृतार्थ झालों. हे भुजंगमा, आतां मी तुझा निरोप घेतों. १२. ३. ३६४.

---

## अध्याय ३६५ वा.

[ उंच्छवृत्त्युपाख्यान—पुढें चालू. ]

भीष्म—हे राजा, याप्रमाणें मनाचा निश्चय करून त्या ब्राह्मणानें त्या नागाचा निरोप घेतला. व तो त्या उंच्छव्रताची दीक्षा घेण्यासाठीं च्यवनभार्गवाकडे गेला. त्याच्याकडून सर्व संस्कार करून घेतल्यानंतर, तो त्याच व्रताचें आचरण करीत राहिला आणि ही कथा त्यानें च्यवनभार्गवाला सांगितली. च्यवनभार्गवानें ही कथा जनकाच्या घरीं महात्म्या नारदाला सांगितली. नारदानें ही कथा इंद्राच्या दरबारांत त्या सदाचारी महेंद्रानें विचारल्यावरून सांगितली. हे राजा, देवराज इंद्रानें ही पवित्र कथा पूज्य अशा ब्राह्मणांना सांगितली. माझें आणि परशुरामाचें ज्या वेळेस अत्यंत भयंकर युद्ध झालें, त्या वेळेला वसूंनीं ही कथा मला सांगितली. व तूं मला विचारल्यावरून आज, हे युधिष्ठिरा, ही कथा मी तुला सांगत आहें. राजा, तूं मला विचारलेला परम धर्म हा त्या ब्राह्मणानें आचरलेला धर्मच होय. तो ब्राह्मण या धर्माचें आचरण करीत असतांना निराकांक्ष स्थितींत राहात असे व आपली वृत्ति धैर्याची ठेवी. त्याला त्याचें कर्तव्य कोणतें, हें पद्मनाभ नागानें सांगितलें होतें. त्याप्रमाणें आपल्या मनाचा निश्चय करून, तपश्चर्येचे कष्ट सहन करीत करीत, व शेतांतील खळ्यावरून मोजके दाणे टिपून त्यावर निर्वाह करीत तो वनांतराला गेला. आणि उंच्छवृत्तिधर्माच्या आचरणानें पुढें त्याला उत्तम गति प्राप्त झाली. १२.३.३६५.

[ शांतिपर्व समाप्त. ]